कै. विष्णुशास्त्री ऊर्फ तात्यासाहेब पुराणिक, राहणार पनवेल, यांच्या पत्नी श्रीमती रमाबाई पुराणिक यांच्या पुरस्काराच्या मदतीनें प्रकाशित होणारें

## श्रीधूतपापेश्वर

म्हणजे

# श्रीशिवलिंगोपासना

कली देवो महेश्वरः । कूर्मपुराण

"Oh India! forget not that the God thou worshippest is the Great Ascetic of ascetics, the all renouncing Shankar."

*(Vivekananda)*


लेखक

डॉ. सदाशिव कृष्ण फडके, डी. ओ. सी.

नवयुगधर्ममालाकार, पनवेल.





१९५४

॥ श्री ॥

# प्रस्तावना

आनंदमानंदकरं प्रसन्नम् । ज्ञानस्वरूपं निजबोधरूपम् ।
योगींद्रमीड्यं भवरोगवैद्यम् । श्रीमद्गुरुं नित्यमहं नमामि ॥ १ ॥
—श्रीसद्गुरुस्तोत्र.

सुमारें पंचेचाळीस-पन्नास वर्षे झालीं असतील, माझ्या मनाला विशेषेंकरून चार देवतांच्या विलक्षण स्वरूपांबद्दल विचार पडला होता. त्या देवता म्हणजे ( १ ) त्रिमूर्ति दत्तात्रेय. माझें गोत्र अत्रि आहे. तेव्हां आत्रेय श्रीदत्तगुरु हे माझे वडील गोत्रज बंधूच आहेत. दुसरे, श्रीगजानन, माझे कुलस्वामी श्रीगणपति आहेत. त्यांचा वार्षिक उत्सव हा आमच्या घरचा पूर्वीपासूनचा कुलाचारच आहे. तिसरे, महाराष्ट्रांत सर्वांत ज्यांच्या मूर्ति अगदीं खेडोपाडीं सुद्धां अधिक आढळतात, ते वानरमुख श्रीहनुमान. हेंच माझ्या श्रीसद्गुरूंचें तत्त्वतः स्वरूप असावें, असें मानतात. तसेंच चवथे, माझी जन्मभूमि वसई येथील लिंगरूपांत पुजले जाणारे मुख्य ग्रामदेव श्रीसिद्धेश्वर, हे आमच्या घरापासून अगदीं जवळ असल्यामुळें व त्यांचें देऊळ फार मन्द असल्यामुळें त्यांच्यावर माझी बाळपणापासून फार प्रीति आहे. तेच माझे इष्ट देव होत.

यांपैकीं श्रीत्रिमूर्ति दत्तात्रेयासंबंधीं श्रीदत्तभक्तरहस्य, ( २ ) श्रीगजाननासंबंधीं श्रीमंगलमूर्ति गणेश व ( ३ ) वानरमुख श्रीहनुमंतासंबंधीं अकरा हनुमंतांशीं हितगूज हे तीन ग्रंथ शके १८५३ ते १८६३ या दहा वर्षांच्या अवधींत मीं लिहिले, व ते प्रसिद्धहि झाले.

अखेर लिङ्गरूपांत पुजले जाणारे माझे इष्ट देव श्रीशिव यांचाच काय तो विचार करावयाचा राहिला होता. तो मी यथावकाश करीतच होतों. पुढें त्यास मूर्तरूप येण्यास एक निमित्त झालें. माझे पूज्य व सन्माननीय गुरुबंधु कै. विष्णु कृष्णशास्त्री ऊर्फ तात्यासाहेब पुराणिक यांची कोंकणचीं कुलदैवतें श्रीधूतपापेश्वर व श्रीआर्यादुर्गा हीं होतीं. त्यांच्यावर तात्यासाहेबांची फार निष्ठा असे. त्यांनीं पनवेल येथें स्थापन केलेल्या आर्यौषधि कारखान्यास "श्रीधूतपापेश्वर आरोग्यमंदिर" हेंच नांव त्यांनीं दिलें होतें. त्यांच्याकडे

दर सोमवारीं लघुरुद्र होत असतो शिवाय मधून मधून धोपेश्वरीं जाऊन ते महारुद्र करीत सन १९०५ सालीं राजापूरची श्रीगंगा आली असता त्यांनीं तेथें जाऊन महारुद्र केला होता तेव्हा मी त्यांच्याबरोबर होतों. तेव्हाच मला त्यांच्यामुळें धोपेश्वरीं श्रीसद्गुरु काकामहाराज पुराणिक यांच्या समाश्रयाचा सुयोग घडून आला

कै. तात्यासाहेब पुराणिक यांच्या पश्चातहि त्यांच्या घरीं श्रीधूतपापेश्वराची उपासना व दर सोमवारीं लघुरुद्र होतच असतो. सुमारें बारा तेरा वर्षांपूर्वी कै तात्यासाहेब यांचे पश्चात् त्यांचे सन्माननीय चिरंजीव श्री. नानासाहेब पुराणिक यांनीं मला सहज एक दिवस असा प्रश्न विचारला कीं, "आमचें कुलदैवत श्रीधूतपापेश्वर आहे पण कित्येक आधुनिक विद्वानांच्या लेखांतून, श्रीशिवलिंगोपासनेसंबंधीं, तो देव अनार्यांचा अवैदिक आहे व त्याचें शिवलिंग हें प्रतीक अश्लील आहे, असे मततेच विकल्प वाचण्यात येतात त्यास काहीं उत्तर आहे काय?" त्यावर मीं त्यास म्हटलें कीं, "त्याचा खुलासा थोडक्यात करता येण्यासारखा नाहीं" तेव्हा ते म्हणाले कीं, "तुम्ही यावर विचार करून एखादें पुस्तक लिहिल्यास तें आपण छापू."

मला ती गोष्ट कर्तव्य होतीच त्यास हें आणखी एक निमित्त मिळून मी नेटानें त्या उद्योगास लागलों पुढें शिवलिंगोपासनेसंबंधीं संदेह व आक्षेप आणि त्याचें निरसन अशा पूर्वोत्तर पक्षाची संवादरूप सुमारें ४४ लेखांची लेखमाला काशी येथें त्या वेळीं प्रसिद्ध होणाऱ्या सिद्धान्त नामक एका भारदस्त हिंदी साप्ताहिकात मीं शके १८७० सालीं प्रसिद्ध केली त्यानंतर तो विषय मीं प्रबंधरूपात मराठींत प्रसिद्ध करावा असें काहीं सज्जनांच्या सल्ल्यानें ठरविलें व तसा प्रबंधरूप हा नवा ग्रंथ तयार केला याचे तीन खंड केले आहेत. प्रथम खंडात शिवलिंगोपासनेसंबंधीं निराक्षेप ठळक माहिती दिली आहे दुसऱ्या चिकित्सक खंडात शिवलिंगोपासनेसंबंधीं अनेक संदेह आणि आक्षेपांचें निरसन केलें आहे. तिसऱ्या साधनसार खंडात कर्म, भक्ति, योग व ज्ञान या साधनांच्या रहस्य दृष्टीनें थोडक्यात सारभूत विचार मांडला आहे अशा प्रकारचा या विषयावरील हा ग्रंथ मराठींतच काय, पण कोणत्याहि भाषेत प्रसिद्ध झालेला माझ्या ऐकिवात नाहीं असा हा ग्रंथ प्रसिद्ध होण्याचा योग पुढीलप्रमाणें जमून आला

कै. विष्णु कृष्णशास्त्री ऊर्फ तात्यासाहेब पुराणिक हे जसे माझे गुरुबंधु त्याप्रमाणें त्यांच्या पूज्य पत्नी श्री. रमाबाई पुराणिक या माझ्या गुरुभगिनी होत. त्यांची श्रीधूतपापेश्वरावर त्याचप्रमाणें श्रीसद्गुरूंवर परमनिष्ठा आहे. त्यांनीं आपल्या व्यवस्थापत्रांत ज्या धर्मादाय देणग्यांच्या योजना केल्या आहेत त्यांतून या माझ्या नियोजित ग्रंथास श्रीधूतपापेश्वर म्हणजे शिवलिंगोपासना असें नांव द्यावें व या ग्रंथप्रकाशनास दीड हजार रुपये पुरस्कार म्हणून मदत द्यावी असें त्यांनीं ठरविलें. पुढें त्या मदतीनें हा ग्रंथ प्रसिद्ध करण्याचें पुण्याचे सुप्रसिद्ध प्रकाशक श्री. य. गो. जोशी यांनीं पत्करिलें. या ग्रंथासारखे शास्त्रीय ग्रंथ द्रव्यप्राप्तीच्या दृष्टीनें लिहिले जात नाहींत, पुरस्कृत होत नाहींत इतकेंच काय तर प्रकाशकहि बहुधा प्रकाशित करीत नाहींत, हें सुज्ञ वाचक जाणत असतीलच. तथापि आजच्या महागाईच्या काळांतील छपाईचा वाढलेला खर्च भागण्यासाठीं वाचकांच्या उदार आश्रयाची गरज आहेच आहे.

आपल्या पौराणिक वाङ्मयावर व देवताविज्ञानावर Indo Aryan mythology, Permanent History of Bharat Varsha, Mystery of Mahabharat, वैदिकविज्ञान, ब्रह्मविज्ञान, धर्मविज्ञान इत्यादि परप्रांतीय ग्रंथांप्रमाणें विधायक चिकित्सेचे ग्रंथ आपल्या मराठी भाषेंत फारकरून आढळत नाहींत. ती उणीव या माझ्या ग्रंथानें अंशतः भरून निघेल असा मला भरंवसा वाटतो.

श्रीशिवलिंगोपासनेसंबंधीं जे सश्रद्ध असतील त्यांची श्रद्धा या ग्रंथाच्या वाचनानें दृढ होईल. उलट जे या विषयासंबंधीं साशंक असतील, त्यांच्या शंकांचें निरसन हा ग्रंथ करील. याशिवाय जे वाचक या विषयासंबंधीं उदासीन असतील, त्यांचें लक्ष या ग्रंथवाचनानें या विषयाकडे आकृष्ट होईल व ते शिवोपासनेचें महत्त्व जाणूं लागतील. शिवोपासनेचें (१) शिवतत्त्वविवेक व (२) शिवलीलावर्णन असे दोन विभाग कल्पिल्यास हा ग्रंथ पहिल्या वर्गांत पडेल. श्रद्धाळू भाविक वाचकांस शिवलीलावर्णन जास्त मनोरंजक वाटणें स्वाभाविक असलें, तरी जिज्ञासु वाचकांस हा शास्त्रीय ग्रंथ तितकाच मनोवेधक व उद्‌बोधक वाटेल अशी मला खात्री वाटते.

या ग्रंथांतील आजच्या परिस्थितीबद्दल व या ग्रंथांतील मुख्य विषयाबद्दल माझी जी विचारसरणी आहे ती या ग्रंथाचे पुरस्कर्ते व प्रकाशक यांस मान्य

असेल असें मला वाटत नाहीं त्याच्याशीं विचारविनिमय करून मीं हा ग्रंथ मुळींच लिहिलेला नाहीं किंवा या ग्रंथात मी काय लिहिलें आहे, हें मी त्यास पूर्वी दाखविलें नाहीं व त्यास अजूनहि माहीत नाहीं तेव्हा या ग्रंथांत शिष्टमान्य होण्यासारखें जें काहीं नसेल, त्याची सर्वस्वी जबाबदारी एकट्या मजवरच आहे त्यास या ग्रंथाचे पुरस्कर्ते व प्रकाशक मुळींच जबाबदार नाहींत श्रीशिवलिंगोपासनेबद्दल व अशात वैयक्तिक मजबद्दल त्याना जो आदर वाटत असेल, त्यामुळेंच त्यानीं या ग्रंथाचें पुरस्कृत्व व प्रकाशकत्व पत्करलें त्यात माझ्या स्वभावानुसार जे काहीं लेखनप्रमाद घडले जातील, त्याचाहि पुरस्कार करण्याचा त्याचा हेतु असणें शक्यच नाहीं इतका स्पष्ट खुलासा करून मी त्यानीं उदार बुद्धीनें केलेल्या या सहकार्याबद्दल त्याचे फार फार आभार मानतों असो

या ग्रंथाच्या पूर्वतयारीच्या कामीं गेलें एक तप तरी मी त्या उद्योगात आहे या मुदतींत मला माझ्या चरितार्थाकरता पूर्वी कराव्या लागणाऱ्या वकिलीच्या दगदगीच्या व्यवसायातून चिरंजीव गोविंदरावानीं मला सोडविलें व पूर्ण निर्वेधता दिली. तसेंच, अन्य तऱ्हेनें श्री नानासाहेब पुराणिकानींहि मला स्वास्थ्य दिलें व मुंबईच्या ग्रंथसंग्रहालयातून मिळाले ते ग्रंथहि मिळवून दिले, म्हणूनच या ग्रंथाला हें मूर्तस्वरूप येऊ शकलें वास्तव त्या उभयतास धन्यवाद देणें जरूरच आहे

या ग्रंथलेखनात मी ज्या ज्या ग्रंथाचे आधार घेतले त्या सर्व अनुकूल व प्रतिकूल ग्रंथकाराचा मी फार आभारी आहे त्यापैकीं अनुकूल आधार ग्रंथाचे नामनिर्देश ठिकठिकाणीं केलेच आहेत, म्हणून त्याची लांबलचक यादी स्वतंत्र दिली नाहीं वर लिहिल्याप्रमाणें ज्या विद्वान् गृहस्थानीं आपले अभिप्राय स्पष्ट व प्रांजलपणें मला कळवून प्रबंधरूप ग्रंथ लिहावा असें मार्ग-दर्शन केलें, त्याचाहि मी आभारी आहे मीं या ग्रंथाचें रूप जरी पालटलें आहे, तरी सिद्धान्तपत्रात प्रसिद्ध झालेली माझी पूर्वोक्तपक्षाची लेखमाला हाच या ग्रंथाचा सर्वांत मोठा आधार आहे तो त्या वेळीं मूर्तरूपात येण्यास ज्याची विशेष सश्रम कृपा कारण झाली, त्या सिद्धान्तपत्राचे सहसपादक पं दुर्गादत्त त्रिपाठी यांचे आभार मानावे तेवढे थोडेच आहेत त्यानीं फार आग्रहपूर्वक माझ्या लेखमालेचें हिंदींत भाषांतर करून तें प्रसिद्ध केलें

फार मोठीं पुस्तकें वाचण्यास वाचक कंटाळतात. आजकाल छपाईचा खर्च पण वाढलेला आहे. यामुळें या ग्रंथाची मूळची नियोजित पृष्ठसंख्या पांचशें होती. पण तितक्यांत ग्रंथलेखन पुरें करणें फारच कठिण वाटूं लागलें. तेव्हां अधिक लेखनविस्तार होऊं देण्यास हा ग्रंथ कितपत योग्य आहे, याचा अंदाज घेण्याकरितां अर्धा छापून झालेला ग्रंथ विद्वानांच्या अभिप्रायार्थ पाठवावा, असें मनांत आणलें. त्याप्रमाणें माझ्या विनंतीस मान देऊन नाशिकचे सुप्रसिद्ध म. म. श्रीधर अण्णाशास्त्री वारे व काशीच्या सरकारी संस्कृत विद्यापीठाचे विद्वान् प्राध्यापक (१) पं. श्रीमुकुन्दशास्त्री खिस्ते (साहित्य-प्रधानाध्यापक), (२) पं. श्रीसुरेन्द्रनाथशास्त्री, न्याय-वेदान्ताचार्य, एम्. ए., (३) पं. श्रीभूपनारायण झा, व्याकरण – न्याय – मीमांसा – सांख्य-योगाचार्य, (४) प्रो. एम. डी. कपिल, तत्त्वज्ञानाचे दुय्यम प्राध्यापक, (५) पं. श्रीअनंतशास्त्री फडके, व्याकरणाचार्य, मीमांसातीर्थ, वेदान्त-केसरी आणि (६) पं. श्रीमुरारिलाल, एम्. ए., आचार्य, ज्योतिष व अध्यात्माचे प्राध्यापक अशा पंडितवर्यांनीं हा छापलेला अर्धा ग्रंथ पाहून हा ग्रंथ सविस्तर पुरा होऊ द्यावा असा ग्रंथाचा गौरवपूर्वक पुरस्कार केला, याबद्दल मी त्यांचा फार फार आभारी आहें.

याशिवाय गेल्या बारा-चवदा वर्षांच्या दीर्घ कालांत ज्यांनीं मला या ग्रंथाचे कामीं थोडीफार प्रत्यक्ष व अप्रत्यक्ष मदत केली असेल, त्या सर्वांचीं नांवें आतां माझ्या स्मरणांतहि नाहींत. त्यांचे आभार मी कसे मानूं? तसेंच ज्यांच्या अदृष्ट प्रेरणेनेंच हा सारा ग्रंथ लिहिला गेला, त्या माझ्या सर्वस्वरूप ब्रह्मीभूत श्रीसद्गुरूंचे आभार मी कोणत्या शब्दांत मानावे, तें मला कळत नाहीं. हा सारा ग्रंथ त्यांचाच आहे, असेंच मीं म्हणणें योग्य होतें. पण माझ्यांतील वैगुण्यांमुळें या ग्रंथांत कांहीं दोष राहिले असतील, ते त्यांच्या पदरीं बांधतां येत नाहींत, म्हणून मी तसें म्हणत नाहीं. माझें मन ते जाणतच आहेत. सुज्ञ वाचकांस अधिक काय सांगावें! हा ग्रंथच त्यांच्याजवळ सर्व कांहीं सांगेल.

इत्येषा वाङ्मयी पूजा श्रीमच्छंकरपादयोः।
अर्पिता तेन देवेशः प्रीयतां मे सदाशिवः॥ महिम्न ४०.

आषाढ व. कामिका ११
शके १८७६, सोमवार.
पनवेल.

श्रीसद्गुरुचरणरज
सदाशिव कृष्ण फडके

# अनुक्रमणिका

## १. प्रथम खंड



## २. चिकित्सा खंड

॥ श्री ॥





## प्रथम खंड

### प्रकरण १ लें

### मंगल

गणानां त्वां गणपतिं हवामहे कविं कवीनामुपमश्रवस्तमम्।
ज्येष्ठराजं ब्रह्मणां ब्रह्मणस्पत आ नः शृण्वन्नूतिभिः सीद सादनम्
॥ १ ॥ ऋ. २।२३

नि षु सीद गणपते गणेषु त्वामाहुर्विप्रतमं कवीनाम्।
न ऋते त्वत् क्रियते किं चनारे महामर्कं मघवञ्चित्रमर्च ॥ ९ ॥
ऋ. १०।११२

भावार्थ—हे [ माझे कुलस्वामी ] गणपते ! ब्रह्मणस्पते ! ज्ञात्यांमधील अत्यंत प्रख्यात ज्ञाता आणि ज्येष्ठराज अशा तुम्हें मी [ या माझ्या वाग्यज्ञांत ] आवाहन करतों. माझी स्तुतियुक्त [ प्रार्थना ] ऐकून [ मला ] साहाय्य करण्याकरितां तूं माझ्या या वाग्यज्ञमंडपांत येऊन बैस.

सर्वजगद्व्यापक समस्त प्राण आणि प्रज्ञारूप इंद्रस्वरूप गणपते ! तूं आपल्या रुद्रपुत्र मरुद्गणांसह (वर्णीसह) या माझ्या वाग्यज्ञरूप अनुष्ठानांत उपस्थित ऐस. हे गणपते, तुला सर्व विद्वानांत अग्रगण्य मानतात. हे प्रज्ञाप्राण स्वरूप देवा, तुझ्या कृपेवांचून कोणतेंहि कार्य केव्हांहि करतां येत नाहीं. यास्तव हे पूजनीय प्रभो ! माझ्या ठिकाणीं असणारा जो तुझा अत्यल्प प्रज्ञाप्राणांश त्या ठिकाणीं तूं यथोचित दिव्य ज्ञान प्रकाशित कर !

नमस्तेऽस्तु महामाये, श्रीपीठे सुरपूजिते, शंखचक्रगदाहस्ते,
महालक्ष्मि नमोऽस्तु ते ॥ १ ॥
आद्यन्तरहिते देवि, आद्यशक्ति महेश्वरी, योगजे योगसंभूते
महालक्ष्मि नमोऽस्तु ते ॥ २ ॥

अर्थ—[ सुबोध आहे ] [ हे माझे कुलस्वामिनी देवी ! तुझ्या पदकमलीं माझे अनंत प्रणाम असोत. हे भगवती ! या वाग्यज्ञानें लोकरंजन, उद्बोधन व मनःशांति यांची संप्राप्ति होवो ! ]

हरिः ॐ इडा देवहूर्मनुर्यज्ञनीर्बृहस्पतिरुक्थामदानि ।
शँ᳚सिषद्विश्वेदेवाः सूक्तवाचः पृथिवि मातर्मामा हिँ᳚सीर्मधु मनिष्ये मधु जनिष्ये मधु वक्ष्यामि मधु वदिष्यामि मधुमतीं देवेभ्यो वाचमुद्यासँ᳚ शुश्रूषेण्यां मनुष्येभ्यस्तं मां देवा अवन्तु शोभायै पितरोऽनुमदन्तु ॥ नमो रुद्रेभ्यः ।

ॐ शान्तिः । शान्तिः । शान्तिः ॥

---

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ॥
भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः भद्रं पश्येमाक्षभिर्यजत्राः ।
स्थिरैरङ्गैस्तुष्टुवाँ᳚सस्तनूभिः व्यशेम देवहितं यदायुः ॥
सह नाववतु । सह नौ भुनक्तु । सह वीर्यं करवावहै ।
तेजस्वि नावधीतमस्तु । मा विद्विषावहै ॥

ॐ शान्तिः । शान्तिः । शान्तिः ॥

---

अनुवाद—हे सिद्धेश्वरा ! हे धूतपापेश्वरा ! हे त्रैलोक्यनाथा ! हे त्रिपुरारे ! हे सर्वाधिष्ठा ! श्रीशिवगुरो ! हा जो वाग्यज्ञ आरंभिला जात आहे, त्यांत विद्याधिपति बृहस्पति साह्यकारी होवो ! हे भूमाते ! हे अंतरिक्षाच्या शक्तिरूप सरस्वती ! आणि हे द्युस्थानीय भारतिदेवी ! या आरंभिलेल्या सत्कर्मास तुम्ही आधारभूत, सहकार्यरूप, व प्रेरकरूप व्हावें. हे वसु, रुद्र, आदित्यादि देवतांनो ! जेणेंकरून आम्हांला इहपरकल्याणाचा मार्ग दिसेल, शिवोपासनेंतील आमचे भ्रम दूर होतील, शिवशक्त्युपासनेतील असंभावना, विपरीत भावना इत्यादि विकल्प नाहींसे होतील, विशेषेंकरून परकीय संस्कृतीनें शिवलिंगोपासनेवर अध्यारोपित केलेली व आधुनिकांना भासत असलेली ग्राम्यता व अश्लीलता निर्मूल ठरेल, असा आपला सर्वांचा आशीर्वाद असावा !

तसेंच, श्रद्धा आणि विचार यानीं युक्त अशा उपासकांस संतोष वाटेल, असे परिणामीं परम मंगलकारक विचार या ग्रथांत प्रगट होवोत, जेणेंकरून आमचे पूर्वज आणि वशज यांनींहि आत्मतुष्टीचे धन्योद्गार काढावेत !

हे शिवगुरो ! आपल्या कृपेनें आरंभिलेला हा ग्रथ योग्य रीतीनें शेवटास जावो !

ॐ शान्तिः । शान्तिः । शान्तिः ॥

---

हें सारें दृश्य जगत् व त्याहून मोठें असलेलें अदृश्य जगत् परमशिवशक्तितत्त्वानें ओतप्रोत व्याप्त आहे. हें संपूर्ण विश्व त्यातूनच व्यक्त झालें असून, तें मूळ परमशिवशक्तितत्त्व जसें आहे, तसेंच पूर्ण आहे. हे देवहो ! जें मगलकारक असेल, तेंच आमच्या कानीं येवो. व तेंच आमच्या दृष्टीस दिसो ! हे पूज्य देवतांनो, आम्हांस प्राप्त झालेलें आयुष्य आजीव ब्रह्मार्पण केलेल्या कर्मानेंच आम्हीं भोगावें. आमचें सर्वांचें भरणपोषण सलोख्यानें एकत्र होवो. आमचीं सारीं कर्में व अभ्यास हीं सहकारितेनें व उत्साहभरानें पुरीं होवोत. आमच्यांत द्वेषमत्सर न वाढतां, सर्वांना पूर्ण शांति-सुख लाभो !

ॐ शान्तिः । शान्तिः । शान्तिः ॥

---

**मा त्वा रुद्र चुक्रुधामा नमोभिर्मा दुष्टुती वृषभ मा सहूती ।**
**उन्नो वीरॉं अर्पय भेषजेभिर्भिषक्तमं त्वा भिषजां शृणोमि ॥**

ऋ. २।३३।४

अनुवाद—हे ( धूतपापेश्वर ! आदिनाथ ! ) रुद्रा ! आम्ही तुला नमस्कार करतों. तुजसंबंधीं ( अयथार्थ कल्पना करण्याची ) चूक आम्हीं न करावी. तुझ्यासंबंधीं कोणी ( अनार्य अशी ) गौण कल्पना केली असली, किंवा तुला दुसऱ्या( अनार्य देवतां )बरोबर ( गौणपणा देऊन ) कोणीं संबोधिलें असलें, अथवा बोलावलें असलें, तरी तूं ( कृपा करून ) रागावूं नकोस. उलट आम्हांला वीर ( साधक ) दे. कारण तूं धन्वतरी वैद्यांतील ( श्रेष्ठ व प्रथम ) वैद्य आहेस असें आम्ही ऐकतों. ( तेव्हां आम्हां तार्किकांना *कुकल्पनेच्या रोगाच्या बाधेपासून व भवरोगापासून तूं मुक्त करा.* )

**नासदासीन्नो सदासीत् तदानीं नासीद्रजो नो व्योमा परो यत् ।**
**किमावरीवः कुह कस्य शर्मन्नम्भः किमासीद्गहनं गभीरम् ॥ १ ॥**

न मृत्युरासीदमृतं न तर्हि न रात्र्या अह्न आसीत् प्रकेतः।
आनीदवातं स्वधया तदेकं तस्माद्धान्यन्न परः किं चनास ॥ २ ॥
तम आसीत् तमसा गूळ्हमग्रे ऽ प्रकेतं सलिलं सर्वमा इदम्।
तुच्छ्येनाभ्वपिहितं यदासीत् तपसस्तन्महिनाजायतैकम् ॥ ३ ॥
कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत्।
सतो बन्धुमसति निरविन्दन् हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥ ४ ॥
तिरश्चीनो विततो रश्मिरेषा मधः स्विदासी३ दुपरि स्विदासी३ त्।
रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् ॥५॥
ऋ. १०।१२९

अनुवाद — परमेष्ठी प्रजापति म्हणतात :—

सृष्टीच्या मूळारंभीं असत् नव्हतें, तत्सापेक्ष असें सत्पण नव्हतें. अंतरिक्ष नव्हतें व आकाशपण नव्हतें. विनाशी व तत्सापेक्ष अविनाशी असें कांहीं नव्हतें. रात्र नव्हती. दिवस म्हणावा असाहि नव्हता. जें काय होतें, तें एकलें एकच परम( शिव )तत्त्व आपल्या शक्तीनें वायूशिवाय स्फुरद्रूप होतें. तें सारें मायेनें जणूं आच्छादलेलें होतें. तें एकमेव परमशिवशक्तितत्त्वच आपल्या तपानें जणूं व्यक्त झाल्यासारखें भासत होतें. त्या मूळ स्फूर्तिरूप शिवशक्तिस्वरूप संकल्पांतून हें अखिल दृश्य उद्भूत झालें. त्या शिवशक्तीच्या प्रभावानें हें सारें विश्व ओतप्रोत व्याप्त आहे.

ॐ नमो भवाय च रुद्राय च ॥ १ ॥ नमः शर्वाय च पशुपतये च ॥ २ ॥ नमो गिरिशाय च शिपिविष्टाय च ॥ ६ ॥ नमो बृहते च वर्षीयसे च ॥ ९ ॥ नमो अग्रियाय च प्रथमाय च ॥ ११ ॥ अ० ५॥ नमः पूर्वजाय चापरजाय च ॥ २ ॥[६] नमः शंकराय च मयस्कराय च ॥ १० ॥ नमः शिवाय च शिवतराय च ॥ ११ ॥ अ० ८ ॥ नमः पा [ ]सव्याय च रजस्याय च ॥ ८ ॥ नमः शुष्क्याय च हरित्याय च ॥ ९ ॥ अ० ९ ( रुद्राध्याय )

विश्वेश्वर विरूपाक्ष विश्वरूप सदाशिव। शरणं भव भूतेश करुणाकर शंकर ॥ १ ॥ हर शंभो महादेव विश्वेशामरवल्लभ। शिवशंकर सर्वात्मन् नीलकंठ नमोऽस्तुते ॥ २ ॥ मृत्युंजयाय रुद्राय नीलकंठाय शंभवे। अमृतेशाय शर्वाय महादेवाय ते नमः ॥ ३ ॥

एतानि शिवनामानि यः पठेन्नियतः सकृत्। नास्ति मृत्युभयं तस्य पापरोगादि किंचन ॥ ४ ॥

ऋग्वेद खिलसूक्त

अनुवाद—ज्याच्यापासून प्राणी उत्पन्न होतात, त्या भवाला आणि या भवसागरांतून तारून नेणाऱ्या रुद्राला माझा नमस्कार असो! त्या भूतपापेश्वर देवाला म्हणजे उपासकरूप पशूंचें पालनकर्त्या पशुपतीस माझा नमस्कार असो! त्या मोठ्यांत मोठा असलेल्या महादेवाला व ज्याचे अनंत कल्याणगुण आहेत, अशा भगवंताला माझा नमस्कार असो! सर्वप्रथम व सर्वांच्या अखेर असणाऱ्या आद्यंत परमात्म्याला माझे नमस्कार असोत! त्या शिव आणि शंकर या संज्ञांनी वेदात प्रसिद्ध असलेल्या आदिनाथाला माझे नमस्कार असोत! स्थूल आणि सूक्ष्म, सरस आणि नीरस सर्व पदार्थांना व्यापून असणाऱ्या त्या सत्वनाला माझे नमस्कार असोत!

भावार्थ—विश्वेश्वर, विरूपाक्ष, विश्वरूप, सदाशिव, शंकर अशा संज्ञांनी वेदांनी निर्दिष्ट केलेल्या त्या करुणाकर प्रभूला मी शरण आहें. तसेंच शंभु, महादेव, शिव, नीलकंठ अशा नांवांच्या सर्वात्म्यास माझा नित्यस्मरणपूर्वक नमस्कार असो! कारण जो कोणी सदाशिव नामाचें पठण करतो, त्यास मृत्यु, पाप व रोग यांचें भय यत्किंचित्‌हि उरत नाहीं.

सर्वेन्द्रियगुणाभासं सर्वेन्द्रियविवर्जितम्।
सर्वस्य प्रभुमीशानं सर्वस्य शरणं सुहृत् (बृहत्) ॥ ३।१७ श्वे.
नैव स्त्री न पुमानेष न चैवायं नपुंसकः।
यद्यच्छरीरमादत्ते तेन तेन स पूज्यते (रक्ष्यते) ॥ ५।१० श्वे.
तमीश्वराणां परमं महेश्वरं।
तं देवतानां परमं च दैवतम्
पतिं पतीनां परमं परस्ताद्
विदाम देवं भुवनेशमीड्यम् ॥ ६।७ श्वे.
न तस्य कार्यं करणं च विद्यते, न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते।
पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥६।८
मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ॥
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥ ४।१०

एको देवः सर्वभूतेषु गूढः, सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा।
कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥ ६।११
यस्य देवे परा भक्तिर्यथादेवे तथा गुरौ।
तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः ॥ २३ ॥

श्वे. ६

भावार्थ — सर्व इंद्रियांचे गुण याच्या ठिकाणीं आहेत, असें भासत असूनहि हा सर्व इंद्रियांनीं रहित आहे. सर्वांचा प्रभु, सत्ताधीश व सर्वांचें मोठें आश्रयस्थान असा हा महादेव आहे.

हा स्त्री नाहीं, पुरुष नाहीं, आणि नपुंसकहि नाहीं. जें जें शरीर घेतो, त्या त्या शरीराशीं हा तादात्म्य पावतोसा दिसतो.

ईश्वरांचा सर्वश्रेष्ठ महेश्वर, देवतांचें श्रेष्ठ दैवत, पतींचा श्रेष्ठ पति, विश्वाचा स्वामी व सर्वथा पूजनीय, अशा या महादेवाला आम्हीं प्राप्त करून घ्यावें.

याला स्वतासाठीं कांहीं एक करावयाचें नाहीं. कोणतेंहि साधनरूप कर्मेंद्रिय यास नाहीं. याच्या बरोबरीचा अगर याच्याहून श्रेष्ठ कोणी दिसत नाहीं. याची श्रेष्ठ शक्ति वेदांनीं अनेक प्रकारें गायिलेली आहे. याचें ज्ञान, बल व क्रिया स्वाभाविक आहेत.

माया म्हणजे प्रकृति आणि मायी म्हणजे महेश्वर, ह्यांच्या अवयवरूपी जीवांनीं हें सर्व जग व्यापलें आहे.

हा एक देव सर्व भूतांमध्यें गूढरूपानें आहे. सर्व व्यापणारा, सर्व भूतांचा अंतरात्मा, कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांचे ठिकाणीं अधिष्ठानरूप असलेला, साक्षी, ज्ञाता, केवल आणि गुणरहित असा हा ( शिव ) आहे.

ज्याची देवाच्या ठिकाणीं परमभक्ति आहे, आणि जशी देवाच्या ठिकाणीं तशी गुरूच्या ठिकाणीं आहे, त्याला या महान् आत्म्याच्या गोष्टी सांगितल्या असतां कळतात.[1]

---

१ या आरंभींच्या मंगलांत पुढील ग्रंथांतील महत्त्वाचे बरेच संकेत आले आहेत, हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईलच.

## प्रकरण २ रें

# श्रीधूतपापेश्वर

शुद्धस्फटिकसङ्काशं त्रिनेत्रं पंचवक्त्रकम्।
गङ्गाधरं दशभुजं सर्वाभरणभूषितम्॥ १॥
नीलग्रीवं शशाङ्काङ्कं नागयज्ञोपवीतिनम्।
व्याघ्रचर्मोत्तरीयं च वरेण्यमभयप्रदम्॥ २॥

श्री धूतपापेश्वरगंगामाहात्म्यवर्णन

की पृथ्वीखंड त्या शाळुंका। अनेक पर्वत शिवपिंडिका।
इंद्रें मांडिलें अभिषेका। जलधारा चरसूनी॥ १॥ मुक्तेश्वर

श्रीधूतपापेश्वर अथवा धोपेश्वर हें देवस्थान सह्याद्रीच्या पायथ्याजवळ राजापूर तालुक्यांत राजापूर शहरापासून जवळच, दोन डोंगरांच्या मध्यें आहे. धोपेश्वर हा गांव या देवस्थानास इनाम आहे. हें देवस्थान किती प्राचीन आहे, तें निश्चयानें सांगण्यास साधन नाहीं. येथें दोन शिलालेख आहेत. ते जीर्णोद्धाराचे दिसतात. एक महादरवाजावर फडके यांचा शके १७९३ चा आहे व दुसरा देवालयामागील तटबंदीवर शके १४९१ चा आहे. प्राचीन स्कंद पुराणांतील सह्याद्रि खंडात श्रीधूतपापेश्वर गंगामाहात्म्यवर्णनाचे तीन अध्याय आहेत. श्रीधूतपापेश्वर गंगामाहात्म्यवर्णन या नांवाचें एक लहानसें पुस्तक शके १८२९ सालीं धूतपापेश्वर मुद्रणालयांत प्रसिद्ध झालेलें आहे.

राजापूर हें पांचसहास्रें वर्षांपूर्वी त्या प्रांताचें मुख्य राजधानीचें शहर होतें, असें राजापूर नांवावरून दिसतें. राजापूर बंदरांतून पूर्वी इग्रज, फ्रेंच, डच यांचा व्यापार फार मोठ्या प्रमाणावर चालत असे. एका काळीं राजापूरच्या सराफ बाजारांत सोन्याचा धूर निघत असे, असा लाक्षणिक लोकप्रवाद आहे.

दक्षिणेंतील पल्लव, पांड्य, चोल हीं राजघराणीं परमशिवभक्त होतीं; त्यांनीं अनेक शिवालयें दक्षिणेंत बांधलीं, हें प्रसिद्ध आहे. चालुक्यांनींहि तशींच बांधलीं असतील. या आपल्या धर्मभूमींत गांवोंगांवीं शिवमंदिरें बहुतेक मजबूत चिरेबंदीच बांधलेलीं दिसतात. प्राचीन भारतवर्षाच्या स्वास्थ्याचीं व शिवभक्तीचीं तीं उत्कृष्ट स्मारकें आहेत. आतांच्या नूतन प्रजासत्ताक स्वराज्यांत राजघराणीं

राहिलीं नाहींत. संस्थानेंहि विलीन झालीं व जहागिऱ्या मावळत चालल्या. त्या-बरोबर प्राचीन राजैश्वर्य मावळलें! राजा म्हणजे विष्णूची गादी. आणि विष्णु हा परमशिवभक्त. आतां विष्णूलाच मानायला हें जडवादी नवयुग तयार नाहीं! मग त्याची गादी कोठली! कांहीं असो. प्राचीनकाळीं अशीं परम-वैभवशाली, भव्य व चिरस्थायी शिवमंदिरें ठायीं ठायीं उभारलीं जावींत, त्यात शिवलिंगोपासना नित्य चालावी, असा ईश्वरी संकेत स्पष्ट दिसतो.

ईश्वरभक्ति आणि वेदान्ततत्त्वज्ञान यांची लाट दक्षिणेंतूनच महाराष्ट्रांत आली असावी, असें म्हणतात.[1] त्यापूर्वी ती लाट उत्तरेकडून दक्षिणेकडे गेली असेल, असें शैवधर्मसंस्थापक तिरुमूलर याच्या चरित्रावरून दिसतें. श्रीविष्णु, ब्रह्मदेव, इंद्र इत्यादि शिवभक्त देव व कुबेर, रावण इत्यादि शिवभक्त असुर यांची अतिप्राचीन सत्ता आजच्या हिंदुस्थानच्या उत्तरेस होती, असें कोणी मानतात. उलट गौरीशंकर व कैलास हीं शिवस्थानें असलेल्या हिमालयानें भूगर्भांतून वर डोकें काढलेंच नव्हते, त्या वेळपासूनचा वृद्धातिवृद्ध सह्याद्रि आहे, असें भूगर्भशास्त्रवेत्ते म्हणतात.

एकदा प्राचीनकाळीं ऋषि सूताला म्हणाले कीं, "पूर्वी सह्याद्रीवर शंकर-पार्वती सर्व गणांसह राहात असत, असें आमच्या ऐकण्यांत आहे; तेव्हा तेथील पवित्र क्षेत्राचें माहात्म्य आम्हाला सांग." त्यावरून त्या बहुश्रुत सूतानें शिवपार्वतींचा यासबधीं झालेला प्राचीन संवाद त्यांस सांगितला, तो असा—

एक दिवस अवसर पाहून पार्वतीनें महादेवास विचारलें कीं, "वाराणशी-क्षेत्रात जसा आपणास आनंद वाटतो, तसा इतर कोठें वाटतो? आणखी कोणकोणत्या ठिकाणीं राहून आपण भक्तांचा उद्धार करतां? तीं तीर्थें

---

१ भक्ति नारदास म्हणते :—
उत्पन्ना द्राविडे साहं वृद्धिं कर्णाटके गता
क्वचित्क्वचिन्महाराष्ट्रे गुर्जरे जीर्णतां गता ॥ १–४७
वृंदावनं पुनःप्राप्य नवीनेव सुरूपिणी ।
जाताहं युवती सम्यक् प्रेष्ठरूपा तु सांप्रतम् ॥ १–४९
ज्ञानेश्वराचें तत्त्वज्ञान पृ. २५४ भागवतमाहात्म्य.

अथवा क्षेत्रें मला सांगावीं." तेव्हां शंकरांनीं तिला सह्याद्रीवरील प्रसिद्ध हरिहर, दाल्भ्येश, संगमेश्वर, मारळेश्वर हीं स्थानें सांगितल्यानंतर पूर्वी अप्रगट असून मागून प्रगट झालेलें वाराणशीतुल्य धूतपाप या नांवाचें आपलें लिंग सांगितलें. तेव्हां असें हें महत्त्वाचें शिवलिंग अप्रगट होतें, तें मागून प्रगट कसें झालें? ती माहात्म्यकथा पार्वतीनें शिवाला विचारल्यावरून शिवानें सांगितलेली ती कथा सह्याद्रिखंडांत वर्णिली आहे. तिचा सारांश पुढें देत आहें.

धोपेश्वर गांवीं पूर्वी एक विद्वान् ब्राह्मण राहत असे. त्याच्या दाराशीं एक पुष्कळ दूध देणारी अशी गाय होती. तिला गुराखी रोज डोंगराकडे चरणीस नेत असे. पुढें एका काळीं ती रानांत चरून सायंकाळीं परत आली कीं तिच्या ओटींत दूध मुळींच निघत नाहींसें झालें! असें सतत आठ दिवस चाललेलें पाहून, ही गुणाची गाय सकाळीं दूध भरपूर देते, मग सायंकाळींच कशी देत नाहीं? तेव्हां हा गुराखीच रानांत तिचें दूध काढून पीत असला पाहिजे, असा त्या ब्राह्मणास संशय येऊन, त्या संशयावरून त्यानें गुराख्याला शासन केलें. आपण दूध काढीत नसून आपणांस विनाकारण शिक्षा भोगावी लागली, याचें फार वैषम्य वाटून त्या गुराख्यानें दुसऱ्या दिवशीं त्या गाईवर पाळत ठेवली. तेव्हां त्याला असें आढळलें कीं, ती गाय एका खिंडींतील जाळींत सायंकाळीं नेमानें जाते व तेथें तिच्या ओटीचें जणूं अभिषेकपात्र बनून तिच्या चारी सडांतून ओटींतील दूध संपेपर्यंत दुधाचा खालीं अभिषेक होतो! तें पाहून दुधाचा चोर सांपडला, असें वाटून रागाच्या आवेशांत आपल्या हातांत असलेली कुऱ्हाड त्या गुराख्यानें तेथें त्या जाळींत हाणली! त्या बिचाऱ्याला काय ठाऊक कीं, जेथें त्या कामधेनूला वात्सल्यासक्तीचा अनावर पान्हा फुटे, तेथें एक शिवलिंग होतें! त्या शिवलिंगावर त्याच्या कुऱ्हाडीचा जोराचा घाव पडून त्याचा एक कपचा उडाला. तो दूर क्रिकटगिरीजवळ जाऊन पडला. त्या गुराख्यानें दूध पिणारा चोर सांपडला म्हणून मोघम गाईच्या धन्यास सांगितलें. तें ऐकून त्या धन्याला आश्चर्य वाटलें. तो दुसऱ्या दिवशीं त्या गोवाऱ्याबरोबर गाईच्या मागोमाग गेला. तों तेथें गुराख्याच्या कुऱ्हाडीच्या घावानें भग्न झालेलें शिवलिंग पाहातांच त्याला अति वाईट वाटलें. तसेंच त्या काम-

धेनूला रोज प्रेमपान्हा फोडणारें तें दिव्य शिवलिंग भग्न झालेलें पाहून त्या गोमातेचें दुःख अनावर झालें, म्हणून तिनें जवळच्याच कोटितीर्थांत तत्क्षणीं उडी टाकून जलसमाधि घेतली! हा त्या मुक्या जनावरानें प्रेमोत्कटतापूर्वक केलेला देहत्याग पाहून सारेच सखेदाश्चर्यानें थक्क झाले। असा तो हृदयभेदी प्रकार पाहून त्या बिचाऱ्या गुराख्याच्या अंतरात एकदम प्रकाश पडला, व तीव्र पश्चात्तापाच्या ज्वालांनीं त्याचें अंतःकरण भडकलें असता, त्यानें आपल्या हातून न जाणता झालेल्या शिवद्रोहाबद्दल त्या महादेवाची क्षमा मागितली पण शिवद्रोहाला देहान्तावाचून प्रायश्चित्तच नाहीं, असें त्याच्या मनानें पुरें घेतलें तेव्हा पृथ्वीमातेनें आपल्या अपराधासह आपणास पोटात घ्यावें, अशी तिची करुणा भाकून कृतकर्माबद्दल प्रायश्चित्तासाठीं त्यानें पण त्या कोटितीर्थांत उडी घेतली! तें पाहून दयामय धूतपापेश्वराला त्याची कींव आली व त्यानें अनन्यगतिक झालेल्या त्या गोपाळाला आपलें गण पाठवून शिवलोकीं नेलें! तेव्हा देवांनीं पुष्पवृष्टि केली त्यानंतर त्या प्रांतातील ब्राह्मणांनीं त्या धूतपापेश्वर शिवलिंगाची षोडशोपचारें पूजा सुरू केली तेथेंच आजचें श्रीधोपेश्वर नामक शिवमंदिर पुढें बांधलें गेलें, व त्याच्याच शेजारीं त्या गुराख्याचें स्मारक म्हणून एक कामेश्वर नामक लहानसें शिवमंदिर बांधण्यात आलें. पुढें शिवाशेनें तेथें अनेक तीर्थें येऊन राहिलीं श्रीगंगाहि त्या प्रांतात शिवसान्निध्यास्तव प्रादुर्भूत झाली तीच पुढें नेमानें एक दोन वर्षांनीं एकाएकीं प्रगट होऊन तशीच एकाएकीं गुप्त होणारी राजापूरची प्रसिद्ध गंगा होय तिच्या माहात्म्यावर एक प्राचीन बखर असून, कविवर्य मोरोपंतांचें एक लघुकाव्य पण आहे

अगदीं अशींच घडलेलीं इतिहासप्रसिद्ध आणखी दोन उदाहरणें यापुढें सांगत आहें उदेपूरच्या अत्यंत प्रतापी राजवंशाचा मूळ पुरुष बाप्पा रावळ याचें चरित्र दिव्य आहे त्याच्या बापाला शत्रूंनीं ठार मारलें, त्या वेळीं तो अवघा तीन वर्षांचा होता! त्यानंतर त्याचा बराच काळ अरण्यात अज्ञात वासात गेला तो तेथें गाईंचा गुराखी बनला नगींद्राच्या दरींत तो गाई चारीत असे त्यापैकीं एका सुलक्षणी गाईचें दूध वरीलप्रमाणेंच एकदा नाहींसें होऊं लागलें तेव्हा सहजच गाईच्या धन्यास बाप्पाचा संशय आला. मग बाप्पानें त्या दिव्य गाईवर पाळत ठेवली तेव्हा त्याला असें आढळलें कीं,

सायंकाळ झाली तशी ती त्या दरींतील एका घळींत शिरली व एका वेलाच्या जाळींत उभी राहून मस्तक भूमीला लावून तिनें ईश्वराला वंदन केलें व आपल्या आचळांतून दुग्धरूप भक्तिप्रेमरसाचा पान्हा सोडला! तें पाहतांच बाप्पा रागानें दूध कोण चोरतो, तें पाहण्यासाठीं पुढें सरसावला, व पाहतो तों त्या जाळींत हरित नांवाचे ऋषि तपश्चर्या करीत बसले होते ; व गाईच्या सडांतून जेथें दुग्धधारांचा अभिषेक होत होता, तेथें एक स्वयंभू शिवलिंग होतें. तें पाहून तो सानदाश्चर्यानें थक्क झाला! मग बाप्पा तेथील हरित ऋषींस शरण गेला, व त्यांच्या योगानुसंधानात आपण व्यत्यय आणल्याबद्दल त्यानें त्याची क्षमायाचना केली. त्या दिव्य ऋषींनीं बाप्पाचें असामान्य राज्ययोगाचें भावी अदृष्ट त्याच्याकडे अवलोकन करतांच जाणलें, आणि त्याच्यावर प्रसन्न होऊन त्यास त्यांनीं गुरुदीक्षा दिली व कृतार्थ केलें. त्या महात्म्याचें तेवढेंच इहलोकींचें कार्य उरलें होतें. तें केल्यावर त्यांनीं तत्क्षणींच दिव्य विमानातून स्वर्गारोहण केलें! त्याच ठिकाणीं पुढें त्याच शिवलिंगावर हल्लीं असलेलें उदेपूरचें सुप्रसिद्ध श्रीएकलिंगजींचें विशाल मंदिर बांधलें गेलें. हरित ऋषींचे वंशज ह्या देवाचे पुजारी व उदेपूरचे राणे श्रीएकलिंगजीचे दिवाण, असें पुढें पिढ्यान् पिढ्या सुरू राहिलें होतें[1].

आतां अशीच तिसरी कथा सांगतों.

दक्षिणेंत कृष्णा नदीच्या काठच्या शैलपर्वताला दक्षिणचा कैलास म्हणतात. या स्थानाचा महिमा महाभारत, शिवपुराण व पद्मपुराण यांत फारच वर्णिला आहे. या पर्वताजवळ प्राचीन काळीं एका चन्द्रगुप्त नामक राजाची राजधानी होती. त्या राजाची एक भक्तिभावनाप्रधान अशी राजकन्या एकदा कांहीं संकटांतून सुटण्याकरितां राजवाड्यांतून बाहेर पडली व त्या डोंगराच्या आश्रयाला असलेल्या एका गौळीवाड्यांत अज्ञातवासांत राहिली. तेथें कंद, फळें, मुळें व दूध यावर ती आपली उपजीविका करीत असे. तेथील तिच्या एका सुंदर लाडक्या कपिला गाईच्या ओटींतील दूध वरीलप्रमाणेंच नाहींसें होत असलेलें तिला आढळलें. तेव्हां असें कां होतें तें समजून यावें म्हणून ती आश्चर्यानें त्या गाईकडे बारकाईनें लक्ष ठेवूं लागली. एक दिवस एका

---

1 Col. Tod's Annals and Antiquities of Rajastan, p. 242.

स्थळीं जाळींत त्या गाईच्या चारी सडांतून दुधाच्या धारा लागलेल्या तिला दुरून दिसल्या. तेव्हां हा दूध काढणारा चोर कोण, त्यास शासन करण्याकरिता ती रागानें पुढें सरसावली. पण ती तेथें पाहते तों भक्तांचें प्रेमसर्वस्व हरण करणाऱ्या हराच्या सुंदर लिंगाशिवाय तेथें अन्य कोणी नाहीं, असें तिला आढळलें! तें पाहून तिच्या भक्तिभावनाप्रधान अशा कोमल स्त्रीहृदयांत एकदम शिवभक्तीचा दिव्य प्रकाश पडला! त्यानंतर कांहीं काळानें तिनें तेथें एक भव्य शिवमंदिर बांधलें; तेंच बारा ज्योतिर्लिंगापैकीं प्रसिद्ध मल्लिकार्जुन नामक सुप्रसिद्ध देवस्थान होय.[१]

हीं तिन्ही देवस्थानें फार मोठीं आहेत. तेथें अनेक राजेरजवाड्यांचीं मस्तकें यापूर्वी नम्र झालीं आहेत. हजारों भाविक जन त्यांच्या दर्शनानें व उपासनेनें पावन झाले आहेत असामान्य स्थानमाहात्म्य असल्यावांचून अशा गोष्टी कशा घडतील? तें शिवाचें अप्रगट स्थानमाहात्म्य त्या गोमाताना कसें कळलें? याचा खुलासा करणाऱ्या शिवपुराणांतील (हिंदी खं. ८, अ. ६-९) एका आख्यायिकेचा येथें थोडक्यांत निर्देश करतों. ती आख्यायिका अशी:—अति प्राचीन काळीं एकदा ब्रह्मदेव आणि विष्णु यांनीं दिव्यज्योतिस्वरूप शिवलिंगाचा आद्यन्त लावण्याचा दीर्घ प्रयत्न केला होता. विष्णु वराहरूपानें खालीं व ब्रह्मदेव हंसरूपानें वर, असे शोध करण्यास गेले. पण त्यास त्या ज्योतिस्वरूप शिवलिंगाचा अंत लागला नाहीं. असें असतां ब्रह्मदेवाच्या भिडेस्तव स्वर्गीच्या एका सुरभीनें, "ब्रह्मदेवानें शिवलिंगाचा अंत पाहिला" अशी खोटीच साक्ष दिली. तेव्हां शंकरानें तिला "तूं मृत्युलोकीं जा!" असा शाप दिला. म्हणून ती सुरभि या भूलोकीं एक भावनाप्रधान गोमाता होऊन राहिली असावी असें वाटतें. तिनें जणूं आपल्या पूर्वपातकाच्या परिमार्जनासाठीं वरीलप्रमाणें ठिकठिकाणच्या अप्रगट शिवलिंगांवर दुग्धाभिषेक करून तीं भाविक भक्तांच्या नजरेस आणून दिलीं. त्या योगानें तेथें लक्षावधि लोकांस पावन करणारीं पुण्यक्षेत्रें निर्माण झालीं. मानवास ईश्वरानें बुद्धिसंपन्न केलें, याबद्दल त्यास अभिमान वाटणें स्वाभाविक आहे. पण मानवेतर प्राण्यांची उपजत बुद्धि ही मानवी बुद्धीपेक्षां सूक्ष्म, अचूक व श्रेष्ठ असल्याचें अनेक

---

१ 'कल्याण-शिवांक' पृ. ५५०.

बाबतींत दिसून येतें. मग वरील आख्यानांतील साक्षात् सुरभीच्या ठिकाणीं ही सूक्ष्म संवेदना आढळून यावी यांत नवल नाहीं. संत बहिणाबाईची आवडती कालवड एकादशीचें उपोषण करी! व कीर्तनश्रवणाला येऊन बसे! पृथ्वीवर दुष्टांचा भूभार असह्य झाला असतां भूमाता गोमातेच्याच रूपानें ईश्वरास शरण जाते. आपल्या हिंदुधर्मांत गोमातेचें माहात्म्य फार मानलें आहे, हें सुज्ञ जाणतच असतील.

सुप्रसिद्ध आद्य शंकराचार्यांप्रमाणें शैव धर्माचे प्रणेते, महान् तत्त्वज्ञ व योगी श्रीतिरुमूलर यांची कथा अशीच विलक्षण आहे. त्यास कोणी नंदीचा अवतार मानतात. एकदा अगस्ति ऋषींच्या दर्शनासाठीं ते उत्तरेकडील काश्मिरकडून दक्षिणेंत आले असतां, रानांत एका ठिकाणीं त्यांना एक हृदयद्रावक प्रकार दिसला. तो असा कीं, तेथील गुरचरणीवर चरणाऱ्या कांहीं गाईंचा गुराखी तेथें मृत होऊन पडला होता! त्याच्या शेजारीं त्याच्या गाई अतिशोकग्रस्त होत्साल्या उभ्या राहून डोळ्यांतून दुःखाश्रु ढाळीत असलेल्या त्यानें पाहिल्या! आपल्याला रोज चारणाऱ्या आपल्या प्राणप्रिय गोपाळाचें शव सोडून त्या तेथून जाईनात! आपल्या डोळ्यांतील अनवरत प्रेमाश्रुधारांनीं आपण त्यास संजीवित करूं, अशा वेड्या आशेनें त्यांना घेरलें होतें. तो संजीवित व्हावा म्हणून मृत्युंजय शिवाची साश्रु नयनांनीं त्या जणूं करुणा भाकीत होत्या! तें हृदयद्रावक दृश्य पाहून योगींद्र तिरुमूलर या महात्म्याला त्या गाईंची दया आली, व त्यानें आपल्या योगसामर्थ्यानें त्या गोवाऱ्याच्या शवांत प्रवेश करून त्यास संजीवित केलें. हें पाहून त्या गाई हर्षभरानें शेंपट्या वर करून त्याच्यापुढें नाचूं लागल्या! मग तिरुमूलरनें गोप-

शरीरांतच निःसंग वृत्तीनें राहून शैव तत्त्वज्ञानावर असामान्य कोटीची ग्रंथरचना केली. त्यांनीं लिहिलेल्या तिरुमंदिरादि ग्रंथांवरून असें दिसून येतें कीं, प्राचीन शैवकथांच्या उघड उघड विलक्षण वाटणाऱ्या उत्तान अर्थाच्या मागें त्यांतील रहस्यार्थ फार सूक्ष्म व अति महत्त्वाचा असूं शकतो. "परोक्ष प्रिया इव हि देवाः, प्रत्यक्ष द्विषः।" (बृ. उप. ४।२।२ ऐत. उप. ३।१४)

म्हणजे देवांना परोक्षच वर्णन आवडतें. प्रत्यक्ष उघड लिहिलेलें आवडत नाहीं, असें एक शास्त्रवचन प्रसिद्ध आहे, व ह्या दृष्टीनें पाहू गेल्यास आपल्या वैदिक वाङ्मयात व पुराणांत असे गूढ सकेत ठिकठिकाणीं आढळतात.

उदाहरणार्थ, पृथ्वीनें गाईचें रूप घेतल्याच्या कथा पुराणांत आहेत. उषा हीच दुभती धेनु व बालमार्तंड हाच तिचें स्तन्यामृत पिणारा वत्स, अशी कल्पना ऋग्वेदांत आहे हीच ब्रह्मांडातील कल्पना पिण्डांतर्गत केल्यास आत्मप्रबोधनशक्ति अथवा स्फूर्ति हीच गो म्हणजे गाय व आत्मलिंग हाच तिच्या वात्सल्यप्रेमासक्तीचा विषय, अशी भावना करतां येईल. अथर्ववेद, वाजसनेयसंहिता व शतपथ ब्राह्मण यात (प्रजापतिरूप सृष्टि) कामाची मुलगी वाक्विराट हिलाच कामधेनु असें म्हटलें आहे (ऋ ८।१००।११; ८।१०१।१६). एका ठिकाणीं तर गाईला रुद्राची आईच म्हटलें आहे. (ऋ. ८।१०१।१५). परमशिव या अव्यक्त तत्त्वाचें अप्रगट नामरूपकर्मात्मक लिंग व्यक्त होणें अगर तसें तें जाणणें, या मनश्चंद्रम्याच्या ज्ञानप्रकाश किरणास वेदांत गाईची उपमा दिलेली आढळते. (ऋग्वेद १।८४ १२; १।७१।५; १।८७।३ पहा.) हें नामरूपात्मक शिवलिंग व त्याचें व्याकरण हा सत् देवतारूप कामधेनूचा विषय फार क्लिष्ट व गूढ आहे. (छां. उप. ६। ३। २; पहा.) त्याची येथें अधिक चर्चा करणें वाचकांस कदाचित् रुक्ष व कंटाळवाणें वाटेल. सोप्या भाषेत लिहावयाचें तर गो म्हणजे इंद्रियें, त्याचें चालक जें अतर्मन तोच अज्ञातवासांतील गोरखी, बाप्पा रावळ, किंवा सुशील राजकन्या असें समजावें. त्यांची ज्ञानप्रकाशरूप अंत:स्फूर्ति तीच कामधेनु समजावी. तिची आत्मलिंगावर अखंड धारा म्हणजे ध्यानधारणा समजावें. धोपेश्वरच्या गुराख्याची कथा याप्रमाणें कदाचित् परोक्ष भाषेत लिहिली असावी. गाईनें व त्यानें कोटितीर्थांत जलसमाधि घेणें अथवा जीव देणें, म्हणजे मनाचें उन्मन होणें होय. कुदळ, खड्ग, परशु हीं सारासारविवेकबुद्धीचीं प्रतीकें वेदान्तांत मानलेलीं दिसतात. कुऱ्हाडीचा आघात म्हणजे सूक्ष्मबुद्धीनें नामरूपांचा भेद अगर बोध करून अंतर्यामीं शिव पाहणें होय. भक्ताच्या अखिल विषयजाताचें हरण करणारा तोच " स्तेनानां पतिः। " हर होय. तोच हरित ऋषि पण मानावा. अशा रीतीनें श्रीधूतपापेश्वर शिवाची श्रेष्ठ भक्ति हाच या प्रसिद्ध शिवमंदिराचा पाया होय. अथवा भूमिका

होय पण अशी श्रुत्यनुकूल आध्यात्मिक धारणा चित्तारूढ होण्यास जी शुद्ध प्रज्ञा लागते, ती नसेल तर त्यासाठीं भक्तप्रज्ञानीं श्रद्धेचा आश्रय करणें, हच योग्य ठरतें 'श्रद्धावान् लभते ज्ञानम्।' ही भगवदुक्ति प्रसिद्धच आहे म्हणून अशा केवळ श्रद्धासंपन्न सामान्य वाचकाकरिता श्रीधूतपापेश्वर माहात्म्याच्या काहीं स्थूल आख्यायिका येथें सांगतों

येथें एक स्पष्ट खुलासा करणें आवश्यक वाटतें आपल्या प्राचीन ग्रंथातील साऱ्याच घटना परोक्ष अगर लाक्षणिक भाषेंत अध्यात्माचें रूपक म्हणूनच लिहिल्या असतील, असें नव्हे ज्याप्रमाणें एकाच अहंकारात पंचतन्मात्रक अत्यंत भिन्न भासणारे विषय व्यक्त होतात, किंवा ज्याप्रमाणें ऑक्सिजन, हैड्रोजन हे अदृश्य वायु, प्रवाही दृश्यजल, व घनबर्फ हीं एकाच मूळ जलतत्त्वाचीं सूक्ष्म व स्थूल रूपें असू शकतात, त्याचप्रमाणें मूळातील एकच शिवस्वरूप अध्यात्म, अधिदैव व अधिभूत या त्रिविध रूपांत सूक्ष्म, अव्यक्त व व्यक्त दशेंत प्रतीतीस येत असणें शक्य दिसतें एकाच कमलाचे ठिकाणीं रूपरसगंध हे धर्म असू शकतात एकाच स्त्रीस सुंदर, सुगुण व पतिव्रता असें मानता येतें. तात्पर्य, एखाद्या भौतिक घटनेंतील आधिदैविक व आध्यात्मिक रहस्याची प्रचीति घेत असता त्या घटनेच्या आधिभौतिक सत्यतेला बाध येण्याचें कारण नाहीं ऐतिहासिकानीं घटना सत्य मानावी, भक्तानीं त्यातील आधिदैविक सत्याचें चिंतन करावें व ज्ञानपिपासूनें त्यातील आध्यात्मिक रूपक ग्रहण करावें असो आता वर म्हटल्याप्रमाणें श्रीधूतपापेश्वरमहात्म्याच्या काहीं आख्यायिका सांगतों

(१) एकदा राजापुरावर पेंढाऱ्याचें परचक्र आलें तेव्हा लोक घाबरून पळू लागले त्या वेळीं तेथें काहीं सतश्रेष्ठ श्रीतुकोबाराधाच्या दृढनिष्ठेचे होते त्यानीं अनन्यभावानें श्रीधूतपापेश्वराचा "त्राहि माम्! त्राहि माम्!!" म्हणून धावा केला तेव्हा काय चमत्कार सांगावा! प्रभुरामचंद्राच्या वानरसेनेप्रमाणें श्रीधूतपापेश्वर मंदिरातून असंख्य भुग्याचा लोट बाहेर पडला व त्यानीं सारें आकाश व्याप्त केलें! मागें चंद्रसेनेचा पराभव पोखरण्यासाठीं महारुद्र हनुमानानें हेंच रूप धारण केलें होतें त्या भुग्याची धाड त्वेषानें आपल्या अंगावर येत आहे असें पाहताच, त्या सर्व पेंढाऱ्याची पळता पळता दाणादाण झाली, व एक मोठेंच संकट श्रीधूतपापेश्वरकृपेनें अचानक रीतीनें टळलें

(२) "देव भक्तालागीं करूं नेदी संसार।" हा अनुभव अनेक संतांनीं घेतला आहे. श्रीधूतपापेश्वराचा एक भक्त भक्तीनें श्रीमंत तसा धनानें अत्यंत दरिद्री होता. तो रोज सकाळीं चौपदरी घेऊन भिक्षेला बाहेर पडे, तेव्हां बरोबर पाच लहान मातीचीं बोळकीं नेई व कांहीं घरीं भीक मागून शिवपूजेसाठीं त्यात दूध, दहीं, मध इत्यादि पचामृत आणी. पूजेची सर्व तयारी झाल्यावर तो स्नान करून मध्यान्ह उलटल्यावर देवळांत होणाऱ्या सामसुमींत श्रीधूतपापेश्वरमंदिरांत एकान्तांत बसून निवातपणें सायकाळपर्यंत शिवलिंगारुद्राभिषेक व त्याची षोडशोपचार पूजा करी. नंतर घरीं येऊन देवास नैवेद्य दाखवून प्रसाद ग्रहण करी ; व पुन्हा रात्रीं नऊ वाजल्यावर देवळांत सामसूम झाली कीं त्याची सायंपूजा व भगवंताशीं हितगूज रात्रीं बारा वाजेपर्यंत चाले! यामुळें देवळातील सेवेकऱ्यांना देऊळ बंद करण्यासाठीं रोज रात्रीं तिष्ठत बसावें लागे. त्यांनीं त्याबद्दल अनेक वेळां तक्रार केली. पण ती त्यानें मनावर घेतलीच नाहीं. तेव्हां गांवच्या खोताकडे त्यांनीं तक्रार नेली. खोतानें आपल्या अधिकाराच्या दर्पांत त्या भक्तास अशी तंबी दिली कीं, प्रहर रात्रीच्या आंत त्यांनीं पूजा न आटोपली तर त्याला पुन्हा देवळांत पाऊल टाकूं दिलें जाणार नाहीं. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं देवळाचे दरवाजे खरोखरच बंद केलेले पाहून, त्या भक्तानें महाद्वाराच्या बाहेर एका कोपऱ्यात दगडांचे मोठाले गुड अथवा गोटे होते, त्यांच्यापुढें बसून त्या गोट्यांच्या ठिकाणींच आपल्या हृत्पुंडरीकांतील शिवाची स्थापना करून रीतसर यथासांग पूजा केली. असेंच पुढेंहि चाललें असते. पण देव भक्ताचा अभिमानी असतो. तसेंच अभक्तांची कानउघाडणीहि त्यास करावी लागते. ह्याप्रमाणें त्या रात्रीं श्रीधूतपापेश्वर एका गोसाव्याच्या उग्र रूपांत पुजाऱ्याच्या स्वप्नात येऊन त्यास म्हणाला कीं, "तूं पूजा कोणाची करतोस? मी तर आंत नसून बाहेरच्या गुंड्यांत असतों." तसेंच त्यानें त्या खोताच्या व सेवेकऱ्यांच्या स्वप्नांत अति उग्ररूप धारण केलें व त्यांना दरडावून सांगितलें कीं, "त्या भक्ताची क्षमा मागून त्यास आंत पूजा करण्यास बोलवा, नाहीं तर तुम्हा सर्वांना या त्रिशूळांनीं ठार करीन!" प्रथम त्यांचा या स्वप्नावर भंरवसा बसला नाहीं. पण पुन्हा स्वप्नांत येऊन जेव्हां शिवरुद्रानें अत्यन्त घोर रूप धारण केलें, तेव्हां ते घाबरले! व त्यांनीं त्या शिवभक्तापुढें अनेक वेळा

लोटांगण घालून त्यांची क्षमा मागितली. त्यावर तो भक्त शांतपणें म्हणाला, "गुंड्यांत नसे ईश्वर! आहे तो काय मात्र घुमटांत!॥" पण ते सारे सेवेकरी भीतीनें भेदरून गेले होते. ते म्हणाले, "आम्हांला तें कांहीं समजत नाहीं. कांहीं असो. आपण आंतच येऊन शिवपूजा करा. नाहीं तर आम्हांस प्राणांस मुकावें लागेल!" अशी विनवणी करून त्यास आंत येण्यास त्यांनीं भाग पाडलें. श्रीधूतपापेश्वर भक्ताचा असा अभिमानी असतो.

(३) एकदा राजापूरच्या एका धनिकानें धोपेश्वरास अर्पण करण्याकरितां अकरा उत्तम कलमी आंबे आणण्यास आपल्या नोकरास सांगितलें. त्यानें त्याप्रमाणें आंबे विकत घेतले. पण तो मालकाचे घरीं येत असतां वाटेंत कर्मधर्मसंयोगानें एक अत्यंत क्षुधित असलेला वृद्ध पांथस्थ त्यास भेटला. तो दीनवाणीनें म्हणाला, "बाबा! माझें गाडें अगदींच थकलें! क्षुधेनें जीव व्याकूळ झाला आहे! एक पाऊलहि पुढें टाकवत नाहीं. तुझ्याजवळील आंब्यांतील दोन आंबे देशील तर मला जीवदान दिल्याप्रमाणें होईल." तो नोकर भाविक होता. त्याला करुणा आली व त्यानें या पांथस्थास आनंदानें आंबे खाऊं घातले. घरीं गेल्यावर आंबे कमी भरले. तेव्हां तो धनिक आपल्या नोकरास फार टाकून अनेक दुरुत्तरें बोलला. तें ऐकून त्या भल्या नोकरास फार वाईट वाटलें, व सेवाधर्म कठिण आहे! असें त्याच्या मनास जाचूं लागलें. त्याच रात्रीं त्या धनिकास श्रीधोपेश्वराचा दृष्टान्त झाला कीं, "तुझ्या नोकरानें त्या क्षुधित पांथस्थास आंबे दिले, ते मला पावले!"

(४) रुद्रंभट या नांवाचा एक सदाचारी शिवभक्त धोपेश्वरीं राहात असे. तो अठरा विश्वे दारिद्र्यानें पीडला होता. त्यामुळें त्यास ऋणग्रस्त झालें होतें. एकदा त्याच्या सावकारानें त्याच्याकडे तगाद्यास आपला शिपाई बसविला. पैसे दिल्यावांचून तो त्यास अन्नग्रहण करूं देईना. तेव्हां रुद्रंभट त्या शिपायास नम्रपणें म्हणाला कीं, "सावकाराच्या संमतीवांचून मी जेवणार नाहीं; पण तुम्ही जेवून घ्या." त्याप्रमाणें त्यानें शिपायाला जेवूं घातलें व आपण उपाशीच सावकाराच्या गांवीं जाण्यास पायीं निघाला. वाटेंत रात्रीं एका धर्मशाळेंत त्यानें मुक्काम केला. आज धोपेश्वरची एकादशनी अंतरली या दुःखानें त्यास अत्यंत बेचैन केलें होतें. त्याच वेळीं श्रीधूतपापेश्वरानें

(२) "देव भक्तालागीं करू नेदी ससार।" हा अनुभव अनेक संतानीं घेतला आहे श्रीधूतपापेश्वराचा एक भक्त भक्तीनें श्रीमत तसा धनानें अत्यत दरिद्री होता तो रोज सकाळीं चौपदरी घेऊन भिक्षेला बाहेर पडे, तेंव्हा बरोबर पाच लहान मातीचीं बोळकीं नेई व काहीं घरीं भीक मागून शिवपूजेसाठीं त्यात दूध, दही, मध इत्यादि पचामृत आणी पूजेची सर्व तयारी झाल्यावर तो स्नान करून मध्यान्ह उलटल्यावर देवळात होणाऱ्या सामसुमींत श्रीधूतपापेश्वरमंदिरात एकान्तात बसून निवातपणें सायकाळपर्यंत शिवलिंगा-रुद्राभिषेक व त्याची षोडशोपचार पूजा करी. नतर घरीं येऊन देवास नैवेद्य दाखवून प्रसाद ग्रहण करी, व पुन्हा रात्रीं नऊ वाजल्यावर देवळात सामसूम झाली कीं त्याची सायपूजा व भगवताशीं हितगूज रात्रीं बारा वाजेपर्यंत चाले। यामुळें देवळातील सेवेकऱ्याना देऊळ बद करण्यासाठीं रोज रात्रीं तिष्ठत बसावें लागे त्यानीं त्याबद्दल अनेक वेळा तक्रार केली पण ती त्यानें मनावर घेतलीच नाहीं. तेंव्हा गावच्या खोताकडे त्यानीं तक्रार नेली खोतानें आपल्या अधिकाराच्या दर्पांत त्या भक्तास अशी तबी दिली कीं, प्रहर रात्रीच्या आत त्यानीं पूजा न आटोपली तर त्याला पुन्हा देवळात पाऊल टाकू दिलें जाणार नाहीं. त्याप्रमाणें दुसऱ्या दिवशीं देवळाचे दरवाजे खरोखरच बद केलेले पाहून, त्या भक्तानें महाद्वाराच्या बाहेर एका कोपऱ्यात दगडाचे मोठाले गुड अथवा गोंटे होते, त्याच्यापुढें बसून त्या गोट्यांच्या ठिकाणींच आपल्या हृत्पुडरीकातील शिवाची स्थापना करून रीतसर यथा-साग पूजा केली असेंच पुढेंहि चाललें असतें पण देव भक्ताचा अभिमानी असतो तसेंच अभक्ताची कानउघाडणीहि त्यास करावी लागते त्याप्रमाणें त्या रात्रीं श्रीधूतपापेश्वर एका गोसाव्याच्या उग्र रूपात पुजाऱ्याच्या स्वप्नात येऊन त्यास म्हणाला कीं, "तू पूजा कोणाची करतोस? मी तर आत नसून बाहेरच्या गुड्यात असतो" तसेंच त्यानें त्या खोताच्या व सेवेकऱ्याच्या स्वप्नात अति उग्ररूप धारण केलें व त्याना दरडावून सागितलें कीं, "त्या भक्ताची क्षमा मागून त्यास आत पूजा करण्यास बोलवा, नाहीं तर तुम्हा सर्वांना या त्रिशूळानीं ठार करीन!" प्रथम त्याचा या स्वप्नावर भरवसा बसला नाहीं पण पुन्हा स्वप्नात येऊन जेव्हा शिवरुद्रानें जास्तच घोर रूप धारण केलें, तेंव्हा ते घाबरले। व त्यानीं त्या शिवभक्तापुढें अनेक वेळा

लोटांगण घालून त्यांची क्षमा मागितली. त्यावर तो भक्त शांतपणें म्हणाला, "गुंड्यांत नसे ईश्वर! आहे तो काय मात्र घुमटांत!॥" पण ते सारे सेवेकरी भीतीनें भेदरून गेले होते. ते म्हणाले, "आम्हांला तें कांहीं समजत नाहीं. कांहीं असो. आपण आंतच येऊन शिवपूजा करा. नाहीं तर आम्हांस प्राणांस मुकावें लागेल!" अशी विनवणी करून त्यास आंत येण्यास त्यांनीं भाग पाडलें. श्रीधूतपापेश्वर भक्ताचा असा अभिमानी असतो.

(३) एकदा राजापूरच्या एका धनिकानें धोपेश्वरास अर्पण करण्याकरितां अकरा उत्तम कलमी आंबे आणण्यास आपल्या नोकरास सांगितलें. त्यानें त्याप्रमाणें आंबे विकत घेतले. पण तो मालकाचे घरीं येत असतां वाटेंत कर्मधर्मसंयोगानें एक अत्यंत क्षुधित असलेला वृद्ध पांथस्थ त्यास भेटला. तो दीनवाणीनें म्हणाला, "बाबा! माझें गाडें अगदींच थकलें! क्षुधेनें जीव व्याकूळ झाला आहे! एक पाऊलहि पुढें टाकवत नाहीं. तुझ्याजवळील आंब्यांतील दोन आंबे देशील तर मला जीवदान दिल्याप्रमाणें होईल." तो नोकर माविक होता. त्याला करुणा आली व त्यानें या पांथस्थास आनंदानें आंबे खाऊं घातले. घरीं गेल्यावर आंबे कमी भरले. तेव्हां तो धनिक आपल्या नोकरास फार टाकून अनेक दुरुत्तरें बोलला. तें ऐकून त्या भल्या नोकरास फार वाईट वाटलें, व सेवाधर्म कठिण आहे! असें त्याच्या मनास जाचूं लागलें. त्याच रात्रीं त्या धनिकास श्रीधोपेश्वराचा दृष्टान्त झाला कीं, "तुझ्या नोकरानें त्या क्षुधित पांथस्थास आंबे दिले, ते मला पावले!"

(४) रुद्रंभट या नांवाचा एक सदाचारी शिवभक्त धोपेश्वरीं राहात असे. तो अठरा विश्वे दारिद्र्यानें पीडला होता. त्यामुळें त्यास ऋणग्रस्त झालें होतें. एकदा त्याच्या सावकारानें त्याच्याकडे तगाद्यास आपला शिपाई बसविला. पैसे दिल्यावांचून तो त्यास अन्नग्रहण करूं देईना. तेव्हां रुद्रंभट त्या शिपायास नम्रपणें म्हणाला कीं, "सावकाराच्या संमतीवांचून मी जेवणार नाहीं; पण तुम्ही जेवून घ्या." त्याप्रमाणें त्यानें शिपायाला जेवूं घातलें व आपण उपाशीच सावकाराच्या गांवीं जाण्यास पायीं निघाला. वाटेंत रात्रीं एका धर्मशाळेंत त्यानें मुक्काम केला. आज धोपेश्वरची एकादशनी अंतरली या दुःखानें त्यास अत्यंत बेचैन केलें होतें. त्याच वेळीं श्रीधूतपापेश्वरानें

दुसऱ्या एका धनिकास दृष्टान्त दिला कीं, " आताच्या आता रात्रीं रुद्रभटाच्या सावकाराकडे जाऊन त्याच्या देण्याची रक्कम चुकती करून पावती रुद्रभटास धर्मशाळेत लगेच पोंचती कर " त्याप्रमाणें त्या धनिकानें पैसे चुकते करून पावती रुद्रभटास आणून दिली तेव्हा त्या सत्त्वस्थ भक्तास काय वाटलें असेल, तें शब्दानीं वर्णन करता येणें शक्य नाहीं

(५) के विष्णुशास्त्री पुराणिक (या ग्रथाच्या पुरस्कर्त्यांचे वडील) यांचे व माझे सद्गुरु श्री काकामहाराज पुराणिक हे श्रीधूतपापेश्वर देवालयाचे वशपरपरा पुराणिक होते त्याचे वडील कै. भाऊकाका हे या धूतपापेश्वराचे निष्ठावत भक्त होते त्याची गरिबी असल्यामुळ त्यास द्रव्यार्जनास बाहेर जाणें भाग पडे. एकदा असेच ते परप्रातीं जाऊन तेथून पायवाटेनें परत येत असता वाटेंतील एका अरण्यात त्याना वाटमाऱ्यानीं गाठलें त्याच्याजवळचें द्रव्य व तें रक्षण करताना त्याचे प्राणहि जाण्याचा तो घोर प्रसग होता! अशा वेळीं प्रसगावधान ठेवून भाऊकाकानीं मनोमय श्रीधूतपापेश्वराची अनन्यगतिक होऊन करुणा भाकली कीं, " हे दयामय धोपेश्वरा! मला या प्राणातिक सकटातून सोडविण्यास तुजवाचून येथें कोणी नाहीं हे दीनदयाळा! तू मज गरीब कुटुबवत्सलाचें रक्षण कर मी घरीं सुरक्षित गेल्यावर तुला चादीच्या पादुका अर्पण करीन " इतक्यात ते दरोडेखोर त्याच्या अगावर येणार तोंच एक पार मोठा दिव्य शुभ्रवर्णाचा नंदी त्या गर्द अरण्यातून बाहेर आला व रागानें आपलीं शिंगें रोखून त्यानें त्या वाटमाऱ्यास दूर पिटाळून लावलें! तेव्हा त्याना भेदरून पळता पळता भुई थोडी झाली. ते वाटमारे दूर पळून गेल्यावर तो नदी शेपटी पाठीवर घेऊन मोठ्या आनदानें भाऊकाकाकडे आला! तेव्हा प्रथम त्यास भय वाटलें पण पुढें तो त्यास भीति न दाखविता अभय देऊनें अरण्यात निघून गेला व दिसेनासा झाला तें पाहून भाऊभटजींचें अत करण भक्तिप्रेमानें भरून आलें नेत्रावाटे वाहणाऱ्या कृतज्ञतेच्या अश्रुधारानीं त्यानीं

---

१ लडिवाळपणें त्याला अवलोकुनि एकवार सपूर्ण।
आलेल्या मार्गानें परतुनि झाला, अदृश्य तो पूर्ण ॥ १-६-५५

श्री. काका पुराणिक महाकाव्य.

श्रीधूतपापेश्वराच्या भूलिंगास जणुं अभिषेकच केला! पुढें त्यांनीं मोठ्या आनंदानें श्रीधूतपापेश्वरास चांदीच्या पादुका समर्पण केल्या. त्या अद्याप श्रीधोपेश्वराच्या देवस्थानांत ठेवलेल्या आहेत.

(६) आणखी एक आख्यायिका वाचनांत आहे. त्यांत ग्राह्यांश अगदीं अल्प आहे. तरी तिचा नुसता उल्लेख येथें करतों. पूर्वी केव्हां तरी राजापुरास कोणी एक पालखीपदस्थ राजवैद्य राहात असे. त्यानें एकदां कामांध होऊन घोर पाप केलें होतें. पण पुढें कृतकर्माबद्दल पश्चात्ताप पावून त्यानें श्रीधूतपापेश्वराची अंतःकरणपूर्वक क्षमायाचना केली. तेव्हां श्रीधूतपापेश्वरानें आपल्या कृपेनें त्याचें पापक्षालन करून त्यास कृतार्थ केलें. अशा आख्यायिकांमुळें या देवाचें नांव श्रीधूतपापेश्वर असें पडलें, असें सांगतात. पण ही शेवटची आख्यायिका खरी असेल, असें कांहीं स्थानिक गृहस्थ सांगत नाहींत.

यांशिवाय अवर्षण पडलें असतां श्रीधोपेश्वराला संकट घातलें तर तें दूर झाल्याचे प्रसंग अनेक घडल्याचें ऐकिवांत आहेत. हें देवस्थान जागृत असल्याबद्दल पूर्वीपासून प्रसिद्धि आहे. या देवाला संकटकालीं कौल लावणें म्हणजेच त्याच्याजवळ 'नक्षत्रमाळ मागणें' (म्हणजे देवाचा आदेश घेणें) अशी प्रथा येथें सुरू आहे. शिव धोपेश्वरीं प्रगट झाल्यावर श्रीगंगा पण त्यांच्या मस्तकीं राहण्याकरतां तेथें आली. तिचा एक लहानसा धबधबा मंदिराच्या मार्गेच सतत बारा महिने पडत असतो. ह्या धबधब्यानें उत्पन्न केलेल्या फेसाच्या राशीमुळें जणुं कर्पूरगौर शिवाच्या मस्तकावरच गंगावतरण होत आहे, असा गंभीर व रमणीय देखावा तेथें दिसतो. तेथें जवळच एक श्रीदत्तमंदिर आहे. श्रीगुरुदत्तात्रेयाचें हें नित्य दैनिक संचाराचें स्थान आहे. श्रीवासुदेवानंदसरस्वतींच्या, श्रीदत्तमहात्म्यांत असें म्हटलें आहे कीं—"ज्याचें नित्य गंगास्नान। माहुरीं करी शयन। सह्याद्रिवरी आसन। करी ध्यान गाणगापुरीं ॥ ८३ ॥ कुरुक्षेत्रीं आचमन। धोपेश्वरीं जाऊन। करी जो भस्मधारण। संध्यावंदन कऱ्हाडीं ॥ ८४ ॥" येथें आणखीहि अनेक तीर्थें व दैवतें शिवसान्निध्यास येऊन राहिलीं आहेत. मुख्य श्रीधूतपापेश्वर लिंग हें शिवाचें प्रतीक व श्रीगंगामाई हें शिवशक्तीचें प्रतीक आहे. यासंबंधीं सोनशिंग शाहीर पोवाडा म्हणतो:—

श्री धूतपापेश्वर धनी धूतपाप। जागती ज्योत। सुखी नांदती त्याची रयत। तीर्थामध्यें आंघोळ करितां रोग नाहीं रहात। " * सुखी नांदती त्याची रयत। जी, जी, जी, जी, जी, जी ॥ ध्रु० ॥

---

## प्रकरण ३ रें

## शिवशक्ति

कारणोपाधिरीश्वरः। —श्रुति

मायान्तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्।

—श्वे. उप. ४।१०.

ऐसी इयें निरुपाधिकें। जगाचीं जियें जनकें।
तियें वंदिलीं मियां मूळिकें। देवो देवी ॥

—अमृतानुभव.

शिवशक्ति जगदेश्वरी। प्रकृतिपुरुष परमेश्वरी।
मूळमाया गुणेश्वरी। गुणक्षोभिणी ॥

—१७-१-३ दासबोध.

श्रीधूतपापेश्वर हें परमात्म्याचें शुद्ध निर्गुण तसेंच शबल, सगुण, अथवा सशक्तिक रूप आहे. त्याचें शांकरमताप्रमाणें विवेचन या प्रकरणांत केलें आहे. शिवलिंग म्हणजे शिवशक्ति. अर्थात् शिवलिंगोपासनेचा विचार करतांना जगत्कारणरूप शिवशक्तींचा अथवा सशक्ति शिवाचा विचार करणें ओघासच येतें. या ग्रंथांचें मूळचें जोडनांव 'शिवशक्त्युपासना' असें होतें. पण विस्तारभयास्तव या ग्रंथांतून शक्त्युपासना हा भाग कमी केला आहे. म्हणून शिवलिंगोपासना हेंच जोडनांव दिलें आहे. तरी शिवलिंगोपासना म्हणजे शिवशक्त्युपासना हें विसरतां येत नाहीं. शैव मतांत शिव हें तत्त्व निर्गुण-सगुण असें उभयविध मानतात. ह्या ग्रंथाच्या

श्रीधूतपापेश्वर या नांवाला धरून श्रीधूतपापेश्वरमाहात्म्यवर्णन मागील प्रकरणांत केलें. वर लिहिल्याप्रमाणें श्रीशिवलिंगोपासना हें या ग्रंथाचें दुसरें नांव आहे. शिवलिंगोपासना हा अमृतानुभव आहे. भावार्थमंजिरीकार म्हणतात कीं, "उपास्य–उपासक–उपासना। एकँ तूंचि दयाघना। जी जी करावी कल्पना। ती ती पांगुळे तुजपुढें॥"॥ ३६॥ श्रीसमर्थ रामदास म्हणतात कीं, "कल्पनेनें कल्पना उडे। जैसा मृगें मृग सांपडे। कां शरें शर आतुडे। आकाशमार्गीं ॥ ३१॥ शुद्ध कल्पनेचें बळ। जालियां नासे शबल। हेंचि वचन प्रांजळ। सावध ऐका ॥ ३२॥" दा. बो. ७।५. अशी जी अमृतानुभवरूप कल्पना आहे तिला ज्ञानेश्वरांनीं निवृत्तिनाथ असें अन्वर्थक नांव दिलें आहे. श्रीधूतपापेश्वर ही अशीच परमार्थसंज्ञा आहे. श्रीशिवगुरु ही अशीच अज्ञाननाशपूर्वक कैवल्यस्वरूप कल्पना आहे. शिव हें उपास्य, साधक हा उपासक व उपासना हेंच शक्तिस्वरूप आहे. एकाच डोंगरात कोरलेल्या शिवशक्ति व भृंगी याप्रमाणें हें निर्द्वंद्व स्वरूप आहे. आपलेंच स्वरूप (बुद्धिरूप) आरशांत पाहिलें असतां तेथें बिम्ब, प्रतिबिम्ब व कल्पना किंवा बुद्धि असें विविध रूप भासतें. हेंच उपासनेचें तात्त्विक स्वरूप होय. या उपासनास्वरूप शिवशक्ति समावेशनाच्या गूढ व गोड रहस्याचा श्रीज्ञानदेवादि संतांच्या दृष्टीनें थोडा विचार करूं.

त्यासाठीं श्रीज्ञानेश्वर प्रथमें सद्गुरुसमाश्रय करतातः "तदाश्रयाकारण। मी माझें मीपण। आलों असें घेऊन। त्याशीं समरस व्हावया" ॥ १–२०॥ (अमृतानुभव, भावार्थमंजिरी) शिवोभूत्वा शिवं यजेत्, अशी शिवोपासनेची प्रक्रिया आहे. "देहभाव हारपला। तुज पाहतां विठ्ठला॥" असें म्हणत श्रीतुकोबा विठ्ठलस्वरूपच झाले. अशी उपासकाची शरणागति पाहिजे. शिवोपासकानें शिवरूप होण्याची जी विद्या तीच शिवशक्ति, तीच शांकरी अथवा शैवांची शांभवी विद्या होय. तीच ब्रह्मविद्या व तीच हैमवती उमा होय. श्रीज्ञानदेव म्हणतात, "सांडूनी मीठपणाचा लोभू॥ मिठें सिंधुत्वाचा

---

१ अमृतानुभव श्लोक—

यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययम्।
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये ॥ १ ॥

श्री धूतपापेश्वर धनी धूतपाप। जागती ज्योत। सुखी नांदती त्याची रयत। तीर्थामध्यें आंघोळ करितां रोग नाहीं रहात। * * सुखी नांदती त्याची रयत। जी, जी, जी, जी, जी, जी ॥ ध्रु० ॥

---

प्रकरण ३ रें

## शिवशक्ति

कारणोपाधिरीश्वरः। —श्रुति

मायान्तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम्।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्।

—श्वे. उप. ४।१०.

ऐसी इयें निरुपाधिकें। जगाचीं जियें जनकें।
तियें वंदिलीं मियां मूळिकें। देवो देवी॥

—अमृतानुभव.

शिवशक्ति जगदेश्वरी। प्रकृतिपुरुष परमेश्वरी।
मूळमाया गुणेश्वरी। गुणक्षोभिणी॥

—१७-१-३ दासबोध.

श्रीधूतपापेश्वर हें परमात्म्याचें शुद्ध निर्गुण तसेंच शबल, सगुण, अथवा सशक्तिक रूप आहे. त्याचें शांकरमताप्रमाणें विवेचन या प्रकरणांत केलें आहे. शिवलिंग म्हणजे शिवशक्ति. अर्थात् शिवलिंगोपासनेचा विचार करतांना जगत्कारणरूप शिवशक्तींचा अथवा सशक्ति शिवाचा विचार करणें ओघासच येतें. या ग्रंथाचें मूळचें जोडनांव 'शिवशक्त्युपासना' असें होतें. पण विस्तारभयास्तव या ग्रंथांतून शक्त्युपासना हा भाग कमी केला आहे. म्हणून शिवलिंगोपासना हेंच जोडनांव दिलें आहे. तरी शिवलिंगोपासना म्हणजे शिवशक्त्युपासना हें विसरतां येत नाहीं. शैव मतांत शिव हें तत्त्व निर्गुण–सगुण असें उभयविध मानतात. ह्या ग्रंथाच्या

श्रीधूतपापेश्वर या नांवाला धरून श्रीधूतपापेश्वरमाहात्म्यवर्णन मागील प्रकरणांत केलें. वर लिहिल्याप्रमाणें श्रीशिवलिंगोपासना हें या ग्रथाचें दुसरें नांव आहे. शिवलिंगोपासना हा अमृतानुभव आहे. भावार्थमंजिरीकार म्हणतात कीं, "उपास्य–उपासक–उपासना। एकं तूंचि दयाघना। जी जी करावी कल्पना। ती ती पांगुळे तुजपुढें॥"॥ ३/१॥ श्रीसमर्थ रामदास म्हणतात कीं, "कल्पनेनें कल्पना उडे। जैसा मृगें मृग सांपडे। कां शरें शर आतुडे। आकाशमार्गीं ॥ ३१॥ शुद्ध कल्पनेचें बळ। जालियां नासे शबल। हेंचि वचन प्रांजळ। सावध ऐका ॥ ३२॥" दा. बो. ७।९. अशी जी अमृतानुभवरूप कल्पना आहे तिला ज्ञानेश्वरानीं निवृत्तिनाथ असें अन्वर्थक नांव दिलें आहे. श्रीधूतपापेश्वर ही अशीच परमार्थसंज्ञा आहे. श्रीशिवगुरु ही अशीच अज्ञाननाशपूर्वक कैवल्यस्वरूप कल्पना आहे. शिव हें उपास्य, साधक हा उपासक व उपासना हेंच शक्तिस्वरूप आहे. एकाच डोंगरात कोरलेल्या शिवशक्ति व भृंगी याप्रमाणें हें निर्द्वंद्व स्वरूप आहे. आपलेंच स्वरूप (बुद्धिरूप) आरशांत पाहिलें असतां तेथें बिम्ब, प्रतिबिम्ब व कल्पना किंवा बुद्धि असें विविध रूप भासतें. हेंच उपासनेचें तात्त्विक स्वरूप होय. या उपासनास्वरूप शिवशक्ति समावेशनाच्या गूढ व गोड रहस्याचा श्रीज्ञानदेवादि संतांच्या दृष्टीनें थोडा विचार करू.

त्यासाठीं श्रीज्ञानेश्वर प्रथमं सद्‌गुरुसमाश्रय करतातः "तदाश्रयाकारण। मी माझें मीपण। आलों असें घेऊन। त्याशीं समरस व्हावया"॥ १–२०॥ (अमृतानुभव, भावार्थमंजिरी) शिवोभूत्वा शिवं यजेत्, अशी शिवोपासनेची प्रक्रिया आहे. "देहभाव हारपला। तुज पाहतां विठ्ठला॥" असें म्हणत श्रीतुकोबा विठ्ठलस्वरूपच झाले. अशी उपासकाची शरणागति पाहिजे. शिवोपासकानें शिवरूप होण्याची जी विद्या तीच शिवशक्ति, तीच शांकरी अथवा शैवांची शामवी विद्या होय. तीच ब्रह्मविद्या व तीच हैमवती उमा होय श्रीज्ञानदेव म्हणतात, "सांडूनी मीठपणाचा लोभू॥ मिठें सिंधुत्वाचा

१ अमृतानुभव श्लोक—

यदक्षरमनाख्येयमानंदमजमव्ययम्।
श्रीमन्निवृत्तिनाथेति ख्यातं दैवतमाश्रये॥ १॥

घेतला लाभू । तेविं अहं देऊनि शंभु ॥ शांभवी झालों" ॥ १६३ ॥ यावर भावार्थमंजिरीकार म्हणतात, "तेवीं (मिठाच्या खड्याप्रमाणें) अहंपणाचा कठिणपणा । मी आपला त्यजूनि जाणा । शिवशक्तीच्या ठिकाणा । समरस जाहलों ॥ १॥३३९॥ शिवशक्तीसीं युक्त होऊन । त्यां हें केलें असें नमन । जेवीं केळीगर्भाचें आकाश जाण । महदाकाशीं मिळतसे ॥ ३३७॥ केळीगर्भामाझारीं । आकाश पूर्वींचेंच निर्धारीं । तें सोपटें काढितां सारीं । आकाश आकाशीं मिळालें" ॥ ३३८ ॥ प्र. १.

**श्रीएकनाथ म्हणतात**:—पाहूं जातां नारायण । पाहतां मुकिजे आपण ॥ १ ॥ ऐसी भेटीची नवलावो । पाहतां नुरे भक्त देवो ॥ २ ॥ पाहतां माठवेंचि दुजें । तेंचि होइजे सहजें ॥ ३ ॥

**श्रीसमर्थ म्हणतात**:—देवास वोळखों जातां । तेथें आली तद्रूपता । देवभक्त विभक्तता । मुळींच नाहीं ॥ १५ ॥ दा. बो. ८।८.

**तुकोबाराय म्हणतात**:—देव पाहावया गेलों । तेथें देव होउनि ठेलों ॥ १ ॥

अशी जी पराकोटीची शिवभक्ति तीच शिवाशीं अविनाशभूत असलेली *शिवशक्ति होय. शिवप्रियाच्या प्रसन्नतेसाठीं शक्तिमातेची मध्यस्थी तीच भक्ति.*

एका परमशिव अधिष्ठानावर शिव आणि शक्ति हीं दोन सापेक्ष आभासरूप तत्त्वें आहेत. अमृतानुभव भावार्थमंजिरींत यांचें पुढीलप्रमाणें फार सुबोध वर्णन केलें आहे: "हीं दोन भासती । परी कोणें निर्मिलें कवणाप्रति । वा कोणाचा अर्थ कोणती । हें कांहीं नुमगे ॥ ३० ॥ दोन म्हणतां आहे एक । एक म्हणतां दोन देख । कां कीं दोहोंवांचून निःशंक । उत्पत्ती न तिसऱ्याची ॥ ३२ ॥ शुद्ध ब्रह्माचिये ठायीं । दुसऱ्याची वार्ताच नाहीं । एथें हीच नवलाई । एकें दोघांत *निर्मिलें* ॥ ३५ ॥ इतरत्र ऐसें होतें । दोघें *निर्मिती* एकातें । दोन टाळाठायीं उठते । ध्वनी सुपहो एकची ॥ ३६ ॥ शुद्ध ब्रह्मापासून । शिवशक्ति निर्माण । परी कोणा आधीं कोण । झाला हें नुमगेची ॥ ३७ ॥" प्र. १. पति आणि पत्नी, पिता आणि पुत्र, स्वामी आणि सेवक, बिंब आणि प्रतिबिंब हे सापेक्ष भाव एकदमच निर्माण होतात. पुरुषाला पती-

१ मी देही हा अहंकार.

पणा पत्नी देते व स्त्रीला पत्नीपणा पतीमुळें मिळतो. याप्रमाणेंच मूळ पुरुष प्रकृतींची शिवशक्ति ही सापेक्ष जोडी आहे. श्रीसमर्थ म्हणतात कीं, "तत्त्वतः मूळमाया तोचि मूळपुरुष ॥ तोचि सकळांचा ईश ॥" दा. बो. ८।३।२०.

अमृतानुभवाच्या चवथ्या श्लोकाचा भावार्थ मंजिरीकार असा सांगतात :— "शिव आणि शक्ति ॥ हीं दोन मासती। परी एकपणाची प्रचीती। ढळत नसे ॥ ४१ ॥ या शिवशक्तीचे ठायीं जाण। जें उरलें अपूर्णपण। तें त्यांनींच केलें धारण। पूर्ण ब्रह्म दावावया ॥ ४२ ॥ आखात आणि उपसागर। हे सागराचे प्रकार। परी अपूर्णत्व साचार। आहे माथीं उभयतांच्या ॥ ४३ ॥ त्यांनीं आपुलें अपूर्णपण। जें केलें धारण। तें सागर जो का परिपूर्ण। तया लागीं दावावया ॥ ४५ ॥ शुद्ध ब्रह्मापासून। प्रकृति पुरुष निर्माण। प्रकृति पुरुषांचें असणेंपण। तें हें जगत दिसे जें ॥ ४७ ॥ गोडीचा लाभ व्हावयास। जैसें आवाहन शर्करेस। तैसें ब्रह्मज्ञान होण्यास। वंदणें प्रकृतिपुरुषाला ॥ ४८ ॥"

एका अर्थी शिवशक्ति हें द्वंद्व कल्पक—कल्पनेप्रमाणें भिन्नसत्ताक आहे. अर्थात् त्यांचा साक्षात् संबंध अशक्य आहे. कारण केवलाद्वैत वेदान्ताप्रमाणें परमार्थतः शक्ति-माया-कल्पना हें स्वरूप मिथ्या आहे. तरी अध्यारोप दृष्टीनें त्यांच्या अनिर्वचनीय संबंधास अनुलक्षून त्यांस वंदन केलें आहे. तें तद्रूपतेनें केलें आहे. शिव ही पारमार्थिक सत्ता व शिवसंकल्प ही व्यावहारिक सत्ता आहे. येथें हें ध्यानीं ध्यावें कीं, कल्पनेचे संस्कार कल्पकाच्या ठिकाणीं जेव्हां लीन होतात, तेव्हां ते त्याच्या आत्म्यांत लीन होत नाहींत. त्याच्या बुद्धि—उपाधींत लीन होतात. पण बुद्धि ही उपाधि मिथ्याच आहे. तिला त्रिकालाबाधित पारमार्थिक सत्ता नाहीं. ती बाधित होते. अशा या बुद्धीच्या ठिकाणचे ( शिवशक्ति-स्वरूप ) अहं-इदं किंवा विषय-विषयीभाव हे ब्रह्मात्म्यावरील विवर्त आहेत. वस्तुतः ब्रह्मात्म्याच्या ठिकाणीं दोन्ही भाव नाहींत. हें गूढ रहस्य ब्रह्मात्मैक्यानुभवावांचून पटणें शक्य नाहीं. त्या अमृतानुभवाअंतीं शिव-शक्ति व भृंगी हें त्रिकूट विलय पावून एक परमशिव तत्त्व काय तें उरतें. त्याची कोण काय कल्पना करणार !

---

१ अद्वैतमात्मनस्तत्त्वं दर्शयन्तौ मिथस्तराम्।
तौ वन्दे जगतामाद्यौ तयोस्तत्त्वाभिपत्तये ॥ ४ ॥

तथापि दृष्टान्तानें कांहीं अंशीं परोक्ष कल्पना करतां येईल. उदाहरणार्थ :— सर्पभ्रमनिरासासाठीं "हा सर्प नव्हे" ही दोरी आहे असें सांगतांना अध्यारोपित सर्पाचें तात्पुरतें उच्चारण अथवा ग्रहण करावें लागतें. त्याप्रमाणें परमशिव या अधिष्ठानाच्या ठिकाणीं भासमान होणारी शक्ति तत्त्वतः शिवाहून पृथक् नव्हे, शिवरूपच ती, असें म्हणावें लागतें. अध्यस्त (सर्प) कल्पनेला अधिष्ठानाहून (रज्जु) पृथक् सत्ता नसते. अर्थात् येथें रज्जु आणि तिच्यावर भासणारा सर्प असा भेद मूळांत संभवतच नाहीं. कारण रज्जू-सर्पाला सत्ता केव्हांच त्रैकालिक नसते. याप्रमाणें शिवशक्ति हें वस्तुतः द्वंद्व नव्हेच. शिवशक्ति म्हणजे अधिष्ठानरूप एक परमशिवच, असें समजावें. या निर्नाम अधिष्ठानाला शिव हें नांव शक्तिसापेक्ष तात्पुरतें दिलें इतकेंच. पण असें असलें तरी जोपर्यंत मनुष्यास जीवभाव आहे, तोंपर्यंत शिवशक्ति हें द्वंद्व अथवा परमात्मा + माया + मायेंत परमात्म्याचें प्रतिबिंब हें ईश्वर-स्वरूप त्रिकूट सत्य मानणें भागच आहे. तत्त्वज्ञानाची केवळ ज्ञानदृष्टि व उपासनेची व्यावहारिक दृष्टि यांत सूक्ष्म, स्थूल असा भेद आहे. एकीचें लक्ष्य शुद्ध ब्रह्म असतें तर दुसरीचें शबल ब्रह्म हें लक्ष्य असतें. अथवा लक्ष्यार्थ आणि वाच्यार्थ असा त्यांत भेद मानतात. अशा या सशक्तिक ईश्वरास किंवा शबल ब्रह्मास व्यावहारिक व तात्त्विक दृष्टींनीं ज्ञानेश्वरांनीं पांचव्या श्लोकांत वंदन केलें आहे. तो श्लोक असा :—

मूलायाग्राय मध्याय मूलमध्याग्रमूर्तये ।
क्षीणाग्रमूलमध्याय नमः पूर्णाय शंभवे ॥ ५ ॥

या श्लोकावरील कळंबचे सत्पुरुष श्रीनिरंजन रघुनाथ यांची टीका[१] फार मार्मिक आहे. ते म्हणतात :— "आतां संपूर्ण शक्तियुक्त चैतन्य शबलब्रह्म जें तोचि पूर्ण शंभु, त्याकारणें नमस्कार करितात. आतां तो पूर्ण शंभु कैसा? मूलाय—संपूर्ण संसारास मूळ म्हणजे कारण, अशी जे ज्ञानरूपा **आदिशक्ति** तिणेंकरून युक्त; अग्राय—संपूर्ण जगताचें अग्र अशी जे त्रिगुणात्मिका **मायाशक्ति** तिणेंकरून युक्त; मध्याय—संपूर्ण जगताचें मध्य अशी जे **अष्टधाप्रकृति** तिणेंकरून युक्त. ऐशा तीन शक्ति आहेत ज्या शबल ब्रह्माच्या; आणखी तो शंभु कैसा होय? मूलमध्याग्रमूर्तये—चिच्छक्तियुक्त

१ अनुभवामृतपदबोधिनी.

चैतन्य जें त्यास परमात्मा शिवं ऐसें नाम, आणि प्रकृतियुक्त चैतन्य जें त्यास पुरुषं ऐसें नाम, आणि मायायुक्त चैतन्य जें त्यास ईश्वरं ऐसें नाम, ऐशा तीन मूर्ति आहेत ज्याच्या; आणखी तो शंभु कैसा होय?" "क्षीणाग्रमूलमध्याय"—पूर्वी वर्णिल्या ज्या मूल, मध्य, अग्र, रूपें-करून शक्ति तीन, त्या क्षीण म्हणजे अविद्यमान आहेत ज्याच्या ठायीं, ऐसा होय. आणखी तो शंभु कैसा होय? "पूर्णाय"—देशकालवस्तु-परिच्छेदरहित ऐसा; अस्तु. या संपूर्ण विशेषणेंकरून युक्त जो शंभु, त्याज-कारणें माझा नमस्कार असो."

दुसरे एक टीकाकार अद्वय दृष्टीनें म्हणतात कीं, गगनांत गगनरूपानें विद्यमान असणाऱ्या (स्थिर अगर विरलेल्या) वायूपासून जशी गगनाची अद्वितीयता व रसता बाधित होत नाहीं, किंवा दुधांत दूधरूपानें विद्यमान असणाऱ्या तुपामुळें जशी दुधाची अद्वितीयता व एकरसता भंग पावत नाहीं, त्याप्रमाणें परमात्मस्वरूपांत परमात्मरूपानें विद्यमान असणाऱ्या शक्ति-विशेषामुळें परमात्म्याच्या अद्वितीयतेचा व एकरसतेचाहि बाध होण्याचें कारण नाहीं.

ऐसीं जीं निरुपाधिकें। जगाचि जियें जनकें। वंदिलीं मिया मूळिकें। देवो देवी ॥ १ ॥ या अमृतानुभवांतील पहिल्या ओवीचा भावार्थ निरानिराळे

---

१ तें तो गा उत्तम पुरुषु। जो तृतीय कां निष्कर्षु। दोहींहून आणिकु। मागिला जो ॥ ज्ञानेश्वरी १५।५२९; गीता १५।१७.

२ तरी केवळ जे सत्ता। तो पुरुष गा पांडुसुता। प्रकृति ते समस्तां। क्रिया नाम ॥ ज्ञानेश्वरी १३।९६६; गीता १३।१९.

३ स्वमायेचें आड वस्त्र। लावूनि एकला खेळवी सूत्र। बाहेरी नटी छाया विचित्र। चौऱ्यांशीं लक्ष ॥ १८।१३०३ ज्ञानेश्वरी; गीता १८।६१.

४ जैसा वारा कां गगनीं विरे। मग वारेपण वेगळें नुरे। तेवीं भक्त हे पैज न सरे। जरी ऐक्या आला ॥ ११४ ॥ जरी पवन हालवूनि पाहिजे। तरी गगना वेगळा देखिजे। एऱ्हवीं गगन तो सहजें। असे जैसें ॥ ११५ ॥ (ज्ञानेश्वरी अ. ७) पैं गगन जेवढें जैसें। पवनुहि गगनीं तेवढाचि असे सहजें हालविलिया वेगळा दिसे। एऱ्हवीं गगन तेंचि तो ॥ ८९ ॥ (ज्ञानेश्वरी अ. ९).

टीकाकार निरनिराळा करतात, तो चिंतनीय आहे. श्री. निरंजन रघुनाथ म्हणतात कीं, शिवशक्ति हीं निरुपाधिक म्हणजे ब्रह्मस्वरूप होत. तसेंच तीं हिरण्यगर्भादि जगतांचीं जनकें म्हणजे मातापितरेंहि होत. तीं देवो देवी म्हणजे द्योतमान आहेत आणि संपूर्ण जगताचीं मूळिकें म्हणजे विवर्त-उपादानत्वेंकरून कारणहि होत.

भावार्थमंजिरीकार म्हणतात— जेवढें जगीं भासत। वा जेवढें दृश्य जात। तेवढें आहे परिप्लुत। प्रकृती आणि पुरुषांनीं ॥ ५९ ॥ भासणें-पणा दिसणेंपणा। हा त्यावरी आरोप जाणा। नांवें ठेविलीं ती कल्पना। पाहूं जातां शिवशक्ति ॥ ६० ॥ शिवशक्तींचें एकीकरण। तेंच जगाचें जगपण। झालें निर्मिलें म्हणून। शब्द खोटे सहजची ॥ ६२ ॥ परी अज्ञान अज्ञानें निवटतें। म्हणून उपाधीचें ग्रहण येथें। केलें पाहिजे तात्पुरतें। शुद्धज्ञान होण्यास्तव ॥ ६३ ॥

दुसरे एक टीकाकार म्हणतात कीं, एकाच मूळ स्फुरणाचीं अहं इदं हीं अर्धीं असल्यामुळें तीं दोन्ही निरुपाधिक म्हटलीं आहेत. कारण उपाधि म्हणजे वस्तूचें ज्ञान करून देऊन त्या वस्तूहून निराळी राहाते ती ( शाखाचंद्र याप्रमाणें ); पण येथें अहं हेंच इदं बनलें आहे. इदं हें अहंहून निराळें राहाणें शक्यच नाहीं. अहं–इदं दोन्ही कल्पनाच. दोन्ही प्रातिभासिकेंच होत.

मंजिरीकार म्हणतात :– वेगें नाम प्रकृती। परी मूळचा शिव निश्चिती। शिवपणाची तीच गती। पाहतां सच्चिदानंद एक ॥ ६८ ॥ नट पाहातां सुंदर पुरुष। तयानें घेतां स्त्रीवेष। तेथें स्त्रीवेषाच्या सुंदरतेस। कारण पूर्वींचीच सुंदरता ॥७१॥ हें यांचें दोन होणें। केवळ विलासाकारणें। कां कीं विलासाचें पारणें। न फिटे दोहोंविण ॥ ९१ ॥ जें दोघांचें एकीकरण। तें हें जगाचें जगपण। जगद्वस्तूचें निरीक्षण। केल्या येईल कळोनी ॥ ९९ ॥ अस्तिभाति आणि प्रिय। हें शिवाचें अंश पाह्य। नामरूपाचा तो ठाय। सहज आहे शक्तीसी ॥ १०० ॥

आतां शिवशक्तिनिरूपण-समासांतील श्रीसमर्थ रामदासांच्या कांहीं ओंव्या नमुन्याकरतां देतों. " निश्चळीं स्मरण चेतलें। त्यास चैतन्य ऐसें कल्पिलें। गुणसमानत्वें जालें। गुणसाम्य ऐसें ॥ ६ ॥ गगनीं आली अभ्रच्छाया। तैसी जाणिजे मूळ माया। उद्भव आणि विलया। वेळ नाहीं ॥ ७ ॥ निर्गुणीं

गुणविकारू । तोचि षड्गुणेश्वरू । अर्धनारीनटेश्वरू । तयासी म्हणिजे ॥ ८ ॥ आदिशक्ति शिवशक्ति । मुळीं आहे सर्वशक्ति । तेथून पुढें नाना व्यक्ती निर्माण जाल्या ॥ ९ ॥ नरनारी दोनी भेद । पिंडीं दिसती प्रसिद्ध । मुळीं नस्तां विशद । होतील कैसी ॥ १५ ॥ नरनारींचें बीज कारण । शिवशक्ती-मध्यें जाण । देह धरितां प्रमाण । कळों आलें ॥ २४ ॥ मुळीं शिवशक्ति खरें । पुढें झालीं वधूवरें । चौऱ्यांसि लक्ष विस्तारें । विस्तारली जे ॥ ३३ ॥" दा. बो. १७।२. याप्रमाणें या शिवशक्तिनिरूपणांत जगाच्या उभारणीचा म्हणजे अध्यारोपाचा विचार सांगितला. पुढें विसावे दशकांत चवथ्या समासांत पुन्हां शिवशक्तिनिरूपण सांगितलें आहे. त्यांत शिवशक्ति यांचें नांव नाहीं-पण सर्व द्वैताचा आत्म्याच्या ठिकाणींच अपवाद केला आहे.

श्रीसमर्थ म्हणतात :—" विचार नेहटूनसा पाहे । तरी उपासन आपणचि आहे । येक जाय येक राहे । देह धरूनी" ॥ २०।४।२३ ॥ श्रीहंसराजस्वामी आपल्या 'संकेत कुबडींत' याचा स्पष्ट खुलासा करतात, तो असा—चौथा ( समास ) म्हणे सर्व चालवी । ते द्रष्टा साक्षीची उठाठेवी । उपासना नेहटून पाहावी । तरी तेंचि ज्ञान ॥ १६ ॥ मूळ संकल्प मूळ जाणीव । ज्ञान उपासना हे अपूर्व । दोहोंसी पाहातां अभिनव । अधिष्ठान आपण असे ॥ १७ ॥ तेंचि परब्रह्म जाणावें । दुजेविण उगेंचि असावें । निर्विकार तें स्वभावें । असताचि असे ॥ १८ ॥

आतां श्रीएकनाथ हा शिवशक्तिविलास अगर आभास यांचें निरूपण करतांना थोड्या वेगळ्या शब्दांत हेंच सार कसें सांगतात त्याचा थोडा नमुना पुढें देतोंः— " जेवीं मोतियांची कंठमाला । भ्रमें सर्प भासली डोळां । ते भ्रमांतीं घालितां गळां । न बाधी कंटाळा सर्पभयाचा ॥ ६८ ॥ तेवीं शिवशक्तिविवंचन । तुज मी सांगेन संपूर्ण । जें आकर्णितां सावधान । द्वंद्वें सकारण हारपती ॥ ६९ ॥ + + + तेथ मी ब्रह्म हें स्फुरे जें स्फुरण । तेंचि मायेचें मुख्य लक्षण । तेंचि प्रकृति–पुरुषांचें जन्मस्थान । जावळीं फळें जाण जन्मलीं ॥ ७५ ॥ + + + जेवीं रूपासवें छायेची व्यक्ति । तेवीं ब्रह्मीं मायेची निजस्थिति । तिणें उपजविली शिवशक्ति । पुरुष प्रकृति द्विधा भेदें ॥ ८८ ॥ + + + नवल दोघांची सोयरिकी । दोघीं भांवडें होतीं सखीं । तो बाप ते त्याची लेकी । पाहातां विवेकी तो पुत्र तिचा ॥ २० ॥

पापरी अगम्यागमन। तिहीं दोघीं करूनि जाण। वाढविले अनेक जन। तिसरेंपण नातळतां ॥ २१ ॥ ऐसा अव्यभिचारी व्यभिचारू। करूनि वाढविला संसारू। तो अति अतर्क्य अगोचरू। अगम्य दुर्धर शिवादिकां ॥ २२ ॥ हा निजशक्तिप्रकृतिमेळें। भोगी शिवत्वाचे सोहाळे। प्रिया न देखतां तात्काळें। सांडी सगळें शिवत्व ॥ २३ ॥" एकनाथी भागवत अ. २४.

जें जें सगुण, सक्रिय, अथवा शबल तें शिवशक्तिस्वरूप आहे. व्यवहारतः तेंच उपास्य व तेंच ध्येय होय. निर्गुण परमशिवतत्त्व अव्यवहार्य आहे. (मा. उप० १२) तें ध्येय तर नाहींच, पण ज्ञेयहि नाहीं. तें ज्ञेयनिरपेक्ष ज्ञातृस्वरूप आहे. (केन उप० २।२,३). ते प्रकाश्य वस्तुविरहित स्वयप्रकाशरूप आहे. शिवलिंग हें शिवशक्तीचें प्रतीक आहे. शाखाचन्द्रन्यायानें त्याला शिवाचें प्रतीक असेंहि म्हणतात. पण तो उगाच समजुतीचा प्रकार आहे. शक्ति व शिव यांच्या प्राधान्य भावानें व सापेक्षतेनें, साळुंका ते शक्तिप्रतीक व बाण तें शिवप्रतीक, असेंहि म्हणतात. पण वस्तुतः निर्गुण परमशिव तत्त्व अलिंग आहे. लिंग म्हणजे प्रकृति होय. नामरूपकर्म हें प्रकृतीचें लक्षण आहे तीच शिवशक्ति जाणावी सत्-चित्-आनंद हे उगाच समजुतीकरितां परम शिवाचें स्वरूपलक्षण मानतात.

स भैरवश्चिदाकाशः शिव इत्यभिधीयते।
अनन्यां तस्य तां विद्धि स्पंदशक्तिं मनोमयीम् ॥६॥८४।२.

शिवत्वाव्यतिरेकेण शिवतैवं विदश्यताम्।
यथांगशून्यता व्योम्नः स्पंदनं मातरिश्वनः ॥२३॥ यो. वा.

जैसी कां समीरेंसकट गती। कां सोनियासकट कांती।
तैसी शिवेसी शक्ति। अवघीच जे॥ अमृतानुभव १।४१.

## प्रकरण ४ थें

# शैव तत्त्वज्ञान

**सृष्टिकाले महेशानः पुरुषार्थप्रसिद्धये**
**विधत्ते विमलं ज्ञानं पञ्चस्त्रोतोपलक्षितम्।** मृगेन्द्रागम.

मागील प्रकरण सांप्रदायिक शैवमतानुसार नाहीं. म्हणून हें प्रकरण लिहीत आहें. आपला महाराष्ट्र प्रायः श्रीमच्छंकराचार्य मतानुसारीच आहे व मी बहुधा त्याच मतास अनुसरून हा ग्रंथ लिहीत आहें. तथापि लिंगायतांचें तत्त्वज्ञान व शाक्त तत्त्वज्ञान अशा कांहीं सांप्रदायिक तत्त्वज्ञानांचें शैव तत्त्वज्ञानाशीं अंशतः साम्य दिसतें. म्हणून शैव तत्त्वज्ञानाचें किंचित् स्वरूप पुढें दाखवीत आहें. स्थूलमानानें पाहातां शैव तत्त्वज्ञान हें श्रीमच्छंकराचार्यांचें केवलाद्वैत व श्रीरामानुजांचें विशिष्टाद्वैत यांच्या मध्यवर्ती आहे. शैव तत्त्वज्ञान शिवशक्तीला मिथ्या मानीत नाहीं. शिव सक्रिय व निष्क्रिय उभयविध मानतें. अर्थात् शिवशक्तीचें स्थूल अथवा व्यक्त स्वरूप जें जगत् त्यासहि तें केवलाद्वैताप्रमाणें मिथ्या मानीत नाहीं. यामुळें कित्येक आधुनिकांच्या विचारसरणीला तारतम्यानें तें जास्त जुळतें वाटेल. असो. आतां शैव तत्त्वज्ञान सारांशरूपानें सांगतों.

सकल जगन्नियंत्या पर-शिवानें सृष्टीच्या आरंभीं जीवांचा भोग व मोक्ष या मुख्य प्रयोजनांच्या सिद्धयर्थ पर आणि अपर अशा दोन प्रकारचें शास्त्र प्रगट केलें. ज्यांत पशु-पति तत्त्वाचा म्हणजे परमशिवस्वरूपाचा बोध आहे ती पराविद्या कामिकादि वातुलान्त शिवागमांमध्यें वर्णित आहे, आणि ज्यांत पशु व पाश म्हणजे जीव आणि माया यांचें ज्ञान आहे, असे जे ऋगादि वेद तीं (शैवमतानें) अपरा विद्या होय. हें शिवज्ञान (१) शैव, (२) पाशुपत, (३) सोम (४) लाकुल असे चार प्रकारचें आहे. यांत पहिलें ज्ञान सौम्य व बाकीचीं रौद्र आहेत. शैवज्ञानांत वाम, दक्षिण, मिश्र आणि सिद्धान्त असेहि चार भेद आहेत. त्यांत सिद्धान्तज्ञान सर्वश्रेष्ठ होय. हें सिद्धान्तज्ञान पहिल्या मूळ नादरूपानें शिवानें प्रगट केलेल्या नित्यसिद्ध विमल ज्ञानांतून, शिवानें सदाशिव अवस्थेंत आपल्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष

आणि ईशान या पाच मुखांनीं, प्रणवादि नामक दहा शिव, आणि अनादि इत्यादि नामक अठरा रुद्र याप्रमाणें अठ्ठावीस दिव्य शिष्यांना ( कोठें ही प्रथम शिष्यांची संख्या ६६ मानतात ) सांगितलें तेच शैवांचे अठावीस आगम होते[१] यांच्याच पुढें शाखा, उपशाखा वाढता वाढता एक परार्धावर वाढल्या त्यांतील अल्पसार पुढें देत आहे

**शैवांचें तत्त्वज्ञान** —इतर दर्शनकार चोवीस किंवा पंचवीस तत्त्वें मानतात, तर शैव छत्तीस तत्त्वें मानतात[२] त्यांतील पहिलीं बारा तत्त्वें जास्त मानण्यानें शैव तत्त्वज्ञान अधिक सूक्ष्म व समृद्ध समजण्यांत येतें या मताप्रमाणें पंचमहाभूतें हीं शब्दस्पर्शरूपरसगंध या पंचतन्मात्रांतून उत्पन्न होतात पंचतन्मात्रांचा उद्भव अहंकारांतून होतो या तमप्रधान अहंकारास भूतादि म्हणतात अहंकाराचे ( सत्त्व ) तैजस, आणि ( रज ) वैकृत, असे आणखी दोन प्रकार आहेत. तैजसांतून ज्ञानेंद्रियें व मन उद्भूत होतात, आणि कर्मेंद्रियें वैकृतांतून उत्पन्न होतात बुद्धि–अहंकार–मन व चित्त हें अंत:करण-चतुष्टय होय. बुद्धीचे दहा धर्म ( पांच यम, पांच नियम ), ऐंशीं ज्ञानप्रकार, शंभर वैराग्यप्रकार, चौसष्ट ऐश्वर्यप्रकार, दहा अधर्म, चौसष्ट अज्ञान, शंभर अवैराग्य, आठ अनैश्वर्य, १७६ अशक्ति, याप्रमाणें एकूण ६१२ प्रत्यय मानतात

अशुद्ध मायेंतून काल, नियति आणि कला हीं तीन तत्त्वें उद्भवतात कलेच्या एका भागांतून मूलप्रकृति व दुसऱ्या भागांतून विद्या ( ज्ञान ) आणि राग ( आसक्ति ) हे उद्भवतात हे केवळ बुद्धीचे धर्म नसून त्यास प्रेरक असे सूक्ष्म कलेचे अंश आहेत काल, नियति, कला, विद्या आणि राग यांना पंच कंचुक म्हणतात या कंचुकांत आवृत असलेलें पुरुषतत्त्व अविद्या, अस्मिता,

---

१ मृगेंद्रागम, स्वायंभू, कामिका, सुप्रभेद, इ आगम शैवसिद्धान्त-प्रदीपिका पहा

२ (१) शिवतत्त्व, (२) शक्तितत्त्व, (३) सदाशिवतत्त्व, (४) ईश्वरतत्व, (५) शुद्धविद्यातत्त्व ( शुद्धाशुद्ध तत्त्वें )— माया, काल, नियति, कला, विद्या, राग व पुरुष. ( अशुद्धतत्त्वें )— प्रकृति, बुद्धि, अहंकार, मन, पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पंचतन्मात्रा, पंचमहाभूतें मिळून ३६

३ या विशेषक अथवा अवच्छेदक उपाधि आहेत

राग, द्वेष आणि अभिनिवेश या पंचक्लेशांनीं युक्त असतें. मायेपासून पुरुषापर्यंतचीं सातें तत्त्वें मिश्र व प्रकृतीपासून उद्भवणारीं चोवीस तत्त्वें अशुद्ध मानतात. भोजयित्री-कांड, प्रेरक-कांड, भोग्य-कांड, अशीं मिश्र, शुद्ध व अशुद्ध तत्त्वांची वर्गवारी करतां येईल.

शैवशास्त्रांत (१) शिवतत्त्व (उन्मनी शक्ति), (२) शक्ति (समनी शक्ति), (३) सदाशिव, (४) ईश्वर, (५) शुद्धविद्या हीं पांच शुद्ध तत्त्वें मानतात. पहिल्या शिवतत्त्वांतून पुढील चार उद्भूत होतात. शिवतत्त्व म्हणजे शिव नव्हे. शिवतत्त्व हें महामायेंतून उद्भूत होतें. महामाया ही शिवाची अंगभूत शक्ति नसून परिग्रह शक्ति मानतात. शिवतत्त्व हें व्यापक व नित्य असून त्याचें स्वरूप ज्ञानक्रियात्मक मानतात. सदाशिव तत्त्वांत ज्ञान व इच्छाशक्ति तुल्यबल असतात. पुढें ईश्वरतत्त्वांत ज्ञानशक्ति इच्छाशक्तीच्या स्वाधीन असते. पुढें शुद्ध विद्यातत्त्वांत इच्छाशक्ति ज्ञानशक्तीच्या अधीन होते. कोणी कोणी या तत्त्वांत कालानुक्रम मानतात. कोणी काल हें अशुद्ध तत्त्व असल्यामुळें त्याचा समावेश वरील शुद्ध तत्त्वांत मानीत नाहींत. सदाशिव तत्त्वांत अहंतेचें व ईश्वरतत्त्वांत इदंतेचें प्राधान्य कोणी मानतात.

येथपर्यंत शुद्ध मायेंतून उद्भवलेल्या अर्थप्रपंचाचा विचार झाला. आतां शब्दप्रपंचाचा विचार पाहूं. वैखरी, मध्यमा, पश्यंती, परा या चार वाणी आहेत. वैखरीचे स्थूल व सूक्ष्म असे दोन भेद आहेत. पहिला प्रकार शुद्ध विद्यातत्त्वांत व दुसरा ईश्वरतत्त्वांत असतो. त्याप्रमाणें सदाशिवतत्त्वांत मध्यमा वाणी, शक्तितत्त्वांत ( बिंदुतत्त्वांत ) पश्यंती वाणी आणि शिव-तत्त्वांत अथवा नादतत्त्वांत परा वाणी असते. शक्ति आणि शक्तितत्त्व, बिंदु आणि बिंदुतत्त्व, शिव आणि शिवतत्त्व यांत भेद आहे. तत्त्व शुद्ध असलें, तरी तें कार्य आहे. वर्णांची अथवा शब्दांची जी अर्थवत्ता ती नाद-तत्त्वांतील स्फोटशक्ति होय. शब्दांतून जो अर्थ निष्पन्न होतो, तो कोणत्याहि अक्षरात नसतो. अक्षरांच्या आनुपूर्वींत जी स्फोटशक्ति येते ती अर्थ प्रगट करते. याचप्रमाणें वाक्यार्थहि त्यांतील स्फोटशक्तीनें प्रकट होतो. याप्रमाणें एकच स्फोटशक्ति वर्णभेदानें आणि शब्दभेदानें निरनिराळा अर्थ व्यक्त करतें[३].

---

१ मागील टीप पहा. २ मागील टीप पहा. ३ हें स्फोटतत्त्व श्रीशंकराचार्यांस मान्य नाहीं.

जीवात्म्याचें वास्तविक स्वरूप अनंत, विभु व सर्वज्ञ असतां तें सोपाधिक व अल्पज्ञ भासतें, याचें कारण अणव, कर्म आणि (अशुद्ध) माया हे जीवाचे बंध होत. अणव या जीवाच्या अंगभूत दोषामुळें त्याच्या ज्ञान–इच्छाशक्ति मर्यादित होतात. त्यातूनच कर्म उद्भवतें. अणव म्हणजे भावरूप अज्ञान व अशुद्ध माया म्हणजे तद्विरोधी (परोक्ष) ज्ञान. ज्यांच्या ठिकाणीं वरील तिन्ही बंध आहेत ते सकल; ज्यांच्या ठिकाणीं माया नाहीं, पण कर्म आणि अणव मात्र आहेत, ते प्रलयाकल; आणि जे केवळ अणव मलयुक्त आहेत ते विज्ञानकल समजावे.

ईश्वर हा नित्य, शुद्ध, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान् व दयाळू आहे. त्याच्या ठिकाणीं सृष्टि, स्थिति, प्रलय, तिरोभाव व अनुग्रह हे धर्म आहेत. तत्त्वतः जीवेशांत भेद नाहीं. परंतु व्यवहारतः वरील तीन दोषांमुळें तो भासतो. ते अशुद्ध मायेचे दोष दूर व्हावेत, हाच सृष्टिचक्रांतील जीवांच्या जन्ममरणपरंपरेंतील ईश्वराचा हेतु आहे. निरनिराळ्या जन्मांत सुखदुःखाचे ठिकाणीं समभाव उत्पन्न झाला कीं तो जीव ईश्वरानुग्रहास पात्र होतो. विज्ञानकल जीवांस शिव अतर्यामिन् रूपांत अनुभूत होतो. प्रलयाकलांस तो दिव्यस्वरूपांत प्रकट होतो, आणि सकल जीवांस तो मानवदेहधारी गुरुरूपांतच भेटतो. गुरुदीक्षेत मलदोष दूर करण्याचें सामर्थ्य असतें. ज्ञाता आणि ज्ञेय या दोन्ही ठिकाणीं शिवत्व प्रत्यय आला कीं तोच मोक्ष होय. मग प्रारब्धमलानें शरीरोपाधि राहिली तरी ती बाधा करीत नाहीं. दक्षिणेंतील शिवाद्वैतांत जीवात्म्याचा परमात्मतत्त्वांत लय मानीत नाहींत. जीव आणि शिव दोन असूनहि त्यांच्यांत दुजेपणा राहात नाहीं, इतकेंच. जीवाचा शिवतत्त्वांत लय झाला, मग मोक्षसुख भोगणार कोण? जीव शिवरूप कधींच होत नाहीं. तो शिवदासच राहातो. तथापि विशिष्टाद्वैती मानतात त्याप्रमाणें तो शिवाहून वेगळा ठरत नाहीं. बंधाचें कारण अज्ञान व मोक्षाचें साधन ज्ञान होय. चर्या, क्रिया, योग आणि शिवकृपा यांनीं ज्ञान प्राप्त होऊन ज्ञानानें मोक्षप्राप्ति होते. हें ज्ञान व्यावहारिक विषयज्ञानाहून भिन्न असतें. पाश आणि पशुत्व या उपाधिद्वारां होणारें ज्ञान वेगळें व पतिज्ञान म्हणजे शिवाशीं समरस होऊन मिळालेलें ज्ञान वेगळें. शैवसिद्धांती सत्कार्यवादी आहेत. त्यांची ख्याति अख्याति होय. त्यांच्यांत जीवन्मुक्तांना कर्मनिर्बंध

नाहीं. पण मुक्तात्म्यांचें व्यक्तित्व ब्रह्माद्वैतास बाध न आणतां टिकून राहातें. हीच समजूत सामान्यतः साधकांच्या साधनमार्गांत हेतुभूत व उत्तेजक ठरते. हाच शैवसिद्धान्ताचा विशेष आहे. एरव्हीं अद्वैतांत व शिवाद्वैतांत फारसा फरक नाहीं. इतकेंच नव्हे, तर शिवज्ञानबोध हा शैवसिद्धांताचा ग्रंथ विद्यारण्यांनीं अद्वैतपरच लावला आहे. व अप्पया दीक्षितांसारखे प्रसिद्ध शैव अद्वैतीच होते.

भागवतधर्माच्या मूळ प्रमाणग्रंथांचा उगम जसा अनिश्चित आहे, त्याच-प्रमाणें शैवपंथाच्या प्रमाणग्रंथांचा उगम शोधणें कठिणच झालें आहे. पण सूर्यप्रकाशांत रत्नें चमकून दिसावीं, त्याप्रमाणें महाराष्ट्रीय संतमंडळ भगवत्कृपेच्या दिव्य प्रकाशांत चमकून राहिलें. तोच प्रकार शैव नयनार याचा झाला. याहून समर्पक दृष्टान्त द्यावयाचा तर विजेच्या चमकेनें ज्याप्रमाणें कृष्णमेघाचें स्वरूप राव-रंक, आबाल-वृद्ध, विद्वान्-अविद्वान् सर्वांसच एकसमयावच्छेदेंकरून किंचित् काल अधिक स्पष्ट दिसतें, त्याप्रमाणें संतांच्या उत्कट भक्तिभावनेनें भगवत्कृपामेघांची चमत्कृति सर्व समाजास अधूनमधून किंचित्काल साक्षात्कृत होत आली. सामान्य सूर्यप्रकाशात जें ईश्वराचें अलौकिक तेज जाणवत नाहीं, तें काळोखीच्या फलकावर विद्युल्लेखानें चटकन् व्यक्त होतें व मनाला पटतें. याप्रमाणें औपनिषदिक अद्वैत तत्त्वज्ञानाचा प्रकाश सामान्यतः मायामोहानें आच्छादित झाला असतां, सतभक्तांच्या सत्त्वपरीक्षेच्या निकषावर संघर्षणानें जें दिव्यदर्शन होतें, त्यांत तप म्हणजे काय व प्रकाश म्हणजे काय, तें झट्दिशीं लोकांच्या प्रत्ययास येतें. विजेची चमक काळोखींतच जास्त दिसावी, त्याप्रमाणें तमानें व्याप्त अशा मागसलेल्या काळांत आणि समाजांतच हे संतांचे चमत्कार जास्त घडून आले. महाराष्ट्रीय संतमंडळाप्रमाणें शैव संतमंडळांत हाच मोठा चमत्कार दिसून येतो. उच्च वर्ण, अगाध विद्वत्ता, घोर तपश्चर्या, दृढ अभ्यास यापैकीं कांहींहि साधन नसतां अत्युत्कट शिवभक्तीनें प्रेरित झालेल्या निःसीम त्यागामुळें अस्पृश्याच्या कुडींतहि कण्णप-नंदरूपानें शिवाचें ज्योतिस्स्वरूप प्रकट झालें. महाराष्ट्रांत ज्याप्रमाणें एका काळीं साऱ्या जाती संत-विभूषित झाल्या, त्याचप्रमाणें शैव नयनरांनीं आपल्या भक्तिप्रभावानें ब्राह्मणांच्या पवित्र

गृहस्थाश्रमापासून प्रागसलेल्यांच्या व बहिष्कृतांच्या चंद्रमौळी झोपड्यांपर्यंत, शारदा चंद्रमौळींची व्यापक सत्ता ठायीं ठायीं स्पष्ट प्रगट केली. ज्या ईशसत्तेचें स्वरूप दीर्घाभ्यासानें किंवा विद्वच्चर्चेनेंहि सहज उमजत नाहीं, तें संतांच्या अद्‌भुत चरित्रांतील चमत्कारांत चटकन्‌ व निःसंदेह व्यक्त होतें व पटतें. महाराष्ट्रांतील भक्तिविजयाप्रमाणें दक्षिणेंतील पेरीय पुराण व शिवभक्तविलास हें उपपुराण शैवभक्तांच्या अशा दिव्य चमत्कारांनीं खच्चून भरलेलें आहे. शिवाची उत्कट भक्ति आणि शिव व शिवभक्त यांसाठीं निस्सीम त्याग या घनऋण विद्युच्छक्तींचें दिव्य स्वरूप त्यांत डोळे भरून पाहावयास मिळतें. या शिवभक्तांच्या कथांत लैंगिक भावनांना स्पर्शहि नाहीं.

संतांच्या चरित्रांतील अद्‌भुत चमत्कारांस विद्युत्प्रभेचा दृष्टान्त दिला, परंतु विद्युत्प्रभा ही क्षणिक व आकस्मिक असते. सूर्यप्रभेप्रमाणें किंवा दीपज्योतिप्रमाणें संतत नसते. यामुळें व्यवहाराच्या सांगतेस सूर्यप्रभेची किंवा दीपज्योतीची गरज असते. त्याचप्रमाणें औपनिषदिक वेदांत सूर्याचें किंवा आचार्योसारख्या ज्ञानदीपांचें सामाजिक जीवनांत महत्त्व आहे. महाराष्ट्रीय संतकवींत ज्ञानेश्वर व एकनाथ, तुकाराम व रामदास यांनीं आपआपल्या तत्त्वज्ञानाच्या ग्रंथरूपांत हे ज्ञानदीप तेवत ठेवले, त्याचप्रमाणें शैवपंथांत तिरुमूलर, अप्पर, संबंदर, सुंदरमूर्ति इत्यादि संतकवींनीं शैवतत्त्वप्रकाश ग्रंथरूपांनीं स्थिर केला. या ग्रंथांत तिरुमूलर यांचा तिरुमंदिर हा ग्रंथ जास्त प्राचीन व शास्त्रदृष्ट्या जास्त महत्त्वाचा दिसतो. यास्तव त्याचें किंचित्‌ दिग्दर्शन पुढे करीत आहे.

तिरुमूलर शैवपंथाचे चार वर्ग पाडतो.:— (१) शुद्ध शैव, (२) अशुद्ध शैव, (३) मार्ग शैव, व (४) कदम शुद्ध शैव.

अशुद्ध शैव हे वेदान्त तत्त्वज्ञानशून्य असल्यामुळें त्या वेषधारी शैवांबद्दल समाजांत आदर नसे. शुद्ध शैव हे वेदान्ती जाणावे. ते पति, पाश, पशु, शुद्ध माया आणि अशुद्ध माया हे भेद मानतात.

रुद्राच्या नऊ अवतारांपासून अठावीस शिवागम प्रगट झाले. त्यांचे कर्म, उपासना आणि ज्ञान असे तीन खंड असतात. त्यांत योगसिद्धींना महत्त्व दिलेलें नसून वेदान्तसिद्धांतालाच महत्त्व दिलें आहे. कार्य, क्रिया, योग आणि ज्ञान हीं शैवधर्मांतील चतुर्विध साधनें होत.

कदम शुद्ध शैव हे विधिनिषेधातीत असतात. शैव नयनार याच वर्गात मोडतात वेदान्त्यांच्या षड्दर्शनाप्रमाणें शैव आगमाचीं भैरव, वाम, काळमुख, महाव्रत, पाशुपत आणि शैव अशीं सहा मतें आहेत

कार्य, क्रिया, योग आणि ज्ञान या चतुर्विध साधनापैकीं कार्य म्हणजे शुद्ध शैवाचें जीवन किंवा आचार होय पचीकरणाप्रमाणें या साधनाचे मिश्रणानें विविध प्रकार होतात. उदाहरणार्थ, कार्य चार प्रकारचें असतें (१) कार्यातील कार्य म्हणजे शिवमदिरें बांधणें, तीं स्वच्छ ठेवणें इत्यादि (२) कार्यातील क्रिया म्हणजे पूजा, अर्चन वगैरे (३) कार्यातील योग म्हणजे अतर्यामीचें ध्यान व (४) कार्यातील ज्ञान म्हणजे अतर्यामितिरूप होणें म्हणजे सालोक्य पावणें होय क्रियासाधनातील ज्ञानानें सामीप्य प्राप्त होतें. योगातील ज्ञानानें सारूप्य प्राप्त होते आणि ज्ञान साधनातील ज्ञानानें मात्र सायुज्य लाभतें

तिरुमूलर याच्या पहिल्या तत्रातच गूढ उपदेश व यमनियमाची कडक शिस्त आहे त्यात मद्य, मांस, हिंसा, लैंगिक मनोविकार याचा निषेध केला आहे आणि उलट धर्म, नीति, सदाचाराचे नियम सांगितले आहेत. दुसऱ्या तत्रात शिवपुराणातील आख्यायिका आहेत तिसऱ्या तत्रात स्वतत्र योग-शास्त्र आहे या अष्टांगयोगशास्त्राचीं फळें भिन्न आहेत यमानें उमेचा आशीर्वाद व अमरावतीची प्राप्ति, नियमानें शिवपद, आसनानें नादश्रवण, प्राणायामानें देवाकडून आदर, प्रत्याहारानें शिवसारूप्य, धारणेनें सर्वगामीत्व, ध्यानानें ब्रह्मा विष्णु रुद्र इद्र याचे लोक, समाधीनें बधमोक्ष आणि तत्परता, याची प्राप्ति सांगितली आहे नतर खेचरी, पर्यंक आणि चद्र हे योग सांगितले आहेत चवथ्या तत्रात मत्रशास्त्र आणि चक्रशास्त्र सांगितलें आहे तें सारें गूढ व अध्यात्मपर आहे पण त्याला वेदान्तसिद्धाताचें महत्त्व दिलेलें नाहीं

लिंगमीमासा हें तिरुमदिराचें मध्यवर्ती तत्त्वज्ञान आहे तिरुमदिराच्या सातव्या तत्रात सत्तामार्ग अनुसरणाऱ्या योग्याच्या साधनमार्गाचें वर्णन आहे प्रथम षट्चक्राचे सहा आधार शुद्ध झाल्यानें नाडीशुद्धि होते, असें सांगितल्यावर अडलिंग, पिंडलिंग, शिवलिंग, आत्मलिंग व ज्ञानलिंग याप्रमाणें सत्तामार्गावरील साधकाचीं दर्शनें किंवा अनुभवाचीं

गृहस्थाश्रमापासून मागसलेल्यांच्या व बहिष्कृतांच्या चंद्रमौळी झोपड्यांपर्यंत, शारदा चंद्रमौलीची व्यापक सत्ता ठायीं ठायीं स्पष्ट प्रगट केली. ज्या ईशसत्तेचें स्वरूप दीर्घाभ्यासानें किंवा विद्वच्चर्चेनेंहि सहज उमजत नाहीं, तें संतांच्या अद्भुत चरित्रांतील चमत्कारांत चटकन् व निःसंदेह व्यक्त होतें व पटतें. महाराष्ट्रांतील भक्तिविजयाप्रमाणें दक्षिणेंतील पेरीय पुराण व शिवभक्तविलास हें उपपुराण शैवभक्तांच्या अशा दिव्य चमत्कारांनीं खच्चून भरलेलें आहे. शिवाची उत्कट भक्ति आणि शिव व शिवभक्त यांसाठीं निस्सीम त्याग या धनऋण विद्युच्छक्तींचें दिव्य स्वरूप त्यांत डोळे भरून पाहावयास मिळतें. या शिवभक्तांच्या कथांत लैंगिक भावनांना स्पर्शहि नाहीं.

संतांच्या चरित्रांतील अद्भुत चमत्कारांस विद्युत्प्रभेचा दृष्टान्त दिला, परंतु विद्युत्प्रभा ही क्षणिक व आकस्मिक असते. सूर्यप्रभेप्रमाणें किंवा दीपज्योतीप्रमाणें संतत नसते. यामुळें व्यवहाराच्या सांगतेस सूर्यप्रभेची किंवा दीपज्योतीची गरज असते. त्याचप्रमाणें औपनिषदिक वेदांत सूर्याचें किंवा आचार्यांसारख्या ज्ञानदीपांचें सामाजिक जीवनांत महत्त्व आहे. महाराष्ट्रीय संतकवींत ज्ञानेश्वर व एकनाथ, तुकाराम व रामदास यांनीं आपआपल्या तत्त्वज्ञानाच्या ग्रंथरूपांत हे ज्ञानदीप तेवत ठेवले, त्याचप्रमाणें शैवपंथांत तिरुमूलर, अप्पर, संबंदर, सुंदरमूर्ति इत्यादि संतकवींनीं शैवतत्त्वप्रकाश ग्रंथरूपांनीं स्थिर केला. या ग्रंथांत तिरुमूलर यांचा तिरुमंदिर हा ग्रंथ जास्त प्राचीन व शास्त्रदृष्ट्या जास्त महत्त्वाचा दिसतो. यास्तव त्याचें किंचित् दिग्दर्शन पुढें करीत आहें.

तिरुमूलर शैवपंथाचे चार वर्ग पाडतो.:— ( १ ) शुद्ध शैव, ( २ ) अशुद्ध शैव, ( ३ ) मार्ग शैव, व ( ४ ) कदम शुद्ध शैव.

अशुद्ध शैव हे वेदान्त तत्त्वज्ञानशून्य असल्यामुळें त्या वेषधारी शैवांबद्दल समाजांत आदर नसे. शुद्ध शैव हे वेदान्ती जाणावे. ते पति, पाश, पशु, शुद्ध माया आणि अशुद्ध माया हे भेद मानतात.

रुद्राच्या नऊ अवतारांपासून अठ्ठावीस शिवागम प्रगट झाले. त्यांचे कर्म, उपासना आणि ज्ञान असे तीन खंड असतात. त्यांत योगसिद्धींना महत्त्व दिलेलें नसून वेदान्तसिद्धांतालाच महत्त्व दिलें आहे. कार्य, क्रिया, योग आणि ज्ञान हीं शैवधर्मांतील चतुर्विध साधनें होत.

कदम शुद्ध शैव हे विधिनिषेधातीत असतात. शैव नयनार याच वर्गात मोडतात वेदान्त्याच्या षड्दर्शनाप्रमाणें शैव आगमाचीं भैरव, वाम, काळमुख, महाव्रत, पाशुपत आणि शैव अशीं सहा मतें आहेत

कार्य, क्रिया, योग आणि ज्ञान या चतुर्विध साधनापैकीं कार्य म्हणजे शुद्ध शैवाचें जीवन किंवा आचार होय पचीकरणाप्रमाणें या साधनाचे मिश्रणानें विविध प्रकार होतात उदाहरणार्थ, कार्य चार प्रकारचें असतें (१) कार्यांतील कार्य म्हणजे शिवमंदिरें बांधणें, तीं स्वच्छ ठेवणें इत्यादि (२) कार्यांतील क्रिया म्हणजे पूजा, अर्चन वगैरे (३) कार्यांतील योग म्हणजे अतर्ज्योतीचें ध्यान व (४) कार्यांतील ज्ञान म्हणजे अतर्ज्योतिरूप होणें म्हणजे सालोक्य पावणें होय क्रियासाधनातील ज्ञानानें सामीप्य प्राप्त होतें योगातील ज्ञानानें सारूप्य प्राप्त होतें आणि ज्ञान साधनातील ज्ञानानें मात्र सायुज्य लाभतें

तिरुमूलर याच्या पहिल्या तत्रातच गूढ उपदेश व यमनियमाची कडक शिस्त आहे त्यात मद्य, मांस, हिंसा, लैंगिक मनोविकार याचा निषेध केला आहे आणि उलट धर्म, नीति, सदाचाराचे नियम सांगितले आहेत. दुसऱ्या तत्रात शिवपुराणातील आख्यायिका आहेत तिसऱ्या तत्रात स्वतत्र योगशास्त्र आहे या अष्टागयोगशास्त्राचीं फळें भिन्न आहेत यमानें उमेचा आशीर्वाद व अमरावतीची प्राप्ति, नियमानें शिवपद, आसनानें नादश्रवण, प्राणायामानें देवाकडून आदर, प्रत्याहारानें शिवसारूप्य, धारणेनें सर्वगामीत्व, ध्यानानें ब्रह्मा विष्णु रुद्र इंद्र याचे लोक, समाधीनें बधमोक्ष आणि तत्परता, याची प्राप्ति सांगितली आहे नतर खेचरी, पर्यंक आणि चद्र हे योग सांगितले आहेत चवथ्या तत्रात मत्रशास्त्र आणि चक्रशास्त्र सांगितलें आहे तें सारें गूढ व अध्यात्मपर आहे पण त्याला वेदान्तसिद्धाताचें महत्त्व दिलेलें नाहीं

लिंगमीमासा हें तिरुमदिराचें मध्यवर्ती तत्त्वज्ञान आहे तिरुमदिराच्या सातव्या तत्रात सखामार्ग अनुसरणाऱ्या योग्याच्या साधनमार्गाचें वर्णन आहे प्रथम षट्चक्राचे सहा आधार शुद्ध झाल्यानें नाडीशुद्धि होते, असें सांगितल्यावर अडलिंग, पिंडलिंग, शिवलिंग, आत्मलिंग व ज्ञानलिंग याप्रमाणें सखामार्गावरील साधकाचीं दर्शनें किंवा अनुभवाचीं

चिन्हें आहेत. तिरुमूलर या तंत्रांतील प्रथम परिच्छेदांतच असें सांगतात कीं, लिंग म्हणजे काय हें कोणासच कळत नाहीं. लिंग अष्ट दिशा आणि पट्कलांचें रूप धारण करतें. तेंच पृथ्वीरूप होतें. वस्तुतः सारें ब्रह्मांड हें शिवलिंगाचेंच रूप आहे, त्यायोगानेंच अव्यक्त आणि अज्ञेय असा शिव ओळखला जातो. सारें स्थावर जंगम शिवलिंगरूप आहे. परगुरु प्रथम तत्त्वमसि या महावाक्याचे द्वारां या अंडलिंगाचें व पिंडलिंगाचें ज्ञान करून देतात. जगतांतील यच्चावत् पदार्थांना शिवाहून पृथक् सत्ता नसून ते शिवलिंगरूप होत. म्हणजे शिवाचेंच चिन्ह होत. त्यांत अनुस्यूत असलेल्या शिवतत्त्वाचे ठिकाणींच सर्वांचें ऐक्य आहे. याप्रमाणें शिष्याला अंडलिंगाचें रहस्य कळल्यावर त्याला पिंडलिंगाचें रहस्य सांगण्यांत येते. जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं असतें. ज्याप्रमाणें ब्रह्मांड हें शिवलिंग, त्याचप्रमाणें पिंड हेंहि शिवलिंगच होय. म्हणून शिवास बाह्यलिंगांत शोधण्याचें कारण नाहीं. तो पिंडांतहि आहेच. असें सखामार्गावरील साधक योगी जाणूं लागतो. पुढें सदाशिव गुरूंच्या द्वारां सदाशिवलिंगाचें रहस्य अहं ब्रह्मास्मि या महावाक्याचे द्वारां त्यास झालें असतां सदाशिवाच्या पंचमुख व दशभुज या सगुणरूपाचें अध्यात्मरहस्य त्यास कळून येतें व तो सदाशिवाच्या सगुणनिर्गुण रूपाचें सामंजस्य जाणूं लागतो. यापुढें नादगुरु ब्रह्मैवाहम् या वाक्यद्वारां बिंदु, नाद इत्यादि सूक्ष्मतम तत्त्वें जाणूं लागून आत्मलिंगाचें रहस्य साक्षात्कृत करतो. यापुढें त्याचे सद्गुरु प्रज्ञानम् ब्रह्म या महावाक्यद्वारां ज्ञानलिंगाची ओळख करून देतात. हेंच शुद्ध शिवपद होय. हें चित् आणि आनंद या पदांच्या पलीकडील सद्रूप होय. यापुढें साधक ज्ञानपदालाहि ओलांडून ज्ञानाज्ञानातीत अशा शिव-लिंगाचे ठिकाणीं सायुज्य पावतो. येथें गुरु-शिष्य भाव व जीवात्मा-परमात्मा भाव राहात नाहींत, तसेंच महावाक्यश्रवण हें साधनहि उरत नाहीं. येथें साधनमार्गाची परिसमाप्ति होते. या लिंगांप्रमाणेंच अंड आदित्य, पिंड आदित्य, मन आदित्य, ज्ञान आदित्य, आणि शिव आदित्य अशीहि प्रकाशक चिन्हांची परिभाषा आढळते. लिंग आणि आदित्य या दोघांचेंहि कार्य अज्ञाननिरास हेंच आहे. तें अज्ञान हेंच जन्ममरणपरंपरेचें कारण आहे. चंद्रसूर्य भौतिक अंधार दूर करतात, तसेंच दयावंत नंदी जन्ममरणपरंपराजनक अज्ञान दूर करतो. वेदान्त म्हणजे बोधान्त, तेंच तत्पद, तेंच पतिपद होय. 'पशु' हेंच

त्वम्पद होय. त्यांचें ऐक्य हेंच शिवसायुज्य होय. हेंच प्रख्यात शैव तत्त्वज्ञानी तिरुमूलर यांचें तत्त्वज्ञान जाणावें.

शैवागमांत कांहीं आगम श्रुतिमूलक असून कांहीं स्वतंत्र आहेत. हे स्वतंत्र आगम प्रथम दहा होते. मागून अठरा वाढले. आगमांत पाशुपत व्रतास विशेष माहात्म्य दिसतें. रुरु, दधीची, अगस्त्य आणि उपमन्यु यानीं हें व्रत धारण केलें होतें. याच्यापासून पुढें गुरुपरंपरा वाढत गेली.

शैवसिद्धांतांतील मार्गः—(१) सन्मार्ग, (२) सखामार्ग, (३) सत्पुत्रमार्ग व (४) दासमार्ग असे चतुर्विध मानतात. तसेंच उलट पक्षीं यांतूनच असन्मार्गी व भ्रष्टाचारी असेहि शैवपंथी कापालिक निर्माण झाले[१], असे मानतात.

तिरुमूलर यांच्या मतें या मार्गापैकीं सन्मार्ग आणि साधनांत ज्ञान हें सर्वांत श्रेष्ठ होय. श्रुतिप्रणीत तत्‌शिवतत्त्व साक्षात्कृत करून घेणें आणि शिवयोगसिद्ध बनून मनोविकार व मरण यांस जिंकणें हा सन्मार्ग होय. पाशुपत योगाला ज्ञान असें म्हणतात. शैवपंथात पाशुपत योगाचें महत्त्व सर्वांत अधिक आहे. वर जीं शैवांचीं षड्विध दर्शनें दिलीं आहेत त्यांपैकीं शेवटचीं तीन म्हणजे महाव्रत, पाशुपत व शैव यांचा अंतर्भाव पाशुपत व्रतांत होत असावा असें दिसतें. आणि बाकीचीं तीन दर्शनें पुढें विकृतरूप पावलीं असावीं असें अनुमान होतें.

दक्षिणेंतील शैवपंथाचें जैन व बौद्धधर्म पंथांशीं कधीं मित्रत्वाचे तर कधीं शत्रुत्वाचे संबंध दिसतात. संबंदर व अप्पर या शैवभक्तांच्या ग्रंथांत जैनांची निंदा पदोपदीं आढळते. खिस्ती शकाचें चवथें शतक हें भरतखंडातील संस्कृत विद्येचें सुवर्णयुग असें ऐतिहासिक मानतात. याच वेळीं पुराणें रचलीं गेलीं असें ते म्हणतात. त्यानंतर कांहीं काळानें दक्षिणेंत जैनांचें प्राबल्य झालें. याचें एक कारण कापालिकांचा भ्रष्टाचार हेंच असावें. शैवधर्माला मालिन्य आल्यामुळें जैनधर्म कांहीं काळ बळावला. पण पुढें सात, आठ व नऊ या खिस्ती शतकांत तामीळ शिवभक्तांचा उदय होऊन त्यांच्या उत्कट भक्तीच्या दिव्य प्रभेंत अवैदिक जैनधर्म मावळला. फलज्योतिषाचे चमत्का-

१ मत्तविलास प्रहसन. Saivism in South India, p. 258.

तांतून ज्योतिर्गणित निर्माण व्हावें, त्याप्रमाणें चमत्कारांचे जोरावर समाजावर छाप टाकणाऱ्या साध्या, भोळ्या किंबहुना विसाट स्वरूपाच्या मासणाऱ्या कट्टर शिवभक्तींतून दहाव्या शतकाचे सुमारास शैव तत्त्वज्ञांचा उदय दक्षिणेंत झाला असें ऐतिहासिक मानतात.

संबंदर हे संत शिवाचे सृष्टि, स्थिति, संहार, तिरोभाव व अनुग्रह हे पाच भाव सांगतात. त्याप्रमाणें अप्पर शिवाचीं तीन रूपें वर्णितात : (१) एक संहारकारी गौण स्वरूप. (२) परात्पर किंवा परंज्योति रूप. ह्या शिवशक्तिसमन्वित रूपाचेंच आद्यन्त ब्रह्मा व विष्णु यांस सांपडलें नाहीं, अशी आख्यायिका आहे. याला संबंदर एकच म्हणतो. (३) हें ज्योतीच्याहि पलीकडील स्तंभ किंवा अथर्ववेदांतील (१०।७) स्कंभ म्हणजे अनिर्वचनीय परब्रह्म होय. यांतील मध्यवर्ती रूप हें अर्धनारीश्वराचें असून, त्यांतील विष्णु हा नारीअंश व ईश्वर हा शिव होय; म्हणूनच त्या रूपास हरिहर असेंहि म्हणतात. अप्पर यांच्या कवितेंत तसेंच शतरुद्रीय स्तोत्रांत शिवाला यज्ञोपवीत धारण करणारा वर्णिला आहे. अर्थात् शिव हा अनार्यांचा देव ही कल्पना निर्मूल आहे.[१]

अप्पर श्रेष्ठ प्रकारची शिवपूजा वर्णन करतांना म्हणतात कीं, "शरीर हेंच शिवमंदिर, मन हाच पुजारी, सत्य हेंच पावित्र्य, मनाचा मणि हेंच लिंग, प्रेम हेंच घृतक्षीरादि उपचार, याप्रमाणें ईश्वराची पूजा करावी. अप्परांच्या शिवसिद्धांतांतील शिव आणि वेदांतील शिव (रुद्र) एकच. काव्यांतील संगीत, अथवा फलांतील रस तोच शिव. तो स्त्री नव्हे व पुरुषहि नव्हे. त्याला परिमाण नाहीं. दृष्टींतील तेज तोच. माणिकवासहर हा शिवाला आर्य म्हणतो. तात्पर्य, या प्राचीन सुप्रसिद्ध शैव संतांच्या मतें, "शिव ही अनार्य देवता" हें मत निर्मूल ठरतें. मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत प्रथम खंडांत रा. पांगारकर म्हणतात — द्रविड हे आर्य आहेत का अनार्य आहेत, हाच वाद कित्येक घालीत बसतात. पण आर्य संस्कृतीचें संरक्षण करण्यांत द्रविडांनीं इतर सर्व प्रांतांपुढें पाऊल टाकलें आहे व वैदिक धर्मरक्षकांत तेच अग्रेसर आहेत, हें प्रांजळपणें कबूल करणें भाग आहे. तामीळांच्या साम्राज्यांत

१ Saivism in South India, P. 378.

२ Saivism in South India, P. 432.

करिकेल, राजराज, गंगईकोंड, जयमकोंड, कुलोत्तंग इत्यादि मोठमोठे सम्राट् झाले व लखदिव, मालदिव हीं बेटें घेऊन कृष्णेच्या खालच्या सर्व हिंदुस्थान-भर त्यांनी राज्य केलें. इतकेंच नव्हे तर पूर्व किनाऱ्यानें कलिंग व आंध्र हे देश घेऊन बंगाल्यांत व ब्रह्मदेशांत आपले पाय पसरले व पुढें जावा सुमात्रादि बेटांत आपल्या वसाहती करून तेथें रामायण-महाभारतादि आपले ग्रंथ नेले. मोठमोठे कालवे व धरणें बांधलीं. स्वतंत्र आरमार ठेवून परदेशांशीं मोठा व्यापार केला व साऱ्या जगांत नाहींत अशीं भव्य मंदिरें बांधून आपल्या भक्तीचीं व शिल्पकलेचीं चिरंतन स्मारकें करून ठेवलीं. त्याच्यांत १२ अळवार वैष्णव व ६३ शैव संत प्रसिद्ध आहेत. नम्माळवार, ज्ञानसंबंदर, अप्पर, माणिक्कवासहर, नंद, इत्यादि मोठमोठे संतकवि तामीळांत झाले. त्यांचीं काव्यें अत्यंत बहारीचीं आहेत. तामीळ शैववाङ्मयांत अकरा काव्यसंग्रह एकत्रित केले आहेत. त्यांपैकीं ज्ञानसंबंदरांचे तीन, अप्पर यांचे तीन, व सुंदरमूर्ति यांचा एक. या सात संग्रहांना देवराम असें नांव आहे. यांस वेदांप्रमाणें प्रामाण्य मानतात. ज्ञानसंबंदर यांनीं मदुरेच्या पांड्य राजास व अप्पर यांनीं पल्लवांच्या केदार राजास जैनपंथांतून परतवून वैदिक धर्मांत आणलें. सारे चोल सम्राट कट्टे शैव होते. पल्लवांतहि कट्टे शिवभक्त असे राजे होऊन गेले.

---

## प्रकरण ५ वें

## उपासना

चिन्मयस्या प्रमेयस्य निष्कलस्या शरीरिणः ।
साधकानां हितार्थाय ब्रह्मणो रूपकल्पना ॥ तन्त्रसार
उपासाविधयस्तत्र चत्वारः परिकीर्तिताः ।
संपदारोपसंवर्गाध्यासा इति मनीषिभिः ॥ १२।१० शिवगीता
आत्मनो मोक्षार्थं जगद्धिताय च । श्रुति
ज्ञान आणि उपासना । दोनी येक चि पाहाना ।
उपासनेकरितां जना । जगदोद्धार ॥ १३।२।८ दासबोध

आपल्या शास्त्रकारांनीं प्रत्येक मानवाचें आत्यंतिक ध्येय, त्यास कळत नकळत, मोक्ष हेंच असतें, असें श्रुति, युक्ति आणि अनुभूति यांवरून ठरविलें आहे. मोक्ष म्हणजे दुःखाची अत्यंत निवृत्ति व निरतिशय आनंदाची नित्य प्राप्ति होय. मानवाचीं सारीं अन्य ध्येयें व त्यांच्या सर्व महत्त्वाकांक्षा या अंतिम ध्येयाहून पुष्कळच कमी पडतात. वस्तुतः याहून श्रेष्ठ ध्येयाची कल्पनाच संभवत नाहीं. सत्, चित्, अनंत आणि आनंद असें या ध्येयाचें स्वरूपलक्षण सांगितलें आहे. हें जें आत्यंतिक ध्येय तेंच परमशिवतत्त्व होय तें नित्यसिद्धच आहे. या जगांत वस्तुतः त्याहून अन्य असें कांहींच नाहीं. याचा अर्थ असा कीं, प्रत्येक जीव तत्त्वतः परमशिवरूप म्हणजे ब्रह्मात्मरूपच आहे. पण असें असता त्याची त्याला अपरोक्ष अनुभूति नाहीं. याचें कारण जीवाच्या व जगाच्या विविध नामरूपकर्मांच्या उपाधीविषयीं जीवाचा सत्यत्वाचा भ्रम, व याउलट ब्रह्मात्मैक्यासंबंधीं अथवा जीव-शिवैक्यासंबंधीं त्याचें अज्ञान होय. अर्थात्, तें अज्ञान दूर करण्यासाठीं झटणें हें प्रत्येक आत्महितेच्छु माणसाचें सहजच आद्य कर्तव्य ठरतें. त्या अज्ञानाच्या निरासाकरितां श्रुति म्हणजे शास्त्र, युक्ति आणि अनुभूति या प्रमाणांनीं कर्म, उपासना आणि ज्ञान हीं तीन मुख्य साधनें ठरविलीं आहेत. पैकीं शास्त्रांत सांगितलेल्या कर्मांनीं अंतःकरणाची शुद्धि होते, उपासनेनें तें एकाग्र होतें व तत्त्वज्ञानानें तें परमशिवतत्त्वांत विलीन होतें. म्हणजे तें नाश पावतें, असें समजूं नये. व्यष्टि मन समष्टिमनरूप बनतें. प्रत्यगात्मा व परमात्मा एकरूप असल्याचें जाणवतें. अज्ञानी जीव ज्ञानस्वरूप होतो. अथवा तसा तो असल्याचें उपलब्ध होतें, असें समजावें.

आतां श्रेष्ठ उपासनीय अशा कारण ब्रह्मालाच ईश्वर म्हणतात, व सामान्यतः सर्व धर्मांत ईश्वर हाच उपासनेचा विषय असतो, हें आपण सर्व मानतोंच. पण त्या ईश्वराची शिव, शक्ति, गणपति, विष्णु, सूर्य अशी उपासकाच्या प्रकृतिभेदांस अनुसरून अनेक नामरूपें शास्त्र–पुराणांत सांगितलेलीं असतात. कारण तो एकच ईश्वर अनेक देवदेवतांचा स्रष्टा, प्रभव, उद्भव व अधिप असतो[१]. तेव्हां त्यांपैकीं कोणत्या देवाची उपासना करावयाची हें

१ यो देवाना प्रभवश्चोद्भवश्च । विश्वाधिपो रुद्रो महर्षिः + + + ॥ १२ ॥
+ + + विश्वस्य स्रष्टारमनेकरूपम् + + + ॥ १४ ॥ श्वे. उप. ४

शास्त्रानुसार ज्यानें त्यानें आपल्या आवडीप्रमाणें ठरवावें लागतें. पण कारण ब्रह्म अथवा ईश्वर हा वस्तुतः एकच व तोहि निराकार व व्यापक आहे. अर्थात् आपल्या आवडीचा साकार देव कोणताहि असला तरी त्याला कार्य ब्रह्म म्हणतात. त्या परिच्छिन्न कार्यब्रह्माचे ठिकाणीं जें व्यापक ईश्वररूप म्हणजे कारणब्रह्म ( घटाकाशात महाकाश असतें त्याप्रमाणें ) अनुस्यूत असतेंच, तेंच वस्तुतः उपास्य होय. याच दृष्टीनें भगवतानें अर्जुनास सांगितलें कीं, जे श्रद्धेनें युक्त होत्साते दुसऱ्या देवताचे भक्त बनून यजन करितात, तेहि विधिपूर्वक नसलें तरी पर्यायानें माझेंच यजन करतात. उदा० तलाठ्याकडे सरकारधारा भरला तरी तो सरकारलाच पोंचतो.

आता ज्या कोणाला कोणत्याहि कामनेच्या पूर्तीसाठीं उपासना करावयाची असतें, त्या सकाम भक्ताच्या सोयीकरितां, कोणत्या कामनेस्तव कोणत्या देवाची कशी उपासना करावी, हें शास्त्रांत सांगितलें आहे. कारण ईश्वराच्या राज्यांत निरनिराळे अधिकार निरनिराळ्या देवताकडे सोंपविलेले असतात. पण कोणत्याहि कामनेसाठीं होणाऱ्या या नैमित्तिक उपासनेशिवाय संध्योपासनादि नित्य निष्काम उपासना शास्त्रांनीं सांगितल्याच आहेत. त्या विचारपूर्वक केल्यास त्या ब्रह्मोपासना अथवा परमशिवोपासनारूपच आहेत. त्या रोज निष्कामतेनें केल्याच पाहिजेत, अशी शास्त्राची आज्ञा आहे. हें नित्य

---

१ यो देवानामधिपो यस्मिल्लोका अधिश्रिताः । य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ॥ श्वे. उप. ४।१३, ऋग्वेद १०।१२१

२ येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥ २३ ॥ गीता ९

३ श्रीमद्भागवत २।३।२–९.

४ अहरहः संध्यामुपासीत । यः संन्ध्यामुपास्ते ब्रह्मैव उपास्ते । श्रुति.
संध्या उपासिता येन ब्रह्म तेन उपासितम् । मनु. "अकरणात् प्रत्यवायः।"

संध्याहीनोऽशुचिर्नित्यमनर्हः सर्व कर्मसु । यदन्य कुरुते कर्म न तस्य फल वाग्भवेत् । दक्षस्मृति. ( भागवत २।३।१० पहा. )

उपासनाकर्मासबंधी शास्त्र सर्व धर्मातून असतेंच. प्रत्येक धर्माचें तें एक प्रधान अंगच असतें.

सगुणोपासनेंतील उपास्य हें सूक्ष्म आधिदैवत जगांतील तत्त्व अगर व्यक्ति असतें आधिभौतिक नामरूप कर्मांचा आध्यात्मिकाशीं सांधा जोडणें हे त्याचें कार्य असतें म्हणजे उपास्य व उपासक हे शरीरी आहेत, या देहबुद्धीची ब्रह्मात्मैक्य बुद्धि करावी, ही उपासना क्रियेची परिणति समजावी.

पण जडवाद्याचें शुद्ध भौतिक विज्ञान व केवलाद्वैती वेदान्त्याचें केवल ब्रह्मविज्ञान, यांना या आधिदैवताच्या मध्यस्थीची गरज व प्रचीति सहज जाणवत नाहीं हें सगुणोपासनेला प्रतिबंधक असे एक सूक्ष्म विघ्न उपासकानीं जाणलें पाहिजे.

"पतितपावना जानकीजीवना। वेगें माझ्या मना पालटावे॥ मिथ्या शब्दज्ञानें तुज अंतरलों, संदेहीं पडलों मीपणाचे॥ सदा खळखळ निर्गुणाची घडे। सगुण नावडे ज्ञानगर्वें॥ रामदास म्हणे ऐसा हा पतित। मीपणें अनंत पाहीं जातां॥ १॥" असें श्रीसमर्थ म्हणतात. श्रद्धेनें सगुण ईश्वर हें एक गृहित सत्य स्वीकारल्यावांचून उपासनाच संभवत नाहीं. हीच श्रद्धा अनुभवानें पुढें दृढ होत जाते. एक वेळ सगुण निराकार ईश्वराची उपासना करतां येईल, पण निर्गुण निराकार अशा परमात्म्याचीहि उपासना संभवते असें मानलें, तरी ती सामान्य साधकास साधणें फारच कठिण आहे. या कलियुगांत नामजप आणि ध्यान हेच उपासनेचे मुख्य प्रकार मानले आहेत. त्याचप्रमाणें उपास्याच्या मूर्तीची मानसपूजा किंवा बाह्य मूर्तिपूजा, ही पण उपासनेंतच मोडते. मुख्य उपासनेचें तंत्र बहुधा एवढेंच असतें. याशिवाय नवविधा भक्ति,

---

१ The highest good is not pleasure, not knowledge alone, but the greatest possible likeness to God, as the absolutely good. —Plato, p. 128.

२ देहबुद्धि ते आत्मबुद्धि करावी॥ १६३॥
विवेकें देहबुद्धि सोडून द्यावी। विदेहीपणें मुक्ति भोगीत जावी॥१२॥
—रामदासाचे मनाचे श्लोक.

३ गीता १२।५; आगमसार पृ. ७०

निष्काम कर्मयोग, लोकसंग्रह, लोकसेवा, शास्त्रसेवा, धार्मिक, नैतिक व शास्त्रीय ग्रंथलेखन, राजयोगादि अनेक प्रकारचे योग, शवसाधनादि तंत्रें व अनेक अनुष्ठानें यानाहि व्यापक अर्थानें उपासनाच म्हणतां येईल. "साधनाना अनेकता" हें लोकमान्य टिळकानीं हिंदुधर्माचें लक्षण मानलें आहे हिंदु तत्त्वज्ञानानें सकाम उपासनेचा निषेध केला आहे. तसा सामान्य हिंदुधर्मानें केलेला नाहीं. सामान्य जनाची उपासनेंत प्रवृत्ति होण्यास कांहीं इष्ट कामनाच कारण होतात सान्या सकाम उपासना हें कांहीं अभिचार कर्माप्रमाणें पाप नव्हे. कोणत्याहि निमित्तानें ईश्वराची उपासना करणें, हें योग्यच आहे आपलें कर्म हें कांहीं स्वतन्त्रतेनें फल देत नाहीं. कर्माचें फल कालावधीनें मिळतें. पापाबद्दल शिक्षा व पुण्याचें बक्षीस असा कर्म व त्याचें ईशदत्त फल याचा संबंध नसून कर्मकर्त्याची उन्नति आणि उत्क्रांति हेंच ईशानियतीचें गूढ सूत्र कर्मविपाकात आधुनिक तत्त्वज्ञ मानतात. यामुळेंच "भक्तालागीं देव, करू नेदी संसार," अशा अनुभवाची संगति लागते. शैवपंथांत शिव हा भोग व मोक्ष दोन्ही देणारा मानला आहे. हा शिव म्हणजे परम शिव नव्हे शबल अथवा सशक्तिक शिव होय. सक्रिय ब्रह्म ती शिवशक्ति व निष्क्रिय ब्रह्म तें परम शिवतत्त्व होय याशिवाय शिवगुरु हा एक शिवाचा फारच महत्त्वाचा आविर्भाव आहे तत्त्वतः विचार करता सगुण शिव अथवा शिवगुरु हीं शिवशक्तीचींच रूपें होत. शिवमूर्ति याहि शिवप्रकृतीच्याच मूर्ति होत. शिव आणि शक्ति हीं दोघें अविनाभूत मानल्यामुळें उपास्य हें तत्त्वतः शिवशक्तिरूपच असलें तरी जीं रूपें पुरुषदेहाकार असतात, त्यात शिवाला प्राधान्य असतें, व जीं रूपें स्त्रीदेहाकार असतात, त्यात शक्तीला प्राधान्य असतें. आगम-निगमात गुरुस्थान अनुक्रमें शिव व शक्ति यांच्याकडे असल्यामुळें शक्ति हेंहि सद्गुरूचें रूप मानलें आहे[१].

गेल्या शें-दीडशें वर्षांच्या देशकालपरिस्थितीमुळें पूर्वीचा शास्त्रोक्त उपासना मार्ग लोकाचारातून बहुतेक सुटल्यासारखाच झाला आहे. नवीन नवीन सुधारकी पथानीं नवीन लोकसंग्रह व लोकसेवा नांवाचे उपासना मार्ग रूढ केले आहेत. पण केवळ त्या रजोगुणप्रधान मार्गांनीं कोणी कृतार्थ म्हणजे ब्रह्मात्मैक्यज्ञानी झाल्याचें ऐकिवात नाहीं. राजकारणाच्या किंवा

---

१ देशिक रूपेण दर्शिताभ्युदयाम्। —श्रीमच्छंकराचार्य.

समाजकारणाच्या चवाठ्यावर बसून उपासनेचें अंतिम ध्येय गांठणें कठिणच वाटतें. या नवयुगांत श्रीरामकृष्ण परमहंसांनीं उपासना मार्गाला फार जोराची चालना दिली. "आधीं केलें मग सांगितलें," असा समर्थरामदासांप्रमाणें त्यांचा दडक असे. वस्तुतः परमार्थाशिवाय त्यांनीं लोकांस कांहींच सांगितलें नाहीं. पण महाराष्ट्रीय संतमंडळींत एकनाथ, तुकारामादि कांहीं संतांनीं ब्रह्मात्मैक्यज्ञानापेक्षां सगुण परमेश्वराची चरणसेवा हिला जास्त महत्त्व दिलें आहे, त्याप्रमाणें श्रीरामकृष्णांचे पट्टशिष्य श्रीविवेकानंद यांनीं मोक्ष व शिव-सायुज्य यांपेक्षां जनताजनार्दनाच्या सेवेला प्राधान्य दिलें, तेव्हां परमार्थसाधक श्रीरामकृष्णांचा हा संप्रदाय नव्हे, असें त्यांच्या संप्रदायांत कांहीं काळ वादाचें रण माजलें. पण रज-सत्त्वप्रधान स्वामी विवेकानदांनीं आपल्या प्रभावानें 'शिव आणि सेवा' असा उभयविध संप्रदाय रूढ केला. त्यामुळें इतर विद्यमान केवळ परमार्थमार्गी संतसंप्रदायांपेक्षां श्रीरामकृष्ण-विवेकानद संप्रदाय जास्त गाजला. केवळ मुमुक्षूंना ते स्वार्थी समजत. या त्यांच्या परोपकारी व व्यवहारी दृष्टीमुळें त्यांचा संप्रदाय आज जास्त ठळक रीतीनें जगापुढें आला आहे. श्रीसमर्थ रामदासांच्या संप्रदायांतहि कोणाची तरी काया तुडवावी, असें लोकसेवेच्या व्यवहाराला धरून धोरण होतेंच. त्याप्रमाणें विवेकानद-संप्रदाय आहे. जास्तींत जास्त करवेल तितका गुरूपदिष्ट नाममंत्राचा जप व तो करीत असतां अंतरीं इष्टमूर्तीचें ध्यान अशी एकांतांत एकाग्रतेनें उपासना करावी व त्यास विवेक-वैराग्याची जोड असावी; तसेंच त्याबरोबरच करवेल ती लोकसेवा करावी, असा हा सुप्रसिद्ध संप्रदाय आहे. 'आत्मनो मोक्षार्थं जगद्धितायच'। हें वेदवचन या संप्रदायाचें सूत्र आहे.

तंत्रशास्त्रांत उपासनाकर्माचा पुष्कळच खोलवर विचार केला आहे. शाक्त तंत्रांत देहदंड, उपवास, सन्यस्तवृत्ति, तपश्चर्या यांची आवश्यकता मानली नाहीं. तत्त्वज्ञानानेंच मोक्ष होतो. भोगाचाच योग बनतो. प्रपंचाचाच

१ The Disciples of Ramkrishna, p. 122.

२ Spiritual talks by the first disciples of Shri Ramkrishna. Read the life and teachings of Swami Brahmananda. See life Sketch of Shri Yogananda.

परमार्थ होतो. ज्यानें पतन होतें त्यानेंच उभें राहातां येतें, असें शाक्तांतील वीर साधक मानतो. पण नुसत्या बुद्धिवादानें आणि तर्कानें तसेंच इष्टापूर्त कर्मानें व समाजसेवेनें परमात्म्याची अपरोक्षानुभूति साधणार नाहीं. त्याला पावित्र्य, तनमनशुद्धि, संयम, शमदमादि शिस्त आणि एकाग्रतेची उपासना याची गरज असतेच. साधकानें सोऽहं अगर साहं बनावें लागतें. म्हणजे चिच्छक्तीशीं समरस व्हावें लागतें. साऱ्या नामरूपकर्मात्मक जगाच्या बुडाशीं चिच्छक्ति आहे. तीच महायोगिनी त्रिपुरसुंदरी होय. अनेक निसर्गशक्ति या योगिनी नामक तिच्या आवरण देवता होत. या योगिनींशीं उपासनेनें तादात्म्य पावल्यानें सिद्धि प्राप्त होतात व सच्चिदानंदरूप महायोगिनी चिच्छक्तीशीं म्हणजेच शिवशक्तीशीं तादात्म्य पावल्यानें मुक्ति प्राप्त होते.

जड भौतिक विज्ञानवादी चाह्याऱ्यांच्या संशोधनांत एका अज्ञात अधिष्ठानाशीं ( Thing in itself ) थांबतात. वस्तुतः तो हिरण्यगर्भ आणि ईश्वर या अवस्थाभेदांतील शिवशक्तीचा प्रत्यय असतो. तें पारमार्थिक अधिष्ठान म्हणजे परिच्छिन्न ( Thing in itself ) पदार्थ नव्हे. तत्त्वतः तो ज्ञेय कोटींतला नसतोच. यासंबंधीं अज्ञान हें भौतिकशक्तिविज्ञानांतील मोठेंच वैगुण्य आहे. हें विश्व म्हणजे केवळ शक्तिस्वरूपच नव्हे तर विचाररूप अथवा संकल्पमात्र आहे, असें मानण्यापर्यंत भौतिक शास्त्रज्ञांची मजल गेली आहे. पण ह्या विचाराचें ( Thought ) प्रेरक शिवशक्तिरूप ते जाणत नाहींत.

त्यासाठीं उपासनाशास्त्र अभ्यासिलें पाहिजे. आपल्याकडे वेदकालापासून उपासनाशास्त्र उपलब्ध आहे. कर्म, उपासना व ज्ञान असें वैदिक वाङ्मयांत व भगवद्गीतेंत कांडत्रय मानलें आहे. वस्तुतः पंचभूतांपैकीं कोणतेंच भूत शुद्ध स्वरूपांत उपलब्ध नसतें, अथवा सत्त्व, रज, तम या त्रिगुणांपैकीं कोणताच गुण अमिश्र स्वरूपांत सांपडत नाहीं. त्याचप्रमाणें साधनमार्गांत कर्म, उपासना आणि ज्ञान या त्रिकांडाचें म्हणतां येईल. याचा अर्थ उपासनेंत कर्म आणि ज्ञान या दोहोंचा अशतः अंतर्भाव अवश्य असतो. त्यांपैकीं कर्माला प्राधान्य देऊन तंत्रांना उपासनाकांड असें म्हटलें आहे. तसेंच ज्ञानाला प्राधान्य देऊन कांहीं उपनिषदांना उपासनापर मानतां येईल व भावनेला प्राधान्य देऊन दैवी मीमांसाशास्त्र व भक्तिसूत्रें यांना उपासनाकांड मानतां येईल.

उपासनेंत उपासक जीवाचें उपनिषदांतील दहरोपासनादि उपासनांनी ब्रह्मपदीं आरोहण होणें किंवा ईश्वराला प्रतिमा प्रतीकादिकांत आवाहन करून ईश्वराचें अवतरण होणें, अशा दोन प्रक्रिया असतात. मूर्तिपूजा हा यापैकीं दुसरा प्रकार होय. मूर्तिपूजेंतहि बहिर्याग अथवा बाह्यपूजा व अंतर्याग म्हणजे रहस्यपूजा असे दोन प्रकार असतात. एकांत कर्मेंद्रियें तर दुसऱ्यांत ज्ञानेंद्रियें व मन हीं प्राधान्यानें गुतलीं जातात.

सामान्यतः उपासनेंत मूर्तिपूजा हे बहिरंग साधन व श्रद्धा हें अंतरंग साधन यांची फार आवश्यकता जाणवते. मूर्तिपूजा ही बौद्धकालानंतरची म्हणजे अर्वाचीन नाहीं. ती वेदकालापासून आहे यजुर्वेदाच्या कण्वसंहितेंत, शतपथब्राह्मणांत, अथर्वसंहितेंत व ऋग्वेदांतहि प्रतिमापूजेचा निर्देश आढळतो. तसेंच शैव, शाक्त, वैष्णव, सौर व गाणपत्य ह्या पंचोपासकांचीं निरनिराळीं प्राचीन तंत्रें आहेत. त्या त्या उपास्यांच्या निरनिराळ्या प्रतिमा अगर प्रतीकें शास्त्रकारांनीं आपल्या दिव्य दृष्टीनें पूजा–अर्चा–ध्यान–धारणेसाठीं योजलीं आहेत. आतां अष्टांगयोग आणि भक्तियोग या दोन्ही योगांत ईश्वरोपासनेसाठीं ध्यानधारणा सांगितली असली, तरी योगात चित्तवृत्ति एकाग्र करण्यासाठीं एखाद्या बिंदूसारखें कोणतेंहि अर्थशून्य लक्ष्य चालतें. पण सगुणभक्तियोगांत इष्ट देवतेचेंच रूप ध्यानधारणेस ध्येयरूप लागतें. भक्ताच्या अशा ध्याननिष्ठेनें ध्येयमूर्ति जड असली तरी तिच्या ठिकाणीं हास्य, नृत्य इत्यादि अनेक चैतन्यभाव प्रतीत होतात. इतकेंच नव्हे तर त्या दिव्य मूर्तीकडून मंत्रोपदेशहि होऊं शकतो. हा अनुभव वैदिक कालांपासून तों आधुनिक श्रीरामकृष्ण परमहंसादि संतभक्त यांच्यापर्यंत लोकप्रसिद्ध

१ दयानन्दतिमिर भास्कर, "अथ मूर्तिपूजन महाप्रकरणम्" पृ. ३५० व पुढें पहा. तसेंच धर्मविज्ञान, खंड १ ला, "उपासना तत्त्व और मन्त्र शास्त्र" पृ. ४२३ ते ४२६ पहा. भास्कराभासनिवारण मूर्तिपूजा प्रकरण पृ. १०७. हे तिन्ही ग्रंथ हिंदी आहेत.

२ दैवत प्रतिमा हसन्ति + + + नृत्यन्ति । सामवेद २६ ब्राह्मण पहा. धर्म विज्ञान पृ. ३८७.

आहे. याला उपासकाच्या ठिकाणी श्रद्धा या अतरग साधनाची फार गरज असते. ज्याप्रमाणें विद्युद्वाहक तारेंतील विद्युच्छक्तीचा प्रभाव जिवंत माणसास जाणवतो, मृत शवास जाणवत नाहीं, त्याप्रमाणें श्रद्धावंताचीच ऋणशक्ति मूर्तीतील ईश्वराच्या घनशक्तीला प्रचीतीस आणू शकते. उपासनेंतील सगुणसाक्षात्कार हें व्यावहारिक सत्यांतील एक सत्य आहे. तें पारमार्थिक सत्य न मानलें तरी प्रातिभासिक भ्रम पण नव्हे. भक्तिमार्ग सोपा म्हणतात. पण वरीलप्रमाणें उपासनासिद्धि कांहीं सोपी नव्हे. श्रद्धाबलानें सगुण साक्षात्कार होणें किंवा सूक्ष्म विचारानें त्यांतील उपपत्ति समजून येणें व पटणें या दोन्ही गोष्टी दुर्घटच आहेत.

मानवाचीं मनासहित ज्ञानेंद्रियें ईश्वरानें स्वभावतःच बहिर्मुख केल्यामुळें इतर प्रापंचिक व्यवहाराप्रमाणें पारमार्थिक उपासनादि साधनमार्गांत मानवानें बहिर्मुख असणें म्हणजे त्याचें बाह्यार्थाकडे लक्ष वेधणें हें स्वाभाविकच आहे. बहिर्मुखतेंत विषय-विषयी भावाचें द्वैत गृहितच धरावें लागतें. उपासनाकर्मांत उपासक हा विषयी तर त्याचा विषय शिव अथवा परमात्म तत्त्व हा असतो. हा परमात्मा उपासकाच्या देहासकट सर्व ब्रह्मांडांत ओतप्रोत भरलेला आहे असें वेदान्तशास्त्र सांगतें. पण मायेच्या अथवा नामरूप कर्माच्या आच्छादनामुळें तो प्रतीत होणें म्हणजेच तो अपरोक्ष होणें कठिण पडतें. म्हणून तो वस्तुमानाच्या ठिकाणीं अनुस्यूत असूनहि साक्षात्कृत न झाला तरी त्याची उपास्याच्या प्रतीक प्रतिमेच्या ठिकाणीं परोक्षतेनें भावना करावी लागते. त्यासच उपासनाकर्म म्हणतात. हें उपासनाकर्म जरी

---

१ निरंजन रघुनाथ यांची आत्मप्रचीति व साक्षात्कार हीं प्रकरणें पाहावीं. श्रीरामकृष्ण परमहंस यांचें चरित्र अवश्य वाचावें. याशिवाय श्रीवासुदेवानंद सरस्वती, श्रीगुलाबरावमहाराज अशा अलीकडील अनेक सत्पुरुषांजवळ त्यांची उपास्यमूर्ति बोलत असे असें समजतें.

२ We worship not what we can, but what we cannot understand. There is the unknown, the reserve of truth, which the intellect cannot reach and yet feels to be behind. (Introduction to the Cultural Heritage of India by Sir S. Radhakrishnan.)

उपासकाच्या परोक्षभावनाप्रधान असलें तरी त्याची भावना सफल होणें हें उपास्याच्या प्रतीक–प्रतिमेच्या वस्तुमाहात्म्यावरहि अंशतः अवलंबून असतें. जसें मातीच्या घटांतील दीपज्योत स्वयंप्रकाश असूनहि बाहेरून दिसत नाहीं. तीच काचेच्या पारदर्शक हंडींत दिसू शकते. त्याप्रमाणें उपासकाच्या उपासनेस योग्य प्रतिमा-प्रतिकाचीं संवादि अशीं आलंबनें शास्त्रांनीं अनेक सांगितलीं आहेत व साधकांनीं त्या साधनद्वारां इष्ट देवतेची उपासना करावी, अशी शास्त्राची आपणास आज्ञा आहे. हीं आलंबनें सविता व आकाश याप्रमाणें मूर्तामूर्तरूप आहेत ( बृ. उप. २।३ ). यापैकीं कांहीं चिद्रूप तर कांहीं जडरूपहि आहेत. तसेंच कांहीं दृश्य तर कांहीं केवळ मनोवेद्य आहेत. उपासनाशास्त्राचें सार्थक्य यांत आहे. उपासकाचें जड भौतिक मन व परमशिव हें मनेंद्रियातीत पारमार्थिक परतत्त्व, यांना जोडणारा सेतु तेंच उपासनाशास्त्र होय. या गूढ व विस्तृत शास्त्रापैकीं कांहीं अंशमात्र पुढें सांगत आहे.

वस्तुतः आस्तिक आणि नास्तिक, ईश्वरवादी आणि निरीश्वरवादी दोघेहि उपासक असतात. नास्तिक अथवा निरीश्वरवादी आपणांस उपासक म्हणवीत नाहींत, इतकेंच. पण ( १ ) आपण नित्य असावें, ( २ ) आपण शहाणें म्हणजे ज्ञानी असावें, ( ३ ) आपण सुखी व आनंदी असावें, ( ४ ) आपण स्वतंत्र व ऐश्वर्यवान् असावें, ( ५ ) आपलें सर्वांनीं ऐकावें, अशा एषणा सर्व आस्तिक आणि नास्तिक माणसांना सारख्याच असणें स्वाभाविक असतें. हें जें सर्व जीवांचें निर्विवाद असें ध्येयसमुच्चय, त्यासच ईश्वर म्हणतात[१]. सत् म्हणजे त्रिकालाबाधित सत्ता अथवा अस्तित्व, चित् म्हणजे मूर्तिमंत चैतन्यस्वरूप अथवा ज्ञानस्वरूप, आनंद म्हणजे नित्य निरतिशयानंदरूप, तसेंच निग्रह व अनुग्रह हींच ईश्वराचीं म्हणजे शिवाचीं स्वरूपलक्षणें होत. या ध्येयांची आराधना जाणून न जाणून सारेच करीत असतात. नदीची जशी समुद्राकडे गति असते, वस्तूला जसें गुरुत्वाकर्षण असतें, अर्भकाची जशी मातेकडे ओढ असते, प्रवाशाची जशी आपल्या घराकडे स्वाभाविक दृष्टि असते, त्याप्रमाणें जीवमात्राची आपल्या मूळकारणाकडे म्हणजे परमात्मरूपाकडे स्वाभाविकच ओढ असते. मग तिची जाणीव त्यास असो वा नसो.

१ सकळ गुणें संपन्न । एक देवाचें लक्षण ॥ तुकोबाराय.

प्रथम देहांत अडकलेला जीव मनेंद्रियाच्या वाटेनें बाहेर पडू पाहतो व आपल्याहून जें श्रेष्ठ व लोभनीय वाटतें त्याची स्वानंदसुख-लाभासाठीं जणू उपासना करू लागतो. रम्य व दिव्य विषयांकडे आकर्षण, पूज्य विभूतींचें आकर्षण, विश्वरूपदर्शन, ईश्वराच्या सगुणसाकार व सगुणनिराकाराकडे आकर्षण, अखेर निर्गुणनिराकाराच्या ठिकाणीं ब्रह्मात्मैक्याची अपरोक्षानुभूति व सायुज्यतेच्या अखंडानदाचा अनुभव, अशा उपासनेच्या पायऱ्या दिसतात.

मातृदेवो भव, पितृदेवो भव, आचार्यदेवो भव, असे मानवाचे लहानपणापासूनचे उपास्य देव असतात. मग त्याचे आचार्य अथवा गुरुजी यांच्याकडून त्याला असें कळून येतें कीं, राज्यांत ज्याप्रमाणें आपण न पाहिलेले अनेक मंत्री व उपमंत्री, राजपाल व अमलदार राज्यसत्तेचे अंशभूत होऊन राज्यकारभार पाहत असतात, त्याप्रमाणें या अखिल भूलोकावरील अध्यात्मज्ञान-राज्याचे संचालक परलोकचे वसिष्ठादि ब्रह्मर्षि, सुश्रुतादि श्रुतर्षि, ऋतुपर्णादि राजर्षि, जैमिन्यादि काण्डर्षि, भेलादि परमर्षि, कण्वादि देवर्षि व व्यासादि महर्षि असे ऋषिगण आहेत. तसेंच अधिदैव कर्मराज्याचे संचालक आठ वसु, बारा आदित्य, एकादश रुद्र, इंद्र आणि प्रजापति इत्यादि नित्य-नैमित्तिक असंख्य देवतागण आहेत. त्याचप्रमाणें अधिभूत स्थूल राज्याचे संचालक सोमसद, अग्निष्वात्त, बर्हिषद, सोमप, हविर्भुक्, आज्यप, ऋतूचे अधिपति इत्यादि नित्य व मर्त्य अथवा नैमित्तिक पितर आहेत. अखिल राष्ट्रव्यापी साम्राज्याच्या अमूर्त सत्तेप्रमाणें ब्रह्मांडव्यापी शिवशक्तीचे म्हणजे चिच्छक्तीचे हे अनेक घटक अगर प्रतिनिधि आहेत. म्हणून ते आराध्य म्हणजे उपासनीय आहेत. तसेंच त्यास आणखी असें कळून येतें कीं, या ब्रह्मांडातील उत्पत्ति, स्थिति, लय, किंवा स्थिति, आगति, गति, संकोच व विकास या अवस्थांचे नियंते ब्रह्मा, विष्णु, महेश, अग्नि आणि सोम हे देव

१ उमा-महेश्वर हेच आई-बाप व श्रीशिवगुरु हेच आचार्य अथवा सद्गुरु या अशाच श्रेष्ठ भावना आहेत.

२ शैव शिव ही संज्ञा कार्यब्रह्म, कारणब्रह्म व कार्यकारणातीत शुद्धब्रह्म या तिघांसहि लावतात. ब्रह्मा-विष्णु-महेश या त्रिमूर्तीपैकीं महेश व जगत् कारणाधीश्वर शबलब्रह्म या दोघास ते शिवच म्हणतात. तरी संदर्भाकडे पाहून अर्थबोध करून घ्यावा. ब्रह्म या अर्थी परमशिव हे शब्द क्वचित् वापरले जातात.

आहेत. तसेंच पंचभूतापैकीं आकाशतत्त्वाशीं संबद्ध विष्णु, अग्नीशीं शक्ति, वायूशीं सूर्य, पृथ्वीशीं शिव व जलतत्त्वाशीं गणपति अशीं पंच उपास्यें संबद्ध आहेत. असे हे परमात्मतत्त्वाचे अंशाधिकारी देव जीवांचे अवश्य उपास्य आहेत. उदाहरणार्थ, सद्भावमूलक शिवोपासना, चित्‌भावमूलक विष्णूची उपासना, शक्तिभावमूलक देवीची उपासना, बुद्धितत्त्वमूलक गणपतीची उपासना व तेजतत्त्वमूलक सूर्याची उपासना शास्त्रानें इष्ट सांगितली आहे. याचप्रमाणें ईश्वराचे कांहीं अवतार व कांहीं विभूति शास्त्रानें उपासनीय मानल्या आहेत. आतां उपासना म्हणजे उपास्याच्या समीप जाणें असा अर्थ आहे. पण तें जेथें शक्य नसतें तेथें शास्त्रकारांनीं अन्य उपाय अगर विधि सुचविले आहेत. सूर्याच्या उष्णतेचा अनुभव सूर्यासमीप जाण्यानें मिळेल, तसाच विशिष्ट शक्तीच्या सूर्यकांतमण्याच्या माध्यमद्वारां येथेंहि अंशतः मिळेल. त्याप्रमाणें या उपास्याच्या प्रतिमा किंवा प्रतीकें हीं अव्यक्त उपास्यांतील धनशक्ति उपासकांतील ऋण शक्तीनें आकर्षित करून घेण्याचीं माध्यमें होत. यांत देवतांतील विशिष्ट प्राणशक्ति-संचय व भक्तांतील ऋणशक्तीची ओढ अथवा उत्कंठा, यांचें जसें महत्त्व आहे, त्याचप्रमाणें साध्यमरूप प्रतिमा अगर प्रतीक यांचेंहि वस्तुमाहात्म्य मानावेंच लागतें. मग हें त्या वस्तूंतील माहात्म्य सिद्धशक्तीच्या एखाद्या महापुरुषाच्या हातून झालेली त्या प्रतिमाप्रतीकाची प्राणप्रतिष्ठा व अर्चा, अथवा अनेक श्रेष्ठ भक्तांची त्या ठिकाणीं खिळलेली दिव्य भावना, अशा अनेक कारणा-मुळें उत्पन्न होत असेल. त्याचप्रमाणें प्रतिमा-प्रतीकांचें विशिष्ट द्रव्य धन-ऋण-शक्तीचें योग्य वाहक असण्यांतहि त्यांचें महत्त्व असेल. म्हणून पारदादि निरनिराळ्या द्रव्यांच्या केलेल्या शिवलिंगांचें माहात्म्य वेगवेगळें मानलें जातें. त्याचप्रमाणें देवळाच्या पायरीचा दगड व ज्यांतून देवाची मूर्ति घडविली तो दगड यांची जात, गुण व धर्म व त्यांचें सौंदर्य हे भाव वेगळे वेगळे असतात. तसेंच त्यावर मागून झालेले प्राणप्रतिष्ठादि शास्त्रोक्त संस्कार हेहि वेगळे असतात. अलीकडील सायकोमेट्री या शास्त्रान्वयें विशिष्ट शक्तीच्या माध्यम व्यक्तीला एखाद्या प्राचीन किल्ल्याच्या भग्नावशेषांतील लहानसा दगड हातीं

---

१ धर्मविज्ञान (हिंदी), खंड १ ला, पृ. ३९१.

२ आभिरूप्याच्च बिम्बस्य पूजायाश्च विशेषतः। साधकस्य च विश्वासाद् देवतासन्निधिर्भवेत्। धर्मविज्ञान, खं. १, पृ. ३८६.

घेऊन त्या स्थळाचा प्राचीन अज्ञात इतिहास सांगतां येतो. किंवा एखाद्या अज्ञात व्यक्तीच्या बोटांतील आंगठी, खिशांतलें घड्याळ, हातरुमाल, अथवा हस्ताक्षराचा कागद हातीं घेऊन त्या व्यक्तीचें गुणवर्णन करतां येतें, हें आतां हजारों प्रयोगांनीं सिद्ध झालें आहे. यांत संस्कारांची सूक्ष्मता व नित्यता सिद्ध होते. चुंबकाकर्षण व चुंबकाकर्षणाचें क्षेत्र हा भौतिकशास्त्रानें अलीकडे हाताळलेला विषयहि उपासनेच्या प्रक्रियेंत फार चिंतनीय आहे. विवक्षित वस्तूंकडे व व्यक्तींकडे जीव सहज आकर्षिले जातात. सत्संगति, तीर्थक्षेत्रें, काशीविश्वेश्वर व पंढरीचा विठोबा अशीं देवतास्थानें लक्षावधि भाविकांना खेंचून घेतात, हा उघड अनुभव आहे.

आतां भौतिकशास्त्रानेंहि असें सिद्ध केलें आहे कीं, अणुरेणूपासून खगोलांपर्यंत–अणोरणीयान् महतो महीयान्–कोणतेंहि तत्त्व किंवा वस्तु स्थिर नसून सूक्ष्मातिसूक्ष्म चल घटकांची घटनात्मक किंवा कर्मात्मक गति–शक्तिरूप आहे. प्रत्येक वस्तूचे हे कर्मात्मक संस्कार कापूर, कस्तुरी यांच्या अणूरेणूंप्रमाणें नित्य बाहेर फेंकले जातात व ते अन्य वस्तूला खेंचूनहि घेतात, किंवा तिला दीर्घकाल चिकटून राहतात. ते संस्कार मूळ ज्या वस्तूचे अगर व्यक्तीचे असतील, त्याचे गुणप्रभाव ते नित्य दर्शवीत राहतात. या अनुभवसिद्ध भौतिक प्रयोगांवरून उपास्यांच्या प्रतिमा-प्रतीकांच्या प्राणप्रतिष्ठेंतील संस्कारांचें महत्त्व लक्षांत येतें व देवमूर्तीसंबंधीं स्पृश्यास्पृश्यविवेक जाणवतो. प्राणप्रतिष्ठा करणारी व्यक्ति जर असामान्य सिद्धिसंपन्न असेल, तर अशा व्यक्तीकडून बुद्धिपुरःसर होणारे प्रतिमेच्या प्राणप्रतिष्ठेचे संस्कार विशेष प्रभावी होणें हें स्वाभाविक आहे. हें असें दिव्य प्रभावसंपन्न वातावरण अनेक देवतांच्या मंदिरांत प्रतीत होतें, हें सगुणोपासनेचें ऐश्वर्य आहे. देवतामूर्तींचें, व सिद्ध साधूंचें प्राविण्य आणि जन्मजात प्राक्संस्कारजन्य व्यक्तींचें वैशिष्ट्य म्हणजे काय हा विषय सूक्ष्म आहे. तो आधुनिक समाजसुधारकांस कळावा तसा जाणवत नाहीं, असें आढळतें.

असो. या उपास्याच्या प्रतिमाप्रतीकांतील वस्तुमाहात्म्यावर भर न देतां च्याल विषयभूत उपास्यांच्या बहिरंगोपासनेचें दिग्दर्शनेंत (१) संपत्, (२) आरोप, (३) संवर्ग व (४) अध्यास, असे चार प्रकार सांगितले

१ University of Spiritualism, Chapter XX.

आहेत. ( १ ) अल्प वस्तूच्या ठायीं अनंत गुणांची भावना करणें; जसें, अन्न, प्राण, मन हेंच ब्रह्म अशी भावना अजाणतां, म्हणजे स्वतःला ब्रह्मज्ञान नसतां, करणें हा संपद्विधि होय. ( २ ) एक देशावर अथवा अंशावर सर्व उपास्य तत्त्वाचा अगर व्यक्तीचा आरोप करून उपासना करणें; म्हणजे शिव, राम, कृष्ण यांच्या प्रतिमांवर साक्षात् त्यांची भावना करून उपासना करणें, हा आरोपविधि होय. ( ३ ) कर्मकांडांतील अनेक देवतांची एकट्या अग्नीच्या ठिकाणीं धारणा करून उपासना करणें, हा संवर्गविधि होय, आणि ( ४ ) कांहींच सारूप्य अगर साधर्म्य नसतां एखाद्या वस्तूवर अन्यथा आरोप करणें; जसें, शाळिग्रामावर विष्णूच्या व बाणावर शिवाच्या देहाकाररूपाची धारणा करून उपासना करणें, हा अध्यासविधि होय. पुढें शिवगीतेंत असें सांगितलें आहे कीं, उपास्य देवतेची वरीलप्रमाणें ध्यानधारणा करीत असतां त्यांत इतर विजातीय विषयांच्या योगानें विघ्न न येतां ज्या उपासकांचें एकरूपाकार ध्यान सतत राहूं लागेल व पुढें पुढें क्रमानें त्यास उपास्य देवता आणि आपण यांच्यांतील म्हणजे ध्याताध्येयरूपांत लीन होऊन त्यांच्यांतील तादात्म्य भावनेनें अभेद दिसूं लागेल, तोंपर्यंत त्यानें उपासना कर्म करावें (शिवगीता, १२।१०–१६ ). अर्थात् या उपासना कर्मांत भक्ताची दृढ भावना व तन्मयता म्हणजे ध्यात्याचें पृथकत्वानें अभान हेंच प्रधान अंग असतें. हरिमिडे स्तोत्र ( ६ ) पहा.

याच सूक्ष्मदृष्टीनें श्रीतुकोबाराय म्हणतात :—

> पाषाण देव पाषाण पायरी। पूजा एकावरी पाय ठेवी ॥ १॥
> सार तो भाव सार तो भाव। अनुभवी देव तेचि जाले ॥ २ ॥
> उदका भिन्न पालट काई। गंगा गोड येरा चवी काय नाहीं ॥ ३ ॥
> तुका म्हणे हें भाविकाचें वर्म। येरीं धर्माधर्म विचारावे ॥ ४ ॥

श्रीएकनाथमहाराज असेंच सांगतात :—

> भाव तोचि देव भाव तोचि देव। ये अर्थी संदेह धरूं नका ॥ १ ॥
> भावें भक्ति फळे भावें देव मिळे। निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥ २ ॥
> भावचि कारण भावचि कारण। यापरतें साधन नाहीं नाहीं ॥ ३ ॥
> एका जनार्दनीं भावाच्या आवडी। मनोरथ कोडी पुरतीं तेणें ॥ ४ ॥

वरीलप्रमाणें बहिरंग उपासना करीत असतां, पुढें पुढें उपास्य-उपासकांच्या

नामरूपांच्या उपाधींतील वैषम्य व द्वैत आड म्हणजे प्रतिबंधक किंवा विघ्नकर होतां कामा नये. या दृढ ध्यानधारणेंत प्रथम उपासकाचें नामरूप व नंतर उपास्याचें नामरूप यांचा लोप होऊन एक अभेद भक्तीचा अखंड आनंदानुभव मात्र उरतो. सराफ ज्याप्रमाणें अलंकारांच्या कारागिरीकडे अथवा नामरूपांकडे पूर्ण दुर्लक्ष करून अधिष्ठानरूप सुवर्णाचा कस पाहतो, त्याचप्रमाणें उपास्यप्रतीकाच्या अधिष्ठानरूप सच्चिदानंदरूपावर उपासकाची सूक्ष्म दृष्टि खिळून उपासकाचें देहमान हरपणें व उभयतांचें शुद्ध स्वरूपांत ऐक्यरूप अपरोक्ष होणें, ही थोडी वेगळी ज्ञानप्रक्रियाहि वरील वचनांतील सद्भावाचा तत्त्वतः अर्थ असूं शकेल.

**अंतरंग उपासना:—** ही बहिरंग उपासनेपेक्षां पुष्कळ श्रेष्ठ मानली आहे. शिवलिंगोपासना ही बहिरंगच असली तरी अंतरंग उपासनेची ती एक अवश्य पायरी आहे. "न काष्ठे विद्यते देवो न पाषाणे न मृण्मये। भावे हि विद्यते देवो तस्माद्भावोहि कारणम्॥" हा भाव म्हणजे आपणासकट सकळ-वस्तुमात्राचें शिवशक्ति हें वास्तविक तत्त्व सच्चिदानंदरूप आहे, असा प्रथम परोक्ष दृढभाव व नंतर त्याच भावाचा मननिदिध्यासनानें अपरोक्ष अनुभव, ही अंतरंग उपासना होय. पण हें बाह्याभ्यंतर ओतप्रोत असलेलें एकमेव सच्चिदानंदरूप अथवा अविनाभूत शिवशक्तिरूप जाणण्यासाठीं अगोदर बहिरंगोपासनेनें "मूर्तिध्यानें तन्मयस्थिति। ऐक्यत्वें राहे निश्चल वृत्ति॥" हें साधलें पाहिजे. हें साधलें म्हणजे ध्याता व ध्येय यांस जोडणारें ध्यान हें दोघांतील विषय-विषयीभावाचें द्वैत व अंतर हळूहळू नाहींसें करतें, म्हणजे ध्याता जीव-अहंकाररूपानें अंतरायभूत न राहतां ध्याता व ध्येय या दोघांचें ऐक्य घडवून आणतें व आपण लीन होतें. म्हणजे ध्याता ध्येयरूपांत समरसता पावतो व मग ध्यानप्रक्रियेंतील द्वैत मावळतें. अशा रीतीनें ध्यात्याच्या ध्यान-विषयक अहंतेचा लोप होतांच तत्सापेक्ष ध्येयरूप सगुणध्यानहि लवकरच मावळतें. याप्रमाणें ध्यान, ध्याता व ध्येय ही त्रिपुटी मावळल्यावर शुद्ध निर्विशेष अखंडानंदरूप ज्ञान मात्र उरतें. तेंच ब्रह्मात्मैक्यरूप होय. व्यक्त व ज्ञात नामरूपांच्या मागें अव्यक्त व अज्ञात असलेल्या अथवा कार्यांत कारणरूपानें अथवा अधिष्ठानरूपानें असलेल्या सूक्ष्म तत्त्वाचें चिंतन, मनन व निजध्यासन ही प्रक्रिया अंतरंग उपासनेला उपकारक होते.

या अंतरंग उपासनेंत निर्गुण व सगुण असे दोन प्रकार आहेत. प्रथम निर्गुण उपासनाप्रकार कसा तें पाहूं वेदेश्वरीकार म्हणतात: "पहिलें परोक्षत्वें ब्रह्म जाणूनी। ध्यात होता सर्वी मज लागूनी। तोचि सगुणोपासक अभिधानी। आपण दास्यत्वें असतां ॥ १३५ ॥ तयापुढें मीवणही त्यागिलें। अहं ब्रह्मचि स्फुरूं लागलें। ध्येय ध्यानरूप मात्र असें उरलें। तो कर्तृतंत्र निर्गुणोपासक ॥१३६॥ नंतर ध्येय ध्यानही त्यागूनी। अभिन्न झाला पूर्णपणीं। तोचि झाला सहज समाधानी। वस्तुतंत्ररूप ॥ १३७ ॥" हा निर्गुण ध्यान-प्रकार सांगितल्यावर अतरंग उपासनेंतील सगुण ध्यान प्रकार सांगतात, तो असा: "मूर्तिचिया ध्यासेंकरून। अखंड एकाग्र होतसे मन। जे ध्येय मूर्ति तेंचि भासमान। होत असे वृत्तीशीं ॥ १६२॥ अंतरीं दृढता जे वृत्तीची। दृश्याकारेंहि दिसे तेंचि। श्वानसूकरादि आढळतां साची। तेथें मूर्ति दिसे सगुण ॥ १६३ ॥ हा ऐसा मनाचा स्वभाव। अभ्यासें होय तैसाच स्वयमेव। गो-अश्व-मनुष्यादि पाहतां अवयव। मज शिवाच्या ध्येय मूर्तिच दिसती ॥ १६४ ॥ मग तो वेगळा भाव टाकून। म्हणे हें जगचि शिवरूप संपूर्ण। मग भजू लागे सर्वात्मभावालागून। तींहींही काळीं ॥ १६५ ॥ स्वप्नींहि मज गुरूरचि देखे। जागृतींत तो मजवीण नोळखें। ऐशिया उपासका सारिखें। मज काई दुजें आवडे? ॥ १६६ ॥ मग मी तया प्रसन्न होऊन। गुरुरूपें प्रगटोनि अंगें आपण। उपदेशीं ज्ञान ब्रह्माभिन्न। तेव्हां निर्भय सहजचि ॥ १६७ ॥ एवं निर्गुण आणि सगुण ध्यान। परमार्थमार्ग दाविले दोन। हेचि दोन्ही विशद करून। बोलिजेत असती ॥ १६८ ॥ या दोहींहि उपासनेशीं। अंतरंग बोलिजे निश्चयेंसी। तस्मात् साधकें हेंचि सदृढ मानसीं। दिननिशीं अभ्यासावें ॥ १६९ ॥ ब्रह्म आत्मा जाणूनि अपरोक्ष। अनुसंधान रूप लावावें लक्ष। हा निर्गुणोपासनेचा पक्ष। ध्येय ध्यान रूपें ॥ १७० ॥ हें जरी मंद प्रज्ञा न घडे। तरी ध्यावें सगुणाचें रूपडें। मग सर्व जगीं तेंचि आतुडे। ध्येय मूर्ति सदा ॥ १७१ ॥ एवं दोहीं परी जें अनुसंधान। यातीच

१ "मन रामीं रंगलें। अवघें मनचि राम झालें। सबाह्य अभ्यतरीं अवघें रामरूप कोंदलें हो ॥ धृ० ॥" "उपासना सकळाठाईं। आत्माराम कोठें नाहीं। याकारणें ठाईं ठाईं। रामें आटोपिलें॥" –दा. बो. १५।९।२८.

"राम उपासना ऐसी। ब्रह्मांड व्यापिनी पाहा।" –मानपंचक ४।१७.

नाम अंतरंगसाधन । यापरतें जें जें देहाचरण । ते ते बहिरंगक्रिया ॥ १७२ ॥
—वेदेश्वरी १२.

श्रवणमनननिदिध्यासाची मोक्षप्रद अंतरंग उपासना साधण्यासाठीं अगोदर पूजाअर्चा, जपतपादि बहिरंग साधनें करावीं लागतात. अशीं बहिरंग आणि अंतरंग साधनें ज्यांनीं दीर्घ कालपर्यंत केलीं, असे प्राचीनकालीं अनेक शिवभक्त होऊन गेले. त्यांचेहि उल्लेख आपल्या पुराणांत आढळतात. तसेंच ही वैधी भक्ति कशी करावी याबद्दलहि शिवगीता, शिवार्चन अथवा लिंगार्चनपद्धति इत्यादि अनेक ग्रंथांत पुष्कळ माहिती सांगितलीच आहे. ती येथें कोठवर सांगावी ! शिवाय या उपासनाकर्मांत म्हणावयाचीं रुद्रसूक्तें, देवीसूक्तें, शिवासंबंधीं कवनें, स्तोत्रें व सहस्रनामें हीं सर्व विचारपूर्वक अवलोकन करणें फार फार अगत्याचें होईल. कारण तीं वाचलीं असता शिवशक्त्युपासना अथवा शिवलिंगोपासना यांसंबंधीं जो श्रेष्ठ व उदात्तपणाचा भाव आहे, तो पूर्णपणें कळून येईल.

शिवगीतेंत भगवान् शंकर श्रीरामाला सांगतात कीं, "जो वेदाध्ययन, यज्ञ, नाना प्रकारचीं दानें मदर्पणबुद्धीनें करितो, तो माझा भक्त मला प्रिय आहे. भस्म लावून, रुद्राक्ष धारण करून, जो जितेंद्रिय पंचाक्षरी मंत्राचा किंवा रुद्राध्यायाचा जप करतो, तसेंच अथर्वशीर्ष, कैवल्योपनिषत्, श्वेताश्वतर सूक्त यांचा जप करतो व माझें अनन्यबुद्धीनें चिंतन करतो, तो श्रेष्ठ भक्त होय. ॐ हेंच परमब्रह्म होय. या प्रणवाच्या निरनिराळ्या मात्रांचें जो शास्त्रोक्त चिंतन करतो व भूत आणि भविष्य सर्व रुद्ररूप आहे, त्या रुद्ररूपामध्यें प्राण आणि प्राणाचे ठायीं ओंकार आहे, म्हणून रुद्र आणि ओंकार यांत भेद न मानतां त्याचें जो चिंतन करतो, तो मुक्त होतो. जो बाहु वर उभारून सूर्याभिमुख होत्साता, उदकांत उभा राहून सूर्यबिंबस्थ माझ्या स्वरूपाचें ध्यान करून अथर्वांगिरस मंत्राचा जप करतो, तो जसा गृहस्वामी आपल्या घरांत प्रवेश करतो, तसा माझ्या स्वरूपांत प्रवेश करील. तसेंच ईशावास्यादि उपनिषदाचे मंत्र जो नित्य माझ्या अग्रभागीं पठण करील, तो सायुज्य पावेल"
—शिवगीता, अ. १५.

शिवलिंगोपासना ही शिवशक्त्युपासना आहे. ही उपासना इतर उपासनांपेक्षां जास्त सूक्ष्म, गूढ व व्यापक स्वरूपाची आहे. शिवलिंग हें अरूप

प्रतीक असतें, तसें शक्तिपीठहि अनेक ठिकाणीं अरूप प्रतीक असतें. त्या प्रतीकाच्या ठिकाणीं साकार व सरूप अशा शिवशक्तीचा अभ्यास अथवा धारणा करणें, हा उपासनेंतील ध्यानाचा एक प्राथमिक प्रकार समजावा. त्याचप्रमाणें आपल्या अहंच्या किंचित् स्फुरणाप्रमाणें शिवशक्तीचें अतिसूक्ष्म-रूप असून, ज्ञाताज्ञात अनंत ब्रह्मांडांना व्यापून उरणारें असें शिवशक्तीचें विराट स्वरूपहि असतें. यासाठीं वृत्ति जशी अतिसूक्ष्म तशी अतिव्यापकहि करावी लागते. या व्यापकरूपांत शिवशक्तीच्या किती भावांचा अंतर्भाव होतो, याची गणना करतां येणें शक्यच नाहीं. तात्त्विक अदितीप्रमाणें शिवशक्ति नामरूपकर्मांना जन्म देणारी व त्यांचा संहार करणारी आहे. सारें दृश्य व मनोवेद्य शिवशक्तीचेंच स्वरूप आहे. त्याहून अन्य कांहींच नाहीं. एवढी सूक्ष्म व व्यापक दृष्टि उपासकाला आरंभींच साधणें काठिण, म्हणून शिवशक्तीच्या नानाविध देहाकारांची भावना अनेक सद्भक्तांनीं अनुभवसिद्ध करून ठेवली आहे. त्याहि मूर्तींत अगर प्रतिमारूपांत अनेक गूढसंकेत असतातच. ते जाणलेले बरें. पण तें निदान-शास्त्र आज उपलब्ध नाहीं.

" न सन्ति याथार्थ्यविदः पिनाकिनः। " असें कुमारसंभवांत (५।७७) म्हटलें आहे. " शिवमात्मनि पश्यन्ति प्रतिमासु न योगिनः। अज्ञानां भावनार्थाय प्रतिमाः परिकल्पिताः॥ " असें एक शास्त्रवचन आहे. शिवाच्या ज्या नामरूपांचा शास्त्रांत व शिल्पांत म्हणजे मूर्तींत अथवा चित्रांत निर्देश आढळतो, त्यांत कोठें कोठें साक्षात्कारी सत्पुरुषांनीं भावित केलेल्या त्याच्या रूपाशीं (उ०, चंद्रशेखर, त्रिलोचन, गंगाधर, इ० ), कोठें कोठें त्याच्या ठिकाणीं कल्पिलेल्या गुणधर्मांशीं (उ०, नटराज, दक्षिणामूर्ति, अर्धनारीश्वर, इ.) कोठें त्याच्या परिवाराशीं (उ०, उमापति, भूतेश), कोठें त्याच्या-संबंधीं वर्णिलेल्या कथाप्रसंगांशीं, (उ०, स्मरहर, त्रिपुरांतक, भिक्षाटणमूर्ति, कंकाळमूर्ति, किरातार्जुनमूर्ति, विघ्नेशानुग्रहमूर्ति, रावणानुग्रहमूर्ति, इ० ), असा संबंध असतो. कांहीं केवळ तात्त्विक कल्पना असतात (उ०, अष्टमूर्ति, शिवसादाख्य, अमूर्तसादाख्य, मूर्तसादाख्य, कर्तृसादाख्य, एकादशरुद्र, इ०); अशा अनेक प्रकारच्या शिवमूर्तींची तपशिलवार माहिती मीं माझ्या मूळ *ग्रंथांत लिहिली होती.* त्यांत शिवमूर्तींचीं मुखें, हात, त्या हातांतील आयुधें, त्यांचीं वाहनें, त्यांचे नृत्यांतील आविर्भाव यांचे जे संकेत स्पष्ट उपलब्ध

आहेत, तेहि सांगितले होते. पण विस्तारभयास्तव तें मोठें प्रकरण या ग्रंथांत घेतलें नाहीं. कारण शिवाची प्रतिमोपासना न करतां त्याची लिंगरूपांतच उपासना करावी, असा शास्त्रनिर्बंध आहे. तसेंच, हा ग्रंथ जरी सर्वसाधारण शिवोपासनेसंबंधीं असला तरी शिवलिंगोपासना हाच त्यांतील प्रधान विषय आहे.

शिवाय शिवमूर्तिविज्ञानासंबंधीं जें वाङ्मय उपलब्ध आहे त्यांत शिल्प अथवा देशकालपरत्वें शिल्पाचा रुक्ष इतिहास हाच मुख्य विषय आहे. त्यांत उपासकाच्या उपासनेस अथवा भक्तिभावनेस उपकारक अशी विषयाची मांडणी मुळींच नाहीं. त्यांतहि आपल्याकडे उपलब्ध असलेल्या मध्ययुगीन देवताविषयक शिल्पांत ग्रीसप्रमाणें वास्तवदृष्टि किंवा चित्ताकर्षक सौंदर्यदृष्टि नसून गूढ सांकेतिक दृष्टीलाच प्राधान्य देण्यांत आलें असल्यामुळें, त्या रहस्यमय सांकेतिक दृष्टीच्या अभावीं तें मूर्तिविज्ञान भक्तभावनेला पोषक न होतां प्रतिबंधकच होण्याचा संभव अधिक वाटतो. यावर कोणी थिऑसोफिस्ट आणखी असें म्हणतात कीं, देवतामूर्तीच्या सौंदर्यावर उपासक मोहून जाऊं नये म्हणून त्या मुद्दाम विद्रूप करण्यांत येतात. तसें असलें तरी, एकप्रकारें चिखलांत हात घालून तो धूत बसण्याप्रमाणें, हा द्राविडी प्राणायामाचा उद्योग न करतां तो प्राचीन अतिगूढ, संदिग्ध व विरूप असा मूर्तिविचार सोडून दिलेलाच बरा, असें मीं ठरविलें.

कारण, कर्तृतंत्र उपासनेंत उपासकाच्या उपास्यासंबंधीं सरूप-अरूप अशा अवस्थांसंबंधीं भावना देशकालभेदानें बदलत जाणें अपरिहार्य आहे. आजचा मूर्तिकार शिवमूर्ति घडवितांना मोहेनजोदाडो येथील उत्खननांत सांपडलेली व शिवाची म्हणून मानली गेलेली सशृंग योगमूर्ति आपल्यापुढें आदर्श नमुना म्हणून ठेवणार नाहीं. अति प्राचीन काल सोडून दिला व अर्वाचीन कालाचा विचार पाहिला, तरी पंढरीच्या श्रीविठ्ठलाचें " सुंदर तें मुख, सुंदर तें ध्यान।"

---

१ Cultural Heritage of India, Vol. III, p. 553.

२ Inner life, by Rev. C. W. Leadbeater. Lotus Fire, by Dr. Arundale.

प्रतीक असतें, तसें शक्तिपीठहि अनेक ठिकाणीं अरूप प्रतीक असतें. त्या प्रतीकाच्या ठिकाणीं साकार व सरूप अशा शिवशक्तीचा अभ्यास अथवा धारणा करणें, हा उपासनेंतील ध्यानाचा एक प्राथमिक प्रकार समजावा. त्याचप्रमाणें आपल्या अहंच्या किंचित् स्फुरणाप्रमाणें शिवशक्तीचें अतिसूक्ष्म-रूप असून, ज्ञाताज्ञात अनंत ब्रह्मांडांना व्यापून उरणारें असें शिवशक्तीचें विराट स्वरूपहि असतें. यासाठीं वृत्ति जशी अतिसूक्ष्म तशी अतिव्यापकहि करावी लागते. या व्यापकरूपांत शिवशक्तीच्या किती भावांचा अंतर्भाव होतो, याची गणना करतां येणें शक्यच नाहीं. तात्त्विक अदितीप्रमाणें शिवशक्ति नामरूपकर्मांना जन्म देणारी व त्यांचा संहार करणारी आहे. सारें दृश्य व मनोवेद्य शिवशक्तीचेंच स्वरूप आहे. त्याहून अन्य कांहींच नाहीं. एवढी सूक्ष्म व व्यापक दृष्टि उपासकाला आरंभींच साधणें कठिण, म्हणून शिवशक्तीच्या नानाविध देहाकारांची भावना अनेक सद्भक्तांनीं अनुभवसिद्ध करून ठेवली आहे. त्याहि मूर्तींत अगर प्रतिमारूपांत अनेक गूढसंकेत असतातच. ते जाणलेले बरें. पण तें निदान-शास्त्र आज उपलब्ध नाहीं.

" न सन्ति याथार्थ्यविदः पिनाकिनः। " असें कुमारसंभवांत (५।७७) म्हटलें आहे. " शिवमात्मनि पश्यन्ति प्रतिमासु न योगिनः। अज्ञानां भावनार्थाय प्रतिमाः परिकल्पिताः॥ " असें एक शास्त्रवचन आहे. शिवाच्या ज्या नामरूपांचा शास्त्रांत व शिल्पांत म्हणजे मूर्तींत अथवा चित्रांत निर्देश आढळतो, त्यांत कोठें कोठें साक्षात्कारी सत्पुरुषांनीं भावित केलेल्या त्याच्या रूपाशीं ( उ०, चंद्रशेखर, त्रिलोचन, गंगाधर, इ० ), कोठें कोठें त्याच्या ठिकाणीं कल्पिलेल्या गुणधर्मांशीं ( उ०, नटराज, दक्षिणामूर्ति, अर्धनारीश्वर, इ. ) कोठें त्याच्या परिवाराशीं ( उ०, उमापति, भूतेश ), कोठें त्याच्या-संबंधीं वर्णिलेल्या कथाप्रसंगांशीं, ( उ०, स्मरहर, त्रिपुरांतक, भिक्षाटणमूर्ति, कंकाळमूर्ति, किरातार्जुनमूर्ति, विघ्नेशानुग्रहमूर्ति, रावणानुग्रहमूर्ति, इ० ), असा संबंध असतो. कांहीं केवळ तात्त्विक कल्पना असतात (उ०, अष्टमूर्ति, शिवसादाख्य, अमूर्तसादाख्य, मूर्तसादाख्य, कर्तृसादाख्य, एकादशरुद्र, इ०), अशा अनेक प्रकारच्या शिवमूर्तींची तपशिलवार माहिती मीं माझ्या मूळ ग्रंथांत लिहिली होती. त्यांत शिवमूर्तींचीं मुखें, हात, त्या हातांतील आयुधें, त्यांचीं वाहनें, त्याचे नृत्यांतील आविर्भाव यांचे जे संकेत स्पष्ट उपलब्ध

आहेत, तेहि सांगितले होते. पण विस्तारभयास्तव तें मोठें प्रकरण या ग्रंथांत घेतलें नाहीं. कारण शिवाची प्रतिमोपासना न करतां त्याची लिंगरूपांतच उपासना करावी, असा शास्त्रनिर्बंध आहे. तसेंच, हा ग्रंथ जरी सर्वसाधारण शिवोपासनेसंबंधी असला तरी शिवलिंगोपासना हाच त्यांतील प्रधान विषय आहे.

शिवाय शिवमूर्तिविज्ञानासंबंधीं जें वाङ्मय उपलब्ध आहे त्यांत शिल्प अथवा देशकालपरत्वें शिल्पाचा रुक्ष इतिहास हाच मुख्य विषय आहे. त्यांत उपासकाच्या उपासनेस अथवा भक्तिभावनेस उपकारक अशी विषयाची मांडणी मुळींच नाहीं. त्यांतहि आपल्याकडे उपलब्ध असलेल्या मध्ययुगीन देवताविषयक शिल्पांत ग्रीसप्रमाणें वास्तवदृष्टि किंवा चित्ताकर्षक सौंदर्यदृष्टि नसून गूढ सांकेतिक दृष्टीलाच प्राधान्य देण्यांत आलें असल्यामुळें, त्या रहस्यमय सांकेतिक दृष्टीच्या अभावीं तें मूर्तिविज्ञान भक्तभावनेला पोषक न होतां प्रतिबंधकच होण्याचा संभव अधिक वाटतो. यावर कोणी थिऑसोफिस्ट आणखी असें म्हणतात कीं, देवतामूर्तींच्या सौंदर्यावर उपासक मोहून जाऊं नये म्हणून त्या मुद्दाम विद्रूप करण्यांत येतात. तसें असलें तरी, एकप्रकारें चिखलांत हात घालून तो धूत बसण्याप्रमाणें, हा द्राविडी प्राणायामाचा उद्योग न करतां तो प्राचीन अनिगूढ, संदिग्ध व विरूप असा मूर्तिविचार सोडून दिलेलाच बरा, असें मीं ठरविलें.

कारण, कर्तृतंत्र उपासनेंत उपासकाच्या उपास्यासंबंधीं सरूप-अरूप अशा अवस्थांसंबंधीं भावना देशकालभेदानें बदलत जाणें अपरिहार्य आहे. आजचा मूर्तिकार शिवमूर्ति घडवितांना मोहेनजोदाडो येथील उत्खननांत सांपडलेली व शिवाची म्हणून मानली गेलेली सशृंग योगमूर्ति आपल्यापुढें आदर्श नमुना म्हणून ठेवणार नाहीं. अति प्राचीन काल सोडून दिला व अर्वाचीन कालाचा विचार पाहिला, तरी पंढरीच्या श्रीविठ्ठलाचें " सुंदर तें मुख, सुंदर तें ध्यान।"

---

१ Cultural Heritage of India, Vol. III, p. 553.

२ Inner life, by Rev. C. W. Leadbeater. Lotus Fire, by Dr. Arundale.

प्रतीक असतें, तसें शक्तिपीठहि अनेक ठिकाणीं अरूप प्रतीक असतें. त्या प्रतीकाच्या ठिकाणीं साकार व सरूप अशा शिवशक्तीचा अभ्यास अथवा धारणा करणें, हा उपासनेंतील ध्यानाचा एक प्राथमिक प्रकार समजावा. त्याचप्रमाणें आपल्या अहंच्या किंचित् स्फुरणाप्रमाणें शिवशक्तीचें अतिसूक्ष्मरूप असून, ज्ञाताज्ञात अनंत ब्रह्मांडांना व्यापून उरणारें असें शिवशक्तीचें विराट स्वरूपहि असतें. यासाठीं वृत्ति जशी अतिसूक्ष्म तशी अतिव्यापकहि करावी लागते. या व्यापकरूपांत शिवशक्तीच्या किती भावांचा अंतर्भाव होतो, याची गणना करतां येणें शक्यच नाहीं. तात्त्विक अद्वितीप्रमाणें शिवशक्ति नामरूपकर्मीना जन्म देणारी व त्यांचा संहार करणारी आहे. सारें दृश्य व मनोवेद्य शिवशक्तीचेंच स्वरूप आहे. त्याहून अन्य कांहींच नाहीं. एवढी सूक्ष्म व व्यापक दृष्टि उपासकाला आरंभींच साधणें कठिण, म्हणून शिवशक्तीच्या नानाविध देहाकारांची भावना अनेक सद्भक्तांनीं अनुभवसिद्ध करून ठेवली आहे. त्याहि मूर्तीत अगर प्रतिमारूपांत अनेक गूढसंकेत असतातच. ते जाणलेले बरे. पण तें निदान-शास्त्र आज उपलब्ध नाहीं.

"न सन्ति याथार्थ्यविदः पिनाकिनः।" असें कुमारसंभवांत (५।७७) म्हटलें आहे. "शिवमात्मनि पश्यन्ति प्रतिमासु न योगिनः। अज्ञानां भावनार्थाय प्रतिमाः परिकल्पिताः॥" असें एक शास्त्रवचन आहे. शिवाच्या ज्या नामरूपांचा शास्त्रांत व शिल्पांत म्हणजे मूर्तींत अथवा चित्रांत निर्देश आढळतो, त्यांत कोठें कोठें साक्षात्कारी सत्पुरुषांनीं भावित केलेल्या त्याच्या रूपाशीं (उ०, चंद्रशेखर, त्रिलोचन, गंगाधर, इ०), कोठें कोठें त्याच्या ठिकाणीं कल्पिलेल्या गुणधर्मांशीं (उ०, नटराज, दक्षिणामूर्ति, अर्धनारीश्वर, इ.) कोठें त्याच्या परिवाराशीं (उ०, उमापति, भूतेश), कोठें त्याच्यासंबंधीं वर्णिलेल्या कथाप्रसंगांशीं, (उ०, स्मरहर, त्रिपुरांतक, भिक्षाटणमूर्ति, कंकाळमूर्ति, किरातार्जुनमूर्ति, विघ्नेशानुग्रहमूर्ति, रावणानुग्रहमूर्ति, इ०), असा संबंध असतो. कांहीं केवळ तात्त्विक कल्पना असतात (उ०, अष्टमूर्ति, शिवसादाख्य, अमूर्तसादाख्य, मूर्तसादाख्य, कर्तृसादाख्य, एकादशरुद्र, इ०); अशा अनेक प्रकारच्या शिवमूर्तींची तपशिलवार माहिती मीं माझ्या मूळ ग्रंथांत लिहिली होती. त्यांत शिवमूर्तींची मुखें, हात, त्या हातांतील आयुधें, त्यांचीं वाहनें, त्यांचे मूर्त्यांतील आविर्भाव यांचे जे संकेत स्पष्ट उपलब्ध

आहेत, तेहि सांगितलें होतें. पण विस्तारभयास्तव तें मोठें प्रकरण या ग्रंथांत घेतलें नाहीं. कारण शिवाची प्रतिमोपासना न करतां त्याची लिंगरूपांतच उपासना करावी, असा शास्त्रनिर्बंध आहे. तसेंच, हा ग्रंथ जरी सर्वसाधारण शिवोपासनेसंबंधीं असला तरी शिवलिंगोपासना हाच त्यांतील प्रधान विषय आहे.

शिवाय शिवमूर्तिविज्ञानासंबंधीं जें वाङ्मय उपलब्ध आहे त्यांत शिल्प[१] अथवा देशकालपरत्वें शिल्पाचा रुक्ष इतिहास हाच मुख्य विषय आहे. त्यांत उपासकाच्या उपासनेस अथवा भक्तिभावनेस उपकारक अशी विषयाची मांडणी मुळींच नाहीं. त्यांतहि आपल्याकडे उपलब्ध असलेल्या मध्ययुगीन देवताविषयक शिल्पांत ग्रीकप्रमाणें वास्तवदृष्टि किंवा चित्ताकर्षक सौंदर्यदृष्टि नसून गूढ सांकेतिक दृष्टीलाच प्राधान्य देण्यांत आलें असल्यामुळें, त्या रहस्यमय सांकेतिक दृष्टीच्या अभावीं तें मूर्तिविज्ञान भक्तभावनेला पोषक न होतां प्रतिबंधकच होण्याचा संभव अधिक वाटतो. यावर कोणी थिऑसोफिस्ट आणखी असें म्हणतात कीं, देवतामूर्तीच्या[२] सौंदर्यावर उपासक मोहून जाऊं नये म्हणून त्या मुद्दाम विद्रूप करण्यांत येतात. तसें असलें तरी, एकप्रकारें चिखलांत हात घालून तो धूत बसण्याप्रमाणें, हा द्राविडी प्राणायामाचा उद्योग न करतां तो प्राचीन अतिगूढ, संदिग्ध व विरूप असा मूर्तिविचार सोडून दिलेलाच बरा, असें मीं ठरविलें.

कारण, कर्तृतंत्र उपासनेंत उपासकाच्या उपास्यासंबंधीं सरूप-अरूप अशा अवस्थांसंबंधीं भावना देशकालभेदानें बदलत जाणें अपरिहार्य आहे. आजचा मूर्तिकार शिवमूर्ति घडवितांना मोहेनजोदाडो येथील उत्खननांत सांपडलेली व शिवाची म्हणून मानली गेलेली सश्रृंग योगमूर्ति आपल्यापुढें आदर्श नमुना म्हणून ठेवणार नाहीं. अति प्राचीन काल सोडून दिला व अर्वाचीन कालाचा विचार पाहिला, तरी पंढरीच्या श्रीविठ्ठलाचें " सुंदर तें मुख, सुंदर तें ध्यान।"

१ Cultural Heritage of India, Vol. III, p. 553.

२ Inner life, by Rev. C. W. Leadbeater. Lotus Fire, by Dr. Arundale.

असें जरी संतांनीं मानलें, तरी मुंबईच्या माधवबागेंतील श्रीलक्ष्मीनारायणाची मूर्ति घडवितांना पंढरीचा विठोबा व कोल्हापूरची महालक्ष्मी हे आदर्श मूर्तिकारानें मानले नाहींत. आजकालच्या देवघरांत लावलेली रविवर्म्याच्या शिवपंचायतन, लक्ष्मी, सरस्वती, गंगावतरण या लोकप्रिय तसबिरींतील चित्रांचे आदर्श कांहीं प्राचीन शिल्प खास नव्हे. अशी बदललेली अभिरुचि दिसत असतां, या उपासना ग्रंथांत मीं प्राचीन 'रूपमंडन' वर्णन करण्यांत स्वारस्य तें काय? आज बंगाली चित्रकलेंत प्राचीन चित्रकलेचे अवास्तव अनुकरण करण्याची एक विक्षिप्त तऱ्हा निघाली आहे. पण मला तरी तीं मनोवेधक वाटत नाहीं. तें कांहीं असो. प्राचीन शास्त्र व शिल्प यांत निर्दिष्ट केलेलें निदान शिवरुद्राचें रूप, गुण व चरित्र इतकें लोकोत्तर, गूढ, अद्भुत व सांकेतिक आहे कीं, तें जसेंच्या तसें ध्यानधारणेसाठीं नजरेपुढें ठेवणें व तें आत्मसात् करणें आजच्या अभिरुचीला तरी कठिणच वाटेल. "अतीतः पन्थानं तव च महिमा वाङ्मनसयोरतव्द्यावृत्त्या यं चकितमभिधत्ते श्रुतिरपि। स कस्य स्तोतव्यः कतिविधगुणः कस्य विषयः पदे त्वर्वाचीने पतति न मनः कस्य न वचः॥२॥" असें पुष्पदंतानें म्हणून पुढें जो विशेषेंकरून सोळा, सतरा, अठरा व बावीस या श्लोकांत शिवस्तव केला आहे, त्यांत वर्णिलेलें दृश्य स्पष्ट नजरेसमोर आणणें व राखणें हें कसें कठिणच आहे. "तव तत्त्वं न जानामि, कीदृशोऽसि महेश्वर। या दृशोऽसि महादेव तादृशाय नमोनमः॥" असेंच अखेर म्हटलें जातें.

१ मही पादाघातादव्रजति सहसा संशयपदं। पदं विष्णोर्भ्राम्यद्भुजपरिघरुग्णग्रहगणम्। मुहुर्द्यौर्दौस्थ्यं यात्यनिभृतजटाताडिततटा जगद्रक्षायै त्वं नटसि ननु वामैव विभुता॥१६॥ वियद्व्यापि तारागणगुणितफेनोद्गमरुचिः प्रवाहो वारां यः पृषतलघुदृष्टः शिरसि ते। जगद्द्वीपाकारं जलधिवलयं तेन कृतमित्यनेनैवोन्नेयं धृतमहिम दिव्यं तव वपुः॥१७॥ रथः क्षोणी यन्ता शतधृतिरगेन्द्रो धनुरथो रथाङ्गे चन्द्रार्कौ रथचरणपाणिः शर इति। दिधक्षोस्ते कोऽयं त्रिपुरतृणमाडम्बरविधिर्विधेयैः क्रीडन्त्यो न खलु परतन्त्राः प्रभुधियः॥१८॥ प्रजानाथं नाथ प्रसभमभिकं स्वां दुहितरं गतं रोहिद्भूतां रिरमयिषुमृष्यस्य वपुषा। धनुः पाणेर्यातं दिवमपि सपत्राकृतममुं त्रसन्तं तेऽद्यापि त्यजति न मृगव्याधरभसः॥२२॥ —शिवमहिम्न.

तेव्हां श्रीएकनाथमहाराज एकनाथी भागवतांत (अ. ३०) म्हणतात कीं, " ब्रह्मा जगाचा आदि कर्ता। त्यासही न कळे तुझी सत्ता। तूं नाना अवतारीं देहधर्ता। तथा तुज कर्ता नव्हे ब्रह्मा ॥ २६७ ॥ तूं स्वलीला देह कैसा धरसी। अवतार चरित्रें कैसीं करिसी। कैसेनि देह सांडिसी। हें ब्रह्मादिकांसी कळेना ॥ २६८ ॥ मुळें होईल ब्रह्मज्ञान। परी तुझें स्वलीला देहधारण। याचें नेणती पर्यवसान। अति सज्ञान साकल्यें ॥ २७ ॥" तुलसीदास असेंच म्हणतात. तें खरेंच आहे

तात्पर्य, शिवमूर्तीचा रूपविचार हा अति दुर्बोध व कालांतरामुळें क्वचित् गैरसमज करणारा वाटत असल्यामुळें, शिवलिंगोपासनेवरील या ग्रंथांत तो उपास्याचा रूपविषय उपासक वाचकांच्या आवडीनुसार त्यांच्या भावनांवरच मी सोंपवीत आहे. ज्यांना त्या प्राचीन शास्त्रोक्त रूपविषयाचेंच आगत्य असेल त्यांनीं साक्षात्कारी शिवभक्तांकडूनच तो विषय शक्यतर समजून घेणें इष्ट वाटतें. उपासनाकर्मांत मूर्तिविज्ञानावरील आधुनिक वाङ्मयउपासकाचे कामास येईल, असें मला तरी आढळलें नाहीं. उपासना हा प्रेमळ भावनेचा विषय आहे. आणि मूर्तिविज्ञानाच्या आधुनिक ऐतिहासिक दृष्टीच्या चिकित्सेंत भाविकाच्या देवताविषयक प्रेमभावनेवर कसे आघात होत आहेत, इकडे लक्ष दिलें जात नाहीं. म्हणून प्राचीन शिल्पशास्त्रांतील शिवाच्या विविधरूपाबद्दल एकवेळ कमीच माहिती असलेली परवडली, पण उपासनेंत निरुपयोगी व भक्तीला विघातक होणारी व संभ्रमग्रस्त करणारी अशी शिवरूपाची चिकित्सा नको; ती या शिवलिंगोपासना ग्रंथांत अप्रस्तुत आहे, असें मी ठरविलें. असो. आतां पुढील प्रकरणांत शिवलिंगोपासनेचा आरंभ विचार करूं.

उपासनेला दृढ चालवावें। भूदेवसंतांसि सदा नमावें।
सत्कर्मयोगें वय घालवावें। सर्वांमुखीं मंगल बोलवावें॥

---

## प्रकरण ६ वें

# शिवलिंगोपासना

लिङ्गरूपाय लिङ्गाय लिङ्गानां पतये नमः ।
अलिंगो लिंगमूलं तु अव्यक्तं लिंगमुच्यते ॥
आलिंगः शिव इत्युक्तः ॥

लिंगं शैवमिति स्मृतम् ॥ — लिंगपुराण

ब्रह्मादिस्थावरं यत् सर्वं लिङ्गे प्रतिष्ठितम्
तस्मात्सर्वप्रयत्नेन स्थापयेल्लिङ्गमैश्वरम् ॥ — स्कंदपुराण

सच्चिदानंद निर्गुण । जगीं असे नामरूपाधिष्ठान । हें उत्तम शिवलिंगाचें स्थापन । ज्ञानियाविण नव्हे ॥ २५ ॥ सर्व ब्रह्मांड हें शिवलिंग पवित्र । वेद गाताती शिवाचें चरित्र । हा मध्यम स्थापनेचा प्रकार । स्तवनांसी योग्य ॥ २६ ॥ कनिष्ठ हे कायिक सेवेसी । लिंग प्रतिष्ठा प्रतिमा पुजेसी । एवं हे त्रिविध प्रकारेंशीं । रामें शिवलिंग स्थापिलें ॥ २७ ॥ —वेदेश्वरी अ० ४.

पांचवी भक्तीतें अर्चन । अर्चन म्हणजे देवार्चन । शास्त्रोक्त पूजा विधान । केलें पाहिजे ॥ २ ॥ सिळासताकित नवांकित । शालग्राम शकलें चक्रांकित । लिंगें सूर्यकांत सोमकांत । बाण तांदळे नर्मदे ॥ ६ ॥ हरिहरांच्या मूर्ती । भगवंत जगदात्मा जगदीशमूर्ती । शिवशक्तीच्या बहुधा मूर्ती । देवार्चनीं पूजाव्या ॥ १२ ॥ —दासबोध ४–५.

शिवशक्ति या प्रकरणाप्रमाणें मागच्या प्रकरणांत उपासनेसंबंधीं स्थूल व सूक्ष्म व म्हणून सुबोध व थोडा दुर्बोध असा उभयविध विचार केला. कारण तीं आरंभींचीं प्रकरणें एक प्रकारें बीजभूत होतीं. आतां यापुढें स्थूलावरून सूक्ष्म, ज्ञातावरून अज्ञात, व्यक्तावरून अव्यक्त, असा अखेरपर्यंत विचार करण्याकरितां प्रथम शिवलिंगोपासना सांगणार आहे. " सगुणाचेनि आधारें । निर्गुण पाविजे निर्धारें ॥ " असा श्रीसमर्थांचा दंडक आहे. जोंवर व्यावहारिक सत्तेतील देहगेहादि सत्यवत् प्रतीत होत आहेत, तोंवर

निर्गुणनिराकारोपासकांनींहि सारीं भूत-भौतिकें, पूजाविधिविधानें, ईश्वराच्या विभूति, प्रतीक-प्रतिमा यांच्या ठिकाणीं सत्यत्वबुद्धि व आस्था बाळगणें योग्यच आहे. श्रीसमर्थ रामदास म्हणतात: "करणें लागे भोजन। करणें लागे उदकप्राशन। मळमूत्रत्यागलक्षण। तेंहि सुटेना ॥ १६ ॥ ज्ञानविवेकें मिथ्या जालें। परतु अवघें नाहीं टाकिलें। तरी मग भजनेंचि काय केलें। सांग पापा ॥ १८ ॥ ज्ञानबळें उपासना। आम्ही भक्त जरी मानू ना। तरी या दोषाच्या पतना। पावों अभक्तपणें ॥ ४० ॥ देहास लागली उपासना। आपण विवेकें उरेना। ऐसी स्थिती सज्जना। अंतरींची ॥ ४२ ॥ –दा. बो ६–७; नाहीं उपासनेचा आधार। तो परमार्थ निराधार। कर्मेंविण अनाचार। भ्रष्ट होती ॥ ५१ ॥" –दा. बो. ५।२. परमार्थमार्गांत कर्म, उपासना आणि ज्ञान असा साधनांचा, व्यक्त आणि अव्यक्त असा विषयांचा व स्थूल आणि सूक्ष्म असा विचारांचा अनुक्रम आहे.

शिवलिंगोपासना यांत या सर्वांचा अंतर्भाव होतो. श्रीसमर्थ म्हणतात, "उपासनेचा मोठा आश्रयो। उपासनेविण निराश्रयो। उदंड केलें तरी तो जयो। प्राप्त नाहीं ॥ २९ ॥ समर्थाची नाहीं पाठी। तयास भलताच कुटी। याकारणें उठाउठीं। भजन करावें ॥ ३० ॥ भजन साधन अभ्यास। येणें पाविजे परलोकास। दास म्हणे हा विश्वास। धरिला पाहिजे ॥ ३१ ॥" –दा. बो. १६।१०. पुढें शिवशक्ति निरूपणांत श्रीसमर्थ म्हणतात कीं, "देवा येवढें चपळ नाहीं। ब्रह्माएवढें निश्चळ नाहीं। पाइरीनें पाइरी चढोन पाहीं। मूळपरियंत ॥" –दा. बो. २०।४।३०.

याप्रमाणें पायरीपायरीनें हा परमार्थाचा सोपान मार्ग चढून जावयाचें म्हणजे त्यास आरंभ सामान्यतः मूर्तिपूजादि कर्मापासूनच होतो. "ईशावास्य-मिदं सर्वम्" याचा अभ्यास पाषाणलिंगांत ईश्वर पाहण्यापासूनच करतात. देहबुद्धिप्रधान कर्ममार्गांतून सगुणोपासकाचें मन उपासनाप्रांतात जेथवर धांव घेईल, तेथें अगोदरच शिवशक्तिरूप उपास्याचें दिव्य शिवलिंग असतेंच. श्रीसमर्थ आपला उपासनेसंबंधीं अनुभव सांगतात कीं, "उपासना शोधून पाहिली। तों ते विश्व व्यापिली जाली। न कळे लीळा परीक्षिली। न वचे कोणा ॥ २६ ॥ उपासना सकळां ठाईं। आत्माराम कोठें नाहीं। या कारणें ठाईं ठाईं। देवें आटोपिलें ॥ २८ ॥" –दा. बो. १५।९.

या प्रकरणाच्या मथळ्यावरील श्लोकांत स्कंदपुराण म्हणतें कीं, जो लिंगरूप आहे, लिंग म्हणजे कारण, जो कारणांचाहि अधिपति आहे, त्यास नमस्कार असो. हें आकाशरूप ब्रह्मलिंग आहे व पृथ्वीरूपिणी जगदंबा त्याची पीठिका आहे. तें सर्व देवतांचें निवासस्थान असून सर्व भूतांचें लयस्थान असल्यामुळें त्यास लिंग म्हणतात. ब्रह्मादि सर्व चेराचर शिवलिंगाच्या ठिकाणीं प्रतिष्ठित आहेत. यास्तव सर्व प्रयत्नानें बाहेर आणि हृदयांत शिवलिंगाची स्थापना करावी. लिंगपुराणांतहि असेंच वचन आहे. आतां सर्व भूतांचें लयस्थान वस्तुतः प्रकृतीच आहे, आणि म्हणून लिंग म्हणजे प्रधान अथवा प्रकृति असें लिंगपुराणांत म्हटलेलें आढळतें. निर्गुण पुरुषाच्या अथवा परमशिवाच्या ठिकाणीं व्याप्यव्यापक भाव संभवत नाहीं. पण तो भाव प्रकृतिरूपांत अनुस्यूत आहे. प्रकृतीनें आपल्या पोटांत जणूं तिरोहित केलेलें हें शिवतत्त्व उपासकांच्या नजरेस आणण्यासाठीं, काळूच्या बीजाप्रमाणें तें आंतील अनुस्यूत तत्त्व जणूं बाहेर अतीत रूपांतहि निर्दिष्ट करण्याची स्थूल योजना अथवा संकेत ज्या प्रतीकांत दिसतो, त्याला आपण सोपाधिक शिवलिंग म्हणतों. ज्याप्रमाणें शक्तिपीठांत शक्तिप्रतीकाचें किंवा प्रतिमेचें प्राधान्य असतें, त्याप्रमाणें शिवलिंगांत शिवप्रतीकाचें प्राधान्य मानतात. ज्याप्रमाणें शाक्त उपासक कालीची मूर्ति जणूं शवरूप (निश्चेष्ट) शिवदेहावर उभी दाखवितात, त्याप्रमाणें शैव उपासक शक्तीच्या साळुंकेवर शिवपिंडी उभी दाखवितात. कित्येक बाणलिंगांत तर शक्तिपीठ व्यक्त नसून त्या शिवलिंगांत तें अव्यक्तच मानावें लागतें.

येथें एक मुद्दा स्पष्ट लक्षांत घेतला पाहिजे तो असा कीं, आपण बाण अगर पिंडी तो शिव व साळुंका ती शक्ति, असें प्रतीकदृष्ट्या म्हणतों, पण वस्तुतः बाण आणि पिंडी हीं नामरूपें शक्तीचींच आहेत. शिवाला नामरूपच नाहीं. पण नाटकांतील पुरुष नट ज्याप्रमाणें स्त्रियांचें व पुरुषांचेंहि सोंगच घेतात, अथवा ज्याप्रमाणें कापडावर काढलेल्या रंगीत तैलचित्रांतील वस्त्र धारण करणारी व्यक्ति व तिचें वस्त्र हीं दोन्ही चित्रेंच असतात ; म्हणजे

१ लिङ्गवेदी महादेवी लिङ्गं साक्षान्महेश्वरः । तयोः संपूजनान्नित्यं देवी देवश्च पूजितौ । लयनाल्लिंगमित्युक्तं तत्रैव निखिलं सुराः ॥

१ लिंगपुराण-पूर्वार्ध, अ. ३.

नाटकांतलें पुरुषाचें सोंग त्या पुरुषाहून वेगळेंच असतें व कापडावरील कापडाचें रंगीत चित्र हें वस्तुतः तें कापड नसतें, त्याप्रमाणे शिवलिंगांतील पिंडी अगर बाण हें शिवाचें प्रतीक अगर सोंग आहे. बाण, पिंडी हें केवळ नामरूप म्हणजे शिव नव्हे. एकाच महासामान्य निर्गुणनिराकार शिव या अधिष्ठानावर शिवप्रतीक बाण व शक्तिप्रतीक साळुंका हा नामरूपाचा भेद उपासकाच्या समजुतीकरितां दाखविला जातो. तत्त्वतः अव्यक्त अरूप असें एक शिवाधिष्ठान मात्र सत्य आहे. बाकीचीं बाण, पिंडी, साळुंका इत्यादि सारीं नामरूपें हीं अध्यारोपित आहेत. अथवा शक्तीच्या दृष्टीनें सांगावयाचें तर ज्याप्रमाणें एखाद्या स्त्रीनाटकसमाजांत कांहीं स्त्रियाच पुरुषाची भूमिका दाखवितात, त्याप्रमाणें शक्तीच ( म्हणजे नामरूपात्मक प्रकृतीच ) साकार शिवरूप किंवा शिवलिंगरूप धारण करते. दुसरा दृष्टांत द्यावयाचा तर वेरूळच्या लेण्यांत ज्याप्रमाणें एकाच डोंगरांत शिव-पार्वती, नंदी-भृंगी इत्यादि मूर्ति कोरून दाखविलेल्या असतात, पण वस्तुतः सारा एकच अखंड पाषाण असतो, त्याप्रमाणें तत्त्वतः उपासना हा अध्यारोपरूप विषय आहे. यास्तव यांतील शिवलिंग, शक्तिपीठ इत्यादि भेद उपासनादि व्यवहारापुरतेच सत्य मानावयाचे आहेत. हा तत्त्वविवेक ध्यानीं ठेवून पुढील ग्रंथ वाचावा.

शक्तिपीठें जशीं पिंडांत असतात व बाहेर ब्रह्मांडांतहि असतात, त्याप्रमाणें शिवलिंगेंहि अंतर्बाह्य आहेत. आपल्या पिंडांत ( १ ) ( गुदद्वाराजवळ ) मूलाधार चक्राशीं स्वयंभूलिंग, ( २ ) स्वाधिष्ठान चक्राजवळ ( ओटीपोटाजवळ ) परमलिंग, ( ३ ) अनाहत चक्राजवळ ( हृदयाजवळ ) बाणलिंग, ( ४ ) आज्ञाचक्राशीं ( भ्रूमध्य ) इतर किंवा पाताळ लिंग, अशीं अध्यात्म लिंगें मानलीं आहेत. तसेंच ( ५ ) सहस्रार चक्राजवळ ( मस्तकांत ) परमशिवाचें स्थान मानलें आहे.'

वर above head

( १ ) याशिवाय "श्रीपर्वत शिरस्थाने केदारन्तु ललाटके। वाराणसी महाप्राज्ञ भ्रुवोर्घ्राणस्यमध्यमे ॥" इत्यादि प्रकारें पिण्डांतर्गत विविध शिवलिंगांची भावना जाबालदर्शनोपनिषदांत व अन्यत्रहि केलेली आढळते. (Parmanent History of Bharat Varsha, Vol. I. p.234 et sequa ) शिवाय षट्चक्रनिरूपण पहा.

व्यासशिष्य सूतशौनकादि ऋषींना सांगतात की,, वस्तुतः सर्व ब्रह्मांड (सशक्तिक) शिवलिंगरूप आहे. सारी भूमि व जगत् शिवलिंगमय आहे. फार काय दर्शन, वर्णन, स्मरणाचा सारा विषय शिवशक्तिमय आहे. देवासुर मानवाकडून शंभु सर्वत्र पूजला जात आहे. लोकांवर अनुग्रह करण्याकरितां लिंगरूपांनीं क्षेत्राक्षेत्राचे ठिकाणीं तेच विभु अथवा अनंत सशक्तिक शिव प्रगट झाले आहेत. शिवलिंगपूजा ही अनादि आहे व सार्वत्रिक आहे, असें पाश्चात्य संशोधकांनींहि शोधाअंतीं ठरविलें आहे.[1] आपल्या प्राचीन ग्रंथांवरून ती अनादि म्हणजे सृष्ट्युत्पत्तीबरोबरच सुरू झाली असल्याचें दिसतें. हें दुष्ट संसारचक्र जसें अनादि आहे तसेंच त्या चक्राच्या पाशांतून मुक्त करणाऱ्या पशुपति शिवाची उपासना पण अनादीच आहे.[2] जेथें जेथें शिवभक्तांनीं स्मरण केलें, तेथें तेथें लिंगरूपांत (सगुण) शिव राहिले आहेत. याप्रमाणें शिवभक्तांनीं स्थापित केलेल्या शिवलिंगाची संख्या असंख्य आहे.[3] त्यापैकीं ज्यांचीं वर्णनें स्कंद, शिव इत्यादि शैव पुराणांत स्थलमहात्म्यासह

१ It can scarcely be questioned, theorise as writers may, that the origin of this ( Linga ) worship is lost in antiquity ( Phallic Miscellany, p. 4. Phallicism, p. 4. ). *With the fourth race a form of worship began, which ages later was doomed to regenerate into phallicism and sexual worship.* (Secret Doctrines, Vol. III, pp. 281-86).

२ म. भारत, सौप्तिक पर्व, अ. १७ लिं. पु. पू. १।१७. शिवपुराण, धर्म सं. अ. ४९.

३ Cultural Heritage of India, Vol. II, p. 18.

४ सर्वेषां शिवलिंगानां मुने संख्या न विद्यते। सर्वलिंगमयी भूमिः सर्वलिंगमयं जगत् ॥९॥ यत्किंचित् दृश्यते दृश्यं वर्ण्यते स्मर्यते च यत्। तत्सर्वं शिवरूपं हि नान्यदस्तीति किंचन ॥ ११ ॥ पाताले चापि वर्तन्ते स्वर्गेचापि तथा भुवि। सर्वत्र पूज्यते शम्भुः स देवासुरमानुषैः ॥ १३ ॥ यत्र यत्र यदा शंभुर्भक्त्या भक्तैश्च संस्मृतः, तत्रतत्रावतीर्याथ कार्यं कृत्वा स्थितस्तदा ॥१६॥ लोकानामुपकारार्थं स्वलिंग चाप्यकल्पयत्। तल्लिंग पूजयित्वा तु सिद्धिं समधिगच्छत ॥ १७ ॥ -शिवमहापुराण को. रु. सं. अ. १.

सविस्तर दिलीं आहेत, त्या सर्वांचा नुसता उल्लेखहि या ग्रंथांत करता येणें शक्य नाहीं. तथापि शिवलिंगांपैकीं मुख्य मुख्य जे प्रकार आहेत, त्यांची अगदीं त्रोटक माहिती या प्रकरणांत देत आहें.

(१) ज्योतिर्लिंगें:—यांच्या मूळ स्वरूपासंबंधीं व उत्पत्तीसंबंधीं निरनिराळ्या दिव्य किंवा प्राकृत कल्पना व आख्यायिका रूढ आहेत. उदाहरणार्थ, कोठें कोठें ज्योतिर्लिंग म्हणजे व्यापक ब्रह्मात्मलिंग किंवा व्यापक प्रकाश असा अर्थ करतात. महेश्वराच्या मायासंज्ञक शक्तीच्या योगानें प्राप्त झालेल्या कांहीं एका अत्यंत अद्भुत विशेषरूपानें तेजस्वरूपांत प्रादुर्भूत झालेलें ज्योतिर्लिंग केनोपनिषदांत वर्णिलें आहे[१]. कोठें बारा ज्योतिर्लिंगें म्हणजे शिवलिंगाचे बारा खंड आहेत असें सांगतात. कोठें असें सांगितलें जातें कीं, मागें विष्णूच्या मोहिनीरूपाला भुलून शिव तिचे मागें लागले व मोहिनी दूर जाऊं लागली, तेव्हां कामासक्त होऊन तिचा पाठलाग करीत जाणाऱ्या शिवाचें रेत जेथें जेथें स्खलन पावलें, तेथें तेथें ज्योतिर्लिंगें निर्माण झालीं[२]. कोठें अशी कल्पना आढळते कीं, ज्योतिर्लिंगें हीं ज्वालामुखी पर्वताचे उद्रेक आहेत. कोणी अशी कल्पना करतात कीं, "गतिर्भर्ता प्रभुः साक्षी निवासः शरणं सुहृत्। प्रभवः प्रलयः स्थानं निधानं बीजमव्ययम्॥" गीता९।१८. हे ईश्वराव्ययाचे बारा विवर्त आहेत, त्यांसहि बारा ज्योतिर्लिंगें म्हणतां येईल. आणखी कोणाची कल्पना अशी आहे कीं, संवत्सर हा सर्वाधार स्कंभ आहे[४]. त्या संवत्सराचे बारा महिन्यांचे द्वादशादित्य म्हणजे बारा ज्योतिर्लिंगेंच होत[५]. याशिवाय (१) ब्रह्म, (२) माया, (३) जीव, (४) मन, (५) बुद्धि, (६) चित्त, (७) अहंकार, (८) आकाश, (९) वायु, (१०) अग्नि, (११) जल

---

१ केनोपनिषत् खंड ३, १, २ (१४।१५) शांकरभाष्य पहा. "ब्रह्मेति परो लिङ्गात्", "महेश्वरशक्तिमायोपात्तेनात्यन्ताद्भुतेन प्रादुर्भूतं किल केनचिद्रूप विशेषेण" इ०

२ गुजराथी श्री. शिवलहरी पृ. २२ पहा.

३ गोविंद हरि फडके यांचें माझी तीर्थयात्रा, भाग ४ पृ. ४००.

४ स्कम्भे सर्वं प्रतिष्ठितम्॥– अथर्व संहिता १०।४।७।२०.

५ संवत्सरस्य प्रतिमा वै द्वादशः॥– तैत्तिरीय १।१।६।७.

व (१२) पृथ्वी, यांसहि तैत्तिरीयांत बारा ज्योतिर्लिंगेंच म्हटलें आहे. शिवपुराणातहि अशीं ज्योतिस्वरूप बारा तत्त्वें मानली आहेत. हीं भिन्न भिन्न दृष्टींचीं बारा बारा ज्योतिर्लिंगें सोडून शिवमहापुराणातें भरतखंडांतील जीं लोकप्रसिद्ध बारा ज्योतिर्लिंगें सांगितलीं आहेत तीं अशीं:—(१) श्रीसोमनाथ (काठेवाड), (२) श्रीमल्लिकार्जुन (श्रीशैल पर्वत), (३) श्रीमहाकाल (उज्जयिनी), (४) श्रीओंकारेश्वर अथवा अमरेश्वर (नर्मदातटीं माधाता पर्वत), (५) श्रीकेदारनाथ (हिमालय पर्वत), (६) भीमाशंकर (भीमातट सह्य पर्वत), (७) श्रीविश्वेश्वर (बनारस), (८) श्रीत्र्यंबकेश्वर (ब्रह्मगिरी व गोदावरीजवळ) (९) वैद्यनाथ (संथाल परगणा), (१०) नागेश्वर (द्वारकेजवळ), (११) सेतुबन्ध रामेश्वर (दक्षिण हिंदी महासागराचे किनाऱ्याजवळ), (१२) घृष्णेश्वर (निजामच्या राज्यांत वेरुळजवळ), यांचें माहात्म्य शिवपुराणांत असें वर्णिलें आहे:—"द्वादशैतानि नामानि प्रातरुत्थाय यः पठेत्॥ सप्तजन्म कृतं पापं स्मरणेन विनश्यति॥ यं यं काममपेक्ष्यैव पठिष्यन्ति नरोत्तमाः। तस्य तस्य फलप्राप्तिर्भविष्यति न संशयः। एतेषां दर्शनादेव पातकं नैव तिष्ठति। कर्मक्षयो भवेत्तस्य यस्य तुष्टो महेश्वरः॥" शि. पु. ज्ञा. सं. अ. ३८. ह्या बारा ज्योतिर्लिंगांच्या आख्यायिका संक्षेपानें बहुधा कल्याण शिवांकाच्या आधारें पुढें देत आहें यासंबंधीं तात्त्विक विचार पुढें स्थलावकाशानुरूप मी करणार आहें.

(१) **श्रीसोमनाथ**—दक्षानें (चंद्राचें परिभ्रमण वृत्त) आपल्या सत्तावीस कन्या (नक्षत्रें) चंद्राला दिल्या. त्यापैकीं रोहिणीवरच तो विशेष प्रीति करी, म्हणून इतर कन्या कष्टी झाल्या. त्यामुळें दक्षानें चंद्राला शाप दिला कीं, तूं क्षयी होशील त्याप्रमाणें त्याला क्षय लागला (लाक्षणिक). म्हणून तो प्रभास (सूर्याचा प्रकाश) तीर्थावर मृत्युंजय शिवाची उपासना करीत राहिला, तेव्हां सूर्यरूप शंकर प्रसन्न झाले. (त्यांनीं त्याला शिरीं

३ ज्ञानसंहिता, अध्याय ३८, ८२ इत्यादि. व्यंकटेशप्रत कोटिरुद्र सं. अ. १.

४ दुसरें स्थान आसाम प्रांतात आहे

५ निजाम हैदराबाद राज्यांतील परळी वैद्यनाथ हें दुसरें.

६ या नांवाचीं आणखी २ स्थानें निजाम हैदराबाद व अलमोड्याजवळ आहेत.

धारण केलें.) त्याचा क्षय गेला. (तो पुन्हां कलासंपन्न झाला.) तेव्हां चंद्रादि देवतांच्या आग्रहास्तव श्री शिव ज्योतिर्लिंगरूपानें प्रभास क्षेत्रीं कायमचे राहिले. तेंच सोमनाथ ज्योतिर्लिंग होय. येथेंच श्रीकृष्णचंद्राचा, जरा नामक व्याधाचा बाण लागण्याचें निमित्त होऊन अस्त झाला. या कथा लाक्षणिक आहेत. मुसलमान राजांनीं इ. स. १०२४, १२९७, १३९५ व १४१३ याप्रमाणें चार वेळां या शिवलिंगाचा विध्वंस केला. त्याचा अखेरचा जीर्णोद्धार स्वराज्यप्राप्तीनंतर सन १९५१ सालीं ११ मे रोजीं झाला. त्या वेळीं तें मंदिर सर्व धर्मियांना खुलें करण्यांत आलें आहे.

(२) **श्रीमल्लिकार्जुन**—याची एक कथा पूर्वी दुसऱ्या प्रकरणांत दिलीच आहे. याच ठिकाणीं कार्तिकेय आपल्या आईबापावर रुसून येऊन राहिले होते. म्हणून याच क्रौंच पर्वतावर त्यांच्या समजुतीकरितां श्रीशिव पार्वतीसह ज्योतिर्लिंगरूपानें राहिले.

(३) **श्रीमहाकालेश्वर**—उज्जयिनी नगरींत चंद्रसेन नामक एक परमशिवभक्त राजा राज्य करीत होता. राजा तशी प्रजा या न्यायानें त्या नगरांतील एका गरीब गवळ्याच्या पांच वर्षांच्या श्रीकर या नांवाच्या मुलाला बाळपणापासूनच शिवपूजेचा छंद लागला होता. तो एका ओसाड कुईटारू झोपडींत खापऱ्या-दगडाचेंच शिवलिंग तयार करी. त्यावर दगड-मातीचे पूजोपचार शुद्ध बाळभावानें समर्पण करी व ध्यानमग्न होई. श्रीधरस्वामी म्हणतातः "आर्द्र तृण पुष्प सुवासीन। तेंचि वाहे आवडी करून। नाहीं ठाऊके मंत्र ध्यान आसन। प्रेमभावें पूजीतसे ॥६०॥ परिमल द्रव्यें कैंची जवळीं। शिवावरी मृत्तिकाच उधळीं। मृत्तिकाच घेऊनी कर कमळीं। पुष्पांजली समर्पित ॥६१॥" त्याच्या शुद्ध बालभावाच्या ध्यानधारणेंत त्याचें देहमान सुटे व तो समाधिमग्न होई. एकदां असा तो त्या गवताच्या झोपडींत ध्यानमग्न झाला असतां त्याची आई त्यास जेवण्यास बोलावण्यास आली. पण त्या वेळीं त्या बालभक्ताचें मन शिवमय झालें होतें. तें परत देहमानावर येईना. तेव्हां त्याच्या आईनें त्याला छांदिष्ट मानून व त्याची शिवपूजा लुटुपुटीची समजून ती रागारागानें उधळून टाकली. कित्येक आधुनिक मूर्तिपूजाविरोधक पंथांनीं आपल्या पढतमूर्खपणाच्या भ्रांत बुद्धीनें अव्वल इंग्रजींत असाच मूर्तिभंजक अत्याचार केला. पण सनातनी भाविकांनीं

आपली मूर्तिपूजा सोडली नाहीं. त्याचप्रमाणें त्या बालभक्तानें शिवपूजा सोडली नाहीं. पण त्या वेळीं आईनें आपली शिवपूजा मोडली हें पाहून तो रडूं लागला. त्याला आपली पूजा भंगलेली दाहावेना. त्यानें डोळे मिटले व त्याच्या बालभावानें,जगाचे जे आईबाप त्यांच्याकडे आपलें गाऱ्हाणें नेलें. शिव कांहीं दूर नव्हते. त्याची ती अत्युत्कट भक्ति पाहून ते प्रसन्न झाले व त्याच्या मानसपूजेंत अद्भुत चमत्कार घडून आला. "तृणगृह होतें जें जर्जर। झालें रत्नखचित शिवमंदिर। हिऱ्यांचे स्तंभ वरी शिखर। नाना रत्नांचे कळस झळकती॥७०॥" याप्रमाणें शिवसमाधि पावलेल्या श्रीकराच्या बालभावात लगेच सिद्धसंकल्पशक्ति आली. "नेत्र उघडोनी बाळ पहात। तंव राजोपचार पूजा दिसत। सिद्ध करोनी ठेविली समस्त। बाळ नाचतें ब्रह्मानंदें॥ ८२॥" हा शुद्ध शिवभक्तीचा महिमा पाहून शिवभक्त चंद्रसेन राजा आनंदाश्चर्यानें थक्क झाला. त्यानें तेथें शिवमंदिर बांधलें. तेंच श्रीमहाकालेश्वर ज्योतिर्लिंग होय. याच श्रीकराच्या असामान्य पुण्याईनें त्याच्या आठव्या पिढींत श्रीकृष्ण जन्मास आले. याच ठिकाणीं एक शिवभक्त अग्निहोत्री राहात होता. त्याचा दूषण नामक एका मदान्ध मूर्तिभंजक असुरानें छळ केला. तेव्हां तेथें भूतभावन भगवान् प्रगट होऊन त्यांनीं आपल्या हुंकारानें त्याचा नाश केला; अशी पण कथा आहे. सत्तेनें उन्मत्त होणाऱ्या पाखंडी नास्तिकांनीं यापासून योग्य तो बोध घ्यावा.

(४) **श्रीओंकारेश्वर व श्रीअमलेश्वर**—सुप्रसिद्ध भक्त अंबरीष व मुचुकुन्द यांचा पिता मान्धाता यानें येथें घोर तपश्चर्या करून शिवाला प्रसन्न करून घेतलें. "शिवोभूत्वा शिवं यजेत्।" असा त्याला अधिकार प्राप्त झाला होता. छांदोग्यांत सनत्कुमारांनीं नारदास अहंकारादेश किंवा आत्मादेश सांगितले आहेत (७।२५). त्याप्रमाणें तो आत्मा शिवरूप मानून स्वस्वरूपीं ध्यानमग्न होई, म्हणून त्यास 'माम् धाता' म्हणजे मांधाता हें नांव पडलें. याचा पिता युवनाश्व यानें पुत्रप्राप्तीकरतां मंत्रसिद्ध केलेलें जल आपणच चुकीनें प्राशन केल्यामुळें त्याच्या पोटीं हा जन्मास आला. तेव्हां हा क्षुधेनें व्याकुळ झाला असतां इंद्रानें 'माम् धास्यति' असें म्हणून त्यास आपली तर्जनी चोखण्यास दिली, अशी लाक्षणिक कथा आहे. इंद्र आणि शिव एकच. इंद्राची तर्जनी (प्रदेशिनी) येथें ब्रह्मात्मदर्शक समजावी. कौषितकी ब्राह्मणांत "प्राणोऽस्मि

प्रज्ञात्मा तम् माम् आयुर अमृतम् इत्युपास्व।" असा इंद्राचा आदेश आहे (महाभारत, वनपर्व अ १२६) विन्ध्य पर्वतानें शिवाच्या पार्थिवलिंगार्चनासहित येथें तपश्चर्या केली या दोन्ही कारणास्तव येथें शिव ओंकाररूप व पार्थिव लिंगरूप प्रगट झाले तींच हीं दोन ज्योतिर्लिंगें होत ओंकार लिंग घडीव नाहीं त्याच्या जलहारीचा सबध खालीं नर्मदेपर्यंत जाऊन पोहोंचतो

(५) **श्रीकेदारनाथ**—येथेंहि घडीव शिवलिंग नाहीं एक अनघड उचवटा आहे ही नर नारायण ऋषींची प्रसिद्ध तपोभूमि आहे "दृष्ट्वारूप नरस्यैव तथा नारायणस्य च। केदारेश्वर नाम्नस्य मुक्तिभागी न सशय ॥" असें केदारखडात या स्थानाचें माहात्म्य सांगितलें आहे येथें भक्तांन साक्षात् जलसमाधि घेण्याची भृगुपतन नामक प्रथा पूर्वी असे सन १८२९ साली ती तेथील धर्मसुधारकाच्या विनतीवरून इग्रज सरकारनें बद केली

(६) **श्रीभीमाशंकर**—शकरानें त्रिपुरासुराला मारल्यावर या स्थानीं विश्राति घेतली त्या वेळीं येथें एक भीमक नामक सूर्यवशी राजा तपश्चर्या करीत होता त्यावर प्रसन्न होऊन शिवानें त्यास दर्शन दिलें तेव्हापासून भीमाशकर या नावाचें हें ज्योतिर्लिंग प्रसिद्ध आहे

दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, आसाम प्रातात कामरूप जिल्ह्यात कामरूपेश्वर नामक एक प्रतापी शिवभक्त राजा राहात होता त्याचा भीम नामक एका महाराक्षसानें फार छळ केला तेव्हा शकर प्रगट होऊन त्यानीं त्याचा नाश केला तेव्हा देवऋषींच्या प्रार्थनेवरून तेथें पार्थिव लिंगात शिव कायमचे राहिले तेव्हापासून हें ज्योतिर्लिंग प्रसिद्ध झालें

(७) **श्रीविश्वेश्वर**—श्रीक्षेत्रकाशी ही पुण्यभूमि प्रलयकाळातहि लोप पावत नाहीं, असे तिचें माहात्म्य सागतात ही आदि सृष्टिस्थली आहे, असें मानतात येथें श्रीविष्णु, अगस्ति, श्रीवसिष्ठ, विश्वामित्र, इत्यादि थोर पुरुषानीं शिवाची अर्चा केली येथील शिवलिंगाची स्थापना आद्य शकराचार्यांनीं केली होती पण औरगजेबानें तें देऊळ उध्वस्त करून तेथें एक मशीद बाधली ती अद्यापि तेथें आहे हल्लींचें देऊळ पूर्वीच्या देवळाच्या जागेशेजारीं श्रीअहिल्यादेवी होळकर हिन बाधलें आहे

(८) श्रीत्र्यंबकेश्वर— गौतमऋषींच्या घोर तपश्चर्येवर प्रसन्न होऊन भगवान् शंकरांनीं या स्थानीं वास केला आहे. व त्यांच्याच तपश्चर्येमुळें श्रीगंगा गोदावरीरूपानें येथें अवतीर्ण झाली आहे. येथें शिवलिंगाची पिंडी नाहीं. उलट लहानसा खळगा आहे व त्यांत बारीक तीन लिंगें आहेत. तीं ब्रह्मा-विष्णु-महेशांचीं प्रतीकें असल्याचें मानतात.

(९) श्रीवैद्यनाथ—हिमालयावर रावणानें घोर तपश्चर्या करून शिवाला प्रसन्न केलें व त्याच्याकडून लंकेंत स्थापन करण्याकरितां लिंग मागून घेतलें. तें लंकेंत नेत असतां (संथाळ परगण्यांत जैसीडीह स्टेशनाजवळ) तेथील चिताभूमीवर त्यास लघुशंकेसाठीं उतरावें लागलें, तेव्हां एका अहीराजवळ त्यानें तें लिंग तात्पुरतें दिलें. पण कर्मधर्मसंयोगानें त्याची लघुशंका फार लांबली! तेव्हां त्या अहीरानें तें जमिनीवर ठेवलें. तें तेथें कायमचेंच राहिलें. रावणास मागाहून तें उपटून नेतांच येईना. तेंच हें ज्योतिर्लिंग होय.

दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, दक्षमख विध्वंसनानंतर सतीचें शव खांद्यावर घेऊन शंकर उन्मत्तासारखे इकडे तिकडे फिरूं लागले, तेव्हा त्या शवाचा हृत्पिंड येथें पडला व त्याचा दहनसंस्कार येथें झाला. म्हणून तिला चिताभूमि हें नांव पडलें असावें.

(१०) श्रीनागेश्वर—एक सुप्रिय नामक वैश्य मोठा शिवभक्त होता. त्याचा दारुक नामक राक्षसानें छळ करून त्यास कारागृहांत टाकलें. तेथें शिवानें त्यास दर्शन देऊन राक्षसाचा विध्वंस केला. तेव्हांपासून तेथें हें ज्योतिर्लिंग प्रसिद्धीस आलें.

(११) श्रीरामेश्वर—हें शिवलिंग प्रभु रामचंद्रानें लंकेंत जाण्यापूर्वी शिवाचा आशीर्वाद मिळावा म्हणून स्थापन केलें. दुसरी आख्यायिका अशी आहे की, रावणाच्या कुळाचा नाश करून राम परत आले, तेव्हां आपल्या हातून झालेल्या ब्रह्महत्येच्या पापक्षालनार्थ त्यांनीं या शिवलिंगाची स्थापना केली. हें अगदीं समुद्रकांठीं असून याच्या मंदिराच्या आवारात असलेल्या २४ विहिरींचें पाणी गोड आहे. बाहेरच्या विहिरींचें खारें आहे.

---

१ शिवलीलामृताच्या तिसऱ्या अध्यायांत हा गणपति होता असें आहे.

नामरूपांच्या उपाधींतील वैषम्य व द्वैत आड म्हणजे प्रतिबंधक किंवा विघ्नकर होतां कामा नये. या दृढ ध्यानधारणेंत प्रथम उपासकाचें नामरूप व नंतर उपास्याचें नामरूप यांचा लोप होऊन एक अभेद भक्तीचा अखंड आनंदानुभव मात्र उरतो. सराफ ज्याप्रमाणें अलंकारांच्या कारागिरीकडे अथवा नामरूपांकडे पूर्ण दुर्लक्ष करून अधिष्ठानरूप सुवर्णाचा कस पाहतो, त्याचप्रमाणें उपास्यप्रतीकाच्या अधिष्ठानरूप सच्चिदानंदरूपावर उपासकाची सूक्ष्म दृष्टि खिळून उपासकाचें देहमान हरपणें व उभयतांचें शुद्ध स्वरूपांत ऐक्यरूप अपरोक्ष होणें, ही थोडी वेगळी ज्ञानप्रक्रियाहि वरील वचनांतील सद्भावाचा तत्त्वतः अर्थ असूं शकेल.

**अंतरंग उपासना:—** ही बहिरंग उपासनेपेक्षां पुष्कळ श्रेष्ठ मानली आहे. शिवलिंगोपासना ही बहिरंगच असली तरी अंतरंग उपासनेची ती एक अवश्य पायरी आहे. " न काष्ठे विद्यते देवो न पाषाणे न मृण्मये। भावे हि विद्यते देवो तस्माद्भावोहि कारणम्॥ " हा भाव म्हणजे आपणासकट सकळ-वस्तुमात्राचें शिवशक्ति हें वास्तविक तत्त्व सच्चिदानंदरूप आहे, असा प्रथम परोक्ष दृढभाव व नंतर त्याच भावाचा मननिदिध्यासनानें अपरोक्ष अनुभव, ही अंतरंग उपासना होय. पण हें बाह्याभ्यंतर ओतप्रोत असलेलें एकमेव सच्चिदानंदरूप अथवा अविनाभूत शिवशक्तिरूप जाणण्यासाठीं अगोदर बहिरंगोपासनेनें " मूर्तिध्यानें तन्मयस्थिति। ऐक्यत्वें राहे निश्चल वृत्ति॥ " हें साधलें पाहिजे. हें साधलें म्हणजे ध्याता व ध्येय यांस जोडणारें ध्यान हें दोघांतील विषय-विषयीभावाचें द्वैत व अंतर हळूहळू नाहींसें करतें, म्हणजे ध्याता जीव-अहंकाररूपानें अंतरायभूत न राहतां ध्याता व ध्येय या दोघांचें ऐक्य घडवून आणतें व आपण लीन होतें. म्हणजे ध्याता ध्येयरूपांत समरसता पावतो व मग ध्यानप्रक्रियेंतील द्वैत मावळतें. अशा रीतीनें ध्यात्याच्या ध्यान-विषयक अहंतेचा लोप होतांच तत्सापेक्ष ध्येयरूप सगुणध्यानहि लवकरच मावळतें. याप्रमाणें ध्यान, ध्याता व ध्येय ही त्रिपुटी मावळल्यावर शुद्ध निर्विशेष अखंडानंदरूप ज्ञान मात्र उरतें. तेंच ब्रह्मात्मैक्यरूप होय. व्यक्त व ज्ञात नामरूपांच्या मागें अव्यक्त व अज्ञात असलेल्या अथवा कार्यांत कारणरूपानें अथवा अधिष्ठानरूपानें असलेल्या सूक्ष्म तत्त्वाचें चिंतन, मनन व निजध्यासन ही प्रक्रिया अंतरंग उपासनेला उपकारक होते.

(८) श्रीत्र्यंबकेश्वर— गौतमऋषींच्या घोर तपश्चर्येवर प्रसन्न होऊन भगवान् शंकरांनीं या स्थानीं वास केला आहे. व त्यांच्याच तपश्चर्येमुळें श्रीगंगा गोदावरीरूपानें येथें अवतीर्ण झाली आहे. येथें शिवलिंगाची पिंडी नाहीं. उलट लहानसा खळगा आहे व त्यात बारीक तीन लिंगें आहेत. तीं ब्रह्मा-विष्णु-महेशाचीं प्रतीकें असल्याचें मानतात.

(९) श्रीवैद्यनाथ—हिमालयावर रावणानें घोर तपश्चर्या करून शिवाला प्रसन्न केलें व त्याच्याकडून लंकेंत स्थापन करण्याकरितां लिंग मागून घेतलें. तें लंकेंत नेत असतां (सथाळ परगण्यांत जैसीडीह स्टेशनाजवळ) तेथील चिताभूमीवर त्यास लघुशंकेसाठीं उतरावें लागलें, तेव्हां एका अहीराजवळ त्यानें तें लिंग तात्पुरतें दिलें. पण कर्मधर्मसंयोगानें त्याची लघुशंका फार लांबली! तेव्हा त्या अहीरानें तें जमिनीवर ठेवलें. तें तेथें कायमचेंच राहिलें. रावणास मागाहून तें उपटून नेतांच येईना. तेंच हें ज्योतिर्लिंग होय.

दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, दक्षमख विध्वंसनानंतर सतीचें शव खांद्यावर घेऊन शंकर उन्मत्तासारखे इकडे तिकडे फिरूं लागले, तेव्हां त्या शवाचा हृत्पिंड येथें पडला व त्याचा दहनसंस्कार येथें झाला. म्हणून तिला चिताभूमि हें नांव पडलें असावें.

(१०) श्रीनागेश्वर—एक सुप्रिय नामक वैश्य मोठा शिवभक्त होता. त्याचा दारुक नामक राक्षसानें छळ करून त्यास कारागृहांत टाकलें. तेथें शिवानें त्यास दर्शन देऊन राक्षसाचा विध्वंस केला. तेव्हांपासून तेथें हें ज्योतिर्लिंग प्रसिद्धीस आलें.

(११) श्रीरामेश्वर—हें शिवलिंग प्रभु रामचंद्रानें लंकेंत जाण्यापूर्वी शिवाचा आशीर्वाद मिळावा म्हणून स्थापन केलें. दुसरी आख्यायिका अशी आहे कीं, रावणाच्या कुळाचा नाश करून राम परत आले, तेव्हां आपल्या हातून झालेल्या ब्रह्महत्येच्या पापक्षालनार्थ त्यांनीं या शिवलिंगाची स्थापना केली. हें अगदीं समुद्रकांठीं असून याच्या मंदिराच्या आवारात असलेल्या २४ विहिरींचें पाणी गोड आहे. बाहेरच्या विहिरींचें खारें आहे.

---

१ शिवलीलामृताच्या तिसऱ्या अध्यायांत हा गणपति होता असें आहे.

(१२) श्रीघुष्मेश्वर—सुधर्मानामक ब्राह्मणाची घुष्मानामक एक साध्वी स्त्री शिवभक्त होती. घुष्माची वडील बहीण हीच तिची सवत होती. तिनें घुष्मेच्या मुलाची द्वेषानें हत्या करून त्याचें प्रेत येथील सरोवरांत टाकून दिलें. पण शिवकृपेनें तो संजीवित होऊन बाहेर आला. या तिच्या सवतीच्या पापाबद्दल शिवाकडून शासन व्हावें असें घुष्मेनें न मागतां उलट तिच्यासाठीं क्षमायाचनाच केली. ही तिची निर्वैर वृत्ति व परमशिवभक्ति पाहून शिव तिच्यावर प्रसन्न झाले व तिच्या प्रार्थनेवरून येथेंच ज्योतिर्लिंगरूपांत राहिले.

याशिवाय बंगाल प्रांतांत चट गांवाच्यानजीक सीताकुंड म्हणून एक उंच स्थान आहे. त्या ठिकाणीं श्रीचंद्रनाथ या नांवाचें एक ज्योतिर्लिंग गुप्त होतें. तें आतां कलियुगांत प्रगट झाल्याचें देवीपुराणाच्या चैत्रमाहात्म्यांत लिहिलें आहे. या सर्व ज्योतिर्लिंगांच्या माहात्म्याकडे सारांशरूपानें पाहिलें तर (१) प्राचीन ज्वालामुखी, (२) आरोग्यदायक हवापाणी, (३) श्रेष्ठ भक्ताची तपोभूमि, (४) नैसर्गिक सौंदर्य, (५) भक्तरक्षणार्थ असुरांचा वध, अशा यांच्या आख्यायिका आहेत. सर्व भरतखंडास आसेतुहिमाचल एका धर्मभावनेंत सुबद्ध करण्याकरतांहि हीं शिवस्थानें स्थापन झालीं असतील. शिवलिंगांच्या स्थानमाहात्म्याबद्दल स्कंद पुराणांतील माहेश्वर केदारखंडांत सांगितलें आहे कीं, गांवांतील शिवलिंगापेक्षां गांवाबाहेरील शिवलिंगाचें माहात्म्य शंभरपट अधिक आहे. त्यापेक्षां शंभरपट अरण्यातील शिवलिंगाचें, त्यापेक्षां शंभरपट पर्वतावरील शिवलिंगाचें, त्याहीपेक्षां तपोवनांतील शिवलिंगाचें दहा हजारपट माहात्म्य अधिक आहे. कांहीं असो; ईशनियतींतील मानवाच्या उत्कट भक्तिभावनेचा प्रभाव त्या ठिकाणीं स्पष्ट दृग्गोचर होतो. असख्य भक्तांच्या दृढ भक्तिभावना ज्या स्थळीं दीर्घकाळ सतत केन्द्रीभूत होत आल्या आहेत, त्या स्थलांचें पावनत्व व चुंबकत्व वाढत राहावें, हें नैसर्गिकच आहे. गाईचें दूध तिच्या साऱ्या शरीरांत अव्यक्त असलें तरी तें तिच्या सडांत मात्र उपलब्ध होतें. त्याप्रमाणेंच भूमातेवरील शिवलिंगपूजनांत भक्तीच्या गोरसाचा महल्लाभ होतो.

सर्व भूतमात्रीं ईश्वर भरून राहिला असला तरी विशेषेंकरून तुला मीं कोठें पाहावें ? या अर्जुनाच्या प्रश्नाला उत्तर म्हणून भगवंतानें आपला विभूतियोग सांगितला. त्याप्रमाणें सारें ब्रह्मांड शिवमय असलें, तरी त्या

व्यापकाची उपासना करणें फार कठिण पडतें; म्हणून शिवोपास्याचा हा एक विभूतिप्रकारच मानतां येईल. परंतु बारा ज्योतिर्लिंगांची यात्रा कांहीं सर्वांनाच घडत नाहीं. शिवाय नित्य अखंडित उपासना तेथें घडणें सर्वांस कसें शक्य होणार ? म्हणून शिवप्रतीकांची संख्या व विस्तार सहजच वाढत गेला. त्यांतील मुख्य प्रकार पुढें सांगतों.

(१) **स्वयंभू शिवलिंगें**—भक्तभावनेंत ज्योतिर्लिंगाच्या खालोखाल स्वयंभू शिवलिंगांचें माहात्म्य असतें. स्वयंभू लिंगाशिवाय इतर कृत्रिम लिंग, म्हणजे मुद्दाम घडविलेलीं स्थावर लिंगें व जंगम म्हणजे चल लिंगें, असे आणखी प्रकार आहेत. स्वयंभू लिंगांसंबधीं लौकिक समजुती निरनिराळ्या आढळतातः (१) तीं ज्वालामुखींच्या उद्रेकांचीं आपोआप बनतात. (२) योगधारणेंत ज्यांचें प्राणोत्क्रमण झालें असेल अशा योग्यांच्या शुष्क झालेल्या शवांचीं स्वयंभूलिंगें बनतात. (३) भूकंप, जलप्रलय, मूर्तिभंजकांचीं आक्रमणें अशा अस्मानी-सुलतानींत जीं प्राचीन शिवलिंगें भूमींत अगर जलाशयांत गडदलीं जातात, तीं पुढें दृष्टान्त होऊन किंवा सहज उपलब्ध झालीं असतां त्यांस स्वयंभू शिवलिंगांचें माहात्म्य प्राप्त होतें. (४) जे पाषाणादि पदार्थ न घडवितांच शिवलिंगरूप मानून अर्चिले जातात, त्यांसहि क्वचित् स्वयंभू शिवलिंग म्हणत असतील.

आतां या केवळ लौकिकी समजुती सोडून, शास्त्रविचार पाहिला तर, अचल किंवा स्थावर लिंग सुप्रभेदागमाप्रमाणें नऊ प्रकारचें असतें: (१) स्वयंभू पूर्ण किंवा पुराण, (२) दैवत, (३) गाणपत्य, (४) असुर, (५) सुर, (६) आर्ष, (७) राक्षस, (८) मानुष आणि (९) बाण, असे ते नऊ प्रकार आहेत. 'मानसारा' प्रमाणें अचल लिंग, शैव लिंग, पाशुपत लिंग, काळामुख लिंग, वाम लिंग, भैरव लिंग, व आणखी एक अनामिक सहावें लिंग, अशीं सहा शिवलिंगें मानलीं आहेत. पहिल्या वर्गीकरणांत उत्तम, मध्यम व अधम (कनिष्ठ) असा अनुक्रम आहे. एकंदर शैवागमांत कामिकागमाचें प्रामाण्य अधिक मानतात. त्या आगमाप्रमाणें स्वयंभू, दैविक, आर्षक, गाणपत्य, मानुष आणि बाण अशीं षड्विध स्थावर लिंगें असतात. मुकुटागमाप्रमाणें दैविक लिंगाचे आकार ज्योतीप्रमाणें किंवा हस्तांजलीप्रमाणें असतात. हीं लिंगें ओबडधोबडहि असतात. गाणपत्य लिंगें हीं गणानीं स्थापन केलेलीं

आहेत, अशी समजूत असते. स्वयंभू लिंगें प्राचीन कालापासून आपोआपच प्रगट झालेली असतात. पुढें तीं अस्मानी सुलतानी होऊन भंगलीं, तरी त्यांचा जीर्णोद्धार करतां येत नाहीं. फार तर शुद्धि करतां येते. शिवलिंगांसंबंधीं आगमांतील नियम स्वयंभू लिंगाला लागत नाहींत. स्वयंभूचें असें असाधारण माहात्म्य असल्यामुळें, आपलें ग्राम–शिवलिंग स्वयंभू आहे असें अभिमानपुरस्सर मानण्याकडे ग्रामस्थांचा कटाक्ष असतो. तथापि, निगम ज्ञानदेवाच्या जीर्णोद्धार दत्तकांत फक्त अडसष्ट (६९१) स्वयंभू लिंगांची नोंद आहे. ती लेखनविस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. या यादींत प्रत्येक स्वयंभू शिवलिंगाच्या गांवाचा व त्यांच्या विशेष नांमांचा उल्लेख आहे. ही स्वयंभू शिवलिंगांची यादी अगदींच अपुरी असावी, असें उघड दिसतें. याशिवाय भरतखंडांत अनेक ठिकाणीं स्वयंभू लिंगें आहेतच. उदाहरणार्थ, घोपेश्वरचा धूतपापेश्वर, वसईचा सिद्धेश्वर हीं स्वयंभू शिवलिंगें आहेत. त्यांचा कोठवर निर्देश करणार !

(२) **मानुषलिंगें**— एखाद्या लिंगाची स्थापना शिवानें, पार्वतीनें, सिद्धपुरुषानें, रामासारख्या मानवदेहधारी अवतारी पुरुषानें, अगर अन्य कोणी पुरुषानें केलेली असो; जें लिंग घडविलेलें किंवा निवडलेलें, अथवा एखाद्या प्रतीकावर कोणी तरी शिवभावना करून मानलेलें असेल, तें कृत्रिमच होय, असें आपण विचाराच्या सोयींसाठीं मानूं. शास्त्रांत ज्यास मानुषलिंगें म्हटलें आहे, तीं मानुषलिंगें मनुष्याकडून घडविलेलीं असतात. या शास्त्रोक्त मानुषलिंगाचे दहा प्रकार आहेत : (१) सर्वदेशिक, (२) सर्व सम, (३) वर्धमान, (४) शैवाधिक, (५) स्वस्तिक, (६) त्रैराशिक, (७) अध्य, (८) नगर, (९) द्राविड, व (१०) वेसर, असे ते दहा प्रकार होत. यांच्या वरच्या वाटोळ्या भागाला रुद्रभाग, मधल्या अष्टकोनी भागाला विष्णुभाग, व खालच्या चौकोनी भागाला ब्रह्मभाग असें म्हणतात. यांपैकीं विष्णुभाग व ब्रह्मभाग हे जमिनींत पुरले जातात. त्याचे चौकोनी व अष्टकोनी आकार लिंग गरगर वाटोळें फिरूं नये, किंवा खालींवर हलूं नये

१ उदाहरणार्थ, महादेव, महेश्वर, देवदेवेश, प्रपितामह, स्थाणु, शशीभूषण इत्यादि.

व्यापकाची उपासना करणें फार कठिण पडतें; म्हणून शिवोपास्याचा हा एक विभूतिप्रकारच मानतां येईल. परंतु बारा ज्योतिर्लिंगांची यात्रा कांहीं सर्वांनाच घडत नाहीं. शिवाय नित्य अखंडित उपासना तेथें घडणें सर्वांस कसें शक्य होणार? म्हणून शिवप्रतीकांची संख्या व विस्तार सहजच वाढत गेला. त्यांतील मुख्य प्रकार पुढें सांगतों.

**(१) स्वयंभू शिवलिंगें**—भक्तभावनेंत ज्योतिर्लिंगाच्या खालोखाल स्वयंभू शिवलिंगांचें माहात्म्य असतें. स्वयंभू लिंगाशिवाय इतर कृत्रिम लिंग, म्हणजे मुद्दाम घडविलेलीं स्थावर लिंगें व जंगम म्हणजे चल लिंगें, असे आणखी प्रकार आहेत. स्वयंभू लिंगांसंबंधीं लौकिक समजुती निरनिराळ्या आढळतात: (१) तीं ज्वालामुखींच्या उद्रेकांचीं आपोआप बनतात. (२) योगधारणेंत ज्यांचें प्राणोत्क्रमण झालें असेल अशा योग्यांच्या शुष्क झालेल्या शवांचीं स्वयंभूलिंगें बनतात. (३) भूकंप, जलप्रलय, मूर्तिभंजकांचीं आक्रमणें अशा अस्मानी-सुलतानींत जीं प्राचीन शिवलिंगें भूमींत अगर जलाशयांत गडदलीं जातात, तीं पुढें दृष्टान्त होऊन किंवा सहज उपलब्ध झालीं असता त्यांस स्वयंभू शिवलिंगांचें माहात्म्य प्राप्त होतें. (४) जे पाषाणादि पदार्थ न घडवितांच शिवलिंगरूप मानून अर्चिले जातात, त्यांसहि क्वचित् स्वयंभू शिवलिंग म्हणत असतील.

आतां या केवळ लौकिकी समजुती सोडून, शास्त्रविचार पाहिला तर, अचल किंवा स्थावर लिंग सुप्रभेदागमप्रमाणें नऊ प्रकारचें असतें: (१) स्वयंभू पूर्ण किंवा पुराण, (२) दैवत, (३) गाणपत्य, (४) असुर, (५) सुर, (६) आर्ष, (७) राक्षस, (८) मानुष आणि (९) बाण, असे ते नऊ प्रकार आहेत. 'मानसारा' प्रमाणें अचल लिंग, शैव लिंग, पाशुपत लिंग, काळामुख लिंग, वाम लिंग, भैरव लिंग, व आणखी एक अनामिक सहावें लिंग, अशीं सहा शिवलिंगें मानलीं आहेत. पहिल्या वर्गीकरणांत उत्तम, मध्यम व अधम (कनिष्ठ) असा अनुक्रम आहे. एकंदर शैवागमांत कामिकागमाचें प्रामाण्य अधिक मानतात. त्या आगमाप्रमाणें स्वयंभू, दैविक, आर्षक, गाणपत्य, मानुष आणि बाण अशीं षड्विध स्थावर लिंगें असतात. मुकुटागमाप्रमाणें दैविक लिंगाचे आकार ज्योतीप्रमाणें किंवा हस्तांजलीप्रमाणें असतात. हीं लिंगें ओबडधोबडहि असतात. गाणपत्य लिंगें हीं गणांनीं स्थापन केलेलीं

आहेत, अशी समजूत असते. स्वयंभू लिंगें प्राचीन कालापासून आपोआपच प्रगट झालेलीं असतात. पुढें तीं अस्मानी सुलतानी होऊन भंगलीं, तरी त्यांचा जीर्णोद्धार करतां येत नाहीं. फार तर शुद्धि करतां येते. शिवलिंगां-संबंधीं आगमांतील नियम स्वयंभू लिंगाला लागत नाहींत. स्वयंभूचें असें असाधारण माहात्म्य असल्यामुळें, आपलें ग्राम-शिवलिंग स्वयंभू आहे असें अभिमानपुरस्सर मानण्याकडे ग्रामस्थांचा कटाक्ष असतो. तथापि, निगम ज्ञानदेवाच्या जीर्णोद्धार दस्तकांत फक्त अडसष्ट (६९[1]) स्वयंभू लिंगांची नोंद आहे. ती लेखनविस्तारभयास्तव येथें देतां येत नाहीं. या यादींत प्रत्येक स्वयभू शिवलिंगाच्या गांवाचा व त्यांच्या विशेष नामांचा उल्लेख आहे. ही स्वयंभू शिवलिंगाची यादी अगदींच अपुरी असावी, असें उघड दिसतें. याशिवाय भरतखंडांत अनेक ठिकाणीं स्वयंभू लिंगें आहेतच. उदाहरणार्थ, घोपेश्वरचा धूतपापेश्वर, वसईचा सिद्धेश्वर हीं स्वयंभू शिवलिंगें आहेत. त्यांचा कोठवर निर्देश करणार !

(२) मानुषलिंगें—एखाद्या लिंगाची स्थापना शिवानें, पार्वतीनें, सिद्धपुरुषानें, रामासारख्या मानवदेहधारी अवतारी पुरुषानें, अगर अन्य कोणी पुरुषानें केलेली असो ; जें लिंग घडविलेलें किंवा निवडलेलें, अथवा एखाद्या प्रतीकावर कोणी तरी शिवभावना करून मानलेलें असेल, तें कृत्रिमच होय, असें आपण विचाराच्या सोयीसाठीं मानू. शास्त्रांत ज्यास मानुषलिंगें म्हटलें आहे, तीं मानुषलिंगें मनुष्याकडून घडविलेलीं असतात. या शास्त्रोक्त मानुषलिंगाचे दहा प्रकार आहेत : (१) सर्वदेशिक, (२) सर्व सम, (३) वर्धमान, (४) शैवाधिक, (५) स्वस्तिक, (६) त्रैराशिक, (७) आढ्य, (८) नगर, (९) द्राविड, व (१०) वेसर, असे ते दहा प्रकार होत. यांच्या वरच्या वाटोळ्या भागाला रुद्रभाग, मधल्या अष्टकोनी भागाला विष्णुभाग, व खालच्या चौकोनी भागाला ब्रह्मभाग असें म्हणतात. यांपैकीं विष्णुभाग व ब्रह्मभाग हे जमिनींत पुरले जातात. त्याचे चौकोनी व अष्टकोनी आकार लिंग गरगर वाटोळें फिरूं नये, किंवा खालींवर हलूं नये

---

१ उदाहरणार्थ, महादेव, महेश्वर, देवदेवेश, प्रपितामह, स्थाणु, शशीभूषण इत्यादि.

म्हणून असल्याचें म्हणतात याची उंची, जाडी, वगैरे परिमाणें शास्त्रोक्त प्रमाणबद्ध असतात त्या प्रमाण शास्त्रांतील गणित बरेंच क्लिष्ट आहे या गूढ गणितामुळें काहीं लिंगास त्रैराशिक व काहींस त्रैभाजिक लिंग अशीं नावें आहेत मानुषलिंगाचे आणखी अष्टोत्तरशतलिंग, सहस्रलिंग, धारालिंग, शैवष्टयलिंग आणि मुखलिंग असे प्रकार आहेत अष्टोत्तरशत व सहस्र या प्रकारांत लिंगाच्या पूजाभागावर तितकीं शिवलिंगें कोरलेलीं असतात धारालिंगास उभ्या धारा असतात मुखलिंगावर एक अगर अनेक मुखें कोरलेलीं असतात पिंडीचे आकार चौकोनी, षट्‌कोनी, अष्टकोनी असे विविध असतात याचीं मापें शास्त्रांत सांगितलेलीं आहेत लिंग हें पु-शिलेचें करतात व खालची साळुंका स्त्री शिलेची करतात, हें शास्त्रांतील वर्णन क्लिष्ट आहे

मद्रास इलाख्यात पंचमहाभूतांचीं पांच शिवलिंगस्थानें फार प्रसिद्ध आहेत क्षेत्रमाहात्म्याप्रमाणें व शिल्पाच्या दृष्टीनेंहि हीं मंदिरें अत्यंत प्रेक्षणीय आहेत, तीं अशीं (१) शिवकांची येथें पृथ्वीतत्त्वलिंग आहे. (२) जबुनाथ येथें जललिंग आहे (३) अरुणाचल येथें तेजलिंग आहे. येथेंच सुप्रसिद्ध संत श्रीरमणमहर्षि हे असत (४) कालहस्तिगिरीवर वायुलिंग आहे (५) चिदंबर येथें आकाशलिंग आहे याशिवाय छायावनांत छायावनेश्वर आहे हिरण्यगर्भ क्षेत्रांत महादेवेश्वर आहे आम्रातक क्षेत्रांत सूक्ष्मेश्वर आहे या सर्व शिवस्थानांचीं आख्यानक माहात्म्यें आहेत पण तीं लेखनविस्तारभयास्तव येथें देता येत नाहींत या पांची शिवालयांचें दाक्षिणेंत फारच माहात्म्य मानलें आहे पहिलें व तिसरें पार्वतीची तपोभूमि आहे शिवकांची येथील लिंग वाळूचें असल्यामुळें त्यावर पाणी घालीत नाहींत, चमेलीच्या तेलानें स्नान घालतात येथें जवळच एक प्राचीन आम्रवृक्ष आहे त्याला चार फांद्या आहेत ते चार वेद असें मानतात

१ Elements of Hindu Iconography, Vol II, Part I, P 99

२ शिवकांची येथील शिवस्थान व शिवभक्त हाच श्रीशिवभक्तविलास ह्या स्कंदपुराणाच्या उपपुराणाचा मुख्य वर्ण्य विषय आहे

प्रत्येक पांदीला येणाऱ्या आम्रफलाचा रंग व रुचि वेगळी असते. जंबुकेश्वराऱ्या पिंडीखालून एकसारखें पाणी वाहात असतें. चिदंबर या आकाशलिंगाचें मंदिरात शिवाचें पार्थिव प्रतीक नाहीं. कालहस्तीश्वर या मंदिराचे गर्भागारात वायु (वाहाता) व प्रकाश यांचा अगदीं अभाव आहे. येथील चोकोनी शिवलिंगापुढें कणप्प या प्राचीन सुप्रसिद्ध भिल्ल भक्ताची मूर्ति आहे.

या शिवलिंगांच्या स्मरणार्चनाची फलश्रुति दिव्य सांगितली आहे. हीं पांच लिंगें व सूर्य, चंद्र आणि पशुपति मिळून शिवाच्या अष्टमूर्ति मानतात. यांप्रमाणें प्रांतांप्रांतीं व गांवोगांवीं हजारों सुप्रसिद्ध मानुषलिंगस्थानें आहेत. त्यांचें ग्रंथांतरीं वर्णन आहे. पण त्यांचा संग्रह येथें कोठवर करावा! तें शक्यच नाहीं.

(३) चललिंगें — आपल्या देशांतील कांहीं स्थावर पार्थिव शिवलिंगांचा विचार येथवर झाला. आतां चल शिवलिंगांचा थोडक्यांत विचार कर्तव्य आहे. या चललिंगांचे प्रकार अनेक संभवतात: (१) कांहीं शिवोपासक रोज वाळूचें अगर दुसऱ्या द्रव्याचें पार्थिवलिंग तयार करून त्याची पूजा करितात. या

---

१ पृथ्व्यादि पञ्चतत्त्वाना लिङ्गानि स्मरता नृणाम्।
मुक्तिः करस्था भवति नात्र कार्या विचारणा॥
त्रयो दशोत्तरशतस्थानानि परमेशितुः।
प्रातः काले तु पूजान्ते स्मर्तव्यानि मनीषिभिः॥
पुण्यकर्माणि सर्वाणि तैः कृतानीह जन्मनि।
तेषां फलप्रवचने शक्तः शेषोऽपि न क्वचित्॥

२ तस्यादिदेवदेवस्य मूर्त्यष्टकमय जगत्।
तस्मिन् व्याप्तस्थितं विश्वं सूत्रे मणिगणा इव॥
शर्वो भवस्तथा रुद्र उग्रो भीमः पशुपति.॥
ईशानश्च महादेवः मूर्त्तयश्चाष्ट विश्रुताः।
भूम्यम्भोऽग्निमरुद्व्योमक्षेत्रज्ञार्कनिशाकराः।
अधिष्ठाता महेशस्ये सर्वादेरष्टमूर्तिभिः।
अष्टमूर्त्यात्मना विश्वमधिष्ठाय स्थितं शिवम्
भजस्व सर्वभावेन रुद्रं परमकारणम्॥

— शिवपुराण.

पूजा केल्यावर तें विसर्जन करतात. (२) पुष्कळांच्या देव्हाऱ्यांत कायमचेंच चलपाषाणलिंग किंवा बाणलिंग असतें. (३) प्राचीन पाशुपत व अर्वाचीन लिंगायत गळ्यांत किंवा दंडावर लिंग धारण करतात, तेंहि कायमचेंच असतें. (४) तांत्रिक उपासक योनिलिंगाच्या आकृति किंवा यंत्रेंहि पूजीत असतील.

चललिंगात मृण्मय, लोहज, रत्नज, दारुज, शैलज, आणि क्षणिक असे सहा प्रकार आहेत. भाजलेल्या मातीचें लिंग अभिचारिक क्रियांत उपयोग करितात. लोहज लिंग सुवर्णादि धातूंचें असतें. रत्नज मोतीं, पोंवळीं, वैडूर्यमणि, पुष्पराग, पाच, नीलमणि यांचे करतात. दारुज लिंग शमि, पिंपळ, उंबर, बेल, शाल, देवदार, चंदन, बोर इत्यादि लांकडांचें असतें. शैलजलिंग हें बहुधा लिंगायत अंगावर धारण करतात तेंच असावें. क्षणिक लिंग पूजेपुरतें तयार करून नंतर लगेच विसर्जन करतात. हें लिंग वाळू, तांदूळ, भात, पीठ, लोणी, गंध, शेण, इत्यादि द्रव्यांचें करतात. या निरनिराळ्या द्रव्यांच्या लिंगपूजेची फलश्रुति शास्त्रांत वैभव, अन्नसमृद्धि, स्थावरमिळकतप्राप्ति, रोगनिवृत्ति, आनंदोवृत्ति, ज्ञान, सौभाग्य, दीर्घायु, बल, वासनापूर्ति, मोक्ष, अशा निरनिराळ्या प्रकारची सांगितली आहे. गरुडपुराणादि ग्रंथांत ती दिली आहे. उदाहरणार्थ, पारदाच्या चललिंगार्चनाचा महिमा सर्वांत अधिक मानतात. ब्रह्मा, विष्णु, महेश व पार्वती या चौघांची पूजा एका पारदलिंगार्चनांत होते. पारद शब्दांत प = विष्णु, आ = कालिका, र = शिव, द = ब्रह्मा, अशा भावना मानल्या आहेत. हा विषय गरजूंनीं मूळ शास्त्रग्रंथांतून किंवा अनुभवी उपासकांकडूनच समजून घेणें इष्ट आहे.

**(४) शिवलिंगांचा चौथा प्रकार विदेशांतील शिवलिंगें**—त्यांची माहिती पुढील प्रकरणांत देत आहें.

**निरंजनाचे बोबडे बोल । हें अरण्यांतील वांकडें फूल ॥**
**गुरु आत्मलिंगा बहुसाल । पूजा करीतसे अंतरीं ॥ १२५ ॥**
**तें लिंग म्हणाल जरी सान । तरि ठेवावया नाहीं ठिकाण ॥**
**ब्रह्मांडाएवढें कल्पून । उगेंच अनुमान सांगतों ॥ १२६ ॥**

—स्वात्मप्रचीति

## प्रकरण ७ वें

# शिवलिंगोपासक पंथ

(पूर्वार्ध)

यस्याज्ञया जगत्स्रष्टा विरञ्चिः पालको हरिः ।
संहर्ता कालरुद्राख्यो नमस्तस्मै पिनाकिने ॥

—स्कंदपुराण.

शिवः शक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुम् ।

— शंकराचार्य.

शैवागमोऽपि द्विविधः श्रौतोऽश्रौतश्च स स्मृतः ।

—वायुसंहिता.

महाराष्ट्रांतील शांकरमतानुयायी उपासक कोणत्याहि विशिष्ट शैवपंथाचे सांप्रदायिक असल्याचें फार करून आढळत नाहीं. पण शैव, शाक्त, लिंगायत व नाथपंथी ह्या शिवलिंगोपासकांच्या विशिष्ट पंथांतील सांप्रदायिक महाराष्ट्रांत मुळींच नाहींत असें नाहीं. तथापि श्रीमच्छंकराचार्यांनीं रूढ केलेल्या पंचोपासनेंत हें सांप्रदायिक वैशिष्ट्य बरेंच लोपलें आहे.

महाराष्ट्रांतील सार्वजनिक शिवालयांतून विशिष्ट शैवसंप्रदायनिष्ट उपासना फारकरून कोठें सुरू नसावी, अशी माझी कल्पना आहे; म्हणून या ग्रंथांत शैव, शाक्त, लिंगायत व नाथपंथी या शिवलिंगोपासक संप्रदायांचा विचार मी फारसा तपशीलवार करणार नाहीं. शैव व शाक्त या सांप्रदायिक वाङ्मयाचा जितका विचार करणें या ग्रंथांत ओघासच येईल, तितकाच करीन. लिंगायत पंथाचे एक आधुनिक विद्वान् इतिहासकार लिंगायत हे वंशानें हिंदु असले तरी धर्मानें हिंदूच नव्हत, असेंहि म्हणतात. पण हें त्यांचें म्हणणें मान्य न करणारे लिंगायत पुष्कळ असतील. हे सारे पंथ मूळच्या सनातन वैदिक हिंदु धर्मांतूनच कांहीं संघर्षामुळें फुटून निघाले असावेत असें दिसतें. तरी ते आपला पंथ अति प्राचीन व स्वतंत्र असल्याचेंच सांगतात. अशा या शिवलिंगोपासक विविध पंथांचें किंचित् दिग्दर्शन या प्रकरणांत करीत आहे.

( १ ) शैव पंथ— सामान्यतः शैव नामक पंथांत मुख्य चार पोटविभाग मानतात. ब्रह्मसूत्रावरील भामती टीकेंत २।२।३७ या सूत्रावरील व्याख्येंत शैव, पाशुपत, कारुणिक–सिद्धांती व कापालिक अशा चार उपपंथांचा उल्लेख आहे. कारुणिक यांच्याऐवजीं कोणी काठक तर कोणी कालामुख उपपथ मानतात. याशिवाय नकुलीश, लंकुलीश हीं नावें शैवपथांत आढळतात. कदाचित् पाशुपत पंथाचींच हीं नांवें असतील. वायुसंहितेंत व अन्य कांहीं ग्रंथांत "शैवागमोऽपि द्विविधः श्रौतो श्रौतश्च स स्मृतः।" असे शैवांत दोन विभाग पाडतात. बौद्ध व वैष्णव या पंथांची छाया त्यांवर पडली आहे असेहि कांहीं शैव संप्रदाय आहेत.

या सर्व शैवपंथाचा उगम न सांपडण्याइतका प्राचीन आहे. ब्रह्माला स्पष्ट व्यक्त होण्यापूर्वी तिचें मूळ रूप तेजोमेघरूपांत अस्पष्ट व अव्यक्त असावें, अशी शैव पंथांची मूळ कल्पना करतां येते. भोग आणि त्याग, विवेक आणि वैराग्य, अज्ञान आणि जादू, लौकिक आणि अलौकिक, एषणा, भीति आणि उन्माद, देव आणि भक्त, गुरु आणि चेला, अशा मानवाच्या प्राथमिक विविध वृत्तींत शैव पंथांचा उगम शोधला पाहिजे, असें सामान्य लौकिक दृष्टीस वाटतें. मग प्राचीन ग्रीक आणि चिनी प्रवाशांच्या प्रवासवृत्तांकडे पाहाणारी आधुनिक ऐतिहासिक दृष्टि कांहीं म्हणो.

वेदांस जर सादि व पौरुषेय मानलें तर शैवपंथ त्यांच्याहि पूर्वीचा असला पाहिजे, असें म्हणावें लागेल. कारण वैदिक वाङ्मयांत रुद्रमाहात्म्य, रुद्रकथा, व शिवतत्त्वविवेचन ठिकठिकाणीं आलेलें आहेच. अलीकडे अति प्राचीन अशा गणलेल्या द्रौविड किंवा तामिळ वाङ्मयांत शिवमाहात्म्य आहेच. ज्यांत शिवमाहात्म्य वर्णिलें नाहीं, असें एकहि पुराण नाहीं. हे सारे शैव पंथाच्या प्राचीनत्वाचे पुरावे आहेत. शिवलिंगोपासना आणि योगधारणा हीं

---

१ कल्याण–शिवांक, पृ. १६६.

२ Cultural Heritage of India, Vol. II, p. 18.

१ History and Philosophy of Lingayat Religion, by Prof. Sakhare, (Introduction). See also Cultural Heritage of India, Vol. III, p. 64 et sequa.

शैव पंथाची सहा हजार वर्षांपूर्वीची दोन मुख्य चिन्हें मोहनजोदारो येथील उत्खननांत सांपडलीं आहेत. तसें पाहिलें तर ब्रह्मा, विष्णु, ब्रह्मदेवाचे मानसपुत्र—वसिष्ठ, अगस्ति, गौतम, विश्वामित्र, दधीचि, इंद्र, उपमन्यु, मार्कंडेय हे सारे प्राचीन पुरुष शैवच होते. त्याचप्रमाणें वैदिक ऋषींचे आदर्श व वैदिक राजांचेहि आदराश्चर्याचे विषय असे जे इतर अलौकिक सामर्थ्यसंपन्न व विरक्त पुरुष ऋग्वेदादि अति प्राचीन वाङ्मयांत व भारत-रामायणादि पुराणेतिहासग्रंथांत वर्णिलेले आढळतात, तेहि कदाचित् या पंथाचे आद्य सांप्रदायी असतील. त्यांचें वर्णन व आदिनाथ जे शंकर यांचें वर्णन यांत बरेंच साम्य आढळतें. पंचमहाभूतांपैकीं आकाश हें अरूप व अव्यक्त आहे. प्राण अथवा वायु हेंच किंचित् व्यक्त असें पहिलें भूत आहे. या तत्त्वांशीं समरस झालेले जे देव आणि ऋषि तेच पहिले शैवपंथी होत असें मी अनुमान करतों.

शास्त्रांत प्राणांना ऋषि म्हटलें आहे व देवता वायुस्वरूप मानल्या आहेत. अशा सूक्ष्म तपस्वी ऋषींचा व देवांचाहि जो पहिला देव तोच महादेव होय. त्यासच अग्निस्वरूप महादेव असेंहि म्हटलें आहे.

ऋग्वेदांत दहाव्या मंडळाच्या एकशें छत्तिसाव्या सूक्तांत सूर्य, वायु व अग्नि या त्रैलोक्याच्या अधिदैवांचें वर्णन केलें आहे. वस्तुतः हीं तिन्ही स्वरूपें शिवरुद्राचींच आहेत. याच सूक्तांतील २ ते ५ मंत्रांत मुनींचें वर्णन आहे तें असें :— वातरशन मुनि पिंगट व मलिन वस्त्रें धारण करतात. ज्या वेळीं ते देवतारूप घेतात, त्या वेळीं ते वायुस्वरूप स्वीकारतात. ते म्हणतात कीं, मुनिवृत्तीमुळें आनंदी वृत्तीनें असणारे आम्ही वायुरूप स्वीकारतों. हे मर्त्य हो ! आमचीं शरीरेंच केवळ तुम्ही पहा. सर्व पदार्थमात्राला स्वतेजानें प्रगट करणारा ( वायुरूप ) मुनि आकाशमार्गानें संचार करतो. सर्व देवांना मित्रभूत असणाऱ्या सत्कृत्यांकरतां त्यांची स्थापना केली जाते. वायुप्रमाणें व्यापक, वायूचा मित्र, पार काय, पण वायुरूप झालेला मुनि पूर्व समुद्रांत

---

१ आकाशलिंगमित्याहुः पृथिवी तस्य पीठिका। आलयः सर्व देवानां लयनाल्लिंगमुच्यते ॥ —स्कंदपुराण.

२ ऋग्वेद, ४।५८।३.

व उत्तर समुद्रात जातो याप्रमाणें अथर्ववेदातील (१५) व्रात्य, रामायणातील वैखानस, ह्यासारखे अति प्राचीन कालीन ऋषि हे सारे शैवपथीच असावेत असें अनुमान होतें वाराह कल्पातील चालू मन्वतरात झालेले शिवाचे अठ्ठावीस अवतार व त्या प्रत्येकाचे चार चार शिष्य याची यादी शतरुद्रीय सहितेंत दिली आहे, त्यातील काहीं अश येणेंप्रमाणें . (१) श्वेत-(स्थान-छागल पर्वत) (शिष्य) श्वेत, श्वेतशिख, श्वेताश्व, श्वेतलोहित (२) सुतार-(शिष्य) दुदुभि, शतरूप, हृषीक, केतुमत् .(३) दमन-(शिष्य) विशोक, विशेष, विपाप, पापनाशन (४) सुहोत्र-(शिष्य) सुमुख, दुर्मुख, दुदर्भ, दुरितक्रम (५) कक-(शिष्य) सनक, सनत्कुमार, सनदन, सनातन (६) लोकाक्षी-(शिष्य) सुधामन्, विरजस्, सजय, अडज (७) जैगीषव्य-(स्थान-काशी) (शिष्य) सारस्वत, योगीश, मेघवाह इत्यादि शिवपुराण हिंदी अनुवाद नवलकिशोर प्रेस याचा खड ७ अ ८ यातहि वेगळीच यादी आढळते

आद्य शैव पथाचें किंचित् दिग्दर्शन होण्यासाठीं वरील यादी उगाच नमुन्यापुरतीच दिली आहे शिवपुराणातून शिवाचे आणखी अनेक अवतार वर्णिले आहेत तसेंच वरील शिवावताराचे प्रत्येकीं चारच अनुयायी होते, असें असणें शक्य नाहीं चार चार प्रमुख अनुयायाचीं नावें दिलीं आहेत, इतकेंच या शैव पथाच्या अति प्राचीनत्वाला व व्यापकतेला पुराणें हीं तर प्रमाणभूत आहेतच, पण आणखी प्रमाणें पाहिजे असतील तर भरतखडात व भरतखडाचे बाहेर आर्चिपेलोगो, मध्य आशिया इतकेंच काय सर सबध भूगोलाच्या मध्य कक्षेवर विशेष माहात्म्याचीं अशीं प्राचीन शिवक्षेत्रें मोजलीं तर तीं सहस्रावधि आढळतील शैवपुराणातून त्यापैकीं पुष्कळाची नावनिशीवार

१ चित्रावशास्त्री यांचें मापातर

२ (1) It can scarcely be questioned, theorise as writers may, that the origin of this worship (Linga) is lost in antiquity (Phallic Miscellany, p. 3, Phallism, p. 2)

(ii) With the fourth race a form of worship began which ages later was doomed to degenerate into phallism

[टीप पुढील पानावर पहा.]

यादींहि मिळेल व आज जाग्यावर त्यांचा पुरावा प्रत्यक्ष अवशेषरूपानें आढळेल. दुसऱ्या दृष्टीनें विचार केल्यास वामन, परशुराम, राम, कृष्ण हे सारे अवतार शिवोपासकच होते. त्याहिपूर्वी श्रीविष्णूनें वराहरूपानें शिवलिंगाचा पाताळांत आदि पाहण्याचा यत्न केला होता. तसेंच शिव हा नरसिंहापेक्षां श्रेष्ठ होय, असें कालिकादि पुराणांत वर्णन आढळतें. या इतक्या गोष्टी सिद्धवत् मानल्या तर शैवपंथाचा महिमा फार प्राचीन व साऱ्या जगाला व्यापून उरण्याइतका होता, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. त्यास जगाच्या इतिहासांत प्राचीन लिंगोपासनेच्या रूपांत भरपूर पुरावा मिळतो. आजहि शिवास भजणाऱ्यांची संख्या भरतखंडांत इतर देवतांच्या उपासकांपेक्षां पुष्कळच जास्त भरेल.

तप आणि तपस्वी यांचें अस्तित्व जगाच्या उत्पत्तीपासून आपल्या शास्त्रांत मानलें आहे. तपांतूनच सृष्टि उत्पन्न झाली. ब्रह्मदेव, प्रजापति, यांचे मानसपुत्र या सर्वांनीं केवळ भवबंधापासून सुटण्याकरितांच नव्हे तर सृष्ट्युत्पत्तीकरितांहि तप केलें आहे. रामायणांत रामाकडे आलेल्या कांहीं तपस्वी ऋषींचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे :—

ईश्वराच्या नखापासून झालेले वैखानस, केसापासून झालेले वालखिल्य, पादप्रक्षालनापासून झालेले संप्रक्षाल, सूर्यचंद्राच्या किरणांवर उपजीविका करणारे मरीचिप, शिजविल्यावांचून कुटलेलें अन्न खाणारे असंख्य अश्मकुट्ट, वृक्षांच्या गलित पानांवर उपजीविका करणारे तपस्वी पत्राहार, दांतावांचून कुटण्याचें वगैरे साधन जवळ न बाळगणारे दंतोलूखली, गळ्याइतक्या पाण्यात उभें राहून तप करणारे उन्मजक, भूमीवर कांहीं एक न पसरतां शयन

[टीप, मागील पानावरून चालू]

and sexual worship (Secret Doctrines, Vol. III, pp. 281–286. See also R. C. Muzumdar's Ancient Indian Colonies in the Far East. Indian Civilization and its Antiquity, Chapter I.)

(iii) कल्याण–शिवांक, पृ. ५७४ ते ५७६ पहा.

१ Modern Review, February, 1951. पुरुषार्थ, वर्ष १४, अंक ५, पृ. ३७१. व कल्याण–शिवांक पहा.

व उत्तर समुद्रांत जीतो. याचप्रमाणें अथर्ववेदांतील ( १५ ) व्रात्य, रामायणांतील वैखानस, ह्यांसारखे अति प्राचीन कालीन ऋषि हे सारे शैवपंथीच असावेत असें अनुमान होतें. वाराह कल्पांतील चालू मन्वंतरांत झालेले शिवाचे अठ्ठावीस अवतार व त्या प्रत्येकाचे चार-चार शिष्य यांची यादी शतरुद्रीय संहितेंत दिली आहे, त्यांतील कांहीं अंश येणेंप्रमाणें : ( १ ) श्वेत-( स्थान-छागल पर्वत ). ( शिष्य ) श्वेत, श्वेतशिख, श्वेताश्व, श्वेतलोहित. ( २ ) सुतार-( शिष्य ) दुंदुभि, शतरूप, हृषीक, केतुमत्. ( ३ ) दमन-( शिष्य ) विशोक, विशेष, विपाप, पापनाशन. ( ४ ) सुहोत्र-( शिष्य ) सुमुख, दुर्मुख, दुदर्भ, दुरितक्रम. ( ५ ) कंक-( शिष्य ) सनक, सनत्कुमार, सनंदन, सनातन. ( ६ ) लोकाक्षी-( शिष्य ) सुधामन्, विरजस्, संजय, अंडज. ( ७ ) जैगीषव्य-( स्थान-काशी ). ( शिष्य ) सारस्वत, योगीश, मेघवाह इत्यादि. शिवपुराण हिंदी अनुवाद नवलकिशोर प्रेस याचा खंड ७ अ. ८ यांतहि वेगळीच यादी आढळते.

आद्य शैव पंथाचें किंचित् दिग्दर्शन होण्यासाठीं वरील यादी उगाच नमुन्यापुरतीच दिली आहे. शिवपुराणांतून शिवाचे आणखी अनेक अवतार वर्णिले आहेत. तसेंच वरील शिवावतारांचे प्रत्येकीं चारच अनुयायी होते, असें असणें शक्य नाहीं. चार चार प्रमुख अनुयायांचीं नांवें दिलीं आहेत, इतकेंच. या शैव पंथाच्या अति प्राचीनत्वाला व व्यापकतेला पुराणें हीं तर प्रमाणभूत आहेतच ; पण आणखी प्रमाणें पाहिजे असतील तर भरतखंडांत व भरतखंडाचे बाहेर आर्चिपेलोगो, मध्य आशिया इतकेंच काय तर सबंध भूगोलाच्या मध्य कक्षेवर विशेष माहात्म्याचीं अशीं प्राचीन शिवक्षेत्रें मोजलीं तर तीं सहस्त्रावधि आढळतील. शैवपुराणांतून त्यांपैकीं पुष्कळांची नांवनिशीवार

१ चित्रावशास्त्री याचें भाषांतर.

२ (i) It can scarcely be questioned, theorise as writers *may, that the origin of this worship* ( *Linga* ) *is lost in* antiquity ( Phallic Miscellany, p. 3, Phallism, p. 2 ).

(ii) With the fourth race a form of worship began which ages *later* was doomed to degenerate into phallism

[ टीप पुढील पानावर पहा.]

यादीहि मिळेल व आज जाग्यावर त्याचा पुरावा प्रत्यक्ष अवशेषरूपानें आढळेल. दुसऱ्या दृष्टीनें विचार केल्यास वामन, परशुराम, राम, कृष्ण हे सारे अवतार शिवोपासकच होते. त्याहिपूर्वी श्रीविष्णूनें वराहरूपानें शिवलिंगाचा पाताळात आदि पाहण्याचा यत्न केला होता. तसेंच शिव हा नरसिंहापेक्षा श्रेष्ठ होय, असें कालिकादि पुराणात वर्णन आढळतें. या इतक्या गोष्टी सिद्धवत् मानल्या तर शैवपंथाचा महिमा फार प्राचीन व साऱ्या जगाला व्यापून उरण्याइतका होता, असें म्हणणें अतिशयोक्तीचें होणार नाहीं. त्यास जगाच्या इतिहासात प्राचीन लिंगोपासनेच्या रूपात भरपूर पुरावा मिळतो. आजहि शिवास भजणाऱ्याची सख्या भरतखडात इतर देवताच्या उपासकापेक्षा पुष्कळच जास्त भरेल.

तप आणि तपस्वी याचें अस्तित्व जगाच्या उत्पत्तीपासून आपल्या शास्त्रात मानलें आहे. तपातूनच सृष्टि उत्पन्न झाली. ब्रह्मदेव, प्रजापति, याचे मानस-पुत्र या सर्वांनीं केवळ भवबधापासून सुटण्याकरिताच नव्हे, तर सृष्टयुत्पत्ती-करिताहि तप केलें आहे. रामायणात रामाकडे आलेल्या काहीं तपस्वी ऋषींचें वर्णन पुढीलप्रमाणें केलें आहे —

ईश्वराच्या नखापासून झालेले वैखानस, केसापासून झालेले वालखिल्य, पादप्रक्षालनापासून झालेले सप्रक्षाल, सूर्यचद्राच्या किरणावर उपजीविका करणार मरीचिप, शिजविल्यावाचून कुटलेलें अन्न खाणारे असख्य अश्मकुट्ट, वृक्षाच्या गलित पानावर उपजीविका करणारे तपस्वी पत्राहार, दाताबाचून कुटण्याचें वगैरे साधन जवळ न बाळगणारे दतोलूखली, गळ्याइतक्या पाण्यात उभें राहून तप करणारे उन्मजक, भूमीवर काहीं एक न पसरता शयन

[ टीप, मागील पानावरून चालू ]

and sexual worship ( Secret Doctrines, Vol III, pp 281–286 See also R. C Muzumdar s Ancient Indian Colonies in the Far East Indian Civilization and its Antiquity, Chapter I )

(iii) कल्याण–शिवाक, पृ ५७४ ते ५७६ पहा.

१ Modern Review, February, 1951. पुरुषार्थ, वर्ष १४, अक ५, पृ २७१ व कल्याण–शिवाक पहा

करणारे गात्रशय्य, कधींच निद्रा न करणारे अशय्य, एका पावलापेक्षां जास्त जागेची अपेक्षा न धरता एकाच पाउलावर उभें राहून तपश्चर्या करणारे अनवकाशिक, तसेंच केवळ उदकपान करून राहाणारे, केवळ वायु भक्षण करून राहाणारे, उघड्या प्रदेशात राहाणारे आकाशनिलय, ओटा घालून त्यावर पडून राहाणारे स्थंडिलशायी, पर्वतशिखरासारख्या उच्च प्रदेशावर नेहमीं वास्तव्य करणारे ऊर्ध्ववासी, जितेंद्रिय, नेहमीं आर्द्रवस्त्र परिधान करणारे, नेहमीं जप करीत राहाणारे, सर्वदा अध्ययन करणारे तपोनिष्ठ आणि भर उन्हाळ्यात पंचाग्निसाधन करणारे पंचतपोन्वित, असे सर्व ब्रह्मतेजानें युक्त असलेले व योगानें एकाग्रचित्त असलेले तपस्वी शरभंग मुनींच्या आश्रमामध्यें आले.

वरील वर्णनात अतिशयोक्ति नाहीं हें बौद्धांच्या वाङ्मयातून व इतर प्रवाशांच्या वृत्तातांतून पडताळून पाहातां येईल. इतकेंच काय, पण आजच्या कलिकालांतहि कुंभमेळ्यांत किंवा हिमालयांत, तिबेटात व भरतखंडांतील निरनिराळ्या डोंगरावरील अरण्यांत व नदीकांठच्या अनेक तपोभूमींत वरील दृश्य आजहि पाहाण्यास मिळेल. आता हे सर्व शिवोपासकच असतील असा स्पष्ट पुरावा न मिळाला तरी त्यांचें उपास्य व शिवतत्त्व यांत भेद नाहीं. शिवाय योगधारणा हा शैवपंथाचा विशेष आहे. वैराग्यवृत्ति व वेशभूषा यांतहि बरेंच साम्य आहे. ह्या गोष्टी निर्विवाद आहेत. सान्या देवतांत शिव हा तपस्व्यांचा आणि योग्यांचा आदर्श आहे. योगी, जोगी आणि बैरागी ह्या सर्व विरक्तांचा उगम प्राचीन शैवपंथांतूनच झालेला दिसतो. गौरीशंकर शिखर व कैलास पर्वत शिरोधार्य करणाऱ्या या धर्मभूमीचें उपास्य शिवच आहे असें स्वामी विवेकानंद म्हणतातै.

१ वाल्मीकि रामायण, लेले यांचें भाषांतर, ३।६।१–६.

२ मनु. ६।१–८७. Studies in the Vedant, (Kirtikar), Chap. VIII, p. 134. Indian Philosophy by Radha-Krishnan, Vol. I, p. 121. Keeth– Religion and Philosophy of the Vedas, II, p. 402. Briggs– Goraknath, p. 210.

३ " Oh, India, forget not, that the God thou worshippest is the great Ascetic of ascetics, the all renouncing Shankara." — Vivekananda.

आधुनिकांनीं अति प्राचीन काळाच्या केलेल्या वर्णनांत पाश्चात्यांचें अंधानुकरण, अनादराची व तिरस्काराची भावना, आणि रहस्यदृष्टीचा अभाव हे दोष ठळकपणें असतात. याचें एक कारण प्राचीन काळ म्हणजे घोर अज्ञान व संस्कृतीचा अभाव असें ते धरूनच चालतात. पुष्कळ वेळां त्यांचा हा अविचार उघडकीस येतो; तरी पण त्यांचे पूर्वग्रह व कलुषित भाव जात नाहींत. शैवांच्या उपास्याचे रुद्र आणि शिव असे नामभेद आढळले, तरी दोहोंचा अर्थ पाप आणि दुःख यांस दूर करणारा ( धूतपापेश्वर ) असाच निघतो. यामुळें रुद्र आणि शिव हीं दोन दैवतें नसून एकच दैवत आहे. हा रुद्र यज्ञोपवित धारण करणारा याज्ञिक असेंहि वर्णन वेदांत आढळतें. पण ( १ ) यज्ञकर्माचा ज्यांना अधिकार नाहीं, असा बहुजनसमाज, (२) यज्ञकर्मापासून मरणोत्तर मिळणाऱ्या स्वर्गादि फलांबद्दल ज्यांस आस्था नाहीं असा वेदांती वर्ग, ( ३ ) संहिता, ब्राह्मण या वेदभागापेक्षां औपनिषदिक तत्त्वज्ञानाकडे किंवा उपासनेकडे ज्यांची दृष्टि आहे असा साधक-वर्ग, व (४) सामान्य भक्तिमार्गी, हे संख्येनें वाढत गेल्यामुळें यज्ञनारायणाहून वेगळ्या देवास भजणारा वर्ग प्राचीन काळींच बळावत गेला असावा. याच वर्गांपैकीं कांहींस केसिन, मुनि, व्रात्य अशीं नांवें मिळत गेलीं असतील. वैदिक विधिनिषेध फारसे न पाळणारे उत्तरकालीन त्रेसष्ट नयनार हे कट्टे तामीळ शिवभक्त कदाचित् याच वर्गातील असावेत. या सर्वांचा उपास्य देव म्हणजे रुद्र अथवा शिव होय. त्यांसच भव, शर्व अशींहि नामाभिधानें दिलेलीं आढळतात. यज्ञाच्या कर्मकांडाचें अगत्य न बाळगणाऱ्या या शिवभक्तांच्या समूहांत जातिनिष्ठ श्रेष्ठ-कनिष्ठ भाव न उरल्यामुळें हा वर्ग जणुं वेदबाह्य फटिंग आहे असाहि भास होत असला, तरी त्यांचें दैवत रुद्र, शिव हें वैदिकच असून त्यांचा शैवपंथहि वेदांना सोडून आहे, असें म्हणतां येणार नाहीं. ऐतिहासिक दृष्टीचे लेखक ऋग्वेदादि संहिता भाग, शतपथादि ब्राह्मण भाग, श्वेताश्वतरादि उपनिषद्भाग यांचा कालानुक्रम ठरवून रुद्र व शिव या दैवतेच्या संज्ञांतील भावनेचा विकास दाखवीत असतात. तो खरा असो अगर उगाच काल्पनिक असो, एवढी गोष्ट खरी दिसते कीं, वेदांच्या संहिता,

१ अथर्ववेद, ११।२, १५।५।१. शतरुद्रीय, कौषितकी ब्राह्मण, ७।४. ऋग्वेद, १०।१३६।६, इत्यादि.

भाग आहेत. यांतील ज्ञानभाग उपनिषदांप्रमाणें तत्त्वज्ञानपर आहे. शैवांचा भर भक्तीवर अधिक आहे. प्रसिद्ध शैव भक्तांवैकीं विद्वान् थोडेच असावेत असें म्हणतां येईल. या निरनिराळ्या आगमांवर आधारलेलें शिवज्ञानबोध व सिद्धियार असे अनेक ग्रंथ आहेत. त्यांत १२ शैव तिरुमराई व १४ सिद्धान्तशास्त्रें प्रसिद्ध आहेत. वेदान्तसूत्रावर शैव भाष्यें पण आहेत. तामीळ संतांचीं देवारम् आणि तिरुवासमम् व पेरीयपुराण प्रसिद्ध आहेत. शैव शिव, शक्ति, जीव, जगत् आणि ईश्वर हीं तत्त्वें सत्य मानतात. पण जगाला शिवरूप ब्रह्माहून पृथक्–स्वतंत्र सत्ता मानीत नाहींत. ते शिव ब्रह्मरूपच मानतात. प्रथम जरी आगम हे वेदविरोधी मानले गेले असले तरी पुढें आगमांची छाप वैदिक धर्मावर व तत्त्वज्ञानावर पडत गेली, असें कोणी मानतात. श्वेताश्वतर, अथर्वशिरस्, गीता हे प्रसिद्ध ग्रंथ आगमानुसार बनले व आगमश्रुतींना वेदश्रुतींचें प्रामाण्य प्राप्त झालें असें म्हणतात. काश्मिरी शैव दर्शनाचा झोंक केवलाद्वैताकडेच अधिक आहे. बाकीचे शैव विशिष्टाद्वैती दिसतात. शिवसायुज्य हाच त्यांचा मोक्ष होय.

(२) **शाक्तपंथ**—शक्तीचे जे उपासक ते शाक्त. शक्ति हा शब्द स्त्रीलिंगी आहे आणि शाक्तांचीं उपास्यें दुर्गा, उमा, भैरवी, त्रिपुरसुंदरी, काली, कराली, चामुंडा, इत्यादि सारीं देवीचींच रूपें आहेत. असें आहे तरी ज्या ईश्वराची शक्तिरूपानें शाक्त उपासना करतात, त्या ईश्वराच्या ठिकाणीं किंबहुना शक्तीच्या ठिकाणींहि स्त्रीलिंग, पुल्लिंग अशा लैंगिक भावनांना प्राधान्य दिल्याचें दिसत नाहीं. शिवाच्या क्रियात्मक स्वरूपास शिवा–शक्ति म्हणतात आणि निर्विकार व निष्क्रिय स्वरूपाला शिव म्हणतात. त्यांतल्या त्यांत सृष्टीचें सृजन व संगोपन या ईश्वराच्या मुख्य कार्यास अनुलक्षून शिव-शक्तीच्या ठिकाणीं शाक्त मातृभावना ठेवतात. पण शाक्तांहून इतर वैष्णवादि हेहि विठ्ठलाला विठाई, रामाला रामाई, श्रीगुरूंना गुरुमाउली असें संबोधितात, हें लक्षांत घेतलें, म्हणजे या मातृभावनेंत फक्त प्रेमभावना दिसते.

शाक्तांच्या तंत्राचें स्वरूप प्राधान्येंकरून क्रियात्मक व साधनरूप आहे. वेदान्तांतील अद्वैतानुभूति कशी संपादन करावी, यासंबंधींचा कलियुगास

१ नाहं स्त्री न पुमांश्चाहं न क्लीबं सर्गसंक्षये। सर्गे सति विभेदः स्यात् कल्पितोऽयं धिया पुनः॥ —देवी भागवत ३।६

अनुरूप असा साधनमार्ग तत्रशास्त्रात सागितला आहे चित्ताचे जे स्वभावत ग्राम्यविषय, त्यास दिव्यरूप देऊन चित्तासहि तद्रूपतेनें शुद्ध करणें हेंच शाक्ताच्या तत्रमार्गाचें श्रेष्ठ रहस्य आहे तत्रशास्त्र हें एक उपासनाकाड आहे शाक्ताद्वैत आणि तत्रशास्त्र हे पर्याय शब्द नव्हत त्याचा विशेष जिव्हाळ्याचा सबध आहे इतकेंच शाक्ताचे प्रमाणग्रथ तत्र, आगम, निगम, हे प्राधान्येंकरून शिव–उमा सवादात्मक आहेत ज्यात शिव वक्ता आहे ते आगम व ज्यात उमा शिवास सागत आहे ते निगम होत हें शास्त्र केवळ अनुभवजन्य असल्यामुळें "गुज घेऊनि चावटी। करती बहु॥" या धाकानें त्या शास्त्रात गुह्यगोपनाकडे फार कटाक्ष आहे तरी सुद्धा तत्रशास्त्रातील प्रक्रियाचा अनधिकारी साधकाकडून विपर्यास झाल्यामुळें, तत्रशास्त्राचें व शाक्ताचें नाव काहीं अशीं निष्कारण बद्द झालें आहे या पथाचा असा विश्वास आहे कीं, वेद हे शिवाचे निश्वसित असले तरी निश्वसित हे विचारपूर्वक नसतात उलट आगम आणि तत्रें हीं शिवानें विचारपूर्वक सागितलेलीं आहेत, म्हणून त्यास वेदाहून अधिक व स्वतत्र प्रामाण्य आहे, हा साम्प्रदायिक अभिनिवेश सोडून दिला, तर आगम, निगम व तत्रें यास पचम वेद असेंहि मानतात[१] कल्लुकभट्टानें श्रुति वैदिक आणि तात्रिक उभय-विध मानली आहे[२] तसेंच विष्णुभागवत व देवीभागवत यात तात्रिक पूजा कलियुगात उत्तम मानली आहे[३] शाक्त आपणास अद्वैती मानतात शाक्ताचे प्रातभेदानें व तत्त्वभदानें अनेक पोटभेद आहेत. त्याचें धार्मिक वाङ्मय विपुल आहे आचार्यांनीं रूढ केलेल्या पचप्रतीकात शाक्ताची ललिता देवी आहे तसेंच त्याच्या मठातून शारदा अबेचें विशेष माहात्म्य मानलें जातें आचार्यांचीं देवीचीं स्तोत्रें पाहिलीं म्हणजे शाक्ताद्वैतवाद त्यास सर्वथैव असमत होता, असें म्हणवत नाहीं

---

१ कुलार्णव तत्र, महानिर्वाण तत्र, ताराप्रदीप पहा

२ देवीभागवत, मनु पहा

३ Hinduism in its present form involves no doubt a double frame work of 'Vaidik and Tantrika'—not loosely super imposed the one upon the other, but con stituting one organic whole (–The Cultural Heritage of India, Vol II, p 166). — कल्याण शक्तिअक, पृ ३३३ पहा

मोहनजोदारोच्या उत्खननांतील पुराव्यावरून शाक्तपंथ व शक्तीची उपासना निदान सहा हजार वर्षापूर्वीची आहे हें सिद्ध होतें. या प्राचीनं कालदृष्टीप्रमाणें देशदृष्टीनें पाहातां शक्त्युपासनेचा जन्म बंगाल प्रांतांत, वाढ मिथिला प्रांतांत, संचार महाराष्ट्रांत व नाश गुजराथेंत झाला आहे, असें कांहीं मानतात[१]. शाक्तांचें बरेंच वाङ्मय बंगाल प्रांतीं निर्माण झालें आहे. आजहि बंगाल प्रांतांत शक्त्युपासनेलाच प्राधान्य असल्याचें दिसतें. बंगालचे जगप्रसिद्ध नवयुगधारी संत श्रीरामकृष्ण परमहंस हे शक्त्युपासक होते. तसेंच बंगालचे एक सुप्रसिद्ध न्यायमूर्ति ज. वुड्रॉफ यांनीं फारच आस्थापूर्वक शाक्तवाङ्मयाचा अभ्यास करून त्यावर इंग्रजींत अनेक ग्रंथ लिहून या लोपत चाललेल्या शास्त्राचा उद्धार केला आहे. या त्यांनीं अत्यंत चिकाटीनें केलेल्या दीर्घ परिश्रमांत सहृदयता, मार्मिकता, आस्था व प्रामाणिकपणा हे गुण फार श्रेष्ठ दर्जाचे व आदर्शवत् दिसून येतात. अत्यंत सयुक्तिक असें आपलें तंत्रशास्त्र त्यांनींच उजेडांत आणून तें आज लोकमान्यतेस पात्र केलें आहे.

वैदिक शास्त्रपरंपरेप्रमाणेंच तांत्रिक शास्त्रपरंपरा दिसते. वैदिकांच्या वेदोपनिषदांप्रमाणें शाक्तांचें अथर्ववेदाचें सौभाग्यनामक उत्तरकांड व त्यांचींच उपनिषदें व निगम ग्रंथ हे आहेत. त्यापुढें वैदिकांप्रमाणेंच तांत्रिक कल्पसूत्रें व सूक्तें आहेत. ब्रह्मसूत्रांप्रमाणें अगस्तीचीं शक्तिसूत्रें आहेत. तसेंच वैदिकांप्रमाणेंच तांत्रिकांचे दशविध संस्कार, तांत्रिक गायत्रि, तांत्रिक बीजें, दैशिक गुरु वगैरे विशेष आहेत. तांत्रिकांचे षडाम्नाय प्रसिद्ध आहेत. त्यांपैकीं चार चतुर्विध पुरुषार्थांकरितां व दोन केवळ मुक्तीकरितां आहेत. ते साधकांचे पशु, वीर व दिव्य, असे तीन वर्ग पाडतात[२]. तंत्रांत वेदान्त्यांच्या ज्ञानभूमिकांप्रमाणें सप्तविध किंवा नवविध आचार मानले आहेत. सारांश, त्यांचें धार्मिक वाङ्मय इतकें विपुल व भरीव आहे कीं, त्याची येथें त्रोटक रीतीनें कल्पना देतां येणें शक्यच नाहीं. पुढें जेथें जेथें जरूर वाटेल तेथें तेथें स्थलावकाशानुरूप विवेचन करीनच.

---

१ Shakti and Shakta, p. 94.

२ पद्मपुराण, उत्तर खंड, १९३।५१ पहा.

प्रकरण ७ वें

# शिवलिंगोपासक पंथ

( उत्तरार्ध )

आदिनाथं च मच्छेन्द्रं गोरक्षं गहिनीं तथा ।
निवृत्तिं ज्ञाननाथं च भूयो भूयो नमाम्यहम् ॥
नाथपंथका बाना यारो । सब दुनियासे न्यारा है ॥

—शिवदिनकेसरी.

आदिनाथ जे श्रीशंकर ते उमादेवीस उपदेश करीत असतां तो मत्स्येंद्रानें ऐकला व पुढें मत्स्येन्द्रनाथापासून हा संप्रदाय सुरू झाला असें मानतात. सांप्रदायिक दृष्टीप्रमाणें या नाथपंथाच्या दोनचार परंपरा रूढ आहेत. कच्छ प्रांतांतील धीनोधर मठांत पुढीलप्रमाणें परंपरा सांपडते:— (१) निरंजन निराकार, (२) अधर्म सोमनाथ, (३) चेत सोमनाथ, (४) ओंकारनाथ, (५) अचेतनाथ, (६) आदिनाथ, (७) मच्छेंद्रनाथ. दुसरी परंपरा अशी:— मूळ आदिनाथ म्हणजे शंकर व त्यांचे शिष्य मच्छेंद्रनाथ व जालंधरनाथ. तिसरी परंपरा:—(१) मूळ शक्ति, (२) तिचे शिव, (३) शिवाचे उदेनाथ, (४) त्यांचे जालधरनाथ व (५) या जालंधराचे मच्छेंद्र व दुसरा जालंधर. चवथी परंपरा अशी:—गरुड पुराणांत ८७ व्या अध्यायांत व रुद्रयामलाच्या उत्तरखंडांत ज्या रुद्रकुलाचें वर्णन आहे तेंच नाथकुल होय. ईश्वरपुत्र महायोगी, त्याचा बिंदुनाथ, त्याचा आदिनाथ ( कदयपाचा मुलीकडून पणतू ) व त्याचा मत्स्येंद्र किंवा मीननाथ. मत्स्येंद्राच्या अनेक शिष्यांत गोरखनाथ हा प्रमुख होता. मत्स्येंद्राचा कौलज्ञानविनिश्चयनामक तांत्रिक ग्रंथ होता. गोरखनाथांचे नांवावर हिंदी, व्रज, संस्कृत व मराठी भाषेंतहि बरेंच कावित्व आहे. नाथपथांचें मुख्य साधन हठयोग व तंत्र हें दिसतें. त्यांची शिव, भैरव, पाळासुंदरी अशीं मुख्य दैवतें आहेत.

पुढें पुढें निंद्य वामाचारांत व जादूटोण्यांत या पंथाचें अधःपतन झाल्याचें वर्णन इंग्रजी ग्रंथांतून आढळतें. पण उलट पक्षीं महाराष्ट्रीय संतांपैकीं

मुकुंदराज, निवृत्तिनाथ, ज्ञानेश्वर, बहिणाबाई इत्यादि अनेक संतांची गुरुपरंपरा नाथसंप्रदायाची आढळते, हें ध्यानीं ठेवलें पाहिजे.

श्रीगोरखनाथांच्या दूरवर संचाराप्रमाणें त्यांच्या नांवावर मोडणारा वाङ्मयविस्तार पण अवाढव्य आहे. हठयोगप्रदीपिका, गोरखनाथकी गोष्ठी, गोरखनाथका वचन, गोरखबोध, इत्यादि ग्रंथ विशेष प्रमाणभूत मानतात. यांशिवाय मत्स्येन्द्रसंहिता, गोरक्षसंहिता, अमरौघशासन असे कांहीं संस्कृत ग्रंथ आहेत. शिव हा परमदेव असून त्याच्यामध्यें मानवी आत्म्यानें योगमार्गानें लीन होऊन जाणें हेंच यांचें अंतिम ध्येय होय. औपनिषदिक व पातंजल योगपद्धतीशीं त्यांच्या पद्धतीचें बरेंच साम्य आहे. आचार्यांचा अद्वैत सिद्धान्त त्यांनीं बहुतांशांनीं स्वीकारला आहे. शुद्ध नाथपंथांत सगुणोपासनेचा पुरस्कार नाहीं व स्पष्ट विरोध पण नाहीं. शिव आणि गुरु या देवतांवर या पंथांत परमनिष्ठा दिसून येते.

कुलकुंडलिनीयोगसाधनाच्या द्वारां पिंडाला पिंडानें ग्रासणें हें नाथसंप्रदायाचें रहस्य आहे, असें ज्ञानेश्वर सांगतात (ज्ञानेश्वरी ६।२९१ पहा). मच्छिंद्र, गोरख, गहिनि, निवृत्ति व ज्ञानेश्वर या परंपरेंतील तत्त्वज्ञान ज्ञानेशांच्या वाङ्मयांत दिसून येतें. तसेंच आदिनाथ, हरिनाथ, रघुनाथ, आणि मुकुंदराज या परंपरेंतील तत्त्वज्ञानाचे शेवटले ग्रंथ विवेकसिंधु व परमामृत हे प्रसिद्ध आहेत. महाराष्ट्रीय शैवपंथ शांकरसंप्रदायांत विलीन झाला; तसेंच महाराष्ट्रांतील नाथपंथाचें म्हणावेंसें वाटतें. त्याच्या आचारविचारांचें वैशिष्ट्य फारसें कोठें आढळत नाहीं. कदाचित् तो पंथ जगाशीं फटकून असेल.

नाथपंथाचा संबंध कोणी साक्षात् शंकराशीं (आदिनाथ) तर कोणी बौद्धांच्या महायान पंथाशीं जोडतात. मनाचा लय शून्यांत करण्याचा उपदेश या पंथांत केलेला असतो. नाथपंथ हा शैव असल्यामुळें शैवांचे संन्याशी, दंडी, परमहंस, ब्रह्मचारी, लिंगायत, अघोरी व जोगी असे जे सात भेद आहेत,

१ गोरक्ष किमयागार, गोरक्ष शतक, गोरक्ष गीता, गोरक्ष कल्प, गोरखबोध, दत्त-गोरक्ष संवाद, योगचिंतामणी, ज्ञानसिद्धान्त योग, योगमार्तंड, विवेकमार्तंड, सिद्धान्तपद्धति, असे त्यांचे ६०।७० ग्रंथ आढळतात.

त्यांपैकीं शेवटच्या पंथांत नाथपंथाची गणना होते[१]. नवनाथभक्तिसार व नाथलीलामृत असे मुख्य नाथांच्या चरित्रपर ग्रंथ मराठींत आहेत. नाथलीलामृत ग्रंथांत (१) प्रकाशनाथ, (२) विमर्शनाथ, (३) आनंदनाथ, (४) ज्ञाननाथ, (५) सत्यानंदनाथ, (६) पूर्णानंदनाथ, (७) स्वभावानंदनाथ, (८) प्रतिमानंद, आणि (९) सुभगानंद, अशीं जीं नांवें दिलीं आहेत, त्यांहून नवनाथभक्तिसारांतील नवनाथांचीं नांवें वेगळींच आहेत.

नऊ, चवदा, चवऱ्यायेंशी अशा मुख्य नाथांच्या निरनिराळ्या याद्या प्रसिद्ध आहेत. या नाथांचीं अविवेचक अशा सांप्रदायिक भाविकांनीं लिहिलेलीं परम अद्भुत चरित्रें एका बाजूस व नाथसांप्रदायिकांची विशेषेंकरून लिंगोपासना इत्यादि विषयांत बहुतांशीं निंदाच केलेली आहे, असे अभाविक व असंप्रदायी आधुनिकांनीं लिहिलेले ग्रंथ दुसरे बाजूस. या दोन अग्राह्य अशा वाटणाऱ्या टोकांतील निर्मळ सत्य शोधून काढणें फारच कठिण आहे. पण विशेषेंकरून महाराष्ट्रीयांकरितां लिहिलेल्या या ग्रंथांत त्याची तितकी आवश्यकताहि वाटली नाहीं. म्हणून मी या संशयग्रस्त विषयाचा जास्त अभ्यास केला नाहीं. मी स्वतः नाथसांप्रदायींच आहें. पण माझा नाथसंप्रदाय नाममात्र आहे. सांप्रदायिक वैशिष्ट्य त्यांत कांहींच नाहीं.

**(४) वीरशैव लिंगायतपंथ:**—शिवोपासक ते शैव. त्यांच्यांत (१) वैदिक, (२) आगमानुसारी व (३) भक्तीमार्गी असे ज्याप्रमाणें भेद पडले, त्याप्रमाणें लिंगायतपंथांत मुख्य दोन भेद पडले आहेत. प्राचीन श्रुतिस्मृतिपुराणाभिमानी ते आराध्य असा एक पंथ आहे. त्यांच्यासंबंधीं अशी एक आख्यायिका आहे कीं, जेव्हां शिवानें ब्रह्मदेवास सृष्टि उत्पन्न करण्यास सांगितलें तेव्हां ब्रह्मदेवास तें प्रथम साधेना. म्हणून शिवानें नमुन्याकरितां कांहीं सृष्टि निर्माण केली. वीरशैवांतील शिवलिंगोद्भव पंच आचार्य आणि पंचम, तसेंच त्यांचीं गोत्रें व शाखा ही ती शिव-सृष्टि होय. दुसरा पंथ लिंगायतांचा. तो पंथ बाराव्या शतकांत बसवाचार्य नामक एका धर्मसुधारकानें स्थापन केला किंवा पुनरुज्जीवित केला. तेव्हां त्या काळीं विस्कळित झालेल्या कांहीं वैदिकब्राह्मणधर्मविरोधी समाजास

१ Campbell Oman— The Mystics, Ascetics and Saints of India, Ch. VIII.

त्यानें आपल्या जातिभेदरहित लिंगायतपंथांतर्गत शिवभक्तिमार्गांत संघटित केलें. यांच्या मतप्रणालीचें मूळ (१) वेदविरोधी द्राविडांच्या शैवधर्मांत आहे. तसेंच तें (२) दक्षिणेंतील ६३ नयनार शिवभक्तांच्या भक्तिपंथांत, आणि अंशतः (३) काश्मिरी शैवपंथांत आहे, असें म्हणतात. हा अर्वाचीन पंथ श्रीबसवाचार्यादि लिंगवंतांच्या अथवा शरणांच्या वचनांनाच शास्त्रप्रमाणें मानतो.

वरील तीन शैवपंथांप्रमाणें या लिंगायतपंथाचें आराध्य दैवत शक्तिविशिष्ट शिव हेंच आहे. शिवलिंग या प्रतीकाचीच ते पूजा करतात. यामुळें बौद्ध जैनापेक्षां ते हिंदुधर्माला जवळचेच वाटतात. आरंभीं साधकावस्थेंत ते द्वैत मानीत असले, तरी परिणामीं ते शिवसायुज्यवादीच आहेत.

प्राचीन वैदिकपरंपरा मानणारे आराध्य वीरशैव आणि बसवाचार्यानुयायी अर्वाचीन लिंगायत यांच्यांत धर्मस्थापना, धर्माचार, श्रुतिस्मृतिपुराणें, तसेंच श्रौतसूत्रें, स्मार्तसूत्रें व धर्मसूत्रें यांचें प्रामाण्य व चातुर्वर्ण्याश्रमधर्म इत्यादि बाबतींत तीव्र मतभेद आहेत. आराध्य वीरशैवांच्या मतानें त्यांचे धर्मसंस्थापक पंचाचार्य यांचा आविर्भाव प्रथम शिवाच्या पंचमुखांतून व नंतर वेळोवेळीं शिवलिंगांतून झालेला आहे व त्यांनीं (१) रंभापुरी, (म्हैसूर), (२) उज्जयिनी, (३) केदार, उखीमठ, (४) श्रीशैल, व (५) श्रीक्षेत्र काशी येथें मठस्थापना करून व अनेक ग्रंथरचना करून शैवधर्मप्रचार अति प्राचीन कालापासून केलेला आहे. या पंचाचार्यांच्या कलियुगांतील अवतारांचीं नांवें, (१) रेवणसिद्ध (हेच रेणुकाचार्य असें कोणी म्हणतात), (२) मरूळसिद्ध, (३) एकोरामाध्य, (४) पंडिताराध्य आणि (५) विश्वाराध्य, अशीं होतीं. यांच्या गांवांची अथवा सिंहासनांची परंपरा अद्यावत् सुरूच आहे. उलट बसवाचार्यानुयायी एक विद्वान् लेखक म्हणतात कीं, या पंचाचार्यांच्या आविर्भावाच्या आख्ययिका सर्वस्वीं निराधार आहेत. उलट रेणुक व रवण हे आचार्य बसवाचार्यांच्या मागूनचे असून त्यांचा

१ पूर्वसृष्टिसमुद्भवात् परशिवादुद्भूय सद्वैभवात्
सिद्धान्तं श्रुतिसिद्धमद्भुततमं संस्थाप्य संविश्रुताः।
सिद्धस्तोमसुरद्रुमाः सुरवरैः संसेव्यमानाः सदा
पञ्चाचार्यगुरूत्तमाः सकरुणं सिद्धिं वितन्वन्तु मे ॥

लिंगायतधर्मसंस्थापनेशीं अर्थाअर्थी कांहींच संबंध नाहीं. तसेंच श्रीबसवाचार्यांनीं पुनरुज्जीवित केलेल्या लिंगायतधर्माचा उगम बाराव्या शतकांत झाला नसून तो वेदांच्याहि पूर्वकालीं रूढ असलेल्या द्राविड शैवधर्मांतून झाला आहे. असे या पंथांत हे धर्मस्थापनेबद्दल तीव्र मतभेद असले, तरी पंचाचार, अष्टावरण, षट्स्थल, लिंगधारणा, लिंगोपासना अशीं जीं त्यांचीं धार्मिक साधनें, त्यांत दोन्ही पंथांत पुष्कळ साम्य आहे. आणवमल, (परिच्छिन्नभाव), मायामल (अज्ञानमोह), कार्मिकमल (रागद्वेषादि) यांच्या निरासासाठीं उभय पंथांतील साधनांत बरेंच साम्य आहे. पंचाचारानें समाजोन्नति, अष्टावरणानें वैयक्तिक उन्नति व षट्स्थलानें आत्मोन्नति साधतां येते, असें दोन्ही पंथ सारखेंच मानतात. श्रौतसूत्रें, स्मार्तसूत्रें व धर्मसूत्रें यांचें प्रामाण्य मात्र आराध्य वीरशैव मानीत असले तरी अर्वाचीन लिंगायत तद्विरोधीच आहेत. आराध्य वीरशैव हे आगम पुराणेतिहास यांसहि प्रमाण मानतात. शैवांचीं ३६ तत्त्वें हे मानतात.

प्रत्येक शैवपंथाचा उगम शिवापासूनच मानला आहे. त्याचप्रमाणें वीरशैवांच्या पंचाचार्यांचाहि उद्भव मानला आहे. यांतील श्रीरेवणसिद्ध हे प्रथम शिवाच्या सद्योजात मुखातून प्रगट झाले व पुढें युगभेदानें अंशतः नामभेदानें त्यांनीं अवतार धारण केले. कलियुगाच्या आरंभीं ते आंध्र प्रांतांत कोलिपाक नगरांत सोमेश्वरनामक शिवलिंगांतून प्रकट झाले. त्यांनीं अठरा मठ स्थापन केले व पुढें दीर्घ कालानंतर आपलें अवतारकार्य संपवून ते पुन्हा त्याच शिवलिंगांत गुप्त झाले. त्याचे कांहीं ग्रंथ प्रसिद्ध आहेत. त्यांचें एक ब्रह्मसूत्रावर भाष्य पण आहे. त्यांनीं वीरशैवांच्या शक्तिविशिष्टाद्वैत मताची स्थापना केली. श्रुतींत कांहीं श्रुति द्वैतपर व कांहीं अद्वैतपर वाटतात. त्यांचा समन्वय द्वैती व केवलाद्वैती यांपैकीं कोणासच नीट करतां आला नाहीं, तो या शक्तिविशिष्टाद्वैतांत केला आहे, असें या पंथाचें वैशिष्ट्य सांगतात. हा पंथ फार प्राचीन आहे. याच्या सिद्धान्तशिखामणि या ग्रंथांत श्रीरेवणसिद्धांनीं (रेणुकाचार्यांनीं) अगस्ति मुनींस उपदेश केला, तो दिला आहे. तसेंच श्रीरेणुकाचार्यांनीं आद्य शंकराचार्य यांस श्रीचंद्रमौळीश्वरलिंग देऊन त्यांनीं आचार्यांवर अनुग्रह केला, असें या पंथाच्या अनेक ग्रंथांत वर्णन आढळतें. याहि पूर्वीची पौराणिक आख्यायिका

अशी सांगतात कीं, लंकेंत यानीं विभीषणाच्या प्रार्थनेवरून एकदमच तीन कोटि रूपें धारण करून तितकीं शिवलिंगें स्थापन केलीं. या पंथाच्या भेदाभेदवादात शक्तीचें स्वरूप दोन प्रकारचें मानलें आहे: (१) सूक्ष्म चिदचिद्विशिष्ट म्हणजे परशिव व (२) स्थूलचिदचिद्विशिष्ट शक्ति म्हणजे जीव, असा भेद आहे. या पंथात अनेक सत्पुरुष निर्माण झाले. प्रसिद्ध श्रीसिद्धारूढस्वामी याच पंथातील असावेत. आधुनिक संत प्रो. रामभाऊ रानडे, एम्. ए. हे मूळ रेवणसिद्धांच्या गुरुपरंपरेंतील असावेत, असें ऐकतों.

श्रीबसवेश्वरांच्या लिंगायतपंथाचे वैशिष्ट्य थोडक्यांत सांगावयाचें तर, (१) ते वर्णजातिभेद मानीत नाहींत, (२) ते धर्मकर्मांत स्त्री-पुरुषांचा सारखाच अधिकार मानतात, (३) त्यांचें तिसरें तत्त्व अहिंसा. ते शाकाहारी आहेत, (४) सौलभ्य हें यांचें चवथें वैशिष्ट्य. यांत यज्ञयाग, व्रतवैकल्यें, संस्कार, वर्णाश्रमधर्म, प्रायश्चित्त, तपाचरण, इत्यादि कर्मकांड नाहीं. (५) ते यात्रा-जत्रा, तीर्थ, क्षेत्र, देवांच्या मूर्ति, कीर्तनसंप्रदाय वगैरे रूढींना मानीत नाहींत. "अल्पायासं बहुफलं" असा त्यांचा सुलभ भक्तिमार्ग आहे. या पंथांत लिंगांगी लोकांनीं लिंगच ईश्वराचें प्रतीक असून, भोगीच त्यागी व योगी बनून, नीतीच्या पायावर आधारलेल्या पंचाचाररूपी पटांगणांत, अष्टावरणरूपी आवरणांनीं मोक्षाच्या षट्स्थल सोपानावर भक्तिप्रभावानें चढून शिवानुभव म्हणजे लिंगांगसामरस्याचा आनंद सर्वांनीं उपभोगावा असें यांच्या मताचें सार आहे. या पथांत कोणत्याहि धंद्याला हीन मानीत नाहींत. स्पृश्यास्पृश्य भेद नाहीं. शरिरावरील लिंगधारणेप्रमाणें श्रमोपजीवी व्यवसाय या पंथांत प्रत्येक लिंगवंताला अवश्य मानला आहे. जगमानेंसुद्धां चरितार्थाकरितां उद्योग केलाच पाहिजे, असें या पंथाचें धोरण आहे गळ्यांत अगर दंडावर लिंग धारण करणें, हें उभय पंथांचें समान वैशिष्ट्य दिसतें. श्रीबसवेश्वर शिवास म्हणतात, "विश्वव्यापी, आकाशव्यापी, फार काय याच्याहिपेक्षां व्यापक असा तूं. तुझे पाद पाताळापेक्षांहि पलीकडे असून तुझें मस्तक ब्रह्मांडाला भेदून गेलेलें आहे. एवढें असूनसुद्धा तुझें कोणाला ज्ञान नाहीं; आणि तुझी योग्यता कोणत्याहि उपमेनें अगर प्रमाणानें करतां येत नाहीं. तूं अगोचर आहेस, आणि अप्रतिमहि आहेस, आणि देवा, एवढा महान् असूनसुद्धां तूं माझ्या हाताच्या तळव्यावर (ह्या पंथांत तळहातावर

लिंग ठेवून पूजा करतात.) येऊन वसल्यामुळें माझ्या मुठींत मावण्यासारखा सान बनून राहिला आहेस."

शक्तिविशिष्ट वीरशैव व लिंगायत यांच्या तत्त्वज्ञानाचे अति त्रोटक निर्देश पुढें देत आहे. विस्तारभयास्तव अधिक लिहितां येत नाहीं.

**लिंगांगसामरस्यविचार**—वीरशैवसिद्धान्तांत परशिव ब्रह्मास 'स्थल'* म्हणतात. हें स्थल अंग-स्थल (जीव) व लिंग-स्थल (परशिव) असें द्विधा मानतात. भक्त्यानुग्रहास्तव लिंग, स्थूल, सूक्ष्म व कारणनामक शरीरस्थान-भेदानें इष्टलिंग आचारलिंग व गुरुलिंग, प्राणलिंग, शिवलिंग, जंगम-किंवा चरलिंग, आणि भावलिंग (प्रसादलिंग व महालिंग) असें षड्विध मानतात.* तसेंच अंगसुद्धां त्यागांग (भक्त व महेश), भोगांग (प्रसादी व प्राणलिंगी) आणि योगांग (शरण व ऐक्य) असें सहा प्रकारचें आहे. अवांतर भेदांनीं अंगस्थळ चव्वेचाळीस प्रकारचें व लिंगस्थळ सत्तावन

---

* स्थ=स्थान–स्थिति+ल=लय. स्थीयते लीयते यत्र जगदेतच्चराचरम्। तद्ब्रह्म स्थलमित्युक्तं स्थलतत्त्वविशारदैः॥ स्वशक्तिक्षोभमात्रेण स्थलं तद्द्विविधं भवेत्। एकं लिङ्गस्थलं प्रोक्तमन्यदङ्गस्थलं स्मृतम्॥ लीयते गम्यते यत्र जगत्सर्वं चराचरम्। तदेतत् लिङ्गमित्युक्तं लिङ्गतत्त्वपरायणैः॥

—अनुभवसूत्र, २।१०, ३।३

१ स्थूल देहावर धारण करण्यांत येतें तें. २ प्राणाख्य प्राणरूप (प्राणाचा संचार, संयम इत्यादि). ३ जिव्हेवरील (मंत्रोच्चार, रसग्रहण). ४ सूक्ष्म शरीरावर धारण करावयाचें तें. ५ नेत्राख्य. ६ त्वग्रूप. ७ कारणशरीरावर धारण करावयाचें तें. ८ श्रोत्र ९ मन. १० गुरुलिंग व जंगम यांचें ऐक्य योगानुसंधान. ११ अर्थ उघड आहे. उपासक. १२ दानध्यानादींत निष्णात. १३ गुरुलिंग, जंगमाला अर्पण केलेल्या प्रसादाचा स्वीकार. १४ निर्मल ज्ञानास कारण होणारा शिवप्रसाद. १५ परशिव चित्स्वरूप व तन्निष्ठ शक्तिप्राणस्वरूपलिंग या दोहोंचें प्रतीक हें जाणणारा. १६ गुरुलिंग, जंगमाला निर्वचनापूर्वक तनमनधनाचें अर्पण. १७ आपण सति व लिंग आपला पति मानून प्रापंचिक सुख विवर्जित होणारा. १८ शिवोऽहं भावनेनें शिवैक्यसाधन.

प्रकारचें मानतात. या सर्व लिंगांगसामरस्याचें ज्ञान हेंच वीरशैव मतात मोक्षास मूलकारण आहे

या पथातील अति मुख्य भाग म्हणजे षट्स्थल होय ही प्रक्रिया थोडी-फार स्वतंत्रच वाटल्यामुळें त्याचें येथें दिग्दर्शन करीत आहे असें सांगतात की, परिपूर्ण परब्रह्म सपूर्णानंदात असता त्याच्या ठिकाणीं पूज्यपूजकलीला उत्पन्न झाली तेव्हा या पूर्णब्रह्माच्या स्वप्रकाशात एक प्रकारचें चलन होऊन न्यूनाधिकभावानें दोन भाग निर्माण झाले. त्यापैकीं लहान व अपूर्ण भाग म्हणजे अंगस्थल (अर्थात् उपासक जीव) व पूर्ण भाग म्हणजे लिंगस्थल होय एका दिव्यानें दुसरे असंख्य दिवे लावले तरी पहिल्यात काहीं न्यूनता येत नाहीं त्याप्रमाणें असंख्य अंगस्थलाच्या निर्मितीमुळें लिंगस्थलात अपूर्णता येत नाहीं

"अंगस्थलप्रतिपाद्यभक्त, लिंगस्थलप्रतिपाद्य आचारलिंगाचें अंग असल्या-मुळें तो आचारलिंगाशीं सामरस्य पावतो त्याचप्रमाणें माहेश्वर गुरुलिंगाशीं, प्रसादी शिवलिंगाशीं, प्राणलिंगी जंगमलिंगाशीं; शरण प्रसादलिंगाशीं; व ऐक्य, महालिंगाशीं, सामरस्य पावतात तसेंच आचारलिंग गुरुलिंगाशीं; गुरुलिंग शिवलिंगाशीं, शिवलिंग जंगमलिंगाशीं, जंगमलिंग प्रसाद-लिंगाशीं, प्रसादलिंग महालिंगाशीं व महालिंग परशिवब्रह्मरूपघनलिंगाशीं सामरस्य पावून अखंडानंदाचा अनुभव घेत राहातात नद्या समुद्राला मिळाल्यावर नामरूप विसरून जशा त्याच्याशीं एकरूप होतात, तसा शिव-ज्ञानयुक्त वीरशैव नामरूपापासून विमुक्त होऊन परशिवाशीं सामरस्य पावतो"

अंग हा विषयी अथवा साधक जीव आहे, लिंग हें साध्य अथवा विषय आहे. त्याचें सामरस्य हें ध्येय आहे तें ध्येय गाठण्याचे मार्गात साधक अंगाची किती प्रगति झाली व साध्य लिंग कितपत आटोक्यात आलें,

---

१ मुंडक ३।२।८.

जलेजलमिवन्यस्त वह्नौ वह्निरिवार्पित. ।
परेब्रह्मणि लीनात्मा विभागेन न दृश्यते ॥

— सिद्धान्तशिखामणि २०१२.

असा दुहेरी विचार या साधनमार्गांत अभिप्रेत आहे. याप्रमाणें त्यागांगीचें इष्टलिंगाशीं, भोगांगीचें प्राणलिंगाशीं व योगांगीचें महालिंगाशीं ऐक्य होतें.

वीरशैवांच्या शक्तिविशिष्टाद्वैतपंथात लिंग व स्थल यांस वेदान्तांतील क्षेत्र व क्षेत्रज्ञ या शब्दांप्रमाणें फार महत्त्व आहे. पण लिंग व स्थल यांच्या ठिकाणीं त्यांनीं शक्तीचा भेदाभेद मानला आहे. या पंथांतील पंचाचार्य, पंचम व जंगम यांचें जें वर्णन केलें आहे, त्यात विरक्तीलाच महत्त्व दिलें आहे. उपपंचमांत मरारी व वेदारी हे जसे आहेत, तसेंच स्मरारि पण आहेत. त्यांच्या साधनमार्गांतहि कापालिक, कालामुख, वाममार्गी-तांत्रिक, यांच्याप्रमाणें भैरवीचक्रपूजा, योनिपूजा, पंचमकार असे प्रकार नाहींत. वीरशैव हे शक्तिविशेष योनीचे पूजक नसून शक्तिविशिष्ट लिंगाचे पूजक आहेत. शक्ति व शक्तिमान् यांच्या ठिकाणीं ते भेदांत अभेद पाहातात. त्यांचें लिंग म्हणजे शिवच. लिंग म्हणजे शिवाचा अवयव किंवा चिन्ह नव्हे. अर्थात् त्यांची शिवलिंगोपासना ही मूर्तिपूजा नसून तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें त्यांचे शक्तिविशिष्टाद्वैत हे शंकराचार्यांच्या केवलाद्वैताच्या जवळजवळच आहे.

श्रीबसवानुयायी लिंगायत आपले पंथास शक्तिविशिष्टाद्वैत असेंच म्हणतात. काश्मिरी शैवपंथांत शिवाच्या ठिकाणीं शक्ति अविनाभूत असल्याचें गृहीत धरलेंच आहे. तीच गोष्ट लिंगायतांनीं आपल्या धर्मांत शिवाला स्पष्टपणें शक्तिविशिष्ट मानून उघड केली आहे. पण लिंगायतांचें हें विशिष्टाद्वैत रामानुजांप्रमाणें द्वैतविशेषमूलक नाहीं. तें निर्विशेषाद्वैत आहे. शंकराचार्यांचा मायावाद ब्रह्मशक्ति मानीत नाहीं. नामरूपात्मक मायेची ते अजातीच मानतात. लिंगायत व काश्मिरी शैव मायावाद या अर्थानें मानीत नाहींत. ते शिवाप्रमाणें शिवशक्तीला, शिवसंकल्पाला व सकलरूप सृष्टीला शिवरूप म्हणजे सत्यरूप मानतात. अघटितघटनापटीयसी ही शिवाची सृष्टिजनकशक्ति ते खरीच मानतात. याप्रमाणें त्यांचा शिव किंवा परब्रह्म शक्तिविशिष्ट आहे. पण या शक्तिविशेषाला ते शाक्तांप्रमाणें सर्वस्व मानीत नाहींत. इतकेंच काय—पण लिंगायत धर्मांत शाक्तांची शक्ति, सांख्यांची प्रकृति, वेदान्त्यांची माया, शैवांची शक्तिदेवता, याप्रमाणें शक्तीचा उपास्यभेदानें कोठें उल्लेखहि मात्र आढळत नाहीं. त्यांच्या अंगावर धारण करावयाच्या शिवलिंगांत शक्ति अव्यक्तच मानलेली असते.

## शक्तिविशिष्ट वीरशैव लिंगायतांचें शिव-शक्ति-भक्तीचें कोष्टक










[ पुढील पानावर पहा. ]

[ मागील पानावरून चालू ]




वर ज्या शिवलिंगोपासक चार पंथांची स्थूल व त्रोटक माहिती दिली आहे, त्याहून अन्यहि शिवलिंगोपासक संप्रदाय किंवा समाज देशीं विदेशीं असतील, त्यांचा मीं शोध घेतला नाहीं. या चार पंथांत कट्टे केवळ शिवलिंगोपासक वीरशैव व लिंगायत हेच होत. नाथसंप्रदायापैकीं कानफाटे सोडून दिले, तर ह्या संप्रदायाचें आज रूढ असें व्यावर्तक स्वरूप निदान महाराष्ट्रांत तरी मला आढळलें नाहीं. श्रीज्ञानेश्वरदर्शन भाग १ यांत ' ज्ञानेश्वरांचा नाथपंथ, ' या विषयावर एक विस्तृत निबंध आहे. त्यांत नाथपंथ हा शैवपंथ नसून पंढरीच्या विठ्ठलाचा संप्रदायी पंथ आहे, असा निष्कर्ष काढला आहे. त्यांत त्यांनीं एकनाथांचा एक अभंग दिला आहे तो असा :— " ध्यानीं बैसोनि शंकर । जपे रामनाम सार ॥ पार्वती पुसे आवडी । काय जपतां तांतडी ॥ मंत्र तो मज सांगा । ऐसी बोलतसे दुर्गा ॥ एकांतीं नेऊन । उपदेशी राम अभिधान । तेंच मच्छेंद्रा लाधलें । पुढें परंपरा चाललें ॥ तोचि बोध जनार्दनीं । एका लागतसे चरणीं ॥ १ ॥ " या अभंगावरून एकनाथ हे वैष्णवपंथी असावेत, असें अनुमान काढलें आहे. आतां मत्स्येंद्रनाथ म्हणजे महाविष्णु ( अवतार ) असेंच सर्व नाथपंथी मानतात. सिद्धान्तसार, ज्ञानेश्वरी

* टीप :—शैवांचीं पहिलीं पांच तत्त्वें अशीं आहेत : ( १ ) शिव, ( २ ) शक्ति, ( ३ ) सदाशिव, ( ४ ) ईश्वर, ( ५ ) शुद्धविद्या. या कोष्टकांत शिवापूर्वी एक परशिव मानल्यामुळें एका आंकड्यानें अनुक्रमांक वाढतो असें समजावें. म्हणजे कोष्टकाशीं मेळ बसेल.

वगैरे अर्थात् तसें स्पष्ट आहे. तसें मानल्यास मत्स्येंद्रनाथांनीं म्हणजे महाविष्णूनें आपलाच विठ्ठलसंप्रदाय रूढ केला, हें म्हणणें ठीक वाटत नाहीं. महाविष्णु हे परमशिवभक्त होते. यास पंढरीचा श्रीविठ्ठलच साक्ष आहे. " विठोनें शिरीं वाहिला देवराणा !" तोच शिव होय. तेव्हां नाथपंथ हा शैवपंथ आहे, हा जो रूढ समज आहे, तो निराधार वाटत नाहीं. या वादांत अधिक खोल जाण्यास येथें अवकाश नाहीं व आवश्यकताहि वाटत नाहीं.

या चारी पथाच्या निर्मितींत एक सर्वसाधारण उद्दिष्ट दिसते. तें असें कीं, वैदिक कर्मकांडानें ब्राह्मणेतरांची कोंडी केली. तसेंच आद्यशंकराचार्य याच्या केवलाद्वैतवादानें, म्हणजे मायावाद, जगन्मिथ्यात्ववाद, प्रपंच-विन्मुखता, सन्यासनिष्ठा, अजातवाद, इत्यादि अखेरच्या सिद्धांतांनीं सर्वसाधारण अजाण व विषयी समाजांत एक प्रकारचा अनवस्था प्रसग उत्पन्न केला. यामुळें दिङ्मूढ झालेल्या बहुजनसमाजाच्या धारणेस धार्मिक तत्त्वज्ञानाचा आधार नाहींसा झाला. अशा स्थितींत वर्णजातीभेदांकडे व याज्ञिककर्मकांडाकडे दुर्लक्ष करून सर्वसाधारण समाजाचा धर्मदृष्ट्या संग्रह करावा व त्यास आत्मोन्नतीचा मार्ग दाखवावा, यासाठीं भागवतादि संप्रदाय निर्माण झाले, तसेंच हे शैवभक्तिसंप्रदाय लोकसंग्रहाच्या निकडीमुळें निर्माण झाले असावेत, असें त्या पंथांतील जातीनिरपेक्ष सामान्य व उदार धोरणावरून दिसतें. मग वारकरी संप्रदायांत मागून जसा वैदिक कर्ममार्गाच्या विरोधाचा भास उमटूं लागला, तसेंच याहि पंथास पुढें पुढें वैदिकविरोधाचें अनिष्ट स्वरूप प्राप्त झालें असावें. तरी पण त्यांनीं हिंदुसंस्कृतीचें व तत्त्वज्ञानाचें मूळ तत्त्व सोडलें नाहीं, म्हणून त्यांस अवैदिक म्हणतां येत नाहीं.

त्रयी सांख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमिति । प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमदः पथ्यमिति च । रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथजुषां । नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥ ७ ॥ शिवमहिम्न-

## प्रकरण ८ वें

# शिवभक्त

........

देव तोचि संत । संत तोच देव ॥

पर पुरुषाचें सुख भोग तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥
संवसारा आगी आपुलेनी हातें । लावूनी मागुतें पाहूं नये ॥ २ ॥
तुका म्हणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपावरी ॥ ३ ॥

कोटिजन्मार्जितैः पुण्यैः शिवे भक्तिः प्रजायते । —शिवगीता १।१६
त्यागेनैके अमृतत्व मानुशुः । —कैवल्य उप. २

सा विद्या या विमुक्तये ।
शिवो भूत्वा शिवं भजेत् ।

मागील प्रकरणांत आपल्या देशांतील शिवलिंगोपासक पंथांची त्रोटक माहिती दिली. शिवभक्ति ही केवळ पंथविशिष्ट नसून त्याहून प्राचीन व व्यापक असावी असें दिसतें. शिवभक्तांचें व शिवभक्तीचें वर्णन शिवपुराण, लिंगपुराण, वायुपुराण, स्कंदपुराण, अशीं शैव पुराणें व पेरीयपुराण, शिवभक्त-विलास, अशीं शैव उपपुराणें यांतच केवळ नसून इतर सर्व पुराणांत व महाभारत-रामायणासारख्या जगन्मान्य इतिहासग्रंथांतहि शिवभक्तीची तात्त्विकता व व्यापकता मुक्तकंठानें सविस्तर वर्णिली आहे. अशा शिवभक्तीचें थोडें दिग्दर्शन या प्रकरणांत करीत आहें.

संताचा महिमा बहु तो दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं तेथें ॥ १ ॥
बहु दुधड जरी झाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे अंगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ ३ ॥

\+ \+ \+

जाणें त्याचें वर्म नेणें त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥ १ ॥
मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवाविण कळू न ये ॥ २ ॥
तुका म्हणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण [illegible] ॥ ३ ॥

हे श्रीतुकोबारायाचे उद्गार शिवभक्तमहिम्याला [illegible] समर्पक [illegible]. शिवभक्तिरहस्य स्वानुभवी शिवभक्तच जाणू शकतात. आधुनिक [illegible] बुद्धि-

वादातात तें कळणें अशक्यच आहे. शिवभक्ति हा बुद्धीचा विषय नसून भावनेचा व अनुभवाचा आहे. अनुभवसंपन्न भक्त हे पारमार्थिक योग्यतेनें सारे सारखेच खरे, पण काहीं शिवभक्त एकांगी, विक्षिप्त व कठोर असल्याचें भासतें. याचें कारण त्यांच्या ठिकाणची निस्सीम त्यागवृत्ति व वैराग्यवृत्ति होय. शिव हा योग आणि भोग दोन्ही देणारा आहे असे कोणी मानतात. पण भोगी शिवभक्त थोडेच आढळतात. रजोगुणापेक्षां सत्त्व व तम या गुणांचें तारतम्यानें आधिक्य शिवभक्तांत अधिक आढळतें. कारण त्यांचें उपास्य आंतून सत्त्वगुणी व बाह्यतः तमोगुणी असें मानलेलें आहे.

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेलीं जित असों निजोनिया जागे । जो जो जें जें मागें तें तें देऊं ॥ २ ॥
भले तरी देऊं ××× लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथां ॥ ३ ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हापुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचे परी ॥ ६ ॥

हें वर्णन वैष्णवभक्तांपेक्षां शैवभक्तांना जास्त लागू पडतें. असो. याविषयीं ह्या प्राथमिक खंडांत अधिक चिकित्सा न वाढवितां कांहीं आदर्श शिवभक्तांचा निर्देश मात्र करीत आहें.

**पौराणिक शिवभक्त**—महाभारताच्या अनुशासनपर्वांतील महादेवमाहात्म्य-कथन नामक १८ व्या अध्यायांत व्यासांनीं आपण मेरु पर्वतावर उग्रतपश्चर्येनें शिवाराधना कशी केली व त्याच्या सहस्र नामाचा कसा जप केला व शंकरास प्रसन्न करून घेतलें, तें सांगितलें आहे. नंतर सांख्य शास्त्रवेत्त्या कपिल मुनींनीं आपण अनेक जन्म मोठ्या भक्तीनें भगवान् शंकराची (देवता बुद्धीनें ?) आराधना केल्याचें व त्यास प्रसन्न केल्याचें सांगितलें आहे. नंतर इंद्राचा मित्र चारुशीर्ष यानें आपण गोकर्णक्षेत्रीं भगवान् शंकराची शंभर वर्षें उग्र तपश्चर्या करून त्याची कृपा संपादन केल्याचें सांगितलें आहे. नंतर महात्मा वाल्मीकीनेंहि आपण शंकराच्या आराधनेनें पापविमुक्त कसे झालों, तें निवेदन केलें. त्यानंतर जामदग्न्यानें जेष्ठ भ्रात्यांच्या वधानें लागलेलें ब्रह्महत्येचें पाप शिवास शरण जाऊन निवारण करून घेऊन अमरत्व प्राप्त करून घेतल्याचें वर्णन केलें. मग विश्वा-

मित्र म्हणाले कीं, "मीहि शंकराच्या कृपाप्रसादानेंच ब्राह्मणत्व प्राप्त करून घेतलें." नंतर असितदेवलानें आपणांस इंद्राचा शाप झाला असतां त्या भयावह परिणामापासून शिवभक्तीनें कसें सोडविलें तें वर्णन केलें. पुढें गृत्समदानें महादेवाच्या वरप्रसादानें आपण पशुयोनींतून कसे उद्धरलों, तें निवेदन केलें. नंतर वासुदेवानें आपण शंकराची आराधना दीर्घकाळ करून त्याची कृपा संपादन केल्याचें सांगितलें. नंतर जैगीषव्य म्हणाला कीं, "भगवान् महादेवाच्या भक्तीनेंच मीं त्याच्यापासून अष्टविध ऐश्वर्य मिळविलें." मग गर्गमुनि म्हणाले कीं, "शंकराच्या मानसपूजेनें त्यास तोषवून मीं त्याच्या कृपेनें चौसष्ट अंगांचें ज्ञान प्राप्त करून घेतलें." पुढें पराशर म्हणाले कीं, "भगवान् शंकराची तपश्चर्या केल्यामुळेंच मला व्यास हे पुत्र प्राप्त झाले." मांडव्य ऋषि म्हणाले कीं, "मला एकदां नाहक खोट्याच आरोपावरून सुळावर चढविलें असतां, मीं शंकराचा धांवा केला; तेव्हा त्यानीं मला संकटातून सोडवून दीर्घायु केलें." पुढें गालव ऋषींनींहि आपण शंकराच्या आराधनेनें कसे चिंताविमुक्त झालों तें वर्णन केलें.

या त्रोटक वर्णनावरून भगवान् शिवाच्या थोर थोर भक्तांची व त्याचें आराध्य दैवत जें शिव त्याच्या माहात्म्याची थोडी तरी कल्पना होईल.

याप्रमाणें इंद्रादि सर्व देवांनीं व श्रीरामासारख्या अवतारी पुरुषांनीं शिवाची आराधना केली आहे. सारे दर्शनकार[१] शिवभक्तच होते. यक्ष, गंधर्व शिवभक्त होते. तसेंच ऋषिवर्यांत शिलाद, शिलादपुत्र नंदी, दधीची, गौतम, अगस्ति, याज्ञवल्क्य, व्यास, वालखिल्य, सावर्णि, विकर्ण, शाकल्य, मार्कंडेय अशा सहस्रावधि प्रख्यात ऋषींनीं शिवभक्ति केली आहे. आचार्यांत श्रीमच्छंकराचार्य व त्यांच्या गादीवरील पुरुष, तसेंच वीरशैवाचे रेणुकाचार्य, दारुकाचार्य, श्रीएकोरामाराध्य, श्रीपंडिताराध्य आणि श्रीविश्वाराध्य हे लिंगोद्भव पंचाचार्य अलौकिक शिवभक्त होते. लिंगायतांचे पंथसंस्थापक बसवाचार्य हेहि कट्टे शिवभक्त होते. प्रसिद्ध नवनाथ हे शिवभक्त जगप्रसिद्धच आहेत. या सर्व पंथांत त्या पंथसंस्थापकाच्या अनुयायांतहि मोठमोठे योगी, शिवभक्त झालेलेच आहेत. श्री. अप्पय्या दीक्षित व श्रीकंठ हे महान् पंडित शिवभक्त होते. त्याच-

१ मूळ सारे दर्शनकार जरी ईश्वरवादी नसले, तरी उपास्यदेवता म्हणून शिवभक्त असू शकतील.

वादाला तें कळणें अशक्यच आहे. शिवभक्ति हा बुद्धीचा विषय नसून भावनेचा व अनुभवाचा आहे. अनुभवसंपन्न भक्त हे पारमार्थिक योग्यतेनें सारे सारखेच खरे, पण कांहीं शिवभक्त एकांगी, विक्षिप्त व कठोर असल्याचें भासतें. याचें कारण त्यांच्या ठिकाणची निस्सीम त्यागवृत्ति व वैराग्यवृत्ति होय. शिव हा योग आणि भोग दोन्ही देणारा आहे असें कोणी मानतात पण भोगी शिवभक्त थोडेच आढळतात. रजोगुणापेक्षां सत्त्व व तम या गुणांचें तारतम्यानें आधिक्य शिवभक्तांत अधिक आढळतें. कारण त्यांचें उपास्य आंतून सत्त्वगुणी व बाह्यतः तमोगुणी असें मानलेलें आहे.

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदूं ऐसे ॥ १ ॥
मेलों जित असों निजोनिया जागे । जो जो जें जें मागे तें तें देऊं ॥ २ ॥
भले तरी देऊं ××× लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथां ॥ ३ ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करूं घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हापुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरे कोड त्याचे परी ॥ ६ ॥

हें वर्णन वैष्णवभक्तांपेक्षां शैवभक्तांना जास्त लागू पडतें. असो. याविषयीं ह्या प्राथमिक खंडांत अधिक चिकित्सा न वाढवितां कांहीं आदर्श शिवभक्तांचा निर्देश मात्र करीत आहें.

**पौराणिक शिवभक्त**—महाभारताच्या अनुशासनपर्वांतील महादेव-माहात्म्य-कथन नामक १८ व्या अध्यायात व्यासांनीं आपण मेरु पर्वतावर उग्रतपश्चर्येनें शिवाराधना कशी केली व त्याच्या सहस्र नामाचा कसा जप केला व शंकरास प्रसन्न करून घेतलें, तें सांगितलें आहे. नंतर सांख्य शास्त्रवेत्त्या कपिल मुनींनीं आपण अनेक जन्म मोठ्या भक्तीनें भगवान् शंकराची (देवता बुद्धीनें?) आराधना केल्याचें व त्यास प्रसन्न केल्याचें सांगितलें आहे. नंतर इंद्राचा मित्र चारुशीर्ष यानें आपण गोकर्णक्षेत्रीं भगवान् शंकराची शंभर वर्षे उग्र तपश्चर्या करून त्याची कृपा संपादन केल्याचें सांगितलें आहे. नंतर महात्मा वाल्मीकीनेंहि आपण शंकराच्या आराधनेनें पापविमुक्त कसे झालों, तें निवेदन केलें. त्यानंतर जामदग्न्यानें जेष्ठ भ्रात्यांच्या वधानें लागलेलें ब्रह्महत्येचें पाप शिवास शरण जाऊन निवारण करून घेऊन अमरत्व प्राप्त करून घेतल्याचें वर्णन केलें. मग विश्वा-

वगैरे ग्रथांत तसें स्पष्टच आहे. तसें मानल्यास मत्स्येंद्रनाथांनीं म्हणजे महाविष्णूनें आपलाच विठ्ठलसंप्रदाय रूढ केला, हें म्हणणें ठीक वाटत नाहीं. महाविष्णु हे परमशिवभक्त होते. यास पंढरीचा श्रीविठ्ठलच साक्ष आहे. " विठोनें शिरीं वाहिला देवराणा ।" तोच शिव होय. तेव्हां नाथपंथ हा शैवपंथ आहे, हा जो रूढ समज आहे, तो निराधार वाटत नाहीं. या वादांत अधिक खोल जाण्यास येथें अवकाश नाहीं व आवश्यकताहि वाटत नाहीं.

या चारी पंथांच्या निर्मितींत एक सर्वसाधारण उद्दिष्ट दिसतें. तें असें कीं, वैदिक कर्मकांडानें ब्राह्मणेतरांची कोंडी केली. तसेंच आद्यशंकराचार्य यांच्या केवलाद्वैतवादानें, म्हणजे मायावाद, जगन्मिथ्यात्ववाद, प्रपंच-विन्मुखता, संन्यासनिष्ठा, अजातवाद, इत्यादि अखेरच्या सिद्धांतांनीं सर्वसाधारण अजाण व विषयी समाजांत एक प्रकारचा अनवस्था प्रसंग उत्पन्न केला. यामुळें दिङ्मूढ झालेल्या बहुजनसमाजाच्या धारणेस धार्मिक तत्त्वज्ञानाचा आधार नाहींसा झाला. अशा स्थितींत वर्णजातीभेदांकडे व याज्ञिककर्मकांडाकडे दुर्लक्ष करून सर्वसाधारण समाजाचा धर्मदृष्ट्या संग्रह करावा व त्यास आत्मोन्नतीचा मार्ग दाखवावा, यासाठीं भागवतादि संप्रदाय निर्माण झाले, तसेंच हे शैवभक्तिसंप्रदाय लोकसंग्रहाच्या निकडीमुळें निर्माण झाले असावेत, असें त्या पंथांतील जातीनिरपेक्ष सामान्य व उदार धोरणावरून दिसतें. मग वारकरी संप्रदायांत मागून जसा वैदिक कर्ममार्गाच्या विरोधाचा भास उमटूं लागला, तसेंच याहि पंथास पुढें पुढें वैदिकविरोधाचें अनिष्ट स्वरूप प्राप्त झालें असावें. तरी पण त्यांनीं हिंदुसंस्कृतीचें व तत्त्वज्ञानाचें मूळ तत्त्व सोडलें नाहीं, म्हणून त्यांस अवैदिक म्हणतां येत नाहीं.

**त्रयी सांख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमिति । प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमदः पथ्यमिति च । रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिलनानापथ-जुषां । नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥ ७ ॥** शिवमहिम्न-




## प्रकरण ८ वें

## शिवभक्त

........

देव तोचि संत । संत तोच देव ॥

पर पुरुषाचें सुख भोग तरी । उतरोनि करीं घ्यावें सीस ॥ १ ॥
संवसारा आगी आपुलेनी हातें । लावूनी मागुतें पाहूं नये ॥ २ ॥
तुका म्हणे व्हावें तयापरी धीट । पतंग हा नीट दीपावरी ॥ ३ ॥

कोटिजन्मार्जितैः पुण्यैः शिवे भक्तिः प्रजायते । —शिवगीता १।१६
त्यागेनैके अमृतत्व मानुषुः । —कैवल्य उप. २

सा विद्या या विमुक्तये ।
शिवो भूत्वा शिवं भजेत् ।

मागील प्रकरणांत आपल्या देशांतील शिवलिंगोपासक पंथांची त्रोटक माहिती दिली. शिवभक्ति ही केवळ पंथविशिष्ट नसून त्याहून प्राचीन व व्यापक असावी असें दिसतें. शिवभक्तांचें व शिवभक्तीचें वर्णन शिवपुराण, लिंगपुराण, वायुपुराण, स्कंदपुराण, अशीं शैव पुराणें व पेरीयपुराण, शिवभक्त-विलास, अशीं शैव उपपुराणें यांतच केवळ नसून इतर सर्व पुराणांत व महाभारत–रामायणासारख्या जगन्मान्य इतिहासग्रंथांतहि शिवभक्तीची तात्त्विकता व व्यापकता मुक्तकंठानें सविस्तर वर्णिली आहे. अशा शिवभक्तीचें थोडें दिग्दर्शन या प्रकरणांत करीत आहें.

संतांचा महिमा बहु तो दुर्गम । शाब्दिकांचें काम नाहीं तेथें ॥ १ ॥
बहु दुधड जरी झाली म्हैस गाय । तरी होईल काय कामधेनु ॥ २ ॥
तुका म्हणे अगें व्हावें तें आपण । तरीच महिमान येईल कळों ॥ ३ ॥

+ + +

जाणें त्याचें वर्म नेणें त्याचें कर्म । केल्याविण धर्म नेणवती ॥ १ ॥
मैथुनाचें सुख सांगितल्या शून्य । अनुभवाविण कळू न ये ॥ २ ॥
तुका म्हणे जळो शाब्दिक हें ज्ञान । विठोबाची खूण [illegible] ॥ ३ ॥

हे श्रीतुकोबारायाचे उद्गार शिवभक्तमहिम्याला [illegible] समर्पक [illegible]. शिवभक्तिरहस्य स्वानुभवी शिवभक्तच जाणू शकतात. आधुनिक रुक्ष बुद्धि-

वादाला तें कळणें अशक्यच आहे. शिवभक्ति हा बुद्धीचा विषय नसून भावनेचा व अनुभवाचा आहे. अनुभवसंपन्न भक्त हे पारमार्थिक योग्यतेनें सारे सारखेच खरे, पण कांहीं शिवभक्त एकांगी, विक्षिप्त व कठोर असल्याचें भासतें. याचें कारण त्यांच्या ठिकाणची निस्सीम त्यागवृत्ति व वैराग्यवृत्ति होय. शिव हा योग आणि भोग दोन्ही देणारा आहे असे कोणी मानतात पण भोगी शिवभक्त थोडेच आढळतात. रजोगुणापेक्षा सत्त्व व तम या गुणांचें तारतम्यानें आधिक्य शिवभक्तात अधिक आढळतें. कारण त्यांचें उपास्य आंतून सत्त्वगुणी व बाह्यतः तमोगुणी असें मानलेलें आहे.

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदू ऐसे ॥ १ ॥
मेलें जित असों निजोनिया जागे । जो जो जें जें मागें तें तें देऊं ॥ २ ॥
भले तरी देऊं ××× लंगोटी । नाठाळाचे काठी देऊं माथा ॥ ३ ॥
मायबापाहूनि बहु मायावंत । करू घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हापुढें । विष तें बापुडें कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरें कोड त्याचे परी ॥ ६ ॥

हें वर्णन वैष्णवभक्तांपेक्षां शैवभक्तांना जास्त लागू पडतें. असो. याविषयी ह्या प्राथमिक खंडांत अधिक चिकित्सा न वाढवितां कांहीं आदर्श शिवभक्तांचा निर्देश मात्र करीत आहें.

**पौराणिक शिवभक्त**—महाभारताच्या अनुशासनपर्वांतील महादेव-माहात्म्य-कथन नामक १८ व्या अध्यायांत व्यासांनीं आपण मेरु पर्वतावर उग्रतपश्चर्येनें शिवाराधना कशी केली व त्याच्या सहस्र नामाचा कसा जप केला व शंकरास प्रसन्न करून घेतलें, तें सांगितलें आहे. नंतर सांख्य शास्त्रवेत्त्या कपिल मुनींनीं आपण अनेक जन्म मोठ्या भक्तीनें भगवान् शंकराची (देवता बुद्धीनें ?) आराधना केल्याचें व त्यास प्रसन्न केल्याचें सांगितलें आहे. नंतर इंद्राचा मित्र चारुशीर्ष यानें आपण गोकर्णक्षेत्रीं भगवान् शंकराची शंभर वर्षें उग्र तपश्चर्या करून त्याची कृपा संपादन केल्याचें सांगितलें आहे. नंतर महात्मा वाल्मीकीनेंहि आपण शंकराच्या आराधनेनें पापविमुक्त कसे झालों, तें निवेदन केलें. त्यानंतर जामदग्न्यानें जेष्ठ भ्रात्यांच्या वधानें लागलेलें ब्रह्महत्येचें पाप शिवास शरण जाऊन निवारण करून घेऊन अमरत्व प्राप्त करून घेतल्याचें वर्णन केलें मग विश्वा-

मित्र म्हणाले कीं, "मीहि शंकराच्या कृपाप्रसादानेंच ब्राह्मणत्व प्राप्त करून घेतलें." नंतर असितदेवलानें आपणांस इंद्राचा शाप झाला असतां त्या भयावह परिणामापासून शिवभक्तीनें कसें सोडविलें तें वर्णन केलें. पुढें गृत्समदानें महादेवाच्या वरप्रसादानें आपण पशुयोनींतून कसे उद्धरलों, तें निवेदन केलें. नंतर वासुदेवानें आपण शंकराची आराधना दीर्घकाळ करून त्याची कृपा संपादन केल्याचें सांगितलें. नंतर जैगीषव्य म्हणाला कीं, "भगवान् महादेवाच्या भक्तीनेंच मीं त्याच्यापासून अष्टविध ऐश्वर्य मिळविलें." मग गर्गमुनि म्हणाले कीं, "शंकराच्या मानसपूजेनें त्यास तोषवून मीं त्याच्या कृपेनें चौसष्ट अंगाचें ज्ञान प्राप्त करून घेतलें." पुढें पराशर म्हणाले कीं, "भगवान् शंकराची तपश्चर्या केल्यामुळेंच मला व्यास हे पुत्र प्राप्त झाले." मांडव्य ऋषि म्हणाले कीं, "मला एकदां नाहक खोट्याच आरोपावरून सुळावर चढविलें असतां, मीं शंकराचा धांवा केला; तेव्हां त्यानीं मला संकटांतून सोडवून दीर्घायु केलें." पुढें गालव ऋषींनींहि आपण शंकराच्या आराधनेनें कसे चिंताविमुक्त झालों तें वर्णन केलें.

या त्रोटक वर्णनावरून भगवान् शिवाच्या थोर थोर भक्तांची व त्यांचें आराध्य दैवत जें शिव त्याच्या माहात्म्याची थोडी तरी कल्पना होईल.

याप्रमाणें इंद्रादि सर्व देवांनीं व श्रीरामासारख्या अवतारी पुरुषांनीं शिवाची आराधना केली आहे. सारे दर्शनकार[1] शिवभक्तच होते. यक्ष, गंधर्व शिवभक्त होते. तसेंच ऋषिवर्यांत शिलाद, शिलादपुत्रनंदी, दधीची, गौतम, अगस्ति, याज्ञवल्क्य, व्यास, वालखिल्य, सावर्णि, विकर्ण, शाकल्य, मार्कंडेय अशा सहस्रावधि प्रख्यात ऋषींनीं शिवभक्ति केली आहे. आचार्यांत श्रीमच्छंकराचार्य व त्यांच्या गादीवरील पुरुष, तसेंच वीरशैवाचे रेणुकाचार्य, दारुकाचार्य, श्रीएकोरामाराध्य, श्रीपंडिताराध्य आणि श्रीविश्वाराध्य हे लिंगोद्भव पंचाचार्य अलौकिक शिवभक्त होते. लिंगायतांचे पथसंस्थापक बसवाचार्य हेहि कट्टे शिवभक्त होते. प्रसिद्ध नवनाथ हे शिवभक्त जगप्रसिद्धच आहेत. या सर्व पंथांत त्या पथसंस्थापकाच्या अनुयायांतहि मोठमोठे योगी, शिवभक्त झालेलेच आहेत. श्री. अप्पय्या दीक्षित व श्रीकंठ हे महान् पंडित शिवभक्त होते. त्याच-

१ मूळ सारे दर्शनकार जरी ईश्वरवादी नसले, तरी उपास्यदेवता म्हणून शिवभक्त असू शकतील.

वादाला तें कळण अशक्यच आहे शिवभक्ति हा बुद्धीचा विषय नसून भावनेचा व अनुभवाचा आहे अनुभवसंपन्न भक्त हे पारमार्थिक योग्यतेनें सारे सारखेच खरे, पण काहीं शिवभक्त एकांगी, विक्षिप्त व कठोर असल्याचें भासतें याचें कारण त्यांच्या ठिकाणची निस्सीम त्यागवृत्ति व वैराग्यवृत्ति होय शिव हा योग आणि भोग दोन्ही देणारा आहे असें कोणी मानतात पण भोगी शिव भक्त थोडेच आढळतात रजोगुणापेक्षा सत्त्व व तम या गुणाचें तारतम्यानें आधिक्य शिवभक्तात अधिक आढळतें कारण त्याचें उपास्य आतून सत्त्वगुणी व बाह्यत तमोगुणी असें मानलेल आहे

मऊ मेणाहून आम्ही विष्णुदास । कठिण वज्रास भेदू ऐसे ॥ १ ॥
मेलों जित असों निजोनिया जागे । जो जो जें जें मागें तें तें देऊ ॥ २ ॥
भले तरी देऊ ××× लंगोटी । नाठाळाचे काठी देऊ माथा ॥ ३ ॥
मायबापाहूनि बहु मायावत । करू घातपात शत्रूहूनि ॥ ४ ॥
अमृत तें काय गोड आम्हापुढ । विष तें बापुडे कडू किती ॥ ५ ॥
तुका म्हणे आम्ही अवघेचि गोड । ज्याचें पुरें कोड त्याचे परी ॥ ६ ॥

हें वर्णन वैष्णवभक्तापेक्षा शैवभक्ताना जास्त लागू पडतें असो याविषयीं ह्या प्राथमिक खडात अधिक चिकित्सा न वाढविता काहीं आदर्श शिवभक्ताचा निर्देश मात्र करीत आहें

**पौराणिक शिवभक्त**—महाभारताच्या अनुशासनपर्वातील महादेव-माहात्म्य कथन नामक १८ व्या अध्यायात व्यासानीं आपण मेरु पर्वतावर उग्रतपश्चर्येनें शिवाराधना कशी केली व त्याच्या सहस्र नामाचा कसा जप केला व शकरास प्रसन्न करून घेतलें, तें सागितल आहे नतर साख्य शास्त्रवेत्त्या कपिल मुनींनीं आपण अनेक जन्म मोठ्या भक्तीनें भगवान् शकराची (देवता बुद्धीनें!) आराधना केल्याच व त्यास प्रसन्न केल्याचें सागितल आहे नतर इद्राचा मित्र चारुशीर्ष यानें आपण गोकर्णक्षेत्रीं भगवान् शकराची शभर वर्षे उग्र तपश्चर्या करून त्याची कृपा सपादन केल्याचें सागितलें आहे नतर महात्मा वाल्मीकीनेंहि आपण शकराच्या आराधनेनें पापविमुक्त कसे झालों, तें निवेदन केलें त्यानतर जामदग्न्यानें जेष्ठ भ्रात्याच्या वधानें लागलेलें ब्रह्महत्येचें पाप शिवास शरण जाऊन निवारण करून घेऊन अमरत्व प्राप्त करून घेतल्याचें वर्णन केल मग विश्वा-

मित्र म्हणाले कीं, "मीहि शंकराच्या कृपाप्रसादानेंच ब्राह्मणत्व प्राप्त करून घेतलें." नंतर असितदेवलानें आपणांस इंद्राचा शाप झाला असतां त्या भयावह परिणामापासून शिवभक्तीनें कसें सोडविलें तें वर्णन केलें. पुढें गृत्समदानें महादेवाच्या वरप्रसादानें आपण पशुयोनींतून कसे उद्धरलों, तें निवेदन केलें. नंतर वासुदेवानें आपण शंकराची आराधना दीर्घकाळ करून त्याची कृपा संपादन केल्याचें सांगितलें. नंतर जैगीषव्य म्हणाला कीं, "भगवान् महादेवाच्या भक्तीनेंच मीं त्याच्यापासून अष्टविध ऐश्वर्य मिळविलें." मग गर्गमुनि म्हणाले कीं, "शंकराच्या मानसपूजेनें त्यास तोषवून मीं त्याच्या कृपेनें चौसष्ट अंगांचें ज्ञान प्राप्त करून घेतलें." पुढें पराशर म्हणाले कीं, "भगवान् शंकराची तपश्चर्या केल्यामुळेंच मला व्यास हे पुत्र प्राप्त झाले." मांडव्य ऋषि म्हणाले कीं, "मला एकदां नाहक खोट्याच आरोपावरून सुळावर चढविलें असतां, मीं शंकराचा धांवा केला; तेव्हां त्यांनीं मला संकटांतून सोडवून दीर्घायु केलें." पुढें गालव ऋषींनींहि आपण शंकराच्या आराधनेनें कसे चिंताविमुक्त झालों तें वर्णन केलें.

या त्रोटक वर्णनावरून भगवान् शिवाच्या थोर थोर भक्तांची व त्यांचें आराध्य दैवत जें शिव त्याच्या माहात्म्याची थोडी तरी कल्पना होईल.

याप्रमाणें इंद्रादि सर्व देवांनीं व श्रीरामासारख्या अवतारी पुरुषांनीं शिवाची आराधना केली आहे. सारे दर्शनकार[१] शिवभक्तच होते. यक्ष, गंधर्व शिवभक्त होते. तसेंच ऋषिवर्यांत शिलाद, शिलादपुत्रनंदी, दधीची, गौतम, अगस्ति, याज्ञवल्क्य, व्यास, वालखिल्य, सावर्णि, विकर्ण, शाकल्य, मार्कंडेय अशा सहस्रावधि प्रख्यात ऋषींनीं शिवभक्ति केली आहे. आचार्यांत श्रीमच्छंकराचार्य व त्यांच्या गादीवरील पुरुष, तसेंच वीरशैवांचे रेणुकाचार्य, दारुकाचार्य, श्रीएकोरामाराध्य, श्रीपंडिताराध्य आणि श्रीविश्वाराध्य हे लिंगोद्भव पंचाचार्य अलौकिक शिवभक्त होते. लिंगायतांचे पंथसंस्थापक बसवाचार्य हेहि कट्टे शिवभक्त होते. प्रसिद्ध नवनाथ हे शिवभक्त जगप्रसिद्धच आहेत. या सर्व पंथांत त्या पंथसंस्थापकांच्या अनुयायांतहि मोठमोठे योगी, शिवभक्त झालेलेच आहेत. श्री. अप्पय्या दीक्षित व श्रीकंठ हे महान् पंडित शिवभक्त होते. त्याच-

१ मूळ सारे दर्शनकार जरी ईश्वरवादी नसले, तरी उपास्यदेवता म्हणून शिवभक्त असूं शकतील.

प्रमाणें वीरश्रेष्ठांत अश्वत्थामा, अर्जुन, भगीरथ, भद्रायु, श्रीयाळ, भारशिव, वाकाटक, हर्षवर्धन, चालुक्य, राष्ट्रकूट, पल्लव अशा अनेक रणगाजींनीं व राजघराण्यांनीं शिवार्चना केली आहे. कवींत कालिदास, सुबधु, बाण, श्रीहर्ष, भट्टनारायण, भवभूति असे शतशः शिवभक्त कवी प्रसिद्ध आहेत. बहुतेक सर्व शास्त्रकार शिवभक्तच आढळतील. स्त्रियांत अनुसया, शबरी, सुमती महाश्वेता, अम्मइयर, अव्वई, अक्का अशीं शिवभक्त स्त्रियांचीं अनेक नांवें सागता येतील.

याप्रमाणें ब्राह्मण क्षत्रिय अशा श्रेष्ठ जातींतहि होऊन गेलेल्या थोर थोर शिवभक्तांची यादी व त्यांचीं दिव्य चरित्रें कोठवर वर्णन करावीं? त्यांचा आस्थापूर्वक अभ्यास केल्यास कोणाचेंहि चित्त शिवासंबंधीं विकल्पशून्य व निर्मळ होईल. हे व असे दुसरे लक्षावधि थोर पुरुष आद्य वनमानवांच्या अथवा रानटी अनार्यांच्या एखाद्या ग्राम्य व अश्लील उपास्याला आदिकारण शिव मानून भजले असतील व त्यानेंच कृतार्थ झाले असतील, असें मानणें निवार अशक्यच आहे.

महाभारतांत द्रोणपर्वांत (अ. २०१) व्यास अश्वत्थाम्याला सांगतात कीं, ज्याला नारायण असें म्हणतात, त्यानें शिवाला प्रसन्न करून घेण्याकरितां सहासष्ट हजार वर्षें केवळ वायु भक्षण करून घोर तपश्चर्या केली. तेव्हां जगाचा ईश्वर, उत्पत्तिस्थान व पालनकर्ता प्रभु यानें त्यास विश्वरूपानें दर्शन दिलें. तेव्हां नारायणानें त्याची स्तुति केली. त्याचा अल्पसारांश असा आहे कीं, "हे वरेण्या आदिदेवा, ज्यांनीं प्रथम पृथ्वीवर येऊन पूर्वी तुझ्या जुन्या देवसृष्टीचें संरक्षण केलें, ते जगाचे संरक्षक प्रजापतिहि तुझ्यापासूनच उत्पन्न झाले. नाना प्रकारचे प्राणिसंघ, तशींच सर्व विश्वेंहि तुझ्यापासूनच उदय पावलीं. इंद्र, यम, वरुण, कुबेर, त्वष्टा व सोम यांच्या नांवानें जें कर्म केलें जातें तें वास्तविक तुजसाठींच होय. प्राणिमात्रांचा उत्पत्ति आणि लयहि तुझ्या ठिकाणींच आहे. हें मनांत आणून विद्वान् तुझें एकत्व जाणतात. चित्प्रतिबिंबरूप दोन हृदयस्थ दिव्य पक्षी, शब्दरूपशाखांचे सात अश्वत्थवृक्ष आणि दशेंद्रियरूप द्वारांवर राहून या देहनगरीचें संरक्षण करणारे दुसरे दहा रक्षक, हे सर्व तूंच निर्माण केले आहेस. तूं आत्म्याचाहि आत्मा आहेस. तुझें स्वरूप अगदीं निर्विकार आहे. तें जो जाणतो, तो निर्विकार ब्रह्मपदीं जाऊन पोंचतो."

नंतर त्याच अध्यायांत ब्रह्मदेव शिवस्तुति करतांना म्हणतात, "हे प्रभो! तूं स्वतः यज्ञनारायण असून या भुवनाचा पालक आहेस आणि या भुवनाचा लयहि तुझ्या ठिकाणींच होतो. तूं भव आहेस. तूं महादेव आहेस. तूंच सर्वांचें निजधाम आहेस आणि परमपदहि तूंच आहेस ? हें स्थावर जंगमात्मक सर्व जग तूंच व्यापलेलें आहेस."

लिंगपुराणांत व शिवपुराणांत ब्रह्मा आणि विष्णु या उभयतांनीं भक्तिभावानें शिवाची स्तुति पुष्कळच केली आहे. शिवपुराणांत म्हटलें आहे कीं, ब्रह्मदेव व विष्णु शिवाच्या ज्योतिर्लिंगाचा आदिअंत लावतांना थकले, तेव्हां दोघेहि शिवास शरण गेले असतां, शिव प्रणवलिंगरूपांतून वर्णरूपांत व्यक्त झाले. त्या वेळीं ब्रह्मदेवानें व विष्णूनें, शिवानें आपलें सगुणसाकाररूप दाखवावें,-अशी प्रार्थना केली. तेव्हां शिव सगुणरूपांत प्रगट होऊन दोघांस कृतार्थ करते झाले.

महाभारताच्या अनुशासनपर्वांत श्रीकृष्णानें भगवान शिवाची उपासना केल्याचें वर्णन आहे. त्यानें आपल्या शिवस्तुतीच्या अखेर म्हटलें आहे कीं, "कर्मफल असें जें स्वर्गसुख तें तूंच आहेस. सर्वांच्या हृदयांत तूंच वसति केली आहेस. सार्‍या योगसिद्धी तूंच होत. बुद्धि, मति व लोक हीं तुलाच शरण जातात व तुझाच आश्रय करून असतात. जे नित्य योगसाधनें करतात, ते तुझ्याच प्रातीसाठीं झटतात. तूं पुराणपुरुष आहेस. तुझ्या ठिकाणीं लोकोत्तर शक्ति आहे. तूं बुद्धिमान् लोकांचें अंतिम साध्य आहेस. हे महादेवा! महत् अहंकार व पंचतन्मात्रा हीं तुझीं सात सूक्ष्म तत्त्वें, तसेंच सर्वज्ञता, तृप्ति, अनादि बोध, स्वतंत्रता, कधींहि ऱ्हास न पावणारी शक्ति व अनंत सामर्थ्य, ह्यांचें यथार्थ ज्ञान करून घेऊन, आणि तसेंच परमात्म्याचें सर्वत्र अभिन्न स्वरूप व्याप्त आहे असें योगसाधनानें जाणून, जो पुरुष तुझ्या ध्यानांत निमग्न राहतो, तोच तुझ्यामध्यें प्रविष्ट होऊन सायुज्य मिळवितो."

उपमन्यूची माता अंबा हिनें शिवाचें कांहीं लाक्षणिक व सांकेतिक असें वर्णन केल्यानंतर ती आपल्या पुत्रास म्हणाली कीं, "ज्या पुरुषांनीं आत्मस्वरूपाचें ज्ञान करून घेतलें नाहीं, त्यांना या देवाधिदेवाचें (शंकराचें) यथार्थ स्वरूप कळावयाचें नाहीं. अथवा त्यांना ह्या महादेवाचें ध्यान करतां येणार नाहीं, किंवा त्याची यत्किंचित् ओळखहि पटणार नाहीं. ++ ह्या महेशाचें मंगलपद

चरित्र यथार्थ जाणण्यास कोण समर्थ होईल बरें ? ह्या देवाधिदेवानें पूर्वी जीं रूपें धारण केली, तीं इतकी अगाध व अचिंतनीय आहेत कीं, त्याचें अनुमान करणेंहि अशक्य होय ! ++ दिशा हेंच त्याचें वस्त्र होय सर्वांचा तो आच्छादक आहे त्याला रूप नाहीं तो मायावी आहे तो नानाविध रूपें धारण करतो इ " (म भा ) पुढें उपमन्यूनें दीर्घ तपश्चर्येनें शंकरास प्रसन्न करून घेतल्यानंतर शंकराची पुष्कळच स्तुति केली, त्यांत तो म्हणतो, [म भा अ नु प अ १४] " हे महादेवा, तू पुरुष आहेस व स्त्रीहि आहेस तू केवळ पुरुष नाहींस तू सांख्य आहेस व योगीहि आहेस अथर्वणहि तूच आहेस सर्व संकटांचा तू नाशक आहेस शोकांचा हरणकर्ता तू आहेस जगांत व्याप्त असलेली जी माया तीहि तुझीच हस्तक होय बीज व क्षेत्र यांचा उत्पादक व संरक्षक तूच आहेस सुरासुरांचा अधिपति तू आहेस विश्वाचा नायक तू आहेस कितीहि चिंतन केल्यानं तुझें यथार्थ रूप ध्यानांत उतरत नाहीं आम्हांला सर्व आधार तूच आहेस सर्वांचें हृदय तूच पवित्र जनांचा अधिपति तूच योग्यांचें ध्येय असें जं परब्रह्म तेंहि तूच सर्व गतींमध्ये श्रेष्ठ जो मोक्ष तो तूच जगांत जें जें म्हणून काहीं तेजस्वी दिसून येईल, तें तें सर्व तूच तू देवाधिदेव भगवान् आहेस भगवंता ! भक्तवत्सला ! मी तुला नमस्कार करतो हे विश्वोत्पादका योगेश्वरा ! मी तुला नमस्कार करतों "

तंडिऋषीनें उग्र तपश्चर्या केली असतां भगवान शिवानें त्यास दर्शन दिलें तेव्हां तंडिऋषीनें भगवंताची प्रार्थना केली कीं ( अनु प अ १६ ) " हे महाबुद्धिमंता परमेश्वरा, पावनांना पावनत्व देणारा तूच, गतिमानांना गति देणारा तूच, तेजामधील दिव्य तेज तें तूच तपामधलें श्रेष्ठ तप तें तूच मोक्ष हा तुझ्यापासूनच मिळतो हे आनंदघना ! सहस्राक्षा देवा ! ब्रह्मदेव, इंद्र, विष्णु, विश्वदेव व महर्षि ह्यांना सुद्धां जर तुझें वास्तविक ज्ञान होत नाहीं, तर माझ्यासारख्यांना तें कसें बरें होईल ? हे परमेशा ! सर्व कांहीं तुझ्यापासून प्रवृत्त होतें व अंतीं सर्वांचा तुझ्यामध्येच लय होतो ब्रह्मा, विष्णु व रुद्र ह्या तीन तुझ्याच तनु होत हे विश्वाधिपते ! तूंच आदि पुरुष, तूच अध्यात्म, तूच अधिभूत, तूच अधिदैवत, तूच अधिलोक, तूच अधिविज्ञान व तूच अधियज्ञ आहेस. देवतांनाहि ज्याचें ज्ञान होत नाहीं, त्या तुला विद्वान् लोक आपल्या अंतर्यामीं अवलोकन करून भवबंधनांतून सुटतात आणि तुझ्या सच्चिन्मय स्वरूपांत

मिळतात. हे देवा! ह्या विश्वांत अत्यंत श्रेष्ठ असें ज्ञेय तूच होस. तुझें ज्ञान झालें कीं त्याहून श्रेष्ठ असें ज्ञान जगांत दुसरें मुळींच उरत नाहीं. "

पुराणोत्तरकालीन शैवभक्तींत तामीळ प्रांत हा अग्रेसर दिसतो. तामीळ प्रांतांतील भव्य शिवालयांस जगांत क्वचितच कोठें तोड आढळेल. त्यांच्या शिवालयांप्रमाणें त्यांचीं विद्यामंदिरें, मठ व हृदयमंदिरेंहि शिवभक्तीनें उत्कटत्वानें भारलेलीं दिसतात. महाराष्ट्रीय संतांत ज्याप्रमाणें सर्व जातींतील संत आढळतात, व ते बहुतेक सर्व वैष्णवच दिसतात, त्याप्रमाणें सुप्रसिद्ध त्रैसष्ट तामीळ नायनार हे सारे शैव असून त्यांत सर्व जातींचे संत आढळतात. वारकरी संप्रदायांत संतांची योग्यता त्यांच्या जन्मजातीवर मानीत नाहींत. रामेश्वरशास्त्री या विद्वान् ब्राह्मणानें तुकारामाला आपले गुरु केलें. त्याचप्रमाणें नायनार संतांची योग्यता त्यांच्या जन्मजातीवर मानलेली नाहीं. कणप्प आणि नंद असे शूद्र आणि अतिशूद्रहि ब्राह्मण नायनारांइतकेच वंद्य ठरले. महाराष्ट्रीय संतांत आणि या शैव संतांत आणखी असें साम्य आहे कीं, उत्कट भक्ति व त्यासाठीं निस्सीम त्याग या गुणांनींच त्यांनीं संतपदवी मिळविली. तामीळ शिवभक्तांचा काळ महाराष्ट्रीय वैष्णव संतांच्या बराच अगोदर आहे. खिस्ती सनाच्या चवथ्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत तामीळ प्रांतांतील शैवभक्तांचा मुख्य काळ दिसतो. ह्या शैवभक्तांत आणि महाराष्ट्रीय संतांत आणखी एक साम्य आहे तें असें कीं, ह्यांस वेदप्रामाण्य मान्य आहे; पण महाराष्ट्रीय संतांच्या नाममाहात्म्याप्रमाणें ह्या शिवभक्तांचा शिवपंचाक्षरी नाममंत्रावर विशेष भर आहे.

उत्तरेकडील मोहनजोदारो येथील उत्खननांत ज्या सहा हजार वर्षांपूर्वींच्या संस्कृतीचा उपलब्धि झाली आहे, ती संस्कृति द्राविड असावी, असें कोणी म्हणतात व त्या सांस्कृतिक अवशेषांत शैवभक्तीचीं चिन्हें पुष्कळच आढळतात.

इ. सन सुरू होण्याचे पूर्वी तामीळ प्रांतांतील लोक सुसंस्कृत व सधन होते. चीनपासून इजिप्तपर्यंत त्यांचा परमुलखाशीं व्यापार असे. कृषि आणि कला यांसहि तत्कालीन राजांनीं उत्तेजन दिलें होतें. त्या वेळचा द्रविडांचा धर्म सगुणभक्तीचा होता. त्यानंतर बौद्ध आणि जैन या धर्मांनीं दक्षिणेंत जोराचें आक्रमण केलें. पुढें इ. सनाच्या पहिल्या कांहीं शतकांत पौराणिक धर्म बळावला; आणि तेव्हांपासून वैष्णव व शैव संत कवींचा उदय या दक्षिणच्या धर्मभूमींत होऊं लागला. त्यांनीं बौद्ध व जैन धर्मांचा पाडाव केला व लोकांचे हृन्मंदिरांत

चरित्र यथार्थ जाणण्यास कोण समर्थ होईल बरें ? ह्या देवाधिदेवान पूर्वी जीं रूपें धारण केलीं, तीं इतकीं अगाध व अचिंतनीय आहेत कीं, त्याचे अनुमान करणेंहि अशक्य होय ! ++ दिशा हेंच त्याचें वस्त्र होय सर्वांचा तो आच्छादक आहे त्याला रूप नाहीं तो मायावी आहे तो नानाविध रूपें धारण करतो इ ” (म भा ) पुढें उपमन्यूनें दीर्घ तपश्चर्येनें शकरास प्रसन्न करून घेतल्यानतर शकराची पुष्कळच स्तुति केली, त्यात तो म्हणतो, [म भा अ नु प अ १४] “हे महादेवा, तू पुरुष आहेस व स्त्रीहि आहेस तू केवळ पुरुष नाहींस तू साख्य आहेस व योगीहि आहेस अथर्वणहि तूच आहेस सर्व सकटाचा तू नाशक आहेस. शोकाचा हरणकर्ता तू आहेस जगात व्याप्त असलेली जी माया तीहि तुझीच हस्तक होय बीज व क्षेत्र याचा उत्पादक व सरक्षक तूच आहेस सुरासुराचा अधिपति तू आहेस विश्वाचा नायक तू आहेस कितीहि चिंतन केल्यान तुझें यथार्थ रुप ध्यानात उतरत नाहीं आम्हाला सर्व आधार तूच आहेस सर्वांचें हृदय तूच पवित्र जनाचा अधिपति तूच योग्याचें ध्येय असें जें परब्रह्म तेंहि तूच सव गतींमध्य श्रेष्ठ जो मोक्ष तो तूच जगात जें जें म्हणून काहीं तेजस्वी दिसून येईल, ते तें सर्व तूच तू देवाधिदेव भगवान् आहेस भगवता ! भक्तवत्सला ! मी तुला नमस्कार करता हे विश्वोत्पादका योगेश्वरा ! मी तुला नमस्कार करतों ”

तडिऋषीनें उग्र तपश्चया केली असता भगवान शिवानें त्यास दर्शन दिलें. तेव्हा तडिऋषीनें भगवताची प्रार्थना केली कीं ( अनु प अ १६ ) “हे महाबुद्धिमंता परमेश्वरा, पावनाना पावनत्व देणारा तूच, गतिमानाना गति देणारा तूच, तेजामधील दिव्य तेज तें तूच तपामधलें श्रेष्ठ तप तें तूच मोक्ष हा तुझ्यापासूनच मिळतो हे आनदघना ! सहस्राक्षो देवा ! ब्रह्मदेव, इंद्र, विष्णु, विश्वदेव व महर्षि ह्याना सुद्धा जर तुझें वास्तविक ज्ञान होत नाहीं, तर माझ्यासारख्याना तें कसं बरें होईल ? हे परमेशा ! सर्व काहा तुझ्यापासून प्रवृत्त होतें व अतीं सर्वांचा तुझ्यामध्येंच लय होतो ब्रह्मा, विष्णु व रुद्र ह्या तीन तुझ्याच तनु होत हे विश्वाधिपते ! तूंच आदि पुरुष, तूच अध्यात्म, तूच अधिभूत, तूच अधिदैवत, तूच अधिलोक, तूच अधिविज्ञान व तूच अधियज्ञ आहेस. देवतानाहि ज्याचें ज्ञान होत नाहीं, त्या तुला विद्वान् लोक आपल्या अतर्यामीं अवलोकन करून भवबधातून सुटतात आणि तुझ्या सच्चिन्मय स्वरूपात

मिळनात. हे देवा! ह्या विश्वांत अत्यंत श्रेष्ठ असें ज्ञेय तूंच होस. तुझें ज्ञान झालें कीं त्याहून श्रेष्ठ असें ज्ञान जगांत दुसरें मुळींच उरत नाहीं."

पुराणोत्तरकालीन शैवभक्तींत तामीळ प्रांत हा अग्रेसर दिसतो. तामीळ प्रांतांतील भव्य शिवालयांस जगांत क्वचितच कोठें तोड आढळेल. त्यांच्या शिवालयांप्रमाणें त्यांचीं विद्यामंदिरें, मठ व हृदयमंदिरेंहि शिवभक्तीनें उत्कटत्वानें भारलेलीं दिसतात. महाराष्ट्रीय संतांत ज्याप्रमाणें सर्व जातींतील संत आढळतात, व ते बहुतेक सर्व वैष्णवच दिसतात, त्याप्रमाणें सुप्रसिद्ध त्रेसष्ट तामीळ नायनार हे सारे शैव असून त्यांत सर्व जातींचे संत आढळतात. वारकरी संप्रदायांत संतांची योग्यता त्यांच्या जन्मजातीवर मानीत नाहींत. रामेश्वरशास्त्री या विद्वान् ब्राह्मणानें तुकारामाला आपले गुरु केलें. त्याचप्रमाणें नायनार संतांची योग्यता त्यांच्या जन्मजातीवर मानलेली नाहीं. कणप्प आणि नंद असे शूद्र आणि अतिशूद्रहि ब्राह्मण नायनारांइतकेच वंद्य ठरले. महाराष्ट्रीय संतांत आणि या शैव संतांत आणखी असें साम्य आहे कीं, उत्कट भक्ति व त्यासाठीं निस्सीम त्याग या गुणांनींच त्यांनीं संतपदवी मिळविली. तामीळ शिवभक्तांचा काळ महाराष्ट्रीय वैष्णव संतांच्या बराच अगोदर आहे. ख्रिस्ती सनाच्या चवथ्या शतकापासून नवव्या शतकापर्यंत तामीळ प्रांतांतील शैवभक्तांचा मुख्य काळ दिसतो. ह्या शैवभक्तांत आणि महाराष्ट्रीय संतांत आणखी एक साम्य आहे तें असें कीं, ह्यांस वेदप्रामाण्य मान्य आहे; पण महाराष्ट्रीय संतांच्या नाममाहात्म्याप्रमाणें ह्या शिवभक्तांचा शिवपञ्चाक्षरी नाममंत्रावर विशेष भर आहे.

उत्तरेकडील मोहनजोदारो येथील उत्खननांत ज्या सहा हजार वर्षांपूर्वीच्या संस्कृतीचा उपलब्धि झाली आहे, ती संस्कृति द्राविड असावी, असें कोणी म्हणतात व त्या सांस्कृतिक अवशेषांत शैवभक्तीचीं चिन्हें पुष्कळच आढळतात.

इ. सन सुरू होण्याचे पूर्वी तामीळ प्रांतांतील लोक सुसंस्कृत व सधन होते. चीनपासून इजिप्तपर्यंत त्यांचा परमुलुखाशीं व्यापार असे. कृषि आणि कला यांसहि तत्कालीन राजांनीं उत्तेजन दिलें होतें. त्या वेळचा द्रविडांचा धर्म सगुणभक्तीचा होता. त्यानंतर बौद्ध आणि जैन या धर्मांनीं दक्षिणेंत जोराचें आक्रमण केलें. पुढें इ. सनाच्या पहिल्या कांहीं शतकांत पौराणिक धर्म बळावला, आणि तेव्हांपासून वैष्णव व शैव संत कवींचा उदय या दक्षिणच्या धर्मभूमींत होऊं लागला. त्यांनीं बौद्ध व जैन धर्मांचा पाडाव केला व लोकांचे हृन्मंदिरांत

व देवालयात स्वतःस देवतातुल्यस्थान प्राप्त करून घेतलें. देवताचे मूर्तीप्रमाणें या संताच्या मूर्तींचीहि लोक पूजा-अर्चा करू लागले. कित्येक शैवभक्ताच्या स्मारकमंदिरात यांच्या मूर्तीच्याऐवजीं शिवलिंगेंच आहेत. जे भक्त शिवाशीं सारूप्य किंवा सायुज्य पावले ते शिवरूप झाले.

**शैवभक्त**—शिवाप्रमाणें शैवभक्ताच्या मूर्तिहि वर सांगितल्याप्रमाणें दक्षिण हिंदुस्थानांत बऱ्याच आहेत. यांपैकीं कण्णप्प नायनार ह्या व्याध साधूचें मंदिर कालाहस्तीला स्वतंत्र आहे, तसेंच कुल्शेखर अळवार यांचें आहे. त्रेसष्ट शैवसंताच्या मूर्ति दक्षिणेंतील शिवमंदिरांतून आढळतात. या त्रेसष्टांशिवाय त्यानंतरहि प्रसिद्धीस आलेल्या अनेक थोर शिवभक्ताच्या मूर्ति दक्षिणेकडील मंदिरांत स्थापन झालेल्या आहेत. या शिवभक्तांच्या प्रतिष्ठापना लिंगरूपांत व शिवरूपांतहि केलेल्या असतात. वैष्णव भक्तांच्या मूर्तीप्रमाणें ह्या देहधारीच असतात असे नाहीं. हे संत चतुर्वर्णांपैकीं कोणत्याहि वर्णाचे असतात. जेथें या संताच्या मूर्ति असतात, तेथें त्यांनीं बहुधा हात जोडलेले दाखवितात. दक्षिणेंतील तामीळ संतांत किंबहुना साऱ्याच संतांत सहज काव्यस्फूर्ति हा गुण बहुधा आढळतोच. सुप्रसिद्ध तामीळ कवि एकूणपन्नास मानतात. त्यांत नक्कीर हा शैव संतकवि फार प्रसिद्ध आहे. हा शिव आणि कार्तिकेय यांचा परमभक्त होता. कालानुक्रमानें त्यानंतरचा प्रसिद्ध शिवभक्त कण्णप्प व्याध व त्यानंतरचा शैवधर्माचा प्रणेता तिरुमूलर असावा, असें कोणी म्हणतात.

**तिरुमूलर**—हे एक असामान्य कोटींचे सिद्धपुरुष उत्तरेकडून दक्षिणेंत आल्याची माहिती पूर्वी दिलीच आहे. तिरुमूलर यांचा काल कोणता तें नक्की सांगवत नाहीं. तीन हजार परिच्छेदांचा तिरुमंदिर हा शैवपंथाचा प्रमाणभूत ग्रंथ यांनीं तयार केला व मग ते शिवलोकास गेले, अशा पौराणिक आख्यायिका आहे. ऐतिहासिकांच्या मतें ह्यांचा काल चार ते सहा शतकांत बसतो. तिरुमूलर हे एक नंदीचे वरदभक्त ब्राह्मण जातीचे योगी उत्तरेकडून दक्षिणेकडे अगस्त्य ऋषींच्या दर्शनासाठीं आले. दक्षिणेंत कावेरीच्या काठीं ते आले असता तेथें मूलनामक एक गोवारी अरण्यांत मरण पावल्यामुळें त्याच्याजवळ त्याच्या गाई येऊन दुःखानें हंबरडा फोडीत आहेत असें त्यानें पाहिलं. तेव्हां तिरुमूलर यांस त्या गाईंची करुणा येऊन त्यानें या मृत गोवाऱ्याच्या शवांत योगबलानें प्रवेश केला व त्यास जिवंत केलं. नंतर त्यानें

तिरुमंदिर हा शैव- धर्मावरील प्रमाणग्रंथ लिहिला. हें मागें श्रीधूतपापेश्वर या प्रकरणांत सांगितलेंच आहे. तिरुमूलर म्हणत कीं, प्रेम व देव एकच. ज्यांचें सर्वांभूतीं प्रेम नाहीं, त्यांचें देवावर प्रेम नाहीं, असें खुशाल समजावें. विश्वधर्म म्हणतात तो हाच होय.

## दक्षिणेंतील नायनारांची शिवभक्ति—

बाळो जन मज म्हणोत शिंदळो। परि हा वनमाळी न विसंबें ॥ १ ॥
सांडूनी लौकिक झालिये उदास। नाहीं भय आस जीवित्वाची ॥ २ ॥
नाइकें वचन बोलतां या लोकां। म्हणें झालों तुका हरिरता ॥ ३ ॥

याप्रमाणें महाराष्ट्रीय संत भक्तांनीं देववेडेपणाचें जें स्वानुभवपूर्ण वर्णन केलें आहे, तें दक्षिणेंतील नायनारांचे शिवभक्तींत उत्कटतेनें दिसतें.

ते होमहवनादि कर्मकांडापेक्षां भक्तीला महत्त्व देत. शिवाला परमगुरु मानीत. सृष्टि, स्थिति, लय, तिरोधान आणि अनुग्रह हे शिवाचे धर्म मानीत. त्यांच्या उत्कट शिवाराधनेंत क्षुल्लक विघ्न आणणारांचा ते घात करीत. एरिपत्त नायनार हा कट्टर शिवभक्त तर अशांचे अंगावर कुऱ्हाडच चालवी! कट्टया शिवभक्त चंदेश्वराच्या बापानें चंदेश्वराच्या शिवावरील दुग्धाभिषेकाला हरकत केली, तें पाहून त्यानें रागानें बापाचा पायच तोडला. या सर्व निंद्य व क्रूर प्रकारांत त्यांची उत्कट शिवभक्ति हीच निमित्त असल्यामुळें त्यांचे सारे अपराध क्षम्यच ठरत.

नायनारांच्या दासमार्गांतहि त्यांची उत्कट भक्ति हाच विशेष असे. कुण्णप्पानें शिवास आपला डोळाच काढून दिला! कलाई नायनार यानें शिवपूजेंतील धूप विकत आणण्यासाठीं घरांत पैसा नव्हता म्हणून बायकोचें मंगळसूत्र विकलें. कालीया नायनारानें शिवाजवळील नंदादीपाला तेल पुरविण्यासाठीं आपलें सर्वस्व घालविलें. शेवटीं आपली बायको विक्रीस काढली. तीस कोणी घेईना. तेव्हां नंदादीपांत तो आपलें रक्तच घालूं लागला. याप्रमाणें त्यांचे भक्तीचे पराकाष्ठेचे प्रकार विलक्षण असत. सक्य नायनार यानें एक दिवस भक्तीच्या उन्मादांत शिवलिंगावर फुलाऐवजीं दगडच फेंकला. पुढें शिवाला तेंच प्रिय मानून तो रोज नियमानें शिवलिंगावर दगड फेकूं लागला. एक दिवस विस्मरणानें वरीलप्रमाणें दगड फेकण्याचा राहिला. हें जेवणास बसतांना त्याच्या लक्षांत आलें. तसाच तो

जेवण टाकून उठला व शिवलिंगावर दगड टाकून आला त्याच्या या व्रतनिष्ठेनें शिव प्रसन्न झाले आदिपट्ट नायनार हा कोळी होता. तो रोज, त्याला मासे मिळत, त्यापैकीं एक शिवास देई पुढें शिवानें त्याचें सत्त्व पाहिलें तेव्हा त्यास रोज एकेकच मासा मिळू लागला तोहि तो शिवासच देई व आपण उपाशी राही एक दिवस त्याला अमोलिक असा सुवर्ण मत्स्य मिळाला तोहि त्यानें शिवाला दिला तेव्हा शिव प्रसन्न झाले याला सत्पुत्र मार्ग म्हणतात

पुसलार नायनार याच्या मनात शिवमंदिर बांधावें असें फार होतें पण तो निर्धन तो काय बांधणार। म्हणून त्यानें मनोमयच शिवमंदिर बांधण्यास सुरुवात केली तें त्याचें मानसिक मंदिर पुरें झाल्यावर त्यातील देवाच्या प्राणप्रतिष्ठेचा दिवस आला त्याच दिवशीं नरसिंह वर्मा या पल्लव राजानें बांधलेल्या शिवमंदिरातील देवाच्या प्राणप्रतिष्ठेचा मुहूर्त होता तेव्हा शिव त्या राजाच्या स्वप्नात येऊन म्हणाला कीं, मी त्या वेळीं पुसलारचे मंदिरात असेन यासाठीं त्यानें आपला मुहूर्त पुढें टाकावा राजा पुसलारचे मंदिर पाहाण्यास जातो तों तें मनोमयच आढळलें यास मानसपूजा किंवा सहमार्ग म्हणतात संत तिरुमूलर आणि समयाचार्य हे सखामार्गी किंवा सन्मार्गी भक्त होते नायनार वर्णांत श्रेष्ठ कनिष्ठ भाव मानीत नसत हें वर सांगितलेंच महाराष्ट्रातील संताच्या मेळ्याप्रमाणें नायनारांत व्याध, बेरड, कुंभार, भंडारी, परीट, कोळी व अस्पृश्य जातींचेहि शिवभक्त होते कण्णप्प व नंद हे शूद्रातिशूद्र शिवभक्त आदर्शवत् मानतात शैव धर्माचा योग हा विशेष आहे व योगशास्त्रानुष्ठानात सिद्धि व चमत्कार वाटेल ते होऊं शकतात भक्तियोगातहि तें सामर्थ्य सहज प्राप्त होतें नामीनदी नावाचे भक्ताला एकदा शिवमंदिरात घृतदीप लावावे असें वाटलें तो एका जैन व्यापाऱ्याकडे घृताची याचना करण्याकरिता गेला पण त्यानें घृत न देता तुझ्याजवळ तूप नाहीं तर तळ्यातल्या पाण्याचे दिवे लाव, असें सांगून त्याची चेष्टा केली! तेव्हा त्यास वाईट वाटलें व तो रडूं लागला तेव्हा त्याला साक्षात्कार झाला कीं, तळ्यातलें पाणीच दिव्यात घाल, तच तूप होईल तसेंच झालें।

ईशभक्तीचा महिमा सामान्य जनास पटण्यासाठीं ईश्वर असे चमत्कार घडवून आणतो चमत्कारावाचून नमस्कार नाहीं, असा हा जनस्वभाव

आहे. असे हे साधुसंतांचे चमत्कार सर्व धर्मांतून आढळतात. जे ईश्वराशीं समरस झाले, त्यांच्या ठिकाणीं ईश्वराचें अघटित घटनासामर्थ्य आढळावें यांत नवल नाहीं. अशा अनेक सिद्धि प्राप्त व्हाव्या म्हणून बुद्धिपुरःसर घोर तपश्चर्या करणारे सिद्ध तापसी वेगळे व हे भक्तकोटींतील निरिच्छ संत-साधु वेगळे. संत भक्तसिद्धि प्राप्त व्हावी म्हणून इच्छा करीत नाहींत. त्यांचा महिमा लोकांस कळावा म्हणून ईशनियतीच त्यांच्या ठिकाणीं सिद्धि-संपन्नता दाखविते.

> ऐसी संताची महिमा । बोलिजे तितुकी उणी उपमा ॥
> जयाचेनि मुख्य परमात्मा । प्रगट होये ॥ — दासबोध, १।५।२६

---

## प्रकरण ९ वें

# सार्वत्रिक शिवलिंगोपासना

**धिग्भस्मरहितं भालं धिग्ग्राममशिवालयम् ।**

मागील प्रकरणांत आपल्या भरतखंडांतील शिवलिंगोपासना, शिवलिंगोपासक पंथ व भक्त यांची त्रोटक माहिती दिली आहे. आतां या प्रकरणांत भरतखंडाबाहेरील शिवलिंगोपासनेची माहिती द्यावयाची आहे. भरतखंडांतील शिवलिंगोपासक लिंगायतपंथाचे कांहीं पुढारी आपण प्राचीन वंशपरंपरेनें हिंदु असलों तरी धर्मानें हिंदु नाहीं असें म्हणतात. याउलट भरतखंडाबाहेरील कांहीं प्राचीन शिवलिंगोपासक धर्मानें आपणास हिंदूच म्हणवीत असतील असें वाटतें. भरतखंडाबाहेरील त्या हिंदूंचें हिंदुत्व दिक्कालाच्या स्थित्यंतरांत आतां लोपलें असेल इतकेंच. पण शिवलिंगोपासनेचे जे कांहीं अवशेष भरतखंडाबाहेर अद्याप सांपडतात, त्यावरून शिवलिंगोपासना ही शुद्ध स्वरूपांत, [ म्हणजे निंद्य लिंगोपासना अथवा जननेंद्रियोपासना ( Phallic worship ) म्हणून नव्हे ] प्राचीन काळीं केव्हां तरी सर्व पृथ्वीवर रूढ होती, असें दिसतें. मग ते सारेच उपासक मुळांत हिंदु असोत अगर नसोत.

शिवलिंगोपासनेचा उगम कालाच्या दृष्टीनें अद्याप कोणालाच लागलेला नाहीं म्हणून शिवलिंगोपासना अनादि असल्याच मानावें लागतें. देशाच्या दृष्टीनें विचार करता या पृथ्वीच्याच इतिहासात इतकीं स्थित्यतरे झालीं आहेत कीं, त्यावरून भिन्नसस्कृतिसमेलन अथवा संघर्ष याचीं निश्चित अनुमानें बाधण अशक्यच आहे उदाहरणार्थ, कोणी रामायणकाळी किंवा त्यापूर्वी उत्तर व दक्षिण ध्रुवाजवळ आज दर्यागर्क झालेली फार मोठीं लेमूरिया व अॅटलॅटिस अशा नामानीं निर्दिष्ट खडे होतीं व मध्य आशियाच्या भागी समुद्र होता, असें म्हणतात. कोणी पूर्वी भारतवर्ष पूर्वबाजूनें अमेरिकेला चिकटलेलें होतें, म्हणजे मध्यें पॅसिफिक महासागर नव्हता, असें म्हणतात. कोणी पश्चिमेस अरबी समुद्र नसून आफ्रिका आपल्या पश्चिम किनाऱ्याला चिकटली होती, असें सागतात. कोणी सशोधक सागतात कीं, उत्तरध्रुव हिमालयाजवळपास एका काळीं होता कोणी सागतात कीं, एका काळीं हिमालय नव्हताच तेथें समुद्र होता युनायटेड स्टेटसमध्यें केंटकी सस्थानात पृथ्वीच्या पोटांत एक मॅमथ नावाची फार मोठी गुहा सापडली आहे तिची रुंदी दहा कोस असून खोलीचा अत लागला नाहीं पण तीव्र प्रकाशाचे झोत आत फेकले असता आत काचेचीं तावदानें असणारीं घरें असावींत व पडक्या देवळाचे घुमट असावेत असे दिसतें. उत्तर अमेरिकेंत एका डोंगरावर हिमपूर्वकालचें एक शिवालय अद्यापि आहे, असें म्हणतात पेकीन येथील एका टेकडीवर एका अति प्राचीन माणसाचा दात सापडला आहे तो दहा लाख वर्षांपूर्वीचा असावा असा शास्त्रज्ञाचा अदाज आहे दक्षिण हिंदुस्थानात असेच आश्चर्यकारक अवशेष सापडत आहेत मोहनजोदारो व हराप्पा येथील उत्खननानें, सि. पू. आणि इ स. व बौद्धधर्म याभोंवतीं आर्यसंस्कृतीच्या कालनिर्णयाचा पिगा घालणाऱ्या आधुनिकाच्या ऐतिहासिक दृष्टीच्या पूर्व कल्पनाची पळापळ झाली आहे ! जे कृष्णमूर्ति याच्या मागील तीस जन्माचा योगमार्गानें थिऑसॉफिस्टांनीं शोध घेता आधुनिकाच्या ऐतिहासिक दृष्टीचें दौर्बल्य उघडकीस येऊं पहातें. याशिवाय परकीय मूर्तिभजकानीं प्राचीन सस्कृतीच्या अवशेषाचा सर्वत्र नाश केला आहे तो वेगळाच. अशा स्थितींत आधुनिक संशोधकाच्या वरचेवर बदलणाऱ्या ऐतिहासिक दृष्टीच्या निष्कर्षावर विसंबून न राहाता तारतम्यानें जास्त शाश्वत व सूक्ष्म अशा प्रत्यक् आणि पराक् दृष्टींनीं पाहातां

शिवलिंगोपासकास त्याच्या पिंडातील दहराकाश व ब्रह्मांडातील महाकाश हींच स्थावर महालिंग उपासनेला आधार अथवा अधिष्ठानरूप आलंबनें वाटणें ह आद्य मानलेल्या निसर्गोपासनेच्या दृष्टीनेंहि स्वाभाविक आहे हा आकाश लिंगोपासनेचा अनुभव सर्व काळातील, सर्व देशातील, सर्व समाजातील व धर्मातील, सर्वांस सारखाच येण्यासारखा आहे हो एक सार्वत्रिक व व्यापक शिवलिंगोपसानेची उपपत्ति संभवते त्याचा विचार पुढील प्रकरणात केला आहे कोणी विद्वान् असं म्हणतात कीं, पृथ्वीवरील अतिप्राचीन कालीं सर्व मानवाच्या असंस्कृत मनाचे स्वभाव, भावना, कल्पना सारख्याच असल्यामुळें सर्व देशातील प्राचीन लोकाच्या धार्मिक, नैतिक व तात्त्विक विचारात स्वाभाविकच साम्य आढळतें यामुळें शिवलिंगोपासना स्वतंत्रेनच सर्वत्र रूढ झाली[2]

१ तुलनेकरता पुढील संदर्भ पाहावे —ग्रो वा ३।१७ ३।४०
Phallism, p 44, Phallic Miscellanies, p 91, Elements of Hindu Iconography, p 41, Secret Doctrines, II p 162

२ + + + Some modern scholars are disposed to think that the conception of phallism occurred to the primitive people, all over the world, independent of any suggestion being received by one people from another The reason on which they base their assumption is that human nature is everywhere the same, it is therefore natural that the mind of man will act uniformally all over the world It is a fact which according to these scholars can also explain satisfactorily the independence of growth and similarity in character of relgious beliefs and superstitions all over the world If this is borne in mind, we shall have no justification for believeing that a particular country is indebted in this respect to some other country (Indian Civilization and its Antiquity, pp 8, 9)

(टीप पुढील पानावर पहा)

कोणी असें म्हणतात कीं, युफ्राटीस म्हणजे कुमद्वती नदीच्या काठीं असलेल्या बलेश्वराची पूजा पाहून शिवलिंगोपासना भरत खंडांत आली कोणी, ती अन्य तऱ्हेनें परकीय संस्कृतीतून या देशानें घेतली, असें मानतात या मतमतांतरांत, ती मूळ भारतवर्षांतूनच सर्व जगभर पसरली व कोठ कोठें विकृतरूप पावत गेली, हेंच मत शिष्टमान्य झालेलें दिसतें[१] या प्रकरणावरूनहि तसेंच दिसून येईल

भारतीय आर्य भरतखंडाच्या बाहेरून येथें आले व येथें येऊन मग अगर तत्पूर्वीच जगभर पसरले, असे भिन्न विचारप्रवाह आढळतात. यांपैकीं आर्य बाहेरून या देशांत आले, हें मत विशेषेंकरून सनातनी पंडितास मान्य नाहीं ध्रुव हा अचल नाहीं तो अति प्राचीन काळीं हिमालयाजवळ होता, असें आता सिद्ध होत आहे. त्या अर्थी लोकमान्य टिळकांचा युक्तिवाद मान्य करूनहि आर्यांचें वसतिस्थान आर्यावर्ताच्या बाहेर दूर जात नाहीं आता भारताचें बृहत् भारत कसें व केव्हा वाढत गेलें व तें पूर्व, पश्चिम, उत्तर व दक्षिण या चारी दिशांस कोठवर वाढलें होतें, या अनिश्चित विषयाची चर्चा मी

---

( टीप मागील पानावरून चालू )

It is admitted on all hands that a survey of the great religions of the world shows that they hold in common many religious, ethical and philosophical ideas. (Ancient Wisdom by Annie Besant, p. 2).

---

१ The conclusion we come to and which we think is fully warranted by all the circumstances is, that the great mass of phallic worship existing in different parts of the world began in India and gradually found its way into the Western nations, becoming, as was perfectly natural with such a system, more and more depraved as time went on, and as it was found that it could be made subservient to the desires and passions of licentious man. ( Phallic Miscellanies, p. 92 )

या प्रकरणात करीत नाहीं कारण शिवलिंगोपासना केवळ बृहत्-भारतांतच नव्हे तर साऱ्या पृथ्वीवर विशेषेंकरून भूमध्य रेषेच्या दक्षिणोत्तर चोवीस चोवीस अशांच्या पट्टयावर प्राचीन काळी रूढ होती असें दिसतें. मग त्याचें कारण सर्वांस सारखेंच परिचित व दिव्य असें जें पराशिवाचें आकाशलिंग यामुळे असो, अगर त्याची उपपत्ति अन्य.असो.

**विदेशांतील शिवलिंगें** —ज्या गावीं लिंगोपासना होत नाहीं, तो गांव व्यर्थ होय, अशी प्राचीन काळीं समजूत होती, असें दिसतें. याच कारणामुळें साऱ्या जगभर प्राचीन काळीं लिंगोपासना रूढ झाली असावी. वीरशैव असें म्हणतात कीं, जगद्गुरु पञ्चाचार्य यानीं प्राचीन काळीं शिवाच्या आज्ञेवरून सर्वत्र लिंगोपासना रूढ केली. कोठें कोठें शिवमूर्तीची उपासनाहि रूढ झाली आहे. उदाहरणार्थ, इजिप्त देशात मेंफिस व अशीरिस या गांवीं नंदीवर आरूढ अशा शिवमूर्ति आहेत तेथें त्यांची पूजा बिल्वपत्रानेंच करतात. तुर्कस्तानच्या चार्चीलन गावीं एक बारा फूट उंचीचें शिवाचें महालिंग आहे. हेड्रोपोलिस नगरांत तीनशें फूट उंचीचें शिवलिंग आहे. मक्केत दोन शिवलिंगें आहेत. त्यांपैकीं एक मक्केश्वर व दुसरें जमजमनामक विहिरींत आहे. अमेरिका खंडात ब्राझील देशात बरीच शिवलिंगें आहेत इतर ठिकाणीं पण आहेत. मेक्सिकोतहि आहेत. उत्तर अमेरिकेंत कॅलिफोर्नियाच्या उत्तरेच्या प्रदेशात एरिझोनाच्या दगडाळ वनांत एका पर्वताच्या बाराशें फूट उंच मुळक्यावर अगदीं दुर्गम स्थानीं संशोधकानीं विमानातून उतरून एक अति प्राचीन शिवालय शोधून काढलें आहे. तेथील वातावरण बाहेरच्या वनातील वातावरणाहून भिन्न म्हणजे [illegible] हिमयुगपूर्वकालीन [illegible] बराच काल तेथें [illegible] सॅन्फ्रान्सिको येथें एक शिवमंदिर बांधलें आहे. ( Cultural heritage of India II 606.)

युरोपात कॉरिंथ येथें पार्वती-मंदिर पण आहे. स्कॉटलंडात ग्लास्गो येथें सुवर्णाच्छादित शिवलिंग आहे इटालियन लोक अजून शिवलिंगोपासना करतात.

१ कल्याण-शिवाकावरून हा परिच्छेद लिहिला आहे

२ मॉडर्न रिव्यु, फेब्रुवारी सन १९६१.

३ पुरुषार्थ, वर्ष १४, अंक ५ पृ. ३७१

फीजियन लोकांच्या एटिस आणि निनिवा नगरात एपीरनामक शिवलिंग आहे यहुदी लोकांच्या मुलखात बरींच शिवलिंगें आहेत त्याचप्रमाणें आफ्रिडिस्तान, चिनळ, काबूल, बलख-बुखारा इत्यादि स्थळीं पुष्कळ शिवलिंगें आहेत त्याना पचशेर किंवा पंचवीर म्हणतात फ्रेंचाचें कबोडिया म्हणज प्राचीन कबोज या देशात श्ता स ८६६ मध्यें त्या देशाच्या त्या वेळच्या राजेंद्रवर्मा नामक राजान शिवलिंग स्थापन केलेलें आहे जावा ( यव ), सुमात्रा ( सुवण द्वीप ) या बेटात अनेक शिवलिंगें आहेत अगस्ति ऋषींनीं तिकडे शिवभक्तीचा प्रचार केला आहे अगस्तीच्या मूर्तीहि तेथ आढळतात त्यांस तेथील लोक शिवगुरु म्हणतात जावा बेटांतील लाराजो गांवातील एका दुमजली शिवमदिरात दहा फूट उच शिवाची मूर्ति असून नंदी, दुर्गा, गणपति, ब्रह्मा, विष्णु अशाहि मूर्ति आहेत या मदिराचा काळ इ स ९०५ च्या पूर्वीचा नसावा असा तर्क आहे याप्रमाणें पूर्व आशियात बृहत्भारताचे रामण्यदेश, हसावती, द्वारावती, ताम्रलिंग, क्बुजदेश, चपावती, मौन, मलयद्वीप, यवद्वीप, सुवर्णद्वीप, बलिद्वीप, लबकद्वीप, चीनमय भारत, द्वीपमय भारत, लघु भारत इत्यादि प्राचीन प्रदेशात शिवोपासना रूढ होती आज तेथें मुसल्मानाची वस्ती आहे तथापि त्याना तेथील प्राचीन सस्कृतीचा अभिमान आहे तेथील एका मुसल्मानाच्या घरात जन्मलेल्या एका आधुनिक पडितानें युरोपात जाऊन सस्कृत भाषेचा अभ्यास करून उच भाषेंत अगस्त्यरूप शिवावर एक सुदर ग्रथ लिहिला आहे त्याच्या आरभींचा मगल श्लोक रोमन लिपींत छापला आहे तो सस्कृत लिपींत असा—

॥ ओम् अविघ्नमस्तु नम शिवाय ॥ य सर्वं सृजति प्रपालयति चाशेष हरिष्यत्यपि देवाना जगतोऽपि य सुदारुणो गौरीपतिर्यो हर । त देव प्रणमामि शूलिनमचिन्त्य नीलकण्ठ शिव । भो देवेश मम प्रशाम्यतु मल पाप च सर्वं सदा ॥ एव नमामि भगवन्तमगस्त्यध्येय, द्वीपान्तरे निवसता सुमुनिर्महान् य । तेषा महागुरुरपि प्रवरोऽधिनेता, काले पुरा स परिपूजित एकविप्र ॥

याप्रमाणें आशियाच्या आग्नेय कोपऱ्यातील बाह्यभारताप्रमाणें मध्य आशियात म्हणजे अफगाणिस्थान, इराण, चीन, जपान येथेंहि शिवोपासना रूढ असल्याचे

१ हीं युरोपमधील सारींच लिंगें आज शिवलिंगें म्हणून मानतात असें निश्चित म्हणता येणार नाहीं

दाखले स्पष्ट मिळतात इराणात बंदर आबास या मुसलमानांचे गावात मुसल मानाच्या घराच्या गर्दीत मधोमध एक शिवमंदिर आजहि विद्यमान आहे त्या ठिकाणी मुसलमानांची लोकसंख्या कित्येक हजार असून हिंदूंची लोकसंख्या दों पाऊणशेहि नाहीं असें असून त्या शिवमंदिरातील शिवार्चन निर्वेध सुरू आहे

Kambuja

बृहत्भारतातील लिंगोपासनेच्या या इतिहासांत कंबोज आणि चंपा येथील शैवसंप्रदायाचें स्वरूप तेथील राजाश्रयामुळ प्राचीन काळीं फार उज्वल स्वरूपात असल्याचें दिसतें आजच्या फ्रेंच राजसत्तेतील इण्डोचायना (अनाम) देशात अनेक विशाल देवालयें व बरेच प्राचीन शिलालेख आहेत त्यात शिवविषयक लेखच अधिक आहेत या देशातील मीसोनग्राम काशी प्रमाणें शिवोपासनेसंबंधीं प्रसिद्ध आहे इतकी शिवभक्ति आज भारतातहि उरली नाहीं येथील शिलालेख संस्कृत भाषेत फार सुंदर लिहिले आहेत लेखाचे आरंभीं 'ॐनम शिवाय' असें मंगल असतें येथील शिलालेखांवरून पुढील-प्रमाणें निरनिराळ्या राजांनीं निरनिराळीं शिवलिंगें स्थापन केल्याचें आढळतें (१) भद्रवर्मा राजानें भद्रेश्वर (इ स ५ वें शतक), (२) शम्भुभद्रवर्मा राजानें-शम्भुभद्रेश्वर, (३) इन्द्रवर्मा-इन्द्रभद्रेश्वर, इन्द्रभोगेश्वर, इन्द्रपरमेश्वर, (४) विक्रान्तवर्मा-विक्रान्तरुद्र, विक्रान्तरुपेश्वर, विक्रान्तदेवाधिभवेश्वर, (५) जयसिंह वर्मा-जयगुहेश्वर, (६) भद्रवर्मदेव-प्रकाशभद्रेश्वर, (७) भद्रवर्मदेव-भद्रमलयेश्वर, भद्रचंपेश्वर, भद्रमडलेश्वर, भद्रपुरेश्वर, (८) इन्द्रवर्मा-इन्द्रकान्तेश्वर, (९) हरिवर्मा-हरिविभेश्वर, (१०) जय हरिवर्मा-जय हरिलिंगेश्वर, (११) जयेंद्रवर्मा-जयेंद्रलोकेश्वर, जयद्रेश्वर, (१२) इन्द्रवर्मा इन्द्रवर्मलिंगेश्वर, (१३) जयसिंहवर्मदेव-जयसिंहवर्मलिंगेश्वर. याशिवाय अनेक शिवलिंगें स्थापन झाल्याचे व त्याना अग्रहार गाव वगैरे दिल्याचे उल्लेख शिलालेखात आहेत इतकेच नव्हे तर या शिवार्चनेंत तत्कालीन राजांनीं सोनें, रुप, रत्नें याच्या रूपानीं अपार संपत्ति खर्च केली व आपल्या शिवभक्तीची उत्कटता व्यक्त केली, यासंबंधीं उल्लेख आहेत त्यापैकीं काहीं उतारे नमुन्याकरिता पुढें देत आहें —

(अ) सृष्ट येन नितयमखिलं भूर्भुव स्व स्वशस्त्या।<br>
येनोत्खात भुवनदुरित वह्निनेवान्धकारम्।<br>
यस्याचिन्त्यो जगति महिमा यस्य नादिर्न चान्त-<br>
श्शम्पादेदो जनयतु सुख शम्भुभद्रेश्वरोऽयम् ॥

(आ) यं सर्वदेवाः ससुरेन्द्रमुख्या ध्यायन्ति तत्तत्त्वविदश्च सन्तः ।
स्वस्थः सुशुद्धः परमो वरेण्यो ईशाननाथः स जयत्यजस्रम् ॥

(इ) इशमद्रेश्वरस्यैव सर्वद्रव्यं महीतले ।
ये रक्षन्ति रमन्त्येते स्वर्गे सुरगणैः सदा ॥
ये हरन्ति पतन्त्येते नरके वा कुलैः सह ।
यावत्सूर्योऽस्ति चन्द्रश्च तावन्नरकदुःखिताः ॥
लुब्धेन मनसा द्रव्यं यो हरेत्परमेश्वरात् ।
नरकाच्च पुनर्गच्छेन् नचिरं तु स जीवति ॥

(ई) श्रीशानभद्रेश्वर मन्दिरार्क ।
परैः पुरोरोजकृतं विशीर्णम् ॥
पुनर्भवोऽहं सचिनाशकांस्तान् ।
हत्वा रणे तस्य पुनः प्रचक्रे ॥
श्रीमान्श्रीशानभद्रेश्वरममितमुदं स्थापयित्वा पुरोजो ॥
नाकौकः स्थापनस्याक्षयमुत स भुवन्भूधरस्याङ्कमूर्धम् ।
कृत्वा चास्तं गतोऽभूत्पुनरहमपरो भावयित्वा विनष्टं
स्थानं देवस्य तस्याभिमतशचि भुवन्स्थापिनेशः पुरेष्वा ॥

(उ) शैव क्रियावित्सुकृतप्रसक्तो
देवार्चनाज्ञानसमर्थबुद्धिः
शिवोर्गुणान् भारतरान् स चित्ते
सञ्चिन्त्य पुण्य स करोतु कीर्त्यै ॥
शाके खद्वयषष्टिभिर्युक्ते पञ्चाब्दे शुच्यपाण्डरे ।
स्थापितः शिवलिङ्गेशः शिवाचार्येण धीमता ॥

* याशिवाय येथील सत्यमुख लिंगाच्या अति प्राचीन स्थापनेबद्दलचा शिलालेख पूर्वी उद्धृत केला आहे. वरील उपांत्य श्लोकांत शमुभद्रेश्वर लिंगाच्या प्राचीनत्वाबद्दल उल्लेख आहेच. हें लिंग साक्षात् शंकरानें आदिकाळांत भृगूला दिलें. त्यानें उरोजनामक राजाला दिलें. त्यानें चम्पा नगरीत त्या लिंगाची स्थापना करून त्यास शानभद्रेश्वर असें नाव दिलें. वरील शिवलिंगापैकी एक (उ) शिवलिंग वीरशैवांचे शिवाचार्य यांनी स्थापन केलें असा उल्लेख वर आहे.

याप्रमाणें चंपा देशचे प्राचीन राजे परमशिवभक्त होते. ते सर्व हिंदू होते, असें स्पष्ट दिसतें. शिवलिंगस्थापना आणि शिवसेवा हेंच आपलें मुख्य कर्तव्य ते मानीत. तेथील शिवमंदिरांनीं त्यांची कीर्ति अजरामर केली. शिवालयाचें रक्षण हा त्यांचा परमधर्म होता. त्यांनीं आपली अपार संपत्ति शिवार्पण केली होती. शिवद्वेषियांविरुद्ध युद्ध करणें हा त्यांचा क्षात्रधर्म होता. शिवनामोच्चारानें जिव्हा, शिवपूजेनें हात, शिवदर्शनानें नेत्र, तीर्थयात्रांनीं पाय, याप्रमाणें सर्व इंद्रियांचें सार्थक करून शिवध्यानानें ते आपली आत्मतुष्टि करून घेत, असें त्यांच्या अनेक शिलालेखांवरून निःसंदेह दिसून येतें.

या देशांतील शिवलिंगें कांहीं चौकोनी असत, तर कांहीं मुखाकार असत. क्वचित् शिवाच्या मूर्ति पण असत. कोठें सर्पवेष्टित जटाजूटधारी, कोठें त्रिनेत्र त्रिशूलधारी, कोठें वृषभारूढ, कोठें ताण्डवेश्वर, कोठें अर्धनारीश्वर, कोठें अष्टाविसापर्यंत अनेक हात असलेली, अशा शिवमूर्ति आहेत. आपल्या येथीलप्रमाणें कार्तिकेय, गणपति, नंदी व पार्वती यांच्या प्रतिमा पण तेथें आहेत. गणपतीच्या मस्तकीं शिवलिंग असा अनेक मूर्ति आहेत. तेथें शिवभक्तांप्रमाणें देवीचेहि अनेक भक्त असत. या चंपा देशांत 'मुखलिङ्ग' महादेव अति प्राचीन आहे. द्वापारयुगाचीं ५९११ वर्षे लोटल्यावर अर्थात् आजपासून ८६३१२३ इतकीं वर्षे मागें विचित्रसागर नामक महाराजानें या शिवलिङ्गाची स्थापना केली होती. पुढें कोणा परकी मूर्तिभंजकाचें आक्रमण होऊन त्यांत त्या देवस्थानाचा नाश झाला व अपार संपत्ति लुटली गेली. नंतर त्या ठिकाणीं सत्यवर्मा राजानें सत्यमुखलिंग नामक शिवलिंगाची स्थापना केली. यासंबंधीं २९ वा शिलालेख पुढील प्रकारचा आहे.

पञ्चसहस्रनवशतैकादशे विगतकलिकलङ्कद्वापरवर्षे श्रीविचित्रसगरसंस्थापितः श्रीमुखलिङ्गः। तस्य सकलकोशागाररजतरत्नहेमकदवकलशभृङ्गारस्वमदण्डासितातपत्रचामरहेमघटादिपरिभोगा वर्धमाना भवन्ति स्म। ततश्चिरकालकलियुगदोषाद्देशान्तरप्लवागनपापनरमुगणसंहृतेषु प्रतिमापरिभोगभूषणेषु शून्योऽभवत्। पुनरथापि तत्पुण्यकीर्त्यविनाशाय श्रीसत्यवर्मनरपतिर्विचित्रसगरमूर्तिरिव माधवसतशुक्लपक्षे यथा पुरा श्रीभगवतीश्वर–मुखलिङ्गमतिष्ठिपत्।

यावरून असें अनुमान होतें कीं, भरतखंडांतील शिवलिंगोपासनेचें रूप भरतखंडाबाहेर पश्चिमेस जसें विकृत झालें तसें पूर्वेस झालें नाहीं.

---

१ Phallic Misellanies, p. 91.

या पौर्वात्य अथवा दाक्षिणात्य जयेंद्रवर्मानामक शिवभक्त राजानीं इ. स. १०८८ सालीं शिवलिंगाला एक रत्नजडित स्वर्णकवच अर्पण केलें त्याला १७२० तोळे सोनें लागलें त्यानंतर त्यानें तीन हजार तोळे वजनाचा सुवर्ण कळस मंदिरावर चढविला; आणि चवदा लाख तोळे चांदीनें मंदिराच्या साऱ्या भिंती मढविल्या यांत राजाचें वैभव व उत्कट शिवभक्ति या दोहोंचें दिग्दर्शन होतें याच ईश्वरार्पण केलेल्या द्रव्यास अनुलक्षून वरील (ई) हा शिलालेख आहे

वर दिलेल्या विदेशीय शिवलिंगाशिवाय परदेशांत अन्यहि शिवलिंगात्मक प्रतीकें ईजिप्त, आयर्लंड, अमेरिका वगैरे देशांत असल्याचें कोणी सांगतात. पण तीं आज तद्देशीय लोक ईश्वराचें प्रतीकरूप मानीत असतीलच असें वाटत नाहीं तथापि उत्तरोत्तर होत जाणाऱ्या संशोधनावरून हेंच निःसंदेह सिद्ध होत चाललें आहे कीं, कांहीं आधुनिक विद्वान् शिवोपासना म्हणजे भरतखंडातील जंगली लोकांची रानटी उपासना असें बेजबाबदारपणें म्हणत असतात, तें अगदींच अविचाराचें असून उलट हजारों वर्षांपूर्वी जीं खंडें व देश वैभवाच्या शिखरावर होतें त्या त्या ठिकाणीं भरतखंडातील शिवोपासना अत्यंत उज्ज्वल स्वरूपांत रूढ होती. समग्र आशियांत ती सुरू होतीच पण त्याच्या पूर्वेकडील पॅसिफिक महासागरांत गडप झालेल्या अति प्राचीन खंडांतहि ती सुरू होती, असें त्या खंडापैकीं अवशिष्ट राहिलेल्या बेटांच्या इतिहासावरून, तसेंच चीन व अमेरिका येथील संशोधनावरून उघड दिसून येतें आज बोर्निओ, बाली, जावा, सुमात्रा, इत्यादि बेटांत तसेंच अमेरिका, आफ्रिका व युरोप खंडांतहि कोठें कोठें शिवलिंगोपासनेचे अवशेष सांपडतात ईजिप्तचे सुप्रसिद्ध मनोरे, तसेंच आयर्लंडचे मनोरे, बाबेलचा मनोरा हीं महादेवाचींच स्मारक लिंगें (Images of Mahadeo) असल्याचें सर विल्यम जोन्स म्हणतात. बनारसचे बाबु शिवप्रसाद यांच्या पृथ्वीप्रदक्षिणा या ग्रंथांत, लिंगपूजेची प्रथा कोणकोणत्या देशांत, कोणकोणत्या स्वरूपांत अस्तित्वांत होती, त्याबद्दल मोठ्या विस्तारानें विवेचन केलें आहे त्यांत पुढील प्रमुख उल्लेख आहेत : (१) मिसर देशांत ऑसिरस व आयीसिस, (२) ग्रीसमधील बेसक आणि वेयसस, (३) स्कॉटलंडमधील ग्लासगो येथील सुवर्णविशिष्ट लिंग, (४) ऑस्ट्रिया,

(१) Phallic miscellanies, p 91

हंगेरी येथील तनीखकलिंग, (५) असिरियात चिर्ले गावीं तीनशे घन हाताच महालिंग, (६) अरबस्थान येथील संगे असबद (मक्केश्वर) नावाच लिंग, (७) इराणातील ज्वालामयलिंग, (८) पेरू देशातील पार्थिवेश्वरलिंग, (९) अमेरिकेच्या वेंब्रुको शहरातील हिमुखलिंग, (१०) तसच तैथच टेन्स शहरातील घनलिंग, इत्यादि[1]

पाश्चात्य लैंगिक उपासनेचा (Phallism) उगम भरतखडातून झाला अस दाखविण्याचा व पाश्चात्य लैंगिक उपासनेचें शब्दसूत्र व कथासूत्र भरतखडातील शिवासबधी सज्ञांशीं व कथांशीं जोडण्याचा प्रयत्न काही विद्वानांनी केला आहे. वामनपुराणात सहाव्या अध्यायात अशी एक कथा आहे कीं, प्रथम ब्रह्मदेवानें स्वत च्या पूजेसाठीं एक सुवर्णाप्रमाण पीतवर्णाचं शिवलिंग तयार केलें नतर त्यानें ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांनीं अनुक्रमानें श्वेत, रक्त, पीत व कृष्ण वर्णांचीं शिवलिंगें पुजावीं, असें विधान केल त्यान या चार वर्णांकरितां लिंगोपासनेसंबधीं चार पद्धति निर्माण केल्या विश्वामित्राचा पुत्र यानें पहिली पद्धति अनुसरली गोपायन हा त्याचा शिष्य होय अपस्तभ यानें तिसरी पूजापद्धति स्वीकारली क्रीय (Crete) चा राजा बक हा वैश्य होता तो त्याचा शिष्य होता

हा बक (Baka) म्हणजे ग्रीक आणि असिरियन पुराणातील बाकुस (Bacchus) होय क्रीय म्हणजे भूमध्य समुद्रातील क्रीट बेट होय, असें अनुमान सदर ग्रथकार काढतात कारण कोणी तरी भारतीय भक्तानच लिंगोपासना ग्रीस, ईजिप्त, आशियामायनर व तत्सनिध प्रात यात रूढ केल्याची परपरागत समजूत त्या त्या देशात आहे युरोप खडात ग्रीस आणि तत्समीप देश यातच लिंगोपासना प्रथम रूढ झाली ती प्रथम फारच माठ्या थाटात सुरू झाली ग्रीकाचा महादेव ऑसिरीस तोच बाकुस होय याची कथानिया येथें ज्या हेबॉन (Hebon) नावानें पूजा होत असे त नाव शिवनामाचाच अपभ्रश होय हेबॉनची पत्नी हेबे (Hebe) हिचें कोरे (Kore) असेंहि नाव होते तहि गौरी या नावाचें अपभ्रष्ट रूप दिसतें तसेंच तिचें डेमेटर (Demeter) हें नाव देवमाता या नावावरूनच बनलें असाव, असें हे सशोधक म्हणतात

१ लिंगपूजेचें ऐतिहासिक विवेचन, पृ ७

२ Indian Civilization and its Antiquity By B Mookerji, p 14, et sequa

ग्रीकाचा बाकुस ( Bacchus ) हा भारतीय बकाप्रमाणें Hebon-शिव या देवाचा उपासक होता ग्रीकाचा Hebon याचेमागें वृषभ आणि व्याघ्र हे अनुचारी असत त्याच्या एका हातात त्रिशूळ, व दुसरे हातात कमंडलू असे शिव होऊन शिवाची पूजा करावी, या न्यायानें हा बक शिवरूप दिसत असे हेबॉनऱ्या भगताच्या लीला निशाचर शिवगणाप्रमाणच होत्या. भारतीय बकानें शीघ्र फलदायी शिवाची 'फलेश' या नावानें पाश्चात्य देशात उपासना सुरू केली त्या फलेशचा अपभ्रंश phallus असा झाला पाश्चात्याचा डायोनिसस ( Dionysus ) म्हणजे देवनिद्री किंवा दूनेश शिव होय शेमोस ( Chemos ) किंवा खेम ( Khem ) म्हणजे क्षेमेश, मोलोच ( Moloch ) आणि मेरडॉक ( Merodock ) म्हणजे मृड अॅडोनेस ( Adonais ) म्हणजे अर्धनारीश साबाझिअस ( Sabazius ) म्हणजे शवशायी, होरस ( Horus ) म्हणजे हर, ओसिरिस ( Osiris ) ईश्वर; सेबेक ( Sebek ) शिवक, सेब ( Seb ) शिव, स्क्रॅपीझ ( Scraphiz ) सर्पेश, माउत ( Maut ) माता, सेइस ( Cteis ) सति, सिबिल्लाइन ( Sibylline ) शिवलिंग, लगबा ( Lengba ) लिंगदेव, याप्रमाण पाश्चात्य लिंगोपासनेसबधीं देवतावाचक शब्दाचा भारतीय नामाशीं सबध जोडला जातो व सुमात्रा, जावा, या पूर्वेकडील बेटाप्रमाण क्रीट या पश्चिमेकडील बेटात भारतीय सस्कृतीबरोबर लिंगपूजा गेली असें हे ग्रथकार अनुमान काढतात

[ सदर्भग्रथ—शिवनिर्माल्य रत्नाकर, मि ए बर्गेन व बार्थ याचे प्राचीन शिलालेखावरील ग्रथ एनशट इडियन कॉलनीज् इन दि फार ईस्ट डॉ एन जे. क्रोम याच यवद्वीपातील प्राचीन शिल्पकला फ्रेंच ग्रथकार म्यास्परो याचा ग्रथ एनशट लोतान रादेन मासपूर्वचरक एशियाटिक जर्नल, न १–३ कल्याण शिवाक, पृ ५७३ ते ९० बाबु शिवप्रसाद याची पृथ्वीप्रदक्षिणा इडियन सिव्हिलिझेशन अॅण्ड ट्रस अॅंटिक्विटीज मॉडर्न रिव्ह्यु, फेब्रुवारी सन १९५१. Cultural Heritage of India पुरुषार्थ, वर्ष, १४ अक ५ ]

माता च पार्वती साक्षात् पिता देवो महेश्वरः।
बांधवाः शिवभक्ताश्च स्वदेशो भुवनत्रयम्॥

—शकराचार्यकृत अन्नपूर्णास्तोत्र

---

प्रकरण १० वें

# व्यापक लिंगोपासना



द्यौ ३ ष्पितः पृथिवि मातरध्रु भ्रातर्वसवो मृळतानः ।
विश्व आदित्या अदिते सजोषा अस्मभ्यं शर्म बहुलं वियन्त ॥
—ऋग्वेद, ६।५१।५.

आकाशस्तल्लिङ्गात् ।
—ब्रह्मसूत्र, १।१।२२.

आकाशमुपास्वेति ।
—छांदोग्य उप., ७।१२।१.

आकाशं लिंगमित्याहुः पृथिवी तस्यपीठिका ।
आलयः सर्व देवानां लयनाल्लिङ्गमुच्चते ॥
—स्कंदपुराण

दक्षिणाश्च उदञ्चोहं प्राञ्च प्रत्यञ्च एव च ।
अधश्चोर्ध्वं च विदिशो दिशश्चाहं सुरेश्वराः॥
—शिवगीता, ६।१३.

तया शिवरूप-गगनामाजीं । ज्ञानसूर्य प्रगटला सतेजीं ।
देखिया सूर्यप्रकाशीं सहजीं । सर्वांची मुक्ति राहाटी
व्हावी ॥ ३ ॥
—ज्ञानेश्वरी, अ० १२.

मागील प्रकरणांत ध्वनित केल्याप्रमाणें अति प्राचीन इतिहासपूर्वकाळीं सर्व पृथ्वीवर एक शिवलिंगोपासनाच रूढ असेल तर त्या सत्ययुगांत

माता च पार्वती साक्षात् पिता देवो महेश्वरः ।
बांधवाः शिवभक्ताश्च स्वदेशो भुवनत्रयम् ॥

या आचार्यांच्या दिव्य दर्शनाप्रमाणें अखिल जग हें एक शिवसांप्रदायिक विश्वकुटुंब म्हणून सुखशांतीनें नांदत असेल, असें अनुमान होतें

कालाची पुनरावृत्ति होत असते असें म्हणतात या भारतवर्षाला त्याचें स्वराज्य प्राप्त होताच, प्रभासक्षेत्रातील पुराणप्रसिद्ध व इतिहासप्रसिद्ध सोमनाथ नांवाच्या पहिल्याच ज्योतिर्लिंगाच्या मंदिराचा जीर्णोद्वार होऊन तें मंदिर सर्व धर्मीयांना मोकळें ठेवण्यात आलें आहे, आणि आज विश्वधर्माचे डोहाळे भूमातेला लागले आहेत, असें बरेच विचारी पुरुष म्हणत असतात त्या डोहाळ्याप्रमाणें साऱ्या जगावर जर पुढें एकच एक विश्वधर्म नांदावयाचा असेल, तर त्या व्यापक धर्मातील उपास्य शिवलिंग व त्याचें प्रतीक कसें असेल अगर असावें, व त्या ठिकाणीं कोणती धारणा ठेवावी, यासंबंधीं कांहीं सूचक विचार पुढें मांडीत आहें त्यास आधारभूत अनेक शास्त्रवचनें या लेखाच्या आरंभीं दिलींच आहेत याचाच किंचित् विस्तार या प्रकरणांत करीत आहें

सर्वधर्मनिरपेक्ष असें उपास्याचें व त्याच्या प्रतीकाचें स्वरूप असावयाचें म्हणजे तें जगताचे पूर्वी, जगताला आरंभक, व अखिल जगाला आधारभूत, असेंच असलें पाहिजे परब्रह्म परमात्म्याच्या ठिकाणीं हें जग कसें उत्पन्न झालें, तो विचार शास्त्रकार पुढीलप्रमाणें सांगतात "तेवीं स्वरूप जें असंग। पहिलें स्वतःसिद्ध अभंग। तेथें स्फूर्ति हें माया सोंग। न होऊन जालें ॥७२॥ जालें तें जरी सत्य असतें॥ तरी माया नाम का उच्चारितें। तस्मात् जालेंच नसतां तयातें॥ जालेंसें कल्पिलें ॥७३॥ स्फूर्ति म्हणजे अहंब्रह्मस्फुरण। उगीच आपआपली आठवण॥ जेवीं वायूची झुळूक उत्पन्न। गगना नातळतां उठे ॥७३॥ + + + स्फुरणींच जें छिद्र पडिलें। म्हणजे चिद्घन असतां स्फुरण जालें। तया अवकाश नाम ठेविलें। आकाश ऐसें ॥ ९३ ॥ स्फुरणाचा जो चंचळपणा। तो वायूचे पावला अभिधाना। भासलें स्फुरण तें वचना। तेज बोलिजे ॥ ९४ ॥" इ (लघुवाक्यवृत्ति, हंसराज टीका)

सृष्टीच्या पूर्वींचें मूळचें जें एकम्, एवम्, अद्वितीयम् ब्रह्म, त्या ब्रह्माच्या ठिकाणीं अगदीं आरंभीं अहम् आणि इदम्, बिंब आणि प्रतिबिंब, कल्पक आणि कल्पना, विषयी आणि विषय, ज्ञाता आणि ज्ञेय, इच्छा आणि क्रिया, असें जें द्वंद्व निर्माण झालें तेंच अविनाशभूत असें शिवशक्तिस्वरूप होय

मूळच्या मायोपहित सद्‌युन्मुख सद्‌ब्रह्माच्या ठिकाणीं प्रथम मनःप्राण वाङ्‌रूप आकाश उद्‌भूत झालें. शालाचद्रन्यायानें हेंच सद्‌ब्रह्माचें अति निकटवर्ती असें शबलब्रह्माचें, अथवा शिवशक्तींचें म्हणजे ईश्वराचें पहिलेंच, बृहत् आणि व्यापक प्रतीक होय.

ज्याप्रमाणें भूताकाश, चित्ताकाश व चिदाकाश या आकाशसंज्ञांत स्थूल-सूक्ष्म भाव संभवतो, त्याचप्रमाणें प्राणवाङ्‌मयोद्भव आकाश व आकाशोद्भव वायु याप्रमाणें प्राण व वायु यांत सूक्ष्म स्थूल भेद आहे. मनप्राणवाङ्‌मयात्मक आद्य शिवसंकल्पाच्या अनंत नादलहरींनीं व्यात जो अवकाश तेंच आकाश हें पहिलें महद्‌भूत होय. हाच सगुणाचा व्यक्त मूळारंभ होय.

छांदोग्य उपनिषदांत शालावत्य महर्षींनें सर्व लोकांची आधारभूत वस्तु विचारली असता, प्रवाहण राजानें उत्तर दिलें कीं, हीं सर्व भूतें आकाशापासूनच समुत्पन्न होतात व आकाशातच अस्त पावतात. आकाशच सर्वांची प्रतिष्ठा आहे. (सर्वाणि ह वा इमानि भूतान्याकाशादेव समुत्पद्यन्त आकाशं प्रत्यस्तं यन्त्याकाशो ह्येवैभ्यो ज्यायानाकाशः परायणम् ।''–छांदोग्य, १।९।१.)

शतपथ ब्राह्मणांत (१४।४।२) म्हटलें आहे कीं, "द्वे वाव ब्रह्मणोरूपे मूर्तं चामूर्तं च।" यांत आकाश आणि वायु हे ब्रह्माचे श्रेष्ठ अमूर्त प्रकार होत. आपल्या सूर्यमालेचा उत्पादक जो सूर्य त्याचा अंतर्यामिन् हिरण्मय पुरुष म्हणजे हें अमूर्त ब्रह्म होय.

चवथ्या ईशश्रुतीवर टीका करतांना हंसराज म्हणतात–"एक जें ब्रह्मतत्व पूर्ण । तेथें उद्भवलें हें जरी संपूर्ण । तरी तें हलवलें नाहीं सघन । गगन जेवीं सर्वीं ॥ ९ ॥ मायादि वृत्तींच्या प्रवाहें ॥ जीवेशत्वही त्या सर्वे वाहे । परी परमात्मत्व सचलें राहे । चिद्‌गगन निश्चळ ॥ १० ॥" येथें वायुसंपरिव्यक्त-आकाशतत्वालाच आकाश म्हटलें आहे.

ब्रह्मसूत्रभाष्यात (१।१।२२) आकाश हें ब्रह्मलिंग मानलें आहे. ब्रह्म म्हणजेच परमशिव. अर्थात् आकाश हेंच शिवलिंग होय. वायुसहित आकाश म्हणजे सक्रिय ब्रह्माचें अथवा सशक्तिक शिवाचें प्रतीक होय.

छांदोग्यात, स्मर म्हणजे स्वस्वरूपस्मरण याच्या खालोखाल आकाश हेंच श्रेष्ठ उपास्यलिंग मानलें आहे (छां. ७।१२।१)

शिवगीतेंत शिव रामाला आपला विभूतियोग सांगतांना म्हणतात कीं, दक्षिणेकडे, उत्तरेकडे, पूर्वेकडे, पश्चिमेकडे व खालीं-वर, दिशा व विदिशा मीच आहे. त्याचप्रमाणें आकाश, रवि, चंद्र, नक्षत्रें आणि ग्रह मीच आहे. (आकाशोऽहं रविः सोमो नक्षत्राणि ग्रहास्तथा ॥ ६।२९.)

योगवासिष्ठांत भूताकाश, चित्ताकाश व चिदाकाश हीं तीन आकाशें सांगून उपासकांनीं तत्त्वतः तीं एकच समजावीं असें म्हटलें आहे. (चित्ताकाशं चिदाकाशमाकाशं च तृतीयकम्। विद्ध्येतत्त्रयमेकं त्वमविनाभावनावशात् ॥ ३।४०।१९). यांत चिदाकाश हें ज्ञानस्वरूप ब्रह्म व बाकीचीं त्याच्या उपलब्धीचीं स्थानें अर्थात् प्रतीकें आहेत.

शास्त्रांत तेज, जल, पृथ्वी या भूतत्रयरूपमूर्त ब्रह्माला 'सत्' व अमूर्त अशा वायुसहित आकाशाला 'त्य' म्हणतात. सर्व मिळून होणारें 'सत्य' हें प्रजापतीचें तात्त्विक व व्यक्त स्वरूप मानलें आहे. सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी सृष्टिकर्ता असलाच पाहिजे. त्यालाच प्रजापति म्हणतात. त्याचीच ओम् ही संज्ञा आहे. मन, प्राण, वाक्; अथवा नाम, रूप, कर्म; किंवा ज्ञान, क्रिया व अर्थ, ह्या त्याच्याच कला आहेत. दैनंदिन प्रलय म्हणजे गाढ निद्रा, तिच्या उत्तरक्षणाप्रमाणें एकोऽहं, अहं ब्रह्म, ही जी महाप्रलयानंतरची परमात्म्याच्या अहम्‌ची प्रारंभिक जागृतावस्था, या अवस्थेंतील सूक्ष्म अहंताच इदंतारूप म्हणजे विषयरूप पावते. जणूं आपण आपल्यालाच विषयभूत होतों. हेंच अविनाभूत अशा शिवशक्तीचें अथवा ब्रह्मप्रकृतीचें समावेशन होय. ही जी आद्यस्फुरद्रूपक्रिया तिचा ध्वनि तोच प्रणव होय. या स्फुरद्रूपक्रियेंत मन, प्राण, वाक् या तिन्ही कलांचा परिणाम दिसून येतो. या सृष्टीच्या आरंभक प्रणव ध्वनीच्या लहरी जें द्रव्य उत्पन्न करतात तेंच भूताकाश होय. प्रणव हेंच परमात्म्याचें पहिलें व्यक्त स्वरूप. त्या आकाशवाणीचेंच महदाकाश बनतें. तेंच ईश्वराचें आद्यप्रतीक होय.

परमात्म्यापासून आकाश व त्यांतून सर्व सृष्टि निर्माण झाली (तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूतः आकाशाद्वायुः वायोरग्निः, अग्नेरापः अद्भ्यः पृथिवीति ।-तै. उप. २।१). भक्ताचे अनन्यगतिक प्रार्थनातरंग व कृपाळू ईश्वराची वरद आकाशवाणी यांचें मधुमीलन जेथें होतें, तेंच हें आकाशलिंग

प्रतीक होय. शिव होऊन शिवाला भजावें याचा रहस्यार्थ हृदाकाश तेंच चिदाकाश हाच जाणावा.

छांदोग्यांत नारदास सनत्कुमारांनीं सांगितलें कीं, "तूं आकाशाचीच परमात्म भावनेनें उपासना कर; कारण आकाश सर्वांत मोठें आहे. त्यांतच सर्वांची उत्पत्ति, स्थिति व गति आहे. बोलणें आणि ऐकणें आकाशामुळेंच संभवतें. जो आकाशलिंगाचे ठायीं ब्रह्माची उपासना करतो, तो आकाशवान्, प्रकाशवान्, पीडारहित व विस्तीर्ण प्रचाराच्या लोकांस प्राप्त होतो." यास्तव (दुर्घट असूनहि) आज अनेकांस इष्ट वाटत असलेल्या विश्वधर्मांत आकाश हेंच ब्रह्मलिंग म्हणजेच शिवलिंग, हें श्रेष्ठ असें उपासनीय प्रतीक ठरतें.

भगवान् अर्जुनाला राजविद्या सांगतांना म्हणतात कीं, मीं आपल्या अव्यक्त स्वरूपानें हें सर्व जग विस्तारलें आहे. माझ्या ठायीं सर्व भूतें आहेत. मीं अमूर्त असल्यानें त्यांच्या ठायीं नाहीं. आणि माझ्या ठायीं सर्व भूतेंहि नाहींत ! पहा, कशी ही माझी ईश्वरी करणी किंवा योगसामर्थ्य आहे तें ! भूतें उत्पन्न करणारा आत्मा भूतें धारण करूनहि पुनः निराकार निःसंगतेनें त्या भूतांत नाहीं. सर्वत्र वावरणारा महान् वायु ज्याप्रमाणें सर्वदा आकाशाच्या ठायीं संसर्गा-शिवायच असतो, तशीं सर्व भूतें माझ्या ठायीं स्थित आहेत असें समज. मी अध्यक्ष होऊन प्रकृतीकडून सर्व चराचर सृष्टि प्रसवितों. या कारणामुळें हे कौंतेया ! जगाची ही घडामोड चालली आहे. दैवी प्रकृतीचा आश्रय करून राहिलेले जाणते महात्मे सर्व भूतांचें अव्यय आदिस्थान जो मी त्या मला ओळखून अनन्यभाव होत्साते माझें भजन करतात. आणि यत्नशील, दृढव्रत आणि नित्य योगयुक्त होत्साते माझें सतत कीर्तन व वंदन करीत भक्तीनें माझी उपासना चालवितात. तसेंच दुसरे कित्येक बहुप्रकारें ज्ञानयज्ञानें यजन करून माझी उपासना करीत असतात. वर भगवंतानेंच सांगितल्याप्रमाणें परमात्म्याच्या या निःसंग योगैश्वर्याचें सम्यक् प्रतीक आकाश हेंच होय.

वायुसंपरिष्वक्त आकाश हें शबलब्रह्माचें म्हणजे शिवशक्तीचें अर्थात् ईश्वराचें लिंग म्हणजे चिह्न अथवा प्रतीक आहे. असें हें आकाश म्हणजे केवळ पोकळ घुमटाप्रमाणें दिसणारें आभाळ नव्हे. तें खालीं-वर सर्वत्र व्यापक आहे. तें स्वतः स्थिर वाटलें तरी त्यांतील प्राणतत्त्वामुळें तें स्पंदयुक्त आहे. ही जी आकाशाची प्राणस्पंदस्थता तेंच तत्त्वतः विश्वाचें

स्वरूप होय अर्थात् तेंच विश्वधर्माचें मूलस्वरूप होय अशी विश्वरूप-दर्शनाची धारणा या आकाशरूप शिवलिंगाच्या ठिकाणीं सहजप्राप्त आहे. अनघड पाषाण शिलेच्या ठिकाणीं तेहतीस कोटी देवता अव्यक्त असू शकतात त्याहीपेक्षा जास्त सत्यतेनें महदाकाशाच्या ठिकाणीं साऱ्या देवदेवताचीं नामरूपें अव्यक्ततेनें वास करतात, हें सुज्ञास सहज पटेल

स्वामी विवेकानंदानीं आपल्या राजयोगावरील पुस्तकात (Ch. III) असें म्हटलें आहे :—

" According to the philosophers of India, the whole universe is composed of two materials, one of which they call Akasa. It is the omnipresent, all penetrating existence. Every thing that has form, every thing that is the result of compounds, is evolved out of this Akasa. It is the Akasa that becomes the air, that becomes the liquids, that becomes the solids, it is the Akasa that becomes the human body, the animal body, the plants, every form that we see, every thing that can be sensed every thing that exists "

" By what power is this Akasa manufactured into this universe ? By the power of Prana. Just as Akasa is the infinite omnipresent material of this universe, so is this Prana the infinite omnipresent manifesting power of this Universe. At the beginning and at the end of a cycle everything becomes Akasa and all the forces that are in the universe resolve back into the Prana. It is the Prana that is manifesting as the actions of the body, as the nerve currents, as thought force, from thought down to the lowest physical force, everything is but the manifestation of Prana."

Vedant Kesari further adds—

According to the Hindu cosmologists, on the relative plane there are two principles : the first is the sentient

or pure Spiritual Principle, and the second, the insentient power or force, in which the sentient spirit is immanent "

"In the great hymns of Rigveda we read —" Motionless did the Supreme Spirit vibrate alone in its glory Beyond that nothing did exist. Creative then became the glory with self sustaining principle below and creative energy above '

" Conscious of intense cosmic vibration, the Seer of the Upanishads declares—whatever exists in this Universe vibrates within the Prana ' ( Vedant Kesari, Dec. 1951— Rajayoga by Swami Vivekananda, chapter III )

अखिल जग हें प्राणशक्तीचें अर्थात् चचल आकाशाचें म्हणजे शिवशक्तीचें अथवा सक्रिय ब्रह्माचें विविध स्पदरूपच आहे हें मूलग्राही स्पदशास्त्र हा भौतिकशास्त्राचा परिपाक आहे याप्रमाणें आपलें सनातन वैदिक तत्त्वज्ञान, भावी विश्वधर्म, व भौतिक विज्ञान याचें जेथें मधुमीलन होतें, तेंच हें महान् शिवालय होय येथेंच प्रकाशविमर्श, स्थितिगति, चिज्जड, सत्यानृत, याप्रमाणें अनेक विरोधी धर्माश्रयरूप, अथवा अभिन्न निमित्तोपादानकारणरूप म्हणजे शिवशक्तिरूप जगदीश्वराचें आकाशलिंगरूप महान् प्रतीक विद्यमान असलेलें भासत आहे. तेंच बाहेरील स्थूल भूताकाश अतरातील सूक्ष्म दहराकाश अथवा चित्ताकाश व निर्गुण चिदाकाश हें सारें तत्त्वत परब्रह्मच होय अशीहि सगुणाच्या आधारें निर्गुणाप्रत पोंचविणारी, नैतिक समतावादाचें अथवा आत्मौपम्यबुद्धीचें मर्म पटविणारी आकाशलिंगद्वारा शिवब्रह्माची दिव्य उपासना होय दृढीकरणार्थ याचाच आणखी पुन पुन्हा विचार करू

जगत्कारणरूप शिवाचें लिंग अरूप आणि व्यापक असलें पाहिजे हें उघड आहे आकाशलिंग हें तसें आहे आणि त्या विराट आकाशलिंगाचीच रुद्र, अरूप, पार्थिव शिवलिंग ही उपासनेला व्यवहार्य अशी प्रतिमा आहे असें समजावें ऋग्वेदात (६।२१।५, १।११९।६) म्हटलें आहे कीं, 'द्यावा

पृथिवी ' अथवा ' आकाश पृथिवी ' हींच आपल्या जगाची मातापितरें होत. भौतिक जगाचें म्हणजे महद्भूतपंचकाचें आद्यन्त आकाश आणि पृथिवी हेच होत. त्यांच्या पोटांत वायु, तेज व जल हे भूतत्रय आलें. तेव्हां महद्भूतनाथ अशा पंचमुखी शिवाचें आकाशलिंग हें विवक्षित धर्मपंथनिरपेक्ष असें सामान्य व व्यापक प्रतीक मानतां येईल. विविध धर्मपंथांतील अनेक इष्टदेवांचा जो देवाधिदेव महादेव, ज्याला श्रीधूतपापेश्वराप्रमाणें ईश्वर हें सर्वसाधारण नांव दिलें जातें, त्याचें हें सर्वोत्कृष्ट, सर्वांस मान्य होण्यासारखें असें अरूप व व्यापकतादर्शक प्रतीक होय. देवालयांतील स्थावर मूर्तीची जशी वेगळी लहान उत्सवमूर्ति करतात, तसेंच स्थावर आकाशलिंगाचीच पार्थिव शिवलिंग ही लघुतम प्रतिमा होय.

अति प्राचीन वैदिक वाङ्मयांत पुढील आशयाचें वर्णन आढळतें :– या सर्वत्र प्रतीत होणाऱ्या महदाकाशलिंगाच्या ठिकाणीं तो एकच ( वृषभेचा ) सूर्यरुद्र[1] आपल्या तीव्र प्रकाशमहिम्यांत प्रतिष्ठित आहे. त्याच्यापासून किरणरूपानें अवतरणाऱ्या असंख्य रुद्रांनीं[2] हें आकाशलिंग व्याप्त आहे. तो द्यौस्थानीय सूर्यरुद्र हाच आमचा पिता व पृथिवी ( आणि आदित्याची अदिती याच ) हीच आमची माता होय[3]. समष्टि मनश्चंद्रम्याच्या शांतदृष्टिक्षेपरूप किरणांनीं तोच घोर रुद्र सौम्य शिवरूपात प्रतीत होतो[4]. त्याच सोम म्हणजे उमेसहित शिवानें म्हणजे सौम्य प्राणांनीं हें आकाशलिंग व्याप्त आहे. अर्थात् तेंच शिवशक्तिरूप आहे. हें शिवाचें आकाशलिंग पोकळ शून्यरूप नसून वस्तुतः घन आहे. प्रकाशरूप शिवाला जणूं तिरोहित करूं

१ एको हि रुद्रो न द्वितीयाय तस्थुर्य इमॉंल्लोकानीशत ईशानिभिः। प्रत्यङ्जनास्तिष्ठति—श्वे. उप. ३।२.

२ " असंख्याताः सहस्राणि ये रुद्राः। " यजु. १६।५४
" ये चैनं रुद्रा अभितो दिक्षुश्रिताः। "

३ ऋग्वेद ६।५१।५ ; १।१९१।६ पहा.

४ एष वै सोमो राजा देवानामन्नं यच्चन्द्रमाः ॥ —शत. ब्रा. १।६।४।५.

५ त्वमिमा ओषधीः सोम विश्वा—स्त्वमपो अजनयस्त्वं गाः ॥
त्वमा ततन्थोर्व १ न्तरिक्षं त्वं ज्योतिषा वि तमो ववर्थ ॥
—ऋ. १।९१।२२.

पाहाणारी, (तमप्रधान महारात्रि ही प्रबोध प्रभातरूप परिणामांत प्रकाशरूप होणारी) विमर्श (काली उमा) आहे. म्हणून श्रीकालीसहित शिवाचें हें पाषाणलिंगप्रतीक घन, दीर्घगोल व कृष्णवर्ण आहे. तें बाहेरून अचित् पण अंतर्यामी चिद्रूप, बाह्यतः तमप्रधान पण अंतरंग सत्त्वप्रधान असें जाणावें.

वरील विवेचनास दुजोरा देणारी आणखी प्रमाणें म्हणजे—

> चिन्मयः परमाकाशो य एव कथितो मया।
> एषोऽसौ शिव इत्युक्तो भवत्येव सनातनः॥ यो वा.
>
> आकाशं लिङ्गमित्याहुः पृथिवी तस्य पीठिका।
> आलयः सर्व देवानां लयनाल्लिङ्गमुच्यते॥ १॥

दुसरें वचन स्कंदपुराणांत आहे. शिवलिंगोपासनेस ही आकाशरूप स्वयंभू शिवलिंगाची धारणा भव्य, सयुक्तिक आणि पुरेशी आहे. आकाशापेक्षां पार्थिव शिवलिंग थोडें जास्त उमट वाटतें, याचें कारण क्षितिजाच्या रुंदीच्या मानानें खस्वस्तिक उंची जास्त मानली असावी. सूर्य क्षितिजाशीं मोठा दिसतो, तसा खस्वस्तिकीं दिसत नाहीं. या दूरत्वाच्या कल्पनेनें शिवलिंग तसें उमट करीत असतील. सारींच शिवलिंगें तशीं नसतात. आकाश हें पृथ्वीवर टेकलेलें भासतें, म्हणून पृथ्वी त्याची पीठिका म्हणता येते.

परब्रह्मरूप शिवाला आकाशासारखें दुसरें उपमान नाहीं. श्रीसमर्थ त्यास खब्रह्म म्हणतात—" आकाश सकळांसि व्यापक। आकाश अनेकीं एक। आकाशामध्यें कौतुक। चहूं भूतांचें ॥ ३५॥ आकाशा ऐसें नाहीं सार। आकाश सकळांहून थोर। पाहातां आकाशाचा विचार। स्वरूपासारिखा॥ ३६॥ —दा. बो. ८।५.

उपमान हें उपमेयाहून भिन्न असतें, हें उघडच आहे. पण ज्ञातावरून अज्ञात परमशिवत्व जाणण्यास आकाशाहून योग्य अशी अन्य शिवविभूति अगर प्रतीक मिळणार नाहीं. तें पोकळ म्हणावें तर शिवशक्तीनें व्यास आहे. अमूर्त म्हणावें तर वायुतेजादिभूतभौतिकास धारण करणारें प्रत्यक्ष आहे.

तें सर्वत्र सम, नित्य, एकरस, अखंड, निर्विकार, निश्चल, विभु, व्यापक व निर्मल आहे. प्रणव हीच त्याला व शिवाला संज्ञा शोभते. भौतिक दृष्ट्या

तें सर्वप्रथम व सर्वांत मोठें असें जगत्कारण आहे तें उपासनीय मानलें आहे तें नामरूपाचा निर्वाह करणारें आहे याप्रमाणें अखिल जगत् असें या आकाशरूपशिवलिंगाच्या पोटात आहे, तसेंच उलट तें आकाशरूपशिवलिंग अणुरेणू-यांहि पोटात अनुस्यूत आहेच भौतिकाचें जल, वायु, विद्युत् आणि तेज ही तत्त्वें त्या आकाशरूपशिवलिंगात आहेत सारें आधिदैवत जगत् या आकाशलिंगात अव्यक्त आहे सर्व धर्मीयांचे देव व पितर त्यात अव्यक्त आहेत अंतःकरण आणि ज्ञानेंद्रियाचा सारा सत्त्वांश त्यात आहे पार्शी भक्ताचा सूर्य, मुसलमानाचा चद्र, ज्योतिर्विदाचीं ग्रह व नक्षत्रें, आणि भौतिकशास्त्रज्ञाची विद्युतादि शक्ति त्यात आहे चारी भूताचें लयस्थान तेंच आहे चतुर्दश भुवनें त्यातच आहेत खपुष्प आणि गंधर्वनगरें ही सारी महेश्वराची माया तेथेंच आहे तें ईश्वरप्रमाणें सर्वोत्पत्तिस्थितिगतीस आधार आहे-
" निष्क्रमण प्रवेशनमित्याकाशस्य लिंग । " —वैशेषिकदर्शन, २।१।१-

त्या नीललोहित सगुण शिवाची आकाश हीच जणू प्रतिमा होय. आकाशगंगा धारण करणारें आकाश हेंच गंगाधराचें उत्कृष्ट उपमान होय. मेघ हाच त्याचा जटाजूट असून सूर्य, चंद्र आणि अव्यक्त अग्नि हेच त्याचे त्रिनेत्र होत. अहोरात्र हाच त्याचा वृषभ जाणावा त्रैलोक्य हाच त्याचा त्रिशूल, दिशा हेंच त्या दिगंबराचें वस्त्र, मेघगर्जना हाच त्याचा पराक्रमी

१ अस्य लोकस्य का गतिरित्याकाश इति होवाच । सर्वाणि ह वा इमानि भूतान्याकाशादेव समुत्पद्यन्त आकाशं प्रत्यस्त यन्त्याकाशो ह्येवैभ्यो ज्यायानाकाशः परायणम् ॥ —छादोग्य, १।९।१. एतस्मादात्मन आकाशः संभूत । —तै उप २।१

२ आकाशो वाव तेजसो भूयानाकाशे वै सूर्याचद्रमसावुभौ विद्युन्नक्षत्राण्यग्नि ॥ इ० —छादोग्य ७।१२।१

३ स य आकाश ब्रह्मेत्युपास्त आकाशवतो वै स लोकान्प्रकाशवतोऽसबाधानुरुगायवतोऽभिसिध्यति यावदाकाशस्य गत तत्रास्य यथाकामचारो भवति । य आकाश ब्रह्मेत्युपास्तेऽस्ति ॥ छादोग्य —७।१२।२.

४ बृहदारण्यक उपनिषत्। मैत्रेयी ब्राह्मण; छादोग्य उप ८।१४।१,६।३.

५ एकोदेव. सर्वभूतेषुगूढ सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ॥ श्वे उप ६।११.

वीरभद्र समजावा. आकाश हेंच कश्यप म्हणजे पश्यकरूप साक्षीसामान्य आहे. दाक्षायणी अदिती हिलाच मी शिवशक्ति मानतों तीच जगन्माता, तीच द्यावापृथ्वीरूप, आणि विश्वरूप पण तीच आहे आणि विश्वाचा आपल्या पोटात ग्रास करणारी तीच पिण्डातर्गत दहराकाश व बुद्धि हीच कश्यप (पश्यक)—अदितीची जोडी, शिवशक्तीचीं प्रतीकें अगर आलंबनें म्हणून उपासकास सोयीचीं वाटतात. पण हें आकाश व महत्बुद्धि दोन्ही जड आहेत, म्हणूनच त्याचें जड पार्थिव लिंग हेंच व्यवहार्य प्रतीक योग्य ठरतें. सर्व देशांत, सर्व धर्मांत आणि तिन्ही काळांत जें एकमेव उपासनीय आहे, तें हें परमात्म्याचें व्यापक अथवा सहज सर्वत्र उपलब्ध असें लिंग होय. आकाश-लिंग हीच परमशिवाची परमश्रेष्ठ विभूति होय.

*श्रीरामकृष्ण परमहंस यास एकदा श्रीगंगा नदींतून एक अति लावण्यवती* स्त्री बाहेर प्रकट झालेली दिसली. थोड्या वेळानें ती प्रसूत झाली व तिला एक सुंदर बालक झालें असें त्यानीं पाहिलें. नंतर आश्चर्य असें कीं, तें बालक त्या स्त्रीनेंच खाल्लें व ती अदृश्य झाली. हें तत्त्वतः अदितीचेंच रूप दिसतें.

शिवलिंगाचा संबंध, यज्ञातील स्तूप, किंवा यज्ञकुंडातील अग्नीच्या स्फुलिंगाला झाकणाऱ्या भस्माचा ढीग, किंवा असि, अथवा दिव्य तेजें,

---

१ संस्कृत व्याकरणाप्रमाणें कश्यपाचें पश्यक रूप बनतें.

२ ऋ. १।७२।९; १०।६३।१०. अ. वे. ३।१।१८.

३ The mistress of the race is Aditi, the mother of the Gods, the great deep and chaos, or primeordial substance in its first remove from the unknown in the manifold cosmos. (Secret Doctrines, IV, pp. 95, 97).

४ Comple works of Swami Vevekananda, Mayavati Edition, IV p 942.

५ भगिनी निवेदिता ह्यांच्या शिव आणि बुद्ध या पुस्तकांतील कल्पना पहा.

६ Pro. R. D. Ranade's Foreword to the Hand-book of Veershaivism. शिवाद्वैत-संहिता ५।११२,४; ऋ २।१।६;१।२७।१०; ३।२।५; ४।३।१; अथर्व ७।८७।१; शतपथ ब्रा. ६।१।३।१०, यजु. २।६।६. ३।५।५; म भा. वन. २२७।२६ केन. ख.४ शि. पु वि. स. १.

यांच्याशीं कित्येक जोडतात, व शिवरुद्राला वादळाचा देवें अशाहि अनेक कल्पना कोणीं कोणीं केल्या आहेत. पण या सर्व आकाशलिंगाच्या पोटात सामावतील. यापेक्षां सूक्ष्म विचार करतां अव्ययात्म्याच्या पांच कलांपैकीं आनंदविज्ञानरूप आद्यस्फूर्ति, अथवा महत्-बुद्धि हेंच शाक्तिपीठ व त्यावर मनःप्राणवाक् असा त्रिकूटात्मक अहंकार, तोच सशाक्तिक बाण अथवा पिंडी अशीहि शबल शिवाच्या लिंगाची कल्पना करतां येईल. पण या स्थूल, सूक्ष्म कल्पनापेक्षां महाकाशलिंग हें सगुणनिर्गुण, मूर्तामूर्त, मनोवेद्यरूप सर्व ठिकाणच्या, सर्व आबालवृद्धांस अनायासें मनोगोचर होत असून मनांत गांभीर्याची भावना सहज उत्पन्न करणारें आहे. याच मेघाच्छादित आकाशावरून बगळ्यांची रांग उडत असतांना पाहून श्रीरामकृष्ण परमहंसांस अगदीं बालपणीं भावसमाधि लागली होती. 'अणोरणीयान् महतो महीयान्' असें हें आकाश आहे. " निर्गुणः सगुणश्चेति शिवोज्ञेयः सनातनः। निर्गुणः प्रकृतेरन्यः सगुणः सकलः स्मृतः ॥" हें शारदातिलकांतील शिवाचें वर्णन आकाशालाहि लागू होईल. " निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरंजनम्। अमृतस्य परं सेतुं दग्धेंधनमिवानलम् ॥" ६।१९, असें श्वेताश्वतरातील शिवाला अनुलक्षून असणारे अनेक मंत्र अंशतः आकाशालाहि लागू पडतात. असें " मूर्तें वा मूर्त्तानां लिङ्गं "

१ ओरायन १२४, १२८; शिवाक पृ. ३९८ ( कल्याण मासिक )

२ Shivaparabrahman has no particular form but is all formed. He is, therefore, called विश्वरूप. [ तं विश्वरूप- श्वे. ६।५. विश्वस्य स्रष्टारमनेकरूपम्। श्वे. ५।१३ ]. He has hands and feet in all directions ( श्वे. ३।१४,१६ ). .. ...The semi spherical top, resembling the visible horizon, is truely symbolical of the universe that surrounds the earth on all sides. Though the symbol has no legs and feet, and eyes and ears, in all directions, just as a circle has no face all round, but it has faces in all directions at every point of the circumference. Thus the Linga is the closest possible representation of such a formless or all formed God Shiva.

म्हणजे आकाश होय. ब्रह्माप्रमाणें तें सर्वत्र असून तें कसें आहे तें सांगतां येत नाहीं. त्याचें 'नेति नेति' असेंच वर्णन करावें लागेल. सारांश, शिवलिंगोपासना एका काळीं सर्वत्र रूढ कशी झाली या भूतार्थाचा दिक्कालाच्या चौकटींत ऐतिहासिक दृष्टीनें शोध लावण्याचा व्यर्थ खटाटोप न करतां, भविष्यकालाचा विचार पाहावा. तो विचार करतां, एकाच काळीं व कोणत्याहि काळीं, अजाण-सुजाण सर्वांना मार्ग-पुढें, वर-खालीं सर्वत्र ओतप्रोत व्यापक असें हें सद्ब्रह्मरूप आकाशलिंग उपासनीय आहे. सगुणनिर्गुण, व्यक्ताव्यक्त, साकारनिराकार, सक्रियनिष्क्रिय असा सशक्तिक शिव शोधण्याचें व त्याच्या उपलब्धीचें आकाशलिंग हें एक सर्वोत्कृष्ट म्हणजे समर्पक बाह्य प्रतीक आहे. प्रकाशानें व्यक्त, वायूनें चचल व मेघांनीं आच्छादित होणारें, याप्रमाणें सत्त्वरजस्तमात्मक गुणमायेनें युक्त असें हें सशक्तिक शिवाचें आकाशलिंग आहे. तें अखिल जगाला आपल्या पोटांत धारण करणारें व उलट अणूच्या पोटांतहि अनुस्यूत असणारें असें सर्वांना प्रत्यक्ष विषयभूत आहे, म्हणून उपासनेस सुलभ आहे. अशा या परमशिवाच्या आकाशलिंग या सर्वमान्य होणाऱ्या मव्य विभूतीची पूजा उपासनादि व्यवहारांच्या सोयीसाठीं केलेलें पार्थिव बाणलिंग हें एकच एक भविष्यकालीन धर्मभेद-निरपेक्ष अथवा विश्वधर्मसापेक्ष असा सार्वत्रिक उपासनेस योग्य प्रतीक आहे. त्याच्या ठिकाणीं ज्ञानस्वरूप अखंड नंदादीपाचा प्रकाश हाच सत्त्वगुण; घंटा, शंख, मंत्रघोष यांच्या नादलहरी हाच रजोगुण; गंधलेपन हाच आच्छादक तमोगुण, याप्रमाणें त्रिगुणात्मक माया व्यक्त दिसत असते. या मायेच्या आंत पंचतन्मात्र समावेशक म्हणून व्यापक व मरीव असें हें जडप्रतीक आहे. आकाशलिंग पोकळ भासतें म्हणून चिदाकाशरूप सत्घन परमशिवास योग्य उपमान नाहीं, असें कोणी (दा. बो. ८१९, अमृतानुभव २।२२) मानतात. तें त्या उपमानांतील उगाच भासणारें वैगुण्य या घनस्वरूप पाषाणलिंगांत नाहीं. आतां हें पाषाणलिंग जड आहे, असें

१ जगीं आपण भरला। आपणामाजीं जग पाहे॥ –शिवराम कवि.; अहं कृत्स्नस्य जगतः प्रभवः प्रलयस्तथा ॥ ६ ॥; मत्तः परतरं नान्यत्किंचिदस्ति धनंजय। मयि सर्वमिदं प्रोतं सूत्रे मणिगणा इव ॥ ७ ॥ गीता ७.

२ शिवगीता ६।२५.

त्याच्यांतील दुसरें वैषम्य भासतें. तेंच जणूं दूर करण्याकरितां कोठें कोठें या पाषाणलिंगासमोंवार कुलकुंडलिनीच्या वलयांप्रमाणें साडेतीन वळसे घातलेला धातूचा नाग बसवितात. अशा नागवलयांकित शिवलिंगाचें ध्यान करण्यांत पाषाणलिंगांतील शिवचेतन चिन्मयरूपांत साक्षात्कृत झाल्याप्रमाणें सहज भावित होतें.[1] अशा रीतीनें उपास्य, प्रतीक व उपासक यांच्यांतील कुंडलिनीजागरानें समपातळींत आलेली शक्तिकला निर्गुण ब्रह्मात्मसाक्षात्कारास योग्य होऊं शकते.

एका विद्वान् लिंगायत लेखकाच्या म्हणण्याप्रमाणें याज्ञिकांचा यूप, यज्ञकुंडांतील भस्माची रास, अथवा अग्नि, इत्यादींवर केलेल्या याज्ञिक कल्पना शिवलिंगास लावतां येत नाहींत. कारण, शिवलिंगोपासना ही यज्ञसंस्थेपेक्षांहि प्राचीन आहे, असें मोहेंजोदारो येथील संशोधनावरून उघड होतें.[2] कांहीं असो.

निःसंग, उदास, व्यापक, अनासक्त, विरक्त, अरूप, अशा शिवतत्त्वाचें आकाशलिंग हें जें एकमेव प्रतीक आहे, त्याची पार्थिक शिवलिंग ही प्रतिकृति आहे. आनंद, विज्ञान, मन, प्राण, वाक् या पंचकलांनीं, व पंचतन्मात्रांनीं, आकाशलिंग व्याप्त असल्यामुळें घन आहे. उलट पार्थिव बाणाचे जड व घन वाटणारे परमाणू तत्त्वतः पाहतां पोकळ व केवळ शक्तिस्वरूपच आहेत. ते परस्परांपासून इतके दूर व विरळ आहेत कीं, त्यानें घन दिसणारें लिंग शास्त्रीय सूक्ष्म दृष्टीला पोकळ आकाशलिंगच आहे, असें म्हणतां येतें. तसेंच ज्याप्रमाणें अंतरींच्या दहराकाशांत जडाचा निषेध सहज साधतो, त्याप्रमाणें ह्या बाह्य लिंगांत आकाशदृष्टीनें जडरूपाचा निषेध तत्त्वज्ञानानें सहज साधतो. तो साधल्यावर जीवशिवैक्य अथवा ब्रह्मात्मैक्य साधणें बरेंच सुलभ करतां येतें.

---

१ पश्चिमाभिमुखी योनिगुदमेढ्रान्तरालगा। तत्र कन्दं समाख्यातं तत्रास्ति कुण्डली सदा॥ संवेष्ट्य सकला नाडी सार्धत्रिकुटिला कृतिः। मुखे निवेश्य सापुच्छं सुषुम्णा विवरे स्थिता॥ १॥ सुप्ता नागोपमा ह्येषा स्फुरन्ती प्रभया स्वया। अहिवत् सन्धि संस्थाना वाग्देवी बीज संज्ञका॥

See Serpent Power by Sir J. Woodroffe.

२ लिंगपूजेचें ऐतिहासिक विवेचन, पृ. ९.

व्यापक आणि उदास। जैसें कां आकाश। तैसें जयाचें मानस। सर्वगगा ॥१२-१८०॥ तिही ॠतूं समान। जैसें कां गगन॥ तैसें एकचि मान। शीतोष्णीं जया॥ १२-२०२॥ जो निंदेतें ने घे। स्तुति न श्लाघे। आकाशा न लगे। लेपु जैसा॥ १२-२०७॥

—(आदर्श शिवभक्त), ज्ञानेश्वरी.

---

## प्रकरण ११ वें

## शिवस्तुति

यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिपो रुद्रो महर्षिः।
हिरण्यगर्भं पश्यत जायमानं स नो शुभया बुद्ध्या संयुनक्तु॥४।१२॥

—श्वे. उप.

श्रीगणेशायनमः॥ जय शंकर पार्वतीपते मृड शंभो शशिखंडमंडन। मदनांतक भक्तवत्सल प्रियकैलास दयासुधांबुधे॥ १॥ सदुपायकथास्वपंडितो हृदये दुःख शरेण खंडितः। शशिखंडशिखंडमंडनं शरणं यामि शरण्यमीश्वरम्॥ २॥ महतः परितः प्रसर्पतस्तमसो दर्शनभेदिनो भिदे। दिननाथ इव स्वतेजसा हृदयव्योम्नि मनागुदेहि नः॥ ३॥ न वयं तव चर्मचक्षुषा पदवीमप्युपवीक्षितुं क्षमाः। कृपयाऽभयदेन चक्षुषा सकलेनेश विलोकयाशु नः॥४॥ त्वदनुस्मृतिरेव पावनी स्तुतियुक्ता न हि वक्तुमीशसा। मधुरं हि पयः स्वभावतो ननु कीदृक्सितशर्करान्वितम्॥ ५॥ सविषोऽप्यमृतायते भवाञ्छवमुंडाभरणोऽपि पावनः। भव एव भवांतकः सतां समदृष्टिर्विषमेक्षणोऽपि सन्॥ ६॥ अपि शूलधरो निरामयो दृढवैराग्यरतोऽपि रागवान्। अपि भैक्षचरो महेश्वरश्चरितं चित्रमिदं हि ते प्रभो॥ ७॥ वितरन्यभिवांछितं दृशा परिदृष्टः किल कल्पपादपः। हृदये स्मृत एव धीमते नमतेऽभिमतफलप्रदो भवान्॥ ८॥ सहसैव भुजंगपाशवान्विनिगृह्णाति न यावदंतकः।

अभय कुरु तावदाशु मे गतजीवस्य पुन किमौषधे ॥ ९ ॥ सविषैरिव भीमपन्नगैविषयैरेभिरल परिक्षतम् । अमृतैरिव सभ्रमेण मामभिषिंचाशु दयावलोकनै ॥ १० ॥ मुनयो बहवोऽद्य धन्यता गमिता स्वामिमतार्थदर्शिन । करुणाकर येन तेन मामवसन्न ननु पश्य चक्षुषा ॥ ११ ॥ प्रणयाम्यथ यामि चापर शरण क कृपणाभयप्रदम् । विरहीव विभो प्रियामय परिपश्यामि भवन्मय जगत् ॥ १२ ॥ बहवो भवताऽनुकपिता किमितीशान न माऽनुकम्पसे । दधता किमु मदराचल परमाणु कमठेन दुर्धर ॥ १३ ॥ अशुचिं यदि माऽनुमन्यसे किमिद मूर्ध्नि कपालदाम ते । उत शाठ्यमसाधुसंगिन विपलक्ष्मासि न किं द्विजिह्वधृक् ॥ १४ ॥ क इह विदधामि किं करोम्यनुतिष्ठामि कथ भयाकुल । क नु तिष्ठसि रक्ष रक्ष मामयि शमो शरणागतोऽस्मि ते ॥ १५ ॥ विलुठाम्यवनौ किमाकुल किमुरो हन्मि शिरश्छिनद्मि वा । किमु रोदिमि रारटीमि किं कृपण मा न यदीक्षसे प्रभो ॥१६॥ शिव सर्वग शर्व शर्मद प्रणतो देव दया कुरुष्व मे । नम ईश्वर नाथ दिक्पते पुनरेवेश नमो नमोऽस्तु ते ॥ १७ ॥ शरण तरुणेंदुशेखर शरण मे गिरिराजकन्यका । शरण पुनरेव तावुभौ शरण नान्यदुपैमि दैवतम् ॥ १८ ॥ उपमन्युकृतं स्तवोत्तम जपत शभुसमीपवर्तिन । अभिवाछितभाग्यसपद परमायु, प्रददाति शकर ॥ १९ ॥ उपमन्युकृतस्तवोत्तम प्रजपेद्यस्तु शिवस्य सनिधौ । शिवलोकमवाप्यसोऽचिरात्सह तेनैव शिवेन मोदते ॥ २० ॥'

॥ इत्युपमन्युकृत शिवस्तोत्र सपूर्णम् ॥

न भूमिर्न तोय न तेजो न वायु  
न ख नेन्द्रिय वा न तेषा समूह ।  
अनैकान्तिकत्वात्सुषुप्त्येकसिद्ध  
तदेकोऽवशिष्ट शिव केवलोऽहम् ॥ १ ॥

—दशश्लोकी

विश्व दर्पणदृश्यमाननगरीतुल्य निजान्तर्गत  
पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूत यथा निद्रया  
य साक्षात्कुरुते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वय  
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इद श्रीदक्षिणामूर्तये ॥ १ ॥

—दाक्षिणामूर्तिस्तोत्र.

गभीरे कासारे विशति विजने घोरविपिने
विशाले शैले न भ्रमति कुसमार्थं जडमतिः।
समर्प्यैकं चेतस्सरसिजमुमानाथ भवते
सुखेनावस्थातुं जन इह न जानाति किमहो ॥ ९॥

—शिवानंदलहरी.

अयं दानकालस्त्वहं दानपात्रं
भवान्नाथ दाता त्वदन्यं न याचे
भवद्भक्तिमेवस्थिरां देहि मह्यं
कृपाशील शंभो कृतार्थोऽस्मि तस्मात् ॥

—शिवभुजंग ११.

पशूनां पतिं पापनाशं परेशं गजेन्द्रस्य कृत्तिं वसानं वरेण्यम्
जटाजूटमध्ये स्फुरद्गाङ्गवारिं महादेवमेकं स्मरामि स्मरारिम्
परात्मानमेकं जगद्बीजमाद्यं निरीहं निराकारमोङ्कारवेद्यम्
यतो जायते पाल्यते येन विश्वं तमीशं भजे लीयते यत्रविश्वम् ॥

—वेदसार शिवस्तोत्र १,५.

हे चन्द्रचूड मदनान्तक शूलपाणे स्थाणो गिरीश गिरिजेश महेशशम्भो।
भूतेश भीतभयसूदन मामनाथं संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥ १

विश्वेश विश्वभवनाशित विश्वरूप विश्वात्मक त्रिभुवनैकगुणाभिवेश।
हे विश्वबंध करुणामय दीन बन्धो संसारदुःखगहनाज्जगदीश रक्ष ॥ ८॥

—शिवनामावल्यष्टक.

करोमि त्वत्पूजां सपदि सुखदो मे भव विभो।
विधित्वं विष्णुत्वं दिशसि खलु तस्याः फलमिति।
पुनश्च त्वां द्रष्टुं दिवि भुवि वहन् पक्षिमृगता—
मदृष्ट्वा तत्खेदं कथमिह सहे शंकर विभो॥ ४॥

करस्थे हेमाद्रौ गिरिश निकटस्थे धनपतौ
गृहस्थेस्वर्भूजामरसुरभिचिन्तामणिगणे।
शिरस्थे शीतांशौ चरणयुगलस्थेऽखिलशुभे
कमर्थं दास्येऽहं भवतु भवदर्थं मम मनः ॥५॥

सारुप्यं तव पूजने शिवमहादेवेति सङ्कीर्तने ।
सामीप्यं शिवभक्तिधुर्यजनता साङ्गत्यसम्भाषणे ।
सालोक्यञ्च चराचरात्मकतनुध्याने भवानीपते ।
सायुज्यं मम सिद्धमत्र भवति स्वामिन् कृतार्थोऽस्म्यहम् ॥

—शिवानंदलहरी.

वन्दे देवमुमापतिं सुरगुरुं वन्दे जगत्कारणं
वन्दे पन्नगभूषणं मृगधरं वन्दे पशूनां पतिम् ।
वन्दे सूर्यशशाङ्कवह्निनयनं वन्दे मुकुन्दप्रियं
वन्दे भक्तजनाश्रयं च वरदं वन्दे शिवं शङ्करम् ॥ १४ ॥

करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं वा श्रवणनयनजं वा मानसं वाऽपराधम् ।
विहितमविहितं वा सर्वमेतत्क्षमस्व जयजय करुणाब्धे श्रीमहादेवशंभो ॥ १६ ॥

—शिवमानसपूजा.

ध्येयं वेदान्तवेद्य हृदयसरसिजे दीप्तमुद्यत्प्रकाशं
सत्यं शान्तस्वरूपं सकलमुनिमनः पद्मषण्डैकवेद्यम् ।
जाग्रत्स्वप्ने सुषुप्तौ त्रिगुणविरहितं शंकरं न स्मरामि
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव शिव भोः श्रीमहादेव शंभो ॥ १ ॥

—शिवापराधक्षमापनस्तोत्र.

ॐइत्येतद्यस्य बुधैर्नाम गृहीतं
यद्भासेदं भाति समस्तं वियदादि ।
यस्याज्ञातः स्वस्वपदस्था विधिमुख्या-
स्तं प्रत्यञ्चं दक्षिण वक्त्रं कलयामि ॥ १ ॥

—दक्षिणामूर्तिवर्णमालास्तोत्र.

ब्रह्ममुरारिसुरार्चितलिंगम् निर्मलभासितशोभितलिंगम् ।
जन्मजदुःखविनाशकलिंगम् तत्प्रणमामि सदाशिवलिंगम् ॥ १ ॥

—लिंगाष्टक.

नागेन्द्रहाराय त्रिलोचनाय भस्माङ्गरागाय महेश्वराय ।
नित्याय शुद्धाय दिगंबराय तस्मै नकाराय नमः शिवाय ॥ १ ॥

—शिवपंचाक्षरस्तोत्र.

नमो नेदिष्ठाय प्रियदव दविष्ठाय च नमो
नमः क्षोदिष्ठाय स्मरहर महिष्ठाय च नमः।
नमो वर्षिष्ठाय त्रिनयन यविष्ठाय च नमो
नमः सर्वस्मै ते तदिदमिति शर्वाय च नमः॥ २९॥

बहलरजसे विश्वोत्पत्तौ भवाय नमो नमः।
प्रबलतमसे तत्संहारे हराय नमो नमः।
जनसुखकृते सत्त्वोद्रिक्तौ मृडाय नमो नमः।
प्रमहसि पदे निस्त्रैगुण्ये शिवाय नमो नमः॥ ३०॥

कृशपरिणतिचेतः क्लेशवश्यं क्व चेदं
क्व च तव गुणसीमोल्लंघिनी शश्वदृद्धिः।
इति चकितममन्दीकृत्य मां भक्तिराधा—
द्वरद चरणयोस्ते वाक्यपुष्पोपहारम्॥ ३१॥

असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिंधुपात्रे
सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी।
लिखति यदि गृहीत्वा शारदा सर्वकालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति॥ ३२॥

—शिवमहिम्नस्तोत्र.

त्वं वेदान्तैर्विविधमहिमा गीयसे विश्वनेत–
स्त्वं विप्राद्यैर्वरद निखिलैरिज्यसे कर्मभिः स्वैः।
त्वं दृष्टानुश्रविकविषयानन्दमात्रावितृष्णै–
रन्तर्ग्रन्थिप्रविलयकृते चिन्त्यसे योगिवृन्दैः॥
भक्तामयाणां कथमपि परैर्योऽचिकित्स्याममर्त्यैः
संसाराख्यां शमयति रुजं स्वात्मबोधौषधेन।
तं सर्वाधीश्वर! भवमहादीर्घतीव्रामयेन
क्लिष्टोऽहं त्वां वरद! शरणं यामि संसारवैद्यम्॥

—श्री अप्पय दीक्षितकृत, शिवशरणागति.

ध्यायेन्नित्यं महेशं रजतगिरिनिभं चारुचन्द्रावतंसं
रत्नाकल्पोज्ज्वलाङ्गं परशुमृगवराभीतिहस्तं प्रसन्नम्
पद्मासीनं समन्तात्स्तुतममरगणैर्व्याघ्रकृत्तिं वसानं
विश्वाद्यं विश्ववन्द्यं निखिलभयहरं पञ्चवक्त्रं त्रिनेत्रम् ॥

—शिवपूजा १०.

लोकत्रयस्थितिलयोदयकेलिकारः, कार्येण यो हरिहरद्रुहिणत्वमेति।
देवः स विश्वजनवाङ्मनसातिवृत्तशक्तिः शिवं दिशतु शश्वदनश्वरं वः ॥ ३ ॥

निर्मत्सरौ निवसतः सममर्कचन्द्रौ नीरानलावमृतहालहलौ च यत्र।
राज्ञा नवेन तदधिष्ठितमुज्ज्वलेन शार्वं वपुर्भवतु वाञ्छितसिद्धये वः ॥ १५ ॥

स यत्र गुहबर्हिणो भवभुजङ्गजिह्वाञ्चनै-
र्गजास्यकरकर्षणैः स च गिरीन्द्रकन्याहरिः ।
स चार्कसुतसैरिभो रवितुरङ्गहेषारवै-
र्मुदं दधति धाम तद्दिशतु शाम्भवं धाम वः ॥ ४५ ॥

मूर्ध्नि द्युसिन्धुधवले धवलेन्दुलेखा
कैलासशैलशिखरे धवलश्च वाहः ।
नीहारहारिणि वपुष्यपि भूतिरेषा
पुष्णातु वः सदृशसङ्घटना शिवस्य ॥ २९ ॥

—कवि जगद्धर.

ॐ नमः शिवाय—

निखिलभुवनजन्मस्थेमभङ्गप्ररोहाः
अकलितमहिमानः कल्पिता यत्र तस्मिन् ।
सुविमलगगनाभे ईशसंस्थेऽप्यनीशे
मम भवतु भवेऽस्मिन् भासुरो भावबन्धः ॥ १ ॥

निहतनिखिलमोहेऽधीशता यत्र रूढा
प्रकटितपरमप्रेम्ना महादेवसंज्ञः ।
अशिथिलपरिरम्भः प्रेमरूपस्य यस्य
हृदि प्रणयति विश्वं व्याजमात्रं विभुत्वम् ॥ २ ॥

—स्वामी विवेकानंद.

## पदें

भोलानाथ दिगंबर हे दुःख मेरा हरोरे ॥ धृ. ॥ चंदन चावल बेलकिपतियां ॥ शिवजीके माथां धरोरे ॥ भोला० ॥ व्याघ्रकडासन आसन बैठे ॥ गले रुंडमाला धरोरे ॥ भोला० ॥ २ ॥ अर्धअंगमो गौरिगजानन ॥ मस्तकीं गंगा धरोरे ॥ भोला० ॥ ३ ॥ मीराके प्रभु गिरिधर नागर ॥ मैं तेरे पांव परोरे ॥ ४ ॥

भजमनशंकर भोलानाथ ॥ धृ. ॥ एकहि लोटाभर जल चाही ॥ चावल बेलकिपात ॥ भज मन० ॥ १ ॥ अर्धांगि गौरी जटामें गंगा ॥ महिमावर्णन जात ॥ भज० ॥ २ ॥ बैठे व्याघ्रांबर सांई विश्वंभर ॥ त्रिशूल देहरत हात ॥ भज० ॥ अंगविभूत स्मशानीं लावत ॥ मच्छमुनीश्वर साथ ॥ ४ ॥

भज भज भवजलधिमाजि मनुजा शिवाला ॥ धृ ॥ धरिशिल दृढ चरण-कमल ॥ घडिभरि तरि करुनि विमल ॥ तरिच सकलपापशमल त्यजरे भवाला ॥ भज० ॥ १ ॥ सोडुनियां विषयवमन ॥ झडकरि करि षडरिदमन ॥ पूजिं मन हें करुनि सुमन ॥ गिरिजाधवाला ॥ २ ॥ सावध हो करिचि काय शंकर गुरु बापमाय ॥ चिंतुनि कवि रामपाय ॥ हृदयीं निवाला ॥ ३ ॥

शिवोहं शिवोहं पढो मन्त्रमाला । जय सांब, जय साब, जय शम्भु भोला ॥ धृ. ॥ क्षर वो नहीं अक्षर वो नहीं है, निर्गुण सद्गुण पारा—है बुद्धि मन पार, ओंकार ही पार कूटस्थ साक्षी उजाला ॥ १ ॥

### तामीळ शैवभक्तांच्या काव्याचे कांहीं नमुने

### (१) तिरुमूलर

वेद तूं शास्त्र तूं दानजपयज्ञ तूं<br>
सत्य तू मिथ्य तूं ज्ञान-अज्ञान तू ।<br>
तेज तू तमहि तूं, सौख्य दुःखादि तूं<br>
अर्थ तूं सकल तूं बंधमोक्षादि तूं ॥ १ ॥<br>
भक्त तूं देव तूं भाव तुझी हरा<br>
त्वद्विना आमुतें अन्य नच आसरा ।<br>
भक्त रूपें तुझीं सगुणहीं साजिरीं<br>
करत बा ! दया पूर्ण आम्हांवरी ॥ २ ॥

---

१ पांगारकर याचा मराठी वाङ्मयाचा इतिहास, खंड १.

## (२) अप्पर

आम्हि कुणासि जाणत नाहीं । शिवचरणांवांचुनि कांहीं ॥
ना आम्हां मृत्युची भीती । ना स्वर्ग नरक ही खंती ॥
नृप काय वाकुडें करिती । शिवसमर्थ अमुचा पाहीं ॥ १ ॥

त्यजुनियां कामिनीकनक । शिव धरिला चित्तीं एक ॥
घ्या घ्या ही माझी भाक । जा तुम्ही परत जा भाई[१] ॥ २ ॥

सत्यनिष्ठ मुनी तूंतें शोधिताती ।
पार्वतीचा पति प्राण माझा ॥ १ ॥
भक्तांच्या हृदयीं योगियांच्या ध्यानीं ।
राहसी प्रकाशूनी देवदेवा ॥ २ ॥
प्रेमळांचा सखा विश्वाचें जिव्हार ।
तूं होसी अपार तोषदाता ॥ ३ ॥
मातें मी न जाणें तूंतें मी न जाणें ।
हेंचि एक जाणें दास तुझा ॥ ४ ॥

काष्ठीं अग्नि जसा वा, दुग्धीं घृत, सागरोदकीं लवण ।
पुष्पीं परिमल तैसा भरला विश्वांत पार्वतीरमण ॥ १ ॥

## (३) सुंदरमूर्ति

तुझें स्मरण जन्मुनी पळभरीहि केलें नसे ।
शरीर विषयांत वा विषयपुंज देहीं वसे ॥
सुखार्थ भ्रमलों जगीं बहु उनाड पोळापरी ।
परंतु सुखलेशही गवसला न मातें तरी ॥ १ ॥

न सोडिन तुझे विभो ! चरण, जीव गेला तरी ॥
तुला न विसरेन मी दृढ धरीन अभ्यंतरीं ॥
कदाचितचि विस्मृती घडालि घोर पापास्तव
तरी त्यजिल वैखरी न ' जयशंकरा ' हा स्तव ॥ २ ॥

१ जैन राजाचें धरणें आलें होतें त्या शिपायांस उद्देशून.

### माणिक वासहर

दीर्घकाल विषय सेविले । आयुष्य म्या व्यर्थ वेंचिलें ॥
शिवचरण नाहीं वंदिले । अभागी मी बापुडा ॥ १ ॥
असो झालें तें होवोनि गेलें । परी आता महद्भाग्य उदेलें ॥
शिवें आपुलें म्हणितलें । अंगीकारलें वत्सलें ॥ २ ॥
शिव माझा हिरा खरा । सकल मंगलाचा तुरा ।
तेणें जन्ममरणासी चिरा । लाउनी मुक्त पैं केलें ॥ ३ ॥

### नंद

औषधी औषधी दिव्य ही औषधी । श्रीकृपा अंतरीं रोमरोमांतरीं संचली ॥ भक्त देवा तसा देव भक्तासही धुंडितो । पावली धावली वत्सस्नेहार्द्र ही माउली ॥ नटराज ! माझ्या जिवाच्या जिवलगा । तुझ्या अगसंगा लाभलों जी ॥ १ ॥ आम्हा तुम्हा आता भेद नाहीं देवा ॥ अभिन्नत्वें सेवा घ्यावी माझी ॥ २ ॥

अभिन्न उपासना

### शिवस्तुति

कैलासराणा शिवचंद्रमौळी ॥ फणींद्र माथा मुकुटीं झळाळी ।
कारुण्यसिंधो भवदु खहारी । तुजवीण शंभो मज कोण तारी ॥ १ ॥

\+ \+ \+

एकांति येरे गुरुराज स्वामी । चैतन्यरूपी शिवसूखनामी ॥
शिणलों दयाळा बहुसाळ भारी । तुजवीण शंभो मज कोण तारी ॥ ३० ॥

शास्त्राभ्यास नको, श्रुती पढु नको, तीर्थास जाऊ नको ॥
योगाभ्यास नको, व्रतें मख नको, तीव्रें तपें तीं नको ।
काळाचें भय मानसीं धरु नको, दुष्टास शंकू नको ।
ज्याचीया स्मरणें पतीत तरती तो शंभु सोडू नको ॥ २९ ॥

## श्रीशंकराची आरती

लवथवती विक्राळा ब्रह्मांडी माळा । वीषें कंठकाळा त्रिनेत्रीं ज्वाळा ॥ लावण्य सुंदर मस्तकीं बाळा । तेथुनियां जळ निर्मळ वाहे झुळझुळा ॥ १ ॥ जयदेव जयदेव जय श्रीशंकरा । आरती ओवाळूं तुज कर्पुरगौरा ॥ धृ० ॥ कर्पुर गौर भोळा नयनीं विशाळा । अर्धांगी पार्वती सुमनांच्या माळा ॥ विभूतीचें उधळण शितिकंठ नीळा । ऐसा शंकर शोभे उमावेल्हाळा ॥ २ ॥ देवदैत्यीं सागरमंथन पैं केलें । त्यामाजीं अवचित हळहळ जें उठलें ॥ तें त्वां आनंदें प्राशन केलें । नीलकंठ नाम प्रसिद्ध झालें ॥ ३ ॥ व्याघ्रांबर फणिवरधर सुंदर मदनारी । पंचानन मनमोहन मुनिजन सुखकारी ॥ शतकोटीचें बीज वाचें उच्चारी । रघुकुळटिळक रामदासा अंतरीं ॥ ४ ॥ जय०

## आरती (भैरवी)

चंद्रशेखरा करुं या कर्पुरारती । विषयवासना हरोनि येवो विरति ॥ धृ० ॥
विश्वरूप अष्टमूर्ति जगता आधार तूं ।
शास्त्र-कला-विद्यांचा प्रभव आद्य एक तूं ।
शिवा योगिराया । वरद हस्त ठेवि सदा भक्तांवरतीं ॥

## भजन

शिव हर रे ! शिव हर रे ! सांब सदाशिव शिव हर रे ॥

\+ + +

शिव हर शंकर गौरीशं गौरीशं । वंदे गंगाधरमीशम् ॥

\+ + +

सांब सदाशिव शिवहर शंकर । सांब सदाशिव शिवहर शंकर ।

\+ + +

सदाशिवा, महादेवा । पार्वतीवरदा उमाधवा ॥

\+ + +

चिदानंदरूपः शिवोऽहम् शिवोऽहम् ।

प्रथम खंड समाप्त

# २ चिकित्सा खंड

## प्रकरण १ लें

## भूमिका

(मंगल)

यस्य निश्वसितं वेदा यो वेदेभ्योऽखिलं जगत्।
निर्ममे तमहं वंदे विद्यातीर्थमहेश्वरम् ॥
यद्वो देवा अतिपातयानि वाचा च प्रयुती देव हेळनं ।
अरायो अस्माँ अभिदुच्छुनायतेऽन्यत्रास्मन्मरुतस्तं निधेतन ॥२।१४॥
पूर्णमसि पूर्णं मे भूयाः सुपूर्णमसि सुपूर्णं मे
भूयाः सदसि सन्मे भूयाः सर्वमसि सर्वं मे भूयाः ।
अक्षितिरसि मा मे क्षेष्ठाः ॥ १।११ ॥
प्राच्यां दिशि देवा ऋत्विजो मार्जयंतां ॥
दक्षिणस्यां दिशि मासाः पितरो मार्जयंतां ॥
प्रतीच्यां दिशि गृहाः पशवो मार्जयंतां ॥
उदीच्यां दिश्याप ओषधयो वनस्पतयो मार्जयन्तां ॥
ऊर्ध्वायां दिशि यज्ञः संवत्सरः प्रजापतिर्मार्जयतां ॥ १।११ ॥

— आश्वलायन श्रौ. सूत्र.

धर्मार्थकामकुशलो धर्मार्थावप्यपीडयन् ।
धर्मप्रधानकार्याणि कुर्याश्चेति पुनः पुनः ॥ —म. भा. ७।१५१।३७
धर्मे ते धीयतां बुद्धिर्मनस्तु महदस्तु च ॥ —म. भा. १५।१७।२१
रामो भामिनि लोकस्य चातुर्वर्ण्यस्य रक्षिता ।
मर्यादानां च लोकस्य कर्ता कारयिता च सः॥ —रामा ५।३५।११
अज्ञश्चाश्रद्दधानश्च संशयात्मा विनश्यति । —गीता ४।४०.
असतो मा सद्गमय । तमसो मा ज्योतिर्गमय मृत्योर्माऽमृतं गमय । बृ. १।३।२८

रामदासीं ब्रह्मज्ञान सारासारविचारणा । धर्मसंस्थापनेसाठीं कर्मकांड उपासना ॥ १।२५ ॥ मानपंचक, श्रीसमर्थ रामदास.

## भूमिका

संस्कारो हि गुणांतराधानम् । —चरक सं.—विमानस्थान

राजमूलाः प्रजाः सर्वा राजा धर्मः सनातनः। –रामा. ७।५९; ३।३८.

राजा कालस्य कारणम् ।

राज्ञो हि परमो धर्मः स्वधर्मस्थानुपालनम्

शासतोऽन्यान्यथाशास्त्रमनापद्युत्पथानिह ॥ —भाग. १।१७।१६.

प्रभुत्वं समदृष्टित्वं तच्च स्याद्राजविद्यया ।

तामेव यो न जानाति नासौ मंत्री न सोऽधिपः ॥–यो.वा. ३।७८।४१.

May not the destiny of the sovereign democratic Republic of India fall into the hands of the godless.

—Vedant Kesari, April 1948.

......... the most alarming feature of the recent changes is that the East now shows signs of succumbing, at least outwardly, to the anti-traditional influences which had already overwhelmed the West.

—East and West by Rene Guenon (1941) p. 1.

**विषयस्वरूपः**— या ग्रंथाच्या मागील खंडांत श्रीधूतपापेश्वर, शिवलिंगोपासना आणि शिवलिंगोपासक या विषयांसंबंधीं कांहीं स्थूलसूक्ष्म माहिती दिली. आतां या दुसऱ्या खंडांत शिवलिंगोपासनेसंबंधीं उपस्थित होणारे कांहीं आक्षेप आणि संदेह यांची आमूलाग्र चिकित्सा करावयाची आहे. निराक्षेप असा प्रथम खंड व अखेरचा तसाच सारखंड याच्या संपुटांत या चिकित्साखंडाची योजना बुद्धिपुरस्सर केली आहे.

**जनताजनार्दनाची क्षमायाचनाः**— फणसाचें फळ अवजड असून त्याचे कांटे हातांना थोडे बोचतात. त्या फळाची साल जाड असून आंत चिकट चीक व चारखंडेंहि असतात. त्याच्या आंत मात्र गरे असतात. हा चिकित्साखंड कित्येक वाचकांस कदाचित् तसाच वाटेल. या कंटकमय फणसाच्या चिकाचा चिकटा भाविकांच्या निर्मळ हातांना चिकटूं नये म्हणून श्रीशिवस्नेहात्मक पहिला खंड विषयप्रवेशादाखल लिहिला आहे. तसेंच

अखेर वाचकाचें मन नि शंक व सद्भावनांनी परिपूरित व्हावें, म्हणून रहस्य खंडाची योजना केली आहे

हा उपासनेचा अर्थात् भक्तिशास्त्रापैकींच ग्रंथ आहे भक्तिशास्त्रांत वाद करू नये, असें सांगितलें आहे "वादो नावलंब्य।" असें ७४ वें नारद-भक्तिसूत्र आहे "पूर्वपक्ष साडोनि सिद्धांत। निरूपण करावें नेमस्त॥ ४।२।१८" असें दासबोधांत कीर्तनासंबंधीं सांगितलें आहे श्रीसमर्थांचेच मनाचे श्लोक ६२,१०८ ते ११२ यांत "तुटे वाद संवाद तो हीतकारी॥" असें बजावलें आहे म्हणजे भक्ताभक्तांनीं परस्परांत सुखसंवाद करावा, पण पूर्वोत्तर पक्षाचा वाद करू नये, असें सांगितलें आहे स्फुट ओंव्या ७१ यांतहि त्याचें असेंच म्हणणें दिसतें श्रीसमर्थ मनाच्या श्लोकांत म्हणतात "तुटेवाद संवाद त्यातें म्हणावें। विवेकें अहंभाव यातें जिणावें। अहंतागुणें वाद नाना विकारी। तुटे वाद संवाद तो हीतकारी॥ ११०॥ हिताकारणें बोलणें सत्य आहे। हिताकारणें सर्व शोधूनि पाहे। हिताकारणें बंड पाखांड वारीं। तुटे वाद संवाद तो हीतकारी॥ १११॥ जनीं सांगता ऐकता जन्म गेला। परी वादवेवाद तैसाचि ठेला। उठे संशयो वाद हा दंभधारी। तुटे वाद संवाद तो हीतकारी॥ ११२॥" थोरांचें हें सारें म्हणणें ठीकच आहे त्याप्रमाणें मी हा चिकित्सा खंड या ग्रंथातून मुळींच गाळला असता तर बरें झालें असतें, असें कित्येक सज्जनांना वाटेल, हें पण मी जाणतोंच पण शिवलिंगोपासने-संबंधीं कित्येक आधुनिकांनीं आपल्या प्रामाणिक समजुतीनें जे मलमलतेच ग्रह उत्पन्न केले आहेत, त्यांच्या निराकरणासाठींच तर या ग्रंथाचा जन्म आहे, हें प्रस्तावनेंत दर्शविलेंच आहे तें या ग्रंथाचें जन्मसाफल्य आधुनिकांच्या आक्षेपांचीं पूर्वोत्तरपक्ष केल्यावाचून कसें पुरें होणार! तो पूर्वोत्तरपक्षाचा वाद निरहंकार व निर्मत्सर बुद्धीनेंच केवळ जनहितदृष्टीनेंच करावा, हें धोरण अखंड साधण्याचें सामर्थ्य भगवान् शिवगुरूंनीं मला द्यावें, अशी मी त्यांची प्रार्थना करतों

"सत्यं ब्रूयात् प्रियं ब्रूयात् न ब्रूयात् सत्यमप्रियम्।
प्रियं च नानृतं ब्रूयात् एष धर्मः सनातनः॥ मनु॥

म्हणजे माणसानें सत्य बोलावें, पण तें गोड रीतीनें बोलावें, अप्रिय रीतीनें सत्य बोलू नये पण दुसऱ्याला प्रिय वाटावें म्हणून खोटेंहि बोलू

नये, असें मनुस्मृति सांगते. " अनुद्वेगकर वाक्यं सत्यं प्रियहितं च यत् । " ( गीता १७।१५ ) असें भगवान् सांगतात. " परांतरास न लावावा धका । " असें संत सांगतात. हें सारें ध्यानीं वागवून हा चिकित्सा खड लिहितांना मला ज्यांचीं मतें मान्य करतां येत नाहींत, अशा मतभेदापुरत्या माझ्या देशबांधवांपैकीं माझ्या प्रतिपक्षी विद्वानांचा व त्यांच्या ग्रंथांचा नामनिर्देश मी शक्य तों टाळणार आहें. हेतु असा कीं, वैयक्तिक मतसघर्ष, मताभिनिवेश व तज्जन्य कटु वाद टळावा. मात्र व्यक्तिनिरपेक्ष मतभेद मी स्पष्ट शब्दांत मांडणार आहें त्याचा कोणीं विषाद मानूं नये, अशी विनंती आहे. श्रीशिवरुद्र व त्यांचा परिवार यांच्या संबंधानें आधुनिकांनीं जी भाषा वापरली आहे, त्यांत आपल्याच देवदेवतांची आपण विटंबना करीत आहोंत, याची जाणीव त्यांच्या लिहिण्यांत दिसावी तशी दिसून येत नाहीं, याबद्दल मला वाटणारा खेद निरनिराळ्या तऱ्हेनें व्यक्त होणें अपरिहार्य आहे, हें पण आक्षेपक विद्वानांनीं कृपा करून विसरू नये.

**आधुनिकः**— येथें आणखी एकदोन गोष्टींचा एकदांच आरंभीं खुलासा केलेला बरा. मी या ग्रंथांत आधुनिक हा शब्द विशेषेंकरून ज्यास अनुलक्षून वापरला आहे, त्यांचें शिवरुद्रासंबंधीं लिखाण मला बरें वाटलें नाहीं. असे ते माझ्याशीं सहमत नसणारे माझे मतविरोधापुरतेच प्रतिपक्षी जाणावे. सारेच आधुनिक धर्मविरोधी किंवा धर्मोदासीन नाहींत. त्यांच्यापैकीं अनेक मजपेक्षांहि कितीतरी जास्त धर्मनिष्ठ, तत्त्वनिष्ट, शिवनिष्ठ व विद्वान् असतील, हें मी केव्हांच विसरत नाहीं. माझी टीका त्या आधुनिकांविरुद्ध नाहीं.

**भाविकः**— वैदिक वर्णाश्रमधर्मोदासीन आधुनिक सुधारकांप्रमाणें उलट अनेक धर्मनिष्ठ भाविकांचीं मनें या ग्रंथांतील उपास्यासंबंधीं माझ्या चिकित्सेनें कदाचित् दुखावलीं जाण्याचा संभव आहे. यासाठीं मी त्यांस प्रामाणिकपणें इतकाच निर्वाळा देतों कीं, आपल्या परम आदरणीय सनातन वैदिक वर्णाश्रमधर्माच्या सर्वांगांचा मी त्यांच्याइतकाच चाहता व अभिमानी आहें. फरक इतकाच आहे कीं, यापुढें पालटत जाणाऱ्या परिस्थितींत आपलें धर्माचरण व धार्मिक विधिविधानें केवळ परंपरागत रूढीवर व श्रद्धेवरच अधिष्ठित न ठेवतां त्याला यथाशक्य उपपत्तीची अथवा चिकित्सेची जोड देणें अवश्य झालें आहे, असें मला वाटतें. हें माझें मत चुकीचें असेल, तर

त्याबद्दल माझ्या माविक धर्मबांधवानीं मला क्षमा करावी इतकी प्रस्तावना केल्यावर आता मी या संक्षिप्त भूमिका प्रकरणांतील विषयास सुरवात करतों

**भूमिका**:—या चिकित्सा खंडाची अति संक्षिप्त भूमिका म्हणजे प्रस्तुत परिस्थितीचें माझ्या अल्प समजुतीप्रमाणें द्योतक यथार्थ दर्शन होय आजच्या परिस्थितीचें फार थोड्या शब्दात निदर्शन करावयाचें तर (१) आज राजमान्य झालेली प्रच्छन्न बौद्धचिन्हें, (२) साम्यवाद, (३) भौतिक विज्ञान सर्वस्व, (४) ऐहिक इंद्रियप्रत्यक्षानुसारी दृष्टि, (५) सत्ताभिलाष, (६) नास्तिक्य अथवा धर्मौदासीन्य, (७) ईश्वरनिरपेक्ष मानवतावाद, (८) मध्यमवर्गाची अपक्रांति, (९) पाश्चात्य शिक्षण व विचार यांचे दृढमूल संस्कार, आणि (१०) दुर्भिक्ष व अस्वास्थ्य हीं दशविध लक्षणें सांगतां येतील या लक्षणांच्या व्यापकतेबद्दल व इष्टानिष्टतेबद्दल मतभेद होऊं शकतील पण हीं सारीं लक्षणें साक्षात् किंवा परंपरेनें शिवलिंगोपासनेस प्रतिकूल आहेत, याबद्दल बहुधा मतभेद होणार नाहीं भिन्न संस्कृतींच्या संकराचे संस्कार हेंच या प्राप्तपरिस्थितीचें एक मुख्य कारण असल्यामुळें श्रीशिवलिंगोपासनेचें "पुनश्च हरि ओम्" करण्यापूर्वी त्या अनिष्ट संस्काराचें जरुरीपुरतें व शक्य तें परिमार्जन करणें अवश्य आहे त्यासाठींच हा अल्पारंभ आहे शिवलिंगोपासनेस प्राप्तपरिस्थिति प्रतिकूल असली, तरी शिवलिंगोपासना ही दिक्कालातीत आहे ती केव्हांच आणि कोठेंच असामायिक किंवा अस्थानीं होणार नाहीं. पूर्वी एका काळीं ती स्तुत्यर्थानें साऱ्या

१ या ग्रंथाच्या मूळ हस्तलिखितात या चिकित्सा खंडास स्वतंत्र ग्रंथ मानून त्याचीं पहिलीं १४ प्रकरणें म्हणजे (१) ही भूमिका (विस्तृत) आणि यापुढील (२) आक्षेप आणि संदेह, (३) इंद्रियप्रत्यक्षानुसारी दृष्टि (खंडण), (४) उत्क्रांतिवाद आणि प्राचीन अज्ञान (खंडण), (५) ऐतिहासिक दृष्टि व बौद्धानुकरण (खंडण), (६) प्रामाण्यविचार, (७) हिंदु धर्मसंस्कृति, (८) आस्तिक्य आणि नास्तिक्य, (९) नामसाधन, (१०) मूर्तिपूजा याप्रमाणें प्रारंभिक सामान्य विषयावर चवदा विस्तृत प्रकरणें आधारग्रंथातील अवतरणासह लिहिलेलीं आहेत पण तीं सुमारें छापील अडीचशें पृष्ठाचा मजकूर ग्रंथविस्तारभयास्तव गाळावा लागला आहे शिवाय प्रथम खंड लिहिल्यावर वरील प्रकरणें विस्तारपूर्वक मधेंच घालणें काहीं अंशीं अस्थानीं होईल असेंहि वाटलें

पृथ्वीवर रूढ होती, हें प्रथम खंडांत दाखविलेंच आहे. शिवलिंगोपासनेंतील देवताविज्ञान हें अत्यंत पवित्र व श्रेष्ठ असें मूलग्राही तत्त्वज्ञान असल्यामुळें त्याचा कोठें कोणाशीं विरोध संभवत नाहीं. असें असतां तत्संबंधीं जे आक्षेप व संदेह निर्माण करतात, ते पाश्चात्य संस्कृतीनें भारलेले असेच बहुधा दिसत असल्यामुळें, मी आरंभीं कांहीं वेळ त्यांच्याशीं पाश्चात्यांच्या आणि येथील आंग्लशिक्षितांच्या ग्रंथाधारें सुखसंवाद करणार आहे.

माझ्या समजुती :—सद्य:परिस्थितीचीं दशविध लक्षणें वर अति संक्षेपानें सांगितलीं. त्याचप्रमाणें त्यासंबंधीं माझ्या अल्प समजुती थोडक्यांत सांगतों.

(१) बौद्धधर्म या ठिकाणीं नामशेष झाला, याचें कारण तो या धर्मभूमीस मानवणाराच नव्हता. कारण : (१) तो निरीश्वरवादी, (२) निरात्मवादी, (३) समाजधारक वैदिकवर्णाश्रमधर्मास विरोधी, (४) संकर व अनाचार हे दोषयुक्त असून (५) त्यांत ईश्वरभक्तीचा जिव्हाळा नव्हता. बौद्धचिन्हें अप्रत्यक्षतः शिरोधार्य केल्यानें हिंदु धर्माबद्दल जणूं कांहीं असंमतभाव, किंवा सदोषभाव धारण केल्याप्रमाणें होतें, हें धार्मिक दृष्ट्या फार अनिष्ट वाटतें.

(२) सारी सोपाधिक सृष्टि स्वरूपतःच विषम आहे. अशा सृष्टींत साम्यवाद अव्यवहार्य व अनर्थकारीच ठरेल.

(३) ऐहिक सुखसाधनें वाढयूं पाहाणारें भौतिक विज्ञान हें व्यवहारतः जरूर असलें तरी शाश्वत सुखशांतीचें साधन नव्हेच. तें अशांतीच वाढवील. शीलसंवर्धनाचें किंवा सत्त्वसमृद्धीचें तें साधन नव्हे, हें जाणूनच आपल्या प्राचीन तज्ज्ञ पूर्वजांनीं तो हव्यास सोडला असावा, असें दिसतें[२].

---

१ ईश्वरें नाना भेद केले। भेदें सकळ सृष्टि चाले॥—दा. बो. १७।१०।२०.
मनुष्य आणि गधडे। राजहंस आणि कोंबडे।
राजे आणि माकडें। येक कैसीं॥—दा. बो. १३।१०।१४.

२ Science makes man struggle for Truth in the outside universe and religion makes him struggle for Truth in the inside universe. Both struggles are great no doubt, but one ends in success and the other ends in failure. That is the difference. Religion begins where science ends. —Swami Ramkrishnanand in Disciples of Ramkrishna, p. 156.

(४) दृश्य सृष्टीहून अदृश्य सृष्टि फार श्रेष्ठ व मोठी आहे ती आधिदैवत जगाची परलोकसृष्टि मानल्यावाचून धर्म आणि कर्म याचा पुरा विचार समवतच नाहीं इंद्रियप्रत्यक्षानुसारी दृष्टि ही निकालाबाधित नाहीं ती स्वरूपत च भ्रामक आहे हें आता भौतिक विज्ञानानेंहि निर्विवाद ठरलें आहे

(५) निरनिराळा परिच्छिन्न सत्ताभिलाप हा साहंकार, स्वार्थमूलक व संघर्षकारी असतो वस्तुत सारी सत्ता एका परमेश्वराचीच आहे त्या पारमार्थिक सत्तेशीं समरस होण्याचा यत्न करणें हेंच श्रेयस्कर होय.

(६) देशातील समाजस्थिति कायद्याच्या दडनीतीनें आणि भौतिक विज्ञानानें कधींच साधणार नाहीं देव आणि धर्म हेच वास्तविक समाजधारक होत त्याच्याविषयीं औदासीन्य अध पाताला व अनर्थाला कारण होईल

(७) ईश्वरनिरपेक्ष मानवतावाद हा, वायाची मोट बाधण्यापेक्षाहि जास्त अव्यवहार्य असा ध्येयवाद आहे एक विश्वधर्म होणें शक्य कोटींतील मानलें, तरी त्या सामान्यधर्मात विशेषधर्माचें महत्त्व व अगत्य विसरता येत नाहीं अनेक पृथक् पिळलेल्या दोराचा मजबूत दोरखड बनू शकतो. पिंजलेल्या अगर दाबलेल्या सुट्या कापसाचा किंवा कापसाचा बनत नाहीं

(८) देहाच्यामधलें पोट हें जसें सर्व शरीराचें धारण करतें, तसा समाजातील मध्यमवर्ग होय श्रेष्ठ शील, विद्वत्ता, सदाचार व श्रेष्ठ सास्कृतिक सस्कार ह्याचें धारण व रक्षण करणाऱ्या या मध्यमवर्गाची इतर सामाजिक अवयवानीं (वर्गानीं) अवहेलना व उपासमार करण्यात सर्वांचीच हानि आहे

(९) पाश्चात्य सस्कृतीनें आपणास ऐहिकवादी व बहिर्मुख केलें आहे आपल्यातील पूर्वीच्या कुटुबसस्था, ज्ञातिसस्था, ग्रामसस्था, देवस्थानसस्था, अशा अनेक उपयुक्त सस्था त्यामुळें बहुतेक नामशेष झाल्या आहेत त्या जडवादी सस्कृतीनें आपलें देवताविज्ञान व आध्यात्मिक शील तिरोहित केलें आहे, ही तर सर्वांत मोठी हानि होय!

---

१ There may be a number of material worlds, not realised in space and by consequence not exclusive and repellent to each other.

—Bradley, Appearance and Reality. Ch XXII.

( १० ) सांप्रतच्या अस्वास्थ्यांतून इष्ट त्या सुधारणा घडून न येतां तें क्षयरोगाप्रमाणें हानिकारकच ठरण्याचा आज तरी सुमार दिसतो.

याप्रमाणें दशविधलक्षणात्मक नवयुगधर्म अथवा सद्यःस्थिति आहे, अशी माझी समजूत आहे.

आतां यापुढें आधुनिकांनीं मानलेलीं जीं ज्ञानाचीं मुख्य गमकें त्यांसंबंधीं थोडें विस्तारानें लिहितों.

**आधुनिकांचीं ज्ञानाचीं गमकें** :—ऐहिक सत्तावाद आणि भौतिक विज्ञान हीं आज राज्यपदारूढ अथवा समाजसत्तारूढ आहेत. त्यामुळें : ( १ ) इंद्रियप्रत्यक्षानुसारी दृष्टि, ( २ ) ऐहिक उत्क्रांति किंवा विकासवाद व ( ३ ) भूतकालांसंबधीं ऐतिहासिक दृष्टि, हीं ज्ञानाचीं मुख्य गमकें आधुनिक विद्वानांनीं मानलीं आहेत. या ज्ञानसाधनांची अथवा ज्ञानप्रक्रियांची कांहीं व्यवहारांत व कांहीं मर्यादेत उपयुक्तता असली, तरी या ग्रंथाच्या श्रीशिवलिंगोपासना या विषयाच्या चर्चेत, तीं नुसतींच निरुपयोगी नव्हत, तर अनर्थकारी आहेत, असें माझें म्हणणें आहे. म्हणून त्याचा थोडा स्पष्ट खुलासा करतों.

**इंद्रियप्रत्यक्षानुसारी दृष्टिः**—( १ ) देव, धर्म, आत्मा, परमात्मा, शिव, रुद्र व त्यांचा परिवार, चिच्छक्ति, माया, आधिदैवत जग, परलोक, उपासना, अंतर्मुख इंद्रियातीत वृत्ति व श्रुतिप्रामाण्य या व अशा शिवलिंगोपासनेंतील मुख्य गोष्टी आहेत. परंतु इंद्रियप्रत्यक्षवादात यापैकीं कशासहि मान्यता मिळणें शक्य नाहीं. मी या ग्रंथांत प्रमाणभूत मानलेल्या

---

१ "East and West"; and 'Man and his Becoming" by Rene Guenon. "Bharat Shakti" by Sir John Woodroffe; "Yoga Vasistha and Modern Thought" by Dr. Atreya; 'What Indian can Teach us'; 'Search in Secret India' by Dr. Paul Brunton. 'Cultural Heritage of India'. 'Some present day Superstitions' by P. N. Bose.

हिंदु धर्म संस्कृति—कल्याण विशेषांक. दासबोध. श्रीमच्छंकराचार्य यांचें ब्रह्मसूत्रभाष्य, इत्यादि संदर्भग्रंथ समजावे.

श्रीमच्छंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानात, (श्रुतीचें स्वत.प्रामाण्य सोडलें असतां) बाकीचीं इंद्रियप्रत्यक्ष व त्या प्रत्यक्षावलची अन्य प्रमाणें प्रमात्याच्या अविद्या-दोषामुळें अप्रमाणच मानलीं आहेत. इतकेंच नव्हे तर अनेक नामवत आधुनिक मौतिक शास्त्रज्ञानीं तीं सर्वथैव भ्रामक ठरविलीं आहेत. यासाठीं पुढील अवतरणें वाचावीं—

1. Politics is the freedom of the senses, while religion is freedom from the senses. (Swami Ramkrishananda)

2. The closing of the external channels of sensation is usually the signal of the opening of the psychic and

---

१ न ह्रीदमातिगम्भीरं भावयाथात्म्यं मुक्तिनिबन्धनमागममन्तरेणो-त्प्रेक्षितुमपि शक्यम्। ++ वेदस्य तु नित्यत्वे विज्ञानोत्पत्तिहेतुत्वे च सति व्यवस्थितार्थविषयत्वोपपत्तेः। तज्जनितस्य ज्ञानस्य सम्यक्त्वमतीतानागत-वर्तमानैः सर्वैरपि तार्किकैरपह्नोतुमशक्यम्॥ शारीरमाष्य २।१।११. इतर प्रत्यक्षादि प्रमाणें अविद्येचा विषय म्हणून परमार्थतः अप्रमाण आहेत. पण श्रुति म्हणजे त्रिकालाबाधित अपरोक्षानुभूतिरूप स्वतःसिद्ध ज्ञान आहे. तें अपौरुषेय व म्हणून अप्रमादशील आहे. या विषयाचा अधिक विचार करावयास येथें अवकाश नाहीं, व मौतिक विज्ञानानेंहि इंद्रियप्रत्यक्ष भ्रामक ठरविलें असल्यामुळें, त्याची अवश्यकता पण नाहीं.

२ अविद्यावद्विषयाण्येव प्रत्यक्षादि प्रमाणानि। —शारीरमाष्य १।१।१.

३ मागील टीपेंत दिलेल्या ग्रंथांशिवाय 'Presonality of Man' by Tyrrell. 'Survival of Man' by Sir Oliver Lodge. 'University of Spiritualism by Boddington. Mysterious Universe by Sir. J. Jeans, 'Nature of Physical world' by Eddington. 'How the senses deceive us, Five senses of man; Invisible influences by Dr. Cannon. Unseen world. Kingsland-Rational Mysticism, Matter, Spirit and Cosmos by Stanley Redgroove; Study of Reality by Malkani. Yoga Vasistha and modern thought by Dr. Atreya. Wisdom of the Overself by Dr. Paul Brunton. योगवासिष्ठ, भागवतादर्श (विश्वाध्यास प्रकरण) इत्यादि संदर्भ ग्रंथ पहावे.

from all the evidence it would seem that psychic sense is more extensive, acuter and in every way more dependable than the physical ( Second Sight, pp 12 13 )

3 The world of sense objects is unreal For it is by its very nature, liable to being cancelled The Real must be self evident, it must not appear The self is the only reality that does not appear Its being and the intuition of its being are not distinct It is truly self known and therefore real absolutely ( A Study of Reality by Malkani )

4 These perceptions regarded as psychological results and as sources of information are not only occasionally mendacious nine tenths of our immediate experiences of objects are visual and all our visual experiences without exception are according to science erroneous ( Foundation of belief by Arthur Balfour )

5 External world has no existence independent of mind ( Rational Mysticism, p 148 )

6 The Universe begins to look more like a great thought than like a machine (The Mysterious Universe, p 137 )

**( २ ) उत्क्रांतिवाद किंवा विकासवाद** —हें आधुनिकांच्या ज्ञानाचें दुसरें गमक आहे जडातून चैतन्य उत्पन्न झालें, मूळ अज्ञानातून ज्ञानविकास होत आला, मूळ रानटी अवस्थेंतून सुधारणा होत आली, असें या वादाचें स्थूल स्वरूप असून, ह्यातून आधुनिक असा सिद्धांत काढतात कीं, विकासवादाच्या व्युत्क्रमसरणीनें प्राचीन अज्ञान सिद्ध होतें [१] अर्थात् शिवलिंगोपासना जर अति प्राचीन असेल, तर तिचें स्वरूप रानटी, अजाण, आद्य

[१] पुढील ग्रंथात या मताचा निषेध केला आहे Ancient Wisdom, pp 2,3 Indian civilization and its antiquity, p 9

वनमानवांत साजेसें, रौद्र, ग्राम्य व अश्लील असलेंच पाहिजे. तात्पर्य, प्राचीन अज्ञान हें यांतील गृहित सत्य आहे. तेवढ्याच प्राचीन अज्ञान या मुद्यासंबंधीं माझ्या साधार समजुती अतिसंक्षेपांत पुढीलप्रमाणें सांगतों.

प्रागतिकांनीं सिद्धवत् मानलेलों उत्क्रांतिवाद, विकासवाद, अथवा प्रगतिवाद ही जरी अंशतः एक प्रकारची भूल असली, तरी मला त्यासंबंधीं येथें पूर्वोत्तरपक्ष करावयाचा नाहीं. प्रागतिकांच्या या विचारसरणींत जें प्राचीन अज्ञान गृहित धरलें जातें, तितक्याचपुरता मला विचार कर्तव्य आहे.

**माझ्या समजुती:**—(अ) या अखिल विश्वाचें अधिष्ठान व उपादान जें ब्रह्मात्मतत्त्व त्याचीं स्वरूप लक्षणें (अथवा लक्षण) सत् (त्रिकालाबाधित सत्ता), चित् (चैतन्य, ज्ञान, प्रकाश), आनंद व अनंत (पूर्ण, व्यापक व नित्य असें अविकारी तत्त्व) हीं आहेत. या ज्ञानस्वरूप ब्रह्मात्म्याचा विकास किंवा उत्क्रांति संभवत नाहीं.

(आ) सृष्टीची उत्पत्ति-स्थिति-लयकारी असें सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् सशक्तिक शिव तत्त्व हेंच जगाचें अभिन्ननिमित्तोपादानरूप कारणब्रह्म, जगत्कार्यांत नित्य विद्यमान असतेंच. अर्थात् सृष्टीच्या आरंभीं केवळ शून्यावस्था अथवा अज्ञान असतें असें नव्हे. शिवसंकल्परूप सृष्टींत वस्तुतः अनुक्रम नाहीं (भा. ३।१०।३०,३१). शिवसंकल्परूप सर्वज्ञ वेद ह्यांस जगताच्या उपलब्धिरूप वैदिक विज्ञानी मानीत असतात. शिवसंकल्प हा सारा एक वर्तमानकाळच जाणावा. सृष्टिक्रमांत अनुक्रम सांगण्यांत श्रुतिशास्त्राचें तात्पर्य नाहीं. अनुक्रम मानला तरी मानवसर्गापूर्वीच दिव्य देवसर्ग सांगितला आहे. मानवसर्गाचाच विचार पाहतां मानवाचें पहिलें कृतयुग

---

१ The most idle supposition like that of evolution for example takes the rank of "laws" and are held to be proven. (East and West by Rene Guenon, p. 59.)

२ तैत्तिरीय उपनिषद् २।१; ऐतरेय उप. अ. ६; छां. उप. ६।१, ७।२३; बृ. उप. ३।८, ६।४।५, ४।५।६; लिंगपुराण, पू., अ. १-३.

३ ऋ. १०।१९०।३. Indo Aryan Mythology. Vol. I, page 477. Foot-note.

हें सर्वश्रेष्ठ व अत्यंत धर्मनिष्ठ असेंच वर्णिलें आहे. दशावतार हे उत्क्रांतिवादाचें गमक नव्हत मच्छ-कच्छादि अवताराच्या पूर्वी मन्वादि सर्वज्ञ ऋषि, तसेंच देवता, असुर इत्यादि ज्ञाता व्यक्ति होत्याच. मच्छ, कच्छ, वराह, म्हणजे सामान्य मासा, कासव, डुक्कर नव्हे त्यांचें स्वरूप गूढ व दिव्य असल्याचें वर्णिलें आहे स्थूल दृष्टान्त द्यावयाचा तर रोजच्या निद्रारूप दैनंदिन प्रलयानतर जागी होणारी प्रजा निद्रेच्या पूर्वीच्या विविध अवस्थास युगपत प्राप्त होते, त्याप्रमाणें कल्पारंभीं जीव त्याच्या त्याच्या प्राक्कर्मानुसार अज्ञ व सर्वज्ञ अशा विविध अवस्थास युगपत प्राप्त होतात. अर्थात् आरंभीं सारेच लोक रानटी व असंस्कृत असले पाहिजेत हें उत्क्रांतिवाद्याचें अनुमान अत्यंत निराधार व अयुक्तिक आहे

(इ) या त्रिगुणात्मक सृष्टींतील गुणवैषम्य ही सृष्टीची आरंभापासूनची नित्याची स्थिति असते. म्हणून अति प्राचीन काळींहि रजस्तमप्रधान अशा निकृष्ट मानव सृष्टीप्रमाणें शुद्ध सत्त्वप्रधान अशा सर्वज्ञ व्यक्तिहि असतातच. उदाहरणार्थ, त्रिदेव, ब्रह्मदेवाचे मानसपुत्र, अनेक प्रजापति, मनु, सप्तर्षि, मंत्रद्रष्टे ऋषि, नित्यपितर, देवता, तसेंच ज्याचा प्रलयात लय होत नाहीं, असे महर्लोकादि सूक्ष्म लोकांतील सिद्ध, मुनि इत्यादि श्रेष्ठ ज्ञाते व उपदेष्टे अति प्राचीन काळींहि विद्यमान असतातच. तेच जगाचे स्रष्टे, द्रष्टे, उपदेष्टे व नियंते होत. त्या प्राचीन भारतीयांच्या अतुल ज्ञानवैभवामुळेंच धर्म व तत्त्वज्ञानांत भारतवर्षाची बरोबरी अद्याप कोणासच करता आली नाहीं. शिवलिंग हें उपास्यप्रतीक, त्याचे उपासक व त्याची उपासना हें सारें सशक्तिक शिवाचें म्हणजे ईश्वराचें स्वरूप होय, असें आपले प्राचीन पूर्वज जाणत होते. (शि. पु. वि. सं १०७, यजु ३२।२. लिं पु. पू. अ. २७, ७९, उ. अ ४६, ४७).

---

१ मनु. १।२१, ३३ ते ३६, ९४, ३।२०१. भाग. ३।९।४३, ३।१२।४

२ Ancient Wisdom, Introduction, pp. 4-12. Reign of Religion by Sir Radhakrishnan, pp. 441-451. Evolution of Life and Form by Annie Bessant, pp. 41, 42. Theosophy explained, p. 388. 'A Study of Reality' by Malkani, preface. भारतधर्म महामंडळाचा 'भारतवर्ष का इतिहास.'

(उ) सृष्ट्युन्मुख परमेश्वराचें जे सामान्यतः पूर्वकल्पप्रमाणें जगत्संकल्प तेंच ज्ञानस्वरूप वेद होतें. जणूं त्या वेदांच्या पोटांतच हें जगत् असतें. V₁

(ऊ) सृष्टीच्या आरंभीं प्रादुर्भूत होणारें शिवलिंग हें तत्त्वतः जगत्कारण-स्वरूप असतें, तें ज्योतिस्वरूप असतें. तें दिव्य असतें. आपण पूजा करतों तें शिवलिंग त्याचेंच प्रतीक होयें.

(ए) आतां अनेक नामवंत पाश्चात्य आधुनिक तत्त्वज्ञ डार्विनचा उत्क्रांतिवाद किंवा प्राचीन अज्ञान मानीत नाहींत. आपलें श्वेताश्वतर उपनिषद् सांगतें कीं, परम शिवानें प्रथम ब्रह्मदेवाला निर्माण केलें व त्यास सर्वज्ञानस्वरूप वेदाची प्रेरणा केली. (श्वे. ६।१८) त्या वेदास आज आपण पारखे झालों आहोंत. तेव्हां जागतिक संस्कृतीचा विकास अथवा उत्कर्ष होत नसून अपकर्षच होत आहे, हें आतां पाश्चात्य पंडितांस जाणवूं लागलें आहे[३].

---

१ तै. उप. भाष्य २।६ ; ३।१० ; प्रश्न. ६।२. बृ. उप. २।४।१०. बृहत्-तन्त्रसार. शुक्लयजु. ३४।११. मनु. श्वे. उप. ६।१८. वेदशास्त्रदीपिका, पृ. ३६०–६७. विद्यारण्य भाष्य (ऋग्वेद) Indian Philosophy, Vol. II, p. 504-515. हिंदी ईशविज्ञानभाष्य. धर्मविज्ञान (हिंदी.)

२ केनोपनिषद् ३।११. लिंगपुराण, पूर्वार्ध, अ. १७–१९. शिवमहापुराण विद्येश्वर सं. अ. १-७. महाभारत सौप्तिक पर्व अ. १७. Ancient Wisdom. Introduction pp. 3, 4, 12. Indian Civilization and its antiquity p. 11. "Shiva worship with its Lingam and Yoni stands too high philosophically to be called phallic worship" (Secret Doctrines), (Vol. IV, 159). Cultural Heritage of India, Vol. II, p. 23. Handbook of Veersaivism, Foreward by Prof. R. D. Ranade. History and Philosophy of Lingayat religion by Prof. Sakhare, pp. 322, 323. Indio Aryan Mythology, Vol. I, p. 511.

३ East and West by Rene Guenon, pp. 1, 30, 34, 44, 57, 59, 91, 174, 189-204. Indian Civilization and its antiquity, p. 10. Reign of Religion, p. 441. Aspects of Vedant. Ancient Wisdom by Annie Beasant, p. 4. Personality of Man by Tyrrell, pp. 10, 17, 275. Causes of Evolution, pp. 153, 154.

(३) ऐतिहासिक दृष्टि—हें आधुनिकांच्या ज्ञानाचें तिसरें गमक आहे. शिवलिंगोपासना या विषयापुरतेंच पाहतां या ऐतिहासिक दृष्टींत सत्यस्वरूपावरण आणि विक्षेप हे अज्ञानाचें दोन्ही दोष ठळकपणें आढळतात. या पाश्चात्यानुयायी ऐतिहासिक दृष्टीला आपलें देवताविज्ञान जाणवत नाहीं. आपल्या देशांतील मूर्तिपूजा बुद्ध धर्माच्या ऱ्हासांतून प्रथमच सुरू झाली, तसेंच बौद्धांचे स्तूप, त्यांच्या शिलालेखांचे दगड, व त्यांचींच धर्मालयें यांचींच पुढें शिवलिंगें व शिवालयें बनलीं, असें त्यांचें ठाम मत आहे. तात्पर्य, बौद्ध धर्म व (वैदिक) ब्राह्मणधर्म यांच्या निंद्य व भ्रष्ट अशा अधःपातांतूनच शिवलिंगोपासना प्रथम उगम पावली आहे, म्हणून ती या सुधारलेल्या नवयुगांत आदरणीय नाहीं, असा आधुनिकांचा आक्षेप दिसतो. ही आधुनिक ऐतिहासिक दृष्टि आपल्या अगाध प्राचीन शास्त्रभांडाराचा आस्थापूर्वक सांप्रदायिक पद्धतीनें कधींच अभ्यास करीत नाहीं. हिचा भर पाश्चात्यांचे ग्रंथ व अत्यंत संदिग्ध, व अपुरे असे तथाकथित प्राचीनकालीन अवशेष यांवरच जास्त दिसतो. त्यांत, पूर्वग्रहाभिनिवेश, बहिर्मुखदृष्टि, भ्रामक गमकांची कांहीं तरी मनसोक्त जुळवाजुळव करण्याची उतावळी, नवीन संशोधनाची अवास्तव उत्कंठा व पाश्चात्यांचें बहुधा अंधानुकरण, हे दोष असतात. हें मी शिवलिंगोपासना या विषयापुरतेंच लिहीत आहें. ऐतिहासिक दृष्टीच्या एकंदर गुणावगुणाबद्दल अधिक विचार येथें अप्रस्तुत आहे यासंबंधीं माझ्या समजुतीचे कांहीं मुद्दे पुढें स्पष्ट सांगत आहें.

(३) माझ्या समजुती :—या आधुनिक ऐतिहासिक दृष्टीचा शिवलिंगोपासनेपुरताच विचार करतां, माझी अशी समजूत झाली आहे कीं,—

(अ) शिवलिंगोपासना हा विषय अंतर्मुख सूक्ष्म दृष्टीचा, कर्तृतंत्र शास्त्रानुकूल सद्भावनेचा, गूढ, दिव्य व अदृष्ट फलक असा आहे. तो बहिर्मुख व स्थूल अशा ऐतिहासिक अदूरदृष्टीचा विषयच नव्हे. वास्तव तिनें तिच्या अधिकाराबाहेरील या विषयात न पडावें तें बरें. भगिनी निवेदिता आपल्या

१ शिव महापुराण. विद्येश्वर सं. अ. ७, अ. १. १०७. लिंग पुराण पूर्वार्ध अ. १।१७।१९. श्वे. उप. केनोपनिषद खं. ३. ऋ १०।१२९; कठ. छं. ६।२।३; मनु १।५; ४।१९ अथर्व. ४।७; ११।२; १९।७।७. तलवकार

[टीप पुढील पानावर पहा.]

शिव आणि बुद्ध या पुस्तकांत ( पृ. १९ ) लिहिले की, "The wise and the learned of His ( Lord Siva ) people will laugh at you — 'Understand children,' they will say, 'that this is the Great God of whom we speak ! He can have neither dwelling place nor history nor companions, such things are vain dreams of men.' " [ कोणतें पाषाणलिंग किती वर्षांमागचें ह्या ऐतिहासिक चिकित्सेंत मुळींच महत्त्व नाहीं. ]

( आ ) शिवलिंगोपासना अनादि आहे, म्हणूनहि ती ऐतिहासिक दृष्टीच्या कक्षेबाहेर आहे. शिवलिंगोपासना निदान ऐतिहासिक कालाच्या हजारों वर्षे पूर्वीची आहे, असे अनेक पुरावे आहेत.

---

[ टीप मागील पानावरून चालू ]

१०।१९; ४।१।२. East and West by Rene Guenon, pp.15-16. Siva and Budha by Sister Nivedita, p. 19. See addresses on Bhakti Yoga in the complete works of Swami Vivekananda ( 1909 ). Mayavati Edition IV, p. 756. A search in secret Egypt By Paul Brunton, pp. 77-78.

1 It can scarcely be questioned theorise as writers may, that the origin of this worship ( of Lingam ) is lost in antiquity. ( Phallic Miscellany, p. 4, see also Phallism, p. 2. ) Cultural Heritage of India, Vol. II, p. 18. Indian civilization and its antiquity preface, p. 4. p. 1. Phallic miscellanies pp. 2-4 6-91-92. Phallism p. 1 Secret doctrines III pp. 81-86, IV pp. 37-38. Lives of Alcyone and Orion. Address of Dr. Prannath Vidyalankar at Benaras on 1-5-1933 in the Nagari Pracharini Sabha. Ancient Indian Colonies in the far East by R. C. Muzumdar. Investigation of Dr. K. S. Krishan, Dharma Raja number 13-11-1941. पुरुषार्थ, वर्ष १४ अ. ४ पृ. ३७१; कल्याण शिवांक पृ. ५७५-७६ सिद्धांत पत्र, वर्ष २ पृ. ९७, १२७. लिंग पुराण पू. अ. ३।४ पहा.

(इ) ऐतिहासिक दृष्टीचे आधार अति संदिग्ध व अपुरे असतात. त्यांवर चांधलेलीं अनुमानें बरोबर येण्यापेक्षां चुकण्याचाच संभव जास्त असतो. व जों जों भूतकालाकडे मार्ग जावें तों तों त्या अदूरदृष्टीतील प्रमाद अपरिहार्य होतो, असें नामवंत ऐतिहासिक संशोधकच पजावून सांगतात. एका मोहनजोदारोच्या उत्खननानें कित्येक ऐतिहासिक कल्पनांचे मनोरे, मुलांच्या पत्त्यांच्या बंगल्याप्रमाणें कोसळून पडले।

(ई) रात्रीं घडलेल्या स्वप्नाची आपणांस स्मृति नसते, आपल्याच आयुष्यातील आपल्याला पूर्वस्मृति नसते, एकाच नुकत्याच समक्ष घडलेल्या घटनेच्या चार साक्षीदारांत मेळ नसतो, चार दिशांनीं एकाच वस्तूकडे पाहिल्यास दृश्यानुभव वेगळा येतो, प्राचीन ऐतिहासिक कागदपत्र, शिलालेख व अवशेष हे पूर्वग्रहदूषित व संदिग्ध म्हणून अप्रमाण असण्याचा फार संभव असतो. गीता व ब्रह्मसूत्रें यांवर अनेक भाष्यें झालीं. मग ऐतिहासिक साधनांवरून निघणारीं अनुमानें अत्यंत भिन्न कां असूं शकणार नाहींत?

(उ) आपलें प्राचीन वाङ्मय आधिभौतिक, आधिदैविक, व आध्यात्मिक दृष्टींनीं लिहिलेलें असतें. त्यांतील समाधि भाषा, परकीय भाषा, लाक्षणिक भाषा, परोक्ष भाषा यांचा उत्तानार्थ घ्यावयाचाच नसतो. आपलें प्राचीन वाङ्मय ऐतिहासिक दृष्टीनें लिहिलेंच नाहीं. त्यांत ऐहिक आणि पारलौकिक व्यवहारांचें मिश्रण असतें. अर्थात् तो ऐतिहासिक दृष्टीचा विषय होऊंच शकत नाहीं.

(ऊ) बौद्ध आणि शैव यांचें हाडवैर होतें. शिवलिंगोपासना हें बौद्धांचें अनुकरण संभवत नाहीं. बौद्धांच्या ठिकाणीं ईश्वरोपासनेचा जिव्हाळा मुळींच

---

१ Permanent History of Mahabharat, Chapter, I, p. 2. " I found no peace " by Web Miller.

२ Indian civilisation and its antiquity, p. iv.

३ भारतवर्षका इतिहास (भारतधर्म महामंडळाचा) भूमिका.

४ Indian Philosophy Vol. II p. 722 cultural heritage of India Vol. II, pp. 27-32. शिवभक्तविलास उपपुराण, अ. ४५ ते ५०. Vedant Kesari, June 1950, p. 65. Indian Budhist Iconography pp. 98-99, 144, 146.

नव्हता, म्हणून तर तो धर्म येथें टिकला नाहीं. याशिवाय शिवलिंगपूजा बौद्ध कालाच्या फार पूर्वीपासून रूढ आहे. यासच पुष्कळ पुरावा आहे. त्यांतील कांहीं वर पृष्ठ १६१ खालीं निर्दिष्ट केला आहे. मोहोनजोदारो येथील उत्खनन हा शेवटचा पुरावा होय. त्यांत सहा हजार वर्षांपूर्वीचीं अनेक शिवलिंगें सांपडलीं आहेत.

**प्रामाण्यविचारः**— या पूर्वीच्या तीन परिच्छेदात अति त्रुटक रीतीनें मांडलेला खंडनविचार सविस्तर व योग्य ग्रंथातील भरपूर अवतरणें देऊन करता आला असता, तर फार बरें झालें. पण ग्रंथविस्तारभयापुढें माझा निरुपाय झाला, याबद्दल खेद वाटतो. असो. आता हा ग्रंथ लिहिताना मी अंगीकारलेला प्रामाण्य विचार तसाच संक्षेपतः पुढें सागतों.

(१) या ग्रंथांतील विषय बहुतांशीं गूढ व अतींद्रिय आहे. यास्तव या विषयाच्या चर्चेत श्रुति, स्मृति, पुराणेतिहास व श्रुतीनुकूल संतादि थोर सत्पुरुषाचे ग्रंथ, यास प्रामाण्य द्यावें लागेल. परकीयाच्या ग्रंथाच्या प्रामाण्याचा विचार येथें अप्रस्तुत नसला, तरी तो मी करीत नाहीं. आंग्लशिक्षित वाचकाना त्यांतील विचार जास्त हृदयस्पर्शी वाटतील, म्हणून तशा योग्य त्या ग्रंथाचे आधार त्याच्या समजुतीकरता मीं दिले आहेत इतकेंच. या ग्रंथात आद्य श्रीशंकराचार्यांचें तत्त्वज्ञान हेंच बहुधा मी अनुसरणार आहें.

(२) ग्रंथतात्पर्यनिर्णय ठरविताना किंवा त्यातील कोणत्याहि वचनाचा अर्थ लावताना समग्र ग्रंथाच्या समन्वयानेंच अर्थ लावला पाहिजे. मीमांसकाचीं षड्लिंगेंहि महत्त्वाचीं आहेत. जेथें प्रक्षिप्तवादाचा मुद्दा अत्यंत निर्विवाद नसेल, तेथें तो विकल्प मानताच कामा नये.

(३) ग्रंथार्थनिर्णय ठरवितांना परकीयाच्या व त्याच्या विचारांनीं भ्रमोदरच मारलेल्या स्वकीयांच्या दृष्टीपेक्षा श्रेष्ठ अखंडित प्राचीन परंपरेच्या, साप्रदायिक दृष्टीला जास्त प्रामाण्य दिलें पाहिजे.

(४) आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा त्रिविध दृष्टीनीं आपले अनेक प्राचीन ग्रंथ लिहिलेले असतात, हें त्याच्या रहस्याचा विचार करतां लक्षात ठेवलें पाहिजे.

(५) कोणत्याहि ग्रंथाची, संप्रदायाची, सांप्रदायिकाची, पंथाची किंवा पद्धतीची योग्यता त्यांच्यांतील श्रेष्ठ अंशावरून ठरवावी लागेल, व त्याच

अनुरोधानें त्यांतील निकृष्ट मासणारा भाग अगर विधानें याचा अर्थ अधिकार-भेदानें अगर लक्षणेनें लावावा लागेल.

(७) वरील पहिल्या निर्बंधाला अनुसरून ब्रह्मात्मवाद, जीवेश्वरवाद, जगन्मिथ्यात्ववाद, मायावाद, मूर्तिपूजा, नामसाधन, तसेंच धर्म व मोक्ष पुरुषार्थांचें असामान्य महत्त्व, भाव, श्रद्धा, सहजस्फूर्ति यांचें मूल्य, संत-भक्तांचे अनुभव व श्रुत्यनुकूल तर्क यांचें प्रामाण्य आणि परलोकवाद व पुनर्जन्मवाद हें सारें मान्य केलें पाहिजे या साऱ्या गोष्टीहि आधुनिकांना मान्य नसतात न्यायमूर्ति वुड्रॉफ आपल्या भारतशक्ति नामक पुस्तकांत म्हणतात कीं, One of the results of a hybird education and civilisation is that the simplest and truest things are misunderstood. ( Postscript pp. XVII to XXI. )

(८) गुरुप्रचीति, शास्त्रप्रचीति व आत्मप्रचीति हीं सत्यनिर्णयाची समुच्चयानें प्रमाणें मानलीं पाहिजेत. यांतील आत्मप्रचीति म्हणजे प्रज्ञावंत सद्गुरूपदिष्ट साधकाची आत्मप्रचीति, तसेंच गुरुप्रचीति म्हणजे श्रोत्रीय व ब्रह्मनिष्ठ सद्गुरूंची प्रचीति असें समजावें. सारीं भारतीय प्राचीन आस्तिक दर्शनें अथवा शास्त्रें अधिकारभेदानें प्रमाण मानावीं. (सूतसंहिता, यज्ञ-वैभव खंड, अ. ११-२०-२२. सप्रदाय सुरतरु, अ ६).

(९) पारिभाषिक शब्दांचे अर्थ सांप्रदायिक पद्धतीनेंच लावले पाहिजेत. शास्त्रांतील समाधि भाषा, परकीय भाषा, परोक्ष भाषा, लाक्षणिक भाषा अशा गूढ भाषाप्रकारांत हटकून गैरसमज होतात, त्यांस जपलें पाहिजे. सांप्रदायिक परंपरेनें प्राप्त होणाऱ्या ज्ञानाचें महत्त्व अनन्यसाधारण असतें राजाच्या मागून त्याची जी औरस संतति असेल तीच गादीवर बसते. अन्यास तो अधिकार नसतो त्याप्रमाणें साप्रदायिक ज्ञानाच्या मान्यतेबद्दल समजावें.

(१०) नुसत्या प्राचीन-अर्वाचीन विद्वत्तेला प्रामाण्य नाहीं. ब्रह्मनिष्ठ-कृतार्थ पुरुषाचें अथवा साक्षात्कारी पराकोटीच्या भक्तांचें वचन हेंच

१ चाणाक्ष दृष्टीला सुगंध कळणार नाहीं. श्रीज्ञानेश्वर म्हणतात— "पैं व्याकरणीं चोखडा। तर्कीं अतिगाढा। परि एक आत्मज्ञानीं मुडा। जात्यंध जो ॥ ८३४ ॥ मोरा आंगीं अशेषें। पिसें असतीं डोळसें। परि एकली दिठी नसे। तैसें ते गा ॥ ८३५ ॥" ज्ञानेश्वरी अ० १३

प्रमाणभूत मानावें लागेल. केवळ युक्तिवाद प्रमाण मानतां येणार नाहीं. श्रुति, युक्ति, आणि अनुभूति यांचें ऐकात्म्य हेंच शिष्टमान्य प्रमाण होय.

( ११ ) व्यवहारांत असें नेहमीं घडतें कीं, जे समाजाचे अगर त्यांतील काहीं संस्थाचे पुढारी असतात, तसेंच जे लेखक, वक्ते, शिक्षक, संशोधक व संपादक असतात, त्यांस धर्म व तत्त्वज्ञानासारख्या गूढ विषयावरहि कधीं कधीं आपले विचार प्रगट करावे लागतात, अशा वेळीं त्यांच्या समाजांतील स्थान-माहात्म्यामुळें अगर लोकप्रियतेमुळें, त्यांच्या विचारास समाजाकडून सहजच प्रामाण्य दिलें जातें त्यामुळें समाजाची पुष्कळ वेळा दिशाभूल होते[1]. म्हणून यासबंधीं सावधानता व सारासारविवेक याची फार गरज आहे.

( १२ ) परकीयाच्या दीर्घकालीन राज्यामुळें त्याच्या संस्कृतीचे अनेक अनिष्ट संस्कार आपल्यावर होत आले आहेत. तसेंच आंग्ल शिक्षणात प्रावीण्य मिळविणारांकडेच देशाच्या पुढारीपणाचें, लोकशिक्षणाचें व सत्ताधिकाराचें काम त्या ओघानेंच येत गेलें याचा धार्मिक दृष्ट्या अतिविघातक परिणाम घडून आला आहे ही गोष्ट नि पक्षपाती अशा काहीं पाश्चात्य विद्वानांनींहि स्पष्ट नमूद केली आहे[2] उदाहरणार्थ, हिंदु संस्कृतीचा सखोल व दीर्घकाल अभ्यास

1 To go beyond one's own field and to dabble in theology or spiritism is dangerous even for men as illustrious as Issace Newton, William Crookes or Oliver Lodge. ( Chapter VII of Man the Unknown ).

Thus great men, in speaking about things they do not thoroughly understand, hinder human progress, in one of its fields, while having contributed to its advancement in another. ( Ibid, Chap. II )

2 Those who cannot understand lofty ideas when presented in ritual and symbolic garb will serve their reputation best by not speaking of them (J. Woodroffe)

जस्टिस वुड्रॉफ एके ठिकाणीं यापुढें जाऊन असें स्पष्ट सांगतात कीं आधुनिक आंग्लशिक्षिताची मनाची ठेवण इतकी बदलून जाते कीं, त्यास हिंदुधर्मसंस्कृतीचें रहस्य पटणें व पटवणें पुष्कळ वेळा अशक्य प्राय होतें.

केलेले सर जॉन वुड्रॉफ हे न्यायमूर्ति असें म्हणतात कीं, पाश्चात्य शास्त्रज्ञ व त्यांचे आपल्याकडील अनुयायी बहुश्रुत व बुद्धिमान असले तरी ते वैराग्यपूर्ण तपश्चर्येनें व संन्यस्त वृत्तीनें मायेचा पडदा दूर सारून चिच्छक्तीशीं एकरूपता पावलेले संत बनलेले नसतात. नुसत्या बुद्धिवादानें आणि तर्कानें अपरोक्षानुभूति होणार नाहीं. त्याला पावित्र्य, तनमनशुद्धि, संयम, शिस्त आणि उपासना यांची गरज आहे. आपण साहं बनावें लागतें. जेव्हां ही सिद्धभूमि होती, तेव्हांचें हें तत्त्वज्ञान आहे. ( The Power as Reality by J. Woodroffe. )

( १२ ) अंतर्मुख वृत्तीनें, ध्यानधारणेनें, किंवा श्रवणमननिदिध्यासादि अन्य पारमार्थिक साधनांनीं जीव-अहंकाराचा विलय करून परमात्मरूप शिवतत्त्वाची दृढ अपरोक्षानुभूति करून घेणें, हाच शिवलिंगोपासनेचें अंतिम रहस्य जाणण्याचा प्रशस्त मार्ग दिसतो. प्रकृति, माया, अथवा चिच्छक्ति यांच्या बाह्य स्थूल–सूक्ष्म आविर्भावांचें बहिर्मुख वृत्तीनें अवलोकन व त्याचें चिंतन आणि मनन करीत गेल्यानें बुद्धि चिकित्सक व व्यापक होत जाईल; पण तिला या केवळ बहिर्मुख वृत्तीनें अंतिम शिवतत्त्व केव्हां तरी अपरोक्ष करतां येईल, असें सांगवत नाहीं. किमान पक्ष वैराग्य, शास्त्रोक्त अभ्यास व ईश्वरनिष्ठा हीं साधनें अवश्य पाहिजेतच. ( Varieties of Religious experiences, p. 410. See Personalities of man, p. 275 ).

( १३ ) उत्क्रांति, प्रगति, साम्यवाद, सामाजिक सुधारणा, परंपरानिरपेक्ष आचारविचारस्वातंत्र्य, धर्मनिरपेक्ष राज्य, भौतिक विज्ञानसर्वस्व व ऐहिक सुखवाद अशा अनेक क्रांतिकारक घोषणांनीं आजच्या नवयुगाचें वातावरण दुमदुमलें आहे. हीं वस्तुतः भ्रामक असलेलीं गृहित सत्यें जो न मानील तो अजाण, खुळा व रानटी मानला जात आहे. अशा विचारांच्या कोलाहलांत हा ग्रंथ लिहिणें व वाचणें यास वरील मर्यादा आवश्यक वाटतात.

( १४ ) आपल्या भारतीय संस्कृतीची अंतरमुखता हा विशेष आहे. सत्त्वसंशुद्धि हें प्रगतीचें गमक आहे. अहंता-ममता-त्याग हें वैराग्याचें रहस्य आहे. त्रिकालाबाधित ही सत्याची व्याख्या आहे. हरएक प्रकारच्या योगक्षेमाचें ईश्वरनिष्ठा हें एकमेव साधन आहे. आपण आपल्या सनातन वैदिक वर्णाश्रम धर्माची आस्था बाळगली तर तो धर्म आपली काळजी वाहील. आपण

ईश्वरास प्रपन्न झालों तर आपल्या अभ्युदयानिःश्रेयसाची कदर तो बाळगील, असा अढळ विश्वास पाहिजे. अनेक धर्मनिष्ठांच्या उपासनेच्या पुण्याईशिवाय समाजोद्धारक ईश्वरी अवतार होत नसतो, हें पक्कें जाणून महाराष्ट्राचे प्राचीन राजगुरु श्रीसमर्थ रामदास यांचें– "उपासनेकरितां । जगदोद्धार ॥१३॥२॥८. हें वचन सर्वांनीं मनावर घेतलें पाहिजे.

आक्षेप आणि संदेह :—"संशयात्मा विनश्यति।" गीता ४।४०. याचा वास्तविक अर्थ पोटांत संशय बाळगून त्याचें निराकरण करून घेतलें नाहीं तर त्यानें हानि होते, असाच केला पाहिजे. ( न संशयं मनारुह्य नरो भद्राणि पश्यति । संशयं पुनरारुह्य यदि जीवति पश्यति ॥ म. भा. १२।१४०।३४.) म्हणून भगवान् गीतेंत लगेच म्हणतात कीं, आपल्या हृदयांत अज्ञानानें उत्पन्न झालेला संशय ज्ञानरूप तरवारीनें छाटून टाक, ( गी. ४।४२ ) आपले बहुतेक प्राचीन शास्त्रग्रंथ प्रश्नोत्तररूप आहेत. प्रतिपक्षाच्या आक्षेपाचें खंडण आणि शिष्याच्या संदेहाचें निरसन असेंच शास्त्रग्रंथाचें बहुधा स्वरूप आढळतें. बुद्धिवाद्यास चिकित्सा हवी असते. भाविकास ती आवडत नाहीं. त्यानें क्वचित् त्याचा बुद्धिभेद होण्याचाहि संभव असतो. असें आहे तरी "विषयो विषयश्चैव पूर्वपक्षस्तथोत्तरम् । निर्णयश्चेति पञ्चाङ्गंशास्त्रेऽधिकरण स्मृतम् ।" अशीं पूर्वोत्तर पक्षरूप अधिकरणाची पांच अंगें शास्त्रानेंच मानलीं आहेत. श्रीसमर्थहि म्हणतात—"रत्नें साधाया कारणें । मृत्तिका लागे येकवटणें ॥ १ ॥ पूर्वपक्षाविण सिद्धांत । बोलतांचि नये ॥ ३ ॥ आधीं मिथ्या उभारावें । मग तें वोळखोन सांडावें। पुढें सत्य तें स्वभावें । अंतरीं बाणें ॥ ४॥ दा. घो. ७।३", "निराकृत्यहि पूर्वपक्षं पश्चात्सिद्धान्तो वक्तव्यो भवतीति न्यायात् । मु उ. ४" या शांकरभाष्यांत असेंच म्हटलें आहे. उपनिषदांतून "तूं जर यावर अति प्रश्न करशील तर तुझें मस्तक तुटून पडेल" असें ज्या-प्रमाणें म्हटलेलें आढळतें. बृ. उप.३।६।१. त्याप्रमाणें या उलट तू हा प्रश्न विचारून निराकरण करून घेतलें नसतेंस तर तुझें मस्तक तुटून पडलें असतें, असें पण म्हटलेलें आढळतें. छा. उप ५।११।१. डॉ पॉल ब्रटन यांच्या Hidden truth beyond Yoga या ग्रंथांत ( पृ. १५५-१५६ ) अनेक ठिकाणीं, शंका काढून त्याचें निराकरण करून घेण्याला फार महत्त्व दिलें आहे. श्रीरामकृष्ण परमहंसांनाहि शंका घेणें व तिचें निराकरण करून घेणें

हें फार आवडत असे. हा चिकित्सा खंड त्याच धोरणानें लिहिला जात आहे. प्रतिपक्षाचा कठोर सडेतोड पूर्वपक्ष कोणास बुद्धिभेदक वाटतो, म्हणून या चिकित्सा खंडांत आक्षेप आणि संदेह सौम्य स्वरूपांत व संक्षेपांत मांडले आहेत. तसेंच निराक्षेप अशा प्रथम खंडांत, भाविकांच्या मनाची बैठक, पुढें या चिकित्सा खंडानें सहज बुद्धिभेद होऊं नये, अशी तयार केली आहे.

या चिकित्सा खंडाच्या मूळ हस्तलिखित प्रतींत हिंदुधर्म संस्कृति, श्रुतिप्रामाण्यवाद, परलोकवाद, ब्रह्मवाद, ईश्वरवाद, नामसाधन, मूर्तिपूजा, प्रामाण्यवाद यांसंबंधीं आक्षेप संदेह निराकरणाचीं अनेक प्रकरणें सविस्तर लिहिलेलीं होतीं. पण मागें लिहिल्याप्रमाणें तीं या ग्रंथांत गाळलीं आहेत. आतां साक्षात् शिवलिंगोपासनेसंबंधींच जे आक्षेप व संदेह आहेत, तेवढ्यांचीच चिकित्सा या खंडांत मर्यादित केली आहे.

याप्रमाणें या चिकित्सा खंडांत कोणत्या आक्षेपांची अथवा संदेहांची आपणांस चिकित्सा करावयाची आहे, ते आक्षेप अथवा संदेह थोडक्यांत पुढें देत आहें. येथें भाविकांच्या समजुतीकरतां हें स्पष्टच सांगणें योग्य वाटतें कीं, हे आक्षेप किंवा संदेह मी या ग्रंथाच्या सार्थकतेकरितां वळेंच माझ्याच मनानें कल्पिलेले नाहींत. या आक्षेप किंवा संदेहांच्या मागें आपल्या देशांत मान्यता पावलेल्या अशा अनेक विद्वान व्यक्ति आहेत. त्यांचीं नांवें मी बुद्धिपुरस्सरच सांगत नाहीं; ती गोष्ट वेगळी. अर्थात्, हे आक्षेप अथवा संदेह अनेक भाविक उपासकांच्या मनाला यापूर्वी कधीं शिवलेहि नसले, तरी आधुनिकांच्या वरील प्रकारच्या आक्षेपक लिखाणामुळें आजच्या-उद्यांच्या शिकल्यासवरलेल्या पिढीच्या नजरेपुढें ते सतत खेळते राहातील, अशी आजची परिस्थिति दिसत असल्यामुळें, त्यांची दुसरी बाजू वाचक जगापुढें असणें फार अगत्याचें आहे, म्हणून हें माझ्या अधिकाराबाहेरचें चिकित्सेचें कार्य, अचिंत्य ईश्वरी प्रेरणेनें माझ्या हातीं दिलें आहे, असें मी मानतों. पण तें वाचून ज्या भाविकांना आपला बुद्धिभेद होण्याचा धोका वाटेल, अशा हळुवार मनाच्या भोळ्या भाविकांनीं हा चिकित्सा खंड ( तसें वाटल्यास ) वाचूं नये, अशी विनंती आहे. आतां या चिकित्सा खंडांत चर्चा करण्याचे ठळक आक्षेप व संदेह सांगतों.

आक्षेप व संदेह:—(१) शिव आणि रुद्र वेगळे. शिवाचें वेदांत नांवहि नाहीं. तो अवैदिक आहे. रुद्र ही वेदांतील अति गौण देवता आहे. तो क्रूर, दुष्ट व ग्राम्य असाच वेदांत वर्णिलेला आहे. मोहोनजोदाडो येथील उत्खननांत सांपडलेलीं सारीं शिवलिंगें वेदपूर्वकालीन अनार्यांचीं आहेत. त्यांसच ऋग्वेदांत शिश्नदेव असें अत्यंत निंदेयार्थी म्हटलें आहे. शिव, रुद्र, भैरव, विनायक, कुमारस्कंद, काली, दुर्गा हीं सारीं अनार्यांचीं कल्पित उग्र दैवतें आहेत. नंदी तर पशुच आहे. अर्थात् हीं दैवतें आर्यांनीं उपासनीय नाहींत.

(२) (अ) शिवलिंग हें शिश्नयोनि या जघन्य इंद्रियांच्या मिथुनाचें अश्लील प्रतीक आहे. हें शिवलिंगासंबंधीं शिल्पशास्त्र यावरून व शिवलिंगपूजा कशी रूढ झाली, यासंबंधींच्या अनेक आख्यानावरूनहि स्पष्ट होतें.

(आ) शिवलिंगोपासना ग्राम्य आहे.

(इ) त्या उपासनेंतील कल्पित रुद्र व रुद्राणी अथवा शिवशक्ति या देवता उग्र, भयानक व अमंगल अशाच वर्णिलेल्या असल्यामुळें उपासनीय नाहींत.

तसेंच या देवतांची वेशभूषा व परिवार तसेंच शिवालयांतील इतर चिन्हें ग्राम्य व अश्लील असतात.

(३) वरील आक्षेपाचा विचार केला न केला तरी, शिवलिंगोपासना ही देशकालमानानें असामायिक, अव्यवहार्य व निरुपयोगी आहे.

थोडक्यांत या आक्षेपांची चिकित्सा या खंडांत करावयाची आहे

मार्गे मार्गे निर्मलं ब्रह्मवृन्दं वृन्दे वृन्दे तत्त्वचिन्तानुवादः।
वादे वादे जायते तत्त्व बोधो बोधे बोधे भासते चन्द्रचूडः॥

---

## प्रकरण २ रें

# अनार्य व अवैदिक दैवतें



हरिः ॐ ॥ इडा देवहूर्मनुर्यज्ञनीर्बृहस्पतिरुक्थामदानि शँऽसिषद्विश्वेदेवाः सूक्तवाचः पृथिवि मातर्मामा हिꣳसीर्मधु मनिष्ये मधु जनिष्ये मधु वक्ष्यामि मधु वदिष्यामि मधुमतीं देवेभ्यो वाचमुद्यासꣳ शुश्रूषेण्यां मनुष्येभ्यस्तं मा देवा अवन्तु शोभायै पितरोऽनुमदन्तु ॥ नमो रुद्रेभ्यः । ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः ॥

सर्गादिकाले भगवान् विरिञ्चिरुपास्यैनं सर्गसामर्थ्यमाप्य ।
तुतोष चित्ते वाञ्छितार्थांश्च लब्ध्वा धन्यः सोपास्योपासको भवति धाता ॥ —दक्षिणामूर्ति २०.

या मंगलपूर्वक प्रकरणापासूनच चिकित्सा खंडाला आरंभ होत आहे. उपास्य शिव व त्याची उपासना यांसंबंधीं उपासकानें चिकित्सा करणें, हा अपराध आहे. वास्तव हें लेखनकर्तृत्व मला केवळ निमित्तमात्र मानून भगवान् शिवानें आपणच आपल्या इच्छेनुरूप पुरें करावें, अशी विनम्रभावानें मी त्याची प्रार्थना करतों.

श्रीशिवलिंगोपासनेसंबंधीं आक्षेप आणि संदेह यांचें निरसन करण्यापूर्वीं ईश्वरी मायेनें शिवाच्यासंबंधीं जे आक्षेप व संदेह आधुनिकांच्या ठिकाणीं निर्माण केले आहेत, त्यांचें निराकरण करणें अवश्य आहे.

ते आक्षेप आणि संदेह थोडक्यांत तपशीलवार असे आहेत :—

(१) शिव या देवतेचा नामनिर्देशहि वैदिक वाङ्मयांत नाहीं. ती अनार्यांची व शूद्रांची पुराणोक्त देवता अवैदिक आहे.

(२) रुद्राचा फारच थोडा उल्लेख ऋग्वेदांत आहे. पण त्याचें वर्णन रौद्र व ग्राम्य स्वरूपाचें आहे. तो सुसंस्कृत अशा आर्यांचा देव असणें शक्य वाटत नाहीं.

(३) मोहनजोदडो येथील उत्खननांत वेदपूर्व द्राविड संस्कृतीचे अवशेष सांपडले आहेत. त्यांत त्या अवैदिक अनार्यांचीं शिवलिंगें पुष्कळ आहेत.

(४) ऋग्वेदांत लिंगपूजक शिश्नदेवांस इंद्रानें ठार मारावें, असा त्यांचा तीव्र शब्दांत निषेध केला आहे.

(५) यावरून लिंगपूजा अनार्य शिश्नदेवांची व शिवदेवता द्राविडी अनार्य संस्कृतीतील अर्थात् अवैदिक असें सिद्ध होतें.

(६) ही देवता पुढें आर्य आणि अनार्य यांच्या संकरांत आर्यांनीं निरुपायानें मागाहून पत्करली, असें दिसतें. हेंच तें शंकराचें विषप्राशन होय. तरी पण आर्यांनीं या देवास क्रूर, दुष्ट, अनाचारी इत्यादि दोषयुक्तच मानलें आहे. " त्याला दंत आहेत, त्याच्या केसांची वेणी घातली आहे, त्याचें पोट काळें आणि पाठ तांबडी आहे, तो कांतडें पांघरतो आणि पर्वतावर राहातो," इत्यादि प्रकारें त्याचें विचित्र, रौद्र व रानटीपणाचें वर्णन आर्यांनीं केलेलें आढळतें. त्याला शूद्राचा देव मानलें आहे.

(७) या देवतेचा स्मशानवास, चिताभस्मलेपन, मुंडमाळा, कपालांतून भिक्षा मागणें, पशुवाहन, सर्पभूषणें इत्यादि ओंगळ आचार पाहून त्यास यज्ञांत हविर्भाग देण्याचें लांबच राहिलें, पण खुद्द त्याच्या सासऱ्यानें म्हणजे दक्षानें त्यास यज्ञास बोलावलेंहि नाहीं. उलट त्याची निर्भर्त्सना केली.

(८) वैदिक याज्ञिकांप्रमाणें बौद्धतंत्र पंथांतहि त्याची अत्यंत अवहेलनाच केली आहे, ती लिहवत नाहीं.

(९) शिवरुद्राप्रमाणेंच शक्ति, विनायक, कुमार स्कंद या साऱ्या भयप्रद नरबलि घेणाऱ्या उग्र देवता आहेत.

(१०) या देवतांप्रमाणें यांचा भूतादि परिवार व याचे असुर-काळामुख कापालिक, इत्यादि उपासक आचारभ्रष्ट आढळतात. या देवतेचे पुजारी निकृष्ट जातीचे पूर्वास्पृश्यहि असतात. शैव हे अस्पृश्य मानले होते. शिवतीर्थ व शिव निर्माल्य हीं अग्राह्य मानिलीं आहेत. शिवावर रुद्राभिषेकाची एकादशनी शुचिर्भूत ब्राह्मण करीत नसत.

(११) शिवलिंग हें शिश्नयोनि मैथुनाचें-अश्लील प्रतीक आहे. हाच प्राचीन सर्व धर्मांतील मूळचा लिंगदेव होय. शिवाची लिंगरूपांतच उपासना

कशी उत्पन्न झाली असा प्रश्न उत्पन्न करून त्याचा खुलासा करण्याकरतां पुराणकारांनीं त्या आख्यायिका सांगितल्या आहेत, तसेंच शिवलिंगासंबंधीं जें शिल्पशास्त्र आहे व त्याप्रमाणें जीं प्राचीन शिवलिंगें घडवलेलीं आहेत, हें सारें पाहता शिवलिंग हें जननेंद्रियाचेंच प्रतीक आहे अशी खातरी होते.

याप्रमाणें श्रीशिवाच्या जणु विरोध भक्तीची आक्षेपकांकडून होणारी " शिव्यांची लाखोली " या म्हणीप्रमाणें एकादशनी आहे! यानंतर आतां या खंडांत निंदा व स्तुतीच्या अतीत असलेल्या भगवंताची म्हणजे त्याच्या शिवलिंगाची प्रथम प्रक्षालन पूजा करावयाची आहे. ती उरकल्यावर मग मुख्य पूजा अखेरच्या सारखंडांत यथावकाश जशी तो करवून घेईल, तशी करू.

मार्गावर्तित पादुका पशुपते रङ्गस्य कूर्चायते ।
गण्डूषाम्बुनिषेचनं पुररिपोर्दिव्याभिषेकायते ।
किंचिद्भक्षितमांसशेषकवलं नव्योपहारायते ।
भक्तिः किं न करोत्यहो वनचरो भक्तावतंसायते ॥ ६३ ॥

— शिवानंदलहरी

प्राचीन काळीं कोणी एक कण्णप्प नांवाचा अरण्यवासी भिल्ल एका डोंगरावरील शिवमूर्तीवर पूर्वी ब्राह्मण पुजाऱ्यानें वाहलेलीं बिल्वपत्रें पायांतील पादत्राणानीं झाडून टाकी, आपल्या तोंडांत भरून नेलेल्या पाण्याच्या चुळानें त्या मूर्तीला स्नान घाली व निरनिराळ्या पशुपक्ष्यांच्या मांसाचा नैवेद्य त्यास दाखवी. तेव्हां तेथें सुप्रभातीं शिवपूजा करण्यास येणाऱ्या ब्राह्मण पुजाऱ्याला हो रोज घाण कोण करतो, तें कळेना. त्याला रोज ती जागा धुऊन स्वच्छ करावी लागे. पण आचार्यांनीं लिहिलेल्या वरील श्लोकाप्रमाणें ती त्या शूद्र भिल्लाची पूजा शिवास फार प्रिय होती. याचें कारण त्या अजाण भिल्लाचें शिवावरील प्रेम अमर्याद होतें. तो भिल्ल आपल्या देवतेसाठीं वाटेल तो त्याग करण्यास आनंदानें तयार होता. श्रीविष्णूनें शिवपूजेंत आपलें एकच नेत्रकमल वाहिलें. पण कण्णप्पानें आपल्या हातानें दोन्ही डोळे काढून ते शिवास दिले होते! विरोधी भक्तींतहि मनाची तन्मयता असते व प्राणात त्यागाची तयारी असते; पण वर दिलेल्या आक्षेप घेणाऱ्यांच्या ठिकाणीं अशा प्रेमलक्षण किंवा नविरोधी भक्तीचाहि संभवच नसतो.

पाश्चात्य संस्कृतीच्या वनावटीच्या आधुनिक ऐतिहासिक दृष्टीच्या चष्म्याचा असा एक विलक्षण गुण आहे कीं, त्यानीं देवताविज्ञानासारख्या विषयातहि भक्तिभावनेच्या प्रेमाश्रूची धार डोळ्यास कधींच लागत नाहीं नि पक्षपाती ऐतिहासिक दृष्टि तीच कीं, जी देवतावर्णनातहि चुकूनसुद्धा भावनावश न होता त्र्यवस्थाप्रमाणें सतत रुक्ष व उदासीन राहू शकते देवताविज्ञानावरील ग्रथहि भक्तिभावनावशतेनें लिहिणें हें ऐतिहासिक दृष्टीला मुळींच रुचत नाहीं, याचा मला अनुभव आला आहे इतकेंच काय, तर धर्मासंबधींच लिहीत असता सनातन वैदिक वर्णाश्रमधर्मासंबधी अभिमान धारण करणें, हेंहि कित्येक आधुनिक विद्वानास व सरयास अयोग्य व असमर्थनीय वाटतें, याचाहि मला विलक्षण अनुभव आला आहे तात्पर्य, आपल्याच देवताविज्ञानासारखा का विषय असेना, त्यासंबधीं लिहिताना आधुनिक विद्वान् लेखक किती निरभिमान व निर्मोह राहू शकतात, हें आश्चर्यानें पाहण्यासारखें आहे ! पण हा देवतासंबधीं ग्रथलेखनातील भक्तिभावनाशून्यतेचा दडक मला मान्य नाहीं निदान या उपासनाग्रथात तो अत्यत अप्रस्तुत आहे, असेंच मी समजतों

ज्या महाराष्ट्रांचें शाभवी अथवा आध्यात्मिक विद्येचें तेज श्रीमुकुंदराज-ज्ञानेश्वरापासून तों अगदीं अलीकडील श्रीहंसराजस्वामी, नारायणमहाराज जालवणकर, श्रीवासुदेवानंदसरस्वती, श्रीगुलाबरावमहाराज, व श्रीदासगणू महाराज याच्यापर्यंत अनेक भगवद्भक्त संत कवींनीं अति उज्वल राखलें आहे, त्याच महाराष्ट्रात भक्तिभावनाशून्य असे वरील प्रकारचे शिवविरोधी आक्षेपक निर्माण व्हावे, या ईश्वरी मायेचें सखेदाश्चर्य वाटतें ! याचें कारण तपासू जाता पाश्चात्य संस्कृतीचे दृढमूल संस्कार, याशिवाय दुसरें काहीं आढळत नाहीं ज्याच्या धर्मप्रमाणें सृष्टि उत्पन्न झाल्यास अद्याप सहा हजार वर्षेंहि झालीं नाहींत, त्या खिस्ती पाश्चात्यानीं आमच्या देवताचा व वैदिक संस्कृतीचा कालनिर्णय काय ठरवावा ! तसेंच ते स्वत स्वतंत्र असता हिंदुस्थान या एका जित राष्ट्राच्या प्राचीन देवदेवताबद्दल त्याच्या ठिकाणीं योग्य आस्था, भक्ति-प्रेम व आदर कोठून उत्पन्न व्हावा ! अथवा आमच्या धर्मांचें व देवता-विज्ञानाचें गूढ साप्रदायिक रहस्य त्याना कसें समजावें ! हा काहीं त्याचा दोष नव्हे पण यास गुरुस्थानीं मानून आमच्या आधुनिक विद्वान् बधूनीं देवता-

विज्ञानात्मक स्वधर्मरहस्यास सर्वतोपरी विन्मुख व्हावें, हें आमचें दुर्दैव होय! भौतिक विज्ञानानें आधिदैविक जग व त्यातील देवता याचेसंबंधीं आस्तिक्य बुद्धीचाच घात केला! एका जड निसर्गापलीकडे अन्य आधिदैव व अध्यात्म काही नाहीं असें नास्तिक्यच जगात रूढ झालें! यासंबंधीं पुढील अवतरण वाचावें.

"No attempt at identifying the Gods with any natural phenomena can give an absolutely satisfactory result. The safest thing is to assume that the Vedic poets were aware of certain forces invisible and incomprehensible to ordinary man, and that in describing the gods they were trying to represent these forces in the light of natural phenomena known to ordinary man and thereby to give an idea of what the poets saw and experienced, to the ordinary man who can not understand them in their reality. +++ The obvious relation between the gods described in the vedic mantras and certain of the visible natural phenomena is no authority for concluding that the Vedic religion was essentially one of Nature worship, it is only the result of the Vedic Rishis trying to interprete the narure of gods they saw, in terms of objects that are known to the ordinary man" (Cultural heritage of India, Vol. I, pp. 27-28).

हें सारें देवताविषयक रहस्य पूर्वी पूर्वपरंपरेच्या शिक्षणानें दृढमूल होत असे आपल्या अनेक धार्मिक रूढी, सणवार, देवताचे उत्सव, व्रतवैकल्यें, अनेक मंगल विधिविधानें, अशा हिंदु जीवनातील विविध प्रथानीं, चालीरीतींनीं, किंबहुना उपजत समजुतींनीं जें देवताविज्ञान श्रद्धेनें आमच्या हाडींमाशीं खिळलें होतें, तें पाश्चात्य भौतिक शिक्षणानें निर्मूल करीत आणलें आहे! आपलें देवताविज्ञान म्हणजे भौतिकशास्त्राचें अज्ञान अन्य काही नाहीं, ही

समजूत दृढ झाली आहे. अशी एकदां समजूत झाल्यानंतर आंग्लशिक्षित आधुनिकांत दोनच वर्ग उरले: एक कट्टे जडवादी नास्तिक व दुसरे साधनहीन व अनुभवशून्य केवळ शाब्दिक तात्त्विक. या दोन्ही वर्गांनीं याच जातीच्या पाश्चात्य गुरूंचें अंधानुकरण करीत जें आपल्या प्राचीन शास्त्रीय वाङ्मयाचें आलोडन केलें, तें शवचिकित्सेप्रमाणें अथवा पुरलेलीं हाडें उकरून काढण्याप्रमाणें अत्यंत तुच्छ व रहस्यहीन झालें. प्राचीन किल्ल्यांच्या अवशेषांप्रमाणें त्यांना आपल्या शास्त्रांतील देवताविज्ञान म्हणजे अज्ञानरूप प्राचीन जडावशेषांचा इतिहास यापेक्षां त्यांसंबंधीं अधिक जिव्हाळा त्यांच्या ठिकाणीं उरला नाहीं. प्राचीन देवतामूर्ति त्यांच्या ऐतिहासिक पोतड्यांत मराव्या अथवा नास्तिक्याच्या मुशींत आटवाव्या, या कशाचाच त्यांना विधिनिषेध राहिला नाहीं! आपल्या देवताविज्ञानासंबंधीं आधुनिकांचें जिव्हाळाशून्य लिखाण वाचावें म्हणजे त्यांच्या देवतांसंबंधीं पूर्ण नास्तिक्य भावाची खात्री होईल. "सगुण नावडे ज्ञानगर्वें" या समर्थांच्या उक्तीप्रमाणें आधुनिकांची आपल्या देवताविज्ञानासंबंधीं ऐतिहासिक दृष्टि विवेकभ्रष्ट व भक्तिभावनाशून्य दिसते!

आपलें वैदिक व पौराणिक वाङ्मय हा—सर्वस्वीं—निदान प्राधान्यानें तरी आधिदैविक व आध्यात्मिक दृष्टीचाच विषय आहे; हें म्हणणें शिव व शिवाचा परिवार यांच्यासंबंधीं विचार करतांना तर अवश्यच ध्यानीं ठेवलें पाहिजे. वैदिक वाङ्मयाचा लौकिकार्थानें विचार केल्यामुळेंच ते रानटी लोकांचे अर्थहीन बोल असें आधुनिकांस वाटतें. कोणी वैदिक वाङ्मयांत भासमान होणारा इतिहास हा पामीर पठार किंवा त्याच्याहि उत्तरेस म्हणजे मध्य व उत्तर आशियांत घडल्याचें मानतात. आपल्या देवताविज्ञानाप्रमाणें सारे विश्वाचे नियंते असे ऋषि, देवता व नित्य पितर हे भूलोकींचेच प्राचीन काळीं विद्यमान असलेले मानव असें ते मानतात. तसेंच मानवांच्या इतिहासाप्रमाणेंच केवळ देवासुरांतच नव्हे तर प्रजापति, रुद्र, वरुण, इंद्र इत्यादि देवतांतहि सत्ताभिलाषासाठीं रणें व चुरस माजलेली कित्येक मानतात. या ऐहिक व भौतिक दृष्टीनें पाहणारे कोणी आधुनिक शिव हा भूतानच्या वनमानवांच्या टोळीचा नायक किंवा भूतनाथ, गणपति हा हिमग्यांतील सोंगाप्रमाणें हत्तीची सोंड तोंडावर लावून हिमालय पर्वतावर नाचणाऱ्या जंगली लोकांच्या गणांचा विनायक अशा कल्पना ते करतात! कोणी

कापलेल्या भाताचा भारा डोकीवर घेऊन जाणारा शेतकरी, हें गणपतीच्या स्वरूपाचें मूळ असल्याचें सांगतात! कोणी घरांतील देवतामूर्ति अडगळ म्हणून टाकून दिल्या! कोणी सोन्या-चांदीच्या मूर्ति आटवल्या!! वस्तुतः दिव्य अशा देवताविज्ञानाची विटंबना अधिक काय शक्य आहे!

शिव, रुद्र, शक्ति यांच्यासंबधीं विशेषेंकरून महाराष्ट्रीय आधुनिक विद्वानांचें लिखाण असेंच त्या त्या देवतांबद्दल प्रेमादराच्याऐवजीं तिरस्कार उत्पन्न करणारें असतें. याचें कारण रहस्यज्ञानशून्य व आस्थाहीन अशा पाश्चात्य प्राच्यविद्यासंशोधकाचें अंधानुकरण करून, जो विषय भौतिक किंवा ऐतिहासिक दृष्टीनें पाहावयाचाच नाहीं, तो त्या दृष्टीनें पाहणें हेंच होय. काळ्या चष्म्यानें पांढरा रुपया काळा दिसला, तर त्यांत नवल काय!

आधुनिकांना वेद अपौरुषेय आहेत व ते स्वतःप्रमाण आहेत असें वाटणें कधींच शक्य नसतें. वेदांचें ज्ञानवैभव त्यांनीं साधनानुष्ठानांनीं पटवून घेतलेलें नसतें. वेदाबद्दल देववाणी म्हणून त्यांना नितांत आदर असतो, असें मुळींच नसतें. पण पूर्वग्रहाप्रमाणें शिवपंचायतनाला निंद्य व अनार्य ठरवीत असतां अवैदिक हा अपशब्द निंदाव्यंजक म्हणून ते वापरतात, इतकेंच! ही मी आधुनिकांची व्यर्थ टीका करतों आहें, असें नव्हे. आपल्या देवता-विज्ञानावर अविश्वास हें सुशिक्षितांचें यथार्थ वर्णन आहे, असें तेहि प्रांजलपणें मान्य करतील. चुकून भांग प्यालेला मनुष्य भंगट होणें हें जसें अपरिहार्य आहे, त्याचप्रमाणें परिस्थितिप्राप्त भौतिक जडवादात्मक शिक्षणाच्या संस्कारांनीं मन पुरें अगर अर्धनास्तिक बनणें स्वाभाविकच आहे. काहीं असो.

अशा स्थूल, बहिर्मुख व अश्रद्ध दृष्टीच्या आधुनिकांना शिवरुद्र व त्यांचा परिवार या वेदानें तिरस्कृत केलेल्या निंद्य व्यक्ति वाटतात, तर उलट आध्यात्मिक आणि आधिदैविक दृष्टींनीं, सांप्रदायिक परंपरेचा अवलंब करून पाहणाऱ्यांस सारेंचें सारें वैदिक वाङ्मय जगत्कारणाधीश्वर जो शिव व त्याचा परिवार यांच्याच स्तवनानें भरलेलें दिसतें! त्यांच्या मतें इंद्र, अग्नि, वरुण, सविता वगैरे मुख्य वैदिक गणलेल्या देवता हीं सारीं शिवाचींच स्वरूपें होत. इडा, सरस्वती, भारती, अथवा विश्वाची उभारणी व संहारणी करणारी महाकुंडलिनी हीं सारीं त्रैलोक्यव्यापी शिवशक्तीचींच रूपें होत. अखिल ब्रह्मांडांतील क्रियात्मक प्राणशक्ति हें रुद्राचेंच स्वरूप होय. अखिल विश्वाचें

बुद्धिदाते जगद्‌गुरु तेच, विद्याधिपति गणपति व ब्रह्मवेत्ते सनत्कुमार स्कंद होत. उमा हीच ब्रह्मविद्या होय. नंदी म्हणजे परमात्म्याचा विश्वप्रेमरूप समाधिमात्र होय. अष्टमूर्ति रुद्र म्हणजे अखिल ब्रह्मांडाला व्यापून उरणारें असें परमात्मरूप जाणावें. असें हें थोडक्यांत पुष्कळ असें शिवपंचायतनाचें आध्यात्मिक व आधिदैविक दर्शन होय. म्हणूनच आध्यात्मिक अनुभवसंपन्न असे श्रीभुवनेश्वरी मातेच्या ठिकाणीं जन्मास आलेले साक्षात् काशीच्या श्रीवीरेश्वराचे अंशभूत अथवा नरनारायणांपैकीं नराचेच अंशधारी असे स्वामी विवेकानंद भारतीयांस बजावून सांगतात कीं,

" Oh India! forget not that the God Thou worshippest is the great Ascetic of ascetics the all renouncing Shankara (Vedant Kesari). (म्हणजे हे भारता! तूं हें विसरूं नकोस कीं, तुझें उपास्य वैराग्यमूर्ति शिव होय.)

तसेंच ते स्पष्ट सांगतात कीं,

Siva is the God of the Mahabharat and not Sri Krishna, (Spiritual Talks, p. 151). म्हणजे व्यासोच्छिष्टं जगत् सर्वम् असें जें आपलें महाभारत त्या महाभारताची देवता शिव होय. श्रीकृष्ण नव्हे. स्वामींचें शिवस्तुतिकाव्य प्रसिद्धच आहे. मी या प्रकरणांत फक्त शिवापुरताच प्राथमिक विचार करणार आहें. शिवरुद्र-भेदाभेद व पूर्वपक्षाचे वरील अन्य आक्षेप यांचा विचार पुढें प्रकरणशः करीन.

वस्तुतः शिव जगत्कारणाधीश्वर आहे. हें या ग्रंथांत अथपासून इतिपर्यंत सिद्ध केलें आहे. व या प्रकरणांतहि पुढें दाखविलेंच आहे. तो विश्वातीत, विश्वात्मक, व विश्वचर आहे. तो पदार्थमात्राचा अंतर्यामी आहे. वेद हे त्या परमेशाचे निश्वसित होत. "एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति," असा जो एकच एक परमात्मा तोच परमशिव होय. पुरुषसूक्तांतील पुरुष तो तोच. नासदीय सूक्तांतील जें आद्यतम त्या तमाचा नियंता शिवावाचून अन्य कोणी नाहीं. सारे आगम आणि निगम हा शिवशक्तींचा बुद्धिविलास आहे. याप्रमाणें मूलग्राही व व्यापक अशा आध्यात्मिक किंवा आधिदैविक दृष्टींनीं विचार करतां

१ श्वे. उप. ४।१०, १५; ३।११; ११० इत्यादि.

" शिव हें विशेषनाम वैदिक वाङ्मयांत आहे किंवा नाहीं," या मुद्यावरून शिव अवैदिक आणि अनार्य आहे, या क्षुद्र तर्ककुतर्कांत काहींच स्वारस्य उरत नाहीं.

तसेंच पौराणिक शिव वेगळा, वैदिक रुद्र वेगळा या म्हणण्यांतहि अर्थ नाहीं. कारण वैदिक वाङ्मयांतच शिव आणि रुद्र हीं नांवें एकाच पुरुषाला उद्देशून अनेक ठिकाणीं आलेलीं आढळतात. आजहि आपण शिवलिंगावर अभिषेक रुद्राध्यायानें करतों. 'रुद्रांमध्यें शंकर तो मी,' असें भगवान् विभूति-योगांत ( १०।२३ ) सांगतात. यजुर्वेद अ. १६, अथर्ववेद का. ११।२, ९।७, श्वेताश्वतर सारेंच, कैवल्योपनिषद्, महानारायण उपनिषद्, रुद्राक्षजाबाल उपनिषद्, तैत्तिरीय आरण्यक-अनुवाक् १८, मांडूक्य उप. रुद्रहृदयोपनिषद्, बृ. जाबाल्युपनिषद्, अथर्वशिरोपनिषद् इत्यादि वैदिक वाङ्मयांतून शिव, रुद्र, महादेव, महेश्वर, पशुपति हीं नामें आलीं आहेत.

त्याशिवाय आणखी पुरावा पाहिजे असेल तर ऋग्वेदाच्या परिशिष्टाचा देतां येईल. ऋग्वेदाच्या खिल सूक्ताच्या परिशिष्टांत श्रीसूक्तानंतर पुढील ११ व्या सूक्ताचे चार श्लोक आहेत. " विश्वेश्वर विरूपाक्ष विश्वरूप सदाशिव शरणं भवभूतेश करुणाकर शङ्कर ॥ १ ॥ हर शंभो महादेव विश्वेशामर वल्लभ। शिवशंकर सर्वात्मन् नीलकंठ नमोऽस्तुते ॥२॥ मृत्युंजयाय रुद्राय नीलकंठाय शंभवे । अमृतेशाय शर्वाय महादेवाय ते नमः ॥ ३ ॥ एतानि शिवनामानि यः पठेन्नियतः सकृत् । नास्ति मृत्युभयं तस्य पापरोगादि किंचन ॥ ४ ॥ ++ दशसप्त च नामानि मण्डलान्तेषु यः पठेत् । स शिवस्य पदं गत्वा शिवलोके महीयते ॥ २ ॥ एतानि शिवनामानि मण्डलान्ते सकृत्पठेत् । " हे ऋग्वेदाच्या खिलसूक्तांतील श्लोक असले, तरी ते ऋग्वेदाप्रमाणेंच प्राचीन आहेत. हे श्लोक प्रत्येक मंडलाच्या अखेर म्हणण्याची प्रथा आहे.

स्कंदपुराणांत केदार खंड अ. १ यात म्हटलें आहे कीं, " अष्टादशपुराणेषु दशभिर्गीयते शिवः । चतुर्भिर्भगवान् ब्रह्मा द्वाभ्यां देवी तथा हरिः ॥ " पुढें शिवरहस्य खण्डातर्गत संभवकाण्डांत म्हटलें आहे कीं, " तत्र शैवानि शैवं च भविष्यं च द्विजोत्तमाः । मार्कण्डेयं तथा लैङ्गं वाराहं स्कान्दमेव च । मात्स्यमन्य-त्तथा कौर्मं वामनं च मुनीश्वराः । ब्रह्माण्डं च दशेमानि त्रीणि लक्षानि संख्यया॥ ग्रन्थानां महिमा सर्वैः शिवस्यैव प्रकाश्यते ॥ असाधारणया मूर्त्या नाम्ना साधारणो न च । वदन्ति शिवमेतानि शिवस्तेषु प्रकाश्यते ॥ " २।३०–३३.

याप्रमाणें शिव, भविष्य, मार्कंडेय, लिंग, वाराह, स्कन्द, मत्स्य, कूर्म, वामन आणि ब्रह्माण्ड हीं दहा महापुराणें तर शैवच आहेत. त्याशिवाय विष्णु, भागवत, नारद, आणि गरुड हीं चार वैष्णव पुराणें असलीं, तरी ( चत्वारि वैष्णवानीश विष्णोः साम्यपराणि वै ॥ ) त्यांत हरिहरांची साम्यताच वर्णिली आहे. "नमो हिरण्यगर्भाय हरये शंकराय च। वासुदेवाय ताराय सर्गस्थित्यंत कारिणे॥ विष्णु पु. १।२।२" हें साक्षात् विष्णुपुराणांतील वचन आहे. ब्रह्मपुराणांत ब्रह्माविष्णुमहेश या तिघांचा महिमा सांगितला आहे. सूर्य भगवान् हा ब्रह्माविष्णुशिवात्मक मानला आहे. पद्मपुराण हें वैष्णवपुराण असून त्यांतच शिवगीता आहे.

याशिवाय महाभारत आणि रामायण या इतिहासग्रंथांतहि शिवशक्ति ही अत्यंत गूढ, सामर्थ्यसंपन्न व श्रेष्ठ उपास्यें असल्याचेंच ठिकठिकाणीं वर्णिलें आहे. हरिवंशांत हरिहर सारखेच मानले आहेत. रामायणांतील राम-रावण दोघेहि कट्टे शिवोपासकच होते. मारुति हे तर साक्षात् महारुद्र हनुमानच होत. महाभारतांतील नर-नारायण अथवा कृष्णार्जुन हे दोघेहि शिवोपासक होते. महाभारताच्या अनुशासनपर्व अ. १४ ते १७, द्रोणपर्व अ. ८०।२०२, सौप्तिकपर्व अ. १७।१८ या अध्यायांतून शिवमहिमा व शिवसहस्रनाम सांगितलें आहे. "उपद्रष्टानुमन्ता च भर्ता भोक्ता महेश्वरः। परमात्मेति चाप्युक्तो देहेऽस्मिन्पुरुषः परः॥" गीता १३।२२. ही महेश्वराची स्तुति असून "रुद्रश्च परमो विष्णुः विष्णुश्च परमः शिवः॥ एक एव द्विधा भूतो लोके चराति नित्यशः॥ न विना शंकरं विष्णुः न विना केशवं शिवः। तस्मात् एकत्वमायातो रुद्रोपेन्द्रौ तु तौ पुरा ॥ + + नमस्ते भगवन् विष्णो नमस्ते भगवन् शिव ॥" अशी हरिहरांची ऐक्यात्मक स्तुति व्यास, नारद, भारद्वाज, गर्ग, विश्वामित्र, अगस्त्य, पुलस्त्य, धौम्य यांनीं केलेली हरिवंशांत आहे. श्वेताश्वतरांत "यो देवानामधिपो यस्मिँल्लोका अधिश्रिताः। य ईशे अस्य द्विपदश्चतुष्पदः कस्मै देवाय हविषा विधेम ॥ ४।१३ ॥ म्हणजे जो देवांचा अधिपति, ज्याच्यामध्यें हे लोक आश्रय करून राहिले आहेत, जो या द्विपाद व चतुष्पाद प्राण्यांवर सत्ता चालवितो, अशा कोणत्या देवाची आम्ही हवि देऊन पूजा करावी? याप्रमाणें प्रश्न उपस्थित करून श्वेताश्वतर पुढें सांगतें, "सूक्ष्मातिसूक्ष्मं कलिलस्य मध्ये।

विश्वस्य स्रष्टारमनेकरूपम्। विश्वस्यैकं परिवेष्टितारं ज्ञात्वा शिवं शांतिमत्यंतमेति ॥४।१४॥ घृतात्परं मंडमिवाति सूक्ष्मं ज्ञात्वा शिवं सर्वभूतेषु गूढम् ॥ विश्वस्यैकं परिवेष्टितारं ज्ञात्वा देवं मुच्यते सर्व पाशैः ॥४।१६॥ भावग्राह्यमनीडाख्यं भावाभावकरं शिवम्। कलासर्गकरं देवं ये विदुस्ते जहुस्तनुम् ॥ ५।१४ ॥ म्हणजे या जगज्जालांत सूक्ष्माहून अतिसूक्ष्म, विश्वाला उत्पन्न करणारा, अनेक रूपें असलेला, विश्वाला एकत्र व्यापणारा, अशा शिवाला जाणून मनुष्य पूर्णपणें शांति पावतो. घृताहून दुधांत अतिसूक्ष्मत्वानें असलेली अव्यक्त साय जशी चांगली, तद्वत् सर्वभूतांमध्यें गुप्तरूपानें असणाऱ्या व सर्व विश्वाला एकट्या वेष्टण करणाऱ्या शिवाला जाणलें असतां सर्व पाशांतून मुक्तता मिळते. या उपनिषदांत ज्या जगत्कारणब्रह्माला येथें शिव म्हटलें आहे, त्यालाच यांत अन्यत्र रुद्र, हर, ईश्वर, महेश्वर, असें म्हटलें आहे. सर्वव्यापी एक देव अर्थात् महादेव तोच. रुद्राच्याच तनूला शिव म्हणतात, असें याच उपनिषदांत म्हटलें आहे. शिव, महेश्वर यांस विशेषनामें न म्हणतां विशेषणें म्हणून कोणी म्हणतील, तर सारींच नामें धात्वर्थानें विशेषणें ठरतील.

याशिवाय अठ्ठावीस शिवागमादि शैव सांप्रदायिक वाङ्मय फारच मोठें असून त्यापैकीं कांहीं फार प्राचीन आहे. "अष्टादश पुराणानां कर्ता सत्यवतीसुतः। कामिकादि प्रभेदानां यथा देवो महेश्वरः॥" स्कंद सू. सं. "सृष्टिकाले महेशानः पुरुषार्थ प्रसिद्धये। विधत्ते विमलं ज्ञानं पञ्चस्रोतोपलक्षितम्॥" मृगेन्द्रागम. सृष्टि उत्पन्न झाली तेव्हां हे शिवागम शिवापासूनच प्रगट झाले, असें शैवागमावरूनच दिसूनच येतें. या आगमांच्या प्रामाण्यासंबंधानें आधुनिकांपैकींच एक सुज्ञ अभ्यासू न्यायमूर्ति वुड्रॉफ असें म्हणतात कीं, कित्येक देशी-विदेशी पंडित आगमांचें प्रामाण्य त्यांच्या कालावर अवलंबून ठेवितात, तें योग्य नव्हे. ते आगम अनुभवसिद्ध आहेत, हाच त्यांच्या प्रामाण्याचा महत्त्वाचा पुरावा होय. आगमोक्त अनुष्ठानांनीं ज्या शिवतत्त्वाचा अनुभव सहस्रावधि शिवभक्तांनीं घेतला, तें अपरोक्ष शिवस्वरूप दिक्कालातीत आहे, असेंच त्यांनीं जाणलें हीच गोष्ट महत्त्वाची आहे. त्या तत्त्वाचेंच शिवलिंग हें उपासनेकरतां आलंबन अथवा प्रतीक आहे.

आतां शिवासंबंधीं अनार्य आणि अवैदिक हे आक्षेप ज्या अर्थानें आधुनिक घेतात तो अर्थ निराधार आहे. आर्य व अनार्य यांच्या स्पष्ट व्याख्या मला

कोठें आढळल्या नाहींत. तसेंच मोहनजोदाडो येथें सापडलेली शिवलिंगें वेद-पूर्वकालीन आहेत असें म्हणण्यास मार्शलसाहेबाच्या कल्पनेपलीकडे कांहींच आधार नाहीं. अर्थात् तीं शिवलिंगें अनार्य, अवैदिक म्हणून शिवलिंगोपासना अनार्य, अवैदिक हा युक्तिवाद इतर भरपूर पुरावा पाहता विवेकशून्य ठरतो. वस्तुतः 'शिवोऽहम्' या आध्यात्मिक दृष्टीनें किंवा शिव हाच जगाचा पिता या आधिदैविक दृष्टीनें विचार करतां ऐतिहासिक दृष्टीच्या शिव अनार्य व अवैदिक या आक्षेपांच्या क्षेत्रात शिव येतच नाहीं. शिवलिंगोपासना ही आध्यात्मिक किंवा आधिदैविक दृष्टीची आहे. म्हणून शिवलिंगोपासकास स्थूल, ऐहिक व अदूरदृष्टीच्या ऐतिहासिकाच्या विकल्पाचा विचार करण्याचें कांहींच कारण नाहीं. अध्यात्म आणि अधिदेव जगत् हें आर्य आणि वैदिक या परिच्छिन्नभावाहून फार सूक्ष्म, अतीत, व्यापक व श्रेष्ठ आहे.

शिवाय माझ्या वाचनांत अति प्राचीन संस्कृतींचें जें वर्णन आलें आहे, त्यावरून अनार्य किंवा अवैदिक संस्कृति म्हणजे निंद्यच असली पाहिजे, असें मुळींच म्हणता येत नाहीं. आपल्याकडील द्राविड संस्कृति तसेंच या देशाच्या बाहेरच्या इराणी, चीन, इजिप्शियन, बाबिलोनियन, खाल्डियन, ग्रीक, मेक्सिकन, साउथ अमेरिकन, मय, ऐस्टिक, इकाजाति इत्यादि किती तरी अति प्राचीन संस्कृति अनार्य व अवैदिक असूनहि फार श्रेष्ठ दर्जाच्या होऊन

१ ++ It is impossible in the absence of definite criteria about what is Aryan and what is non-Aryan, to assert that these worshippers (of Shivalingas) were not Aryan themselves.

Marshall's conclusions regarding Saivism in pre-Aryan India are therefore open to doubt on two grounds: (1) it is not so clear that the culture was pre-Vedic, that is pre-Aryan. Again, most of the data from which he draws his conclusions are, as he is himself aware, open to other interpretations which have nothing to do with Saivism. (Cultural Heritage of India, Vol. II, pp. 21-23).

गेल्याचें आढळतें. या बाबतींत पुष्कळ साधार लिहिण्यासारखें आहे, पण या ग्रंथाचा विषय अनार्य व अवैदिक लिंगोपासना हा नाहीं. शिवलिंगोपासना किंवा शिवशक्त्युपासना ह्या विषयाचा जो मी विचार करीत आहें, तो प्राधान्यानें सनातन वैदिक धर्माच्या दृष्टीनेंच करीत आहें. म्हणून अनार्य व अवैदिक या शब्दांवर मी अधिक चर्चा करीत नाहीं.

दुसरें असें कीं, सान्याच शिवलिंगोपासकांचा समाज अवैदिक व अनार्य आहे, अगर होता, असें कोणाचें म्हणणें असेल तर तें अत्यंत निराधार आहे. जगातील एकंदर लिंगोपासकांत कांहीं उघडच विधर्मी आहेत. कांहीं पंथ हिंदुधर्मांत येत असूनहि वैदिक वर्णाश्रमधर्म न पाळणारे आहेत. कांहीं चातुर्वर्ण्यांतून पतित झालेले आहेत. कांहीं स्त्री-शूद्रांना समान हक्क मानणारे आहेत. कांहीं वेदांपेक्षांहि आगमांना जास्त प्रामाण्य देणारे आहेत. असे लिंगोपासकांत अनेक पंथभेद असले, तरी त्या सर्वांच्या लिंगोपासनेस निंद्य व अशास्त्रीय म्हणतां येणार नाहीं. शिवाय वैदिक वर्णाश्रमधर्म मानणाऱ्या कोट्यवधि लोकांत शिवलिंगोपासकांची संख्याच अधिक भरेल. अर्थात् शिवलिंगोपासनेस अनार्य व अवैदिक मानण्याचें कांहींच कारण नाहीं. खरें पाहिलें असतां पूर्वी लिहिल्याप्रमाणें या आक्षेपकांना आर्य आणि वैदिक तें शिरसामान्य असतें असें मुळींच नाहीं. हे आक्षेपक बहुधा भक्तिभावनाशून्य असतात. पण 'Name the dog and kill it' अशा अर्थाची एक इंग्रजी म्हण आहे. त्या अर्थानेंच अनार्य व अवैदिक हे आक्षेपकांचे आक्षेप निंदे-करतां निंदा या अर्थानें निमित्तमात्र असेच बहुधा असतात. तथापि हे आक्षेप विचारपुरस्सर आहेत, असेंच मानून मी त्यांचा येथें विचार करणार आहें.

या दृष्टीनें विचार करतां एक गोष्ट लक्षांत घेतली पाहिजे कीं, प्रत्येक पुराणांतील जी मुख्य देवता असते तिला कारणब्रह्म मानून इतर देवतांस कार्यब्रह्म मानण्याची प्रथा आहे. पण तें केवळ उपासनेच्या सोयीसाठीं असतें. वास्तव वैष्णवपुराणांत विष्णूला अधिक महत्त्व, गणेशपुराणांत गणेशाला अधिक महत्त्व, देवी भागवतांत देवीला महत्त्व, दिलेलें असलें तरी त्यामुळें शिवाचें महत्त्व तत्त्वतः कमी होत नाहीं. ज्याप्रमाणें सभेंतील तात्पुरत्या अध्यक्षापेक्षां जास्त योग्यतेचीं माणसें सभेंत कोणी नसतात असें नाहीं. अथवा लग्नांत वडील माणसें वराला घोडाशीं बसवतात, त्यांत कांहीं

वृद्धांचा उपमर्द मानीत नाहींत. तरीच हें समजावें. सामान्यतः वर दाखविलेंच आहे कीं, सर्व पुराणेतिहासग्रंथांत शिवाचाच महिमा अनन्यसाधारण असा वर्णिलेला आढळतो. आतां भागवतांत (४।२) भृगु व दक्ष यांनी शिवाची निंदा केली आहे, त्याचा विचार करूं. कारण हे विद्वान् आक्षेपक शिवनिंदेसाठीं या दक्ष, भृगु यांच्या शिव-निंदेवर जास्त भर देत असतांना आढळतात. पण ज्या भागवतांत ती निंदा आली आहे, त्याच भागवतांत नंतर चवथ्या स्कंधांतील सहा व सात या अध्यायांत त्याच दक्षाख्यानाच्या अखेरीस साक्षात् दक्षा-सुद्धां सर्वांनीं केलेल्या शिवस्तुतीचा नुसता पाऊस पडला आहे. उदाहरणार्थ, ब्रह्मदेव म्हणतात: "हे शंकरा! तू सर्व विश्वाचा नियंता असून जगाचें उत्पत्तिस्थान जी प्रकृति आणि बीजरूप जो पुरुष त्या उभयतांचें कारण असें जें भेदरहित ब्रह्म तेंहि तूंच आहेस." पुढें दक्षप्रजापति म्हणतो: हे शंकरा! मला तत्त्वज्ञानाची प्राप्ति झालेली नाहीं. म्हणूनच मीं भरसभेत तुझ्यावर अपशब्दरूपी बाणाचे प्रहार केले आणि परमपूज्य अशा तुझी निंदा केली. त्यामुळें मला अधोगतीच मिळणें योग्य असता तूं माझ्या अपराधांकडे दुर्लक्ष करून प्रेमळ दृष्टीनें माझें रक्षण केलेंस; याचें उतराई होण्याचें सामर्थ्य माझ्या अंगीं नाहीं. तरी तूं या आपल्या स्वतःच्या कृतीनेंच संतुष्ट हो.

कोणा एका विद्वान् संशोधकांनीं काशी व काशीविश्वेश्वर यांस अनार्यांचीं स्थानें म्हणून शोध लावला आहे. या शोधाला अथर्ववेदांतून त्यांनीं एक पुरावा म्हणून वचन शोधून काढलें आहे तें असें: "गंधारिभ्यो मूजवद्भ्यो काशीभ्यो मगधेभ्यः। प्रैष्यन्जनमिव शेवधिं तक्मानं परि दद्मसि॥" ५।२२।१४ मीं अथर्ववेदाच्या दोन प्रति पाहिल्या. (पैकीं एक सातवळेकर प्रत) त्या दोन्ही प्रतींत वरील श्लोकांत नेमका 'काशीभ्यो' हाच शब्द नाहीं! आर्यांच्या संस्कृतीचें, विद्येचें व तत्त्वज्ञानाचें माहेरघर अशा भरत-खंडांतील काशी या अत्यंत सुप्रसिद्ध व पवित्र गणलेल्या प्राचीन क्षेत्राची ख्याति मीं अनेक ठिकाणीं वाचली आहे. पण "तें दीर्घकालपर्यंत अनार्य-धर्माचें आगर होतें," हें मला माहीत नाहीं. असें लांछनास्पद संशोधन

१ योऽसौ मया विदिततत्त्वदृशा सभाया क्षिप्तो दुरुक्ति विशिखैरगणय्य तन्माम्। अर्वाक्पतन्तमर्हत्तमनिन्दयापाद्दृष्ट्यार्द्रया स भगवान्स्वकृतेन तुष्येत् ॥ ४।७।१५ ॥ भागवत.

करणें या पूर्वग्रहग्रस्त संशोधकांस भाग पडावें हें पाहून फार खेद वाटतो. आतां त्यांचें दुसरें संशोधन असेंच विलक्षण आहे. तें असें कीं, शिवरुद्रास यज्ञांत हविर्भाग देत नसत, त्याची कारणें म्हणून दक्षाच्या तोंडचीं खालीलें वचनें त्यांनीं शोधून काढलीं आहेत. हीं वचनें वायुपुराण, अ. ८८ यांतील आहेत असें हे म्हणतात. या त्याच्या उतार्‍यांत तीस व एकतीस हे दोनच मघले श्लोक या संशोधकांनीं कां सोडले तें अजमावितां येत नाहीं. मजजवळील वायुपुराणाच्या आनंदाश्रम प्रतींत अ. ८८ यांत हीं कोणतींच वचनें आढळत नाहींत. शिवाय याहि वचनांत शिवाची निंदा न मानतां अत्याश्रमी शिवाची ही व्याजस्तुतिच कां मानूं नये, तें माझ्या अल्प मतीस कळत नाहीं. आतां ही व्याजस्तुति नसून निंदाच आहे, असें मानलें तरी ती अज्ञानजन्य आहे, यथार्थ नव्हे यास याच दक्षाख्यानांत भरपूर पुरावा आहे.

वरील विद्वान् संशोधकांनीं कोणत्याहि पुराणांतील कोणत्याहि अध्यायांतील वरील श्लोक आपल्याला इष्ट वाटणार्‍या शिवनिंदेच्या समर्थनार्थ घेतलेले असोत, पण ते म्हणतात त्या वायुपुराणांत (आनंदाश्रम प्रत) तिसाव्या अध्यायांत हें दक्षाख्यान सविस्तर वर्णिलें आहे. त्यांत दक्षानें केलेली शिवाची स्तुति थोडीथोडकी नसून त्याचे एकशें-सात श्लोक आहेत. शिवाय अति नम्रभावानें आठ सहस्र नामांनीं दक्षानें शिवस्तुति केल्याचें त्यांत म्हटलें आहे. (स्वरचित) या दक्षप्रोक्त शिवस्तोत्राचें इतकें महत्त्व आहे कीं, त्याच्या श्रवणपठणाची

---

१ अतीव गर्वितो जातः सति मे प्राप्य कन्यकाम् ।
कस्य चिन्नाप्यसौ प्रायो न कस्यापि क्वचित्पुनः ॥ २७ ॥
किं वेश्यस्त्वेष किं गोत्रः किं देशीय क्रियात्मकः ।
किं वृत्तिः किं समाचारः निषादो वृषवाहनः ॥ २८ ॥
न ब्राह्मणो भवत्येष यतो वेदं न वेत्यसौ ।
शस्त्रास्त्रधारणात्प्रायः क्षत्रियः स्यान्न सोप्यथ ॥ २९ ॥
क्षतात्संतारणात्क्षत्रं तत्क्वास्मिन्प्रलयप्रिये ।
वैश्योऽपि न भवेदेष सदा निर्धन चेष्टनः ॥ ३२ ॥
शूद्रोऽपि न भवेत्प्रायो नागयज्ञोपवीतवान् ।
एवं वर्णाश्रमातीतः कोऽसौ सम्यङ् न कीर्त्यते ॥ ३२ ॥

—वायुपुराण, अ. ८८ (?)

नुसती फलश्रुति सागण्यात वायुपुराणातील (अ० ३०) ३०७ ते ३२१ इतके श्लोक लिहिले आहेत हें शिवनिंदेचें सपूर्णतया परिमार्जन करणारें स्तोत्र स्थलाभावास्तव येथें समग्र देता येत नाहीं याबद्दल खेद वाटतो पण त्यातील काहीं श्लोकांत पुढीलप्रमाणें दक्षानें आपल्या पूर्वापराधाचें परिमाजन केलें आहे. दक्ष म्हणतो . "हे देवाधिदेवा! देवाच्या शत्रूच्या सैन्याचा नि पात करणाऱ्या व दवदानवानादेखील पूजनीय असलेल्या शंकरा, तुला नमस्कार असो (१८१) गाइ त्याप्रमाणें गोव्हात सुरक्षितपणें राहतात, त्याप्रमाणें सर्व देवता तुझ्या शरिरात (सरक्षणार्थ) राहिल्या आहेत (१८६) तू ऋग्वेद, यजुर्वेद, साम व अथर्ववेदस्वरूप आहेस, असें ब्रह्मविद् म्हणतात व तसेंच सर्व उपनिषदानीं देखील तेंच प्रतिपादिलें आहे (२३१) हे शंकरा! विष्णु, पुराणें व ऋषिसुद्धा तुझें यथार्थ माहात्म्य जाणू शक्त नाहींत (२६९) तूच सर्वस्वरूप असून सर्वव्यापी आणि सर्व भूताधिपति आहेस तसेंच सर्व भूतांचें आतरिक तत्त्व तूच असल्यामुळे तुला (यज्ञामध्यें) निमत्रण केलं नाहीं (२८३) निरनिराळ्या प्रकारच्या दक्षिणा असलेल्या यज्ञात तुझ्याप्रीत्यर्थच आहुति दिल्या जातात तूच सर्व गोष्टींचा कर्ता असल्यामुळें तुला निमत्रिलें नाहीं (२८४) तेव्हा हे देवा! मी तुला शरण आलों आहे तूच माझें आश्रयस्थान आहेस मला अन्यत्र कोठेंहि गति नाहीं तेव्हा तू मजवर प्रसन्न हो (२८७)

---

१ जानुभ्यामवनिं गत्वा दक्षो लब्ध्वा भवाद्वरम्। नाम्नामष्टसहस्रेण स्तुतवान्वृषभध्वजम ॥ १८० ॥ नमस्ते देवदेवेश देवारिबलसूदन। देवेन्द्र ह्यमरश्रेष्ठ देवदानवपूजित ॥ १८१ ॥ सर्वा ह्यस्मिन्देवतास्ते गावो गोष्ठ इवाऽऽसते। शरीर ते प्रपद्यामि सोममग्निं जलेश्वरम् ॥ १८६ ॥ यजुर्मयो ऋङ्मयश्च सामाथर्वमयस्तथा। पठ्यसे ब्रह्मविद्भिस्त्व कल्पोपनिषदा गणै ॥ २३१ ॥ न ब्रह्मा न च गोविंद पुराण ऋषयो न च। माहात्म्य वेदितु शक्ता याथातथ्येन ते शिव ॥ २६९ ॥ सर्वस्त्व सर्वगो देव सर्वभूतपतिर्भवान्। सर्वभूतान्तरात्मा च तेन त्व न निमन्त्रित ॥ २८३ ॥ त्वमेव चेज्यसे यस्माद्यज्ञैर्विविधदक्षिणै। त्वमेव कर्ता सर्वस्य तेन त्व न निमन्त्रित ॥ २८४ ॥ स्तुत्वैव स महादेव विरराम प्रजापति। भगवानपि सुप्रीत पुनर्दक्षमभाषत ॥ २८७ ॥

—वायुपुराण, अ ३०

शिवाला अनार्य व अवैदिक ठरवूं पाहणाऱ्या पूर्वग्रहदूषित आधुनिक संशोधकांना दक्षनिंदा हा एक मुख्य आधार वाटतो. तो या विस्तृत स्तोत्रानें पूर्णपणें नामशेष होतो. एवढें मोठें महत्त्वाचें स्तोत्र या बहुश्रुत संशोधकांना दिसलें नाहीं, यास काय म्हणावें, तें सुज्ञ वाचकांनीच ठरवावें!

पण त्यांनीं आपली स्वधर्मभक्तिभावनाहीन, रूक्ष, तर्ककर्कश, पूर्वकलुषित आणि उपव्यापी बुद्धि असल्या पवित्र व जिव्हाळ्याच्या विषयात घातली नसती, तर फार बरें होतें, असें म्हटल्यावाचून राहवत नाहीं. कारण, असे हे अनेक आधुनिक विद्वान् संशोधक जनतेचा व्यर्थ फार बुद्धिभेद करीत आले आहेत. हें पाहून दुःख वाटतें. या विलक्षण संशोधनांतील सारेच मुद्दे येथें देत बसणें म्हणजे चिखलांत हात घालून तो धूत बसण्यासारखें होईल. तसें करण्यांत स्वारस्य तें काय? आतां यज्ञांतील हविर्भाग शिवरुद्राला मिळत नसे, असें हें आधुनिक संशोधक दक्षकथेवरून गृहीत धरतात. तेंहि चुकीचें वाटतें. यज्ञयागांतील ज्यास स्विष्टकृत म्हणतात, तो रुद्रभागच होय. वस्तुतः यज्ञांतील मुख्य देवताच शिवरुद्र असतां त्या रुद्रदेवतेला हविर्भाग दिला नाहीं, हाच दक्षाचा महान् अपराध होय. हें दक्षानेंच मान्य केलें आहे. हेंच त्या कथेंतील सार आहे. स्विष्टकृत आहुति रुद्रभाग म्हणून त्रेतायुगांत देत होते, असें कल्पसूत्रावरून दिसतें. स्विष्टकृत म्हणजे ज्याच्या योगानें यज्ञाची सांगता पुरी होते, ज्यावांचून ती पुरी होत नाहीं, तो भाग जाणावा. वैदिक विज्ञानाप्रमाणें शिवरुद्र तोच अग्नि होय. त्याची स्विष्टकृत ही निंदागर्भित संज्ञा नाहीं. शिवरुद्र हाच मुख्य यज्ञदेव होय. त्यासच महोदेवं असें वैदिक वाङ्मयांत म्हटलें आहे. तोच महादेव समजावा.

या दक्षयज्ञांत हजर असलेल्या दधिचि ऋषींनीं अगोदरच स्पष्ट बजावलें होतें कीं, (सर्वेषामेकमन्त्रोऽय येनेशो न निमंत्रितः। यथाऽहं शंकरादूर्ध्वं नान्यत्पश्यामि दैवतम्॥ तथा दक्षस्य विपुलो यज्ञोऽयं न भविष्यति॥ १०६॥ वायुपुराण, अ० ३०.) तुम्हीं महेश्वराला निमंत्रण केलें नाहीं हें ठीक नव्हे. त्यापरतें दुसरें श्रेष्ठ दैवत नाहीं. त्याला न बोलाविता चालविलेला हा तुमचा यज्ञ शेवटास जाणार नाहीं. हें अनिष्ट भवितव्य जाणूनच ब्रह्मदेव

१ ऋग्वेद ४।५८।३

व नारायण या यज्ञाला गेले नाहींत (भाग० ४।६।३). पुढें वरील भविष्याप्रमाणें यज्ञ विफल झाला. तेव्हां ब्रह्मदेव शंकराला म्हणतात कीं, "यज्ञांत तुला हविर्भाग मिळणें सर्वथैव उचित आहे. यज्ञ तडीस नेऊन त्याचें फल देणारा तूंच आहेस. परंतु अज्ञानी याज्ञिकांनीं तुला तो हविर्भाग दिला नाहीं, व त्यामुळें तो यज्ञ समाप्त होण्यापूर्वींच उद्ध्वस्त झाला" (भागवत ४।६।५०). तसेंच याच प्रसंगीं ब्रह्मदेव ऋषिमुनींना अगोदरच म्हणतात कीं, "तो शंकर स्वतंत्र असून त्याचें खरें स्वरूप, बल आणि पराक्रम हीं मलाहि अद्यापि कळलेलीं नाहींत. तशींच तीं इंद्राला, तुम्हांला किंवा दुसरे जे देहधारी पुरुष आहेत त्याना व ऋषींना सुद्धां समजलेलीं नाहींत. तेव्हां अशा त्या महादेवाची क्षमा मागून त्याचें सांत्वन करणें हा एकच उपाय आहे (भाग० ४।६।७).

शिवद्वेष्टा म्हणून प्रसिद्ध असलेल्या भृगूनें केलेल्या शिवनिंदेबद्दल त्याला शिवगणांनीं योग्य तें प्रायश्चित्त रोखठोक दिलेंच. असें हें महत्त्वपूर्ण दक्षाख्यानाचें खरें रहस्य जाणून आधुनिकांनीं शिवनिंदा करण्याचें साहस न करणें यांतच शहाणपण दिसतें.

शिवशक्ति ही प्राचीन रानटी अनार्यांचीं दैवतें असें आधुनिकांनीं मानण्याचें आणखी एक कारण असें दिसतें कीं, या दैवतांना क्वचित् नरबलि देण्याची चाल पूर्वीं होती. आजहि शिवशक्तीला रेडे व बोकड बळि देण्याची चाल कोठें कोठें असेलच. पण या कारणास्तव या दैवतांचें "रानटी अनार्यांचीं दैवतें" असें लक्षण बांधणें हा शुद्ध अविचार आहे. 'जीवो जीवस्य जीवनम्' हें जागतिक व्यवहाराचें स्वरूप आहे. मांसाहारी प्राणी व माणसें प्रतिक्षणीं किती जीवांचे बळि देत असतील याची गणतिहि करतां येणार नाहीं. मांसाहारी उपासकांनीं आपल्या शिवशक्त्युपासनेंत पशुबलि देणें स्वाभाविक आहे. शिवाय, वैदिक यज्ञयागांत काय बलि देत नव्हते

१ भृगूनें हें दक्षाख्यान, दारुवनाख्यान व पद्मपुराण यांत शिवनिंदा केल्याचें आढळतें. याचें कारण वारुणसंक्रांति व इंद्रसंक्रांति असे प्राचीन पंथभेद हें असेल; किंवा विश्वामित्र, जमदग्नि, दुर्वास, भृगु अशा तामसी ऋषींच्या वर्तनांचा आणि वचनांचा अर्थ लावतांना त्याचे प्रकृतिविशेष ध्यानीं घेऊन अर्थ लावावा लागेल.

कीं काय ? आदर्श शिवभक्त कण्णप हा आपल्या देवतेला नैवेद्य म्हणून निरनिराळ्या प्राण्यांना मारून त्यांचें स्वादिष्ट मांस आणीत असे. त्याचें शिवानंदलहरींत आचार्यांनीं कौतुक केलें आहे. तेव्हां कोणा कण्णपाच्या दादाला सर्वोत्कृष्ट गणलेल्या नरदेहाचें मांस आपल्या देवतेला द्यावें, असें वाटलें असल्यास त्यांतहि कांहीं नवल नाहीं.

शिवशक्ति या देवतांचे देव, मानव, दानव वगैरे सर्व कोटींत भक्त होते. त्रिविध श्रद्धेप्रमाणें भक्तहि त्रिविध किंवा अनेकविध संभवतात. त्यांच्या श्रद्धेनुसार त्यांचा उपासनाप्रकार श्रेष्ठ–कनिष्ठ असा विविध असावा, हें ओघासच येतें. उपासनेंत निष्काम अथवा मोक्षकाम व सकाम अथवा ऐहिक विषयकाम असे दोन ठळक भेद आहेत. त्यांतहि सकामांत सात्त्विक, राजसिक व तामसी असे प्रकार असतातच. आपलें अगर अन्य कोणाचें ऐहिक कल्याण व्हावें म्हणून जशी सकाम उपासना संभवते, त्याप्रमाणें दुसऱ्याच्या नाशाकरतांहि सकाम अभिचारकर्म संभवतें. या अभिचारकर्माचे प्रयोगहि अघोरी असतील. येथें एक मुद्दा लक्षांत ठेवला पाहिजे तो हा कीं, नियति लौकिक नीतिनियम पाळीत नाहीं. अग्नीचे गोळे (bombs) कच्च्याबच्च्या पोरांसह घरेंचीं घरें जाळतील. त्यांना दया-माया नाहीं. गेल्या जागतिक युद्धांत अणुबॉम्बनें जपानचीं दोन सबंध गांवें आंतील लक्षावधि प्राण्यांसह नाहींशीं केलीं ! अणुशक्तीला ही क्षिति नाहीं. साऱ्या मद्यपि जगाला मोह घालणारा उत्तेजक मद्यार्क असंख्य सूक्ष्म जीवाणूंच्या नाशांतून तयार व्हावा, हा निसर्ग आहे. समुद्रमंथनांतून अमृत आणि हालाहल विष दोन्ही निघालीं.

सजीव प्राण्यांचा वध करणें, हिंसा करणें, दुसऱ्याच्या नाशार्थ अभिचारकर्म करणें, हें आपण अनार्य म्हणजे निंद्य कर्म मानणें हें ठीकच आहे. पण त्यामुळें अग्निदेवता, अणुशक्ति अथवा दुसऱ्या निसर्गशक्ति अथवा देवता या अवैदिक अथवा अनार्यांच्या आहेत, असें म्हणणें हें अगदींच अव्यवस्थित होईल. गायत्रिमंत्राचा विनियोग अभिचारकर्मांत होऊं शकतो. पण म्हणून गायत्रिमंत्र अवैदिक व सूर्यदेवता ही अनार्यांची असें कोणी म्हणत नाहींत. त्याचप्रमाणें रुद्राध्यायांतील कांहीं मंत्रांचा दुरुपयोग अभिचारकर्मांत करतां येतो, म्हणून रुद्राध्याय अवैदिक व रुद्रदेवता अनार्यांची

असेंहि म्हणता येणार नाहीं. मोक्ष हा जसा शास्त्राचा विषय आहे, तसाच कामहि शास्त्राचाच विषय आहे असें रसायन व पदार्थविज्ञान हीं श्रेष्ठ शास्त्रें अणुबाँबची दीक्षा देतात, त्याचप्रमाणें आपलीं कामनिक शास्त्रें अभिचार-कर्महि शिकवितात व परस्त्रीवशीकरणविद्याहि शिकवितात. अशा शास्त्रांतील कार्यकारणभाव नीति-अनीति या अवांतर विषयाचा विचार करीत नाहीं. यामुळें दोषी ईशनियतिरूप शास्त्र ठरत नाहीं त्याचा दुरुपयोग करणारा दोषी ठरतो पिढीजात चोरीचा व्यवसाय करणारे देवीचे उपासक असू शकतात. असें हें कर्मविपाकशास्त्र फार सूक्ष्म व गूढ आहे वस्तुत शिवपूजेंत बलिदान करावें किंवा मांसाचा नैवेद्य दाखवावा असा शास्त्राचा विधि नाहीं

बलिदान हा विषय मीं पुढें चर्चिलाच आहे काहीं अघोरी शिवशक्त्यु-पासक आपल्या देवतास नरबलिहि पूर्वी कोठें क्वचित् देत असतील पण त्यामुळें हीं दैवतें अनार्योंचीं असें म्हणता येत नाहीं. "नादत्ते कस्यचित्पाप न चैव सुकृत विभु ॥ गीता ५।१५ )" अशी ही ईशनियति आहे. पर्जन्यानें शेतें पिकतात व अति पर्जन्यानें गावें वाहून जातात, म्हणून पर्जन्यदेवता क्रूर अनार्योंची असें म्हणणें असमंजसपणाचें आहे आधुनिक भौतिक विज्ञानानें आगगाड्या, आगबोटी, विमानें, तारायत्रें, रेडिओ वगैरे अनेक लोकोपकारक शोध लावले व त्यानेंच हिंस्र पशूना लाजवणारी अशी अति घोर व दारुण हिंसा गेल्या दोन जागतिक युद्धांत घडवून आणण्यास मदत केली म्हणून भौतिक विज्ञान अनार्यांचें असें म्हणणें व्यर्थ आहे हें जे जाणतात, त्यानीं असख्य देव, ऋषि, मुनि यानीं सपूजित अशीं हीं आदिदैवतें अनार्यांनीहि पुजलीं म्हणून त्यास अनार्यांचीच ठरवावीं, हें अत्यंत बेजबाबदारपणाचें व अविचाराचें आहे

**बलिदान**:—आता या विषींतील शास्त्रोक्त तात्त्विक विचार काय आहे तें पाहू या. हें एक उपासनेंतील प्रधान अग आहे श्रेष्ठ उपासकानें आपलें सर्वस्व शिवार्पण करण्यास तयार असलें पाहिजे 'त्यागेनैके अमृतत्व मानुश' ॥२॥ असें कैवल्योपनिषदाचें वचन आहे (१) उपासकानें जीवभाव द्यावा व शिवभाव घ्यावा, असें परमार्थरहस्य आहे सर्व संतानीं हेंच सांगितलें आहे.

---

१ देहाच्या निरसनें पाविजे या ठाया। माझी ऐसी काया जव नव्हे

[टीप पुढील पानावर पहा.]

हें आत्मबलिदान पहिल्या प्रतीचें होय हें सर्वस्व बलिदान करण्याची उपासकाची जोंवर तयारी नसेल, तोंवर त्यानें (२) कामरूप बकरे, क्रोधरूपी मेंढे, मोहरूपी महिष इत्यादि षड्विकारांचें बलिदान केलें पाहिजे. हेंहि पुरें साधेपर्यंत (३) उपासकाला प्रिय असलेल्या मिठाई, कांदे, लसूण, मादक पदार्थ इत्यादि वस्तूंचें सङ्कल्पपूर्वक बलिदान केलें पाहिजे हें पण ज्यांना जमत नाहीं, त्यांनीं (४) मैथुन, मांसभक्षण, मद्यपान इत्यादि विषयांचें अनिर्बंध सेवन न करतां त्यांचें शास्त्रोक्त विधीनें तितक्या मर्यादेपुरतेंच सेवन करावें. यापुढील बलिदानाचा प्रकार सात्त्विक बलिदानाचा आहे. त्यांत कोहळा, ऊस, लिंबू, भाताचा पिंड, पिठाचा पशु अशा पशूंच्या प्रतिनिधींचें बलिदान सांगितलें आहे काहीं आसुरी प्रकृतीचे लोक व काहीं कामाचारी उपासक जीवहत्यारूप बलिदान करतात. पण बलिदानासंबधीं शास्त्ररहस्य वरील प्रकारचें आहे. इंद्रियासक्तीच्या त्यागाच्या ठिकाणीं पशुबलीची कल्पना केली आहे ती लाक्षणिक आहे

शिवशक्ति हीं जगत्कारणस्वरूप महान् आदिदैवतें असल्यामुळें (सूर्याप्रमाणें) त्यांची सर्वांनीं उपासना केली. तीं जशीं जगताचीं आद्य सद्रूप होतीं त्याचप्रमाणें तो भूतपति व पशुपति आपल्या कालीं, करालि शक्तीसह दैत्य, राक्षस, भिल्ल, व्याघ्र, कोळी सर्वांचाच उपास्य होता. यांत वावगें तें काय?

वैदिक चातुर्वर्ण्यांतून जे बाहेर पडले अशांच्या उद्धारासाठीं आगमशास्त्रें शिवानेंच निर्माण केलीं. निगम आणि आगम या सर्वांचा प्रेरक ईश्वरच

[टीप मागील पानावरून चालू]

तुका म्हणे मिळे जीवाचिये साटीं। नाहीं तरी गोष्टी बोलों नये।

तुका म्हणे बळी। जीव दिला पायां तळीं॥

देवाच्या सख्यत्वासाठीं। पडाव्या जिवलगासी तुटि॥

सर्व अर्पून शेवटीं। प्राण तोही वेंचावा॥

—श्रीसमर्थ रामदास.

१ सात्त्विको जीवहत्यां वै कदाचिदपि नाचरेत्। इक्षुदण्डञ्च कूष्माण्डं तथा वन्यफलादिकम्। क्षीरपिण्डैः शालिचूर्णैः पशुं कृत्वा चरेद्बलिम्। (महाकाल संहिता) कामक्रोधौ द्वौ पशू इमावेव मनसा बलिमर्पयेत्। कामक्रोधौ विघ्नकृतौ बलिं दत्वा जपं चरेत्। —महानिर्वाणतंत्र.

आहे. शैवपथात शंकराचार्यांचे अनुयायी शैव, बसवाचार्यांचे अनुयायी शैव, वीरशैव, काश्मीर शैवपंथाचे शैव, नाथसंप्रदायी शैव, तांत्रिक शैव, शाक्त शैव, माहेश्वर, रसेश्वर, कापालिक, लकुलीश, पाशुपत, काळामुखी शैव, असे अनेक पथ आहेत. या पथात कांहींनीं वैदिक कर्ममार्ग न अनुसरतां अन्य योग, भक्ति, असे साधनमार्ग अनुसरले असले, तरी त्यामुळें त्या सर्वांस अशास्त्रीय व निंद्य असेंच म्हणता येणार नाहीं. "साधनानामनेकता" हें हिंदुधर्मांचें वैशिष्टय लोकमान्यांनीं मानलें आहे. महाराष्ट्रीय संताचा वारकरी सप्रदाय सर्वसंग्राहक झाल्यामुळें निंद्य ठरत नाहीं. स्त्री-शूद्र पतितांचाहि उद्धार करूं पहाणारा व्यापक गीताधर्म व त्याचे उपदेष्टे भगवान् श्रीकृष्ण हे ज्याप्रमाणें निंद्य ठरत नाहींत, त्याचप्रमाणें वैदिक वर्णाश्रमधर्मांच्या आंतील व बाहेरील लोकांच्या उद्धाराकरिता प्रवृत्त झालेले शिवागम, त्यांतील शिवलिंगोपासनादि कर्म व उपास्य शिव निंद्य ठरत नाहीं.

आता शिवलिंगाचे पुजारी ब्राह्मण नसतात. ब्राह्मणेतर शूद्र असतात. शिवलिंगपूजेंतील तीर्थ, निर्माल्य, नैवेद्य ब्राह्मण घेत नाहींत. शैवाना अस्पृश्य मानतात. ते अनाचारी असतात. गौतमानें शापभ्रष्ट केलेल्या ब्राह्मणानीं शैवधर्म काढला. वगैरे किरकोळ आक्षेप कोणी कोणी घेतात. त्यासंबंधीं थोडक्यात खुलासा करतों.

देवपूजा हें चरितार्थाचें एक साधन मानणाऱ्या पुजाऱ्यास देवलक म्हणतात; याचें कारण एक तर पैसे घेऊन पूजा करणें हें तारतम्यानें गौणच ठरतें. दुसरें देवस्व, ब्रह्मस्व, शिवस्व कोणीं घेऊं नये अशी शास्त्रमर्यादा आहे. याचें कारण ब्राह्मण, देव, शिव हे एकापेक्षा एक श्रेष्ठ गणले आहेत. निकृष्ट गणले आहेत, असें ते नव्हे हें लक्षात घ्यावें.

*शिवलिंगाचे पुजारी शूद्र असतात असा काहीं नियम नाहीं.* शास्त्राचें काहीं तसें विधिविधान नाहीं. शिवलिंगपूजा चातुर्वर्ण्यापूर्वीची आहे. पण शिवपूजेचें प्रक्षालन ब्राह्मणानीं करू नये, अशी जेथें मागाहूनची प्रथा पडली आहे, तेथें त्यासाठीं लिंगाईत किंवा जंगम गुरव असतात. सर्वत्र असेंच असतें असेंहि नाहीं. जेथें असें असतें तेथें शिवतीर्थ ब्राह्मणधर्माभिमानी ब्राह्मण प्राशन करीत नाहींत. शिवतीर्थाचा नुसता नेत्रस्पर्श करतात.

१ शिवपुराण, विद्येश्वर संहिता २२।१८.

कोणी ब्राह्मण अपरिग्रही असतात. तसेंच कोणी दुसऱ्यासाठीं पैसे घेऊन एका दशिनी करीत नाहींत. शैवांना अस्पृश्य असें शास्त्रांनीं मानलेलें नाहीं. अशी रूढीहि कोठें दिसत नाहीं. जेथें पूर्वी शैव-वैष्णव विरोध जोरांत असे तेथें असें पूर्वी कधीं असणें शक्य आहे. पण त्यानें शिवलिंगोपासनेस बाध येत नाहीं. शिवभक्ति व शिवभक्त, शिवाची वेशभूषा व परिवार यांसबंधीं स्वतंत्र प्रकरणें या ग्रंथांत लिहिलीं आहेत. म्हणून येथें त्याची पुनरुक्ति करीत नाहीं.

गौतमानें शापभ्रष्ट केलेल्या ब्राह्मणांनीं शैवधर्म काढला ही वराहपुराणांतील गोष्ट सर्वतोपरी प्रमाण मानणें अशक्यच वाटतें. कारण अन्य प्रमाणें फार प्रबळ आहेत. शैव व शाक्त हे अत्याचारी व अनाचारी असतात, हें विधान निराधार, विवेकहीन व अतिशयोक्तीचें आहे. कोणत्याहि पंथांत सदाचारी व अनाचारी असे लोक असायचेच; पण कोणत्याहि पंथाची योग्यता त्यांतील श्रेष्ठ सदाचार व सदाचारी यांच्यावरूनच ठरवावयाची असते.

आतां शिवलिंगोपासना कांहीं अनार्यांनींहि आर्यांपासून घेऊन तिला पुढें विकृत स्वरूप व दुराचाराची जोड दिली असेल. ( सीक्रेट डॉक्ट्रिन्स २।७८; ४।३७, ४०; २।८० ) शिवाय शैवागमानुयायी आर्यांतहि चातुर्वर्ण्याच्या निष्ठेची अनास्था, तसेंच वैदिक कर्मकांडाची अथवा याज्ञिक कर्मांची अनास्था, दिसून आल्यामुळें ( महाराष्ट्रांतील संत व कर्मठ वैदिक ब्राह्मण, उदाहरणार्थ, श्रीसंतएकनाथमहाराज व त्यांचे कर्मठ चिरंजीव हरिपंडित यांच्यांत जी तेढ उत्पन्न झाली, तशी ) याज्ञिक कर्ममार्गी व शैव भक्तिमार्गी यांच्यांत तेढ उत्पन्न झाली असेल. यामुळें कट्टर वैदिकमार्गी, तसेंच वैष्णव, बौद्ध व जैन यांच्या कडव्या विरोधामुळें कोठें शैवधर्माची निंदा तर कोठें पुराणादि वाङ्मयांत प्रक्षिप्त भाग घालून मुद्दाम केलेला शैवतत्त्वविपर्यास असे प्रकार क्वचित् घडले असतील. त्यामुळें शिवलिंगोपासनेला बाधा येण्याचें कारण नाहीं. कारण शिवलिंगोपासना म्हटली कीं त्याबरोबर शाक्त, काळामुख, कापालिक, अथवा अनार्य यांचे निकृष्ट किंवा अशिष्ट आचार आलेच, असें मानण्याचें मुळींच कारण नाहीं. सनातन शुद्ध वैदिकधर्मांतहि शुद्धाचारांची शिवलिंगोपासना बहुतेक सर्व ठिकाणीं रूढ आहे. आणि शिवाय शैव, शाक्त, तांत्रिक यांचे जे बाहेरच्यांस सकृद्दर्शनीं दुराचार वाटतात, ते त्यांतील रहस्य समजून घेतल्यावर तसेच वाटणार नाहींत.

अद्ययावत् सुधारलेल्या म्हणून नावाजलेल्या आजच्या मोठमोठ्या राष्ट्रांत जीं नुकतींच लागोपाठ दोन रोमांचकारी व घनघोर अशीं जागतिक युद्धें झालीं, त्यांतील क्रौर्य आणि अत्याचार ह्यांनीं हिंस्र पशूनांहि शरमविलें व हानि आणि अनीति यांनीं अविचाराचा शीग गाठली! त्यांना सुधारलेले व सुसंस्कृत समाज मानणाऱ्या आधुनिकांना शैवांच्या आचाराची चिकित्सा करण्याचा काहींच अधिकार रहात नाहीं.

कोठें शैव वैष्णवद्वयांतील विरोधांत शिव व शैव यांची निंदा आढळली तरी ती अज्ञानजन्य मानून तिकडे दुर्लक्ष करावें. कारण वैष्णवांचीं दैवतें श्रीविष्णु व श्रीकृष्ण हे शिवाचे परमभक्त असल्याचें प्रसिद्ध आहे. विष्णुसहस्र-नामाच्या पहिल्या श्लोकांत शिवस्मरण व शिवसहस्रनामाच्या पहिल्या दोन तीन श्लोकांत विष्णुस्मरणाचाच भास होतो. महाभारताचा मुख्य नायक श्रीकृष्ण नसून श्रीशिव होय, असें स्वामी विवेकानंद म्हणत, हें मीं अन्यत्र सांगितलेंच आहे. श्री. अप्पय दीक्षित यांनीं आपल्या शिवार्कमणिदीपिकेंत शिवोपासनेचें श्रुतिप्रतिपादित्व सिद्ध केलें आहे.

शैवांच्या अनाचारांबद्दल व अस्पृश्यतेबद्दल आधुनिक काय वाटेल तें म्हणोत, पण ज्यांचें उपास्य विवेकवैराग्यमूर्ति शिव हें आहे ते अनाचारी अथवा भ्रष्टाचारी असणें बहुधा संभवत नाहीं. माझ्या या म्हणण्याच्या पुष्टीकरणार्थ ज्यांनीं या विषयाचें विशेष संशोधन केलें आहे, अशा पंडित गोपीनाथराव व प्रो. भूदेव मुकर्जी या दोघा सुप्रसिद्ध विद्वानांच्या ग्रंथांतील दोन अवतरणें देतों. याशिवाय या ग्रंथाच्या पहिल्या खंडांत जें शिवभक्तांचें वर्णन केलें आहे, त्यावरूनहि आधुनिकांनीं यासंबंधीं केलेली गैरसमजूत दूर होईल.

(I) For the past two thousand years at least, the Hindus, males and females, have been offering worship to this symbol of the Great Architect of the Universe, without the least adverting to or feeling conscious of the so called obscenity of this pure symbol of the fatherhood and motherhood of the supreme deity, to them it is a symbol and nothing more, there is nothing obscene in connection with its worship, the simplest

१ लिंगपुराण, पूर्वार्ध, अ. १०८. म. भा. अनुशासनपर्व, अ. १४-१५.
२ शिवार्कमणिदीपिका, २।२।२८, ३।२।२४, १।१।७ पहा.

and the purest materials, such as water from a well reserved for ceremonial purposes, flowers, incense and freshly cooked rice and cakes, are used in the worship of the Linga. If there be any the slightest lack of cleanliness and purity on the part of the officiating priest, it would be passed over unnoticed in a Vishnu temple ; but never in a Siva temple, where absolute purity and cleanliness are rigorously demanded from the pujari. Thus, whatever might have been the original setting and the import of the symbolism, at the present time they are forgotten and lost ; and the worship of Linga and the Yoni, is absolutely and thoroughly free from even the remotest association of any kind of immorality or indecency. ( E. H. Iconogrrphy Vol. II part I p. 74 ).

( II ) *It cannot be said that a predominance of* sexuality is a special feature to be noticed among the Indian votaries of Siva, who is never worshipped publicly without being represented by a phallic image. On the other hand, in the majority of cases, the real votaries of Siva are found to be characterised by a strict abstinance and sometimes by a total renunciation of earthly pleasures. These are facts the truth of which has been *testified to even by the contributor of the article* "Phallism" in Encyclopaedia of Ethics and Religion ( Indian civilization and its antiquity by Bhudev Mookerji, M. A., Rasacharya, p. 11. )

शिवभक्तमहिमा शिवभक्तविलासनामक स्कंदपुराणांतर्गत एका उपपुराणांत सविस्तर वर्णिला आहे. पद्मपुराण हें वैष्णव मानलेलें असूनहि त्यांत शिवगीता आहे व त्या शिवगीतेंत पुढील श्लोक आहे.

संसारान्मुच्यते जन्तुः शिवतादात्म्यभावनात् ।
तथा दानं तपो वेदाध्ययनं चान्यकर्म वा ॥
सहस्रांशं तु नार्हन्ति सर्वदा ध्यानकर्मणः ॥ १६।१३ ॥

प्रकरण ३ रें

# शिव - रुद्र



चत्वारि शृङ्गा त्रयो अस्यपादा द्वे शीर्षे सप्त हस्तासो अस्य ।
त्रिधा बद्धो वृषभो रोरवीति महो देवो मर्त्यां आ विवेश ॥
—ऋ. ४।५८।३ ; १।२७।१०-११. म. भा. ; वनपर्व स्कंद उपाख्यान.

एको हि रुद्रो न द्वितीयाय तस्थुर्य इमाँल्लोकानीशते ईशनीभिः ।
प्रत्यङ् जनास्तिष्ठति सञ्चुकोचान्तकाले
संसृज्य विश्वा भुवनानि गोपाः ॥ २॥ —श्वे. उप. ३.

न द्वितीयो यतस्तस्ये तुरीयं ब्रह्मयत्स्वयम् ।
भूतान्यात्मनि संहृत्य चैको रुद्रो वसाम्यहम् ॥
— शिवगीता ६:४०

भवः शर्वो रुद्रः पशुपतिरथोग्रः सहमहांस्तथा भीमेशानाविति
यदभिधानाष्टकमिदम् । अमुष्मिन्प्रत्येकं प्रविचरति देव श्रुतिरपि
प्रियायास्मै धाम्ने प्रविहित नमस्योऽस्मि भवते ॥ २८ ॥
—शिवमहिम्नस्तोत्र.

जयासी नसेचि किमपि द्वितीय । जें का ब्रह्म ज्या म्हणती
तुरीय । सर्वभूतांसि ग्रासुनि तें मी स्वयें ॥ रुद्रनामें उरतसें ॥ ४६५
—वेदेश्वरी ६.

शिव आणि रुद्र यांच्या भेदाभेद महिम्याचें किंचित् दिग्दर्शन या प्रकरणांत करावयाचें आहे. शिव आणि रुद्र यांच्याबद्दल आधुनिकांची सारखीच विघातक दृष्टि दिसते. शिवस्वरूप कांहींसें सौम्य मानलें तरी तें अवैदिक, व रुद्राला गौणतः वैदिक मानलें, तरी तो दुष्ट, क्रूर व ग्राम्य, अशा थोडक्यांत आधुनिक कल्पना आहेत. यास आधुनिक आपल्याच प्राचीन वाङ्मयांतील आधार दाखवतील हें मी जाणून आहें. माझें त्यावर असें म्हणणें आहे कीं,

योग्य दृष्टीनें या मूलतत्वांकडे पाहणारास त्यांच्या ठिकाणीं तिरस्करणीय वैचित्र्य कांहींच उरणार नाहीं.

श्रीमद्भगवद्गीतेंतील—

> आश्चर्यवत्पश्यति कश्चिदेनमाश्चर्यवद्वदति तथैव चान्यः ।
> आश्चर्यवच्चैनमन्यः शृणोति श्रुत्वाप्येनं वेद न चैव कश्चित् ॥ २।२९ ॥

या श्लोकावर भावार्थ दीपिकाकार श्रीज्ञानेश्वर व यथार्थदीपिकाकार श्रीवामन पंडित जी टीका लिहितात, ती या वेळीं मनापुढें येते. एक महत्त्वाचा फरक इतकाच कीं, आधुनिकाची विघातक निंदाव्यंजक दृष्टि या आश्चर्यांत नाहीं. पण नास्तिक व निंदक नसणाऱ्या वाचकाची मनोभूमिका तयार करण्यास या टीका उपोद्बलक होतील, म्हणून त्या पुढें देतों.

श्रीज्ञानेश्वर म्हणतात— एक अंतरीं निश्चळ । जें निहाळितां केवळ विसरले सकळ । संसारजात ॥ १७२ ॥ एकां गुणानुवादु करितां । उपरति होऊनि चित्ता । निरवधि तल्लीनता । निरंतर ॥ १७३ ॥ एक ऐकतांचि निवाले । ते देहभावीं सांडिले । एक अनुभवें पातले । तद्रूपता ॥ १७४ ॥ जैसे सरिता ओघ समस्त । समुद्रामाजीं मिळत । परी माघौते न समात । परतले नाहीं ॥ १७५ ॥ तैसिया योगीश्वरांचिया मती । मिळणीसवें एक- वटती । परी जे विचारूनि पुनरावृत्ति । भजतीचिना ॥ १७६ ॥

आमच्या आधुनिक विद्वान् संशोधकांना ईश्वरानें अशी पूर्वपरंपराप्राप्त योगीश्वरांची आश्चर्यवत् दृष्टि दिली असती तर फार बरें होतें ! असो. आतां वामन पंडित काय म्हणतात तें पहा—" कोणें एकीं आइकला । देहातीत चिदात्मा नाहीं कळला । आइकोनिही नाहीं धारला । आत्मबोध ॥ ७५२ ॥ चित्तास चैतन्ययोग । सर्वदा आहे नाहीं वियोग । रज्जु देखे तेव्हां भुजग । दृष्टी पाहे ॥ ७५३ ॥ शरीरी आणि शरीर । निवडूनि सांगता काय उशीर । वेगळें करणें क्षीरनीर । हा स्वभावचि हंसाचा ॥ ७५४ ॥ संतकृपेचें घन । सर्वत्र वर्षती जीवन । पालथा घट करटा जन । दोष नव्हे हा तयाचा ॥ ७५५ ॥ चंद्र देखोनि आनंद । पावे सकळ जनवृंद । विषय तस्कर मंद । सुख न मानिती देखोनिही ॥ ७५६ ॥ एवं आत्मज्ञान कानीं । पडोनीही किती एकांनीं । गमावलें कीं मनीं । अनुताप नाहीं उपजला ॥ ७५७ ॥

अधिकारी अनधिकारी। वर्णूनि दोघांतें मुरारी। म्हणे त्यांत जे अधिकारी। आश्चर्य मानिती आत्मयाचें ॥ ७९८ ॥

श्रीरामकृष्ण परमहंस दृष्टांताच्या मार्गेत सांगत की, आमराईत जाऊन झाडांची पानें मोजीत बसूं नका. गोड आमरस सेवन करा. पण आश्चर्य असें की, रहस्याला विलक्षणें किंवा गोड शिवानुभव घेणें याची आस्था मुळींच न बाळगतां, उत्कट विषयानंद सोडून चंद्रकलेच्या पोताची चर्चा करीत बसणाऱ्या अरसिकाप्रमाणें, आधुनिकांच्या बुद्धिविलासाची कींव येते! शिव आणि रुद्र, गोपाळकृष्ण व वासुदेवकृष्ण, ज्ञानेश्वर व ज्ञानदेव अशी भेदचिकित्सा हें आधुनिक बहिर्मुखतेचें मोठेंच आश्चर्य होय!

वेगळ्या मार्गेत लिहावयाचें तर ऑक्सिजन आणि हायड्रोजन ह्या दोन्ही ज्वालाग्राही वायूंचें मिश्रणरूप जल ज्वाला विझविण्यास समर्थ होतें, हें केवढें आश्चर्य! अथवा मोतीं, गार, बर्फ, हिम, अदृश्य वाफ, दृश्य मेघ, हे एका जलाचेच पर्याय किती विचित्र! अथवा हिरा आणि कोळसा, सोनें आणि लोखंड, सुगंध आणि दुर्गंध ह्या पार्थिव पदार्थांतच केवढें वैलक्षण्य! हें सारें वैलक्षण्य स्थूल बहिर्मुख दृष्टीला भासतें. तात्त्विक दृष्टीनें सारें एकच दिसतें. आजोबा, बाबा, काका, मामा, दादा, श्रीमंत, सरदार, रावसाहेब अशा अनेक संज्ञा एकाच व्यक्तीच्या असूं शकतात. छाटणें घेऊन मारणाऱ्या माईचे हात बालकाला पुढें लोण्याहून मृदु वाटतात. "मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास। कठिण वज्रास भेदूं ऐसें॥", "दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दाळण कंटकांचें॥१॥" बाल्य, तारुण्य, वार्धक्य, जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, तुर्या; जन्म-मृत्यु, हे सारे अवस्थाभेद धारण करणारा एकच जीव असतो. अभेदांत भेद दाखविणारीं अशीं हीं अनेक आश्चर्यें आहेत. शिवरुद्रभेदाभेदमहिमा हें याहून मोठें आश्चर्य होय.

रुद्र ही वैदिक देवता असून शिव ही पौराणिक देवता आहे, असें कोणी कोणी मानतात. पुराणात जें शिवाला महत्त्व आहे, तें वेदांत रुद्राला नाहीं, असेंहि ते म्हणतात. शिव आणि रुद्र या भिन्न व्यक्ति आहेत, इतकेंच नव्हे तर, रुद्र ही एक व्यक्ति नसून संख्येनें रुद्र असंख्य आहेत, रुद्र ही देवता उग्र व संहारकारी कल्पिलेली असून शिव हा शांत व कल्याणकारी असा कल्पिलेल पुराणोक्त पुरुष आहे. असे आधुनिकांचे हे सामान्य विचार आहेत. पण

थोडा विचार केला व ग्रथावलोकन केलें, तर असें दिसून येतें कीं, वेदांत, पुराणांचा उल्लेख असल्यामुळें वेदापूर्वीहि पुराण होतें[1], असें म्हणावें लागतें. ( अग्निपुराण ५२।३ ) त्याचप्रमाणें शिव हें तत्त्व वेदांस मान्य असून त्या परात्पर शिवाचींच माया महेश्वर व रुद्र हीं व्यक्त स्वरूपें आहेत, असेंहि दिसून येतें. शिव या शब्दाचा वाच्यार्थ बऱ्याच ठिकाणीं सगुण साकार ईश्वर असा मानला जात असला, तरी त्याचा लक्ष्यार्थ निर्गुण, निराकार परात्पर ब्रह्म असाच असतो. शिवपुराणांत रुद्राला प्राचीन न मानतां शिवालाच प्राचीन मानलें आहे. व रुद्र हा शिवाचा अंश किंवा अवतार असें म्हटलें आहे. तथापि या नामभेदांत महत्त्व नाहीं. कारण याउलट तुरीय ब्रह्म तोच रुद्र असेंहि वर्णन शिवगीतेवरील टीकेंत आढळतें. वेदेश्वरींत म्हटलें आहे कीं, " स्वगत सजातीय विजातीय । भेदरहित जें एकाद्वय । तोचि रुद्र ऋत सत्य होय । सच्चिद्ब्रह्म ॥४८३॥ ++ जें कदां उत्पन्न होईना । त्यासी नाशही कदा असेना । एवं अविनाश मी परिपूर्णा ॥ रुद्रनामें वसामि ॥ ४९२ ॥ +++ एवं म्यां भूतातें निःशेष ग्रासिलें । शेखीं साधकांहीं उरीं नाहीं दिधलें । मज परब्रह्मीं अभिन्न होऊन गेलें । उरलें जें कांहीं तें रुद्रअंगें ॥ ९७ ॥ नामरूपद्वैत ज्या क्षणीं गेलें । ज्ञानें अस्तिभातिप्रिय उरलें । समष्टि तादात्म्य एक रुद्ररूप देखिलें । हें वर्म ज्ञानियां पुसा ॥ ९८ ॥ हा आत्यंतिक विवेकप्रलय । येथेंहि सर्वाचा लय होय । देवभक्त गुरुशिष्य एकरुद्र अव्यय । तुर्यब्रह्म स्वयें उरे ॥ ४९९ ॥ वेदेश्वरी ६.

शिवलिंगोपासना ही शिवाची आहे, रुद्राची नव्हे, असें मानावें, तर शिवलिंगावर अभिषेक रुद्राध्यायानें होतो. सामान्यतः पाहतां जसें शिव हें परात्पर तत्त्व आहे तसेंच रुद्र हें व्यवहारतः सगुण तत्त्व आहे. अग्नीचे जसे स्फुल्लिंग, सूर्याचे जसे रश्मि, तसे अव्यक्त शिवापासून व्यक्त होणारे ते रुद्र, असेंच म्हणावें लागेल. रुद्र हे शिवशक्तीचे पर्याय अथवा अंश आहेत. भक्तांच्या अधिकाराप्रमाणें व भावनेप्रमाणें शिव कधीं भैरव, रुद्र, शर्व, उग्र, अशनी अशा उग्र रूपांत तर कधीं शंकर, भव, पशुपति, महादेव, ईशान या सौम्य नामरूपांत प्रतीत होतो. एकाच ईश्वराचीं हीं भिन्न दर्शनें आहेत. त्यांना भिन्न

---

१ पुराणं सर्व शास्त्राणां प्रथमं ब्रह्मणा स्मृतम् ।
अनन्तरं च वक्त्रेभ्यो वेदास्तस्य विनिर्गताः ॥ ब्रह्माण्डपुराण

व्यक्ति मानण्यांत स्वारस्य नाहीं. किंबहुना लिंगोपासनेंत पूजला जाणारा निर्गुणनिराकार परात्पर शिव भक्तांच्या सोयीसाठीं देहहि धारण करीत असला, तरी शिव आणि रुद्र या दोन्ही तत्त्वांच्या ठिकाणीं देहांची कल्पना करणें तात्त्विक दृष्टीला अप्रस्तुतच वाटतें. अव्यय असा जो ईश्वर त्याला देह नाहीं. तो अव्यक्त आहे. म्हणूनच त्याच्या ज्ञापक चिन्हाची गरज आहे. तें चिन्ह म्हणजेच शिवलिंग. लिंग म्हणजे देवाच्या देहाचा अवयव नव्हे.

आपल्या वैदिक वाङ्मयाकडे पाहतां असें आढळतें कीं, चारी वेदांत शिव-रुद्राची भरपूर स्तुति आहे. ऋक्संहितेंतील (१।११४; २।३३) रुद्र आणि महादेव एकच. यजुर्वेदाचा १६ वा अध्याय, तैत्तिरीय कृष्णयजूंतील रुद्राध्याय, यांत शिवरुद्राची स्तुति आहे. वाजसनेय संहितेंतील रुद्राध्यायात शिव, गिरीश, पशुपति, नीलग्रीव, शितिकंठ, भव, शर्व, महादेव इत्यादि नामें रुद्रालाच दिलीं आहेत. त्यालाच महेश्वर म्हणतात (तस्य प्रकृतिलीनस्य यः परः स महेश्वरः। तदधीन प्रवृत्तित्वात् प्रकृतेः पुरुषस्य च ॥ वा. सं. पू. अ. २८।३३) अथर्ववेदांतील अकराव्या काण्डाच्या एका दुसऱ्याच सूक्ताचे एकतीस मंत्र (शिव) रुद्रस्तुतीनें आहेत. शिवाय, 'यो अग्नौ रुद्रो यो अप्स्वन्तर्य ओषधीर्वीरुध आविवेश । य इमाविश्वाभुवनानि चाक्लृपे तस्मै रुद्राय नमो अस्त्वग्नये ॥ अथर्व० ७।९२।१' अशी रुद्राची स्तुति आहे. यजुर्वेदांतील रुद्राध्यायाप्रमाणें 'त्र्यम्बकं यजामहे' हा शिवपर मंत्र प्रसिद्धच आहे. तैत्तिरीय आरण्यकांत 'नमो हिरण्यबाहवे हिरण्यवर्णाय हिरण्यरूपाय हिरण्यपतयेऽम्बिका पतये उमापतये पशुपतये नमो नमः' ॥ १८ ॥ याप्रमाणें अम्बिकापति महादेवाची स्तुति आहे. 'शिवाय नमः। शिवलिङ्गाय नमः।' हें नारायण उपनिषदांतील वचन आहे. रुद्राक्षजाबाल या उपनिषदांत शिवमाहात्म्य आहेच.

आतां, रुद्र म्हणजे रानटी अनार्यांची एक क्षुद्र व घोर संहारक देवता असा जो कोणी अर्थ समजतात तें त्यांचें अज्ञान आहे. रुद्र म्हणजे एकमेव देव (एको हि रुद्रो न द्वितीयाय०। अथर्व० उप० ५ श्वे० ३।२). रुद्र म्हणजे भगवान् (यो वै रुद्रः स भगवान्। जैमिनीय ब्राह्मण). रुद्र म्हणजे सर्व स्वरूप (रुद्रो ह्येवैतत्सर्वम्। बौधायनसूत्र) रुद्र म्हणजे वैदिक पुरुष (रुद्रो वै पुरुषः।) सर्व देवांत रुद्र हा ज्येष्ठ आणि श्रेष्ठ आहे. (रुद्रो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च देवानाम् कौ० ब्राह्मण २५।१३; नमो ज्येष्ठाय। रुद्राध्याय मंत्र ६।१. हा रुद्र म्हणजेच

शिव अथवा शंकर होय. "नमः शंकराय च। नमः शिवाय च।" यजु० १६।४१, सर्व देवात्मको रुद्र सर्व देव शिवात्मकाः" ॥ रुद्र हृदयोपनिषद्; 'रुद्राणां शंकरश्चास्मि।' गी १०।२३) यजुर्वेदांत व श्वेताश्वतर, मांडुक्य, बृहज्जाबालोपनिषद्, शरभोपनिषद्, निरालम्बोपनिषद्, इत्यादि उपनिषदांत साक्षात् शिवनामाचाहि उल्लेख आहे. (ज्ञात्वा शिवं शान्तिमत्यन्तमेति। श्वे० ४।१४. शिवमद्वैतं चतुर्थमन्यते स आत्मा स विज्ञेयः। माण्डूक्य ७; तेन पापापहानिः स्याऽज्ञात्वा देवं सदाशिवम्। शिवएव सदाध्येयः सर्व-संसारमोचकः। शरभउप. ॐ नमः शिवाय गुरवे सच्चिदानंद मूर्तये। निरालम्ब-उप० ).

याप्रमाणें चारी वेद तसेंच केन, कैवल्य, अथर्व०, मांडूक्य, तैत्तिरीय, श्वेताश्वतर, नारायण, बृहज्जाबाल, रुद्राक्षजाबाल, रुद्रहृदय, इत्यादि उपनिषदें, तैत्तिरीयआरण्यक, आश्वलायनादि गृह्यसूत्रें इत्यादि वाङ्मयांत रुद्र, ईश, ईश्वर, ईशान, हर, कपर्दि, शितकण्ठ, सर्वज्ञ, सर्वशक्तिमान, सर्व-भूतेश, इन्द्र, अग्नि, प्रणव, शंभु, भेषज, महादेव, सूर्य, त्र्यंबक, उमापति, त्रिलोचन, त्रिपुरहन्ता, ताण्डवनर्तक, पञ्चवक्त्र, विरूपाक्ष, कृत्तिवास, महेश्वर, अष्टमूर्ति, व्याघ्रकृति, वृषभध्वज, वज्रहस्त भिषक्तम, संगीतज्ञ, पशुपति, औषधिविधिज्ञ, नीलकंठ अशीं अनेक नावें शिववाचकच आहेत. या ग्रंथसंदर्भात कित्येक ठिकाणीं, (श्वे. उप., कैवल्य उप., नारायण उप., रुद्राक्षजाबाल उप, यजुर्वेद, तैत्तिरीय) शिव हेंहि नांव आहे. अर्थात् शिव हें नांवच वैदिक वाङ्मयात आलें नसल्यामुळें शिव हें आर्यांचें दैवतच नव्हे, हा जो आधुनिकांचा एक ठराविक मुद्दा आहे, त्यांत कांहींच अर्थ नाहीं.

वरीलप्रमाणें जीं अनेक नांवें शिवाला दिलेलीं आढळतात, त्यांत ग्राम्य लैंगिक भावना कोठेंच दिसत नाहीं. पण असें असूनहि मूळात शिवलिंगाच्या ठिकाणीं ग्राम्य लैंगिक भावनाच असली पाहिजे हा आधुनिकांचा पूर्वग्रह किंवा दुराग्रह दिसतो. कारण वरील शिवनामांत जर अश्लील भाव नाहीं तर तो शिवलिंगांत असला पाहिजे असें कसें म्हणतां येईल ? कारणब्रह्माचें शिव-लिंग हें प्रतीक सर्व धर्मांच्या, सर्व पथांच्या व सर्व दर्जांच्या सर्व लोकांनीं पुजावें अशा योग्यतेचें आहे शिव, रुद्र, सदाशिव, महादेव, महेश्वर यांची सर्वांचें [illegible]तील. त्याचप्रमाणें दुर्गा, अंबिका, उमापति, पार्वती यांची

वर्णनें भिन्न आढळतील. इतकेंच काय तर दुर्गाच नऊ प्रकारच्या वर्णिल्या आहेत. तसेंच वैदिकरुद्र व पौराणिकरुद्र (यजु. ३।४७) तसेंच घोरशिव व सौम्यशिव, महादेव आणि महोदेव यांचींहि वर्णनें वेगळीं आहेत. पण शिवलिंगाच्या ठिकाणीं ह्या सर्व देवताच काय तर ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य इत्यादि सारे देव व त्यांच्या सर्व शक्तिदेवता यांचा समावेश होत असल्यामुळें (सर्व देवात्मको रुद्रः सर्वे देवाः शिवात्मका। ४ रुद्रहृदय उप) निरनिराळ्या फळांच्या अपेक्षेनें निरनिराळ्या देवदेवतांना भजणारे उपासक एका शिवलिंगोपासनेंत सार्थकता पावतील. 'यो वै रुद्रः स भगवान्०' । अथर्वशिरस २।१-३२. 'रुद्रो वै ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च देवानाम्' । कौ. ब्रा. २५ । १३, 'एको रुद्रो न द्वितीयाय।' अथर्व. उप. ५; श्वे. उप ३।२; 'यो वै रुद्रः स भगवान्।' जैमिनीय ब्राह्मण). कारण, शिवलिंग हें आदिकारणाचें प्रतीक आहे. त्याची उपासना भुक्ति देईल व मुक्ति देईल, ज्ञान देईल व सिद्धिपण देईल. तो उत्पत्तिकर्ता तसाच रक्षणकर्ता, संहारकर्ता तसाच अमृतत्वदाता आहे. त्याच्या ठिकाणीं सर्व रूपें व सर्व अवयव अव्यक्त आहेत, तसेंच तो अरूप आणि निरवयव पण आहे. सर्वेंद्रियगुणाभासं सर्वेंद्रियविवर्जितम् । सर्वस्य प्रभुमीशानं सर्वस्य शरणं बृहत् ॥ श्वे. ३।१७ असा हा शिवात्मा आहे.

शिव आणि रुद्र यांचीं वैदिक वाङ्मयांतील व पुराणांतील वर्णनें वाचलीं म्हणजे असें स्पष्ट दिसून येतें कीं, रुद्र हें शिवाचें क्रियाशील स्वरूप आहे. प्राण हें क्रियाशील तत्त्व आहे. अग्नि हें विकसनशील तत्त्व आहे तीं रुद्रस्वरूपें होत. रुद्र हें संहारकारी तत्त्व असून लयसाक्षीसहि रुद्र असेंच म्हणतात. रुद्राचीं आठ नामें व त्याचे विविध एकादश (११) प्रकार हे पाहिले म्हणजे रुद्र हें सर्वरूप ब्रह्माण्डव्यापी तत्त्व आहे असें उघड दिसतें.

रुद्र म्हणजे रडणारा, ओरडणारा असा त्याचा ग्राम्य अर्थ करतात. पण वस्तुतः आत्मभूत असलेलीं अव्यक्त नामरूपें व्यक्त करणाऱ्या परमात्म्याचेंच तें अन्वर्थक नाम आहे. नामरूपाचें व्याकरण करणारा तोच. त्याच्या डमरूंतून निघणारे ध्वनि हेच पाणिनीच्या व्याकरणाच्या अष्टाध्यायीचे मूळ आधार होत.

रुद्र ही कांहीं देहाकार पुरुषविध देवताच नसल्यामुळें त्याची पाठ-पोट, हात, पंजे, केसांची वेणी इत्यादि वर्णनें लाक्षणिकच मानणें भाग आहे.

सान्या देवदेवता वायुस्वरूप मानतात. तसें रुद्रांचेंहि वायुस्वरूप आहे. रुद्राला पदार्थमात्राचा अंतर्यामी असेंहि म्हटलें आहे. रुद्र हें व्यापक परमात्मतत्त्व असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं वादळाची देवता वगैरे परिच्छिन्न भाव हे अत्यंत एकदेशी ठरतात. आता ऋग्वेदांत रुद्रसूक्तें थोडीं आहेत. पण त्यामुळें रुद्राला गौणता येत नाहीं. शतपथब्राह्मण या बृहत् ग्रंथांत फक्त एकाच काडात ब्रह्मवर्णन आहे. यजुर्वेदात एका चाळिसाव्या अध्यायांत आत्म्याचें वर्णन आहे. म्हणून ब्रह्मात्म्याचें महत्त्व कमी कोणीच मानणार नाहीं. शिवाय सूक्ष्मदृष्टीनें अवलोकन केल्यास मागें लिहिल्याप्रमाणें इंद्र, अग्नि, वरुण, सोम इत्यादि सान्याच वैदिक देवता या शिवरुद्राचेंच स्वरूप आहेत, अशीं स्पष्ट शास्त्रवचनें आहेत. कारणब्रह्मरूप सशक्तिक शिवाच्या पोटातच सारे देव सामावतात, हें म्हणणें साधार व सयुक्तिकहि आहे. रुद्रहृदयोपनिषदांत पुढीलप्रमाणें वचनें आहेत :—

"रुद्रो ब्रह्मा उमावाणी तस्मै, तस्यै नमो नमः ॥ रुद्रो विष्णुरुमा लक्ष्मीस्तस्मै तस्यै नमो नमः ॥ १८ ॥ रुद्रः सूर्य उमा छाया तस्मै तस्यै नमो नमः । रुद्रः सोम उमा तारा तस्मै० ॥ १९ ॥ रुद्रो दिवा उमा रात्रिस्तस्मै० । रुद्रो यज्ञ उमा वेदिस्तस्मै० ॥ २० ॥ रुद्रो वह्निरुमा स्वाहा तस्मै० । रुद्रो वेद उमा शास्त्रं तस्मै० ॥ २१ ॥ रुद्रो वृक्ष उमा वल्ली तस्मै० । रुद्रो गन्ध उमा पुष्पं तस्मै० ॥ २२ ॥ रुद्रोऽर्थ अक्षरः सोमा तस्मै० । रुद्रो लिङ्गमुमा पीठ तस्मै० ॥ २३ ॥ सर्व देवात्मक रुद्रं नमस्कुर्यात्पृथक्पृथक् । एभिर्मन्त्रपदैरेव नमस्यामीश पार्वतीम् ॥ २४ ॥ यत्र यत्र भवेत्सार्धमिमं मन्त्रमुदीरयेत् । ब्रह्महा जलमध्ये तु सर्वपापैः प्रमुच्यते ॥ २५ ॥ सर्वाधिष्ठानमद्वन्द्वं परं ब्रह्म सनातनम् । सच्चिदानन्दरूपं तदवाङ्मानसगोचरम् ॥ २६ ॥ तस्मिन्सुविदिते सर्वं विज्ञातं स्यादिदं शुक । तदात्मकत्वात्सर्वस्य तस्माद्भिन्न न हि कचित् ॥ २७ ॥

आतां पद्म या वैष्णवपुराणांतील शिवगीतेवरील वेदेश्वरी टीका काय म्हणते तें पहा: सच्चिदानंद शिवब्रह्म । तो मी निजांगें आत्माराम । ऐसिया ध्यास पुरुषोत्तम । पावेल अढळु ॥ ४३२ ॥ असो पिंड तादात्म्यामुळें । शुद्धचि जीवत्वासी पावलें । तेंवींच ब्रह्मांड तादात्म्यामुळें कल्पिलें । शिव

१ पं. सातवळेकर यांचें 'रुद्रदेवता का परिचय' व 'ऋग्वेदमें रुद्र देवता' हीं पुस्तकें पाहावीं.

हें अभिधान ॥ ४५१ ॥ पिंड हें अस्थिमांसाचें। तेवीं ब्रह्माण्ड पंचभूतांचें। या उभयांसी अस्तित्व जयाचें। शिवोहं शिवोहं ॥ ४६१ ॥ पिंडीं उपस्थ भोगीं रति। उत्पत्ति कर्ता प्रजापति। उभयां उभवी जयाची शक्ति ॥ शिवोहं० ॥ ४६६ ॥ बुद्धिनिश्चया अतिचतुर। तो ब्रह्मांडीं सावित्रीवर। यया साक्षी जो चिन्मात्र। शिवोहं० ॥ ४७७ ॥ स्वप्नाचा तैजस अभिमानी। तोचि विष्णु चक्रपाणी। हे जयावरी दिसती दोन्ही। शिवोहं० ॥ ४८० ॥ जेणें अभिमान तोचि प्राज्ञ। ब्रह्मांडीं रुद्र हा आपण। यासी अस्तिभातिप्रिय पूर्ण। शिवोहं० ॥ ४८४ ॥ एवं नामरूप मिथ्या भासे। पिंड ब्रह्मांड दोन्ही ऐसें। यांत सच्चिद्रूप जें असे। शिवोहं० ॥ ४८५ ॥ अहंब्रह्म जे स्फूर्ति। हेहि लया जाय निवृत्ति। एकट उरे स्वयंज्योति ॥ शिवचि शिवरूपीं ॥ ४९६ ॥ अ० १

येथपर्यंत शिवरुद्राची वैदिक व पुराणोक्त वाङ्मयांत रहस्यमय भरपूर स्तुति असल्याचें विपुल पुराव्यानें सिद्ध केलें आहे अर्थविस्तारभयास्तव प्रत्येक ठिकाणचे उतारे दिले नाहींत तरी जरूरीपुरतीं मूळ वचनें दिलींच आहेत. आपलें भारत-रामायण हे इतिहास व पुराणें हीं वेदाचें उपबृंहण करण्या करितांच रचलेलीं आहेत अर्थात् त्यांतूनहि शिवरुद्राचा जो अनन्यसाधारण व निस्सीम असा महिमा वर्णिला आहे, तो शिव हा अनार्य व अवैदिक देव असता तर तो तसा वर्णिला जाणें अशक्यच होतें

**शिव आणि घोर रूप** —असा हा प्रास्ताविक विचार केल्यानंतर ईश्वराच्या शिव आणि घोर अशा उभयविध स्वरूपाचा थोडक्यांत विचार करूं ईश्वराचें स्मरण व चिंतन आपत्कालांतच अधिक उत्कटतेनें होतें. अर्थात् जलप्रलय, अग्निप्रलय, वादळ, विद्युत्पात, रोगाच्या साथी, शत्रूचें आक्रमण असे आपत्प्रसंग ज्याच्या सत्तेनें येतात, तें ईश्वराचें उग्र व घोर स्वरूप अशिक्षित मानवसमाजासहि चटकन् पटतें पुढें त्या उग्र स्वरूप धारण करणाऱ्या ईश्वराची प्रार्थना केली असतां आपत्ति टळते, किंवा सुसह्य होते तेव्हां तोच ईश्वर शिवरूप प्रतीत होतो

संहिताभागात ज्या रुद्राचें अस्पष्ट, संदिग्ध व विस्कळीत वर्णन आहे, त्याचेंच श्वेताश्वतरांत संकलित व सारभूत वर्णन आहे. साऱ्या उपनिषदांच्या मंथनातून वैष्णवांचे कृष्ण भगवान् गीतारूपांत प्रकट होण्यापूर्वीं साऱ्या संहितांच्या मंथनातून श्वेताश्वतर रूपांत शैवांचे रुद्र भगवान् किंचित् व्यक्त

झाले. श्वेताश्वतर हें भगवद्गीतेच्या पूर्वीचें असल्यामुळें त्यांत व्यक्त, झालेलें भगवंताचें स्वरूप मानवदेहधारी श्रीकृष्णासारखें सगुणसाकार नाहीं. आतां भगवद्गीतेंतहि पुरुषप्रकृतिविचार सांगत असता भगवान् योन्यादि परिभाषेचा उल्लेख करतात, तेव्हा हे मानवी देह व देहाचे अवयव हा तेथें वाच्यार्थ नसतो, हें जसें उघडच आहे, त्याचप्रमाणें श्वेताश्वतरांतील लिंगयोनीचा उल्लेख अवयवरूपांनी नाहीं, हेंहि स्पष्टच आहे. शिवलिंगप्रतीकात असेंच अमूर्त रहस्य आहे. शिव हा बीजप्रेरक लिंगी आहे प्रधान अथवा प्रकृति हें लिंग म्हटलें आहे.

श्वेताश्वतरांत जो हा शिवयोग सांगितला आहे त्यानें निरासक्ति उत्पन्न होते. यांत जें शिव-रुद्र-महेश्वराचें वर्णन आहे तें सर्वसत्ताधीश, व्यापक आणि निराकार अशा परमेश्वराचें आहे. ह्या परमेश्वराला वस्तुतः अवयव नाहीं, कारण म्हणजे इंद्रिय नाहीं, तसेंच त्याला लिंग म्हणजे चिह्न नाहीं. प्रतिमा म्हणजे उपमा नाहीं. तो भावरूपानें समजण्यासारखा, पण अशरीरी आहे. तो एक देव सर्व भूतांमध्यें गूढ असणारा, सर्व व्यापणारा, सर्व भूतांचा अंतरात्मा, कर्मांचा अध्यक्ष, सर्व भूतांचे ठिकाणीं अधिष्ठान असलेला, साक्षी, ज्ञाता, केवळ आणि गुणरहित आहे. प्रकृतीच्या जाळ्यात त्यानें आपणास गुंडाळून घेतलेसें भासतें. उलट सारें विश्व त्याच्यांतच लय पावतें (गुंडाळलें जातें). अशा या महान् आत्म्याचेंच शिवलिंग हें प्रतीक आहे. त्याच्या ठिकाणीं आम्य लैंगिक भावना वस्तुतः अप्रस्तुत आहेत. ईश्वर आणि गुरु यांचें माहात्म्य यांत सांगितलें आहे. गीता–भागवतामार्गे ऐतिहासिक कृष्ण आहे, तसा श्वेताश्वतरामार्गे किंवा अथर्वशिरसामार्गे एखादा ऐतिहासिक पुरुष शिवरूपात नाहीं. केनोपनिषदांत उमा आहे. तीहि ऐतिहासिक स्त्री नव्हे. शिव ईश्वराचें स्वरूप व उमा हें ब्रह्मविद्येचें स्वरूप आहे.

१ मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन्गर्भं दधाम्यहम् ।
संभवः सर्वभूतानां ततो भवति भारत ॥ ३ ॥
सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः ।
तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ ४ ॥ गीता. १४

२ वह्नेर्यथा योनिगतस्य मूर्तिर्न दृश्य ते नैव च लिंग नाशः । १।१३ श्वे.
यो योनिं योनिमधितिष्ठत्येको विश्वानि रूपाणि योनीश्च सर्वाः ॥५।२ श्वे.

ब्रह्मा, विष्णु, इन्द्र, अग्नि आणि सोम हे अक्षरप्राणाचे पाच विशेष सांगितले आहेत तेच क्षरपुरुषाचेहि मानले आहेत पहिले अमर व दुसरे मर्त्य असा ह्यात भेद आहे, इतकेच या पाचांची पाच मंडलें एकास पोटात घेणारे दुसरे, याप्रमाणें मानली आहेत स्वयंभूमंडळात ब्रह्माचें प्राधान्य आहे त्याच्या आतील परमेष्ठींत विष्णूचें, त्याच्या आतील सूर्यमंडलात इंद्राचें, (शिवरुद्राचें) पृथ्वींत अग्नीचें, आणि चन्द्रात सोमाचें प्राधान्य मानलें आहे येथ सूर्य, पृथ्वी, चंद्र हीं मंडलें या नांवाच्या खगोलाहून फार मोठीं आहेत. हे खगोल हें त्याचें अक्षात व्यक्त स्वरूप म्हणता येइल

पृथ्वींत ज्या अग्नितत्त्वाचें प्राधान्य आहे, त्या अग्नीला रुद्र असेंहि म्हणतात अग्नितत्त्व बाह्यगतिशील अथवा विकसनशील व ऊर्ध्वगतिशील आहे यास्तव हें अग्नितत्त्व अथवा रुद्रप्राण याची जी वर सूर्यापर्यंतची गति त्याचे एकवीस भाग (स्तोम) करून, पहिले नऊ भाग अग्नि, त्यापुढें अंतरिक्ष लोकातील सहा भाग वायु (किंवा रुद्र) व त्यापुढें सहा भाग द्युलोकात आदित्य, अशीं ह्या प्राणतत्त्वाचीं नांवें आहेत या (आदित्य) सूर्यमंडलापलीकडे सोममंडल आहे या सोमाच्याहि तीन अवस्था मानल्या आहेत. सूक्ष्म अवस्थेंत सोम, किंचित् घन अवस्थत वायु आणि अधिक घन अवस्थेंत अप अशा ह्यास संज्ञा आहेत सोमाची वरून खालील अग्नींत आहुति होत आहे, व अग्नि ऊर्ध्वगतिशील असल्यामुळें वर जात आहे याप्रमाणें अग्नितत्त्वात सोमाची जी आहुति तेंच अग्निषोमात्मक असें जगाचें स्वरूप मानलें आहे पहिल्या एकवीस सोमविभागातील अंतरिक्षातील आग्नेय वायु हा रुद्रस्वरूप आहे हा भौतिक वायूचा व भौतिक अग्नीचा उत्पादक आहे म्हणून भौतिक वायु म्हणजे मरुत हे रुद्राचे पुत्र (मरुतो रुद्रपुत्रा स ) म्हटलें जातें अग्नि हें रुद्राचें वीर्य होय (कृशानुरेता।) पृथ्वीच्या पोटातील पारदादिहि रुद्रवीर्य म्हणतात हें आग्नेय वायूचें

---

१ कल्याण शिवांक, पृ ४१ ते ५२ शतपथब्राह्मण विज्ञानभाष्य ईशापनिषद्, विज्ञानभाष्य पहा

२ अग्निर्वैरुद्र । (शतपथ ५।३।१।१०, ६।१।३।१० ) अग्नेय सर्वोऽग्नि सस्कृत स एषोऽत्र रुद्रो देवता। (शतपथ ९।१।१।१ ) तै. स ४, ५

रुद्रस्वरूप घोर-मानलें आहे. याचे सहकारी एकादश रुद्र मानले आहेत. किंबहुना आग्नेय वायूचे अकरा प्रकार मानले आहेत. या एकादश रुद्राची आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक अशा दृष्टिभेदानें निरनिराळ्या प्रकारची परिगणना होते. पुरुषाचे दहा प्राण व अकरावा प्राणात्मा यास आध्यात्मिक रुद्र म्हणतात. आधिभौतिक रुद्रप्राण म्हणजे पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश, सूर्य, चन्द्रमा आणि यजमान (विद्युत्) ह्या शिवाच्या अष्टमूर्ति व याशिवाय सूर्यातील शुचि, अतरिक्षांतील पवमान आणि पृथ्वींत कार्यक्षम होणारा पावक असे हे एकादश भौतिक रुद्र आहेत. यांपैकीं अष्टमूर्तीशिवाय बाकीचे तीन घोरस्वरूप आहेत. आता आधिदैविक एकादश रुद्र तारामंडलांत राहतात. यांचीं नावें निरनिराळीं आढळतात. तीं अशीं : (१) अज, एकपात, (२) अहिर्बुध्न्य, (३) विरूपाक्ष, (४) त्वष्टा, अयोनिज किंवा गर्भ. (५) रैवत, भैरव, कपर्दी किंवा वीरभद्र. (६) हर, नकुलीश, पिंगल किंवा स्थाणु. (७) बहुरूप, सेनानी किंवा गिरीश. (८) त्र्यंबक, भुवनेश्वर, विश्वेश्वर किंवा सुरेश्वर. (९) सावित्र, भूतेश किंवा कपाली. (१०) जयन्त, वृषाकपि, शंभु किंवा सन्ध्य. (११) पिनाकी, मृगव्याध, लुब्धक किंवा शर्व. याप्रमाणें आधिदैवत जगांतील एकादश रुद्रांचीं हीं तारामंडळांतील व्यक्त स्वरूपें आहेत. यांतहि घोर आणि शिव असा भेद आहे. त्यावरच ज्योतिषशास्त्रांतील भिन्न फलादेश सांगितले आहेत. उदाहरणार्थ, आश्लेषा नक्षत्रावर सूर्य असतां पाऊस पडतो, तो रोगोत्पादक व मघा नक्षत्रांतील पाऊस रोगनाशक मानला आहे.

पुराणातील कित्येक शिवकथांचें आधिदैविकस्वरूप या तारामंडळांतील लुब्धकबंधु, मृगव्याध इत्यादि तारकांच्या रूपात व्यक्त असलेल्या रुद्राला धरूनच आहे. दक्षाचा शिरच्छेद करून त्याला अजाचें म्हणजे मेषाचें मुख बसविलें ही कथा पूर्वी नक्षत्रचक्राचा आरंभ कृत्तिकेपासून होता, तो पुढें अश्विनी (मेष) पासूनच करूं लागले. या ज्योतिर्विषयक भागास अनुलक्षून आहे असें म्हणतात. दक्षाचें आधिदैविक स्वरूप म्हणजे चंद्राचें परिक्रमा वृत्त

१ अग्निर्वाऽरुद्रः, तस्यैते द्वे तन्वौ घोरान्या च शिवान्या च। ऐ. ब्रा.

२ सप्तशीर्षण्य (दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, एक मुख). ७ प्राण, (८-९) मलमूत्र विसर्जन करणारे दोन व (१०) नाभीजवळील.

किंवा कक्षा असें मानतात. मृगव्याधाची कथा शिवलीलामृत, अध्याय दोन यात आहे. त्याचप्रमाणें रुद्रानें यज्ञाचें शिर उडविलें तेव्हा तो यज्ञ मृगाचें रूप घेऊन पळाला इत्यादि वैदिक कथाहि मृगनक्षत्रावर अधिष्ठित आहेत.

आधियाज्ञिकदृष्टयाहि एकादश रुद्राग्नि मानले आहेत पैकीं तीन गार्हपत्य, आवहनीय आणि धिष्ण्य हे आहेत. यात गार्हपत्याचे पुन्हा गार्हपत्य व नूतन गार्हपत्य असे दोन आणखी भेद आहेत. धिष्णाग्नीचे आग्नीध्रीय, अच्छावाकीय, नेष्ट्रीय, पोत्रीय, ब्राह्मणाच्छंसीय, होत्रीय, प्रशास्त्रीय आणि मार्जालीय असे आठ भेद आहेत. आहवनीयाचा एकच प्रकार आहे. मिळून हे एकादश अग्नि अंतरिक्षस्थ अग्नींची अनुकृति आहे हे शिवरूप आहेत व यज्ञात ग्राह्य आहेत. घोररूप रुद्राचें यज्ञात प्रयोजन नाहीं

रुद्र एकच आहे व रुद्र असंख्य आहेत, रुद्र सौम्य आहेत व घोर आहेत, असें विरोधी वर्णन आढळतें त्याचा अर्थ असा कीं, रुद्रतत्त्व राजाप्रमाणें एक आहे याला क्षत्ररुद्र म्हणतात. विट्रुद्र प्रजेप्रमाणें असंख्य आहेत. प्रजापतीच्या क्रोधापासून व अश्रूपासून रुद्राची उत्पत्ति मानली आहे. या परोक्ष मार्गांत क्रोध हें अग्नितत्त्व व अश्रु हें सोमतत्त्व समजावें. हीं दोन्हीं तत्त्वें सापेक्ष आहेत अग्नीच्या उष्णतेचें पर्यवसान सोम-आर्द्रता यांत होतें. सोमाच्या आहुतीची परिणति अग्निसंवर्धन यात होते पृथ्वीचें अग्निमंडळ व त्यावरील सोममंडळ या दोहोंत जे मध्यवर्ती वायु आहेत, तेहि त्यातील त्रिवृत्करणामुळें आल्या शुद्ध रूपात नसतातच. तथापि या वायूपैकीं आग्नेय वायु हे विकृतवायुप्रधान असल्यामुळें या विकृत वायुप्रविष्ट रुद्रप्राणाना घोर मानलें आहे. उलट सोममंडळातील वायूला अथवा रुद्रप्राणाना साधसदाशिव असें मानलें आहे. आधियाज्ञिक सारेच रुद्राग्नि उपास्य आहेत. आधिभौतिकपैकीं अष्टमूर्ति शिवरूप उपास्य आहेत बाकीचे तीन दुरूनच वंदनीय आहेत असाच आध्यात्मिक व आधिभौतिक रुद्रासंबंधीं हेयोपादेय भाव संभवतो. तात्पर्य, रुद्र हें क्रियात्मक शिवतत्त्व आहे. तें अग्निषोमात्मक असलें, तरी अग्नींत सोमाची आहुति पडली असतां सोमहि अग्निरूपच होतो; म्हणून रुद्र हा प्राधान्यानें अग्निरूपच मानला आहे आणि म्हणून त्याच्या उग्र व संहारकारी स्वरूपाचींच वर्णनें जास्त आढळतात. परंतु अग्नीचा साक्षात् संघ जरी जाळणारा असला तरी त्याच्यामध्यें जलपूर्ण पात्राची उपाधि घेतल्यास

तोच पाकसिद्धि करून उपकारकता होतो शिवाय अग्नितत्त्वाचा जाळणें हा जसा धर्म दिसतो, त्याप्रमाणें प्रकाश देणें, जीवन देणें, परिपाक करणें, सौंदर्य देणें, शुद्धि करणें इत्यादि अग्नि अथवा तेज याचे अनेक कल्याणप्रद-धर्म आहेत त्याचप्रमाणें रुद्रशिवाचें केवळ घोर हेंच स्वरूप नाहीं, असें यजुर्वेदातील रुद्राध्याय, ऋग्वेदातील रुद्रसूक्तें, तसेंच शतपथ ब्राह्मणादि ग्रंथातील वर्णनें हीं वाचलीं असता लक्षात येतें सक्रिय ब्रह्मरूप रुद्रप्राण हें तत्त्व म्हणज परिच्छिन्न देवतामूर्तिरूप नसून, अत्यत व्यापक आहे गति, आगति, विकास, सकोच व स्थिति हीं सारीं लक्षणें रुद्रप्राणाचींचि आहेत तेंच सृष्टिकर्त्या ईश्वराचें स्पंदमय स्वरूप आहे त्यालाच सूत्रात्मा असेंहि म्हणतात भट्टभास्करभाष्यांत त्याचें जगत्कारणरूपानेंच ध्यान आहे

पृथ्वींत अग्नितत्त्वाचें प्राधान्य आहे, यास्तव व अन्यहि अनेक कारणास्तव प्राचीन वैदिक धर्मात मूळ देवता अग्नच मानली आहे त्याच्याच नामोच्चारानें ऋग्वेदाचा आरभ होतो. अष्टवसु हे पृथ्वीसबधीं अग्नीच होत ऋग्वेदाचा सबध या अग्नीशीं मानतात. अतरिक्षातील एकादश रुद्राग्नि हा यजुर्वेदाचा वर्ण्यविषय आहे यामुळें रुद्राध्यायात रुद्राचें उग्र स्वरूपच प्राधान्यानें लक्षित झालेलें दिसतें. सामवेदाचा संबध बारा आदित्याशीं आहे मिळून एकतीस देव झाले तसेंच वसु आणि रुद्र व रुद्र आणि आदित्य यांच्या मधील दोन साध्य देव (यासच कोणी दोन अश्विनीकुमार म्हणतात) मिळून तेहतीस देव (कोटी) झाले या तेहतीस कोटींतील कोटि शब्दाचा अर्थ वर्ग किंवा जाति असा असतां कोटि म्हणजे शभर लक्ष असा सख्यादर्शक अर्थ घेतल्यामुळें असख्य रुद्राप्रमाणें सख्येनें तेहतीस कोटी देव मानण्यात आले वस्तुतः अग्नि किंवा रुद्र एकच पण सोमाहुतीचे तारतम्यानें त्याचे

१ स्तुहिश्रुत गर्तसद युवान मृग न भीममुपहन्तुमुग्रम्।
मृडा जरित्रे रुद्र स्तवानो अन्य ते अस्मन्निवपन्तु सेना ॥ १०।८॥
—रुद्राध्याय

२ Invisible Influence, pp 30–33

३ वृषाधिरूढं देवेश सर्वलोकैककारणम्।
ध्यायेद्ब्रह्मादिभि स्तुत्य पार्वतीसहित शिवम् ॥
— भट्टभास्करभाष्य.

घन, तरल, विरल असे तीन प्रकार झाले व त्यांस अनुक्रमें अग्नि, वायु, आणि आदित्य अशा संज्ञा प्राप्त झाल्या. नाम, रूप व कर्म या प्रत्येक वस्तूच्या तीन अंगाच्या परिणामविशेषांमुळें देवतामेद व पदार्थमेद मानले जातात.

रुद्राची उत्पत्ति निरनिराळ्या तऱ्हेनें सांगितली आहे: (१) तो प्रजापतीपासून उत्पन्न झाला[1]. (२) तो शिवापासून उत्पन्न झाला[2]. (३) तो विष्णूच्या ललाटापासून किंवा क्रोधापासून उत्पन्न झाला[3]. (४) तो ब्रह्मदेवापासून उत्पन्न झाला[4]. इत्यादि प्रकारच्या वर्णनावरून रुद्रशिवाला गौणता येत नाहीं. कारण वर जे रुद्रजन्माचे कथाभाग सांगितले, त्यांत शिवाच्या वरानें शिवच रुद्ररूपानें व्यक्त झाले, असें वर्णन आढळतें. अर्थात् निदेवांहून महादेवशिव श्रेष्ठ या म्हणण्यास वरील कथांनीं बाध येत नाहीं. शिवाय पुन रुद्र म्हणजे अखिल पदार्थमात्रांत एकत्वानें व्यापून असणारें ईशतत्त्व असें कौषितकी व शतपथ ब्राह्मण यांतील रहस्य दिसतें. त्याला ईशावास्यांत एकर्षि किंवा अंतर्यामी असें म्हटलें आहे. श्वेताश्वतरांत रुद्रापासून हिरण्यगर्भ उत्पन्न झाला असें म्हटलें आहे. मरुत हे रुद्राचे पुत्र

---

१ श. प. ब्राह्मण १-७-३-८ कौषितकी ब्राह्मण.

२ शिवपुराण (नवलकिशोर प्रेस.) उत्तरार्ध, सातवा खंड, अध्याय पहिला.

३ तस्य ललाटः स त्र्यक्षः शूलपाणिः पुरुषोऽजायत । (अथवा) एतौ द्वौ पुरुषश्रेष्ठौ प्रसादक्रोधजौ मम ॥ —लिंगपुराण, अ. २३.

४ प्रादुरासीत्प्रभोरङ्के कुमारो नीललोहितः ।

५ सृष्ट्यर्थं ब्रह्मणः पुत्रो ललाटादुत्थितः प्रभुः । —महाभारत.
अहं च भवतो वक्त्रात् कल्पान्ते घोररूप धृक् ।
शूलपाणिर्भविष्यामि क्रोधजस्तव पुत्रकः ॥ —कूर्मपुराण.
निर्दिष्टः परमेशेन महेशो नीललोहितः । पुत्रो भूत्वानुगृह्णाति ब्रह्माणं ब्रह्मणोऽनुजः । —वायुपुराण.

६ Indo-Aryan Mythology, Vol. I, pp. 484-493, Vol. II, p. 560.

७ Ibid Vol. II, p. 24.

८ हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं । श्वे. ३-४ ; हिरण्यगर्भं पश्यत जायमानम् । ४।१२.

मानले आहेत. रुद्र हा विज्ञाता, जगद्गुरु मानला आहे. शिवपुराणांत रुद्र हा शिवाचा पहिलाच अवतार मानला आहे व त्या अवताराचें स्वरूप, चरित्र आणि नाम वगैरे सर्व परमशिवाप्रमाणेंच आहे, असें म्हटलें आहे. तात्पर्य, शिवपुराणांत रुद्र शिवरूप कल्याणकारीच मानला आहे. त्याचप्रमाणें ऋग्वेद व यजुर्वेदांतहि तो शंकर म्हणजे कल्याण करणारा, पापनाशक असल्याचें वर्णिलें आहे. रुद्र हे निग्रहानुग्रहकारी व्यापक तत्त्व आहे. यामुळें तो विरोधी धर्माश्रय आहे. रोगकारक तो व रोगनिवारक तोच. घातक तो व रक्षकहि तोचें.

याज्ञिक वाङ्मयांत रुद्रासंबंधीं स्विष्टकृत हा शब्द येतो. त्याचा अर्थ, ज्याच्या योगानें यज्ञाला पूर्णता येते तो, असा समजावा. तो भवभयहारक आहे म्हणून त्यास प्रपंचोपशम म्हटलें. ब्रह्मदेवाचे पांचवें मस्तक त्यानें तोडलें यांतील भाव हाच आहे. दक्ष = सोम, रुद्र = अग्नि, यांच्यांतील मानलेलें वैर असेच लाक्षणिक आहे. दक्ष रुद्रकृपेनें जीवभाव टाकतो व अज या ब्रह्मभावांत उरतो, हें आध्यात्मिक रहस्य आहे.

कार्यब्रह्म ह्या दृष्टीनें जेथें रुद्राचें जन्मकर्म वर्णिलें आहे, तें परमशिवाच्या जणुं नातवंडाप्रमाणें आहे. पुत्राच्या पोटीं पिता पौत्ररूपानें यावा व त्यानें आपल्या आजाचेंच नांव चालवावें, त्याप्रमाणें रुद्राचा जन्म आहे. त्याचें रडणें म्हणजे सोऽहम् हेंच होय. या सोऽहम्मधूनच नामरूपात्मक अष्टमूर्ति निर्माण झाल्या. असा हा विषय अतिसूक्ष्म आणि गूढ आहे. शिवरुद्राप्रमाणेंच शिवशक्ति, शिवगणेश, शिवकार्तिकेय, शिवनंदी या संज्ञांत वस्तुतः अमूर्ततत्त्वांचे सूक्ष्म विचार आहेत. ज्या शिवपंचायतनास कित्येक आधुनिक आक्षेपक अनार्यांचीं दैवतें मानतात, तीं वस्तुतः कारणब्रह्म-रूपाचींच अंगें आहेत. आर्यांच्या पूर्वीचे ते अनार्य या अर्थानें वाटल्यास त्यांस अनार्य म्हणावें. पण अनार्य म्हणजे निंद्य व तिरस्करणीय असें त्यांस मानणें हें अक्षम्य अज्ञान होय. हा सामान्य ऐतिहासिक दृष्टीचा विषयच नव्हे. सृष्टिविज्ञानांतील कार्यकारणात्मक अशा अकल्पनीय अवस्थांसच शिवसतिविवाह, शिव-पार्वती-विवाह, कुमारसंभव, गणेशजन्म इत्यादि

---

१ शिवपुराण ( नवलकिशोर प्रेस ), उत्तरार्ध, खंड ७, अ. १.

२ या ते रुद्र शिवातनूरघोरापापनाशिनी । तया नस्तनुवा शन्तमया गिरिशन्ताऽभिचाकशीहि ॥ — रुद्र १।३

सगुणपर रोचक नावें देऊन अज जें कारणब्रह्म त्या अमूर्ताचें मूर्तिकरणद्वारा पुराणकारांनीं अद्‌भुतरम्य शिवचरित्र वर्णिलें आहे. स्थलाभावास्तव त्याचा अधिक विचार या प्रकरणांत करतां येत नाहीं. या मूलतत्त्वांस आधिदैवत जगात सगुण साकार असें देवतारूप प्राप्त झालेलें असलें, तरी अखिल विश्वाचीं आरंभक व नित्यनियामक अशीं हीं दैवतें अनार्य, अवैदिक व ग्राम्य आहेत, असें आक्षेप घेणें, हें अत्यंत असंबद्ध व हास्यास्पद आहे, हें सुज्ञ वाचकास आता वेगळें सांगावयास नकोच.

शिवरुद्राचें ज्याप्रमाणें आध्यात्मिक, आधिदैविक व आधियाज्ञिक महत्त्व आहे, तसा ज्योतींचा ज्योति असें त्याचें महत्त्व वर्णिलें जातें. शिवरात्रीच्या अखेर वद्य चतुर्दशीच्या पहाटे जे सूर्यकिरण प्रभातीं वर दिसतात, त्याच जटा होत, उषा तीच गंगा होय मावळती चंद्रकोर धारण करणारा तोच चंद्रशेखर जाणावा. तसेंच वृषभ, मिथुन, कर्क, सिंह या राशि उदित असता वृषभ म्हणजे नंदी, मिथुन म्हणजे अविनाभूत शिवपार्वती, कर्क म्हणजे गणपति, सिंह म्हणजे आसन, कन्या म्हणजे गंगा, यास प्रकाशित करतो तो रुद्रमार्तंड असें कोणी वर्णन करतात याशिवाय मृगशीर्ष नक्षत्र, व व्याधाचा तारा यांवर अनेक शिवरुद्रकथा आधारल्या आहेत, त्या कोठवर सांगाव्या? असें हें शिवरुद्राचें आख्यान अतिगूढ व आश्चर्यमय आहे

आता शिवलिंगोपासनेसबंधीं तज्ज्ञ काय म्हणतात तें सामान्यतः अगोदर सविस्तर सांगून, नतर तपशीलवार अनेक आक्षेपाचा विचार स्थलावकाशाकडे लक्ष ठेवून पुढें प्रकरणश करीन.

**पंचविसांचे दृष्टीं। शिवा नाहीं तेथें भेटी॥ १॥ छत्तिसां वेगळा। भरला असे तो निराळा॥ २॥ चाळिसांचे ध्यानीं-मनीं। कदां नये शूलपाणी॥ ३॥ वेसे विचारे भागले। तया नाहीं रूप कळलें॥ ४॥ एकाजनार्दनीं रूप। स्वयंप्रकाश अमूप॥ ५॥**

---

प्रकरण ४ थें

## लिंगपीठोपासना



गुह्यानन्दात्मिका शक्तिः लिंगरूपः शिवः परः ।
तयोर्मिथुनकौशल्यं जगदानन्दकारणम् ॥

—आनन्दानुभव.

शिवलिंगोपासना अथवा लिंगपीठोपासना यासंबंधीं जे ठळक आक्षेप व संदेह आहेत, ते मीं सारांशरूपानें सन १९४१ सालीं श्रीक्षेत्रकाशी येथें प्रसिद्ध होणाऱ्या श्रीभारतधर्म महामंडळाच्या सूर्योदय नामक त्रैमासिक, व सिद्धान्त नामक साप्ताहिक यांच्या संपादकांस खुलाशासाठीं कळविले होते. त्या माझ्या प्रश्नपत्रिकेच्या उत्तरादाखल श्रीभारतधर्म महामंडळाचे महात्मे व श्री. करपात्रीजीमहाराज या थोर व अधिकारी पुरुषांनीं अनुक्रमें 'सूर्योदय' व 'सिद्धान्त' या नियतकालिकांत आपल्या खुलाशाचे लेख प्रसिद्ध करण्याची कृपा केली. त्यांत या ग्रंथांतील चिकित्सेपैकीं महत्त्वाच्या मुद्यांवर थोर तज्ज्ञांकडून प्रकाश पडत असल्यामुळें ग्रंथविस्तारभयाकडे दुर्लक्ष करून त्या समग्र लेखांचें भाषांतर पुढें देत आहें. त्यांत प्रारंभीं माझ्या प्रश्नपत्रिकेचाहि सारांश दिला आहे.

[ सन १९४१ च्या डिसेंबरच्या 'सूर्योदया'च्या अंकावरून ]

### लिंगपीठोपासना

**प्रश्न**—सनातनधर्मीयांची योनिपीठसहित लिंगोपासना पाहून पाश्चात्य विद्वानगण तसेंच त्यांचे आधुनिक शिष्य, आंग्लशिक्षित भारतवासीगण असें म्हणतात कीं, ही उपासना मूळची असभ्य जातीची व ग्राम्य होती. ती तशी अनार्य जातीची उपासना मागून आर्यांनीं ग्रहण केली. तरी अशी ग्राम्य आणि लज्जाजनक उपासना कशी रूढ झाली?

श्रीमहाभारत, पद्मपुराण, स्कन्दपुराण, लिंगपुराण इत्यादि पुराणांत आणि अनेक तंत्रग्रंथांत या उपासनेचें वर्णन विस्तृत रीतीनें केलेलें आढळतें. मग हिला आधुनिक अथवा अर्वाचीन कसें म्हणतां येईल?

जर हा उपासनाविधि शास्त्रोक्त आहे आणि योनिपीठासह शिवलिंगाची अर्चना ही चातुर्वर्ण्य आणि कलियुगाचे पचमवर्ण, तसेंच सर्व स्त्री-पुरुष या सर्वांस जर सांगितली आहे, तर मग या विरोधी शंकाचें समाधान कसें करावें? स्त्री पुरुष सहयोगाला यात आदर्श मानलें आहे की नाही? शिवपार्वतीच्या अनेक लीलाचें वर्णन पुराणात पुष्कळ आहे, त्याचा या उपासनेशीं संबंध आहे कीं नाहीं? असल्यास ह्या लीलाचें रहस्य काय?

स्कदादि पुराणें व अनेक तत्रशास्त्रें यात जर शिवानें हें शास्त्ररहस्य योनी-प्रमाणें गुप्त राखलें पाहिजे असें सांगितलें आहे, तर अशा गोप्यगोपनीय विषयाचीं उघड चिन्हें करून त्याची पूजा कशी प्रचलित करण्यात आली?

श्रीभगवान् सदाशिव जगद्गुरु आहेत त्यानीं आपल्या तृतीय नेत्रानें काम जाळला, ते सृष्टीचे लयकर्ते आहेत, त्यास अलिंगी म्हणतात, त्यास महादेव असें म्हणतात, मग ते अशा ( निंद्य मानलेल्या अश्लील ) प्रतीक द्वारा कसे पूजले जातात?

बाणलिंगाच्या ठिकाणीं शिवाची पूजा करतात परतु त्या ठिकाणीं योनि-पीठाचा काहीच संबंध असत नाहीं इत्यादि अनेक शका प्रश्नपत्रिकेंत[1] होत्या त्याचें समाधान पुढें केलें जात आहे

पहिल्या प्रथम आपल्या सनातनधर्माची सस्कृति आणि आपली दार्शनिक दृष्टि याचें रहस्य समजून घेतलें पाहिजे आपल्या भारतद्वीपाची संस्कृति आणि अन्य देशाची सस्कृति यात महान् अंतर आहे सनातनधर्मीयाची सस्कृति आध्यात्मिकप्रधानतामूलक आणि अन्य देशातील लोकाची संस्कृति आधिभौतिक-लक्ष्यमूलक आहे भारतद्वीपाची सस्कृति अन्त शुद्धिमूलक असते अन्य देशवासीयाच्या सस्कृतीशीं अन्त शुद्धीचा सबंध नसतो केवळ बाह्यस्वरूपाशीं तिचा संबध असतो सनातनधर्मीयाच्या सस्कृतींत दैवी राज्याची प्रधानता आणि अतर्दृष्टि याचा समन्वय राखला जातो अन्य देशीवासीयाच्या सस्कृतींत, दैवी राज्याचा काहींच संबंध न मानता, केवळ बाह्य स्वरूपाचा संबंध मानला जातो या दोन सस्कृतींमध्यें दिवस-रात्रीप्रमाणें स्पष्ट भेद असल्यामुळें दोहोंच्या समाजात फारच अंतर पडलेलें

१ माझ्या प्रश्नपत्रिकेची नक्कल आज मजजवळ आढळत नाहीं तरी वरील साराशानें तिची जरूरीपुरती कल्पना येईल

असतें. याच कारणास्तव सनातनधर्मी परस्त्रीला स्पर्श करणें अनुचित मानतात. उलट पाश्चात्य लोक मद्यपान करून परस्त्रीला आलिंगन देऊन तिच्याशीं नृत्य करणें, त्याचप्रमाणें परस्परांनीं एकमेकांच्या मुखाचें चुंबन घेणें, यांस अयोग्य समजत नाहींत. अशा विपरीत संस्कृतीशीं वशवर्ती झालेले अन्य देशवासी विद्वान् किंवा आजच्या भारतवर्षांतील आंग्लशिक्षित व्यक्ति, जगाच्या मूळकारणरूप पुरुषत्व किंवा नारीत्व यांच्या मुख्य चिह्नांचें नांव घेतांच आपल्या चित्तांतील कलुषित संस्कारांना अनुसरून विचलित होऊन निंदा करण्यास प्रवृत्त होतात. याप्रमाणें गैरसमजुतीमुळें अशा (लिंगपीठाच्या) उपासनेला ते लज्जास्पद समजतात व या संबंधानें अनेक ऐतिहासिक मिथ्या तर्ककुतर्क करीत असतात.

सनातनधर्मी स्थूल पदार्थांची उपासना करीत नाहींत. ते सर्वव्यापक दैवी सत्तेचें एका पीठविशेषामध्यें केंद्रीभवन करून तें पीठ आपल्या उपासनेला आलंबन मानतात. दैवी पीठ उत्पन्न करण्याचे शास्त्रांत अनेक भेद आहेत. आणि त्याशिवाय स्वाभाविक पीठें पण अनेक आहेत. जल, अग्नि, देवमूर्ति, स्थंडिल आदि नवीन दैवी पीठ उत्पन्न करण्याच्या पदार्थांचीं उदाहरणें होत. प्राचीन नित्य पीठांचीं नांवें शास्त्रांत अनेक आढळतात. उदाहरणार्थ, १०८ पीठें व प्राचीन तीर्थादि. दार्शनिक युक्तीनें हें सिद्ध आहे कीं, स्त्रीविद्युच्छक्ति आणि पुरुषविद्युच्छक्ति यांचा संगम झाल्यावांचून विद्युत्क्रिया संपादन होत नाहीं. त्याचप्रमाणें प्राणमय कोषाच्या आकर्षणविकर्षण क्रियांच्या समन्वयानेंच दैवी पीठाचा आधार बनतो. दुसरें, सर्व शास्त्राचा हा सिद्धांत आहे कीं, ब्रह्म आणि ब्रह्मप्रकृति हीं दोन जेव्हां पृथक्त्वानें प्रतीत होतात, तेव्हां त्या अवस्थेला सगुण ब्रह्म असें म्हणतात. याच ब्रह्म आणि ब्रह्मप्रकृति यांच्या परस्पर आलिंगित अवस्थेलाच शास्त्रांत सर्वशक्तिमान् सगुण ईश्वर म्हणतात. उपनिषदांच्या साररूपी श्रीमद्भगवद्गीतेंत याच विज्ञानाचें अनेक प्रकारें वर्णन केलें आहे. भगवान् म्हणतात कीं, मी पुरुष आहें आणि योनिरूपिणी प्रकृतींत मी गर्भाधान करतों, त्यांतूनच ही सृष्टि उत्पन्न होत असते.

---

१. शक्ति व शक्तिपीठें हा विषय या मूळ ग्रंथात लिहिलेला असूनहि तो ग्रंथविस्तारभयास्तव गाळला आहे तरी या लेखांतून पीठसंदर्भ गाळतां येत नाहींत

हा शास्त्रीय विषय मनाला पटण्याकरिता पुरुष, प्रकृति, योनि, गर्भाधान, याहून समर्पक शब्द अन्य आढळणार नाहीत यामुळें प्रकृतिपुरुषात्मक सगुण ब्रह्माची वैज्ञानिक मूर्ति उपासकाच्या नजरेपुढें आणण्यासाठीं मग लिंगात्मक चिह्न अत्यंत उपयोगी आहे यांत शंका नाहीं या कारणास्तव योनिपीठसहित लिंगोपासनाद्वारां साधक भगवान् शिवाचें सांनिध्य प्राप्त करून घेतो यांप्रमाणें शिवलिंगोपासना सर्वांना सारखीच हितकारी असल्याचें दर्शविलें आहे कर्मकाण्डांतहि जें वैदिक कुण्ड तयार करतात, त्यांतहि हीं दोन चिह्नें असतातच यांप्रमाणें हें सगुण ब्रह्माचें चिह्न उपासनाकाण्ड व कर्मकाण्ड यांत यथास्थानीं संबंधयुक्त राहाणें स्वाभाविक आहे ही उपासना चिरकाल प्रसिद्ध आहे ती आधुनिक नाहीं 'सूर्योदया'च्या सप्टेंबरच्या (सन १९४१) अंकात 'वेद और शास्त्रज्ञानलाभ' नामक प्रबन्ध जो पृष्ठ १४७ वर छापला आहे. त्यांत वेद आणि शास्त्राच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होण्यासाठीं कोणकोणत्या गोष्टींची आवश्यकता असते तें संक्षेपत सांगितलें आहे त्या गोष्टी आत्मसात् केल्यानें अशा रहस्याच्या गोष्टी समजणें सोपें जाईल तसेंच शास्त्राच्या तीन भाषा व शास्त्रांत वर्णिलेले तीन प्रकारचे भाव एकत्र गुंतलेले असल्यानें शास्त्राचा अर्थ कसा करावा त्याचेंहि दिग्दर्शन होऊ शकतें

योनिपीठाशीं त्रिगुणात्मक मूलप्रकृति आणि चिन्मयलिंगाशीं पुरुषोत्तम-रूपाचा संबंध आहे अर्थात् लौकिक स्त्रीपुरुषसहयोगाशीं त्याचा संबंध जोडतां येत नाहीं स्त्रीपुरुषसहयोगाचा सृष्टीशीं (सृजन जन्म) संबंध असतो उलट सगुण ब्रह्मरूपी शिवलिंगोपासना हा लय अर्थात् मुक्तीचा विषय आहे या लिंगोपासनेनें प्रकृतिपुरुषात्मक धारणेची सिद्धि होते धारणासिद्धीनंतर सगुण ब्रह्माच्या ध्यानाची सिद्धि साधकाला प्राप्त होते आणि त्यानंतर चिन्मय अलिंगभावाच्या अवलंबनानें साधक महाभावसमाधीला प्राप्त होऊन समाधि-क्षेत्रांत विचरण करूं लागतो

१ (१) समाधि (समाधिगम्य विषयवर्णन)
(२) लौकिक=ऐहिक व्यावहारिक temporal
(३) परकीय=मन्वंतर मन्वन्तरातील आधिदैविकादि लोकांतील गूढ विषय. metaphysi.

२ आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक

शिवपार्वती यांच्या लीलांचें जें वर्णन पुराणांत आढळतें, तें अति विचित्र आहे, यांत शंका नाहीं. परंतु तें सर्व वर्णन समाधि भार्षेत आहे, किंवा लौकिक भाषेचें आहे; तसेंच तें सर्व वर्णन आध्यात्मिक जगताचें आहे किंवा आधिदैविक जगताचें आहे, हें पुरें ध्यानीं घेतलें, तरच त्या चमत्कार-लीलांच्या सागरांतून साधकास पैलपार जातां येतें.

शास्त्रास रहस्यगोपन करण्याची जी आज्ञा आहे, ती अधिकारभेदामुळें आहे. अर्थात् तो विचाराचा विषय आहे. परंतु हा उपासना आणि आचाराचा विषय आहे. यांतील रहस्यसमूह अवश्य गोपनीय आहे; परतु ज्या पीठाचे ठिकाणीं याची उपासना होत असते, तें एक स्थूल आलंबन आहे. यामुळें त्या ठिकाणीं गौप्यगोपनाचा कांहींच संबंध असत नाहीं. तो विषय वेगळा व हा विषय वेगळा आहे. तो जगद्गुरु आहे, तो ज्ञानरूपी नेत्रानें कामदेवाला भस्म करून टाकणारा आहे, तो सृष्टीचा लयकर्ता असल्यामुळें मुक्तिविधाता आहे, तो आलिंग अर्थात् रूपरहित आहे. तसेंच तो दैवी जगतांत सर्वांहून मोठा व पूज्य असल्यामुळें त्यास महादेव म्हणतात. या कारणास्तव सगुणब्रह्माची अशा स्पष्ट चिह्नद्वारां पूजा करण्याचा विधि सांगितला आहे.

बाणलिंग मंत्रशास्त्राप्रमाणें नित्य यंत्र आहे. शालिग्राम शिळेप्रमाणें बाणलिंगाचे ठिकाणीं पीठाचें आवाहन-विसर्जन होत नाहीं. या कारणास्तव बाणलिंगालाहि नित्यपीठ म्हणतात. ज्याच्या ठिकाणीं पीठशक्ति सदा विद्यमान् असते त्याला नित्य पीठ म्हणतात. म्हणून बाणलिंगाजवळ पीठचिन्ह असो नसो, दोन्ही अवस्थांत त्याची पूजा होऊं शकते.

[सन १९४१ च्या 'सिद्धान्तपत्रा'च्या अंक २० व २१ वरून]

## लिंगोपासनारहस्य

[लेखक : श्रीहरिहरानंदसरस्वती ऊर्फ श्रीस्वामी करपात्रीजी]*

"शान्तं शिवं चतुर्थं मन्यन्ते," इत्यादि श्रुतींनीं सर्वाधिष्ठान, सर्वप्रकाशक,

* वर निर्दिष्ट केलेल्या माझ्या प्रश्नपत्रिकेचें उत्तर ता. १७।२।४२ चा अंक ४४ यांत आहे. पण तें अति त्रोटक आहे. त्यांत मागील २०।२१ (सन १९४१) या अंकांतील लेखांचा हवाला दिला आहे. म्हणून त्याच लेखांचें भाषांतर दिलें आहे. तेंच जास्त विस्तृत व उद्बोधक आहे.

परब्रह्मपरमात्म्यासच शिवतत्त्व म्हटलें आहे. हाच सच्चिदानंद परमात्मा आपण स्वतः शिवशक्तिरूपांत प्रकट होतो. तो परमार्थतः निर्गुण, निराकार असूनहि आपल्या अचिंत्य लीलाशक्तीच्या योगानें सगुणसाकार सच्चिदानंद-घनरूपांतहि प्रकट होतो. हेंच शिवशक्तितत्त्व राधाकृष्ण, अर्धनारीश्वर इत्यादि रूपांत प्रकट होतें. सत्तेवांचून आनंद नाहीं व आनंदावांचून सत्ता नाहीं. 'स्वप्रकाश सत्तारूप आनंद' असें म्हटल्यानें आनंदाच्या वैषयिक सुखरूपतेची व्यावृत्ति होते. ज्याप्रमाणें आनंदसिंधूचें माधुर्य हें स्वरूपच आहे, त्याप्रमाणें पार्वती म्हणजे शिवाचें स्वरूप किंवा आत्मा आहे. माधुर्यावांचून आनंद नाहीं व आनंदावांचून माधुर्य नाहीं.

दुसऱ्या दृष्टीनें " सर्वयोनिषु कौन्तेय मूर्तयः संभवन्ति याः। तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥" ( गीता १४।४ ) समस्त प्राणिवर्गांत जितक्या व्यक्ति उत्पन्न होतात त्या सर्वांची योनि अर्थात् त्यांस जन्म देणारी माता प्रकृति आहे आणि बीज देणारा शिव ( लिंग ) पिता मी आहें. अर्थात् मूळ प्रकृति आणि परमात्माच त्या त्या माता-पिता ( योनिलिंग ) रूपांत त्या त्या मूर्ति अथवा वस्तु उत्पन्न करतात[1]. ज्याप्रमाणें लोकांत प्रजोत्पादनाच्या कामनेनें स्त्रीच्या ठिकाणीं गर्भाधान करतात, त्याचप्रमाणें " एकोऽहं बहुस्यां, प्रजायाय।" इत्यादि श्रुतींच्या अनुसार एक ब्रह्मतत्त्वच प्रजोत्पादन किंवा बहुभवन या कामनेनें प्रकृतीच्या ठिकाणीं गर्भाधान करतें. "सोऽकामयत।" हा प्रजोत्पादनासंबंधीं कामच प्रथम आधिदैविक काम आहे. या कामनेनें प्रकृति संसृष्ट होऊन भगवान् अनंत ब्रह्माण्डें उत्पन्न करतो. हा काम भगवानाचाच अंश आहे. " कामस्तु वासुदेवांशः। " —भागवत.

लोकांमध्येंहि प्रेम, काम किंवा इच्छा यांचा मुख्य विषय आनंदच असतो. सुखांत कामना ही साक्षात् व अन्य वस्तु सुखाचें साधन म्हणून इच्छिल्या जातात. याचसाठीं आनंद आणि तद्रूप आत्मा निरतिशय, निरुपाधिक परप्रेमाचें स्थान आहे. कान्ताला कान्तेची कामना, ही त्याला सुखाभिव्यंजक म्हणजे सुखमय होईल या समजुतीनेंच होत असते. कामना किंवा तृष्णा यांनीं व्यथित झालेल्या अंतःकरणांत स्वरूपभूत आत्मानंदाची उपलब्धि

१. अर्थात् मूळ प्रकृति और परमात्मा ही उन उन माता-पिता ( योनिलिंग ) रूप में उन उन मूर्तियों ( वस्तुओं ) का उत्पादन करते हैं.

होत नाहीं. परतु अभिलाषित कान्तेची प्राप्ति झाल्यावर ती तृष्णा एक क्षणभर निवृत्त होते. बस, त्याच वेळीं अंतर्मुख झालेल्या किंचित् शान्त मनाचे ठिकाणीं आत्मानंदाची उपलब्धि होते. पण आत्म्यांत आनंद असतो किंवा आनंदाभिव्यंजक तृष्णेच्या निवृत्तींत तो असतो, हें केवळ विवेकी मात्र जाणतो. अविवेक्याला आत्म्याच्या स्वरूपभूत आनंदाची जाणीव नसते. तृष्णानिवृत्तीलाहि तो आनंदाभिव्यंजक समजत नाहीं. उलट तृष्णानिवर्तक सुन्दर कान्तेच्या ठिकाणींच तो आनंद मानतो. त्यावरून तो पुन्हां तिची इच्छा करतो व पुन्हा कान्ताप्राप्तीच्या तृष्णारूप व्यथेच्या निवृत्तीनें आनंदी होऊन पुन्हां तिची इच्छा करतो. विवेकी समजतो कीं, कान्तेच्या प्राप्तीनंतर जरी आनंद होतो, तरी कान्ता ही साक्षात् आनंदरूप नाहीं. तर तृष्णानिवृत्तीपूर्वक मनाच्या शांतीमुळें आत्म्याचाच आनंद प्रकट होतो आनंदाचें कान्ता हें दूरचें कारण आहे आणि तेंहि आनंदजनकत्व किंवा आनंदमयत्व तिच्या ठिकाणीं भ्रांतीनें मानल्यामुळेंच. ज्याप्रमाणें पिपाच्या प्रभावानें साखर कडू व निंब गोड लागतो, त्याचप्रमाणें भ्रांति किंवा मोहामुळें मांसमय कान्तेच्या ठिकाणीं आनंदाचें भान होतें. परतु याव्यतिरिक्त शुद्ध आनंद किंवा आत्मा याच्या ठिकाणीं जें प्रेम, (किंवा) आनन्दकामना असते ती स्वाभाविक असते. ती आत्म्याच्या अंशभूत असते. यास्तव अद्वैत आत्माच निरुपाधिक प्रेमाचें स्थान मानतात. परतु त्या ठिकाणीं प्रेम व त्याचा आश्रय अथवा विषय यात भेद नाहीं. प्रेम, आनन्द, रस हें सारें आत्म्याचेंच स्वरूप होय. रसरूप आनन्दांतूनच समस्त विश्व उत्पन्न होतें. त्यामुळें सर्वांत तो असणें अनिवार्य आहे या कारणास्तव ज्याप्रमाणें सोपाधिक आनन्द आणि सोपाधिक प्रेम सर्वत्र आहेच, त्याचप्रमाणें कांतापण सोपाधिक आनन्दरूप मानतां येणें शक्य आहे म्हणून ती सोपाधिक प्रेमाचा विषयपण आहे. परंतु निरुपाधिक प्रेम तर निरुपाधिक आत्म्याच्या ठिकाणींच असणें योग्य आहे. ज्याप्रमाणें सत् याच्या सविशेषरूपांत अनुकूलता, प्रतिकूलता, हेयता, उपादेयता असते, निर्विशेष तर एक शुद्ध आत्माच आहे; त्याचप्रमाणें सविशेष आनन्द आणि प्रेमांतहि हेयता, उपादेयता असते. सुन्दर, मनोहर देवता आणि तद्विषयक प्रेम इत्यादि उपादेय आहे. सुन्दर वेदयार्दीची आनन्दरूपता आणि

तद्विषयक प्रेम हेय आहे. ज्याप्रमाणें अति पवित्र दुग्धहि अपवित्र पात्राच्या संसर्गानें अपवित्र मानलें जातें, त्याचप्रमाणें आनंद आणि प्रेमसुद्धां अपवित्र उपाधींच्या संसर्गानें दूषित होतें. शास्त्रनिषिद्ध विषयांत आनंद आणि प्रेम दोष आहेत, हेय आहेत. शास्त्रविहित विषयांत आनंद आणि प्रेम पुण्य आहे, उपादेय आहे. परंतु निर्विशेष, सर्वोपाधिमुक्त प्रेम, आनंद तर स्पष्ट आत्मा किंवा ब्रह्मच होय. असें असूनहि आनंद आणि प्रेम सर्व ठिकाणीं आहे. आत्म्याचेंच रूप असून अपवित्र विषयाचा दोषामुळें कामिनीआदिविषयक प्रेमाला काम, राग इत्यादि म्हणतात. उलट देवताविषयक प्रेमाला भक्ति-आदि म्हणतात.

सजातीयाच्या ठिकाणीं सजातीयाचें आकर्षण होतें. प्रेम किंवा काम म्हणजे हेंच आकर्षण होय. कान्ताकान्त या दोहोंत असणाऱ्या तत्तदवच्छिन्न रस किंवा आनंद यांत जें परस्पर आकर्षण असतें, तोच काम होय.

समष्टि ब्रह्माचें प्रकृतीकडील आकर्षण तोच आधिदैविक काम होय. परंतु जेथें शुद्ध, सच्चिदानंदघन परब्रह्माच्या स्वरूपांतच आकर्षण होतें, किंवा आत्म्याचें आपल्याच अत्यंत अभिन्न स्वरूपांतच जें आकर्षण किंवा निरतिशय निरुपाधिक प्रेम असतें, तें आत्म्याचेंच स्वरूप होय. हेंच राधाकृष्ण, गौरीशंकर, अर्धनारीश्वर यांचें परस्पर प्रेम, परस्पर आकर्षण होय आणि हें शुद्ध प्रेमच शुद्ध काम होय. हेंच कामेश्वर अथवा कृष्णाचें स्वरूपपण आहे. अनंत ब्रह्मांडांत विस्तीर्ण कामबिंदु मन्मथ होय. अनंतब्रह्मांडनायकाच्या प्रकृतीच्य ठायीं वीर्याधानाचा प्रयोजक कामसागर साक्षात् मन्मथ होय. परंतु सौंदर्य-माधुर्यसारसर्वस्व, निखिलरसामृतमूर्ति अशा कृष्णचंद्राचें आपल्याच स्वरूपभूत माधुर्याधिष्ठात्री राधेच्या ठिकाणीं जें आकर्षण असतें तें तर साक्षान्मन्मथ-मन्मथच होय. त्याचें पूर्णतम सौंदर्य असें अद्भुत आहे कीं, तें त्यालाहि विस्मित करतें. काम त्याच्या पदनखमणिचंद्रिकेच्या रश्मिच्छटेला पाहून मुग्ध झाला, त्याचा स्त्रीत्वपुंस्त्वभाव लोपला, त्यानें आपल्या मनांत असा दृढभाव धारण केला कीं, अनंत जन्म तप करून व्रजांगनाभाव प्राप्त करून श्रीकृष्णाच्या पदनखमणिचंद्रिकेची सेवा प्राप्त करीन. परंतु इकडे तर कृष्णानेंहि आपल्याच रूपावर मुग्ध होऊन त्या रसाच्या समास्वादनासाठीं व्रजांगनाभाव-प्राप्त्यर्थ तपस्या करण्याचा विचार केला. या ठिकाणीं शुद्ध परमतत्त्वाचे ठायींच

शिवशक्तिभाव, अर्धनारीश्वरभाव आणि शुद्ध आकर्षणप्रेम किंवा काम आहे. सत्‌रूप गौरी तसेंच चित्‌रूप शिव हीं दोघें जेव्हां अर्धनारीश्वररूपांत मिथुनीभूत होतात त्याच वेळीं पूर्णसच्चिदानंदाचा भाव व्यक्त होतो. परंतु हा भेद केवळ औपचारिक मात्र आहे. वास्तविक पाहतां तीं दोन्ही एकच होत.

कांहीं महानुभवांचें म्हणणें आहे कीं, पूर्ण सौंदर्य आपल्याच ठिकाणीं आपलें प्रतिबिंब आपलें आपण पाहूं शकतें. भगवान् आपलेंच स्वरूप पाहून विस्मित होतात. "विस्मापनं स्वस्य च सौभगर्द्धेः।" बस. यांतूनच प्रेम किंवा काम प्रकट होतो. त्यानेंच शिवशक्तीचें संमीलन होतें, हाच शृंगाररस होय. कामेश्वर, कामेश्वरी, श्रीकृष्ण-राधा, अर्धनारीश्वर, म्हणजे हाच. पूर्ण सौंदर्य अनत आहे. अप्सरांचें सौंदर्य त्यापुढें नगण्य आहे. ह्याच सौंदर्याच्या एक कणमात्रेनें विष्णूनें मोहिनीरूपांत शिवाला मोहवश केलें. याच्याच एका लेशमात्रेनें मदन मुनींना मोहित करतो. हेंच सगुणरूपांत, कोठें ललितारूपांत, तर कोठें कृष्णरूपांत प्रकट होतें. "षोडशी तु कला ज्ञेया सच्चिदानंदरूपिणी।" (सुभगोदय), "नित्यं किशोर एवासौ भगवानन्तकान्तकः।" कधीं आद्य ललिताच पुरुषरूप धारण करून कृष्ण बनते व तीच वंशीनादानें विश्वाला मोहित करते. "कदाचिदाद्या ललिता पुंरूपा कृष्णविग्रहा। वंशीनाद समारम्भादकरोद्विवशं जगत्॥" (तन्त्रराज) प्रकृतिपार, सौंदर्यमाधुर्यसार, आनंदरससार परमात्म्याच्या ठिकाणीं शिवपार्वतीभाव बनतो. अनन्तकोटीब्रह्माण्डोत्पादिनी अनिर्वचनीय शक्तिविशिष्ट ब्रह्माचे ठिकाणीं पण शिवपार्वतीभाव आहे. त्या परमात्म्याच्या ठायीं पण लिंगयोनिभावाची कल्पना आहे.

निराकार, निर्विकार, व्यापक दृक् किंवा पुरुषतत्त्वाचें प्रतीक तेंच लिंग होय आणि अनंत ब्रह्माण्डोत्पादिनी महाशक्ति प्रकृति हीच योनि, अर्घ्य, किंवा जलहरि होय. केवळ पुरुषापासून सृष्टि उत्पन्न होऊं शकत नाहीं किंवा केवळ प्रकृतीपासूनहि सृष्टि उत्पन्न होणार नाहीं. पुरुष निर्विकार, कूटस्थ आहे. तसेंच प्रकृति ज्ञानविहीन व जड आहे. यामुळें सृष्ट्युत्पत्तीसाठीं दृक्-दृश्य, प्रकृति-पुरुष, यांचा संबंध आवश्यक होतो. गीतेंत पण प्रकृतीला परमात्म्याची योनि मानली आहे. "मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्। सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत॥" भगवान् म्हणतात, महद्ब्रह्म-प्रकृति माझी योनि आहे, त्या ठिकाणीं मी गर्भाधान करतों;

तेव्हां त्यांतून महदादिक्रमानें समस्त प्रजा उत्पन्न होते. प्रकृतिरूप योनींत प्रतिष्ठित होऊनच पुरुषरूप लिंग विश्वाचें उत्पादन करतें. याप्रमाणें योनिलिंगसंबंधावांचून कोठेंहि कसलीहि सृष्टि होत नाहीं, पण येथें एक गोष्ट अवश्य लक्षांत घेतली पाहिजे कीं, लोकप्रसिद्ध मांसचर्ममयच लिंग आणि योनि नव्हे. उलट ती व्यापक आहे, उत्पत्तीच्या उपादान कारणरूप पुरुषाचें चिन्हाला लिंग म्हणतात. दृश्य अण्डरूप ब्रह्महि अदृश्य पुरुषब्रह्माचें चिन्ह आहे. आणि तेंच या जगाचें उपादानपण आहे. अर्थात् तें लिंगपदवाच्य आहे. लिंग आणि योनि ( हे शब्द ) पुरुष-स्त्रीचें गुह्यांगपर असल्यामुळेंच त्यांना अश्लील मानणें योग्य नाहीं. गहूं, यव आदींत ज्या भागांतून अंकुर फुटतो त्याला योनि म्हणतात. दाणे व्यक्त होण्यापूर्वी जें छत्र उगवतें तें लिंग होय.

ब्रह्मदेव अथवा देवता यांच्या संकल्पांतून उत्पन्न होणाऱ्या सृष्टीचाहि संबंध लिंगयोनीशीं आहे. अर्थात् येथें लिंग-योनि शब्दांनीं शिवशक्तीच विवक्षित आहेत. उत्पत्तीचे आधारक्षेत्र भग आहे. बीज लिंग आहे. वृक्ष-अंकुरादि सर्व प्रपंचाच्या उत्पत्तीचें क्षेत्र भग होय. बीज पुरुषलिंग आहे. ज्याप्रमाणें हृक्तत्त्व व्यापक आहे तसेंच प्रकृतितत्त्वपण आहे. म्हणून तर कधीं कधीं लोकप्रसिद्ध योनिलिंगाचे संबंधावांचूनहि मानवी संकल्पजा सृष्टि उत्पन्न होत असे. कोठेंहि कशी का सृष्टि उत्पन्न होवो, तेथें सृष्टीच्या उत्पादनानुकूल शिवशक्तीचा संबंध अवश्य मानावाच लागतो. वृक्ष, लता, दूर्वा, तृणादि सर्व तत्त्वाच्या उत्पत्तींत तदुपयुक्त शिवशक्तीचा संबंध अनिवार्य आहे. योगसिद्ध महर्षींचा प्रकृतीवर अधिकार चालत असे. यामुळें ते संकल्प, स्पर्शन, अवलोकन इत्यादि द्वारा सृष्टीचा उपयुक्त लिंगयोनिसंबंध स्थापित करूं शकत. प्रसिद्ध लिंगयोनि वस्तुतः लिंगयोनि नव्हत. तीं खऱ्या लिंगयोनींच्या अभिव्यक्तीचीं गोलकरूप स्थानें आहेत. इंद्रियें त्याहून पृथक् सूक्ष्म पदार्थ आहेत. प्रसिद्ध नासिका किंवा कान हीं घ्राण किंवा श्रोत्र ( इंद्रियें ) नव्हत. ते सारे इंद्रियाचे गोलक आहेत. घ्राण, श्रोत्र इत्यादि इंद्रियें अति सूक्ष्म आहेत. तीं नेत्रादि इंद्रियांचे विषय नाहींत. असें असूनहि त्यांचें त्या गोलकांत विशेषरूपांत प्राकट्य होत असतें. याप्रमाणें कधीं कधीं हे गोलक जसे असावयाचे तसे असूनहि त्यांतील इंद्रिय शक्ति क्षीण झालेली आढळते. त्या वेळीं दर्शन,

श्रवण, वास इत्यादि अनुभवास येत नाहींत. योगी लोकांना घ्राण, श्रोत्र, नेत्र यांच्या संबंधावांचूनहि दूरदर्शन, श्रवण घडतें. याप्रमाणें लौकिक प्रसिद्ध लिंग-योनि आदि केवळ गोलक आहेत. त्यांत व्यक्त होणारें योनिलिंग अतीन्द्रियच आहे. त्याचप्रमाणें प्रजनन इंद्रिय, वीर्य, रज आदि सुद्धां त्याचें मुख्यरूप नाहींत. तर त्यांच्यापेक्षां सूक्ष्म त्यांच्या ठिकाणीं विशेषरूपानीं व्यक्त दृक्दृश्यच शिवशक्ति होत.

अथवा ज्याप्रमाणें अग्नितादात्म्यापन्न लोहपिंडाचे ठिकाणीं दाहकत्व व प्रकाशत्व असूं शकते; त्याप्रमाणें पुरुषप्रतिबिम्बोपेतच अचेतन प्रकृति चेतित होऊन विश्वाला निर्माण करते. ज्याप्रमाणें पुरुषाचें सर्वांगसारवीर्य ग्रहण करून योनि सन्तानरचना करते, त्याचप्रमाणें पुरुषप्रतिबिंब सुद्धां पुरुष समानाकार पुरुषाची प्रतिकृतिहि होतें. त्यापासून अचेतन प्रकृतींत पण चेतनाचा संचार होतो. येथें मूर्तिपूजेंतील भाव हाच असतो कीं, दृश्याकडून अदृश्याची पूजा होते. शाळिग्रामात विष्णूची भावना करतात. केवळ काष्ठ, पाषाण, धातूची पूजा करीत नाहींत. तर मंत्र आणि विधान यांच्या महिम्यानें आहूत, संनिहित, व्यापक देवतातत्त्वच मूर्तींत आराध्य असतें. व्यष्टिद्वाराहि प्राण्याच्या मनाच्या ठिकाणीं समष्टिभावाचें आरोहण होतें. याप्रमाणें समस्त व्यष्टिलिंगाचे ठायीं व त्याचप्रमाणें अन्यत्रहि व्यापक शिवतत्त्वाची समष्टि मूर्ति महादेव–लिंग होय.

ज्याप्रमाणें व्यष्टि नेत्राचा अधिष्ठाता समष्टिनेत्र सूर्य आहे, त्याचप्रमाणें व्यष्टिप्रजननशक्तीच्या ठिकाणीं व्याप्त शिवतत्त्वाचें समष्टिस्वरूप शिवलिंग आहे. ज्याप्रमाणें व्यष्टिनेत्राची उपासना न होतां, समष्टिनेत्ररूप सूर्याचीच आराधना होते, आणि प्रतिमापण त्याचीच करतात, त्याचप्रमाणें समष्टि शिवमूर्तीचीच उपासना व प्रतिमा करतात. ज्याप्रमाणें जाग्रत, स्वप्नाची उत्पत्ति व लय सौषुप्त तमाकडूनच होतात, त्याप्रमाणें तमाकडून सर्वांचा उद्भव व त्यांतच सर्वांचा लय होतो. तम ज्याच्या स्वाधीन आहे, असा त्याचा अधिष्ठाता शिवच सर्वकारण आहे. कार्यांच्या कारणांचा आद्यंत पत्ता सापडत नाहीं.

हें वर सांगितलेंच कीं, समस्त योनींची समष्टिरूप प्रकृति आहे. तीच शिवलिंगाचें पीठ किंवा जलहरी आहे. योनींत प्रतिष्ठित लिंग आनन्दप्रधान,

आनंदमय होतें. ज्याप्रमाणें समस्त रूपाचा आश्रय चक्षु, समस्त गंधाचा आश्रय एकायतन-प्राण आहे, त्याप्रमाणें समस्त आनंदाचें एकायतन लिंगयोनिरूप उपस्थ आहे. अतएव प्रकृतिविशिष्ट ह्रद्रूप परमात्मा आनंदमय म्हटला जातो. सुषुप्तींतसुद्धां त्याच्या अंशभूत व्यष्टिआनंदमयाचा अनुभव घडतो. प्रिय, मोद, प्रमोद, आनंद हे आनंदमयाचे अवयव आहेत. शुद्ध ब्रह्म या सर्वांचा आधार आहे. ज्या अर्थी अनंत ब्रह्मांडोत्पादिनी प्रकृति समष्टियोनि आहे, त्या अर्थी अनंत ब्रह्मांडनायक परमात्माच समष्टिलिंग आहे. आणि अनंत ब्रह्मांड प्रपंचच त्यापासून उत्पन्न झालेली सृष्टि आहे. वास्तव परमप्रकाशमय, अखंड, अनंत शिवतत्त्वच वास्तविक लिंग आहे, आणि तें परमप्रकृतिरूप योनि-जलहरीच्या ठायीं प्रतिष्ठित आहे. त्याचीच प्रतिकृति पाषाणमयी, धातुमयी, जलहरी आणि लिंग या रूपांत बनविली जाते.

अदूरदर्शी अज्ञ प्राण्याच्या दृष्टीनें सांसारिक सुखांत सर्वाधिक सुख प्रियाप्रियतम परिष्वंग मैथुनांत आहे. यास्तव त्याच्या उदाहरणानेंच श्रुतीनें अनंत, अखंड, परमानंद, ब्रह्म आणि प्रकृतीच्या आनंदमय स्वरूपाचें दिग्दर्शन केलें आहे. कोठें कोठें जीवात्म्याचें परमात्मसम्मीलन-सुखाचें दिग्दर्शन वरील दृष्टान्तसुखानें केलें आहे. "तद्यथा प्रियया भार्यया सम्परिष्वक्तो नान्तरं किंचन वेद न बाह्यम्॥" ज्याप्रमाणें प्रियतमेच्या आलिंगनांत कामुकाला आनंदोद्रेकानें बाह्याभ्यंतर विश्वाचें विस्मरण पडतें, त्याचप्रमाणें जीवाला परमात्म्याच्या सम्मीलनांत प्रपंचाचें विस्मरण होतें. श्रुतींत, तसेंच पुराणांत आध्यात्मिक व आधिदैविक तत्त्वाचें वर्णन लौकिक मार्गांत केलें जातें. त्यामुळें कधीं कधीं अज्ञ जनांना त्यांत अश्लीलता दिसू लागते. गोलोकधामांत एक पूर्णतम पुरुषोत्तम श्रीकृष्णानें एकाकी रमेना म्हणून आपल्याच ठिकाणीं दोन रूपें व्यक्त केलीं, एक श्यामतेज व दुसरें गौरतेज. गौरतेज राधिकेच्या ठिकाणीं श्यामलतेज कृष्णाकडून गर्भाधान झाल्यावर महत्तत्त्व, प्रधान, हिरण्यगर्भ उत्पन्न झाले. हीपण प्रकृतिपुरुषसंयोगातून महत्तत्त्वादि प्रपंचाची उत्पत्ति रूपकाच्या द्वारा सांगितली आहे.

यातून असाहि भावार्थ निघू शकतो कीं, जाग्रत, स्वप्नाचे अभिमानी, विश्व, तैजस आणि विराट, हिरण्यगर्भ हे सर्व सावयव आहेत; पण सर्वलयाधिकरण ईश्वर निरवयव आहे. तो मायेनें आवृत होतो. अविद्येच्या आत असणारा

जीव आहे. परंतु जो 'अत्यतिष्ठद्दशांगुलम्' या सिधान्तानुसार अविद्येचें अतिक्रमण करून स्थित आहे तोच ईश्वर होय. निरावरणतत्त्व शिव आहे. ईश्वरभाव मायेनें आवृत आणि शिवभाव अनावृत आहे. माया जलहरी आहे व त्यांत आवृत ईश्वर आहे. जलहरीच्या बाहेर आलेलें शिवलिंग निरावरण ईश्वर आहे ज्याचे पृथक् पृथक् अंग व्यक्त नाहीं तो पिण्डरूपच असणार. सुषुप्तींत प्रतीयमान विशिष्ट आत्मभावाची सूचक पिंडी आहे. शिवाच्या संकल्पमात्रानें प्रकृति स्वतां विकाररूपांत प्रवाहित होते. यामुळें अर्धगोल नाहीं, दीर्घ आहे. लिंगाच्या मूळाशीं ब्रह्मा, मध्यें विष्णु व वरती प्रणवात्मक शंकर आहे. लिंग महेश्वर, अर्घा महादेवी आहे—"मूले ब्रह्मा तथा मध्ये विष्णुस्त्रीभुवनेश्वरः रुद्रोपरि महादेवः प्रणवाख्य सदाशिवः ॥ लिंगवेदी महादेवी लिंगं साक्षान्महेश्वरः । तयोः सम्पूजनान्नित्यं देवी देवेश्च पूजितौ॥" (लिंगपुराण) चैतन्यरूप लिंगसत्ता आणि प्रकृति यांपासूनच ब्रह्मांड उत्पन्न झालें. त्यांच्याच आश्रयानें तें लयास जाऊं शकेल. अर्थात् शुद्ध मोक्षासाठी त्यांच्याच द्वारां पोहोंचलें पाहिजे. Compare Rig-ved.

याशिवाय प्रणवांत अकार शिवलिंग आहे, उकार जलहरी आहे, मकार शिवशक्तीचें संमीलित स्वरूप मानलें जातें. शिवब्रह्माचा स्थूल आकार विराट ब्रह्मांड आहे. ब्रह्मांडआकाराचेंच शिवलिंग असतें. निर्गुण ब्रह्माचें तें बोधक असल्यामुळें तें ब्रह्माण्डलिंग आहे. अथवा उकार म्हणजे जलहरी, अकार पिंडी आणि मकार त्रिगुणात्मक त्रिपुंड्र असेंहि म्हणतात. अथवा निराकाराचा आकाशरूप आकार, ज्योतिः स्तंभाकार, तसेंच ब्रह्मांडाकार आदि सर्व स्वरूपांत शक्तिसहित शिवतत्त्वाचा निवेश आहे. सर्वरूप, पूर्ण, तसेंच निराकाराचा आकार, अण्डाच्या आकाराचा असतो; मैदानांत उभें राहून पाहिलें असतां पृथ्वीवर टेकलेलें आकाश अर्ध अंडाकारच दिसतें. पृथ्वीच्यावर असें आकाश आहे तसेंच खालीं आहे. दोन्ही मिळून अंडाकार होतें. आत्म्यापासून आकाशाची उत्पत्ति आहे, त्याच निराकाराचें ज्ञापक लिंग त्याचें स्थूल शरीर आहे. पंचतत्त्वात्मिका प्रकृति त्याची पीठिका आहे. आकाश पण अमूर्त आणि निराकार असल्यामुळें विशेष रूपात तर प्रत्यक्ष होत नाहीं, तरी पण तें कांहीं तरी आहे, असा निश्चय होतो. त्याचाच सूचक भावमय गोलाकार आहे. शिवब्रह्म निराकार असूनहि सारें कांहीं आहे. निर्विशेष पण सर्वविशेषरूप असतेंच.

चिदाकाशाचे ठिकाणी पण अशा त-हेची शिवलिंगाची भावना आहे या अण्डाकार रेषेंतूनच सर्व अक निर्माण होतात हें कोणत्याहि अकापुढें आलें असता त्याची दसपट करतें

ज्योतिर्लिंगाचें स्वरूप याप्रमाणें समजलें पाहिजे— "नासदासीन्नो सदासीत्तदानीं नासीद्रजो नो व्योमापरो यत्।" ( ऋ ८।७।७ ) "न सन्न चासच्छिव एव केवल।" अर्थात् पहिल्यादा काहींच नव्हतं, केवळ शिवच होता "सर्वे निमेषा जज्ञिरे विद्युत पुरुषादधि। नैनमूर्ध्वं न तिर्यञ्च न मध्ये परिजग्रभत्।" यातूनच विद्युत् पुरुष आणि पुढ त्यातून निमेषादि कालविभाग उत्पन्न झाले हाच विद्युत् पुरुष ज्योतिर्लिंग झाला त्याचा पार, आदि, अत, मध्य केन्द्रादि, कोणालाहि सापडला नाहीं हाच "तदण्डमभवद्धैम सहस्रांशु समप्रभम्।" ( मनु० ) होय अर्थात् सूर्यासारखें परम तेजोमय अड उत्पन्न झालें "तल्लिङ्ग सहित साक्षात्तेजो माहेश्वर परम्। तदेव मूल प्रकृतिर्माया च गगनात्मिका॥" ( शिवपुराण ) ब्रह्माडपिंड सप्तावरणप्रकृतिरूप योनीनें आवृत—परिवेष्टित—आहे शिवपुराणात लिंग शब्दाची व्युत्पत्ति पुढीलप्रमाणें सांगितली आहे

"भगवन्त महादेव शिवलिंग प्रपूजयेत्। लोकप्रसविता सूर्यस्तच्चिह्न प्रसवाद्भवेत्॥ लिंगे प्रसूतिकर्तार लिंगिन पुरुषो यजेत्। लिङ्गार्थगमक चिह्न लिङ्गमित्यभिधीयते॥ लिङ्गमर्थ हि पुरुष शिव गमयतीत्यद। शिवशक्त्योश्च चिह्नस्य मेलन लिङ्गमुच्यते॥" अर्थात् शिवशक्तीचें समेलनच लिङ्ग आहे लिंगाच्या ठायीं विश्वप्रसूतिकर्त्याची अर्चा केली पाहिजे हा परमार्थ शिवतत्त्वाचा गमक—बोधक असल्यामुळें लिंग म्हटला जातो प्रणव पण भगवानाचा ज्ञापक असल्यामुळें लिंग म्हटला गेला आहे पचाक्षर हें त्याचें स्थूल स्वरूप आहे —"तदेव लिङ्ग प्रथम प्रणव सार्वकामिक। सूक्ष्मप्रणवरूप हि सूक्ष्मरूपन्तु निष्कलम्॥ स्थूललिङ्ग हि सकल तत्पञ्चाक्षरमुच्यते॥" माघ कृष्ण चतुर्दशी महाशिवरात्रीच्या दिवशीं कोटिसूर्यासमान परम तेजोमय शिव लिंगाचा प्रादुर्भाव झाला आहे "माघ कृष्ण चतुर्दश्यामादिदेवो महानिशि। शिवलिङ्गतयोद्भूत कोटिसूर्यसमप्रभ।"

शिवपुराणात लिहिलें आहे कीं, एक शिवच ब्रह्मस्वरूप असल्यामुळें निष्कल

आहे. दुसरे देव सर्वरूपी असल्यामुळें सकल म्हटले जातात. निष्कल असल्यामुळेंच शिवाचें निराकार ( आकारविशेषशून्य ) लिंग पूज्य ठरतें. सकल असल्यामुळेंच अन्य देवतांचा साकार विग्रह पूज्य ठरतो; शिव सकल-निष्कल उभयविध आहे. म्हणून त्याचें निराकारलिंग आणि साकार स्वरूप दोन्ही पूज्य ठरतात. दुसऱ्या देवता साक्षात् निष्कल ब्रह्मरूप नाहींत, म्हणून निराकारलिंगरूपांत त्यांची उपासना होत नाहीं ( विद्येश्वर संहिता, शिवपुराण, अ० ३ ). येथेंच पुढें निष्कल स्तंभरूपात ब्रह्माविष्णु यांचा वाद मिटविण्यासाठीं शिवाचा प्रादुर्भाव झाल्याचें वर्णन आहे. श्रीशिवलिंगांतूनच समस्त विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि अखेर त्यांतच सर्वांचा लय होतो. सर्वांचा आश्रय व लयस्थान असल्यामुळें भगवानाला लिंग म्हणतात किंवा कार्यद्वारां कारण-रूपानें लिंगित-अवगत-होत असल्यामुळें भगवान् लिंगपदवाच्य आहे. वास्तव ज्या अर्थी सर्व सृष्टीचा आधारच शिवलिंग आहे, त्या अर्थी सर्वत्र शिवलिंगपूजा आढळते हें ठीकच आहे. आतां ही पहिली अनार्यांची पूज्य मूर्ति होती हें सारें म्हणणें निराधार आहे.

## [ २ ]

दुसऱ्या दृष्टीनें कूटस्थ स्थाणु परब्रह्म सुद्धां शिव आहे. श्रीपार्वतीशक्ति या अपर्णा लतेच्या संसर्गानें हा पुराण स्थाणु, कल्पवृक्षांनाहि जी देतां येणार नाहीं, ती कैवल्यपदवी देतो. स्थाणु ( खुंट ) लिंगरूपांत व्यक्त शिव आहे. अपर्णा जलहरी आहे. शिवलिंगाचा कांहीं अंश जलहरीनें ग्रासलेला असतो. तो योनिग्रस्त लिंग होय. प्रकृतिसंस्पृष्टपुरुषोत्तम होय. "पीठमम्बामयं सर्वं शिवलिंगञ्च चिन्मयम्," वरील महान् अंश योनिबहिर्भूत प्रकृतीपासून असंस्पृष्ट आहे.—" पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि।" प्रकृति-विशिष्ट परम ब्रह्मच सर्व कर्ता, सर्व फलदाता आहे, केवल तर उदासीन आहे. शुद्ध शिवतत्त्व त्रिगुणातीत आहे. त्रिमूर्त्यंतर्गत शिवपण परमबीज, तमो-गुणाचा नियामक आहे. सत्त्वाच्या नियमनापेक्षां तमाचें नियमन फार कठिण आहे. सर्वसंहारक तम आहे. पण त्यालाहि स्वाधीन ठेवणाऱ्या शिवाची विशेषता स्पष्टच आहे.

एका दृष्टीनें लिंग चिन्हालाहि म्हणतात. चिह्नशून्य निर्गुण, निराकार,

निर्विकार ब्रह्म अलिंग आहे. श्रुति त्याला अशब्द, अस्पर्श, अरूप असें वर्णिते परंतु, लिंगाचें अधिष्ठान मूळ तेंच आहे. अव्यक्त सत्त्व लिंग आहे मायाद्वारां एकच परब्रह्म परमात्म्यापासून ब्रह्माण्डरूप लिंगाचा प्रादुर्भाव होतो चोवीस प्रकृति-विकृति, पचविसावा पुरुष, सव्विसावा ईश्वर हे सारे काहीं लिंगच आहेत. यातून ब्रह्माविष्णुरुद्र याचा आविर्भाव होतो. प्रकृतीच्या सत्त्व, रज, तम या तीन गुणाची त्रिकोण योनि बनते प्रकृतींत स्थित निर्विकार बोधरूप शिवतत्त्वहि लिंग आहे. याला विश्व-तैजस-प्राज्ञ, विराट्, हिरण्यगर्भ, वैश्वानर, जाग्रत-स्वप्न-सुषुप्ति, ऋक्-साम-यजु, परा पश्यन्ति-मध्यमा; आदि त्रिकोण पीठात, तुरीय, प्रणव, परावाक्स्वरूप लिंगरूपात समजलें पाहिजे. अ. उ. म. ह्या प्रणवात्मक त्रिकोणात अर्धमात्रास्वरूप लिंग आहे. परमेश्वर समष्टि-व्यष्टि लिंगरूपानें प्रत्येक योनींत प्रतिष्ठित होऊन पचकोशात्मक देहाना उत्पन्न करतो. "अधितिष्ठति योनिं यो योनिं वा चैकईश्वर.। देह पचविध येन तमीशान पुरातनम्॥ (लिंग. पु. ११८)

लिंगभगापासूनच समस्त विश्वाची उत्पत्ति होते. वास्तव सारे लिंग-भगाचे अंकित आहेत. वेद, उपनिषदें, भारत, रामायण, पुराण, तंत्र सर्वत्र शिवाचा महिमा वर्णिला आहे विष्णु, ब्रह्मा, कृष्ण, राम, आदि देवाधि-देवानींहि शिवलिंगाची अर्चा केली आहे सृष्टिविस्तारदृष्टीनें लिंगभगाचें महत्त्व समजू शकतें. कामप्रयुक्त भोगमनेच्या दृष्टीनें पाहाण, ही गोष्ट वेगळी आहे शंकरानें कामाला जाळून सृष्टीच्या बुद्धीनेंच मैथुनद्वारा सृष्टि उत्पन्न केली असेंच इतरानीं करणें योग्य आहे. एरवादे वेळीं दृक् आणि दृश्य दोन्ही एकरूप होतात "आसीज्ज्ञानमथो ह्यर्थ एकमेवाविकल्पितम्" सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी ज्ञान आणि अर्थ (दृश्य) (एकमेक) एकच होते दृश्य शक्तीच्या उद्भवावाचून सर्वसद्रष्टा चिदात्माहि आपणाला असत् मानू लागतो "मेनेऽसन्तमिवात्मान सुप्तशक्तिरसुप्तदृक्" (भागवत) ती अतर्मुख विमर्शरूप सुप्तशक्तिच माया शब्दानें निर्दिष्ट केली जाते "सा वा एतस्य सद्रष्टु शक्ति सदसदात्मिका। माया नाम महाभाग ययेद निर्ममे विभु।" निरधिष्ठान शक्ति नसते आणि शक्तिहीन अधिष्ठान नसतें. अर्थात् उभय उभयस्वरूप आहेत. वास्तव शिवच शक्ति व शक्तिच शिव या दृष्टीनें योनि-लिंगात्मक तसेंच लिंग योन्यात्मक आहे. असें असूनहि या

द्वैतात अद्वैत तत्त्व अनुस्यूत आहे ईश्वर आणि महाशक्तीची अधिष्ठानभूत अद्वैतसत्ता पण निरंजन, निष्कल सत्तेशीं एकीभूत असते. ती सृष्टीचें बीज असूनहि निःस्पद शिवमात्र आहे अव्यक्त अवस्था अलिंगावस्थापण आहे तिला महालिंगावस्था पण म्हणता येते. अव्यक्तापासून तेजोमय, ज्योतिर्मय तत्त्व आविर्भूत होतें तें स्वयं उत्पन्न होतें असल्यामुळें स्वयंभूलिंग असतें तें अव्यक्त अवस्थेचें परिचायक असल्यामुळें लिंग आहे परमार्थत द्वैतशून्य तत्त्व आहे योनि त्रिकोण आहे, केन्द्र किंवा मध्यबिंदु लिंग आहे — "मूलाधारे त्रिकोणाख्ये इच्छाज्ञानक्रियात्मके। मध्ये स्वयंभुलिङ्गं तु कोटिसूर्यसमप्रभम्॥" या वचनात इच्छा ज्ञान-क्रियात्मक योनींत कोटिसूर्यसमप्रभ स्वयंभू चिज्ज्योतिस्वरूप शिवलिंग मानलें आहे मूलाधार आदि षट्चक्र पण योनिच आहे सर्वत्र हें लिंग पण भिन्न भिन्न रूपात विराजमान असतें योनीच्या अतीत होऊन बिंदु अव्यक्त, आणि लिंग अलिंग बनतें. कोणतेंहि गुण, कर्म, द्रव्य याशिवाय योनीलिंगद्वारा बनू शकत नाहीं. याज्ञिकांकडेहि वेदीची स्त्रीरूपात, कुंडाची योनिरूपात आणि अग्निरुद्राची लिंगरूपात उपासना होत असते

एकदा देवीनें शंकराला प्रश्न केला कीं, इद्रियैरहित देव शून्यरूप आहे त्याचा कांहीं आकार नाहीं अशा शून्याच्या पूजेचें फळ काय? शिवानें उत्तर केलें, "महेशानि! शक्तिशून्यशिव शव किंवा प्रेतासमान आहे त्याची पूजा होऊ शकत नाहीं तर रौद्रीशक्तिसहितच त्याची पूजा झाली पाहिजे ती ब्रह्मा विष्णु शिवात्मिका आद्याशक्ति सार्द्धत्रिवलया (साडेतीन फेऱ्याची) कुंडलिनीरूपा आहे तिनें शिवतत्त्वाला साडेतीन फेऱ्यांनीं वेष्टित केलें आहे या शक्तीच्या संयोगानें शिव अनंत ब्रह्माण्डाचें उत्पादनादि कार्य करतो हीच कुंडलिनी योनि आहे हिनें परिवेष्टित शिवलिंग आहे हाच अपर्णालता परिवेष्टित स्थाणुपण आहे अपर्णा पार्वती योनि आहे कूटस्थ ब्रह्मच स्थाणु, खुंट किंवा लिंग आहे "देव्युवाच—इद्रियै रहितो देव शून्य रूप सदाशिव'। आकारो नास्ति देवस्य किं तस्य पूजने फलम्। शिव उवाच—प्रेते पूजा महेशानि कदाचिन्नास्ति पार्वति। रुद्रस्य परमेशानि रौद्री शक्तिरितीरिता। रौद्री तु परमेशानि आद्या कुण्डलिनी भवेत्। वर्त्तते परमेशानि ब्रह्माविष्णुशिवात्मिका॥ सार्द्धं त्रिवल्याकारे शिव वेष्ट्य

सदास्थिता। शक्तिं विना महेशानि प्रेतत्वं तस्य निश्चितम्॥ शक्ति संयोगमात्रेण कर्मकर्ता सदाशिवः। अतएव महेशानि पूजयेच्छिव लिङ्गकम्॥
—( लिंगार्चन तंत्र २ पटल. )

स्कंदपुराणप्रमाणें लिंगपूजन न केल्यानें महान् अमंगल घडतें. उलट त्याच्या पूजनानें भुक्तिमुक्ति सर्व कांहीं प्राप्त होतें. "विना लिङ्गार्चनं यस्य कालो गच्छति नित्यशः। महाहानिर्भवेत्तस्य दुर्गतस्य दुरात्मनः॥ एकतः सर्वदानानि व्रतानि विविधानि च। तीर्थानि नियमा यज्ञा लिङ्गाराधनमेकतः। भुक्तिमुक्तिप्रदं लिङ्ग विविधापन्निवारणम्॥" जरी शिवलिंग आणि त्याची पूजा अनादिकालापासून सुरू आहे, तरी तिच्या आविर्भावाचें पुराणांत वर्णन आहे. ब्रह्मा, विष्णु या दोघांनीं "मी मोठा" असें म्हणून वाद सुरू केला. त्यांचा तो विवाद मिटविण्यासाठीं परमज्योतिर्लिंगाचा आविर्भाव झाला. ब्रह्मदेव भगवानाच्या त्या ज्योतिर्लिंगाचा पत्ता काढण्यासाठीं हंसावर आरूढ होऊन वर गेले आणि विष्णु वराहरूप धारण करून खालीं गेले. हजारों वर्षे घोर परिश्रम करूनहि दोघांनाहि त्याचा आद्यन्त मिळाला नाहीं. शिवलिंगावरून खालीं पडणाऱ्या केवड्याच्या पानानें सांगितलें कीं, "मी दहा कल्पपर्यंत पडता पडतां येथपर्यंत येऊन पोहोंचलें, अजून मला पुढें किती जावें लागेल याचा कांहींच ठावठिकाणा कळत नाहीं." यावरून शिवलिंगाची अनंतता समजून येते. दिव्य वाणीनें भगवानांनीं ब्रह्मा-विष्णु या दोघास बोध केला.

अन्यत्र पृथ्वीला पीठ आणि आकाशाला लिंग म्हटलें आहे जसें वेदीवर लिंग विराजमान असतें, त्याचप्रमाणें पृथ्वीवर आकाश आहे ज्याप्रमाणें ब्रह्माचा एक देशमात्र प्रकृतिसंसृष्ट आहे, त्याप्रमाणें आकाशलिंगाचा पण एक देश पृथ्वीसंसृष्ट आहे यामुळें कोठें लिंग पुरुषाच्या जननेंद्रियाप्रमाणें असतें, कोठें ब्रह्माडाच्या आकाराचें, कोठें पिण्डाच्या आकाराचें असतें. केदारेश्वराची नित्यसिद्ध स्वयंभूमूर्ति कोठेंहि लिंगाच्या आकाराची नाहीं. त्या कारणावस्थेच्या किंवा पिण्डावस्थेच्या चिन्हाला लिंग समजलें पाहिजे. वस्तुदृष्टीनेंहि पुन्हां तें लिंगच आहे. आधुनिक वैज्ञानिकांच्या दृष्टीनें आकाश वक्र आहे. ब्रह्माला पण वक्र किंवा स्तब्ध म्हणतात. अर्थात् त्यापासून उत्पन्न

होणारें सारें वक्रच असलें पाहिजे. अनंत कोटि विश्व सारें लिंगमय आहे. विश्वातीत सगुण ब्रह्माचा पण लिंगच आकार आहे.

शिवशक्तीच्या एकान्तांत जाण्यास न मिळाल्यामुळें शुक्राचार्यांनीं त्याला शाप दिला कीं, तुझी योनिस्थ लिंगरूपांत पूजा होत जाईल. एकदां शंकर दिगंबर वेषांत स्वलिंग आपल्या हातांत धरून दारुक वनांत गेले. त्यांना पाहून ऋषिपत्न्या मोहित झाल्या. तें पाहून ऋषींनीं शंकराला शाप दिला कीं, तुझें लिंग गळून पडेल. त्याप्रमाणें झालें. पण लिंग पृथ्वीवर पडतांच तें प्रज्वलित होऊन आपल्या तेजानें लोक जाळूं लागलें. अखेर पार्वतीनें तें आपल्या योनींत स्थापन केलें. आणि सर्व ऋषींनीं आणि देवतांनीं त्याची पूजा केली. या ठिकाणीं लिंग, योनि, दिव्य प्रकृति आणि परमपुरुषच आहेत. शिवशक्तिरूप लिंग-योनि यांस प्राकृत स्त्रीपुरुषांप्रमाणें चर्मखंड मूत्रेंद्रियें मानणें हा फार मोठा अपराध होईल. या ठिकाणीं अशी पण कथा आहे कीं, मुनीच्या शापानें गळून पडलेलें शिवलिंग अग्नीप्रमाणें जाज्वल्यमान होऊन भूमि, स्वर्ग आणि पाताळ यांत फिरलें. सारे लोक फार दुःखी झाले. तेव्हां ब्रह्मदेव म्हणाले कीं, "गिरिजेची प्रार्थना करा. तीच योनिरूपानें परमज्योतिर्मय लिंग धारण करूं शकेल," मग सर्व देवतांनीं आणि मुनींनीं ज्या वेळीं आराधना केली, तेव्हां भगवान् व गिरिजा प्रसन्न झालीं आणि गिरिजेचे ठिकाणीं शिवाची प्रतिष्ठा झाली. साधारण लिंग गळून पडलें असतां तें अग्निमय होऊन सर्व लोकांत घुसणें शक्य आहे काय? आणि विष्णु, राम, कृष्ण त्याचप्रमाणें सारे देव, दैत्य, मुनि यांनीं काय केवळ साधारण लिंग-योनीचीच पूजा केली काय? जर अशीच गोष्ट असेल तर कृष्णानें उपमन्यूकडे जाऊन तेथें दीक्षापूर्वक घोर तपस्या करण्याची काय आवश्यकता होती?

कांहीं लोक वरील कथेंत आलेल्या शिवलिंगाला केवळ ब्रह्मांड मानतात. तेंच हातांत घेतलेले भगवान् लीलेनें दारुकवनांत गेले होते. तेथें मुनींच्या शापानें हातांतून लिंग गळून पडलें. याप्रमाणें तें गळून पडलें असें सांगितलें आहे, तुटलें असें नाहीं. या ज्योतिर्लिंगब्रह्मतेजाचा आधार पंचतत्त्वात्मिका प्रकृतीची योनि होय. म्हणून पार्वतीनें योनिरूपानें लिंगाला धारण केलें. अर्थात् पंचतत्त्वात्मिका प्रकृति बनून तिनें ब्रह्मांडाचें धारण केलें.

अग्निमय सर्वदाहक लिंगाला योनि-प्राकृतचर्मखंडाचे मूत्रेंद्रियामध्यें कोण

धारण करूं शकणार होतें? "बाणरूपा श्रुता लोके पार्वती शिववल्लभा।" योनिरूपाचा अर्थच बाणरूपा आहे. बाण शब्द पांच संख्येचा बोधक होतो. पंचशर या अर्थानें कामाचें ठिकाणीं, पंचमुख या अर्थानें शिव म्हणून, पंचतत्त्वात्मिका या दृष्टीनें पार्वती म्हणून, बाण या शब्दाचा प्रयोग होतो. त्याप्रमाणें विद्युत्-पुञ्ज पचतत्त्वांत व्याप्त होऊनहि जल आणि पर्वतश्रेणी या ठिकाणीं आधिक्यानें राहातो, त्याचप्रमाणें पार्वती बाणरूप झाली. अर्थात् पर्वतश्रेणीरूप झाली आणि तिच्या ठिकाणीं तें तेजोमय लिंग प्रविष्ट झालें. विद्युत्पुंज जर आपली योनि पृथ्वी किंवा जल यात पडला, तर तो स्थिर होतो. नाहींतर वृक्ष, मनुष्य त्यांच्याना तो भस्मच करतो. हीच गोष्ट शिवानें सांगितली आहे.— "पार्वतीञ्च विना नान्या लिङ्ग धारयितुं क्षमा। तया धृतश्च मल्लिङ्ग द्रुतं शान्ति गमिष्यति॥" अर्थात् पार्वतीशिवाय याला कोणी धारण करूं शकणार नाहीं. तिनें धारण केलें असतां तें त्वरित शांत होईल. "सतश्च योनिमसतश्च। (यजुः) "यो योनिं योनिमधितिष्ठत्येकः।" (श्वेताश्वतर) "यच्च स्वभावं पचति विश्वयोनिः।" (श्वेता.) इत्यादि मंत्रांत योनीचा अर्थ मूर्तेंद्रियच आहे असें म्हणणें हें अज्ञान आहे. श्रीविष्णु आदि देवाधिदेवांचेंहि पूज्य असें हें योनिप्रतिष्ठित लिंग प्राकृत वस्तु कधींच असूं शकणार नाहीं, जर कृष्णानें केलेल्या पूजाआदि कथेला क्षेपक म्हटलें, तर मग सारीच कथा क्षेपक मानतां येईल.

अव्यक्ताच्या लिंगाचे (व्यक्त ब्रह्मांड) भृगु (प्रकृति) च्या आकर्षणविकर्षणाच्या तारतम्यानें द्यावापृथ्वीरूपांत दोन तुकडे झाले. "वायुराश्चन्द्रमा इत्येते भृगवः।" (गोपथ पूर्व० २।८) "शंभो पपात भुवि लिङ्गमिदं प्रसिद्धम्। शापेन तेन च भृगोर्विपिने गतस्य॥"

श्रीशंकरानें पण विश्वेश्वर लिंगाची प्रतिष्ठापना आणि पूजा केली आहे. "ब्रह्मणा विष्णुना वापि रुद्रेणान्येन केन वा। लिङ्गप्रतिष्ठामुत्सृज्य। क्रियते स्वपदस्थितिः॥ किमन्यदिह वक्तव्यं प्रतिष्ठां प्रतिकारणम्। प्रतिष्ठितं शिवेनापि लिंगं विश्वेश्वरं यतः॥"

नारद पंचरात्राच्या वैष्णवांचा सर्वस्वरूप तिसरे रात्र मध्यें लिहिलें आहे कीं, एका शंकराशिवाय सारे क्षीण होते. ब्रह्मा-विष्णु-दक्ष आदींनीं आपल्या तपश्चर्येनें कालिका देवीला प्रकट केली. देवी म्हणाली, "वर मागा"

देवानें सांगितलें कीं, तू दक्षकन्या होऊन शिवाला मोहित कर जगदीश्वरी म्हणाली, "शंभु तर बालक आहे" ब्रह्मदेव म्हणाले, "शंभूसारखा दुसरा कोणी पुरुष असू शकत नाहीं" तें एकून देवी दक्षाकडे सतिरूपानें प्रकट झाली देवतांनीं त्याचा विवाह केला सती-शिवाच्या संयोगानें दोघांचें तेज भूमंडलांत पडलें तेंच पाताळ, भूतळ, स्वर्ग सर्वत्र योनिसहित शिवलिंग झालें लिंगपूजा शाक्त, वैष्णव, सौर, गाणपत्य सर्वांकरितां आहे "शाक्तो वा वैष्णवो वापि सौरो वा गाणपोऽथवा। शिवार्चनविहीनस्य कुत सिद्धिर्भवेत् प्रिये ॥" (उत्पत्तितन्त्रे) शिवाच्या पूजेविरहित अन्य देवताची पूजा केली असतां ते देव पूजा न घेतां शाप देऊन निघून जातात "अनाराध्य च मा देवि योऽर्च्चयेद् देवतान्तरम्। न गृह्णाति महादेवि शापं दत्वा व्रजेत् पुरम् ॥"

जरी शुद्ध दार्शनिक आणि आध्यात्मिक विवेचनाप्रमाणें शिवलिंग अनादिच आहे, त्याची पूजा पण अनादिच आहे, तरी अर्थवादरूपानें अनेक प्रकारें शिवलिंगाची उत्पत्ति व त्याच्या पूजेचा आरंभ सांगितला गेला आहे त्याप्रमाणें जरी नित्य सिद्ध रामकृष्णाचे अवतार मानले जातात, तरी अवताराच्या पूर्वीहि ते पूज्य होतेच कारण कल्पाकल्पाच्या ठिकाणीं त्याचे अवतार होत असतात कोणताहि अवतार नवा नाहीं त्याचप्रमाणें शिवलिंगाचेविषयीं समजलें पाहिजे तें नित्य असूनहि भिन्न भिन्न कल्पाचे ठायीं त्याच्या आविर्भावाचे क्रम भिन्न आहेत समष्टि प्रजजनशक्तिसंपन्न शिवतत्त्वच समष्टि लिंग आहे त्यातूनच समस्त व्यष्टि योनींचा व लिंगाचा आविर्भाव झाला आहे हेंच सतीशिवाच्या मैथुनातून प्रादुर्भूत झालेल्या तेजातून सयोनिलिंगाच्या उत्पत्तीचें रहस्य आहे. प्रकृतिपुरुषाचा संयोग हेंच शिवसतीचें मैथुन होय प्रकृतिमिश्रित अनंत पुरुषाचा प्रादुर्भावहि त्याचें मिश्रित तेज आहे समष्टि लिंगातून उत्पन्न होऊनच व्यष्टिलिंग बनतें अर्थात् साऱ्या व्यष्टिलिंगाची योनि पण समष्टि लिंगाचीहि योनि असते हेंच शिवाच्या दारुकवन विहाराचें रहस्य आहे

अनंत अनंग (कामदेव) ज्याच्या श्री अंगाच्या सौंदर्यबिंदूवर मोहून जातो, त्या भगवान् परम शिवाकडे समष्टि-व्यष्टि प्रकृतिरूप योनि आकर्षिल्या जाव्या हें स्वाभाविक आहे हेंच मुनिपत्न्यांचें शिवाकडे आकर्षिलें जाण्याचें

रहस्य आहे मुनींच्या किंवा शुक्राचार्यांच्या शापामुळें भगवानाचें योनिस्थ लिंगरूपात पूजन रूढ होणें, किंवा शिवलिंगाचें पतन होणें, मग त्यापासून जगत्ताप होणें, त्याची पार्वतीच्या योनींत स्थापना होणें, ब्रह्मा, विष्णु, आदि देवता आणि ऋषि, मुनि, गंधर्व, असुर यांच्या द्वारा त्याची पूजा होणें, ही सारी स्वतन्त्रेच्छु, निरकुश भगवानाची लीला होय ज्याप्रमाणें विष्णु परमात्म्यानें शापवश होत्साते मनुष्य, मत्स्य, वराह, आदि रूपें धारण करणें, केवळ लीला आहे, तसेंच हें जाणावें हीं शापादि निमित्तें पण त्याच्याच इच्छेनें उत्पन्न होतात प्रकृतिसह परमात्म्याचा खेळ किंवा जीवरूपा पराप्रकृतीच्या ठिकाणीं परमात्म्यानें रममाण होणें, किंवा स्वरूपमाधुर्याधिष्ठात्री शक्तीच्या ठिकाणीं परमात्म्याचें रमण रहस्यमय असतें ज्याप्रमाणें कृष्णानें केलेलें ( गोपींचें ) वस्त्रहरण, रासलीला, यात अज्ञ जनाना अश्लीलता प्रतीत होते, त्याचप्रमाणें भगवान् शिवाच्या लीला पण परम रहस्यमय असून त्यात अज्ञ जनाना अश्लीलतेचा भास होणें शक्य आहे निर्गुणरूपसुलभ अति, सगुण न जाने कोई । सुगम अगम नानाचरित, सुनि मुनिमन भ्रम होइ ॥ राम देखि मुनि चरित तुम्हारे । जड मोहही बुध होइ सुखारे ॥ " लिंगरूपाव्यतिरिक्त पण भगवानाचें गगाधर, चन्द्रशेखर, त्रिलोचन, पचवक्त्र, नीलकठ, कृत्तिवास, व्याघ्रचर्मासन, त्रिशूलधारी, वृषभध्वज, साम्ब, सदाशिव असें रूप आहे त्याचें सौंदर्य, माधुर्य लोकोत्तर आहे

" नान्त प्रज्ञ न बहि प्रज्ञ, " " प्रपञ्चोपशम शान्त शिवमद्वैत चतुर्थं मन्यन्ते, " " तमीश्वराणा परम महेश्वर, क्षर प्रधानममृताक्षर हरम् " " तमीशान वरद समीड्यम्, " " मायिनन्तु महेश्वरम् " या श्रुतींत परब्रह्म परमात्म्यालाच हर आणि मायेलाच प्रकृति किंवा गौरी म्हटलें आहे सर्व ठिकाणीं ससारात देह-देही इत्यादिरूपात आधार-आधेय भाव दिसून येतो अनत चैतन्य परमात्मा शिव आहे तोच सृष्ट्युन्मुख झाला कीं लिंगच जाणावा त्याचा आधार योनि प्रकृति आहे शिवलिंगरूपात पिता, प्रकृति योनिरूपात माता आहे " मम योनिर्महद् ब्रह्म, " " द्विधा कृतात्मनो देहमर्द्धेन पुरुषोऽभवत । अर्द्धेन नारी तस्या स विराजमसृजत्प्रभु । " शिवाचा लिंगयोनिभावच अर्द्धनारीश्वराचा भाव आहे सृष्टीचें बीज देणारा परमलिंगरूप श्रीशिव प्रकृतिरूपा नारीयोनीच्या ठिकाणीं आधाराधेयभावानें सयुक्त होऊन त्यानें

आच्छादित होत्साता व्यक्त होतो. हाच जगन्मातापिता या आदिसंबधाचा द्योतक आहे कामवासनारहित शुद्ध मैथुनच पितृऋणांतून मुक्त होण्याचें साधन आहे. शिवपुराणांत लिहिलें आहे कीं, बिंदु, देवी आणि नाद शिव आहे बिंदुरूपा, देवीमाता आणि नादरूप शिव पिता होय. वास्तव परमानंद-लाभार्थ शिवलिंगाचें पूजन परमावश्यक आहे. "भं वृद्धिं गच्छतीत्यर्थाद्भगः प्रकृतिरुच्यते," वृद्धीला प्राप्त होणारी प्रकृतीच भग होय. "मुख्यो भगस्तु प्रकृतिर्भगवान् शिव उच्यते । भगवान् भोगदाता हि नान्यो भोगप्रदायकः ॥" भगासहित लिंग आणि लिंगासहित भग पूजिलें असतां इहलोकीं व परलोकीं विविध सुख प्राप्त होतें. सदाशिवापासून उत्पन्नचैतन्यशक्ति द्वारां जाणला जाणारा चिन्मय आदिपुरुषच शिवलिंग होय. समस्त पीठ अंबामय आहे, लिंग चिन्मय आहे. भगवान् शंकर सांगतात कीं, जो संसाराचें मूलकारण-रूप महाचैतन्याला आणि लोकाला लिंगात्मक जाणून लिंगपूजा करतो, त्याच्याइतका मला दुसरा कोणी प्रिय नाहीं—"लोकं लिङ्गात्मकं ज्ञात्वा लिङ्गे योऽर्चयते हि माम् । न मे तस्मात्प्रियतरः प्रियो वा विद्यते क्वचित् ॥" लिंग चिन्ह आहे. सर्वस्वरूपाची पूजा कशी होते, यासाठीं लिंगाची कल्पना आहे. आदि आणि अंतीं जगत् अंडाकृतिच असतें. म्हणून ब्रह्मांडाची प्रकृतिच शिवलिंग आहे. शिवशक्तीच्या सहवासानेंच पशु, पक्षी, कीट, पतंगादिकांची उत्पत्ति होते. शिव लिंगी आणि शिवा लिंग होय. तें ज्ञापक आहे, प्राण्यांचें आलय आहे, आणि लयाधिकरण आहे. म्हणूनहि तें लिंग आहे. "लीयमानमिदं सर्वं ब्रह्मण्येव हि लीयते ।"

भिन्न भिन्न कामनांमुळें शिवलिंगाचें विधानपण पृथक् पृथक् आहे. यवमय, गोधूममय, सीताखंडमय, लवणज, हरितालमय, त्रिकटुकमय (सुंठ, पिंपळी, मिरीं), ऐश्वर्य-पुत्रादिकामप्रदायक लिंग आहे. गव्यघृतमय लिंग बुद्धि-वर्धक आहे. पार्थिव लिंग सर्वकामप्रद आहे. तिलपिष्टमय, तुषज, भस्मोत्थ, गुडमय, गन्धमय, शर्करामय, वंशांकुरज, गोमयज, केशमय, अस्थिमय, दधिमय, दुग्धमय, फलमय, धान्यमय, पुष्पमय, धात्रीफलोद्भव, नवनीतमय, दूर्वाकांडसमुद्भव, कर्पूरज, अयस्कान्तमय, वज्रमय, मौक्तिकमय, महा नील-मय, महेन्द्रनीलमणिमय, चीरसमुद्भव, सूर्यकान्तामणिज, चन्द्रकान्तमणि-मय, स्फटिक, शुलाख्यमणिमय, वैडूर्य, हैम, राजत, आरकूटमय, कांस्यमय,

सीसकमय, अष्टधातुनिर्मित, ताम्रमय, रक्तचंदनमय, रत्नमय, त्रिलोहमय, दारुज, कस्तूरिकामय, गोरोचनमय, कुंकुममय, श्वेतागुरुमय, कृष्णागुरुमय, पाषाणमय, लाक्षामय, वालुकामय, पारदमय, (याम्रमार्गे) लिंग भिन्न भिन्न कामनापूर्तीसाठीं पूजण्यास सांगितलें आहे. पार्थिव पूजेसाठीं ब्राह्मणादि वर्णांच्या क्रमानें शुक्ल, पीत, रक्त, कृष्णवर्ण अशा मृत्तिकेचें लिंग तयार केलें पाहिजे. एक तोळाभार मातीचें अंगुष्ठपर्वपरिमाणाचें लिंग तयार केलें पाहिजे. पूजा पण वैदिक, तान्त्रिक तसेंच मिश्रविधीची, नाममंत्रानें केली पाहिजे. किंबहुना, शिवलिंगाची विशेषता, पूजा आणि विधि यांसंबंधीं शास्त्रांत पुष्कळच माहिती दिली आहे. बाण किंवा नर्मदा लिंगाच्या परीक्षेसाठीं तें तांदुळादींनीं सात वेळां जोखावें लागतें. जर दुसऱ्या खेपेस जोखतांना तांदुळ वाढले, लिंग हलकें झालें, तर तें गृहस्थास पूज्य मानावें. जर लिंग अधिक भरलें तर विरक्तांना पूजणें योग्य मानावें आणि सात वेळां जोखून तें वजनांत जास्त–कमी भरलें नाहीं तर त्यास बाणलिंग, नाहींतर नार्मद–लिंग समजावें.

प्रायः शिवाला अनार्यांची देवता मानली जात असते. परंतु वेदांत शिवाचें प्राधान्यानें पुष्कळ वर्णन केलेलें आहे. "एको रुद्रो न द्वितीयाय तस्थुर्य इमाल्लोकानीशत ईशनीभिः। प्रत्यङ् जनांस्तिष्ठति सञ्चुकोचान्तकाले संसृज्य विश्वा भुवनानि गोपाः॥" (श्वे. ३।२) समस्त भुवनांचें आपल्या शक्तीनें पालन करीत सर्व ठिकाणीं विराजमान असणारा शिवच अखेर सर्वांचा संहार करतो. बस हेंच परमतत्त्वसर्वस्व आहे. याहून अन्य वस्तु नव्हतीच. "यदा तमस्तन्न दिवा न रात्रिर्न सन्न चासाच्छिव एव केवलः॥" जेव्हां प्रलयकाळीं दिवस-रात्र कार्यकारण कांहींच नव्हतें, त्या वेळीं एक शिवच होता. "स्वधया शम्भुः।" उमासहायं परमेश्वरं प्रभुं त्रिलोचनं नीलकण्ठं प्रशांतम्॥" "नमो नीलग्रीवाय शितिकण्ठाय।" (यजुः) या ठिकाणीं रुद्राचा नील आणि श्वेत दोन्ही प्रकारचा कंठ वर्णिला आहे. "ऋतं सत्यं परं ब्रह्म पुरुषं कृष्णपिङ्गलम्। ऊर्ध्वरेतं विरूपाक्षं विश्व–रूपाय वै नमो नमः॥" (तैत्तिरीयारण्यक) येथेंहि कृष्ण-पिङ्गल, ऋत-सत्य, उर्ध्वरेता-विरूपाक्ष यांस नमस्कार केला आहे. "भुवनस्य पितरं गीर्भिराभी रुद्रं दिवा वर्धया रुद्रमक्तौ। बृहन्तमृष्वमजरं सुषुम्नमृधग्धुवेम कविनेषिता

सः ॥" (ऋ० ६।४९।१०) "यो देवानां प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिपो रुद्रो महर्षिः। हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं स नो बुद्धया शुभया संयुनक्तु ॥" (श्वे० ३।४) "यो अग्नौ रुद्रो योऽप्स्वन्तर्य ओषधीर्वीरुध आविवेश। य इमा विश्वा भुवनानि चाक्लृपे तस्मै रुद्राय नमोऽस्त्वग्नये ॥" अथर्व. ७।९२।१) एको रुद्रो न द्वितीयाय तस्थुः ॥" (श्वे०) "एक एव रुद्रो न द्वितीयाय तस्थुः ॥" (तै. सं. १।८।६।१) अर्थात् अन्य देवांचें कारण, विश्वाचा एक मात्र स्वामी, अतीन्द्रियार्थ ज्ञानी आणि हिरण्यगर्भाला उत्पन्न करणारा रुद्र आम्हांला शुभ बुद्धि देवो. जो अग्नींत, जलांत, ओषधींत वनस्पतींत असतो, आणि जो सर्वांचा निर्माता आहे, त्या तेजस्वी रुद्राला आमचा प्रणाम असो. जो भुवनाचा पिता आहे, मोठा आहे, प्रेरक आणि ज्ञानी आहे, त्या अजराची आम्ही स्तुति करतों, इत्यादि.

जे असें म्हणतात कीं, अग्नि हाच वेदांचा रुद्र होय, त्यानें हें ध्यानांत घेतलें पाहिजे कीं, अग्नि, जलच काय, साऱ्या प्रपंचांत रुद्र आहे. ज्या अर्थी रुद्राहून भिन्न दुसरें तत्त्वच नाहीं, त्या अर्थी अग्निआदि सारा रुद्रच असणें हें ठीकच आहे. एकाच परमात्म्याचीं अग्नि, वायु, मातरिश्वा आदि नामें असतात. "एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति। अग्निं यमं मातरिश्वानमाहुः ॥" परंतु अग्नीहून भिन्न रुद्र नाहींच, ही कल्पना योग्य नाहीं. "ईशानादस्य भुवनस्य भूरेर्न वा उ योषद्रुद्रादसुर्यम् ॥" (ऋ. २।३३।९) या भुवनाच्या स्वामी रुद्रदेवाहून त्याची महाशक्ति पृथक् असूं शकत नाहीं. "अन्तरिच्छन्ति तं जने रुद्रं परो मनीषया ॥" (ऋ. ९।७३।२). मुमुक्षु या रुद्र परमात्म्याला मनुष्याच्या अंतरांत बुद्धिद्वारां जाणूं पाहतो. "असंख्याताः सहस्राणि ये रुद्रा अधिभूम्याम्।" "रुद्रस्य ये मीळ्हुषः पुत्राः ॥" (ऋ. ६।६६।३) "अज्येष्ठासो अकनिष्ठास एते संभ्रातरो वावृधुः। सोमगाय युवा पिता स्वपा रुद्र एषाम् ॥" (ऋ. ५।६०।५). रुद्रापासून उत्पन्न सारे रुद्रच आहेत. तत्त्वमस्यादि महावाक्याच्या अनुसार त्यांना पण एक दिवस महारुद्र, परमात्मा व्हावें लागेल. "स रुद्रः स महादेवः", "रुद्रः परमेश्वरः।" (अथर्व ११।२।३) इत्यादि मंत्रांत पण परमात्म्यालाच रुद्र, महादेव आदि म्हटलें आहे. जे असें म्हणतात कीं, शिवाहून रुद्र वेगळा आहे, त्यांनीं वेदांच्या अन्य मंत्रांकडे लक्ष दिलें पाहिजे. त्यांत स्पष्टपणें परमेश्वरालाच शिव,

त्र्यंबक, महादेव, महेशान, परमेश्वर, ईशान, ईश्वर आदि शब्द वापरले आहेत. "त्र्यंबकं यजामहे सुगन्धिं पुष्टिवर्द्धनम् । उर्वारुकमिव बन्धनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ।" (ऋक्.) "ये भूतानामधिपतयः कपर्दिनः।" (यजुः) असंख्याताः सहस्राणि ये रुद्रा अधिभूम्याम् । " "नीलग्रीवाः शितिकण्ठाः" (यजुः), "तमु ष्टुहि यः स्विषुः सुधन्वा यो विश्वस्य क्षयति भेषजस्य । यक्ष्वामहे सौमनसाय रुद्रं नमोभिर्देवमसुरं दुवस्य ॥" (ऋ० ५।४२।११) "क्षरं प्रधानममृताक्षरं हरः क्षरात्मानावीशते देव एकः" (श्वे० १।१०) 'सर्व व्यापी स भगवांस्तस्मात् सर्वगतः शिवः" (श्वे०३।११), आवो राजानमध्वरस्य रुद्रं होतारं सत्ययजं रोदस्योः । अग्निं पुरा तनयित्नोरचित्ताद्धिरण्यरूपमवसे कृणुध्वम्" (साम-कौथुम, १।७।७) त्वमग्ने रुद्रो असुरो महादिवस्त्वं शर्धो मारुतं पृक्ष ईशिषे ।" (ऋ०२।१।६) इत्यादि मंत्रांत अग्नीलाच रुद्र म्हटलें आहे. "स्थिरेभिरङ्गैः पुरुरूप उग्रो बभ्रुःशुक्रेभिः पिपिशे हिरण्यैः ।" या ठिकाणीं रुद्राला पुरुरूप, असाधारण, तेजस्वी आणि बभ्रुवर्ण वर्णिला आहे.

वैदिकांच्या शिवपूजेच्या सामग्रींत तामस पदार्थ कोणताच नाहीं. बिल्वपत्र, पुष्प, फल, धूप, दीप, नैवेद्य आदींनीं भगवानाची पूजा होते. मद्य-मांस यांचा तर शिवलिंगपूजेंत कधींहि उपयोग केला जात नाहीं. वास्तव शिव तामस देवता आहे, हें म्हणणें अनभिज्ञता होय. आतां त्रिमूर्त्यन्तर्गत शिव कारणावस्थेचा नियंता मानला जातो. कारण ह्या अव्यक्ताची अवस्था अवष्टम्भात्मक असल्यामुळें तमप्रधान म्हटली जाणें शक्य आहे. "तम आसीत्तमसा गूढमग्रे" या श्रुतींत तमाला सर्वांचें आदि आणि कारण म्हटलें आहे. त्यांत वैषम्य होण्यानें सत्त्वरजाचा उद्भव होतो. तमाचें नियंत्रण करणें सर्वांत कठिण आहे. भगवान् शिव तमाचा नियंता आहे. तमाचे अधीन नाहीं. शिव भयानकपण आहे, शांतपण आहे. सर्वसंहारक, कालकाल, महाकालेश्वर, महामृत्युञ्जय अशा भगवानाच्या ठिकाणीं उग्रता उचितच आहे. ब्रह्मक्षत्रोपलक्षित समस्त प्रपंच ज्याचें ओदन (भात) आहे, मृत्यु ज्याची भाजी आहे, मृत्युसहित संसाराला जो भक्षण करतो, तो उग्र असणें स्वाभाविक आहे. शिवाहून भिन्न जें कांहीं आहे त्या सर्वांचा संहारक शिव आहे. वास्तव विष्णूला शिवस्वरूपच मानतात. नाहीं तर भिन्न

मानल्यास तोहि संहाराचा विषय होईल. वस्तुतः हरिहर, शिवविष्णु तर एकच आहेत. त्यांच्यांत किंचितहि भेद नाहींच. " भीषास्माद्वातः पवते । " भगवानाच्या भयानेंच वायु, अग्नि, सूर्य, मृत्यु, आपआपलीं कामें करतात. " महद्भयं वज्रमुद्यतम् " समुद्यत महावज्राप्रमाणें भगवानाला सारे भितात. म्हणूनच भगवानाला मृत्यु किंवा चंडकोपरूप मानला आहे. " नमस्ते रुद्र मन्यवे । " हे रुद्र! आपल्या मन्युस्वरूपाला मी वंदन करतों. तीच शक्तिरूपधारिणी होती, तेव्हां त्याला चण्डिका म्हणतात. असें असूनहि तो ज्ञान्यास व भक्तास रसस्वरूप आहे. " रसो वै सः । " " एष ह्येवानन्दयाति " (श्रुति) भगवान् रसस्वरूप आहे. निखिल रसामृतमूर्ति भगवानापासूनच समस्त विश्वाला आनंद प्राप्त होतो. यासाठीं भगवानाची अघोरा, शिवातनु घोरतनूहून पृथक् वर्णिली आहे. " या ते रुद्र शिवा तनुरघोरा पापकाशिनी। तया नस्तनुवा शन्तमया गिरिशन्ताभिचाकशीहि " भगवानाची कल्याणमयी, शंतमा, शिवा, तनू परमकल्याणमयी आहे. " शान्तं शिवम् "; " अघोरेभ्योऽथ घोरेभ्यो घोरघोरतरेभ्यः । सर्वेभ्यः सर्वशर्वेभ्यो नमस्ते अस्तु रुद्ररूपेभ्यः" याप्रमाणें रुद्राध्यायांत उग्र, श्रेष्ठ, आणि भीमरूप वर्णिलें आहे. " नमः शम्भवाय च मनोभवाय च नमः शंकराय च मयस्कराय च नमः शिवाय च शिवतराय " (यजु. १६।४१). या मंत्रांत शिवाला शिवस्वरूप, कल्याणदाता, मोक्षदाता म्हटलें आहे.

याप्रमाणें त्या अर्थी अनादि, अपौरुषेय वेद तसेंच तन्मूलक इतिहास, पुराण, तन्त्रें, याद्वारां शिवाचें परमेश्वरत्व, शांतत्व, सर्वपूज्यत्व सिद्ध होत आहे, त्या अर्थी शिवाची पूजा अनार्यांकडून घेतली गेली आहे, या शेंडाबुडखा नसलेल्या विधानाला काय किंमत राहिली !

> *यस्य ब्रह्मा च विष्णुश्च त्वं चापि सह दैवतैः ।*
> अर्चयेथाः सदा लिङ्गं तस्माच्छ्रेष्ठतमो हि सः ॥
>
> —महाभारत, अनु. पर्व., अ. १४।२३२.

---

प्रकरण ५ वें

## लिंग-योनि-चिन्हांचे देव्हारे आणि शिवलिंगपूजा

[ १ ]

मधुकुंभसहस्रैस्तु मांसभार शतैरपि ।
न तुष्यामि वरारोहे भगलिंगामृत विना ॥ १०७ ॥
न चक्रांकं न पद्मांकं न वज्रांकमिदं जगत्
लिंगांकञ्च भगांकञ्च तस्माच्छक्तिशिवात्मकम् ॥ १०८ ॥
शिवशक्तिसमायोगो यस्मिन्काले प्रजायते ।
सा संध्या कुलनिष्ठानां समाधिः स विधीयते ॥ १०९ ॥

—कुलार्णवतत्र, अष्टमउल्लास.

योनिर्लिंगप्रकारेण जगत्सृष्ट्यर्थ कारणम् ।
तया संयोगभावेन कर्मरूपमुदाहृतम् ॥

—वातुलशुद्धागम.

आऽहमजानि गर्भधमा त्वमजासि गर्भधम् ।

—तै. स. ७।४।१९.

मागील प्रकरणात थोर अधिकारी पुरुषाकडून शिवलिंगोपासनेवरील आक्षेपाचा सामान्यतः सविस्तर विचार झाला आहे. सुज्ञ वाचकाचें तेवढ्यानेंच समाधान होईल पण आक्षेपकाच्या सर्व आक्षेपाचा तपशीलवार विचार झाला नाहीं, असें आक्षेपक म्हणतील, म्हणून त्यासाठीं पुढील प्रकरणें लिहिणें भाग पडत आहे त्यात कोठें कोठें मागील प्रकरणातीलच कांहीं मुद्याची क्वचित् द्विरुक्ति होण्याचा संभव आहे. कारण मागील प्रकरणात सर्वांगीण विचार झाला आहे. त्याला सोडून मी अधिक तें काय लिहिणार? तरीपण सर्व आक्षेप शक्य तों तपशीलवार चर्चिले जावेत, असा माझा यत्न आहे.

शिश्नयोनिप्रतीकाचे परदेशातील विलक्षण देव्हारे, अखिल प्राण्यातील लैंगिक भावनातिशय, आणि शिवलिंगपूजा, या विषयाचा सापेक्षतेनें सविस्तर विचार ज्यात केला आहे, असे ग्रंथ इंग्रजीत अनेक आहेत.[1] ते आपल्याकडील सामान्य शिवलिंगोपासकाच्या वाचनात बहुधा नसतीलच तरी त्यातील सविस्तर माहिती व विवेचन येथें देण्यात स्वारस्य नाहीं पण ते ग्रंथ ज्याच्या वाचनात आलेले असतात अशा आपल्याकडील आंग्लशिक्षित विद्वानांनीं, त्या पाश्चात्य देशातील, लैंगिक कामासक्ति या विषयावरील ग्रंथात काढलेले निष्कर्ष, गृहीत सत्य मानून शिवलिंगोपासनेचा त्यास अनुसरून अर्थ लावण्यात जो दुरान्वय केला आहे, तो फार बुद्धिभेदक झाला आहे यार्चे मुख्य कारण पाश्चात्याचे तद्विषयक ग्रंथ होतें.

वस्तुत वर निर्दिष्ट केलेल्या, लैंगिक (Sexual) कामातिशय व उपस्थेंद्रियाच्या प्रतीकाचे देव्हारे, या विषयावरील मूळ इंग्रजी ग्रंथाचा मुद्दाम परामर्श घेण्याचें मला कांहीं कारण नव्हतें. उलट त्या ग्रंथाकडे दुर्लक्ष करणेंच योग्य झालें असतें पण आपल्याकडील कित्येक आधुनिक विद्वानाचीं मनें

१ उदाहरणार्थ —Phallic worship, Phallism, Phallic objects and remains, Phallic miscellanies, Masculine cross, Secret Doctrines, Encyclopaedia of Religion and ethics Sexual science, Studies in sexual psychology, इत्यादि —

२ याचीं नावें व याच्या ग्रंथाचीं नावें मी बुद्धिपुरस्सर देत नाहीं यार्चे कारण अन्यत्र दिलेंच आहे

३ Much harm has been done to many of the Shaiva Schools of thought by well-known European writers in whose minds the idea of Lingam is, somehow or other, so closely associated with the phallus, that they cannot but see some hidden trace of phallic obscenity even in the highest philosophical interpretation of Lingam by some of the masterly writters of this school [Shakti or Divine power, p 214].

त्या विदेशी ग्रंथांतील विकृत लैंगिक भावनातिशयांनीं भारल्यावर, त्यांनीं आपल्याकडीलहि अनेक प्राचीन ग्रंथांकडे त्याच भावनांनीं पाहिल्यामुळें, त्यांना आपल्या प्राचीन ग्रंथांत तोच लैंगिक भावनातिशय भासूं लागला व तदनुरूप त्यांनीं शिवलिंगप्रतीकाच्या स्वरूपाचा अर्थ लावला! त्यामुळें अगोदरच ओढोटीस लागलेली आजकालच्या हिंदूंची शिवशक्ति भासंबंधीं उपास्य भावना अधिकच कलुषित झाली. हा भावी शिवलिंगोपासनेस एक मोठाच धोका उत्पन्न झाला आहे. याप्रमाणें शिवलिंगोपासनेच्या अर्थाचा अनर्थ होण्याची व त्यायोगें शिवलिंगोपासनेसंबंधीं तिरस्कार किंवा निदान औदासीन्य वाढत जाण्याची जी परिस्थिति निर्माण होत आहे, त्यास यथाशक्य आळा घालणें सर्वतोपरी इष्टच नव्हे तर जरूरच आहे. म्हणून या बाबतींत आधुनिकाचें एकंदरींत म्हणणें तरी काय आहे, तें सामग्र्यानें समजून देण्यासाठीं त्यांचे संभाव्य मुद्दे त्यांच्या खुलाशासह पुढें देत आहें.

या प्रकरणाच्या आरंभीं दिलेल्या वचनांचा अगोदर थोडा खुलासा करणें जरूर आहे. आपल्या वैदिक-याज्ञिक वाङ्मयांत, आगम ग्रंथांत, तंत्रशास्त्रांत व पुराणांत प्रकृतिपुरुष या युग्मासंबंधीं लैंगिक परिभाषा अनेक ठिकाणीं वापरली आहे. पण यज्ञकर्मांतील अग्नि–सोम, सांख्यशास्त्रांतील पुरुष-प्रकृति, भौतिक शास्त्रांतील धनऋणविद्युत् अथवा निसर्गांतील क्रिया प्रतिक्रिया, अशा युग्मांत ज्याप्रमाणें लैंगिक भाव संभवत नाहीं, त्याचप्रमाणें या लैंगिक परिभाषेसंबंधीं समजलें पाहिजे. याचेच आपल्या प्राचीन ग्रंथांतील कांहीं नमुने या प्रकरणाच्या आरंभीं दिले आहेत. त्यांपैकीं पहिले तीन श्लोक कुलार्णव तंत्रांतील आहेत. तंत्रवाङ्मयांत कुलार्णव तंत्राचा दर्जा फार श्रेष्ठ मानतात. त्यांत वस्तुतः निंद्य व अश्लील असें कांहींच संभवत नाहीं. असें असतां त्यांतील वचनांचा दुरुपयोग करून आधुनिक विद्वानांकडून इतरांचा व्यर्थ बुद्धिभेद केला जातो! कुलार्णव तंत्राच्या पहिल्याच उल्हासांत अधिकारवाद कडक सांगितला आहे. तसेंच शिश्नोदरपरायणता आणि इतर पशुधर्म यांचा धिक्कार केला आहे. पांचव्या उल्हासांत १०७ व्या श्लोकांत पिण्डांतर्गत कुलकुंडलिनी शक्ति आणि चिच्चंद्र यांच्या मधुमीलनासच भग-लिंगामृत म्हटलें आहे. त्याच उल्हासाच्या १०९ व्या श्लोकांत, ज्यानें आपलें चित्त

ईशचरणीं लीन केलें आहे, तोच खरा मांसभोजन करणारा असें सांगितलें आहे व त्यापुढें जो आपल्या इंद्रियाचा संयम करून तीं आत्मसंलग्न करतो, तोच मच्छभोक्ता असून ( श्लोक ११० ) कुंडलीरूप पराशक्तीचा आत्म्याशीं संयोग हाच खरा लैंगिक भोग होय, सामान्य इंद्रियमैथुन नव्हे, असें १११ व ११२ व्या श्लोकांत त्याच उल्हासांत स्पष्ट सांगितलें आहे. आठवा उल्हास कुंडलिनीचक्रभेदाच्या दिव्यानुभूतीच्या वर्णनपर आहे. त्या उल्हासांतील श्लोक १०७ ते १०९ यांत साधकाच्या पिण्डांतर्गत आत्मरूप शिव व कुलकुंडलिनीरूप प्राणशक्ति यांच्या सामरस्यातील समाधिभावाचें अथवा तुरीयावस्थेच्या दिव्य आनंदभोगाचें परोक्ष वर्णन आहे. हा खुलासा कुलार्णव तंत्रांतच व त्या ग्रंथाला जोडलेल्या न्यायमूर्ति वुडरॉफ ( ए. ॲव्हलॉन ) यांच्या इंग्रजी उपोद्घातांत स्पष्ट केलेला आहे. अर्थात् यांत अश्लील व लैंगिक भावनेचा यत्किंचितहि संपर्क नाहीं. उलट ग्राम्य लैंगिक भावांस दिव्य शिवशक्तिरूप देण्याचा अति दुर्घट अभ्यास, हा तंत्रांचा विशेष आहे. यामुळेंच त्यांनीं लैंगिक परिभाषा वापरली आहे. दुसऱ्या वातुल शुद्धागमांतील वचनांवरूनच स्पष्ट होतें कीं, जगत्कारणरूप लिंगयोनि म्हणजे शिवशक्ति, अथवा पुरुषप्रकृति हेंच युग्म होय. उपस्थ इंद्रियें नव्हतच. शिवशक्तीच्या संयोगानें "कर्म" निर्माण होतें. नाम-रूप-कर्म हे मायेचे गुण आहेत. आतां शेवटल्या तैत्तिरीय संहितेंतील लाक्षणिक वर्णनात्मक अश्वमेघ प्रकरणांतील राजपत्न्याश्वसंयोगासंबंधीं वचनाबद्दल असा विचार करावा कीं, सृष्ट्युन्मुख माया-महेश्वर हें अविनाभूत युग्म म्हणजे सबीज सद्ब्रह्म होय. त्यांत ग्राम्य लैंगिक भावाची कल्पनाहि संभवत नाहीं. पूर्वकल्पांतील जीवाचें प्राक्कर्मबीज हाच पुढें उत्पन्न होणाऱ्या सृष्टीचा गर्भ होय. अर्थात् तो गर्भ धारण करणारी माया म्हणजे कांहीं सामान्य योनि हा अवयव नव्हे. हें मुद्दांस सागावयास सकोच. अश्वमेघ यज्ञांतील महाराज्ञी ही अखिल प्रकृतींची एक प्रतिनिधि आहे असें वाटल्यास मानावें. पण बीजाचें आधान करण्याकरतां ( अश्वरूप ) परमेष्ठि प्रजापतीचा प्रकृतिरूप योनींत अनुप्रवेश ही नुसती भाषा आहे. कारण अश्वमेघांतील अश्व शवरूप असतो. तसाच परमेष्ठि वस्तुतः निष्क्रिय असतो. पराप्रकृतिरूप जीवानें आपल्या अपराप्रकृतिरूप शरीरांत अभिन्न निमित्तोपादानरूप परमेष्ठीनें अनुप्रविष्ट व्हावें, म्हणजे सर्व

परापरा प्रकृति परमेष्ठीमय आहे, अशी ब्रह्मानंदाची उपलब्धि व्हावी, हीच ब्रह्मजिज्ञासा या मंत्रांत आहे, असें जाणावें. याप्रमाणें या प्रकरणाच्या आरंभी उद्धृत केलेल्या वचनाच्या थोडक्यात खुलासा केल्यावर आधुनिक आक्षेपकांचे आणखी मुद्दे यथाक्रम पाहू.

( १ ) मुद्दा पहिला :— ऋग्वेदांत शिश्नदेव हा शब्द दोन ठिकाणीं आला आहे. ते मन्त्र असे :—

सवाजं यातापदुष्पदा यन् त्स्वर्षाता परि षदत् सनिष्यन् ।
अनर्वा यच्छतदुरस्य वेदो घ्नञ्छिश्नदेवाँ अभि वर्पसा भूत् ॥ १०।९९।३.

न यातव इन्द्र जूजुवुर्नो न वन्दना शविष्ठ वेद्याभि· ।
स शर्धदर्यो विषुणस्य जन्तो—र्मा शिश्नदेवा अपि गुर्ऋतं नः ॥ ७।२१।५.

( १ ) या दोन्ही मन्त्रात शिश्नदेवांना यज्ञांत येऊं देऊं नये, इन्द्र त्यांना ठार करतो, असा भाव आहे. हे शिश्नदेव म्हणजे शिवलिंगोपासक असा अर्थ आक्षेपक करतात व अशा कारणास्तव शिवलिंगोपासक आणि त्यांची लिंगोपासना अवैदिक, अनार्य व निंद्य होय, असें म्हणतात.

( २ ) हे अवैदिक व निंद्य शिश्नदेव कोण? याचा आणखी खुलासा असा करतात :— ब्रायट यांचें Analysis of ancient mythology आणि गोरेशियो यांचें Ramayan, Vol. X, P. 291, Note 35 यांत असें म्हटलें आहे कीं, चायचलातील नोव्हाचा दुराचारी पुत्र हॅम ह्याच्या वंशजांनीं शिश्नपूजा म्हणजे गर्हणीय जननेंद्रियपूजा हिंदुस्थानात आणली आणि त्याच्यापासून ती ब्राह्मणांनीं घेतली.

( ३ ) आणखी कोणी पाश्चात्य लेखक असें म्हणतात कीं, शिवलिंगोपासनेचा उगम युफ्राटीस (कुफ्रद्रुती) व तैग्रीस या नद्यांच्या दुआबात झाला, याप्रमाणें शिवलिंगोपासना ही मूळची परकी अनार्यांची आहे.

---

१ हा शिवलिंगोपासनेचा अनर्थकारी अर्थ आपल्याकडील अनेक आधुनिकांनीं स्वीकारला आहे त्यांचीं नावें मी येथें बुद्धिपुरस्सर देत नाहीं.

२ Indian civilization and its antiquity या ग्रंथात या मताचा उल्लेख आहे.

(१) खुलासा:—ऋग्वेदांतील वरील मंत्रांत "शिश्नदेव" हा जो शब्द आला आहे, त्याचा अर्थ आपल्याकडील संस्कृतज्ञ पंडितांनीं व कांहीं पाश्चिमात्य संस्कृतज्ञांनींहि वेगळा केला आहे.

उदाहरणार्थ:—(१) शिश्नदेवा. म्हणजे अब्रह्मचर्याः। (यास्काचार्य) (२) शिश्नेन दीव्यन्ति क्रीडयन्तीति शिश्नदेवाः। (सायणाचार्य), (३) शिश्न एव देवः सेव्यः देववत् सेव्यो वा येषा ते शिश्नदेवाः। (स्वामी करपात्रीजी), (४) शिश्नेन प्रकीर्णाभि. पुंश्चलीभिः स्त्रीभिः दीव्यन्ति क्रीडन्ति इति। (दुर्गाचार्य).

याप्रमाणें वरील संस्कृतज्ञ पंडितांच्या मतें शिश्नदेव या शब्दाचा वास्तविक सोपपत्तिक अर्थ शिश्नपरायण अथवा कामुक असा होतो. डॉ. रॉय, डॉ. मूर वगैरे कांहीं सुप्रसिद्ध संस्कृतज्ञ पाश्चात्य पंडिताच्या मतानेंहि वरील शिश्नदेव या शब्दानें वैदिक काळची शिवलिंगोपासना म्हणजे जननेंद्रियांची उपासना असें सिद्ध होत नाहीं.

शिवलिंगोपासनेवरील आपल्या प्राचीन विपुल वाङ्मयावरून शिवलिंग-पूजा ही दिव्यार्थानें व अनादि परंपरेनें भारतवर्षात रूढ असल्याचें स्पष्ट दिसून येतें. प्राचीन इतिहास, पुराणें, तंत्रग्रंथ, आगम, त्याचप्रमाणें कित्येक पौर्वात्य व पाश्चात्य संशोधकाचे ग्रंथ हेंच सिद्ध करतात. तेव्हा श्रुति, स्मृति, पुराणें आणि सदाचार यांना अत्यंत विरुद्ध असा, शिश्नदेव म्हणजे शिवलिंगपूजक असा अर्थ करतांच येणार नाहीं. कारण ज्या शिश्नदेवाना इन्द्र ठार मारीत असे, ते जर शिवलिंगपूजकच असते, तर खुद्द इंद्र, ब्रह्मदेव, विष्णु इत्यादि देवानीं व तशाच योग्यतेच्या उपमन्यु, मार्कंडेय,

१ "However interesting therefore it would be to find a proof of this existence of a phallic worship among the aboriginal tribes contemporary with the Vedic Rishis, it must be confessed that the word *Sisnadeva* does not supply this evidence." (Muir's Sanskrit texts IV, p. 409).

चोपायन, अपस्तंभ, अगस्ति इत्यादि अनेक प्राचीन ऋषि-मुनींनीं ती शिवलिंगपूजा पुढें रूढ केलीच नसती. याचा अधिक विचार पुढें होईल.

अशा विषयलंपट स्त्रीपुरुषांची निंदा ऋग्वेद व अथर्ववेद यांत केलेली आढळते. तशीच प्रकृत मंत्रांत शिश्नपरायणाची निंदा आहे वेदांत शिव हा शब्द मंगलवाची आहे ( ऋ १०।९२।९ ) हें पण येथें ध्यानीं घ्यावें. तात्पर्य, जगत्कारणब्रह्माची दिव्य उपासना शिवलिंगरूपांत अनादिकालापासून आर्यावर्तांत रूढ आहे, या सिद्धान्ताला आक्षेपकांच्या आक्षेपांनीं बांध येत नाहीं हें सिद्ध आहे.

तसेंच श्रीशिवलिंगोपासनेची प्रथा परदेशांतून आपल्या देशांत आली किंवा ती अवैदिक व रानटी अशा अनार्यांपासून अथवा निंद्य शिश्नदेवांपासून आपण घेतली हें विधान निराधार आहे, याचा अधिक विचार या व पुढील अनेक प्रकरणांत होणारच आहे.

[२] **मुद्दा दुसरा :**—ऋग्वेदांतील शिश्नदेवाचा देव तोच लिंगदेव सर्व धर्मांत प्रथम मानलेला आढळतो. ऋग्वेदाच्या प्रसिद्ध नासदीय सूक्तांत (१०।१२९) पुढील मंत्र आहेत—

कामस्तदग्रे समवर्तताधि मनसो रेतः प्रथमं यदासीत् ।
सतो बन्धुमसति निरविन्दन् हृदि प्रतीष्या कवयो मनीषा ॥ ४ ॥

---

१ लिंगपुराण, शिवपुराण, महाभारत—अनुशासनपर्व, कल्याण—शिवांक पृ. ३९९, ४७३. 'सूर्योदय' डिसेंबर १९४१, 'सिद्धान्तपत्र' वर्ष २ अंक ४४.
Indian civilization and its antiquity, pp. 1, 11, 12.
History and philosophy of Lingayats, pp. 323, 24.
Phallic miscellany, p. 27.
Secret doctrines, Vol. IV, pp. 37, 38, 159

२ ऋग्वेद—४।१।५; २।२९।१; १।१२४।७
अथर्व० ४।३७; ५।१७।११.

३ वामनपुराण, अध्याय ६. याला आणखीहि अनेक आधार देतां येतील, पण ते अनवश्यक आहेत. उगाच लेखनविस्तार होतो, म्हणून ते येथें देत नाहीं.

४ Indian civilization and its antiquity, pp. 1, 11, 12.

तिरश्चीनो विततो रश्मिरेषा मधः स्विदासीरे्दुपरि स्विदासीरे्त् ।
रेतोधा आसन् महिमान आसन् स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात् ॥ ५ ॥

ऋग्वेदांतील हें नासदीय सूक्त याच लिंगदेवाचें कामदेवसूक्त आहे. हें त्याच्या वरील चवथ्या व पांचव्या मंत्रांवरून उघड दिसतें. " सर्व सुखाचें आगर। बाप रखमादेवी वर ॥ " म्हणजे एकाच आद्य पुरुषानें पितृत्व व पतित्व धारण केलें, असा तो कामदेव म्हणजे प्रजापति होय. प्रकृतिपुरुष किंवा अर्धनारीश्वर हें त्याचें पहिलें जुगट होय. पांचव्या मंत्रांतील स्वधा अवस्तात व प्रयति परस्तात म्हणजे अधोमार्गी स्त्री व ऊर्ध्वमार्गी पुरुष असें मैथुनकर्म होय. या कल्पनेंतूनच पौराणिक शिवपार्वतीचें मूर्तिकरण उदयास आलें व तें युग्म जगताच्या पितृस्थानीं जाऊन बसलें. यांतच जगांतील सर्व लिंगपूजनाचें सार आहे. यांतील रेतोधा व महिमान हे शब्द अनुक्रमें योनि व शिश्न याचे मूळ निर्देश आहेत. हिरण्यगर्भसूक्त हें याचें पूरक आहे.

(२) खुलासाः—ऋग्वेदाच्या सुप्रसिद्ध नासदीय सूक्तांत सृष्टीच्या आरंभकालापूर्वीचें गूढगंभीर वर्णन आहे. तें सर्वस्वी तात्त्विक आहे. त्यांतील काम, मन, रेतस, स्वधा, प्रयति अशा कोणत्याच पारिभाषिक शब्दांचा अर्थ स्त्रीपुरुषांच्या जननेंद्रियाचे मैथुनपर लावतां येणें अशक्य आहे. कारण मैथुनसृष्टीच्या फारच पूर्वीचें मूळारंभाचें तें अति सूक्ष्म तात्त्विक वर्णन आहे. त्यांतील आद्य तमाचें नियमन करणारा सशक्तिक शिव ही पुरुषविध देवता नव्हेच. त्या जगत्कारणाधीश्वराचेंच शिवलिंग हें प्रतीक आहे. अव्यक्ताव्यक्ततेची ती कारणावस्था फारच उदात्त आहे. ग्राम्य नव्हे. ( गीतारहस्य पृ. २५१–२५५ पहा. )

शिवलिंगोपासना या ग्रंथांत या सूक्ताचें महत्त्व फार आहे. कारण या सूक्तांत आधुनिक विद्वान् ज्याप्रमाणें स्थूल मानवी मैथुनाचा निर्देश पाहातात, तसाच ते तोच स्पष्ट निर्देश शिवलिंग या प्रतीकाच्या ठिकाणीं पण मानतात. एक वाङ्मयात्मक शिवलिंग तर दुसरें भौतिक शिवलिंग एवढाच फरक आहे. माझ्या मतें या सूक्तांत जसा जगत्कारणरूप सबीज सद्ब्रह्माचा निर्देश आहे, तसाच शिवलिंग या प्रतीकांत कारणब्रह्माचा भाव आहे. त्यांत वस्तुतः अविनाभूत सशक्तिक शिवाची निर्द्वंद्व स्थिति आहे, मिथुन नाहीं. अर्थात् द्वंद्वात्मक मैथुनभावहि नाहीं.

"या सूक्तानें गौडपादांचा अजातवाद किंवा शंकराचार्यांचा मायावाद असिद्ध होतो. कारण यांत 'कृत' (म्हणजे कार्यरूप सृष्टि) गृहीत सत्य मानून त्याचा अज्ञात कर्ता कोण असावा एवढाच प्रश्न आहे." असें आधुनिकांचें म्हणणें आहे तें योग्य वाटत नाही. उलट याप्रश्नांतच अजातवाद, मायावाद, केवलाद्वैतवाद हे सारे वाद अध्याहृत दिसतात. या सूक्तांतील प्रश्न "विज्ञातार मरे केन विजानीयात् ॥" बृ. उप. २।४।१४, अथवा श्वेताश्वतर उप. मंत्र ३।४ याप्रमाणें हिरण्यगर्भाच्याहि पूर्वावस्थित असणाऱ्या शिवात्मा-नामक विज्ञाताचा ज्ञाता दुसरा कोण असणार? असा आहे व त्याचें उत्तर पण 'कोणीच नाहीं' असें आहे.

उलट जो असें म्हणेल कीं, 'तें मी जाणतों म्हणून,' त्यास तें मुळींच कळलेलें नसतें, (विज्ञामविजानताम् । २।११ केन उपनिषद्) अशी ही कारणाधीश्वर शिवाची शिवावस्था होय. "तस्माद्द्वयात् शिवा॥" मांडुक्य कारिका, २।३३. याचाच निर्देश या सूक्तात आहे. "अद्वयताऽभयाऽतः सैव शिवा।" (मांडुक्य कारिका २।३३ शांकरभाष्य). या माझ्या म्हण-ण्याच्या पुष्टिकरणार्थ लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्याचा पुढीलप्रमाणें दाखला देतों. ते म्हणतात, (पृ. २५२) "++ म्हणून मूळारंभींच्या एक-जिनसी द्रव्यास सत् किंवा असत्, आकाश किंवा पाणी, उजेड किंवा अंधकार, अमृत वा मृत इत्यादि परस्पर सापेक्ष कोणतेंच नांव देणें योग्य नाहीं. जें काय होतें तें या सर्व पदार्थांहून विलक्षण असून तें एकलें एकच आरंभीं चोहोंकडे आपल्या अपरंपार शक्तीनें स्फुरत होतें. "++ नेति नेति" "एकमेवाद्वितीयम्" किंवा "स्वे महिम्नि प्रतिष्ठितः।" (छां. ७।२४।१) इत्यादि परब्रह्माचीं जीं वर्णनें उपनिषदातून आहेत तीं याच अर्थाचीं अनु-वादात्मक होत. [गी. ८।२०;१३।१२ पहा]. आरंभीं पाणी, अंधकार, किंवा आभु व तुच्छ यांची जोडी, ++ इत्यादि जीं वर्णनें आहेत, तीं सर्व एकल्या एक मूळ परब्रह्माचीं त्याच्या तपोमहिम्यानें पुढें विविध पसारा (सुरू) झाल्यानंतरचीं आहेत. +++ (मु. १।१।९. ऋ. १०।९०।३ पहा) +++ (या सूक्तद्रष्ट्या) ऋषीच्या शुद्ध बुद्धीस या सूक्तांत ज्या परमसिद्धान्ताचें स्फुरण झालेलें आहे, तेच सिद्धान्त प्रतिपक्षांस विवर्तवादासारखीं योग्य उत्तरें देऊन अधिक दृढ, स्पष्ट किंवा तर्कदृष्ट्या निःसंदेह करण्यापलीकडे अद्याप

कोणाचीच मजल गेलेली नाहीं व जाण्याची फारशी आशाहि नको. (पृ. २५५.) या लोकमान्यांच्या खुलाशांत लैंगिक मैथुनकल्पनेस मुळींच अवसर राहात नाहीं.

या विश्वोद्भवासंबंधीं ऋग्वेदांत व अन्य वैदिक वाङ्मयांत अनेक प्रकारें वर्णन केलेलें आढळतें. उदाहरणार्थ, ऋग्वेद १०।८१; १०।७२; १०।१२०; तै. ब्रा. २।६, २, ३; छां. ६।३।२; बृ. उ. १।४; श्वे० उप. १ इत्यादि. हे व असे दुसरे अनेक प्रकारचे सृष्टीच्या व्यक्तीकरणाचे निर्देश वैदिक वाङ्मयांत आहेत. त्या सर्वांच्याहीपेक्षां सूक्ष्म व अव्यक्त असें अविनाभूत शिवशक्तीचें जगत्कारण स्वरूप या सूक्तांत निर्दिष्ट आहे. "एकोऽहम् बहुस्याम्।" असें जें सृष्ट्युन्मुख अव्यय परमात्म्याचें दिव्य ( अभौतिक ) मनस्वरूप त्याचें वर्णन नासदीय सूक्तांत केलेलें दिसतें. हिरण्यगर्भालाहि ज्यांनीं व्यक्त केलें, त्या कारणस्वरूप सशक्तिक शिवाचें गूढ गंभीर दर्शन या सूक्तांत आहे व तेंच शिवलिंगाच्या ठिकाणीं आपण भावित करावयाचें आहे. नुसतें हें कृताचें वर्णन नव्हे; तर आद्यसंकल्प करणाऱ्या सशक्तिक शिवाचें वर्णन आहे. कार्याचें नव्हे. आद्य कारणाचें आहे.

या सूक्ताची देवता प्रजापति असली तरी कोणत्याहि देवदेवतेचा आविर्भाव होण्यापूर्वींच्या अति सूक्ष्म अवस्थेचे निर्देश या सूक्तांत असल्यामुळें उपस्थाची देवता प्रजापति या देवतेच्या स्वरूपाचें वर्णन या सूक्तांत आहे, असें म्हणतां येत नाहीं. येथें प्रजापति म्हणजे परमेष्ठि परमात्मा असा अर्थ जाणावा. त्याचप्रमाणें या सूक्तांतील पाणी, अंधार, मन, रेतस्, रेतोधा इत्यादि लौकिक भाषेंतील शब्दांचा प्रयोग त्या शब्दाच्या स्थूल उत्तानार्थापेक्षां अति सूक्ष्म अशा अभौतिक भावांच्या निर्देशासाठीं केला आहे, असेंहि मानणें भागच आहे. शैवांच्या छत्तीस तत्त्वापैकीं दुसरी जी समनीस्थिति तिचें हें वर्णन असावें. म्हणून रेतोधा या शब्दाचा अर्थ आद्य शिवसंकल्प धारण करणारी प्रथम स्फूर्ति व महिमान याचा अर्थ भूमारूप शिव असाच करणें मला योग्य वाटतें. मानवी मैथुनाच्या स्थूल क्रियेचा सूक्ष्म निर्देश, असा भाव येथें अत्यंत अप्रस्तुत आहे.

नासदीय सूक्त, मंत्र ४ यांत सत् आणि असत् यास जोडणारा एकार्थ अरुण सेतु रुद्र याचें वर्णन दिसतें. दैनंदिन प्रलयाच्या म्हणजे अंधारमय

रात्रीच्यानंतर जाग्रत सृष्टिरूप स्पष्ट सूर्योदयाच्या पूर्वीचा अष्टमूर्ति जो बालमार्तंड तोच रुद्र होय. त्याच्या युगपत् चोहोंकडे फांकणाऱ्या रश्मीचें जें वर्णन पाचव्या मंत्रांत आहे, ते असख्य मानलेले रुद्र होत. "रुद्राचें पोट काळें व पाठ तांबडी" असें जें भावनाशून्यतेनें अतज्ज्ञ आधुनिक ग्राम्य वर्णन करतात, तें या अरुण सेतूचेंच होय. त्याच्या एका बाजूला काळा अंधार व दुसऱ्या बाजूला बाल रवीची लाली असें तें लाक्षणिक सुंदर वर्णन दिसतें. प्रलय आणि सृष्टि, रात्र आणि दिवस यास जोडणारा सेतु तोच. तोच जाग्रत सृष्टींत जणू अनुप्रविष्ट होतोसा भासतो. हा शिवसंकल्पविलास आहे.

वस्तुतः मायामहेश्वरत्व जगद्विवर्तरूपानें भासतो. माया आणि महेश्वर यांची पृथकत्वानें कल्पना करू गेल्यास माया अविद्यमान व महेश्वर निर्गुण व निष्क्रिय ठरतो. त्याच्या अविनाभूत युग्माची कल्पना केल्यास त्यांत कल्पक आणि कल्पना, अग्नि आणि प्रभा याप्रमाणें द्वैत नाममात्र असतें. त्यात समोगाची प्रक्रिया संभवतच नाहीं. एकच शिव शक्तिरूप, संकल्परूप, व सृष्टिरूप होतो. निमित्तोपादानकारण एकच आहे. तेथें स्थूल मैथुनाची कल्पना असंबद्ध आहे

रेतस म्हणजे सर्व नामरूपात्मक सृष्टींत अनुप्रविष्ट होणारा रुद्रांश समजावा. कोणी आधुनिक विद्वान् म्हणतात, त्याप्रमाणें रेतोधा म्हणजे योनि नव्हे व महिमान म्हणजे शिश्न नव्हे तसेंच "स्वधा अवस्तात् प्रयतिः परस्तात्।" म्हणजे खालीं स्त्री आणि वर पुरुष ही ग्राम्य मैथुनाची प्रक्रिया नव्हे. वस्तुतः पूर्वकल्पातील जीवाचे अभुक्त प्राक्कर्मबीज, त्रैलोक्यव्यापी बाळसें धारण करणाऱ्या विवर्तात्मक विश्वरूपात जन्म पावलें, त्याचें, अथवा भोग्यभोक्तादि भेदयुक्त सर्व नामरूपकर्मात्मिक सृष्टिबीजाचें सृष्ट्युन्मुख पण सूक्ष्म, अव्यक्त अशा स्वरूपाचें, पांचव्या मंत्रांत वर्णन आहे. ज्या मायामहेश्वराच्या

१ The hymn describes the spiritual birth of the ever existing One. By birth is meant not that it was born from something else but that by its own innate tapas, brilliant knowledge ( यस्य ज्ञानमयतपः । मु १।१।९ ) It was born of its own accord as the All-loveing All-enselfing Son, simultaneously with the birth of the creatures ( Indo-Aryan Mythology, Vol. I, p. 442. )

अभिन्ननिमित्तोपादानकारणरूपानें हें सर्व व्यापलें, तो रुद्र किंवा हिरण्यगर्भ समजावा त्या रुद्राच्याच पुढें अग्नि, आप, ओपधि, वायु, पर्जन्य, चंद्रमा, आदित्य किंवा पचमहाभूतें, सूर्य, चद्र, आत्मा अशा अनेकविध मूर्ति मानल्या आहेत. "भर्गो देवस्य" तोच. शिव रुद्र तोच, पुरुप व त्याची इच्छा तीच प्रकृति जाणावी एकाच परमशिवनामक परब्रह्माची रुद्र, हिरण्यगर्भ, रेत, सृष्टि हीं सोपाधिक विवर्तरूपें होत. यालाच अन्य ठिकाणीं पुरुपयज्ञ असेंहि म्हटलें आहे.' अन्न अन्नादरूप, अग्नि सोमात्मकरूप या साऱ्या शिवसंकल्पाच्याच भिन्न भिन्न कल्पना आहेत. साराश,—

ईश्वररूप समष्टि मनाचें रेत म्हणजे रुद्र अथवा हिरण्यगर्भ, तोच एकर्षि. तोच अध्यक्ष-परमेष्ठि प्रजापति आणि उषा अथवा वाक् याच्या संयोगातील जो रस तो तोचें. आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक या दृष्टि, किंवा

---

१ This Retas whom I have identified with Rudra Bhutapati seems to be identical with Hiranyagarbha, the Golden Child of the Rig Veda (R.V. X 121) The religious lesson taught by this riddle seems to be that the spiritual and ethical world consists of the all loving Retas of Father Sacrifice. (Indo-Aryan Mythology, Vol. I, p. 481.)

२ There is authority for supposing that Kama, the Retas of Mind spoken of in the Rig Veda is the Self, the Setu of the Upanishads + + + It will be seen that the above (तै. आ० ९।२३) is a general commentary on some of the most remarkable Suktas of Rig Veda viz (X–129) about Paramesthi, (X–90) about Purusha and (X–121) about Hiranyagarbha. The word salilam is taken from verse 3 of R.V. X–129. The Retas of mind of that hymn is described as the Juice of Prajapati and that Juice is clearly identified with Purusha. + + + Purush, the Indweller, is in the waters which in the Vedic Language, appears to mean the universe and He is concealed in all phenomenon (Indo-Aryan Mythology, Vol. I, p. 8–447).

निमित्तकारण व उपादानकारण ह्या कल्पनांचें मिश्रण, येथें आढळतें. परमेष्ठि प्रजापतीचा वध करणारा म्हणजे तद्रूपता पावणारा रुद्र तोच शिवसंकल्परूप रेत होय. हिरण्यगर्भाच्या निर्मितीचा जो साक्षी (श्वे उप ३।४) त्या कारणाधीश्वर शिवाला हिरण्यगर्भ कदाचित् जाणत असेल अगर नसेलहि असें नासदीय सूक्त म्हणतें तें सहजच आहे.

शिवमहापुराणांत नासदीय सूक्ताचाच अनुवाद करून जें रुद्राचें वर्णन केलें आहे, त्यावरून सृष्टीच्या पूर्वीच्या आद्यतमाचा नियता ज्योतिस्वरूप व अनंत असा शिव व त्याचेच संकल्परूप अथवा स्फुलिंगरूप एक किंवा असंख्य रुद्र म्हणजे अखिल नामरूपात्मक सृष्टींत अनुप्रविष्ट होणारे शिवांश असाच अर्थ समीचीन होतो. तसेंच शिवाची अथवा परमेष्ठि प्रजापतीची सृष्ट्युन्मुखता हीच त्याची मनीषा, हीच उषा, हीच वाक्, हीच विराट् अथवा विराज जाणावी. हिच्याशींच प्रजापति संयुक्त झाला, असें लाक्षणिक वर्णन आहे. तसेंच रुद्र तोच अग्नि, तेजातूनच सर्व सृष्टि उद्भूत झाली असो.

याप्रमाणें नासदीय तत्त्वज्ञान अति गूढगंभीर आहे. त्यांत स्त्री-पुरुषाच्या उपस्थेंद्रियाच्या मैथुनाची ग्राम्य कल्पना करणें याहून अधिक अविवेक तो कोणता? "सर्वव्यापी स भगवांस्तस्मात्सर्वगतः शिवः ॥" श्वे ३।११ अथवा "मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् । तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं

१ इदं दृश्यं यदा नासीत्सदसदात्मकं च यत् ।
तदा ब्रह्ममयं तेजो व्याप्तिरूपं च सन्ततम् ॥ १५ ॥
न स्थूलं न च सूक्ष्मं च शीतं नोष्णं तु पुत्रक ।
आद्यन्तरहितं दिव्यं सत्यं ज्ञानमनन्तकम् ॥ १६ ॥
योगिनोऽन्तरं दृष्ट्या हि यद्ध्यायन्ति निरन्तरम् ।
तद्रूपं सकलं ह्यासीज् ज्ञानविज्ञानदं महत् ॥ १७ ॥
कियता चैव कालेन तस्येच्छा समपद्यत ।
प्रकृतिर्नाम सा प्रोक्ता मूलकारणमित्युत ॥ १८ ॥
ज्योतिर्लिङ्गं तदोत्पन्नं – मावयोर्मध्य अद्भुतम् ।
ज्वाला माला – सहस्राढ्यं कालानलचयोपमम् ॥ ६३ ॥
क्षयवृद्धि विनिर्मुक्तमादिमध्यान्तवर्जितम् ।
अनौपम्यमनिर्दिष्टमव्यक्तं विश्वसंभवम् ॥ ६४ ॥ शि पु. अ० २

सर्वमिद जगत् ॥ " श्वे. ४।१० अशा महेश्वररूपातील पुरुषप्रकृति, भोग्य-भोक्ता, कल्पक मन व त्याची इच्छा इत्यादि द्वंद्वें अलैंगिक व अनश्लील असल्याच उघडच दिसेतें

(३) **पूर्वपक्षाचा मुद्दा तिसरा**—" सोऽकामयत बहुस्या प्रजायेय।" ही वदिक ऋचा हीच लैंगिक भावना सुचविते

(३) **खुलासाः**—" सोऽकामयत बहुस्या प्रजायेयेति।" या तैत्तिरीय उपनिषदातील (२।६) वचनातील किंवा " तदैक्षत बहुस्या प्रजायेयेति " या छांदोग्य उपनिषदातील (६।२।३) वचनातील ब्रह्माचें बहुभवन पुत्रोत्पत्ती-प्रमाणें भिन्न पदार्थविषयक नाहीं (न हि पुत्रोत्पत्त्येवार्थान्तरविषय बहुभवन कथ तद्व्यात्मस्थानभिव्यक्तनामरूपाभिव्यक्त्या। तै० २।६ शाङ्करभाष्य.) आत्म्यामध्येंच स्थित असलेल्या अव्यक्त नामरूपाना व्यक्त करून परमात्म्यानेंच जणु बहु होणें आहे अर्थात् येथें स्थूल पतिपत्नीमैथुनसबध अगर सादृश्हि

३ The esoteric lesson taught by the Dawn, the Seasons and the Year is that God is himself the spiritual mother, the spiritual Ritu, the spiritual Retas, and the spiritual Son. Thus, He has solved the problem of spiritual life from the very beginning of creation and it will apply to man also if he solves it thus let him be Atmakridah and Atmaratih (as the छा. उप ७।२५।२ and मु उप ३।१।४ says) let him become himself the same lady Faith or Knowledge and place in her the Ritu of self-sacrifice and the holy retas of the Supreme Self whom he loves as himself, and he will be born as the spiritual Son fit to be in the Father. True the story is very naked but we are dealing with old poets and when the inner meaning is understood it removes all indelicacy and the spiritual procreation will put to shame the animal one (*Indo-Aryan Mythology*, Vol I, p. 490)

नाहींच. कोठेंहि 'काम' हा शब्द आला कीं तो जघन्य इंद्रियांचा काम समजणें हें अगदींच अविचाराचें दिसतें. पिण्डदृष्टीनें पाहिलें तरी नाभीच्या खालील काम व त्यावरील काम यांत महदंतर आहे. शिवाय वरील औपनिषदिक वचनें उघा सृष्टिपूर्वावस्थेचा निर्देश करतात, त्या वेळीं जघन्य इंद्रियें व तत्संबंधीं काम उद्भवलेच नव्हते. सारा काम म्हणजे लैंगिक काम असें जर कोणी निराधार म्हणूं लागलें, तर त्याच्या तोंडावर कोण हात देणार! अथर्ववेदांतील ९।२।१९ हें काममुक्त वाचावें. म्हणजे काम या शब्दार्थाची यथार्थ कल्पना येईल. ज्याचा शिवलिंगोपासनेशीं साक्षात् संबंध नाहीं, अशा लैंगिक मात्रासंबंधीं परमताचें खंडण याहून अधिक करीत बसणें या ग्रंथांत अप्रस्तुत आहे.

(४) मुद्दा चवथा:—चयन यज्ञांतून महादेवाचा अवतार झाला. तो चयन यज्ञ अश्वमेध यज्ञाशीं संबद्ध आहे. तें यजुर्वेदांतील अश्वमेध प्रकरण जननेंद्रियसंभोगाच्या माहात्म्यानें व्याप्त आहे. (तै. सं. ७।४।१९). हें अति विस्तारानें दाखवून एका आधुनिक विद्वान् ग्रंथकारानें अश्वमेधयज्ञ प्रकरणांत लैंगिक कामासक्तीचा अवर्ण्य विचका केला आहे! आणि त्याच्या पुष्टीकरणार्थ यज्ञ या शब्दाची व्युत्पत्ति, य = यण, एकमेकांत मिसळणें, न = जुगणें म्हणजे अनिर्बंध व्यवाय, आणि न = स्त्री-पुरुष, अशी करून यज्ञ म्हणजे स्त्री-पुरुषांच्या लैंगिक स्वैर कामासक्तीला अथवा व्यभिचाराला ज्यांत पुरा अवसर दिला जातो, असा एक वेदोक्त प्रकार आहे, असें दाखविलें आहे. त्याचप्रमाणें इष्टि या शब्दाचा अर्थ स्त्रीपुरुषांचें जुगट असा केला आहे. त्यास वैदिक वाङ्मयांतील व कुलार्णव तन्त्रादि तन्त्रवाङ्मयांतील आधार दिले आहेत.

या अत्यंत अश्लील वाटणाऱ्या विषयाच्या उद्घाटनाकडे वाचकांचें लक्ष वेधण्याचें मला मोठेंच संकट वाटतें. पण या साऱ्या विस्तृत विवरणाचा संबंध त्यांनीं दूरान्वयानें शिवलिंगोपासनेशीं जोडला आहे व या संबंध ग्रंथांत सूक्तासूक्त लैंगिक कामासक्ति हें प्राचीन धर्माचें मूळ आहे, असें दीर्घ प्रयत्नानें दाखविण्याचा ग्रंथकाराचा हेतु दिसतो आहे. यामुळें त्याचा यथाशक्य विचार या ग्रंथांत करणें भाग पडलें. तें टाळतां आलें असतें तर बरें झालें असतें; पण असे अश्लीलतेचे मुद्दे न टाळतां त्याचा यथाशक्य

खुलासा करावा, असा माझा यत्न आहे. त्यांत जी कमतरता पडेल ती विद्वान् वाचकांनीं पुरी करावी. हे व्यर्थ बुद्धिभेदक विषय असेच सोडूं नयेत अशी माझी सर्व शास्त्रज्ञ-पंडितांस नम्र प्रार्थना आहे. असो.

(४) खुलासाः—अश्वमेध यज्ञांतील पारिप्लव भागांतील हें ब्रह्मोद्य प्रकरण आहे, असें समजतें. चयन यागांत रुद्राध्यायाचा विनियोग सांगितला आहे, यापलीकडे चयन यागाचा महादेवाशीं अथवा शिवलिंगोपासनेशीं अर्थाअर्थी संबंध नाहीं. यज्ञ शब्दाची व्युत्पत्ति या लेखकांनीं सांगितली आहे. ती अत्यंत अयुक्तिक वाटते. अग्नि पाकसिद्धि करतो तसा घरेंहि जाळून खाक करतो. व्युत्पत्तिशास्त्राचा, 'पिशाचाच्या हातीं कोलीत,' असा अनर्थकारी परिणामहि होऊं शकतो. यज्ञ ही वैदिक कल्पना अत्यंत उदात्त व सृष्टीचें रहस्य सांगणारी आहे. अग्निषोमात्मक जगत् । ही यज्ञ कल्पना आहे. परमेश्वर नामरूपात्मक सृष्टि निर्माण करून त्या सर्वांत अनुप्रविष्ट झाला ही पुरुषयज्ञ कल्पना आहे. परार्थ, निस्सीम त्याग ही विश्वजित यज्ञाची कल्पना आहे. ज्ञानाग्नींत सर्व परिच्छिन्न भावांची, सर्व कर्मांची, अहंता, ममता यांची आहुति देणें, अखेर देहात्मबुद्धीचा जीवभाव बळी देणें, ही दिव्य यज्ञ-कल्पना आहे. आत्मनिवेदन ही नववी भक्ति हा एक ज्ञानयज्ञ आहे. दान, तप हीं यज्ञाचींच अंगें आहेत. आधिभौतिकाची अध्यात्माशीं जोड करणें हें आधिदैविक यज्ञाचें स्वरूप आहे. यज्ञ ही भावना त्यागार्थ आहे. भोगार्थ नाहीं. अनात्म्याचा त्याग करून आत्मरूपांत उरणें, जीवभाव विसरून शिवरूपांत समरस होणें, जनतेंतील जनार्दन तत्त्वांत ऐक्यत्व पावणें, भागत्यागलक्षणा करणें, पुष्कळांना जास्तींत जास्त सुख देणें, असे यज्ञ या सूक्ष्म, व्यापक व गंभीर विधिविधानाचे अनेक श्रेष्ठ प्रकार सांगतां येतील. अश्वमेधादि वैदिक यज्ञांत तेंच रहस्य शोधलें पाहिजे. परमात्म्याचें जें प्रवर्ग्य तें जीवाचें ब्रह्मोदन होय. समष्टि मनाचा रेतसाचा उत्सर्ग म्हणजे संकल्प हेंच सृष्टीचें बीज आहे किंवा अन्न आहे. आतां यजुर्वेदांत (तै. स. आणि वाज. सं.) जें अश्वमेधाचें स्वरूप आढळतें, त्याचें केवळ बाह्य स्वरूप पाहिलें तर तें सर्वसंग्राहक असें दिसतें. ज्याप्रमाणें एखाद्या देवाच्या जत्रेत वेदोक्त, शास्त्रोक्त व लौकिक अनेक प्रकार आढळतात; म्हणजे त्यांत ईश्वरनाम-स्मरणाचा जयघोष, पूजा, अभिषेक, अन्नदानाचें मुक्तद्वार, दुकानें, प्रदर्शनें व

करमणुकीचीं साधनें असतात, त्याचप्रमाणें जनतेच्या रुचिवैचित्र्याप्रमाणें अथवा संवत्सर यज्ञातील खिमग्याप्रमाणें क्वचित् तमाशांचे फडहि असतात. सम्राटानें करावयाचा हा अश्वमेध यज्ञ व्यवहारतः पुष्कळांना विविध प्रकारें आनंद देत असतो व लोकप्रीतीचें संवर्धन करतो.

लोकरंजन हें त्याचें बाह्यस्वरूप असावें असें भासलें, तरी त्याचें अंतःस्वरूप फार वेगळें असलें पाहिजे, असें थोड्या विचारा अंतीं दिसून येतें. त्यात "राजपत्न्याश्वसंभोग" हा एक गूढ व सांकेतिक विधि अत्यंत परोक्ष मार्फत वर्णिलेला आढळतो. यज्ञातील यजमान, म्हणजे सम्राट राजा आपल्या पट्टराणीला आपल्या देखत व अनेक ऋत्विजांच्या देखत एका अश्वाशीं संयुक्त करीत असतो, असा हा बाह्यतः अत्यंत अप्रशस्त व अमंगल दिसणारा विधि वाटतो. पण आपल्या प्राचीन वेदशास्त्राची भाषा इतकी परोक्ष असते कीं, ज्याप्रमाणें फणस, अननस, नारळ, किंवा भात यांतील रहस्यरूप अन्नांश, अत्यंत दक्ष, विलक्षण व त्याज्य आवरणांनीं आच्छादित असतो, त्याप्रमाणें शास्त्रातील अति गूढ रहस्यभाग बाह्यतः अमंगल वाटणाऱ्या परिभाषेंत लिहिलेला असतो[१] अशीं उदाहरणें वैदिक वाङ्मयांत पुष्कळ आढळतात. तसाच येथेंहि प्रकार असलाच पाहिजे, हें उघड आहे. एरव्हीं प्रभुरामचंद्र, युधिष्ठिर अशा आदर्शवत् थोर पुरुषानीं अश्वमेघ यज्ञ केलेच नसते. ही गोष्ट एखाद्या लहान मुलाच्याहि लक्षात येईल. ज्याप्रमाणें अनंत कालगणनेचें एक गमक ब्रह्मदेवाचा दिवस मानतात; अथवा ब्रह्मानंदाच्या आनंदाचें गमक श्रोत्रियाचा आनंद हें मानतात, त्याचप्रमाणें आपल्या प्राचीन ग्रंथात पुण्याईचें श्रेष्ठ गमक अश्वमेध यज्ञ हें मानतात, हें जाणून या महायज्ञाचा पुण्यमय रहस्यार्थ पाहिला पाहिजे. अश्वमेधासंबंधीं अश्लील व लैंगिक व्यवायभावनेनें तें पुण्याईचें श्रेष्ठ गमक मानताच येणार नाहीं. आपल्या प्राचीन शास्त्रातील हीं परोक्षे

१ Some of the stories are outwardly so absurd as would never have been preserved as sacred literature unless there was some simple meaning hidden in them. + + + wherever such things are found in the Vedas, we find in the case of many of them this stereotyped

[ टीप पुढील पानावर पहा. ]

भाषेतील वर्णनें ज्यांनीं काळजीपूर्वक म्हणजे आदर व आस्थापूर्वक वाचलीं असतील, त्याच्या हें लक्षांत आलें असेल कीं, त्या वर्णनांतच तें वर्णन उत्तानार्थानें वाचणें व्यर्थ आहे, तें लक्ष्यार्थानेंच वाचावें, अशी सूचक गुरुकिल्ली असतेच असते. शिपविष्ट शिव-विष्णु, अजाशिर दक्ष, गजशिर गणेश, अहल्याजार इंद्र, कन्याजार ब्रह्मा, हैमवती पार्वती, नांगरकींत सापडलेली सीता, यज्ञांतून निघालेली व पाच पतींची पत्नी द्रौपदी, भागवतांत अनुल्लिखित व परस्त्री असलेली श्रीकृष्णप्रिया राधा, अशा शेंकडो असंबद्ध भासणाऱ्या घटना प्राचीन वाङ्मयात आढळतात. त्या अध्यात्माचेंच उपबृंहण परोक्षतेनें करीत असतात. या अश्वमेधातील राजपत्न्याश्वसंभोग या निंद्य वाटणाऱ्या विधींतील अश्व मृत असतो; त्यामुळें तेथें संभोग शक्य नसतो, हें सर्व जाणत असतात. हीच यांतील असंबद्धतेची गुरुकिल्ली होय. याच्याच अधिक खुलाशाचा अल्प यत्न मी पुढें करीत आहें.

---

[ टीप, मागील पानावरून चालू ]

expression " परोक्षप्रियाः इव हि देवाः. " In approaching God, all kinds of moods of mind seem to have been employed. + + + and since the inner meaning was all right, no fear whatever stood in the way of even Para Brahman being outwardly subjected to all the paradoxes derived from the pranks of Sabda Brahman—the pranks of words in puns and puzzles. + + + For ages there seems to have been a school of poets who composed stories containing such riddles and their meanings were sufficiently well known to their contemporaries and successors. But a time came when they were forgotten and only the outer meanings left, there was never any immorality of the Gods nor of the Rishis spoken of in our Puranas and the Laws of conduct maintained in the different Shakhas were regorously enforced. ( Indo-Aryan mythology, Vol. I, Introduction, pp. XI-XII ).

या अश्वमेधांतील अश्वाचें वर्णन बृहदारण्यकांत पहिल्याच ब्राह्मणांत सविस्तर केलें आहे. त्यावरून हें स्पष्ट कळून येतें, कीं, " तस्यावयवभूतेस्तु व्याप्त सर्वमिद जगत् ।" अशा व्यापक महेश्वराचें म्हणजे विराटरूप परमात्म्याचें अथवा परमेष्ठि प्रजापतीचें अश्व हें प्रतीक आहे. पुरुषसूक्तांतील पुरुष (ऋ. १०।९०) व विश्वकर्मन् सूक्तांतील विश्वकर्मा (ऋ. १०।८१) हें त्या अश्वाचें मूळ तात्त्विक स्वरूप आहे. अर्थात् अश्वमेध यज्ञ म्हणजे वरील सूक्तांतील पुरुषमेध अथवा सर्वमेध यज्ञ होय. अश्वमेध यज्ञ क्षत्रिय सम्राटानींच करावा असा शास्त्रसंकेत आहे. म्हणजे तो क्षेत्राचा अभिमानी स्वामी असावा हा भाव आहे. महत्-प्रकृति हें तें क्षेत्र होय. तिलाच शास्त्रांत महद्योनि असेंहि म्हटलें आहे. या महद्योनिरूप प्रकृतीची सार्थकता समष्टि भगवान् तिच्या ठिकाणीं अनुप्रविष्ट होण्यातच आहे. याप्रमाणें राजपत्न्याश्वसमोग या विलक्षण विधींतील यजमान राजा हा जीवप्रतिनिधि, महाराज्ञी ही अखिल प्रकृति भगवती अथवा महद्योनि यांची प्रतिनिधि, व अश्व हा भगवान् परमपुरुष अथवा प्रजापति होय. परमपुरुष आणि प्रकृति ह्या परस्परांत स्वाभाविक आकर्षण मानलेलें असलें, तरी परमात्म्याचें स्वरूप निश्चल, निश्चेष्ट असें (अश्व) शवाप्रमाणें आहे. शिव हें

१ The first section of this adhyaya (बृहदारण्यक ब्राह्मण), contains a glorious description somewhat on the lines of the Purusha Sukta (Rig. X 90) of Viraj regarded as a sacrificial horse. The only value of this mataphorical description, it seems, consists in the help that it may render to the meditative worship of the cosmos regarded as the Supreme Reality. (History of Indian Philosophy, Vol. II, p. 181).

With such a tapas and utkranti, the Infinite Bhuman self (भुमान्) is exhibited as the Horse fit to be offered. Asva, horse, is derived from *as* which means both to *pervade and eat. (Indo-Aryan Mythology, Vol I, p. 426.)*

सशक्तिक ब्रह्म होय. शिव याचा व्युत्पत्तिसाध्य अर्थ निजलेला, निश्चेष्ट असाच आहे. शिवाय शिव या संज्ञेतील प्रकृतिरूप इकार वस्तुतः शिवात अविनाभूत आहे. पण जलांतून मत्स्य बाहेर काढावा तसा तो इकार पृथक् मानला की शिव शवरूप म्हणजे निष्क्रिय अथवा शुद्ध ब्रह्मरूप उरतो. मग मासळीची जशी जलाकडे अत्यंत ओढ असते–कारण तेंच तिचें जीवन असतें–त्याप्रमाणें तो प्रकृतिरूप इकार शवरूप ब्रह्माशीं जणु संयुक्त होण्यासाठीं अत्यंत उत्कंठित असतो. तसेंच तो प्रजापति परमपुरुष सर्व क्षेत्रांत, बुद्धींत, अगर प्रकृतींत अनुप्रविष्ट व्हावा, हेंच जीवाच्या प्रकृतीच्या ठिकाणीं निरतिशयानंदोपलब्धीचें कारण असतें. वस्तुतः निष्क्रिय असें महाकाशघटात अनुप्रविष्ट होतें असें नव्हे. तें तेथें नित्य असतेंच. त्याची तेथें उपलब्धि होते. त्यास मग घटाकाश म्हणतात. याप्रमाणेंच प्रकृतीच्या ठिकाणीं पुरुषाची आत्मोपलब्धि हा आनंदानुभव आहे. आत्मरति ती हीच. ती जीवरूप पराप्रकृतीच्या स्वामीस सर्वथा इष्टच असते. त्याहून परमलाभ तो कोणता? हेंच अश्वमेध यज्ञांतील महत्पुण्य होय. यांत स्वयंसिद्ध वस्तूची उपलब्धि मात्र सुचविली आहे. याप्रमाणें या ब्रह्मोद्य-प्रकरणांत ब्रह्मोदनाचें प्रत्यक्ष ग्रहण नसून, केवळ आत्मोपलब्धि महावाक्यद्वारां सूचित करावी, त्याप्रमाणें प्रकृतिपुरुषांच्या संयोगाचा उत्तानार्थानें ग्राम्य वाटणारा नुसता परोक्ष संवाद आहे (किंवा असे अनेक संवाद आहेत). रंगभूमीवर ज्याप्रमाणें भोजन, रणसंगर, आणि रतिसंगर हे साक्षात् घडत नसतात, उगाच शाब्दिक निर्देश मात्र असतात; त्याप्रमाणें या ब्रह्मोद्यप्रकरणांतील प्रकृतिपुरुष संयोगाचे परोक्ष संवाद परमात्मरतीच्या निरतिशयानंदाचे गूढ निर्देश मात्र आहेत असें जाणावें. असें हें अश्वमेध-प्रकरणांतील रहस्य मला वाटतें.

प्रकृतीचा स्वामी जीव (राधेच्या अनयाप्रमाणें) उगाच व्यवहारतः नाममात्र तिचा पति आहे. सर्व प्रकृतींचा वास्तविक पति सोळा हजार गोपींना आकर्षित करणारा भगवान् कृष्ण अथवा पशुपति शिव होय. तो निष्काम व निष्क्रिय आहे. तत्त्वतः पाहतां परमशिव अथवा ब्रह्म या अधिष्ठानावर परस्परांस आकर्षित करणारें–पुरुष आणि प्रकृति हें विवर्तरूप द्वंद्व होय. यासच अन्न आणि अन्नाद, अग्नि आणि सोम, प्रजापति आणि वाक्, घनऋणविद्युत् अशा अनेक संज्ञा देतां येतील. अश्व तोच परपुरुष होय, आणि

राजपत्नी हीच प्रकृति होय परमात्मस्वरूप परपुरुषास जार ही लाक्षणिक संज्ञा आहे. पण तत्त्वत. जविनामक या देहनगरीच्या राजाची पारमार्थिक इच्छा आपल्या प्रकृतीनें त्या परपुरुषाशीं संगत व्हावें हीच असते. हाच मोक्षकाम होय. हा ग्राम्य लैंगिक काम नव्हे अश्वमेधांतील अश्वाला भूयान असें म्हटलें आहे परोक्षतेनें लिहावयाचें तर श्वेताप्रमाणें शव फुगतें तसा फुगलेला भूमा आपल्या महिम्यानें महतो महीयान आहे तो परमपुरुष नामरूपकर्मात्मक सर्व प्रकृति विशेषात अनुप्रविष्ट होतो. हाच तो पुरुषयज्ञ-सर्वमेधयज्ञ, किंवा अश्वमेधयज्ञ होय. हा यज्ञ प्रभुरामचद्र, युधिष्ठिर, अशा थोर क्षेत्रज्ञ अथवा क्षेत्रपतींनाच म्हणजे ज्याची प्रकृतीवर सत्ता आहे अशा अधिकारी साधकांस मात्र, करता येतो. हाच श्रेष्ठ पुण्याईचा गमक होय.

---

१ श्वेत राजाचें आख्यान पहा. रामायण –उत्तरकाड, –अ. ७७।७८ व Indo-Aryan Mythology, Vol. I, pp. 146–153, 425 पहा.

२. The Satapatha Brahman says— Prajapati created Virat ( Vak ). She being produced from him went away and entered into the sacrificial horse + + Her entering into the sacrificial horse indicates that she is one with the self that is sacrificed into the hearts womb of all creatures. The Taitt. Sambitta III 3, 5, 2 says that Prajapati saw Virat and with her produced creatures. The Satapatha Brahman says that Vishva Karman produced the creatures from Vak. + + + All this taken together with the riddle of Prajapati's daughter–wife leaves no doubt whatever that Virat is the creator himself revealed as his own daughter Vidya and that He is born in her as the victim Purusha that is fit to be sacrificed in order to show that the purusha thus sacrificed has become all Vedic knowledge and all the creatures and heavenly objects in the sense that He has enselfed them all ( Indo-Aryan Mythology, Vol. I, p. 432. )

महाभारतांतील आश्वमेधिकपर्वांत अनुगीता हाच अत्यंत सारभूत असा अध्यात्मपर भाग आहे. त्यामुळें या संबंध पर्वास अनुगीतापर्व म्हणणें हेंच जास्त योग्य होईल. ही अनुगीता हा आश्वमेधिकपर्वाचा गाभा असल्यामुळें साऱ्या आश्वमेधिकपर्वालाच आध्यात्मिक स्वरूप प्राप्त होतें. यांत हिंसेचा निषेध केला आहे. विषयत्यागाचें महत्त्व वर्णन केलें आहे. आणि हा यज्ञ करण्याकरितां अपार संपत्ति लागते ती कोठून आणावी ? म्हणून युधिष्ठिरानें श्रीकृष्णास प्रश्न केला असतां, कैलासनाथ महातपस्वी शंकर याची महायोग-भूमिरूप मुंजवान पर्वत आहे, तेथें मरुत्-संवर्ताप्रमाणें विपुल संपत्ति मिळेल, असें लाक्षणिक उत्तर भगवंतानें दिलें आहे. ही संपत्ति म्हणजे पारमार्थिक, योगिक अथवा ' वित्तं च पवित्रं ज्ञानमुत्तमम् । ' ( अनुगीता ) याप्रमाणें वित्त म्हणजे ज्ञानस्वरूप आध्यात्मिक संपत्ति होय. मुंजवान पर्वत म्हणजे आत्मानात्मविवेक समजावा. मुंजनामक गवतांतून आंतील गाभ्याप्रमाणें असणारी काडी काढतात, त्याप्रमाणें ज्यानें हृदयस्थ आत्म्याला पृथक्त्वानें जाणलें तो योगी हाच मुंजवान होये. हा विषय इतका सूक्ष्म, गूढगंभीर व

---

१ महाभारत भाषांतर ( चिपळूणकर मंडळीचें ) अध्याय ५१ अखेर टीप पहा.

२ अहिंसा सर्वभूतानामेतत् कृत्यतमं मतम् । एतत्पदमनुद्विग्नं वरिष्ठं धर्मलक्षणम् ॥ हिंसापराश्च ये केचिद्ये च नास्तिक वृत्तयः । लोभमोहसमायुक्तास्ते वै निरयगामिनः ॥ अनुगीता. ( अध्या ९१ पहा. )

३ तत्र गत्वा समन्वास्य महायोगेश्वरम् शिवम् ॥ अनुगीता.

४ The story thus alludes to some process of involution by Yoga, the Lord of Maha-yoga having been mentioned as residing in Munjavan. ( Permanent History of Bharatvarsha, Vol. II, p. 633. )

५ इषीकां च यथा मुञ्जात् कश्चिन्निष्कृष्य दर्शयेत् । योगी निष्कृष्य चात्मानं तथा पश्यति देहतः । मुञ्जं शरीरमित्याहुरिषीकामात्मनिश्रिताम् । एतन्निदर्शनं प्रोक्तं योगविद्भिरनुत्तमम् ॥ —अनुगीता.

व्यापक आहे की, त्याचें पुरेसें वर्णन या परिच्छेदांत करतां येणें अशक्य आहे. वाचकांनीं अतिगूढ असलेल्या बृहदारण्यक ब्रा. १-२ आणि अनुगीता याचा काळजीपूर्वक अभ्यास केल्यास अश्वमेधांतील भूयान (फुगलेला) अश्व म्हणजे विश्वव्यापी समष्टिरूप मन होय, असा भाव व्यक्त होईल व त्यानें या अति हिंसाप्रयुक्त व अमंगल वाटणाऱ्या अश्वमेध प्रकरणावर पिण्डातर्गत शिव योगप्रक्रियेचा किंवा अंतर्यामीकडून समष्टीच्या उद्भवाचा वेगळाच प्रकाश पडेल.

तात्पर्य, अनुगीतेंत सांगितलेल्या यौगिक व आध्यात्मिक तत्त्वज्ञानपरच अश्वमेधप्रकरण लावावें लागेल. याच पर्वांत हिंसेचा निषेध केला आहे व सारें वर्णन लाक्षणिक आहे. "देशन्द्रियाणि होतॄणि हवींषि दश मामिनी। विषयानाम समिधो हूयन्ते तु दशाग्निषु॥" हे यज्ञस्वरूप होय (अनुगीता).

भगवद्गीतेंतहि या पिंडांतर्गत यज्ञाचा महिमा सांगितलाच आहे.

सर्वाणीन्द्रियकर्माणि प्राणकर्माणि चापरे।
आत्मसंयमयोगाग्नौ जुह्वति ज्ञानदीपिते॥ २७॥
श्रेयान्द्रव्यमयाद्यज्ञाज्ज्ञानयज्ञः परंतप।
सर्वं कर्माखिलं पार्थ ज्ञाने परिसमाप्यते॥ ३३॥ —गीता ४

याप्रमाणें कोणी विद्वान् म्हणतात, (The mystery of the Mahabharat) त्याप्रमाणें, अश्वमेध याचा अर्थ इंद्रिय, मन, बुद्धि यांच्या निष्कामतेपूर्वक अनायास सहज त्यांच्या आत्मस्वातंत्र्यानेंच होणारा संयम, असा केला, तरी त्यांत लैंगिक कामाला अवसरच राहत नाहीं. अधियज्ञस्वरूप ईश्वराच्या अंतरोपलब्धीची ही पूर्वतयारीच जाणावी. या ग्रंथकाराच्या मतें यज्ञात ईश्वरार्पण हीच कल्पना मुख्य आहे, भोग नव्हे, त्याग हें यज्ञरहस्य होय. (गीता ३।९-१५, ४०-४३; ४।२४-३३.)

१ सोऽकामयत भूयसा यज्ञेन भूयो यजेयेति। सोऽश्राम्यत्स तपोऽतप्यत तस्य श्रान्तस्य तप्तस्य यशो वीर्यमुदक्रामत्। प्राणा वै यशो वीर्यं तत्प्राणेषूत्क्रान्तेषु शरीरं श्वयितुमध्रियत तस्य शरीर एव मन आसीत॥ ६॥ सोऽकामयत मेध्यं म इदं स्यादात्मन्व्यनेन स्यामिति। ततोऽश्वः समभवद्यदश्वत्तन्मेध्यमभूदिति तदेवाश्वमेधस्याश्वमेधत्वम्। एष ह वा अश्वमेधं वेद य एवमेवं वेद॥ + + +॥ ७॥ बृ. उप. १।२.

वस्तुत या अश्वमेध-प्रकरणीं लैंगिक काम अत्यंत अप्रस्तुत आहे मग त्याची वैदिक परिभाषा कशीहि असो वस्तुत अचल असून उगवत्या-मावळत्या भासणाऱ्या सविता-प्रजापतीला बृ उ प्र ब्रा० २ प्रमाण अश्व मानून पूर्वपश्चिम समुद्र, या त्याच्या योनि म्हटल्यानें त्यात अश्लीलता ती काय मानावी?

तत्त्वत विचार करता शिव याचा अर्थ निश्चेष्ट, व शक्ति तर जड, याच्यांत सयोग अशक्य अर्थात् ह्या संयोगात अपूर्वोत्पत्ति परमार्थत सभवतच नाहीं पण नाकबूल करण्याची सोयच नाहीं असें हें ब्रह्माडबालक तर साक्षात् दिसतें. म्हणून विवर्तरूप ह्या अपूर्व आभासास उत्पन्न करू पाहणा या क्रियेला सृष्टय-मुख अश्वमेध नामक पुरुषप्रकृतियाग अथवा यज्ञ म्हटलें आहे तरी आत्मसयमनानें शिवसायुज्यप्राप्ति हाच त्याचा रहस्यार्थ दिसतो अश्वमेधाच्या आरंभीं परीक्षितीचें मृतप्राय शरीर भगवताच्या कृपेक्षणानें सचेत झालें तशी ही विश्वप्रकृति सबीज सद्ब्रह्माचे अनुप्रवेशानें सचेतन दिसू लागली आहे मुमुक्षूचा इंद्रियरूप अश्व मोकळा सोडला तरी तो कोणत्याहि विषयबधनात अडकला जात नाहीं, यातच साधकाच्या पिण्डातर्गत अश्वमेधाची पुरी सिद्धता होते पराप्रकृति परपुरुषाशी तन्मय होणें ही त्यापुढील सहज व दिव्य अशी ज्ञानप्रक्रिया आहे

प्रिन्सिपॉल थडाणी याच्या महाभारताच्या दार्शनिक उपपत्तीप्रमाणें याग म्हणजे यज्ञ ही पूर्वमीमासा व योग (शिवयोग) वेदान्त ही उत्तरमीमासा होय शिवसायुज्यात त्यागस्वरूप यज्ञप्रक्रियेची परिणति आहे इंद्रियाच्या यज्ञापासून (गी० ३।४१, ४।२६, २७) त्यागाला सुरुवात होते त्यांनी आपल्या ग्रथात राजपत्न्याश्वसयोग या विधीचा उल्लेखहि केला नाहीं पण आपल्याला ज्या अर्थी त्याच विधीचा लाक्षणिक रहस्यार्थ पाहावयाचा आहे, त्या अर्थी इंद्रियें, मन, बुद्धि, यानतर जीवप्रकृतीलाहि परपुरुषार्पण म्हणजे महादेवार्पण करणें हेच अश्वमेध यज्ञाचें पर्यवसान मानणें ओघास येतें (Mystery of Mahabharat, Vol V, pp 782 95) दोन्ही गीतांतील (गीता व अनुगीता) रहस्य हेंच स्पष्ट दिसतें

महाभारतात आश्वमेधिक पर्वात युधिष्ठिरानें केलेल्या अश्वमेधाचें वर्णन आहे त्यात राजपत्न्याश्वसयोग हा भाग मुळींच नाहीं श्रीरामानीं अनेक

अश्वमेध केले. पण त्या वेळी साक्षात् सीता त्यांच्याजवळ नव्हतीच.' ते तिची सुवर्णाची प्रतिमा जवळ घेत.

कोणी वैदिक यज्ञ ही योग्याची पिण्डांतर्गत प्रक्रिया आहे, असें मानतात. पिण्डांतर्गत हृदय हाच यूप व अहंकार-कामक्रोधादि विकार हेच मेध्य पशु, असा ते अर्थ करतात. कोणी याचा संबंध ऋ. १०।८१, १०।९०, व १।१६४।३५, तसेंच तै. सं. ५।४।१२ व बृहदारण्यक १।१।२ यांच्याशीं जोडतात. अश्व या शब्दाचा अर्थ वैदिक वाङ्मयांत पंधरा–सतरा प्रकारचा केला आहे. प्रजापति, इंद्र, वरुण, आदित्य, अग्नि इत्यादि देवतांस व विद्युच्छक्तीसहि अश्व ही संज्ञा लावली आहे ( शतपथ ब्राह्मण, हिंदी विज्ञान भाष्य, खंड ३, पृ. ८५, १४५, १४६, पहा ). अश्व या संज्ञेत भूयान् व्यापक ( अश्नवत् इति अश्वः ) व शक्तिमान् ( तै. ब्रा. ३।८।७।२ ) असे धर्म दिसतात. भौतिक शास्त्रज्ञांचेंहि 'हॉर्सपावर' हें शक्तीचें गमक आहे. तात्पर्य, अश्व म्हणजे सर्वशक्तिमान् शिव परमात्मा असें वाटल्यास मानावें. पण यांत ग्राम्य व अश्लील असा लैंगिक भाव नाहीं. असो. अशा या क्लिष्ट विषयाचा अधिक विचार या ग्रंथांत अप्रस्तुत आहे. अश्लीलतेच्या आक्षेपनिरसनापुरता वर केलेला खुलासा पुरेसा सूचक होईल असें वाटतें. अश्वमेधांतील राजपत्न्याश्वसंयोग कोणींच पाहिलेला नाहीं. यजुर्वेदांत ( तै. सं. व. वा. सं. ) तसा विधि सांगितला

१ दशरथानें केलेल्या अश्वमेधांत हा विधि वर्णिला आहे. पण तत्पूर्वी अतिशय आनंदानें तीन तरवारींनीं ( त्रैलोक्यव्याप्त ) अश्वाला फाडलें, ( कृपाणेर्विशशासैनं त्रिभिः परमया मुदा ॥ १४।३३ बालकांड. ) आणि नंतर धर्मकामना मनामध्यें आणून स्वस्थांतःकरणपूर्वक एक रात्र कौसल्येनें त्यासमीप नुसतें वास्तव्य केलें, असें उघड उघड लाक्षणिक वर्णन आहे. युधिष्ठिराच्या यज्ञांत अश्वाचें शतशः खंड केल्यानंतर द्रौपदी जवळ बसली होती. *यांत ईश्वरांशाचा प्रकृतींत अनुप्रवेश सूचित केला आहे. त्यांत* अश्लीलतेचा लवलेशहि नाहीं. यज्ञस्वरूप प्रकृति ईश्वरार्पण केली आहे, हाच भाव तेथें जाणावा.

२ A true interpretation of Vedic sacrifice. Permanent History of Bharatvarsha Vol. II, Chapter XIV.

असला, तरी तो वरील अर्थानें लाक्षणिक आहे, असेंच मानणें, बृहदारण्यक, अनुगीता, महाभारत, रामायण इत्यादि ग्रंथांवरून सयुक्तिक ठरतें.

पुढील श्लोकावरून भगद्गीतेंतहि यज्ञाची कल्पना कशी ओतप्रोत आहे तें दिसून येतें. यांत पुरुषप्रकृति, योनि, बीज हे शब्द असले तरी अश्लीलता कोठेंच नाहीं.

> अधियज्ञोऽहमेवात्र देहे देहभृतां वर ॥ ८।४
> ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम् ॥ ४।२४
> अहं क्रतुरहं यज्ञः + + + आज्यमहमग्निरहं हुतम् ॥ ९।१६
> गतिर्भर्ता + + निधानं बीजमव्ययम् ॥ ९।१८ ॥
> पुरुषः प्रकृतिस्थो हि भुंक्ते प्रकृतिजान्गुणान् ।
> कारणं गुणसंगोऽस्य सदसद्योनिजन्मसु ॥ १३।२१
> मम योनिर्महद्ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम् ।
> संभवः सर्व भूतानां ततो भवति भारत ॥ १४।३
> सर्वयोनिषु कौंतेय मूर्तयः संभवन्ति याः ।
> तासां ब्रह्म महद्योनिरहं बीजप्रदः पिता ॥ १४।४

याप्रमाणें सारें पिंडब्रह्मांड हे यज्ञस्वरूप आहेत. यांत क्षेत्र म्हणजे प्रकृति व त्यांत अनुप्रविष्ट तो क्षेत्रज्ञ पुरुष यांच्या उभयतांच्या परस्पर संबंधाचे म्हणजेच शिवशक्तीच्या सामंजस्याचें अथवा मधुमीलनाचें जें ज्ञान तोच महान् ज्ञानयज्ञ होये. यांतच अज्ञानाची पूर्णाहुति दिली जाते. अश्वमेधादि यज्ञ हे याचेंच प्रतीक असावें. त्यांत वस्तुतः जाणत्याच्या दृष्टीला ग्राम्य व अश्लील कांहींच दिसत नाहीं.

परंतु या आधुनिक विद्वानाच्या बृहद्ग्रंथांत विकृत लैंगिक कामासक्तीचा अवाच्य असा विचका केला आहे. आणि शिवलिंग हें यान्त लैंगिक कामासक्तीचें प्रतीक आहे, असा त्यांच्या ग्रंथांतील अभिप्राय आहे. इतकेंच नव्हे -तर सामान्य मैथुनकाम ब्रह्मानंदप्राप्ति करून देणारा आहे, असा इष्टार्थ व्यक्त केला आहे. त्यामुळें अशा बहुमोल गणलेल्या या आधुनिक ग्रंथाकडे डोळेझांक करून स्वस्थ बसणें, किंवा तूर्त शिथिलता ठेवणें हें योग्य होणार नाहीं. पण

१ क्षेत्रज्ञं चापि मां विद्धि सर्वक्षेत्रेषु भारत । क्षेत्रक्षेत्रज्ञयोर्ज्ञानं यत्तज्ज्ञानं मतं मम ॥ गीता १३।२.

या आधुनिक विद्वानांच्या ग्रंथांतील मागील तीन-चारच मुद्यांचा खुलासा करण्यांत या ग्रंथाची बरींच पृष्ठें अडविलीं. अशा रीतीनें या व अन्य आधुनिक लेखकांच्या या एका जघन्य लैंगिक भावासंबंधीं सर्व आक्षेपांचा सविस्तर विचार करण्यास या ग्रंथांत वस्तुतः पुरेसा स्थलावकाश नाहीं. मागील प्रकरणांत या विषयासंबंधीं थोर तज्ज्ञांकडून जें सामान्यतः विवेचन झालें आहे, तें सुज्ञ वाचकांस पुरेसें आहे. पण आक्षेपकांच्या कित्येक मुद्यांना मीं या चिकित्सकनामक खंडांत स्पर्शहि केला नाहीं, हा आक्षेप मजवर राहूं नये, म्हणून मला माहीत असलेल्या जघन्य लैंगिक भावासंबंधीं अन्य आक्षेपांचा अति त्रोटक रूपांत मी यापुढें प्रकरणशः परामर्श घेणार आहें.

शिवपूजात्मकं कर्म कर्मनिर्मूलनक्षमम् ।
संकल्पः शिवपूजायाः सर्वसंकल्पदुःखहृत् ॥ १ ॥

—शिवपूजाशतक.

---

प्रकरण ६ वें

# लिंगयोनिचिन्हांचे देव्हारे व शिवलिंगोपासना

[२]

**रूद्रो लिंगमुमापीठं तस्मै तस्यै नमो नमः ।**

—रुद्रहृदयोपनिषद् २३.

वरील वचनांत लिंग अथवा बाण हें रुद्राचें प्रतीक व साळुंका हें उमेचें पीठ यांस नमस्कार केला आहे. यांतील रुद्र म्हणजे पुरुष व उमा म्हणजे प्रकृति किंवा रुद्र आत्मदेव व उमा ही ब्रह्मविद्या असें समजावें. ब्रह्मविद्येंत प्रतिबिंबित, प्रतिफलित, अथवा अनुप्रविष्ट जो अंतर्यामिन् तोच शरण्य शिवात्मदेव होय. यांत अश्लील भावाचा संपर्कहि नाहीं.

(१) आक्षेप—पाशुपत हे लिंगोपासक व शाक्त हे योन्युपासक होत.

(१) उत्तर—पाशुपत हे शिवोपासक व शाक्त हे शक्तीचे उपासक एवढेंच खरें. पाशुपत आणि शाक्त या दोन्ही पथांचें तत्त्वज्ञान श्रेष्ठ

जननेंद्रियांचे देव्हारे दोन्ही पंथांत नाहींत. दोन्ही पंथ अद्वैत तत्त्वज्ञानी आहेत. या पाशुपत तत्त्वज्ञानासंबंधी श्रीहंसराज स्वामी वेदेश्वरीत (अ० ५) म्हणतात कीं, " आणिक आपुलें निजपाशुपतास्त्र। अभिन्न ज्ञान जें वस्तुतंत्र। जेथें त्रिपुटीभेद नसे अणुमात्र। देता झाला तेंहि ॥ ७० ॥ एवं धनुष्य तेंचि अनुसंधान। सद्बुद्धिविचार भाता पूर्ण। पाशुपतास्त्र तें अभिन्न ज्ञान। ऐशीं तिन्ही हीं दिधलीं ॥ ७१ ॥ " यामाप्रमाणें अर्जुनानें शिवापासून मिळविलेल्या पाशुपतास्त्राचा असाच लाक्षणिक अर्थ करतां येईल. शिवाय लिंगपुराण, पू. अ. ७३, १०८ इत्यादि शैव वाङ्मय, पाशुपतपंथासंबंधीं पहावें.

पाशुपत मतांत ईश्वर केवळ निमित्तकारण मानला आहे, म्हणून आचार्यांनी त्या मताचें खंडण केलें आहे. एरव्हीं त्या मतांत आक्षेपकास पाहिजे आहे तो ग्राम्य लैंगिक भाव नाहीं. उलट मनामध्यें कामवासनेचा गंधहि राहूं न देणें हें ह्या माहेश्वर मतांतील शृंगारणद्वार होय. (ब्रह्मसूत्र शांकरभाष्य, २।२।३७ लेलेकृत भाषांतर पहा.)

आतां शाक्तांच्या शक्तिरूपाबद्दल आधुनिक तत्त्वज्ञ श्रीराधाकृष्णन् काय म्हणतात तें पहा :—The cult of Sakti finds its beginnings in the Rigveda. In one of the hymns Sakti is represented as the embodiment of power, the supporter of the earth living in heaven. She is the Supreme Power " by which the universe is upheld, the great mother of the devotees ( Suvratanam )," and soon became identified with " Uma of golden hue " of the Ken Upanishad. ( Indian Philosophy, Vol. II, p. 734). Durga whorship is mentioned in the Mahabharat at the beginning of the Bhisma parva. Krishna advises Arjun to make an obeisance to Durga before the commencement of the battle and pray for success. In the Markandeya purana and two hymns of Harivansa, She becomes the centre of a great cult. (Indian Philosophy, Vol. I, p. 487). शाक्त धर्माचें उज्ज्वल स्वरूप पाहण्यासाठीं आचार्यांचे परमार्थसार, आनंदलहरी, सौंदर्यलहरी तसेंच

भास्करराय यांचे ग्रंथ, रामप्रसाद यांची कविता व श्रीरामकृष्णपरमहंसांचें चरित्र पाहावें. तसेंच ज. वुड्रॉफ यांचे ग्रंथ वाचावे.

**(२) आक्षेप** — शिवपार्वती यांच्या कथानकांतून त्यांच्या एकांतातील विलासांत लैंगिक भावनातिशय दिसतो. तत्त्वतः शिव हा लिंगदेव, पार्वती ही योनि व ब्रह्मा–विष्णु हे वृषणद्वय होत.

**(२) उत्तर** — शिव आणि पार्वती पुराणकारांनीं देहाकाररूपात पुरुषविध वर्णिलीं असलीं, तरी तत्त्वतः तीं अरूप आहेत. शक्ति ही शिवाशीं अविनाभूत आहे. पृथक् मानली तर मिथ्या आहे लिंगयोनि हीं इंद्रियें जन्माला कारण आहेत. जगद्गुरु शिव व ब्रह्मविद्या उमा हीं जन्मातून सोडविणारीं आहेत. त्याच्या सगुण लीला भक्तमनरंजनार्थ वर्णिल्या आहेत. पिण्डांतील पाठीच्या कण्यांतील मणक्यांस पर्व म्हणतात. त्यांतून संचार करून संविद्रूपांत जगाची उभारणी व संहारणी करणारी जी कुल–कुंडलिनीनामक प्राणशक्ति तीच जगन्माता पार्वती होय. व जगाचा उपसंहार करणारी पण काली तीच होय. सहस्रारातील शिवाशीं जीवाची सायुज्यता घडवून आणणारी कुलकुंडलिनी अथवा अध्यात्मविद्या तीच. जननेंद्रियें या अर्थानें शिवाला लिंगरूप व पार्वतीला योनिरूप शास्त्रानें मानलें असतें तर त्याच्या संयोगातून गणेश व स्कंद हे उत्पन्न झाले असेंहि वर्णिलेलें आढळतें. पण गणेश हा केवळ पार्वतीचा प्राकृतिक व स्कंद हा केवळ शिवाचा अंश मानला आहे.

आता सगुण शिवाच्या व्यापक देहाकाराची कल्पना करून " वृषण ते मित्रा वरुण, प्रजापति शिश्न । लज्जा लोम हे दोन । ओठ कोमळ ॥ २३७ ॥ ++ पाणि तोचि जाणिजे इंद्र । पाद तो वामन उपेंद्र । प्रजापति तोचि मेढ्र । जया शिवाचें ॥ २४१ ॥ +++ एव पचभूतें चारी खाणी । त्रैलोक्य हें हृदयगर्णी । आणि चचलरूप देव मिळोनी । एकलें शिवत्व विल्से ॥ २४४ ॥ ऐसें असतां अल्पज्ञ जीव । चळे धरिती एकदेशी भाव । लहानथोर ठेवोनि नांव । भजती वेगळाले ॥ २४५ ॥ " इत्यादि प्रकारें जें व्यापक वर्णन आढळतें, तें स्पष्ट परिच्छिन्नइंद्रियभावविरोधी असतें. अर्थात्, शिव म्हणजे लिंग आणि पार्वती म्हणजे योनि या अवयवांच्या कल्पना अत्यंत असंबद्ध ठरतात. शिवलिंगाला वृषणद्वय जोडल्याचें शब्दचित्र अगर शिल्प कोठें आढळणार

नाहीं. तात्पर्य, व्यापक शिवाच्या शिवलिंगप्रतीकाच्या ठिकाणीं जननेंद्रियांच्या कल्पना करताच येत नाहींत.

( ३ ) **आक्षेप** — अर्धनारीश्वरांत हाच लैंगिक भाव आहे. हराचें प्रतीक लिंग व हरीचें शाळिग्राम असें हें हरिहराचें मिथुन वर्णिलें आहे.

( ३ ) **उत्तर** — अर्धनारीश्वरभावांत आक्षेपकास अभिप्रेत असलेलें जननेंद्रियांचेंच वैशिष्ट्य असतें असें नाहीं. व त्यांचा संयोग समवतच नाहीं

अर्धनारीश्वराचा अथवा शाळिग्रामाचा शिवलिंगोपासनेशीं मुळींच संबंध नाहीं. म्हणून त्याचा अधिक विचार येथें अप्रस्तुत आहे. हरिहरमूर्ति ( वामन-पुराण ) व अर्धनारीश्वर ( शिवपुराण ) या दोन्ही कल्पनांचे हेतु व आख्यानें वेगळीं आहेत. हरिहरमूर्तीनें शिवविष्णु यांत अभेद ऋषींना पटविला आहे तसेंच शिवशक्ति तत्त्वें अविनाभूत आहेत हें तत्त्व अर्धनारीश्वरामुळें ब्रह्मदेव व भृंगिऋषि यांस प्रतीत झालें आहे. असे त्यांतील भिन्न भाव आहेत. त्यांत लैंगिक किंवा अश्लील भावना नाहीं. विश्वगणिताच्या दृष्टीनें दोन संख्यानिरपेक्ष जें केवलाद्वैत त्यास एकहि म्हणतां येत नाहीं. पण एकोऽहम या आद्यस्फूर्तीत, अहंता–इदंता, विषय–विषयी, साक्षी–साक्षीभास्य, कल्पक-कल्पना, पुरुष-प्रकृति, मूळपुरुष–मूळमाया असें द्वंद्व निर्माण झालें व त्या द्वंद्वांतूनच पुढें असंख्य भाव उद्भवले. सत्, चित्, आनंदरूप पुरुष व सत्त्व, रज, तमरूप प्रकृति, दोन्ही मिळून षड्गुणेश्वर भगवान् असें हें अर्धनारीश्वराचें तत्त्वज्ञान आहे. लांबट कलिंगड उभें चिरून त्याचीं दोन शकलें करावीं, त्याप्रमाणें पूर्वीच्या एकाच प्राण्याचीं स्त्री आणि पुरुष हीं दोन अर्धे आहेत, अशीहि शास्त्रांत कल्पना केली आहे या केवळ कल्पनाच असाव्यात. कांहीं असो. ब्रह्मदेवानें अर्धनारीश्वराला तुम्ही नारी-नर मैथुनसृष्टि निर्माण

---

१ + + + Whose consort is Himself as Vidya, for it is said that He doubled himself as Husband and Wife. Who is himself the One manifold Son. ( Indo-Aryan Mythology, Vol. II, p. 25. )

निर्गुणी गुणविकारू । तोचि षड्गुणेश्वरू । अर्धनारी नटेश्वरू । तयासी म्हणिजे ॥ १७।२१८ दा. बो.

करण्याकरता पृथक् व्हा, अशी प्रार्थना केली, तेव्हा अर्धनारीश्वर रूपातील नारी सतिरूपानें जन्मास आली ही लाक्षणिक कथा आहे अर्थात् तत्पूर्वीचें जें जगत्कारणरूप अविनाभूत शिवशक्ति तत्त्व त्यात मैथुनभाव संभवत नाहीं. त्याचेंच शिवलिंग हें प्रतीक आहे

(४) आक्षेप—पृथ्वीवर सर्वत्र शिश्नयोनि या इंद्रियाचें किंवा त्याच्या प्रतिमाचें पूजन प्राचीन कालापासून प्रचलित असल्याचें आढळतें- ( Phallism, Phallic objects, Phallic worship, Phallic miscellanies, Encyclopaedia of Religion and ethics. ) लैंगिक कामासक्ति ही प्राण्यावर निसर्गानेंच लादलेली स्वाभाविक व अनिवार्य प्रवृत्ति आहे, म्हणून ती आदरणीय मानली पाहिजे मनुष्य थोडा सुधारणेच्या मार्गाला लागला कीं प्रथम त्याला धार्मिक पूजनाची जी भावना स्फुरद्रूप होते, ती लिंगविषयकच असते तेव्हा उपस्थाचे देव्हारे सुरू होणें ही मानवी संस्कृतीची प्राथमिक अवस्था आहे उत्कट भक्तिभावनेचें पर्यवसान लैंगिक कामासक्तींत होत असतें

(४) उत्तर—इतर कोठें असले अनाचार होत आले असले तरी भारत-वर्षात असले प्रचार केव्हाहि सुरू असल्याचें सिद्ध करता येणार नाहीं. आपल्याकडे आजहि आदिवासी अगर अरण्यवासी लोकांत हे प्रकार कोठेंच सुरू नाहींत, ही गोष्ट उपरिनिर्दिष्ट ग्रंथातहि नमूद केलेली आढळेल लैंगिक काम नैसर्गिक असला तरी त्याच्या आसक्तींत मनुष्यानें पशूच्यावर ताण करणें हें लज्जास्पद आहे [1] सर्व धर्मांतील धार्मिक पूजनाची भावना जननेंद्रियाच्या देव्हाऱ्यात सुरू होते, हें विधान अत्यंत निराधार वाटतें सर्व धर्मांचें मूळात ऐक्य दाखविण्याचा यत्न बाबु भगवानदास व रेने गेनॉ यांनी केला आहे त्यात त्यांनी या मुद्याला स्पर्शहि केला नाहीं भक्तीस विरक्तीची जोड मिळाल्यानें त्वरित आत्मप्राप्ति होते, असें नाथभागवतात व शिवदासकृत सिद्धारूढ चरित्र अ. ४५ यात सुंदर दाखविलें आहे ईश्वराच्या प्रेमलक्षणा-भक्तीचें पर्यवसान अन्य विषयासंबंधीं विरक्तींतच व्हावयास पाहिजे, हेंच भक्तिशास्त्राचें रहस्य आहे. " विषय तो झाला आम्हा नारायण । " हेंच सगुण-भक्तीचें पर्यवसान होय "शिश्नदेवास" आधुनिकांच्या अर्थानें निंद्य मानणारांनीं हा मुद्दा पुढें मांडावा, हें विसंगत दिसतें.

लिंगपुराण, शिवपुराण इत्यादि शैव व वैष्णव पुराणात व स्वतंत्र शास्त्र ग्रंथांत जी लिंगार्चना सांगितली आहे, त्यात उपस्थेंद्रियांचा यत्किंचितहि संपर्क नाहीं व सामान्यतः सर्व शिवलिंगात उपस्थेंद्रियांचें साहश्यहि नसतें.

त्याचप्रमाणें देवीसंबधीं वैदिक वाङ्मयात, तसेंच देवीभागवत, मार्कंडेय पुराण, देवीगीता इत्यादि पौराणिक वाङ्मयात देवीसंबधीं जी उपासना सांगितली आहे, त्यातहि लैंगिक भाव नाहीं. काली, अन्नपूर्णा, भवानी, एकवीरा, सीतळादेवी, वज्रेश्वरी, भद्रकाली, गावदेवी इत्यादि शक्तींच्या देवस्थानातील देवींच्या मूर्तींत लैंगिक भाव मुळींच नाहीं.

ज्या गांवात गांवदेवींचें आणि शिवाचें देऊळ नाहीं, असा एकहि गाव भारतवर्षांत आढळणार नाहीं. तसेंच रुद्राचा अभिषेक, चंडीचें अनुष्ठान, महिम्न स्तोत्र, सप्तशती, यांचें पाठ, आणि हरितालिका, मंगळागौर, चैत्री गौर, भाद्रपदांतील गौरीपूजन, या कौटुंबिक प्रथा सर्वत्र रूढ आहेत. वरील वाङ्मय व या प्रथा यांच्या मागील तत्त्वज्ञान व शक्तिभावना इतकी पवित्र व गूढगंभीर आहे कीं, तीं पाहता शिश्नयोनिरूप भावनेनें शिवलिंगोपासना भारतवर्षांत कधींहि रूढ असणें शक्यच दिसत नाहीं.[१]

१ I can not bring myself to believe that a nation which in other respects was highly civilised, worshipped Phallus Symbol as meaning only the emblem of the generative power in nature. To worship that power no religious teaching or symbol is necessary. Even beasts know the kind of worship. At all events, so far as the ancient, riddle-living, Sanskrit India is concerned, the Linga worship seems to me to have been invented as an etymological Vedantic riddle by pondering over the Vedic ritual of placing Agni-Purusha in the womb of the heart. The double meaning of purusha and yoni is at the root of the riddle which seemingly is gross and sexual, but really sublime and spiritual. ( Indo-Aryan, Mythology Vol. I, p. 499. )

(५) आक्षेप—ग्रीकांतील डायोनिसस, रोमनांतील बाकानालियन इत्यादि संप्रदायांतील लैंगिक धर्माचारांचें मूळ आपला शंभु-भैरव होय. इजिप्शियनांचा ओसिरिस, हिब्र्यूचा याव्ह, मुसलमानांचा अल्ला, असीरियनांचा असूर, तोच शिवलिंग देव होय. सुमेर, अक्काड, खाल्डी इत्यादि लोकांत याच लिंगदेवाचा प्रचार झाला.

(५) उत्तर–शिवलिंगोपासनेंत अविनाभूत असा अशरीर व अव्यक्त शिवशक्तिभाव आहे. त्या सद्भावाचें रहस्य सोडून इतर देशांत विकृत भावनांनीं जननेंद्रियांचे देव्हारे माजले असले, तर त्यास शिवलिंगोपासना जबाबदार नाहीं, व त्यामुळें परदेशांतील विकृत भावना येथील शिवलिंगोपासनेंत गृहीत धरतां येणार नाहींत. इतकेंच नव्हे तर परदेशांतीलहि लिंगोपासना प्रथमपासून आणि सर्वत्र जननेंद्रियांच्या देव्हारे स्वरूपांत नव्हती. Phällus यांचें मूळ फलेश म्हणजे शीघ्रफलदाता शिव असा कर्नल टॉड अर्थ करतात. परदेशांतील मक्केश्वरादि अनेक लिंगप्रतीकाचें जननेंद्रियांशीं सादृश्य नाहींच. सारांश, परदेशांतील लिंगोपासना तात्त्विक स्वरूपाचीच होती, असें अनेक ग्रंथावरून दिसून येतें. या ग्रंथाच्या पहिल्या खंडात याचा थोडा पुरावा सांगितला आहे. (कल्याण शिवांक पृ. ३३७ पहा.)

(६) आक्षेप—आशियामायनर, मेसापोटेमिया हीं प्राचीन लिंगपूजेचीं मूळ प्रसिद्ध स्थानें आहेत. शिवभक्त रावण व कुबेर यांचीं राज्यें तेथेंच जवळपास होतीं. शिवलिंगोपासक यक्ष, राक्षसाचे अनुयायी तेच अनुक्रमें यहुदी व अरबी मुसलमान होत.

(६) उत्तर—हे संशोधनाचे स्वतंत्र विषय आहेत. यासंबंधीं साधनसामग्री व पुरावे पूर्णपणें हातीं आले, असें केव्हांहि म्हणतां येणें कठिण आहे. अशा स्थितींत आपले प्राचीन ग्रंथ व भारतांतील स्थलमाहात्म्यें यांवरच विसंबून राहणें इष्ट वाटतें. अगस्तीनें शिवलिंगोपासनेचा प्रचार बृहत्भारतांत व त्याबाहेरहि केला असण्याचा संभव आहे. शिवभक्तविलास ह्या स्कंद पुराणाच्या उपपुराणाचा प्रवक्ता अगस्ति आहे. अगस्तीनेंच

१ Secret Doctrines तसेंच Indian Civilization and its Antiquity हे ग्रंथ व या प्रकरणाच्या अखेर दिलेलीं अवतरणें पहावीं.

रामाला शिवदीक्षा दिली होती त्यासबधीं वाङ्मयावरून त्यानीं प्रचारित केलेल्या शिवलिंगोपासनेंत लैंगिक किंवा अश्लील विचार मला लवलेशसुद्धा दिसून आले नाहींत

वामनपुराणाच्या सहाव्या अध्यायात ब्रह्मदेवानें शिवपूजेकरिता चार वर्णांत चार वर्णांचीं शिवलिंगें सागितलीं आहेत व त्यासबधीं चार निर निराळीं पूजाविधानें पण सागितलीं आहेत त्यापैकीं वैश्य जातीकरत सागितलेलें पिवळें शिवलिंग व तत्सबधीं पूजाविधान आपस्तम नामक एका ऋषींनीं स्वीकारलें होतें त्याचा बक या नावाचा एक वैश्य व्यापारी शिष्य होता. तोच पुढें भूमध्य समुद्रातील क्रीट बेटाचा राजा झाला याच बक राजापासून शिवलिंगोपासना प्रथम ग्रीस देशात व नतर सर्व युरोप खडात, तसेंच ईजिप्त, आशियामायनर वगैरे प्रातात पसरली, असें भूदेव मुकर्जी हे फार मोठे विद्वान् सशोधक म्हणतात¹ पण तसें असलें तरी ब्रह्मदेवाकडून मूळात प्रसृत झालेली ही शिवलिंगोपासना ग्राम्य व निंद्य अशी जननेंद्रिय प्रतीकाची नव्हतीच, मग परदेशातील लोकाच्या अज्ञानामुळें किंवा त्यापैकीं कोणाच्या लैंगिक कामातिशयामुळें त्याला पुढें कोठें विकृत स्वरूप प्राप्त झालें असलें, तरी भारतवर्षात तसें ग्राम्यस्वरूप शिवलिंगोपासनेस कधींच प्राप्त झालेलें नाहीं, हें उघड आहे

(७) आक्षेप—प्रकृतिपुरुष, देवदेवता तसेंच स्त्री-पुरुष, नरमादी या मुख्य द्वद्वाचीं जातिविशिष्ट व्यावर्तक चिन्हें अगर लक्षणें म्हणून जननेंद्रियें सहजच महत्त्व पावलीं व त्याचेच देव्हारे वाढणें नैसर्गिक व अपरिहार्य ठरलें 'लिंगाका च भगाका च तस्मात् माहेश्वरी प्रजा।' असें अनुशासनपर्वांत (१४।२३३) व कुलार्णव तत्रात (८।१०८) म्हटलें आहे

(७) उत्तर—भगाङ्क व लिंगाङ्क हीं प्राण्यातील लिंगभेददर्शक चिन्हें असलीं, तरी तशीं स्तनादि अन्यहि व्यावर्तक चिन्हें असतात त्या कारणास्तव त्याचे देव्हारे माजणें अपरिहार्य नाहीं उलट भारतवर्षांत आगमनिगमात तीं तत्त्वें अत्यत गुह्यगोपनीयच मानलीं आहेत, असें आढळतें याचा विचार मागील प्रकरणात सविस्तर झालाच आहे येथें द्विरुक्ति करीत नाहीं

¹ Indian Civilization and its antiquity, Chapter I

अध्यात्म सोपानमार्गाच्या विवेक, वैराग्य, शमादिषट्क, या प्राथमिक पायऱ्या आहेत उपासनेंत देहबुद्धि सोडणें, ही जेथें पहिली अट असते, तेथें जघन्य दर्द्रियाचे देव्हारे माजविणें हा अक्षम्य अपराधच ठरेल उपास्यतत्त्व हृदयात साठवावें असें सांगितलें आहे अर्थात् तें स्थान उपस्थाचें नव्हे

(८) आक्षेप—मैथुनकर्मातील प्रजोत्पादनाची जादू व त्या रतिकर्मातील असाधारण विषयानंद यामुळें जननेंद्रियाचे देव्हारे सर्वत्र सुरू झाले व त्या गुह्य इंद्रियाच्या देव्हाऱ्यात सामान्यतः परसमृद्धिकारक जादू असल्याचें मानण्यात आलें

(८) उत्तर—असें कोठें विदेशात झालें असलें तरी तसें स्वदेशात झालें नाहीं प्रथम खंडातील परदेशातील शिवलिंगोपासना या प्रकरणात परदेशातहि शिवलिंगोपासना जघन्य इंद्रियभावनेनें रूढ नव्हती, हें स्पष्ट होतें

मुख्य मुद्याची गोष्ट एकच आहे ती ही कीं, ईश्वरोपासनेंत विषयवैरस्याला महत्त्व आहे व्यावहारिक ध्येयें व पारमार्थिक ध्येयें अत्यंत भिन्न असतात. उपासना ही पारमार्थिक ध्येयासाठीं असते रतिकर्मातील आनंदोपलब्धीला कारण रतिकर्म नसून त्यानिमित्तानें किंचित् काळ झालेल्या वासनाक्षतीमुळें स्थिर झालेल्या चित्तात क्षणमात्र होणारी आत्मोपलब्धि हींच आनंदरूपात प्रतीत होते ही गोष्ट आपल्या प्राचीन पूर्वजांना उत्तम ठाऊक होती तसेंच वस्तुत प्रजोत्पादन करणारीं इंद्रियें बहिर्गोलकाहून सूक्ष्म व अव्यक्त असतात. हें मागें चवथ्या प्रकरणात सांगितलेंच आहे अर्थात् जघन्य इंद्रियगोलकाचे देव्हारे आपल्याकडे सुरू होणें अशक्यच दिसतें

(९) आक्षेप—प्राचीन द्रविड अनार्यांची लिंगपूजा आर्यांनीं घेतली.

(९) उत्तर—या म्हणण्यास काहीं आधार नाहीं व यामुळें शिवलिंगोपासना अश्लील किंवा निंद्य ठरत नाहीं

(१०) आक्षेप—स्त्री पुरुषाचे अर्धार्ध एकत्र जुळूनच प्रजापतीचें पूर्ण स्वरूप बनतें प्रजापति हीच जननेंद्रियाची देवता आहे प्रजापति तोच सद्यस्कि शिव शिवलिंग हें त्याचेंच मगलिंगात्मक प्रतीक होय

(१०) उत्तर—प्रजापति व शिव एक नव्हत. प्रजापति ही उपस्थेंद्रियांची परिछिन्न देवता मानली आहे. शिव हें अत्यंत व्यापक व अशरीर असें जगत्कारणतत्त्व आहे. शिवलिंग हें त्या अरूप जगत्कारणाचें प्रतीक आहे. प्रजापतीचें नव्हे. प्रजापतीचा व शिवाचा कांहीं संबंध असला तर तो विरोधी संबधच दिसतो. प्रजापतीचा वेध शिवरुद्रानें केला आहे (ऐ.ब्रा. ३।३३; ५।२; शत. ब्रा. १।७।४). प्रजापतीनें सृष्टि निर्माण केली म्हणून शिव त्यावर कोपला. (म. भा. सौतिकपर्व अ०१७) प्रजापति जन्मास घालणारा आहे. शिव त्यापासून सोडविणारा आहे. शिवलिंगास प्रजापतीचें लिंग असें कोणीच म्हणत नाहींत. प्रजापतीचीं उपास्य म्हणून देवालयें नाहींत व त्याची उपासना शास्त्रानें सांगितली नाहीं. प्रजापतीला ब्रह्मदेव, हिरण्यगर्भ, असें कदाचित् म्हणतां येईल. शिव म्हणतां येणार नाहीं. उत्पत्ति, स्थिति व लय या सर्वांचा कारक शिव आहे.

(११) आक्षेप—आपल्या शास्त्रीय वाङ्मयांत कामदेव, कामेश्वर, लिंग, योनि, उपस्थ, लिंगमणि, शिश्नदेव, वृषण, रेतस, मैथुन, विपरीत मैथुन इत्यादि अश्लील अर्थवाचक शब्द अश्वमेधादि यज्ञयागापासून तो वैवाहिक संस्कारांपर्यंत, नासदीय सूक्तादि वैदिक सूक्तांपासून कुलार्णवादि तन्त्रग्रंथांपर्यंत सर्वत्र रूढ दिसतात. त्यावरून शिवलिंगाला लिंगदेव असें म्हणण्यास दुजोरा मिळतो.

(११) उत्तर—या शब्दांचा प्रत्येक ठिकाणीं उपस्थेंद्रियांसंबंधींच भाव असतो, असें नव्हे. सृष्टिरूप जो शिवसंकल्प तोच शिवकाम होय. ग्राम्य अर्थाचा इंद्रियकाम शिवानें जाळला हें प्रसिद्ध आहे. कुलार्णवतंत्र, आरण्यकें, नासदीय सूक्त वगैरे शास्त्रीय वाङ्मय उपस्थेंद्रियांच्या ग्राम्य विषयाकरतां प्रवृत्त झालेलें नाहीं. जेथें प्राण्याची सहजप्रवृत्ति आहे, तेथें शास्त्राची गरज नसते. सामान्यतः अज्ञात विषयाची ज्ञापक शास्त्रें असतात. बालगणितांतील उदाहरणांत केळीं, पेरू अशीं फळें असलीं तरी गणित हें कांहीं खाण्याचें शास्त्र नव्हे. शास्त्रें विषयभोगप्रवृत्तीकरतां नसून उलट निवृत्तीकरतांच असतात. श्रीमद्भागवतांत स्पष्टच म्हटलें आहे कीं—

लोके व्यवायामिषमद्यसेवाः नित्यास्ति जन्तोर्नहि तत्र चोदना ।
व्यवस्थितिस्तेषु विवाह यज्ञ सुराग्रहैरास निवृत्तिरिष्टा ॥ ११।५।११

शास्त्रकार हे शब्दरत्नाकारच होत. पण पंत केकावलींत म्हणतात कीं, जरी— "घना, परिजना, घरीं तुमचिया उणें कायसें। न लाममणि हेम भूपतिस जोडल्या आयसें। परिग्रहुहि संग्रहीं सकल वस्तुला ठेविती। गुणा न म्हणता उणा अधिक आदरें सेविती"॥ २३॥ याच न्यायानें प्राचीन शास्त्रप्रणेत्यांनीं उपमेसाठीं लिंगयोनि मिथुन ही वैषयिक कल्पना समर्पक व सहज पटण्यासारखी वाटल्यावरून अनेक ठिकाणीं वापरली आहे. पण सुंदर स्त्रीच्या मुखाला कमल व काळ्याभोर डोळ्यांना त्यावरील भ्रमर या उपमा दिल्या अथवा स्त्रीस सिंहकटि किंवा गजगति म्हटलें, तरी कमळ, भ्रमर, सिंह आणि गज यांचें स्त्रीशीं तादात्म्य मानीत नाहींत. सौंदर्य हा लक्ष्यार्थ ध्यानीं घ्यावा इतकाच त्यांत भाव असतो. देवगुरूंच्या चरणकमलांचें वंदन करणाऱ्यांचा वंदनाचा विषय कमल नसतो किंवा चरणहि नसतो. देवगुरूंच्या ठिकाणचें परमात्मतत्त्वच त्यांस वंदनीय वाटत असतें. शिपायाच्या वेषाचा जरी वचक वाटला, तरी तो त्याच्या ठिकाणच्या राजसत्तेच्या अंशाबद्दल वाटत असतो. त्याचप्रमाणें पंचाग्निविद्या, यज्ञकुंड, किंवा साक्षात् शिवलिंगाचें शिल्प, यांतील लिंग-योनिमिथुनाच्या कल्पना गूढार्थवाचक व सांकेतिक असतात. बीजरक्षणार्थ जसें टरफल त्याज्य असतें, वालांना लावलेली तावडमाती ही त्यागार्थ असते, भाताचा तूस, तसेंच फणस, नारळ, अननस, आंबे इत्यादि फळांच्या साली या टाकूनच खावयाच्या असतात, ही रहस्यदृष्टि जशी सर्वांना न सांगतांच कळते, त्याचप्रमाणें या शास्त्रांतील सांकेतिक परिभाषेसंबंधीं अधिकारी साधकाचा गैरसमज होत नाहीं. कावळे आंब्याच्या सालीहि खातात व नाक शिंकरलेलेंहि चवीचवीनें खातात, तसें माणसें करीत नाहींत. इतकें सांगितलें म्हणजे पुरे. परिभाषेला रहस्यदृष्टीची फार तर मार्गदर्शिका दासी मानतां येईल. रहस्यदृष्टि वेगळीच. शाखाचंद्रन्यायांत वृक्षशाखेपासून चंद्र फारच दूर असतो.

नासदीय सूक्तांतील काम आणि रेत आणि अनंगरगांतील काम व रेत, लिंगपुराणाच्या नांवांतील लिंग व जननेंद्रियलिंग, गीतेंतील योनि शब्द व स्त्रियांचें मूत्रेंद्रिय, तैत्तिरीयांतील ब्रह्मानंद व विषयासक्ताचा मैथुनानंद, या सर्वांना एकाच माळेचे मणि मानणें याहून अधिक अविवेक तो कोणता असणार? उगाच वडाची साल पिंपळाला लावीत बसण्यांत कांहींच अर्थ

नाहीं. लहान मुलांची खेळण्याची एक दगडी ठोकळ्यांची पेटी मिळते. ते ठोकळे रचून निरनिराळ्या इमारतींची प्रतीकें मुलांना तयार करतां येतात. त्याप्रमाणें वैदिक वाङ्मयाशीं पोरखेळ करणाऱ्यांनीं त्यांतील विविध असंबद्ध विधि, संज्ञा व भावना एकत्र करून त्यांची एखादी अभद्र रचना केली, तर तो त्यांच्या हीन अभिरुचीचा दोष होय. त्या वैदिक वाङ्मयाचा नव्हे. शिवाय, सवत्सरांत जसा शिमगा असतो, जन्मलग्नकुंडलींत ज्याप्रमाणें पापग्रह असावयाचेच, त्याप्रमाणें आपल्या प्राचीन वाङ्मयात सर्वरससंग्रह असला, तरी शिवलिंगोपासना ही वैराग्यपूर्ण व पवित्र भावनेनेंच करावयाची असते. वस्तुतः आपल्याकडील सारे शिवलिंगोपासक शिवलिंगाकडे अश्लील भावनेनें आजवर कधींच पाहात आलेले दिसत नाहींत. पण कित्येक आधुनिक सशोधकाचे उद्योग गुडाला तुंबड्या लावण्याप्रमाणें व्यर्थ सुरू असतात ! असा हा नाहक बुद्धिभेदक आधुनिक वाङ्मयप्रचार सुरू नसता तर हा चिकीत्साखंड लिहिण्याचें प्रयोजनहि नव्हतें. आधुनिकांतहि काहींना शिवलिंगोपासनेसंबंधीं अश्लीलतेचे आक्षेप मान्य नाहींतच.

ज्यांनीं कोणत्याहि प्राचीन धर्माचा आस्थापूर्वक खोलवर अभ्यास केला आहे, अशा आस्तिक्य बुद्धीच्या विद्वानांनीं लिंगोपासना ही मूळांत आध्यात्मिक व तात्त्विक स्वरूपाची असल्याचें मान्य केलें आहे. तसेंच भारताच्या पलीकडे इतर ठिकाणच्या लिंगपूजेच्या रूढींत पुढें कोणतेहि अश्लील भाव शिरले असले, तरी भारतवर्षांतील शिवलिंगपूजा तात्त्विक आणि उदात्त स्वरूपाचीच आरंभापासून अद्यावत् राहिली असल्याचें ते सांगतात.

तशीच वस्तुस्थिति आहे. कोणी लिंगाचें मूळ बौद्धाच्या स्तूपांत असावें असें मानतात, कोणी असें म्हणतात कीं, हिंदूच्या भक्तिशास्त्रांत, कांतेचें प्रियवल्लभावरील निस्सीम मधुर प्रेम हा एक लैंगिक भाव आहे, तसेंच ईश्वराची शक्ति ही स्त्रीरूप देवता मानणें हा एक लैंगिक भाव आहे, असे दोनच प्रकारचे स्त्रीभाव आढळतात. अन्य म्हणजे शिश्नयोनिमिथुनादि ग्राम्य भाव आढळत नाहींत. शिवलिंगाचा आकार कसाहि असो, त्या लिंगप्रतीकाच्या अंतर्यामीं जो शिव तोच उपासनीय असतो. शैवपुराणांत शिवलिंगाच्या ठिकाणीं अश्लील भावना नाहींचें. जगत्स्रष्टा परमात्मा व त्याची अविनाभूत अशी उपादानकारणात्मक चिद्रूपिणी शक्ति हें युग्म

किंवा द्यावापृथ्वी हें विश्वांतील ईश्वरतत्त्वाचें लिंग मानलें आहे. स्वामी विवेकानंदांना शिवलिंगाचें मूळ अथर्ववेदांतील (१०।७) ब्रह्मप्रतीकरूप स्कंभांत आहे असें वाटे. बाबू राजेंद्रलाल मित्र म्हणतात कीं, "शिश्न-योनींच्या अश्लील प्रतीकांवर आपले धार्मिक विधि अधिष्ठित असणें शक्यच नाहीं. याप्रमाणें कांहीं विद्वानांचीं समंजस मतें असलीं, तरी दुसऱ्या अनेक अविचारी आधुनिकांची प्रवृत्ति शिवलिंग अश्लीलच मानण्याकडे आढळते. म्हणूनच हा विस्तृत ग्रंथ लिहिणें प्राप्त झालें.

या विधानांच्या पुष्ट्यर्थ कांहीं आधुनिक इंग्रजी ग्रंथांतील अवतरणें मागील टीपांकाच्या अनुक्रमानें देत आहें. तीं सिद्धान्तवत् म्हणून देत नसून आंग्ल शिक्षित वाचकांस तीं जास्त मानवतील, म्हणून अवलोकनार्थ देत आहें.

(1) The Lingam of the Hindus has a spiritual and a highly philosophical meaning while the missionaries see in it an indecent emblem. ( Secret Doctrines by Madam Blavatasky, Vol. V, p. 285–292. See also Vol. IV, p. 159, p. 38, Vol. I, p. 175, Vol. II, p. 78.

(2) It hence appears evident that the phallus bore no similarity to the Lingam, and that, though the causes which may originally have produced the worship of these objects may have been the same in Egypt and India, still the symbols adopted for their representation and the adoration paid to them by the Egyptions and the Hindus, differed most materially. ( Phallic Miscellanies, p. 27 ).

(3) The Lingam is not properly an instance of sex Symbolism, it is probably not of phallic origin, but derived from the Stupa, and is now regarded as the highest emblem of Shiva, because the least anthropomorphic. True sex symbolism in Indian art or literature

assumes two main forms. The conception of the relation of the soul to God expressed in terms of the passionate adoration of a woman for her lover, and the representation of the energic power ( Shakti ) of a divinity as a feminine divinity, ( Amiss of Indian Art, Campden 1908 )

( 4 ) ( In the Sivalingopasana ) There is nothing like the phallic orgies of antiquity ; it is all mystical and spiritual. The Linga is twofold external and internal. The ignorant who needs a sign, worship as a " mark " or " type " which is the proper meaning of the word Linga of wood or stone ; but the wise look upon this outward emblem as nothing but, and contemplate in their minds, the invisible, inscrutable type which is Shiva himself. Whatever may have been the origin of this form of worship in India, the notion upon which it is founded, according to the impure notions of European writers, are not to be traced in even Shiva Puranas. ( H. H. Wilson on the Puranas, p 72. ).

( 5 ) This representation of the union of sexes, typifies the divine Sakti, or active energy in union, the procreative generative power seen through out nature; the earth being the primitive pudendum or yoni, which is fecundated by the solar heat, the Sun–the primal Lingam, to whose univifying rays, men and animals. plants and fruits of the earth owe their being and continued existence. Thus, according to the Hindus, the Linga is God and God is Linga ; the fecundator, generator, the creator in fact. ( Phallic Miscellanies, p. 1 ).

( 6 ) The worship of Shiva linga originated from the famous Lingam in the Atharva Veda Samhita sung in praise of यूपस्तम्भ the sacrificial post. In that hymn a description is found of the beginningless and endless Stambha or Skambha and it is shown that the said Stambha is put in place of the eternal Brahma. As afterwards, the sacrificial fire, the smoke, ashes and flames, the soma plant, the ox used to carry it on its back, the word for the Vedic sacrifice, gave place to Shiva's body, his yellow matted hair, his blue throat and the bull, the Yupa Stambha gave place to the Shiva Lingam and was raised to high Devahood of Shri Shankar. In A. V the sacrificial cows are praised with the attributes of the Brahman. In the Linga Puran the same hymn is expanded in the form of stories meant to establish the glory of the great Stambh and superiority of Mahadev The explanation of Shiva lingam as phallic emblem began in India in her most thoughtless and degraded times. ( Swami Vivekananda. )

( 7 ) "Our ideas of propriety" according to Voltaire, lead us to suppose that a ceremoney ( like the worship of priapus ), which appears to us so infamous, could only be invented by licentiousness, but it is impossible to believe that depravity of manners would ever have led among any people to the establishment of religious ceremonies. It is probable, on the contrary, that this custom was first introduced in times of simplicity, that the first thought was to honour the deity in the symbol of life which it has given us, such a ceremony may have

excited licentiousness among youths, and have appeared ridiculous to men of education in more refined, more corrupt, and more enlightened times, but it never had its origin in such feelings. Besides, vicious propensities have, in India, been everywhere and at all times most emphatically denounced, and there is no creed known in this country which does not condemn it as hateful. ( Antiquities of Orissa by Baboo Rajendralal Mitra quoted in Phallism, p. 74. ) See also History and Philosophy of Lingayats, pp. 100, 308, 319. and Indo-Aryan Mythology, Vol. I, p. 511.

आतां महाभारतांत, शिवमहापुराणादि पुराणग्रंथांत व कांहीं आगमग्रंथांत शिवलिंगोपासनेसंबंधीं विचार करतां आखिलें माहेश्वरी प्रजेंतील उत्पादनशक्तियुक्त भासणाऱ्या शिश्नयोनि या इंद्रियांचा भाव क्वचित् कोठें दृष्टांतादाखल जास्त स्पष्ट व्यक्त केला आहे हें खरें. पण त्यात वस्तुतः ग्राम्य व अश्लील भावना नाहीं. या इंद्रियवाचक शब्दांना उल्लेख अगर उच्चार उपमेसाठींहि करणें आज कोणास अश्लील वाटत असलें, तरी प्राचीन काळीं तसें वाटत नसावें, असें प्राचीन वाङ्मय चाळून पाहातां, म्हणावेंच लागतें. सर्व सृष्टींचें निर्मितिस्थान आनंद हेंच श्रुतीनें मानलें आहे. वैषयिक सुखांत मैथुन हें अति उत्कट, आनंददायक वाटत असल्यामुळें व त्यांतून नवीन प्रजानिर्मिति होते असेंहि वाटत असल्यामुळें, जगत्कारणाच्या प्रतीकासाठीं शिश्नयोनि चिन्हें क्वचित् कोणास सम्यक् वाटणें स्वाभाविक मानलें, तरी पाश्चात्य देशांत या लिंगांतील जगत्कारण हा उदात्त भाव सुटून, जननेंद्रिय प्रतीकाचेच देव्हारे पुढें पुढें माजत गेले. आपल्याकडे शिवलिंगांत इंद्रियसादृश्य भाव न राहातां जगत्कारणरूप ईश्वरभावच शिवलिंगाचे ठिकाणीं पूजनीय मानला गेला आहे.

पुढें पाश्चात्य देशांत शिश्न-योनि प्रतीकांचे देव्हारे माजवितांना साक्षात् व्यभिचाराचा अश्लील व निंद्य प्रकार बेसुमार वाढत गेल्यामुळें तिकडील

लिंगपूजा बदल्लेल्या शिष्टाचारामुळें बंद पडत गेली.[1] उलट येथील शिवलिंग-पूजेंत अश्लील भावनेचा केव्हांहि मागमूसहि नसल्यामुळें ती चालूच राहिली. यात गैर व निंद्य कांहींच झालें नाहीं. पण हिंदूचे कांहीं गैरमाहितगार अथवा निंदक व अहितचिंतक अशा पाश्चात्य लेखकास, हिंदु लिंगपूजक म्हणजे शिश्नयोनिपूजक असा व्यर्थ डांगोरा पिटण्यास एक निमित्त झालें; व त्याची ही निंदा खरी व यथार्थच मानून आपल्याकडील कित्येक आधुनिकांनीं वस्तुस्थितीकडे दुर्लक्ष करून पाश्चात्य निंदकाचीच री ओढली आहे! पण आज भारतवर्षांतच काय तर परदेशांतहि शिवलिंगपूजा रूढ असल्यावेळचा जो प्राचीन इतिहास उपलब्ध आहे, त्यावरून ती मूळांत अतिश्रेष्ठ दर्जाची होती, हेंच स्पष्ट होतें.

वेदांताप्रमाणें मूळमाया आणि मूळपुरुष एकच. त्यात मैथुनभाव कोठून संभवणार? अग्नि आणि अग्नीची शक्ति याच्या अखंड संयोगांत ग्राम्यता ती काय? कल्पक आणि त्याची कल्पना, त्याचप्रमाणें सृष्ट्युन्मुख शिव व त्याची स्फूर्ति याच्या संयोगांत अश्लीलता ती काय? भाषेंतील लिंगभेद जसा अश्लील वाटत नाहीं, त्याप्रमाणें एकंदर प्राणिसमाजाचें लिंगभेदात वर्गीकरण करणें कोणीच ग्राम्य किंवा अश्लील मानणार नाहीं. समष्टि सृष्टीच्या सृजनाचा अथवा कारणाचा विचार शुद्ध तात्त्विक आहे ग्राम्य नाहीं, हें उघडच आहे. असो. या विषयाची सविस्तर चर्चा यापूर्वी झालेली असल्यामुळें येथें अधिक विस्तार करीत नाहीं.

मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् ।
तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥ —श्वे. उप. ४।१०

---

१. Clement of Alexandria was most severe in his condemnation of the abominations connected with certain festivals in which the phallus occupied a conspicuous position, but as the Lingam is never carried in procession and its worship is not celebrated by bacchanalian rites, his castigation could have no reference, or at any rate, was not applicable to Hindus (Phallic Miscellanies p. 28)

## प्रकरण ७ वें

# शिवलिंगपूजारंभकथा

[१]

**निर्गुण रूप सुलभ अति । सगुन न जाने कोई ।**
**सुगम अगम नाना चरित । सुनि मुनि मन भ्रम होई ॥** —तुलसी०

आतां आपल्याच पुराणवाङ्मयांत आक्षेपकांच्या आक्षेपांस एक मोठाच पुरावा सांपडतो असें त्यांस वाटतें. त्यासंबंधीं विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. आक्षेपकांचें म्हणणें असें आहे कीं, आज सुधारलेल्या विसाव्या शतकांत आपल्या ठिकाणीं जो सहज सभ्यपणा, भारदस्तपणा व बहुश्रुतपणा आला आहे, तसा पुराणकारांच्या काळीं असण्याचा संभवच नव्हता. कारण त्या प्राचीन काळीं ज्ञानविकास झालेलाच नसल्यामुळें कांहीं तरी धर्मवेड, दूधखुळेपणा, आणि अज्ञानजन्य अशा ग्राम्य व अश्लील कल्पना, हाच काय तो वर्ण्य व श्रोतव्य विषय होता. यामुळें शिवलिंगाचें स्वरूप काय? शिवाची लिंगरूपानेंच पूजा कां व केव्हां रूढ झाली? यांसंबंधीं लिंगपुराण, शिवमहापुराण, स्कंदपुराण, वामनपुराण, पद्मपुराण, महाभारत ( नीळकंठी टीका ) यांत ज्या आख्यायिका दिल्या आहेत, त्यांवरून लिंग म्हणजे शिवाचें जननेंद्रिय व योनि म्हणजे पार्वतीचें जननेंद्रिय; तसेंच शिवपार्वतीविलास म्हणजे ग्राम्यमैथुनादि क्रीडा; असा त्याचा स्पष्ट अर्थ असल्याबद्दल आक्षेपकांस मुळींच शंका रहात नाहीं. अशा आख्यायिकांचीं कांहीं ठळक उदाहरणें या व पुढील प्रकरणांत त्रोटक रूपांत देत आहें. त्यांचा यथाशक्य खुलासाहि या व यापुढील प्रकरणांत करीत आहें.

(१) एकदां दारुक वनात ऋषींच्या आश्रमांत शिवपार्वती[१] नग्नच भिक्षाटण करीत फिरत होतीं. तेव्हां त्या नग्न शिवाचें लिंग पाहून तेथील ऋषिपत्न्यांस मोह उत्पन्न झाला. व त्या कामविह्वल होऊन शिवाजवळ

---

१ कांहीं ठिकाणीं पार्वतीचा उल्लेख नाहीं.

निर्लज्जपणें लगट करूं लागल्या. तें पाहून ऋषींपैकीं भृगु कोपाविष्ट झाले; व "तुझें लिंग गळून पडो!" असा त्यांनीं शिवास शाप दिला. तसें शिवाचें लिंग गळून पडलें. तेव्हां चोहोंकडे हाहाकार झाला. तें पाहून ऋषींनां आपण शाप दिल्याबद्दल पश्चात्ताप झाला. मग त्यांनीं शिवाची क्षमा मागून त्याची करुणा भाकिली. पुढें तें गळून पडलेलें शिवलिंग धारण करण्यासाठीं शिवाच्या सांगण्यावरून त्यांनीं पार्वतीची प्रार्थना केली. त्यावरून तिनें तें लिंग आपल्या योनिरूपांत धारण केलें. तेव्हांपासून शिवाच्या आज्ञेनें त्याची पूजा सयोनिलिंगरूपांत सुरू झाली. शिवाची लिंगरूपांत पूजा कां सुरू झाली, याच प्रश्नाच्या खुलाशासाठीं वरील कथा थोड्याशा फरकानें सर्व पुराणांत सांगितली आहे[1].

या आख्यायिकेचा उल्लेख व अंशतः खुलासा मागील प्रकरण ४ यांत आला आहे. पण त्याचा अधिक सविस्तर खुलासा होणें इष्ट वाटतें, म्हणून पुढें विस्तारपूर्वक विचार केला आहे; त्यांत द्विरुक्तिदोष मानूं नये.

शिवाची लिंगरूपांतच उपासना कां रूढ झाली, या प्रश्नांत व या प्रश्नाच्या खुलाशासाठीं सांगितलेल्या वरील आख्यायिकांत "लिंग" हा शब्दच मुख्य कूटरूप आहे, हें सुज्ञ वाचकांच्या सहज लक्षांत येईल. यांतील मर्म लक्षांत येण्यासाठीं आधुनिक तत्त्वज्ञांनीं ज्यासंबंधीं मोठा आकांत मांडला आहे, तो लक्षांत घेणें पुष्कळ सूचक होईल असें वाटतें. योगवासिष्ठकार, गौडपादाचार्य, श्रीमच्छंकराचार्य यांचें केवलाद्वैत, अजातवाद, दृष्टिसृष्टिवाद व जगन्मिथ्यात्ववाद, अशा वादांनीं सगुण परमेश्वराचें सगुण लिंगच गळून पडल्यामुळें सारें राजकारण, समाजकारण, शास्त्रसंशोधन, नीतिशास्त्र इतकेंच काय तर भक्त्युपासनापर परमार्थसाधन व्यर्थ, निर्मूल व हास्यास्पद ठरतें, हा तो

१ The Story of Linga being sundered by a curse does not at all account for the origin of the Linga but merely a supposed and fanciful tale, as it was a general practice in antiquity to invent fictitious tales for the purpose of explaining names of which the origin was lost in obscurity. ( H. P. Lingayats, Intro., p. 324 ).

आकांत होये. यासाठीं चिद्रूपिणी जगमायेनें हें जगद्रूप सगुण लिंग धारण केलें. तेव्हां त्या निर्गुण परमशिवतत्त्वाची लोकिकांत चिच्छक्तीच्या सगुणजगलिंग-रूपांतच पूजा रूढ झाली व त्यांतच द्वैत दृष्टीच्या जगाला समाधान वाटलें, असें या आख्यायिकांतील मूलग्राही मर्म असणें शक्य दिसतें. तें पटण्याकरितां वरील आख्यायिकांचा सविस्तर खुलासा अगोदर अन्य तऱ्हेनें पाहूं.

शिवलिंगोपासना ही लैंगिकच आहे, यासंबंधीं आक्षेपकांनीं पुढें आणलेल्या व त्यांना बिनतोड वाटणाऱ्या या पुराण्याचा तपशीलवार खुलासा करण्यापूर्वी एका मुख्य मुद्द्याचा विचार करावयास पाहिजे आहे, तो असा आहे कीं, श्रीराम व श्रीकृष्ण ह्या अवतारी पुरुषांचीं चरित्रें हीं ज्या ग्रंथांत वर्णिलीं आहेत, त्या भारत व रामायण या ग्रंथांस इतिहास असें म्हणतात. त्यांतलि श्रीराम व श्रीकृष्ण यांचीं चरित्रें बहुतांशीं तुम्हां-आम्हां मानवांसारखीं वर्णिलेलीं आहेत. पण शिव, गणपति, कार्तिकेय आणि देवी अथवा शिवशक्ति यांचीं पुराणें मानवेतिहासाप्रमाणें दिसत नाहींत. शिवपुराण, लिंगपुराण, स्कंदपुराण, गणेशपुराण, मुद्गलपुराण, देवी भागवत, मार्कंडेय पुराण, यांतील शिव, गणपति, शक्ति, कार्तिकेय यांचीं वर्णनें प्रायः अनैतिहासिक आहेत. तसेंच तीं बहुधा पारलौकिक अथवा आधिदैविक व आध्यात्मिक स्वरूपाचीं वाटतात. केवळ इहलोकींचा इतिहास अशीं तीं चरित्रें दिसत नाहींत. तुलनात्मक दृष्टीनें पाहातां इतर अवतारी चरित्रांपेक्षां साऱ्या शिवकथा, मग त्या भारत व रामायणांत का असेनात, या अलौकिक दिसतात. रामायण आणि महाभारत यांस इतिहास ज्या अर्थानें म्हटलें आहे, त्या अर्थानें शिव-पुराण, लिंगपुराण, मुद्गलपुराण, हे इतिहास नव्हत. त्यांत आधिदैविक आणि आध्यात्मिक जगांतील रहस्यपूर्ण घटना आधिभौतिक व्यवहाराच्या लाक्षणिक

१ As this view, which makes a tragic joke of life, renders meaningless many statements of Sankara on the world of experience, and does violence to every canon of sound interpretation, we may here bring together certain considerations which support the phenomenal as against the illusory character of the world. ( Indian Philosophy, by Sir Radha Krishnan, Vol. II, p. 581 ).

मापेंत वर्णिलेल्या आहेत, इतकेंच. पण वस्तुतः त्या घटना स्थूल भौतिक दृष्टीनें पाहावयाच्या नाहींत. तशा त्या पाहूं गेल्यास त्या असंबद्ध व अविश्वसनीय अशाच दिसतील. भारत, भागवत आणि रामायण हे देखील मिश्र दृष्टींनीं लिहिलेले ग्रंथ सर्वस्वीं इतिहास नव्हत, असेंच थोड्या विचारा अंतीं म्हणावें लागतें. अशा लाक्षणिक व काव्यात्मक वाङ्मयांतून अतिशयोक्ति, अर्थवाद, रूपकें, परोक्षवर्णनें यांचें भरपूर मिश्रण असतें, तें फारच सूक्ष्म दृष्टीनें पारखावें लागतें. त्यांतील रहस्य तज्ज्ञ अशा गुरुमुखावांचून कळणें शक्य दिसत नाहीं. ज्याप्रमाणें आपलीं स्थूल, सूक्ष्म, कारण, महाकारण हीं शरीरें अथवा अन्न, प्राण, मन, विज्ञान व आनंद हे कोप अथवा अवस्था आहेत, त्या सारख्याच स्वरूपाच्या नसतात. त्याचप्रमाणें आधिदैविक व आध्यात्मिक जगांचें समजावें लागेल. त्यांचें रूपरहस्य आधिभौतिकाहून वेगळें असतें. शिव आणि शक्ति हीं विश्वाचीं आदि तत्त्वें आहेत. त्यांचें पुरुषविध देहाकाररूप कल्पिलें तरी तें दिव्य मानावें लागतें. त्यांचें वर्णन लौकिक मापेंत केलें असलें, तरी वस्तुतः त्यांना आपल्याप्रमाणें हाडामासाचीं स्थूल शरीरें नसतातच. सारांश, पुराणोक्त शिवलीला हा अक्षरशः ऐहिक इतिहास नसून ती सूक्ष्म अधिदैवत लीला आहे, किंवा सांकेतिक आध्यात्मिक तत्त्वज्ञान आहे, असेंच मानावें लागतें. त्याचा खरा रहस्यार्थ सांप्रदायिक अखंड गुरुपरंपरेवांचून लावतां येणें अशक्यप्राय वाटतें.

ह्या गैरसमज उत्पन्न करणाऱ्या शिवकथांत दारुकवनांत भिक्षाटण वृत्तीनें फिरणाऱ्या शिवाची कथा मुख्य आहे. कारण ती अनेक पुराणांतून सांगितलेली आहे. म्हणून तिचाच विचार या प्रकरणांत मी प्रथम करीत आहें. आतां नवलाची गोष्ट अशी आहे कीं, ही एकच कथा शिवमहापुराणाच्या कोटिरुद्रसंहितेंत (अ. १२) एक प्रकारची, त्याच पुराणाच्या एका प्रतींतील धर्मसंहितेंत (अ. १०) दुसऱ्या प्रकारची, दुर्गाभागवतांत तिसऱ्याच प्रकारची, वामनपुराणांत आणखी वेगळ्या प्रकारची, महाभारताच्या नीलकंठी टीकेंत (अनु० प. अ० १४) आणखी एक प्रकारची, लिंगपुराणांत त्याहून वेगळी, अशी निरनिराळ्या पुराणांत थोड्याफार फरकानें सांगितली आहे. या कथाभेदांवरूनहि यांतील मूळ घटना ही एखाद्या निश्चित स्वरूपाची ऐतिहासिक सत्यकथा नव्हेच, असें दिसून येतें.

हें दारुकवन म्हणजे तत्त्वतः ब्रह्मारण्य अथवा ब्रह्मवन असावें. या एकाच आख्यानाच्या कथाभेदांत भिन्न प्रकारचे कांहीं पाठभेद आढळतात, ते पुढें यांत दिले आहेत.

एकदां दारुकवनांत नग्न व विरूप (सुरूप) शिव एकटाच (शबरीसह व मातृगणांसह) भिक्षाटण वृत्तीनें (शिवोपासक ऋर्षींची परीक्षा पाहण्याकरितां) फिरत असतां, त्याला पाहून सामान्य ऋषिपत्न्या (शिवोपासक ऋर्षींच्या पत्न्या किंवा अरुंधति व अनसूया यांशिवाय सप्तऋर्षींच्या पत्न्या) काममोहित झाल्या. (त्रस्त झाल्या.) तेव्हां ते ऋषि हा शिव आहे, हें न जाणून क्रोधाविष्ट झाले. (पण वसिष्ठ व अरुंधति यांनीं मात्र त्याचें गृहस्थाश्रमधर्माप्रमाणें उत्तम आतिथ्य केलें.) इतर ऋर्षींनीं "तुझें हें कृत्य वेदबाह्य आहे," असें म्हणून त्यास मारहाण केली! (भृगूनें तुझें लिंग गळून पडो, असा शाप दिला). तेव्हां शिवाचें लिंग (शिवानें हातांत धरलेलें ज्योतिर्लिंग) गळून पडलें. तें ज्योतिःस्वरूप लिंग अनेक योजनें लांबवर पसरलें. तें पाताळाखालीं व स्वर्गाच्यावर गेलें. त्याचा अंत ब्रह्मा-विष्णूंसहि लागेना! तें पृथ्वी जाळीत चाललें! पुढें जिकडे तिकडे अंधार पसरला! चोहोंकडे आकांत झाला! असा बिकट प्रसंग प्राप्त झाला. तेव्हां ब्रह्मदेवादि देवांच्या प्रार्थनेवरून पार्वतीनें योनिरूपांत तें लिंग धारण केलें. (पार्वतीनें नुसतें योनिरूप धारण केलें). तेव्हां तें शांत झालें. पुढें शिवाच्या आज्ञेनें (आकाशवाणी झाली, त्याप्रमाणें) शिवाची लिंगरूपांतच पूजा करण्याचें सर्वांनीं कबूल केलें. त्यासाठीं तेथें एक सुवर्णलिंग निर्माण झालें. तें हाटकेश या नांवानें प्रसिद्ध झालें. त्यानंतर शिवाची लिंगरूपानेंच पूजा रूढ झाली.

पुढें याच अध्यायांतील विवरणाचा सारांश असा सांगितला आहे कीं, शंकराच्या प्रतिमा पूजेपेक्षां लिंगपूजेचें माहात्म्य अधिक आहे. ही आकाशवाणी ऐकून ऋर्षींनीं लिंगात्मक शंभुभगवानाची अठरा प्रकारची पूजा आरंभिली. तो चिन्मात्र शिवलिंगांश चेतनशक्तिरूपानें प्रत्येकाच्या हृदयांत आहे. पण त्यास कोणी जाणत नाहीं. हाच सूर्यरूप ज्योतिर्लिंग आहे. शिवलिंगाच्या बाह्यपूजेपेक्षां हृदयस्थ शिवलिंगाच्या पूजेचें माहात्म्य शतपट अधिक आहे. अग्निस्थ ज्योतिर्मय शिवलिंग ब्राह्मणांना विशेष पूज्य असून हृदयस्थ शिवलिंग योग्यांना विशेष पूज्य वाटतें. ज्ञानी पुरुषांना सर्वव्यापी

शिव पूजनीय आहे. साधारण अज्ञानी जीवांनीं पाषाणाच्या शिवलिंगाची यथायोग्य पूजा केल्यास त्यास स्वराज्य व स्वाराज्यप्राप्ति होते [ शि. पु. ध. सं. अ. १० श्लो. २०६ ते २११ ]. हें लिंगपूजामाहात्म्य व त्याची फलश्रुति पाहातां ही शिवलिंगपूजा हा व्यवहार ग्राम्य व अश्लील नव्हे, असेंच स्पष्ट दिसून येतें. माझ्या मतें कुलकुंडलिनी योगांतील अनुभव या कथेंत लाक्षणिक मार्गेंत सांगितला आहे. त्याचें सविस्तर विवरण मी मागाहून करीन. तूर्त या कथेसंबंधीं इतर अवांतर कल्पना काय आहेत, तो विचार पाहूं.

या कथेचे पडसाद ईजिप्त देशांतील ओसिरिस व ईसीस यांच्या कथेंत व इतर विदेशी संप्रदायांत आढळतात. तसेंच आपल्या भागवताच्या दशम स्कंधांतील गोकुळांतील श्रीकृष्णलीला म्हणजे श्रीकृष्ण व गोपी आणि ऋषिपत्न्या यांच्या प्रेमलीला, ह्या वरील शिवलीलेचीं भक्तियोगांतील निराळी रचलेली आवृत्ति आहे, असें म्हणतां येईल. या सर्व कथांत ऐतिहासिक अर्थात् ऐहिक सत्यकथांपेक्षां कांहीं तात्त्विक विचारच परोक्षतेनें सांगण्याचा हेतु दिसतो, हें उघडच आहे. प्राचीन वाङ्मयात ठिकठिकाणीं अशीं परोक्ष आणि सांकेतिक अथवा लाक्षणिक वर्णनें पुष्कळ आढळतात.

मुख्यतः या कथेंतील लिंगवर्णनावरून व दारुकवनांत पार्वतीसह व मातृगणांसह येणाऱ्या शिवाच्या वर्णनावरून त्या शिवपार्वतीस मैथुनोत्सुक नग्न मानवांप्रमाणें देहधारी मानणें अगदींच असंबद्ध ठरतें. आकाशातील मेघगर्जनेला "वर एक म्हातारी हरभरे भरडीत आहे!" असें आजीबाई नातवंडांना सांगतात, त्याप्रमाणेंच हें अत्यंत हास्यास्पद होईल.

या शिवकथेचे सर्व पाठभेद सूक्ष्म दृष्टीनें अवलोकन केले तर असें दिसून येतें कीं,

(१) ज्या काळची ही कथा आहे, त्या वेळचे ऋषि व ऋषिपत्न्या ह्या आपल्याप्रमाणें शरीरधारी वर्णिलेल्या असल्या, तरी या लाक्षणिक अथवा तात्त्विक घटनेच्या वेळीं हें स्थूल जगत् कदाचित् निर्माणहि झालेलें नसावें; किंवा तें झालेलें असलें, तर ही कथा सृष्टयुत्पत्तीसंबंधीं काल्पनिक असावी.

(२) महादेवाला त्याचे भक्त म्हणविणाऱ्या ऋषींनीं मारणें, कुटणें व त्यानें घात राहाणें, हा प्रकार अक्षरशः खरा मानणें अशक्य आहे.

(३) या कथेंतील शिव जर कामुक मानावा तर तो कुरूप व नग्न होता, हें वर्णन यथोचित वाटत नाहीं. तसेंच तो पार्वती व मातृकागण यांसह भिक्षाटण करीत असणें विसंगत ठरतें.

(४) गळून पडलेलें शिवाचें लिंग कित्येक योजनें पसरणें, त्यानें तिन्ही लोक व्यापणें, पृथ्वी जाळूं पाहाणें, पुढें जगांत अंतर्बाह्य अंधार पसरणें, इत्यादि लोकोत्तर, भयंकर व अद्भुत प्रकार लिंग म्हणजे जननेंद्रिय मानल्यानें अत्यंत असंबद्ध ठरतात.

(५) लिंग म्हणजे जननेंद्रिय मानून तें गळून पडलें तरी तथाकथित कामासक्त शिवानें शांत राहाणें संभवत नाहीं.

(६) या कथेचा उत्तानार्थ खरा मानला तर असा अश्लील व अव्यवस्थित प्रकार आदिनाथ व परम वैराग्यशील जगद्गुरु अशा महादेवाच्या ठिकाणीं अशक्यप्राय आहे, हें उघडच वाटतें.

(७) तसेंच तो शिवमहापुराणांतील धर्मसंहितेंत वेदवेत्ते पुराणकार व्यास महर्षि हे त्या पुराणांतील मुख्य उपास्यरूप शिवाबद्दल वर्णितील याहून असंबद्ध तें काय असणार?

(८) अखेर "शिवलिंगाची पूजा करा." अशी आकाशवाणी झाली, किंवा शिवानें तशी आज्ञा केली, ती लिंग म्हणजे सामान्य जननेंद्रिय या अर्थानें असणें मुळींच शक्य कोटींतील वाटत नाहीं. तसेंच त्यानंतर सारे देव, ऋषि, मुनि, या शास्त्यांनीं व शिष्ट मानवांनीं पुष्कळ पिढ्यांपर्यंत या निंद्य अर्थानें लिंगपूजा इतका दीर्घकाळ सुरू ठेवणें, हें मुळींच संभवनीय दिसत नाहीं, हेंहि सांगावयास नकोच.

(९) कांहींच्या म्हणण्याप्रमाणें हा कथाभाग प्रक्षिप्त मानावा, तर तो अनेक पुराणांत आहे व अशा लाक्षणिक स्वरूपांत तो मागून घालण्यांत कांहीं सयुक्तिक हेतु सांगतां येत नाहीं. ह्या व अशा अनेक कारणांस्तव हा संपूर्ण कथाभाग केवळ लाक्षणिकच मानणें भाग आहे. मग त्यांतील खरें रहस्य आपल्याला पुरें समजो अगर न समजो.

(१०) या कथेंतील शिवाच्या भाषणांत गूढ आणि सांकेतिक भाग उघडच दिसतो. शिव म्हणतो "मी साक्षात् परमात्मा आहें. आणि मजबरोबर असलेली ही शबरीरूप प्रकृति माया आहे (किंवा अग्निरूप आहे). जेव्हां मी

सृष्टिरचना करण्याचें मनांत आणतों, तेव्हां या मायारूप अग्नींत संसारोत्पत्तीचें बीज होम करतों. भगवदंश हेंच प्रकृतीचें बीज आहे. तें मायेंत अनुप्रविष्ट झालें कीं सृष्टि उत्पन्न होते." आणखी शिव म्हणतो कीं, "त्या सूर्यभगवानरूप गुरूनें मला देवतांच्या द्वारां अशी सन्मानयोग्य दीक्षा दिली आहे कीं, 'तूं मजप्रमाणें नियमबद्ध असा पूर्ण ब्रह्मचारी रहा.' आता सूर्यरूप गुरूमध्यें व मजमध्यें कांहीं भेद नाहीं." अखेर शिव त्या कामासक्त स्त्रियांना म्हणतो– "वास्तव हे स्त्रियांनो! तुम्ही मजपासून काम-भोगांची इच्छा करतां, ती माझ्या व्रताच्या विरुद्ध आहे. मी स्मरारि नामक कामाचा शत्रु आहें. यासाठीं मजजवळ काम-भोग न मागता नियमधर्मादींची याचना करा."

असें जरी परोपरीनें शिवानें सांगितलें, तरी त्या कामविव्हल स्त्रिया शिवासंबंधीं कामासक्ति सोडीनात. (शि. पु. धर्मसंहिता अ. १०) हा कथाभाग व श्रीमद्भागवत दशम स्कंधांतील तेविसाव्या अध्यायांतील श्रीगोपाल-कृष्ण व याज्ञिक ऋषिपत्न्या यांचा संवाद, तसेंच त्याच स्कंधांतील एकोणतिसाव्या अध्यायांतील श्रीकृष्ण–गोपी संवाद, यांत बरेंच साम्य आहे. अर्थात् ती कृष्णलीला जशी गूढ, आध्यात्मिकरहस्यमय आहे, तशीच ही शिवलीला आध्यात्मिकरहस्यमय लाक्षणिकच मानली पाहिजे.

(११) तें रहस्य कदाचित् असें असूं शकेल कीं, याज्ञिकांचें वैदिक कर्मकांड व शिवागमांचा भक्तिमार्ग यांत भक्तिमार्ग निकृष्ट नाहीं. तो स्त्रीशूद्रादि सर्वांस सुगम आहे. प्रकृतींत अधिष्ठित (भाविकांच्या हृदयांत अधिष्ठित) असलेलें ज्योतिर्लिंग म्हणजे ईश्वरतत्त्व हें प्रतीकद्वारा उपासनीय आहे. प्रकृति ही स्वभावतः पुरुषाला बिलगूं पाहते. पुरुषापासून दूर ती राहूंच शकत नाहीं. ही पुरुषप्रकृतीची संलग्नता आत्मज्ञात्या विरक्त ऋषींस दुःसह वाटते. शिवाचें (आत्म्याचें) बाह्य लिंग म्हणजे प्रकृति त्यानें त्यक्त करावी, असेंच ज्ञानी ऋषि इच्छितात. तें प्राकृतिक लिंग गळून पडल्यामुळें जो आक्रांत झाला, तो प्राकृतिक प्रलय होय. पुढें जगाची रहाटी चालावी व निर्गुण शिवाची उपासनादि करतां यावी, म्हणून प्राकृतिक शिवलिंग प्रतीकद्वारां निर्गुण शिवाची उपासना रूढ झाली, असा यांतील एक भावार्थ संभवतो.

( १२ ) श्रीमद्भागवतांतील क्वचित् कोणास ग्राम्य वाटणाऱ्या कृष्ण-गोपीलीलांचा रहस्यार्थ प्रकट करण्याचा जसा अनेकांनीं प्रयत्न केला आहे, त्याप्रमाणे या देवदारुवनविहाराचा रहस्यार्थ अनेक तऱ्हेनें सांगण्यांत आला आहे. त्याचा उल्लेख मागील प्रकरण ४ यांत आहेच. तसेंच आणखी कांहीं नमुने पुढें देत आहे :—

( १ ) कोणी एक पं. माधवशास्त्री आपल्या 'शिवलिंग और ओंकार' नामक पुस्तकांत असें सुचवितात कीं, या कथेंतील ऋषि म्हणजे प्राण ( श. प. ब्रा. ७।२।३।५ ). दारुकवन म्हणजे ब्रह्मरंध्र. नग्न शिव म्हणजे मल-विक्षेपादि आवरणरहित आत्मज्ञान. तद्रूपी शिवभगवान् प्रथम हृदयांत प्रकट होतात. त्यांच्या मतें या कथेंतील ऋषिपत्न्या म्हणजे बाह्य सकाम वृत्ति. त्या अंतस्थ निर्विकल्प स्थितीस घेरतात. अरुंधती म्हणजे शुद्धबुद्धि. माता ( मातृका ) म्हणजे ऋद्धि-सिद्धि. शिवगण म्हणजे मोद, प्रमोद, वैराग्य समजावे. ऋषींचें भ्रमण म्हणजे कुंभक-रेचक गतीनें प्राण-भ्रमण. बाह्यवृत्ति अंतरात्म्यास घेरीत असलेल्या पाहून ऋषिप्राण घाबरतात. प्राणायामाचा अभ्यास करणारास हा अनुभव येतो. तेव्हां श्वासगति कुंठित होऊन जीव बेचैन होतो. हाच प्राणऋषींचा शिवाशीं भासणारा प्रतिरोध होय. वसिष्ठ म्हणजे न घाबरणारा आत्मवश प्राण, अरुंधती म्हणजे बुद्धीची अंतर्मुख वृत्ति. तिला जघन्य अवयव-अवयवी भाव व कामविकार संभवत नाहींत. भृगु म्हणजे-क्रोधवश मन. लिंग म्हणजे चिज्जडाचें अज्ञानजन्य बंधन. तें असलें म्हणजे देहतादात्म्य होतें ; विवेक राहत नाहीं. उलट तें तुटलें म्हणजे तुरीयावस्थेंत जगद्भाव राहत नाहीं. त्यासच परोक्षतेनें अंधार किंवा प्रलय मानलें आहे. जडचेतनाचें विभेदरूप ज्ञान सद्बुद्धिरूप अरुंधती सतीच्या ठिकाणीं स्थित असतें. आकाशवाणी म्हणजे "जड चेतनविभेदरूप लिंगाची उपासना करा," हा . साधकांच्या अंतरांतला आदेश. याप्रमाणें हें भिक्षाटण आख्यान योग्यांच्या साधनाभ्यासावर रचलें आहे, असें हे माधवाचार्य सुचवितात.

( २ ) दुसरे एक पंडित नारायण आयंगार आपल्या 'इंडो-आर्यन मायथॉलजी' ( खंड १, पृ. ५६३।६४ ) नामक ग्रंथांत सुचवितात कीं, कठोप-निषदांतील, "अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापकोऽलिङ्ग एव च। यं ज्ञात्वा मुच्यते

जन्तुरमृतत्वं च गच्छति ॥" २।३।८. म्हणजे अव्यक्ताहून पर असलेला पुरुष व्यापक व अलिंगच (निर्गुण) आहे. त्याला जाणून प्राणी मुक्त होतो व अमृतत्वाला प्राप्त होतो. या श्रुतींतील विशेषेंकरून, 'व्यापकोऽलिंग' या शब्दावर वरील कथा रचली आहे. अथवा हा द्यर्थी शब्द ह्या कथेंतील रहस्यसूचक आहे. या कथेंतील ऋषि म्हणजे ज्ञानेंद्रियें होत. अरुंधती ही शुद्धबुद्धि होय. विरागी शिव म्हणजे अंतर्यामी होय. ऋषिपत्न्या म्हणजे इंद्रियवृत्ति जाणाव्या. त्यांच्याजवळ सत्यकाम दिगंबर शिव स्वस्वरूपज्ञानाची किंवा आत्मीय प्रेमाची भिक्षा मागत आहे. जो शुद्धसत्त्वगुणलिंगी तोच अलिंगी होय. त्याचें परिच्छिन्न लिंग गळून पडतांच त्यानें जग व्यापलें, म्हणजे अंतर्यामी प्रत्यगात्म्यानें सर्व विश्व अनुप्रविष्ट झालें. शिवाचीं दिगंबर (नग्न) व शिपिविष्ट (शिश्न किंवा महाव्याधिष्ट) हीं नांवें गूढार्थवाची आहेत. त्यांचा उत्तानार्थ अश्लील वाटतो. पण दिगंबर याचा रहस्यार्थ (दिशा हेंच वस्त्र ज्याचें, असा व्यापक आहे.) शिपिविष्ट याचा रहस्यार्थ अंतर्यामी असा आहे. शिपिविष्ट याचा निकृष्ट उत्तानार्थ 'तिरस्करणीय महाव्याधिष्ट' असा होतो. पण रहस्यार्थ आत्महन्ते विषयासक्त जन आत्म्याचा महाव्याधिष्टाप्रमाणें तिरस्कार करतात, म्हणून त्यास परोक्षतेनें शिपिविष्ट म्हणतात. श्रद्धा किंवा ब्रह्मविद्या (अरुंधती किंवा अनसूया) या शिवाचें खरें स्वरूप जाणतात व त्याचा म्हणजे नग्न अर्थात् निरावरणरूप आत्मज्ञानाचा, सत्कार करतात. या कथेंत लिंग हा शब्द सगुणनिर्गुणवाची व्यापकार्थी व सूक्ष्मार्थी आहे. तें मूलतत्त्व महताहून महत् व अणूहूनहि सूक्ष्म आहे. अलिंगाचें लिंगपतन म्हणजे प्रचार अर्थात् त्याचा अंतर्यामीं अनुप्रवेश होय. हीच कल्पारंभापासूनची शिवलिंगोपासना होय. जडचेतनविभेदरूप. अर्थात् आत्मानात्मविवेकरूप लिंग या शिवात्म्याच्या उपासनेंत व्यक्त होतें.

(४) आधिभौतिक दृष्टीनें विचार करणारे अशी कल्पना करतात कीं, ('शिवलिंग और ओंकार' नामक ग्रंथ पाहा) सृष्ट्युत्पत्तीच्या प्रक्रियेंतील वायु हेच भृगु ऋषि; कारण, वायु, जल, चंद्रमा यांस भृगु म्हणतात. (वायु आपश्चंद्रमा इत्यते भृगवः। गोपथ, पूर्व. २।८) ऋषिपत्न्या म्हणजे आकर्षणविकर्षणशक्ति. यांचा परिणाम ब्रह्माण्डरूपलिंग, द्यावापृथिवीरूपांत द्विधा झोण्यांत होतो. [ तदण्डमकरोद्‌ द्विधा। मनु. १।१२; तन्माता पृथ्वी तत्पति

(१२) श्रीमद्भागवतांतील क्वचित् कोणास ग्राम्य वाटणाऱ्या कृष्ण-गोपीलीलांचा रहस्यार्थ प्रकट करण्याचा जसा अनेकांनीं प्रयत्न केला आहे, त्याप्रमाणें या देवदारुकवनविहाराचा रहस्यार्थ अनेक तऱ्हेनें सांगण्यांत आला आहे. *त्याचा उल्लेख मागील प्रकरण ४ यांत आहेच.* तसेंच आणखी कांहीं नमुने पुढें देत आहें :—

(१) कोणी एक पं. माधवशास्त्री आपल्या 'शिवलिंग और ओंकार' नामक पुस्तकांत असें सुचवितात कीं, या कथेंतील ऋषि म्हणजे प्राण (श. प. ब्रा. ७।२।३।५). दारुकवन म्हणजे ब्रह्मरंध्र. नग्न शिव म्हणजे मल-विक्षेपादि आवरणरहित आत्मज्ञान. तद्रूपी शिवभगवान् प्रथम हृदयांत प्रकट होतात. त्यांच्या मतें या कथेंतील ऋषिपत्न्या म्हणजे बाह्य सकाम वृत्ति. त्या अंतरस्थ निर्विकल्प स्थितीस घेरतात. अरुंधती म्हणजे शुद्धबुद्धि. माता (मातृका) म्हणजे ऋद्धि-सिद्धि. शिवगण म्हणजे मोद, प्रमोद, वैराग्य समजावें. ऋषींचें भ्रमण म्हणजे कुंभक-रेचक गतीनें प्राण-भ्रमण. बाह्यवृत्ति अंतरात्म्यास घेरीत असलेल्या पाहून ऋषिप्राण घाबरतात. प्राणायामाचा अभ्यास करणारास हा अनुभव येतो. तेव्हां श्वासगति कुंठित होऊन जीव बेचैन होतो. हाच प्राणऋषींचा शिवाशीं भासणारा प्रतिरोध होय. वसिष्ठ म्हणजे न घाबरणारा आत्मवश प्राण, अरुंधती म्हणजे बुद्धीची अंतर्मुख वृत्ति. तिला जघन्य अवयव-अवयवी भाव व कामविकार संभवत नाहींत. भृगु म्हणजे क्रोधवश मन. लिंग म्हणजे चिज्जडाचें अज्ञानजन्य बंधन. तें असलें म्हणजे देहतादात्म्य होतें; विवेक राहत नाहीं. उलट तें तुटलें म्हणजे तुरीयावस्थेंत जगद्भाव राहत नाहीं. त्यासच परोक्षतेनें अंधार कि प्रलय मानलें आहे. जडचेतनाचें विभेदरूप ज्ञान सद्बुद्धिरूप अरुंधती सतीच्या ठिकाणीं स्थित असतें. आकाशवाणी म्हणजे "जड चेतनविभेदरूप लिंग उपासना करा," हा साधकांच्या अंतरांतला आदेश. याप्रमाणें हें मिश्र आख्यान योग्यांच्या साधनाभ्यासावर रचलें आहे, असें हे . सुचवितात.

(२) दुसरे एक पंडित नारायण आयंगार आपल्या ' ... यॉलजी' (खंड १, पृ. ५६३।६४) नामक ग्रंथांत सुचवितात कीं, निषदांतील, "अव्यक्तात्तु परः पुरुषो व्यापकोऽलिङ्ग एव च। यं ...

वसिष्ठ-अरुंधती यांनीं गृहस्थाश्रमधर्म पाळून शिवरूप अतिथीचा योग्य परामर्श घेतला, म्हणून स्तुति केली आहे. ( शि. पु. ध. सं. १०।१६६–१८१. ) तसेंच कामवश न होणाऱ्या अरुंधतीला सतीत्वाचा आदर्श मानलें आहे. यामुळें पुढें लग्नातील वधूनें अरुंधतीच्या ताऱ्याचें दर्शन करावें, अशी रूढि पडली असें म्हणतात.

( ९ ) साराश, कथेच्या उत्तानार्थांतहि " निवृत्तः परितुष्टश्च सुखी पूर्णमनोरथः ।" १०।१५२ हीच शिवाची भूमिका शिवपुराणांत दाखविली आहे. नग्न शिवाला ऋषिपत्न्या नग्न होऊन निर्लज्जपणें बिलगल्या, तेव्हा भृग्वादि ऋषींच्या शापानें शिवाचें लिंग गळून पडलें हा गूढार्थवाद आहे. कारण उघडच आहे कीं, शिवमहापुराणांत शिवाला व शिवभक्ताना निंद्यत्व आणणारा भाग सत्यार्थानें कसा असेल ?

( १० ) शिवपुराणाच्या कांहीं प्रतींत ऋषिपत्न्या शिवाला बिलगल्या व शिवाचें लिंग ( इद्रिय ) गळून पडलें असा भाग नाहीं. ( पुराणवर्म, पूर्वार्ध, पृ. २७२-७८ ) पण अन्य ठिकाणीं तसें पाल्हाळीक वर्णन आहे. तेव्हा त्याचा खुलासा करतांना तो भाग गोपीलीलाप्रमाणें गूढार्थवाद आहे, असें मानणेंच सयुक्तिक ठरतें.

( ११ ) या अनेक कल्पनांशिवाय असे निंद्य भाग जैनांनीं किंवा अन्य कोणीं दुष्ट बुद्धीनें आपल्या पुराणात मागून घुसडले असावे अशी एक प्रक्षिप्तवादाची कल्पना आहे, ती वेगळीच.

( १२ ) आता माझ्या कल्पनेप्रमाणें या कथेचा रहस्यार्थ सागण्यापूर्वी कुंडलिनीयोग अगोदर सांगितला पाहिजे. तसेंच स्कंदकुमारांचें व परशुरामाचें क्रौंचविदारण व परशुरामाचा रेणुकावध अशा ज्या कुंडलिनीयोगावरच आधिष्ठित अशा कथा मला वाटतात, त्यांचें रहस्य थोडक्यांत सांगितलें पाहिजे. अध्यात्माचें उपबृंहण हेंच साऱ्या पुराणांचें मुख्य उद्दिष्ट आहे, हें कोणींहि कधींहि विसरूं नये सत्त्वगुणवृद्धिपूर्वक ब्रह्मात्मैक्यज्ञान या उद्दिष्टाकडे नजर भिडवूनच साऱ्या पौराणिक आणि वैदिक कथांचा अर्थ लावला पाहिजे. ही पौराणिक वाङ्मयाची मुख्य पारमार्थिक गुरुकिल्ली आहे

परमार्थसाधनाचें अंतिम ध्येय म्हणजे जीव शिवरूप आहे किंवा आत्मा ब्रह्मरूप आहे याचा साक्षात् अनुभव हें होय. यासाठीं जीं अनेक परमार्थ-

द्यौः । श. ब्रा. १३।१।६।१ ] सृष्ट्युत्पत्ति होत असतां तेजोमेघरूप महालिंगाचा भेद झाला. त्या वेळच्या आकांताचें हें वर्णन मानतां येईल. महाशून्यरूप आकाश वायुरूपांत क्रियात्मक होऊन तेजोरूपांत प्रथमच व्यक्त होत. तें तेज जलांत ( जलद्वाररूप योनींत ) उग्र वडवानळरूपानें व पृथ्वींत शांतरूपानें राहतें. तेंच शिवलिंगाचें घोर आणि शान्त रूप मानतां येईल.

( ५ ) एका ठिकाणीं शिवपुराणाच्या आधारें ( ४।५।११ ) असें म्हटलें आहे कीं, या कथेंत अखेर भगलिंग एक झाल्यावर त्या लिंगाची पूजा सुरू झाली ती त्रिमूर्तिरूप म्हणून सुरू झाली. ( 'फॅलिक मिसलिनी', पृ. ५४ )

( ६ ) शिवलिंग म्हणजे शिवाचा अवयव नव्हे, शिवानें हातीं धरलेलें ज्योतिर्लिंग ( लिंगं रत्नमयं तस्य हस्तात्पतितं प्रवीत् । शि. पु. शत. अ. २६-२७ ) म्हणजे ब्रह्माण्ड, तें योनिरूपांत म्हणजे बाणरूपांत, अर्थात् पंचतत्त्वात्मिका प्रकृतिरूपानें धारण केलें, असाहि अर्थ संभवतो. दुसरा असाहि रहस्यार्थ संभवतो कीं, ( सिद्धान्त, वर्ष २, अंक २१ ) समष्टिप्रजननसंपन्न शिवतत्त्व समष्टिलिंग आहे. त्या समष्टिलिंगानें समष्टिव्यष्टि प्रकृतिरूपयोनींचें ( ऋषिपत्न्यांच्या रूपांत ) आकर्षण करणें हें अनिवार्य आहे. हें शिवलीला व कृष्णलीला यांचें रहस्य समजावें. ( मागील प्रकरण ४ पाहा. )

( ७ ) अगदीं व्यावहारिक दृष्ट्या पाहतां विदेही योगी नग्न असतात-त्यांना त्यांत अश्लीलता वाटत नाहीं. पण ज्यांस विदेहता व ग्राम्यता यांतील भेद कळला नाहीं, त्या ऋषिपत्न्यांचा त्यामुळें उद्भवणारा काम व ऋषींचा क्रोध हीं दोन अधःपतनाचीं द्वारें ठरलीं. वसिष्ठ-अरुंधती हीं दोघें या सत्त्वपरीक्षेला उतरलीं. हेंच या कथेंतील सार सदर कथेंतच सांगितलें आहे. ( द्रष्टुं स्त्रीणां च दौः शील्यं साध्वीनां च तथा धृतिम् । कौतूहलाशयौ गौरीदेवदारुवनं शनैः ॥ " शिव. पु. ध. सं. १०।१०९ )

( ८ ) लिंगपुराण पूर्वार्ध अ. २९ ते ३४ यांत ही दारुवनविहाराची कथा आली आहे. त्यांत ऋषींच्या शापानें लिंग गळून पडलें हा भाग नाहीं; हा भेद महत्त्वाचा आहे. प्रवृत्तिज्ञानाची परीक्षा पाहण्याकरितां व निवृत्तिज्ञानाची स्थापना व्हावी, म्हणून शंकर दिग्वासांनीं विकृत रूप धारण करून दारुवनांत प्रवेश केला, असें तेथें सांगितलें आहे व ऋषींनीं आतिथ्यधर्म पाळला नाहीं, हा दोष दाखविला आहे. शिवमहापुराणांतील कथेंतहि

वसिष्ठ अरुंधता यानीं गृहस्थाश्रमधर्म पाळून शिवरूप अतिथीचा योग्य परामर्श घेतला, म्हणून स्तुति केली आहे (शि. पु ध स १०।१६६-१८१.) तसेंच कामवश न होणाऱ्या अरुंधतीला सतीत्वाचा आदर्श मानलें आहे यामुळे पुढे लग्नातील वधूनें अरुंधतीच्या ताऱ्याचें दर्शन करावें, अशी रूढि पडली असें म्हणतात

(९) साराश, कथेच्या उत्तानार्थांतहि "निवृत्त परितुष्टश्च सुखी पूर्णमनोरथ ।" १०।१५२ हीच शिवाची भूमिका शिवपुराणात दाखविली आहे. नग्न शिवाला ऋषिपत्न्या नग्न होऊन निर्लज्जपणें बिलगल्या, तेंव्हा भृग्वादि ऋषींच्या शापानें शिवाचें लिंग गळून पडलें हा गूढार्थवाद आहे कारण उघडच आहे कीं, शिवमहापुराणात शिवाला व शिवभक्ताना निंद्यत्व आणणारा भाग सत्यार्थानें कसा असेल ?

(१०) शिवपुराणाच्या काहीं प्रतींत ऋषिपत्न्या शिवाला बिलगल्या व शिवाचें लिंग (इंद्रिय) गळून पडलें असा भाग नाहीं. (पुराणवर्म, पूर्वार्ध, पृ २७२ ७८) पण अन्य ठिकाणीं तसें पाल्हाळीक वर्णन आहे तेव्हा त्याचा खुलासा करताना तो भाग गोपीलीलाप्रमाणें गूढार्थवाद आहे, असें मानणेंच सयुक्तिक ठरतें

(११) या अनेक कल्पनाशिवाय असे निंद्य भाग जैनानीं किंवा अन्य कोणीं दुष्ट बुद्धीनें आपल्या पुराणात मागून घुसडले असावे अशी एक प्रक्षिप्तवादाची कल्पना आहे, ती वेगळीच

(१२) आता माझ्या कल्पनेप्रमाणें या कथेचा रहस्यार्थ सागण्यापूर्वी कुंडलिनीयोग अगोदर सागितला पाहिजे तसेंच स्कंदकुमाराचें व परशुरामाचें क्रौंचविदारण व परशुरामाचा रेणुकावध अशा ह्या कुंडलिनीयोगावरच आधिष्ठित अशा कथा मला वाटतात, त्याचें रहस्य थोडक्यात सागितलें पाहिजे अध्यात्माचें उपबृंहण हेंच साऱ्या पुराणाचें मुख्य उद्दिष्ट आहे, हें कोणींहि कधींहि विसरू नये सत्त्वगुणवृद्धिपूर्वक ब्रह्मात्मैक्यज्ञान या उद्दिष्टाकडे नजर भिडवूनच साऱ्या पौराणिक आणि वैदिक कथाचा अर्थ लावला पाहिजे ही पौराणिक वाङ्मयाची मुख्य पारमार्थिक गुरुकिल्ली आहे

परमार्थसाधनाचें अंतिम ध्येय म्हणजे जीव शिवरूप आहे किंवा आत्मा ब्रह्मरूप आहे याचा साक्षात् अनुभव हें होय यासाठीं जीं अनेक परमार्थ-

साधनें शास्त्रांत सांगितलीं आहेत, त्यांत कुलकुंडलिनीयोग हें एक योगी लोकांचें साधन आहे. आपल्या पाठीच्या कण्याला मेरुदण्ड किंवा पृष्ठरज्जु असें म्हणतात. त्यावर ३३ मणके म्हणजे ३३ देवता किंवा पर्वे आहेत. तसेंच त्यावर मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, आज्ञा व सहस्रार अशीं चक्रें अगर पद्मं म्हणजे स्थानविशेष मानले आहेत. त्या पद्मांच्या दलांवर एकूण ४९ वर्ण मानले आहेत. तेच मरुद्गण अगर मातृकागण असावेत. या पद्मांतील पहिलीं पांच पंचमहाभूतांचीं अंशरूप होत. सहावें जीव-मनरूप होय. तसेंच सातवें शिवरूप आहे. जीवशक्तीची जी जागृति ती ईशशक्तीची निद्रा होय. अशी ईशशक्ति जी आपल्या पिंडांत आहे तिला कुंडलिनी-शक्ति म्हणतात. पाठीच्या कण्याच्या खालच्या टोंकास मूलाधारचक्र किंवा कुलचक्र व एक स्वयंभू शिवलिंग आहे, असें कल्पिलें आहे. तेथ ही कुंडलिनीशक्ति निद्रिस्त असते. तिची निद्रा ती आपल्या नामरूपकर्मात्मक जागृत जगाची उभारणी होय. ही जीवाची अविद्यात्मक बहिर्मुख दृष्टि होय. रज्जुसर्पभ्रमांत सर्प दिसतो, तोंवर रज्जु दिसत नाहीं. त्याप्रमाणें जगद्भ्रमांत जग दिसतें, तोंवर त्याचें अधिष्ठान ब्रह्म दिसत नाहीं. म्हणून ब्रह्मज्ञानासाठीं जगाचा लय पाहणें जरूर असतें. त्याकरितां योगी लोक योगप्रक्रियेनें पिण्डांतर्गत कुंडलिनीला जागें करतात. तेव्हां ती पांच-भौतिक पांच चक्रांचा व त्याबरोबर जगदाध्यासाचा लय करीत मस्तकांतील ब्रह्मरंध्रांत असलेल्या शिवतत्त्वास विलगण्यास जाते व त्यायोगें त्या साधक योग्याच्या दृष्टीपुढील जगदाभास नाहींसा होऊन स्वयंप्रकाश शिवात्मा सहजच प्रकाशित होतो. तेव्हा जगाची, जगत्सत्यबुद्धीची संहारणी हा अंतिम परमार्थ व जगाची आभासात्मक उभारणी हा ऐहिक व्यवहार होय. त्यांतच कुंडलिनीयोगसाधनमार्गाचा अंतर्भाव होतो. पिंडान्तर्गत सवित्प्रवाहांत अधःस्रोता तो जीव व ऊर्ध्व स्रोता तो देव. आतां या कथेचा मला काय अर्थ वाटतो, तें सविस्तर सांगतों.

शिवाचा दारुकवनविहार म्हणजे सुषुम्नाद्वारानें जीवाचा होणारा जग-लय-योग होय. वन याचा अर्थ उपासनीय, सभजनीय असा होतो. याच लय-योगावर स्कंदकुमाराचें क्रौंचविदारण व परशुरामाचा रेणुकावध या कथा अधिष्ठित आहेत. त्यांचा थोडा विचार येथें करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

स्कंदकार्तिकेय याचा जन्म शिववीर्यातून अग्नीच्या पोटीं व पोषण कृत्तिकां-कडून झालें असा कथाभाग आहे. योगी जीवाचें ओजस् तेंच शिववीर्य. त्या वीर्याकडून प्राणापानाच्या संघर्षात उत्पन्न होणाऱ्या सुषुम्नाग्नीमुळें खडबडून जागृत होणारा जो जीवात्मा तोच स्कंद, तोच परशुराम व तोच भिक्षाटण करणारा शिव होय. हा स्कंदजीवात्मा ज्या कृत्तिकांकडून पोसला गेला, त्या कृत्तिका म्हणजे आपल्या देहपिंडांतील पृष्ठरज्जूवर असलेलीं षट्चक्रें होत. कृत्तिका म्हणजे सप्तऋषिप्राणाच्या शक्ति. सप्तशीर्षण्य प्राणांना म्हणजे ज्ञानेंद्रांना सप्तऋषि म्हणतात. स्कंदाचें क्रौंचविदारण व हंसगमनाला मार्गदर्शन असें :— पाठीच्या कण्यांत पोकळ मणके म्हणजे पर्व असल्यामुळें तोच क्रौंचपर्वत; त्यांतून हंसांना जाण्यासाठीं भोंक पाडणें, म्हणजे पाठीच्या कण्यांतून हंसांना म्हणजे योग्यांना सुषुम्नामार्ग मोकळा करणें व पुढें स्कंद-रूप जीवात्म्यानें सहस्रारांतील शिवात्म्याशीं तादात्म्य पावणें, हेंच योग्याचें अंतिम क्रौंचविदारणरूप ध्येय होय.

आतां परशुरामाच्या आख्यानांतील रेणुका ही कृत्तिकांपैकीं एक आहे. बृ. उपनिषदाप्रमाणें भार्गव-जमदग्नि हे सप्तऋषींपैकीं एक होत. त्यांची पत्नी रेणुका ही रजोगुणी क्षात्रकन्या होती. आत्मांतरमणीय नामरूपाच्या योगैश्वर्या-वर म्हणजे जलक्रीडा करणाऱ्या चित्ररथावर ती मोहित झाली. म्हणून जमदग्नीनें तिला ठार मारण्यास आपल्या मुलांस सांगितलें, असें लाक्षणिक वर्णन आहे. जमदग्नि हाहि सुषुम्नेच्या ठिकाणचा प्राणाग्निच होय. त्याचीं पाच मुलें मूलाधारापासून विशुद्ध चक्रापर्यंतचीं पंचमहाभूतांचीं चक्रें होत. ही जगाची उभारणी करणाऱ्या कुंडलिनी (रजोगुणी) रेणुकेच्या पोटीं जन्मास आलीं. नामरूपात्मक जगाची उभारणी करणारी रजोगुणी अविद्या रेणुका हें कुंडलिनीचेंच एक पूर्वस्वरूप होय. जमदग्नीच्या चार वडील मुलांनीं तिला मारण्याचें असामर्थ्य दाखविलें. म्हणजे विश्वभीचा लय पहिल्या चार चक्रांत होणें शक्य नव्हतें. कारण तीं चक्रें पृथ्वी, जल, तेज व वायु या स्थूल व व्यक्त भूतांचींच आहेत. पाचवें विशुद्ध चक्र हें केवळ (अंशतः निर्गुण ब्रह्माप्रमाणें) आकाशतत्त्व आहे. तोच परशुराम म्हणजे पांचव्या चक्रांत आलेला जीवात्मा, त्यानें त्या चक्राचा भेद करून नामरूपात्मक अविद्येचा (रेणुका नामक रजोगुणी मातेचा) वध केला व पुढें विद्यारूपांत आपल्या

साधनें शास्त्रांत सांगितलीं आहेत, त्यांत कुलकुंडलिनीयोग हें एक योगी लोकांचें साधन आहे. आपल्या पाठीच्या कण्याला मेरुदण्ड किंवा ब्रह्मरज्जु असें म्हणतात. त्यावर ३३ मणके म्हणजे ३३ देवता किंवा पर्व आहेत. तसेंच त्यावर मूलाधार, स्वाधिष्ठान, मणिपूर, अनाहत, विशुद्ध, आज्ञा व सहस्रार अशीं चक्रें अगर पद्में म्हणजे स्थानविशेष मानले आहेत. त्या पद्मांच्या दलांवर एकूण ४९ वर्ण मानले आहेत. तेच मरुद्गण अगर मातृकागण असावेत. या पद्मांतील पहिलीं पांच पंचमहाभूतांचीं अंशरूप होत. सहावें जीव-मनरूप होय. तसेंच सातवें शिवरूप आहे. जीवशक्तीची जी जागृति ती ईशशक्तीची निद्रा होय. अशी ईशशक्ति जी आपल्या पिंडांत आहे तिला कुंडलिनी-शक्ति म्हणतात. पाठीच्या कण्याच्या खालच्या टोंकास मूलाधारचक्र किंवा कुलचक्र व एक स्वयंभू शिवलिंग आहे, असें कल्पिलें आहे. तेथ ही कुंडलिनीशक्ति निद्रिस्त असते. तिची निद्रा ती आपल्या नामरूपकर्मात्मक जागृत जगाची उभारणी होय. ही जीवाची आविद्यात्मिक बहिर्मुख दृष्टि होय. रज्जुसर्पभ्रमांत सर्प दिसतो, तोंवर रज्जु दिसत नाहीं. त्याप्रमाणें जगद्भ्रमांत जग दिसतें, तोंवर त्याचें अधिष्ठान ब्रह्म दिसत नाहीं. म्हणून ब्रह्मज्ञानासाठीं जगाचा लय पाहणें जरूर असतें. त्याकरितां योगी लोक योगप्रक्रियेनें पिण्डांतर्गत कुंडलिनीला जागें करतात. तेव्हां ती पांच-भौतिक पांच चक्रांचा व त्याबरोबर जगदाध्यासाचा लय करीत मस्तकांतील ब्रह्मरंध्रांत असलेल्या शिवतत्त्वास मिळण्यास जाते व त्यायोगें त्या साधक योग्याच्या दृष्टीपुढील जगदाभास नाहींसा होऊन स्वयंप्रकाश शिवात्मा सहजच प्रकाशित होतो. तेव्हां जगाची, जगत्सत्यबुद्धीची सहारणी हा अंतिम परमार्थ व जगाची आभासात्मक उभारणी हा ऐहिक व्यवहार होय. त्यांतच कुंडलिनीयोगसाधनमार्गाचा अंतर्भाव होतो. पिंडान्तर्गत संवित्प्रवाहांत अधःस्रोता तो जीव व ऊर्ध्व स्रोता तो देव. आतां या कथेचा मला काय अर्थ वाटतो, तें सविस्तर सांगतों.

शिवाचा दारुकवनविहार म्हणजे सुषुम्नाद्वारानें जीवाचा होणारा जग-लय-योग होय. वन याचा अर्थ उपासनीय, संभजनीय असा होतो. याच लय-योगावर स्कंदकुमाराचें क्रौंचविदारण व परशुरामाचा रेणुकावध या कथा अधिष्ठित आहेत. त्यांचा थोडा विचार येथें करणें अप्रस्तुत होणार नाहीं.

स्कंदकार्तिकेय याचा जन्म शिववीर्यातून अग्नीच्या पोटीं व पोषण कृत्तिकांकडून झालें असा कथाभाग आहे योगी जीवाचें ओजस् तेंच शिववीर्य. त्या वीर्याकडून प्राणापानाच्या संघर्षानें उत्पन्न होणाऱ्या सुषुम्नाग्नीमुळें खडबडून जागृत होणारा जो जीवात्मा तोच स्कंद, तोच परशुराम व तोच भिक्षाटण करणारा शिव होय. हा स्कंदजीवात्मा ज्या कृत्तिकांकडून पोसला गेला, त्या कृत्तिका म्हणजे आपल्या देहपिंडातील पृष्ठरज्जूवर असलेलीं षट्चक्रें होत. कृत्तिका म्हणजे सप्तऋषिप्राणाच्या शक्ति. सप्तशीर्षण्य प्राणांना म्हणजे ज्ञानकेंद्रांना सप्तऋषि म्हणतात. स्कंदाचें क्रौंचविदारण व हंसगमनाला मार्गदर्शन असें.—पाठीच्या कण्यात पोकळ मणके म्हणजे पर्व असल्यामुळें तोच क्रौंचपर्वत; त्यातून हंसांना जाण्यासाठीं भोंक पाडणें, म्हणजे पाठीच्या कण्यातून हंसाना म्हणजे योग्याना सुषुम्नामार्ग मोकळा करणें व पुढें स्कंदरूप जीवात्म्यानें सहस्रारातील शिवात्म्याशीं तादात्म्य पावणें, हेंच योग्याचें अंतिम क्रौंचविदारणरूप ध्येय होय

आता परशुरामाच्या आख्यानातील रेणुका ही कृत्तिकांपैकीं एक आहे. बृ. उपनिषदाप्रमाणें भार्गव-जमदग्नि हे सप्तऋषींपैकीं एक होत. त्यांची पत्नी रेणुका ही रजोगुणी क्षात्रकन्या होती आपातरमणीय नामरूपाच्या योगैश्वर्यावर म्हणजे जलक्रीडा करणाऱ्या चित्ररथावर ती मोहित झाली. म्हणून जमदग्नीनें तिला ठार मारण्यास आपल्या मुलास सांगितलें, असें लाक्षणिक वर्णन आहे जमदग्नि हाहि सुषुम्नेच्या ठिकाणचा प्राणाग्निच होय. त्याचीं पाच मुलें मूलाधारापासून विशुद्ध चक्रापर्यंतचीं पंचमहाभूताचीं चक्रें होत. ही जगाची उभारणी करणाऱ्या कुंडलिनी (रजोगुणी) रेणुकेच्या पोटीं जन्मास आलीं. नामरूपात्मक जगाची उभारणी करणारी रजोगुणी अविद्या रेणुका हें कुंडलिनीचेंच एक पूर्वस्वरूप होय. जमदग्नीच्या चार वडील मुलांनीं तिला मारण्याचें असामर्थ्य दाखविलें. म्हणजे विश्वश्रीचा लय पहिल्या चार चक्रांत होणें शक्य नव्हतें. कारण तीं चक्रें पृथ्वी, जल, तेज व वायु या स्थूल व व्यक्त भूतांचींच आहेत. पाचवें विशुद्ध चक्र हें केवळ (अद्यातः निर्गुण ब्रह्माप्रमाणें) आकाशतत्त्व आहे तोच परशुराम म्हणजे पाचव्या चक्रांत आलेला जीवात्मा, त्यानें त्या चक्राचा भेद करून नामरूपात्मक अविद्येचा (रेणुका नामक रजोगुणी मातेचा) वध केला व पुढें विद्यारूपात आपल्या

मातेला मंजीवित केलें. तेंच कुंडलिनीचें उत्तररूप होय. नंतर तो परशुराम जीव श्रीदत्तगुरूंच्या भेटीस आज्ञाचक्रांत गेला व पुढें सहस्रारचक्रभेदानें क्रौंचविदारक स्कंद व परशुराम शिवसायुज्य पावले.

या ज्या दोन त्रोटक कथा सांगितल्या त्यांतील हेतु इतकाच कीं, या कुलकुंडलिनीयोगाचीं लाक्षणिक वर्णनें कशीं संभवतात तें लक्षांत यावें. आतां आपण दारुकवनविहार कथेचा थोडक्यांत रहस्यार्थ पाहूं. कुलकुंडलिनीयोग हा एक शिवयोग आहे. यांत पिण्डातर्गत सुषुम्नामार्गांतील मूलाधार चक्राजवळ (१) स्वयंभू लिंग– लिंग व गुद यांच्यामध्यें, त्यावर अनाहत चक्राशीं हृदयाजवळ (२) बाणलिंग आणि त्यावर आज्ञाचक्राशीं भ्रूमध्या- [illegible] पूजेचें

[illegible] .. आतां

[illegible] र शिव

म्हणजे निरावरण जीव होय. त्याच्याबरोबर असणारी पार्वती अथवा अग्नितत्त्व म्हणजे कुंडलिनीशक्ति होय. ती पाठीच्या मणक्यांतून म्हणजे पर्वांतून संचार करते किंवा त्या पर्वांचीच ती यौगिक शक्ति म्हणून तिला पार्वती म्हटलें. कुंडलिनीमार्ग सुषुम्ना तेंच अग्नितत्त्व. मातृकागण म्हणजे षट्चक्रांच्या दलांवर असलेली जगद्वाचक वर्णमाला. ऋषि म्हणजे सप्तशीर्षण्य प्राण. त्यांच्या पत्नी म्हणजे षट्चक्रांच्या शक्ति, म्हणजे भौतिक वृत्ति. त्या नग्न शिवाच्या लिंगावर म्हणजे योगी जीवास प्रथम भासणाऱ्या आपातरमणीय दृश्यजगल्लिंगावर मोहित झाल्या. तेव्हां भृगूंनें म्हणजे मार्गवरामाप्रमाणें विशुद्ध चक्रांत आलेल्या प्राणाग्नीनें "लिंग गळून पडो," असा शाप दिला. याचा अर्थ असा आहे कीं, विशुद्ध चक्रापर्यंत भौतिक चक्रभेद करीत प्राण वर आले म्हणजे जगदाभासरूप प्राकृतिक लिंग लय पावतें, दिसेनासें होतें. लिंगपुराणांत लिंग याचा अर्थ प्रधान प्रकृति असा केला आहे. त्यानंतर वसिष्ठ-अरुंधतीनें त्या योगी शिवरूप पावणाऱ्या जीवाचें आज्ञाचक्रांत उत्तम आतिथ्य केलें. त्या चक्रांत साधक जीवाला श्रीसंतसद्गुरूंची भेट होते व पुढें तो कृतार्थ होतो. तेव्हां त्या योग्याच्या दृष्टींत त्रैलोक्यव्यापी जगदाभास समूळ नष्ट होतो, तोच सगुणजगल्लिंगपतनानें झालेला ऐहिक दृष्टया अनर्थ होय. तेव्हां सर्वत्र अंधार पडला म्हणजे जग दिसेनासें झालें. ऐहिक अंधार

हा पारमार्थिक प्रकाश होय तेंच आलिंगरूप परशिवाचें रूप होय मग जगाच्या संस्थितीकरितां, व्यवहाराकरिता, तसेंच उपासनादि मार्गासाठीं पार्वतीरूप कुंडलिनीनें आपल्या ठिकाणीं लिंगाची स्थापना केली, म्हणजे परत कुलचक्राकडे अथवा मूलाधाराकडे मार्ग वळून कुंडलीनें जगरूप प्राकृतिक लिंगाची उभारणी केली तेव्हा जगाची उभारणी व संहारणीरूप जें कुंडलिनीचें प्राकृतिकरूप लिंग त्याची योगी लोक उपासना करूं लागले म्हणजे कुंडलिनीयोगाचा अभ्यास करूं लागले व अनुभव घेऊं लागले

सारांश, लिंग म्हणजे जननेंद्रिय नव्हे आपातरमणीय असें जें जगदाकार प्राकृतिकरूप तें लिंग, जेव्हा कुंडलिनीशक्ति एखाद्या सर्पिणीप्रमाणें मूलाधारचक्रानजीक (बाण)लिंगाला साडेतीन वळसे घालून त्या (बाण)लिंगाच्या छिद्रावर आपलें मस्तक ठेवून निद्रिस्त म्हणजे निश्चेष्ट असते तेव्हां जीवाच्या दृष्टीसमोर जगदाकार प्राकृतिक लिंग उभें दिसत असतें. पुढें साधकाच्या योगाच्या प्रक्रियेंत प्राणापानांच्या संघर्षांत भडकलेल्या प्राणाग्नीमुळें ती अंतर्निहित शक्ति जागृत होते व मस्तकांतील सहस्रारांत असलेल्या शिवरूपास भेटण्यास व विलयण्यास पाटीच्या कण्यातून वेगानें धावते म्हणजे वर चढूं लागते ती विशुद्ध चक्रांत व लगेच आज्ञाचक्रांत आली कीं पृथ्वी, जल, तेज, वायु, आकाश या पंचमहाभूतांच्या पांच चक्राचा भेद म्हणजे लय झाल्यामुळें भृगु ऋषीच्या म्हणजे प्राणाग्नीच्या जणु शापानें तें त्रैलोक्यव्यापी जगलिंग गळून पडतें, म्हणजे त्याचें भान उरत नाहीं व जीव बहिर्मुखाचा अंतर्मुख होऊन आज्ञावनांतील गुरुकृपेनें लौकरच ब्रह्मरंध्राच्या ठिकाणीं शिवरूप होतो पुढें योग्याचें देहबुद्धीचें उत्थान होऊन योगी देहभानावर येऊं लागताच त्याची तीच कुंडलिनीशक्ति मार्गे फिरून मूलाधाराकडे परत येत गेली कीं पुन्हा आकाश, वायु, तेज, जल, पृथ्वी अशा चक्राच्या अनुक्रमानें जगाची उभारणी होते हीच जगलिंगाची पुनःस्थापना होय ऐहिक दृष्ट्या व उपासनादृष्ट्या या लिंगस्थापनेचें व योगमार्गानें लययोगानें उपासना करण्याचें महत्त्व फार आहे, हें सुज्ञाच्या लक्षात येईलच

या कथेंत शिवाशरूप जीव भौतिक मनोवृत्तींना अथवा प्राणाच्या भोगेच्छाप्रवृत्तींना असें सांगतो आहे कीं, ब्रह्मात्म्यावर अथवा जीवशिवाच्या पारमार्थिक रूपावर विवर्तरूपानें उभारलेलें हें नामरूपात्मक प्राकृतिक जग-

लिंग हें आपातरमणीय आहे, यास्तव यावर तुम्ही मोहित होऊं नका. तो तुमचा बहिर्मुख वृत्तीचा भौतिक काममोह पुरा करावा हें माझ्या वैराग्यशील शिवव्रताच्या विरुद्ध आहे माझी प्रकृति कुंडलिनी माया ही माझ्या सान्निध्यामुळें जगाची उभारणी व संहारणी करते तीच पिंडातील अग्नि होय छांदोग्यातील तेज तें तेंच समजावें हें त्रैलोक्यव्यापी निर्गुणात्मक लिंग हें भोगबुद्धीनें नव्हे तर त्यागबुद्धीनें चिंतनीय आहे सहस्रारातील सूर्य जो परमशिव त्याची ही अशी गुरुदीक्षा आहे कुंडलीनीरूप जी पार्वती म्हणजे तेहतीस पर्वांची ( पाठीचे मणके ) शक्ति म्हणजे प्रकृति अथवा योनी तीच हें जगरूप लिंग धारण करूं शकते व्यवहारात जोंवर या देहगेहाचा अथवा जगाचा सत्यत्वबुद्धीनें भास आहे, तावत् तें जगलिंग-प्रतीकरूप जें शिवलिंग त्याची उपासना वैराग्यपूर्ण वृत्तीनें म्हणजे विषय वैरस्यबुद्धीनें जगानें करावी त्याग शिकविणें हें या शिवलिंगोपासनेचें मत आहे. यासाठीं ज्यानें काम जाळला तो स्मरारि या शिवलिंगाच्या ठिकाणीं चिंतीत जावा वसिष्ठ म्हणजे योगी व अरुंधती म्हणजे त्याची सूक्ष्म ब्रह्मविद्या होय तींच दोघें या शिवयोग्याचें स्वागत कसें करावें तें जाणतात माझ्या मतें या कथेचा हा भावार्थ आहे

या कथेंतील शिवलिंगाचें वर्णन अणोरणीयान् महतोमहीयान्, असें केलें आहे, तीच रहस्याची गुरुकिल्ली आहे तेथें पूजेकरिता देवानीं जें सोन्याचें

---

१ The Linga which is small and at the same time *infinitely great can only be the Purusha of the* heart who is "*anoraniyan mahato mahiyan*". He is the Self identical with Brahma or Vishnu and so they know Him to be limitless, infinite Asceticism that has renounced home and all worldly desires is sexless and its Linga, sign, of vigour is the Self ++ The Rishis are the purified senses +++ I take them (ऋषिपत्न्या) to be the Rishis themselves as females in order to fall in love with Purusha, the Man outwordly, but the formless Indweller esoterically Outwordly the

(अथवा हिऱ्याचें) हाटकेश्वर (अथवा हारकेश्वर) लिंग स्थापन केलें, त्या-संबधीं श्रीसमर्थ दासबोधात असें सुचविलेलें आहे कीं, तें खोल पाताळांतलें हाटकेश्वर लिंग म्हणजे पंचतन्मात्रा, मन आणि बुद्धि या सप्त आवरणांनीं आच्छादित असें पिंडब्रह्मांडव्यापी ब्रह्मात्मलिंग होय. तोच दारुक नामक ब्रह्मवनांतील हटकेश्वर शिव भगवान् होय. तो देहात्मबुद्धीनें जाणतां येणार नाहीं. तो वसिष्ठ-अरुंधतीनें जाणला. बाकीच्या ऋषींना देहबुद्धीच्या ज्ञान-गर्वामुळें तो जाणता आला नाहीं.

सुखें होईल ब्रह्मज्ञान । परी तुझें स्वलीला देहधारण
याचें नेणती पर्यवसान । अति सज्ञान साकल्यें ॥ २७७ ॥

—एकनाथी भागवत, अ० ३०

---

(मागील टीप पुढें चालू)

Purusha in the sense of the male sex falls, but esoterically the *fall* is a pun upon पत् and signifies the Infinite Self's *flight* everywhere as a free bird (हंसात्मा). Thus the story indicates Siva to be sexless and the Linga to be a symbol of the Infinite Purusha, whom the purified senses of the knower realize as their Truth. ('Indo-Aryan Mythology' Vol. I, pp. 507–508.)

२. आवर्णोदकीं हटकेश्वर । तयास घडे नमस्कार । महिमा अत्यंतचि थोर । तया पाताळलिंगाचा ॥ १ ॥ परंतु तेथें जाववेना । शरीरें दर्शन घडेना । विवेकें आणावें अनुमाना । तया ईश्वरासी ॥ २ ॥ सातसमुद्र ओलांडावे । तेथें जाणें कैसें फावे ॥ म्हणोनि विवेकी असावें । साधुजनीं ॥ ४ ॥ जें आपणास नव्हे ठावें । तें जाणतयासी पुसावें । मनोवेगें तर्नें पिरावें । हें तों घडेना ॥ ५ ॥ चर्मदृष्टीस नव्हे ठावें । तें ज्ञानदृष्टीनें पाहावें । ब्रह्मांड विवरोन राहावें । समाधानें ॥ ६ ॥ (दा. बो. १७।१०)

## प्रकरण ८ वें

# शिवलिंगपूजारंभकथा

[२]

पादादि ह्यङ्गं मूर्द्धान्तं देवानां पूज्यते सदा ।
शंकरस्येज्यते कस्माल्लिङ्गं शंसस्व मे सदा ॥ २१ ॥

\+ + +

अव्यक्ता हि गतिस्तेषां न जानन्ति मनीषिणः ॥ २४ ॥

—महाशिवपुराण धर्मसंहिता, अ० ४९

मागील प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आतां दुसऱ्या आख्यायिकेचा काय रहस्यार्थ असावा तें सविस्तर पाहूं या. शिवमहापुराणाच्या धर्मसंहितेच्या अ १०।४९।५० यांत शिवाची लिंगपूजाच कां व कशी रूढ झाली, तें सांगितलें आहे. त्यांपैकीं ४९ व्या अध्यायांत शौनकानें सूताला प्रश्न विचारला कीं, अन्य देवतांच्या चरणांपासून मस्तकापर्यंत त्यांची पूजा करतात; पण भगवान् शंकराचें मात्र लिंगपूजनच होतें, असें कां? त्यावर सूत सांगतो कीं, एकदां सृष्टि जलांत विलीन झाली असतां, त्रिदेव जलांत स्थित झाले. तेव्हां ब्रह्मदेव आणि विष्णु शंकरास म्हणाले कीं, आतां आपण समर्थ आहांत, तर आपणच सृष्टि निर्माण करावी. त्यावर शंकर होय म्हणून जलांत तपश्चर्या करितां अंतर्धान पावले. पण त्यानंतर दिव्य सहस्र वर्षें लोटलीं तरी शंकर जलांतून बाहेर आलेच नाहींत. असें पाहून विष्णूनें ब्रह्मदेवास सृष्टि निर्माण करण्यास सांगितलें. त्याप्रमाणें ब्रह्मदेवानें सृष्टि निर्माण केली. यानंतर शंकर जलांतून बाहेर आले व पाहतात तों सृष्टि अगोदरच निर्माण झाली आहे तें पाहून त्यांना क्रोध आला व ते सृष्टीचा प्रलय करण्यास सिद्ध झाले. तेव्हां ब्रह्मदेवानें त्यांची स्तुति करून त्यास प्रसन्न केलें व सांगितलें कीं, मीं जी सृष्टि निर्माण केली आहे, तिचा प्रलय न करतां ती तशीच राहूं द्यावी. तेव्हां शंकर म्हणाले कीं, सृष्टीचा संहार करण्याकरितां जें तेज प्रकट झालें तें

कोठें जाणार? तेव्हां ब्रह्मदेवानें असें सांगितलें कीं, तें तेज सूर्याच्या ठिकाणीं ठेवावें, त्या तेजानें सृष्टीचें पालन होईल व कल्पांतसमय प्राप्त होईल तेव्हां सृष्टीचा त्याच तेजानें प्रलय होईल. तोंपर्यंत दिवस आणि रात्र या रूपांत सूक्ष्म दैनंदिन प्रलय कालचक्राप्रमाणें सावकाश होतच राहील. तेव्हां शंकर हंसत म्हणाले कीं, आतां सृष्टि निर्माण करण्याची आवश्यकता नाहीं, मग या लिंगाचें काय प्रयोजन राहिलें? असें म्हणून शंकरांनीं लिंगाचे तुकडे तुकडे करून पृथ्वीवर चोहोंकडे फेंकले. तेव्हा तें लिंग पृथ्वीच्या पोटांत व आकाशाच्यावर इतकें वाढलें कीं, विष्णु पाताळांत व ब्रह्मदेव वर जाऊन शोध घेतां त्या लिंगाचा त्यांना आदि-अंत लागला नाहीं. तेव्हां आकाशवाणी झाली कीं, ह्या पदार्थमात्रांत अनुप्रविष्ट असलेल्या चिद्‌घनरूप शिवलिंगाची पूजा करण्यानें मनुष्याच्या कामना सिद्ध होतील. तेव्हां लिंगपूजा सुरू झाली. या आख्यानांतले कांहीं अंश सृष्टीच्या आरंभीं शिवरात्रीच्या दिवशीं प्रकट झालेल्या त्रैलोक्यव्यापी ज्योतिर्लिंगाच्या आख्यायिकेंत आलेच आहेत.

महाभारताच्या सौप्तिक पर्वांत हीच आख्यायिका थोडी वेगळ्या रीतीनें सांगितली आहे. भारतीय युद्धाच्या अखेर कौरवसेनेची दाणादाण झाली, असतां भीमाच्या गदाप्रहारानें अखेर दुर्योधनहि धारातीर्थीं पडला. अशा घोर प्रसंगीं रात्रींच्या समयीं अश्वत्थामादि कौरवांकडील दोनतीन वीर लपत छपत अरण्यांत शिरले. तेथें एक घुबड वडाच्या झाडावर निजलेल्या शेंकडों कावळ्यांना मारून त्यांचा फडशा पाडीत आहे, असें अश्वत्थाम्यानें पाहिलें व त्या घुबडालाच गुरु करून आपण पांडवांकडील धृष्टद्युम्नादि वीर व पांचालीचे पुत्र, आतां थकून निजलेले असतांनाच, त्यांना ठार मारावें, असें त्यानीं ठरविलें. पण त्यांस ईशनियतीकडून विलक्षण अशा कांहीं अडचणी येऊं लागल्या. त्याला जिकडेतिकडे जनार्दनरूप दिसूं लागलें. तेव्हां त्यानें शंकराची आराधना केली व अखेर त्या वेळीं साक्षात्कृत झालेल्या शिवगणांनीं पेटविलेल्या यज्ञकुंडांत अश्वत्थाम्यानें निराशेनें उडी टाकून आत्मबलिदान केलें! तेव्हां शंकर संतुष्ट होऊन त्यांनीं हातांत खड्ग घेऊन अश्वत्थाम्याच्या शरीरांत प्रवेश केला व धृष्टद्युम्न आणि पांचालीचे पुत्र वगैरे वीर झोंपेत असतां अश्वत्थाम्यानें त्यास निर्दयपणानें ठार केलें! तेव्हां पांडवांच्या छावणींत दुसऱ्या दिवशीं मोठा हाहाकार झाला. त्यानंतर हें,.एवढें सामर्थ्य

अश्वत्थाम्याच्या ठिकाणी कोठून आलें, असें शोकग्रस्त युधिष्ठिरानें श्रीकृष्णास विचारलें. तेव्हां हें सारें अश्वत्थाम्यावरील शिवकृपेचें सामर्थ्य होय, असें श्रीकृष्णानें सांगून पुढें शिवमहिम्याचें लाक्षणिक वर्णन केलें आहे. तें सौप्तिक पर्वाच्या सतराव्या व अठराव्या अध्यायांत पुढीलप्रमाणें सांगितलें आहे.

अध्याय १७— एकदां जलप्रलयानंतर पुन्हा सृष्टि निर्माण करण्याच्या वेळीं शंकर जलांत तप करण्यास गेले. ते बराच काळ बाहेर येतना, म्हणून विष्णूनें दुसरा प्रजापति निर्माण करून त्यास सृष्टि निर्माण करण्यास सांगितलें. त्यानें सृष्टि निर्माण केली ती त्यासच खाण्यास धांवली! तेव्हां ब्रह्मदेवानें तिच्याकरितां शाकाहार-मांसाहाररूप अन्न निर्माण केलें. त्यानंतर शंकर पाण्याबाहेर येऊन पाहतात तों सृष्टि निर्माण झालेली असून ती आपल्याच सामर्थ्यानें वाढत आहे, तीस ईश्वराची गरज वाटत नाहीं; असें पाहून शंकरांना राग आला व त्यांनीं आपलें लिंग छाटलें. तें छाटलेलें लिंग भूमींत तसेंच रोवून राहिलें. तेव्हां क्रुद्ध झालेल्या शंकराचें सांत्वन करण्याच्या हेतूनें ब्रह्मदेव त्यांस म्हणाला, "तुम्हीं इतका वेळ जलांत राहून काय केलें? आणि आतां हें लिंग उत्पन्न करून तें जमिनींत कशाकरितां रोवून ठेवलें?" तेव्हां संपूर्ण विश्वाचा नायक तो परमेश्वर संतापून म्हणाला, "हे प्राणी दुसऱ्या कोणीं उत्पन्न केले आहेत. तेव्हा आतां मला या लिंगाचा काय उपयोग? या प्राण्यांकरितां अन्नहि मीं तपोबलानें उत्पन्न करून ठेवलें आहे. या औषधि-वनस्पतींची उत्पत्ति परंपरेनें अव्याहत चालणार." याप्रमाणें बोलून शंकर रागाच्या आवेशांत खिन्न मनानें तेथून निघाले, ते मुंजवान पर्वताच्या पायथ्याशीं तपश्चर्या करण्याकरितां गेले.

अध्याय १८ वा— कृतयुगांत शमदमादि साधनसंपन्न प्रजा असल्यामुळें त्या कृतकृत्य होत्या. नंतर कृतयुग संपल्यावर वेदाच्या आधारानें विधियुक्त यागादि कर्मे केल्यानेंच शाश्वत सुख मिळेल, अशा समजुतीनें कर्मेंच करण्याच्या निश्चयानें देवांनीं यज्ञ निर्माण केला. त्यांत वेगवेगळ्या देवतांना हविर्भाग ठरविले. पण त्यांत ईश्वराला म्हणजे शंकराला हविर्भाग ठरविला नाहीं. लोकयज्ञ, क्रियायज्ञ, गृह्ययज्ञ व मनुष्ययज्ञ असे चतुर्विध यज्ञ त्रेतायुगांत चालले होते. त्यांत ईश्वराला म्हणजे शंकराला हविर्भाग ठेवला नाहीं, ईश्वरास सारे विसरले, असें पाहून शंकरास फार राग आला. त्यानें

त्या यज्ञांपैकी दोन यज्ञांचें एक पांच वितीचें धनुष्य निर्माण केलें व त्यावर वषट्काराची प्रत्यंचा चढविली। म्हणजे विषयवासनेचें धनुष्य गृहयज्ञांतील संयमानें संकुचित केलें. नंतर त्यांनीं दक्षमखविध्वंसाप्रमाणें त्या अज्ञानजन्य यज्ञाचा विध्वंस केला. तेव्हां सर्व जग अशांत झालें. पुढें सर्व देव यज्ञपुरुषासह पश्चात्तापपूर्वक शंकराला शरण गेले. तें पाहून शंकरानें आपला क्रोध अत्यंत ठेवला व देवतांवर कृपा केली. त्यानंतर देव शंकराला हविर्भाग देऊं लागले.

याप्रमाणें सौतिक पर्वांतील आख्यानांत शिवास प्रथम त्रेतायुगांत यज्ञांत हविर्भाग मिळत नव्हता तो मिळूं लागला, असें सांगितलें आहे. अशा पर्यायानें, शिवोपासना रूढ झाली असें दर्शविलें आहे. त्यांत अखिल ब्रह्मांडाचा आदि, मध्य व अंत एक शिवमात्र आहे, असें त्याचें वर्णन केलें आहे. शिव-महापुराण व महाभारत या दोन्ही ठिकाणच्या आख्यानांच्या उगमांत, त्यांच्या पार्श्वभूमींत व वर्णनाच्या तपशिलांत थोडाफार फरक असला तरी शंकरानें आपलें लिंग छाटलें याचा अर्थ काय? लिंग म्हणजे उपस्थेंद्रिय असा अश्लील अर्थ येथें संभवतो काय, हा प्रश्न दोन्ही ठिकाणीं समानच आहे.

समष्टि भगवान् म्हणजे मानवदेहाप्रमाणें विराट् देहधारी पुरुष व प्रजापति हे त्याचें मेढ्र अशा कल्पना आपल्या शास्त्रांत क्वचित् केल्या असल्या तरी त्या लाक्षणिक आहेत. त्या अक्षरशः खऱ्या नव्हत हें उघडच आहे. ईश्वराचें सगुण देहाकाररूप मानलें तरी तें दिव्य मानलें पाहिजे. मानवा-प्रमाणें स्थूल अवयवी देह मानतां येत नाहीं. विदेशांत उपस्थेंद्रियाच्या बृहत्प्रतीकाचे देव्हारे वाढले, तसें आपल्याकडे झालें नाहीं. ईजिप्तचे मनोरे हे महादेवाचें लिंगरूप कोणी मानतात. पण तेथें लिंग याचा अर्थ चिह्न असाच करणें योग्य ठरतें. शिवाय या कथेंत लिंग पुरून ठेवलें किंवा त्याचे अंश चोहोंकडे फेंकले या वर्णनावरून हें लिंग म्हणजे ब्रह्मात्मलिंग अंतर्यामी रूपांत सर्वत्र अनुप्रविष्ट झालें, असा एक रहस्यार्थ उघड दिसतो. नाम-रूपात्मक भौतिक सृष्टि निर्माण झाल्यावर ईश्वर त्यांत आपल्या अंशानें अनुप्रविष्ट होतो अथवा व्यापकत्वानें नित्यच अंतर्निहित असल्याचें उपलब्ध होतें हेंच येथें परोक्ष मार्गानें सांगितलें असावें असें दिसतें. तेंच शिवात्मलिंग प्रतीकद्वारां उपासनीय असल्याची आकाशवाणी झाली म्हणजे पिण्डांतर्गत दहराकाशांतील आत्मानात्मविवेकरूप वाणी स्फुरून आली असें समजावें.

सृष्टीचें आदिकारणरूप जो परमात्मा तो जेव्हां सृष्टिरचनेचें कार्य करतो, तेव्हां त्यास ब्रह्मा किंवा प्रजापति म्हणतात. मोक्ष देण्यासाठीं जेव्हां परमात्मा अनात्मसत्ता नाहींशी करतो, तेव्हां त्यास शिव म्हणतात व अविद्याग्रस्त जीवांचा नाश करणाऱ्या परमात्मशक्तीस रुद्र म्हणतात. परमात्म्याच्या या दिव्यशक्ति वस्तुतः अमूर्त आहेत. त्या शरीरधारी देवता नाहींत. अर्थात् त्यांचें लिंग म्हणजे अवयव ही कल्पना उगाच समजुतीपुरती आहे. उलट या कथेंत शिवतत्त्व व्यापक आहे, हाच ध्वनितार्थ आहे. जगत्प्रलयांत ब्रह्मदेवाचे दैनंदिन प्रलय व महाप्रलय असे भेद आहेत. दैनंदिन प्रलय कधीं जलरूपात, कधीं अग्निरूपांत तर कधीं वायुरूपांत होतो. यापैकीं जलप्रलयाच्या वेळचें वर्णन या कथेंत आहे. त्या वेळीं संहारकारी शिवतत्त्व जलांत लीन असतें. मग ब्रह्मा-विष्णु हे सृष्टि उत्पन्न करतात. त्यापुढील या कथेंतील भाग उघडउघडच लाक्षणिक दिसतो. शिवानें सृष्टि निर्माण केली नाहीं; यांतील रहस्यार्थ शिव हा जन्मपरंपरा वाढविणारा नसून त्यांतून सोडविणारा आहे, हाच असावा.

> ईशावास्यमिदँ सर्वं यत्किञ्च जगत्यां जगत् ।
> तेन त्यक्तेन भुञ्जीथा मा गृधः कस्यस्विद्धनम् ॥ १ ॥

म्हणजे परमार्थस्वरूपानें हें सर्व चराचर झांकून टाकावें. सर्व विकारजात आत्मरूप आहे, अशी भावना करावी. तशी भावना केली असतां हें सारें मोहजनक मायाकार्य सोडल्याप्रमाणें होतें. ज्यानें अशा रीतीनें देहबुद्धीचा त्याग केला आहे, त्यानें " देह हें देवाचें, वित्त कुबेराचें। तेथें या मानवाचें काय आहे ?" या भावनेनें सर्व एषणांचा त्याग करावा व आपला परिच्छिन्न कर्तृत्व-भोक्तृत्वभाव सोडून वर्तावें. अथवा स्थूल व्यावहारिक दृष्टीनें म्हणावयाचें तर पाषाणलिंगांच्या ठिकाणच्या पाषाणबुद्धीचा त्याग करून तें लिंग सारें ईशसत्तेनेंच ओतप्रोत व्याप्त आहे, असें समजून त्या पदार्थमात्रांतील अंतर्यामी ईशसत्तेचीच उपासना करावी, असा रहस्यभाग या आख्यायिकेंत मानतां येईल. ' ईशावास्य ' आणि ' तेन त्यक्तेन भुञ्जीथा ' हीं वरील श्रुतींत कूटवचनें आहेत, तशीच ही लिंग छाटून टाकल्याची कूट आख्यायिका आहे. याचे दोन अर्थ संभवतात : ( १ ) वेगळें करून दाखविलेल्या दिव्य ईश-लिंगानें हें सर्व जग व्याप्त आहे असें मानावें. ( २ ) अथवा ' नेति नेति ' या

व्यतिरेक पद्धतीनें ईश्वराच्या नामरूपकर्मात्मक सगुण जगलिंगाचें प्रतीकरूपांत पार्थक्य दाखवून अलिंग निर्गुण शिव अंतर्धान पावले, तेंच खरें उपास्य निर्गुणरूप ह्या व्यक्त जगलिंगांत पाहावें. कांहीं असो. या परोक्षवर्णनांत ग्राम्य, निंद्य किंवा अश्लील अशी कोणतीच कल्पना संभवत नाहीं. लिंग म्हणजे निर्देशचिन्ह असाच अर्थ उघड दिसतो. मुंजवान शब्दाचा लक्ष्यार्थ पुढें सांगितलाच आहे.

आतां सौप्तिकपर्वांतील या आख्यानांत तत्त्वज्ञानाचे विविध भाव कसे दिसतात तें पाहावयाचें आहे. महाभारतांत द्रोणपर्व अ. २०१ यांत व्यासांनीं अश्वत्थाम्यास शिवलिंगपूजेचा विशेष महिमा सांगितला आहे. त्या वेळीं नारायणापुढें अश्वत्थाम्याचें सामर्थ्य चालेना याचें कारण काय ह्या अश्वत्थाम्याचा प्रश्न होता. त्याचें उत्तर देतांना व्यासांनीं असें सांगितलें कीं, नारायण आणि अश्वत्थामा हे दोघेहि शिवोपासक असले तरी अश्वत्थामा शिवाच्या प्रतिमेची पूजा करीत असे. उलट नारायण शिवलिंगोपासना करीत. यामुळें त्यांच्या सामर्थ्यांत फरक पडला. याचा अर्थ अश्वत्थाम्याचा भगवान् शिवाबद्दल परिच्छिन्न व बहिर्मुख पुरुषविधभाव होता. उलट नारायणाचा शिवासंबंधीं व्यापक व सूक्ष्म भाव होता. व्यास म्हणतात कीं, "ईश्वर सर्वरूप आहे असें जाणून जो त्या प्रभूची लिंगावर पूजा करतो, त्याच्या ठिकाणीं आत्मयोग म्हणजे जीव व ब्रह्म यांच्या ऐक्याविषयीं अपरोक्ष ज्ञान आणि शास्त्रयोग म्हणजे परोक्षज्ञान हीं वास्तव्य करितात."

या श्लोकावरील नीलकंठी टीकेंत असें म्हटलें आहे कीं, प्रतिमापूजेंत आत्मा, मन, इंद्रियें व विषय (प्रतिमा) या चारांचें सान्निध्य असतें. पण लिंगशरीरांत (मानसिक) पूजा केली असता आत्मा आणि मन या दोहोंचेंच सान्निध्य असतें. (चतुर्णामसंनिधानेन यत्फलं तदशाश्वतम्। द्वयोस्तु सन्निधानेन शाश्वतं प्राप्यते पदम्॥ दक्षस्मृति.) म्हणून नारायण व

---

१ ताभ्यां लिंगेऽर्चितो देवस्त्वयार्चायां युगे युगे ॥९२॥ सर्वरूपं भवं ज्ञात्वा लिंगे योऽर्चयति प्रभुम्। आत्मयोगाश्च तस्मिन्वै शास्त्रयोगाश्च शाश्वताः ॥९३॥ सर्वभूतभवं ज्ञात्वा लिंगमर्चति यः प्रभोः। तस्मिन्नभ्यधिकां प्रीतिं करोति वृषभध्वजः ॥९५॥ म. भा. द्रोणपर्व, अ. २०१.

अश्वत्थामा हे दोघे शिवोपासक सारखेच असले तरी बहिर्मुख व अंतर्मुख असे उपासनेंत प्रकारभेद असल्यामुळें एकाला शाश्वत फल व दुसऱ्याला अशाश्वत फल मिळालें. अंतर्मुख वृत्तीनें केलेल्या लिंगार्चनानें हें सर्व ब्रह्म आहे असें जाणलें जातें. अगोदर शास्त्रद्वारां परोक्षज्ञान व मागाहून अनुभवपूर्वक अपरोक्षज्ञान हीं दोन्ही शिवलिंगोपासनेनें प्राप्त होतात. या दोन्ही प्रकारच्या उपासनेंत लैंगिक भाव नाहीं, हें लक्षांत घेणें आवश्यक आहे. त्यानें सौप्तिक-पर्वांतील सतराव्या अध्यायावरील नीळकंठी टीपेचा रहस्यार्थ लक्षांत येण्यास मदत होईल.

द्रोणपर्व अ. २०१ यांतील नारायणाचें सामर्थ्य अधिक कां, हा जसा प्रश्न तसाच सौप्तिकपर्वांत अश्वत्थाम्याला एवढें अचाट सामर्थ्य कसें प्राप्त झालें, असा युधिष्ठिराचा प्रश्न आहे; आणि याहि प्रश्नाचें उत्तर शिवलिंगोपासनेंतच आहे. शिवलिंगोपासनेची दिव्य फलश्रुति दोन प्रकारें व्यासांनीं सांगितली आहे : (१) नामरूपकर्मात्मक सृष्टीच्या लयपूर्वक ब्रह्मात्मैक्य अथवा जीवब्रह्मैक्य यांचें अपरोक्ष ज्ञान व (२) नामरूपकर्मात्मक सृष्टींत शिवच ओतप्रोत व्याप्त असलेला शास्त्रानुसार परोक्षतेनें पाहणें. या सिद्धि अश्वत्थाम्यानें कशा प्राप्त करून घेतल्या, हें सौप्तिकपर्वांत पहिल्या सोळा अध्यायांतच परोक्षतेनें सांगितलें आहे. मर्त्य जीवाचा शिवोपासनेनें अमर्त्य झाला तोच अश्वत्थामा होय. हें मर्म त्याच्या नांवांतच आहे. नामरूपकर्मात्मक भूतभौतिक सृष्टीच्या आघातांनीं पराभूत व सतप्त झालेल्या अश्वत्थामा नामक जीवाला, सर्व सृष्टि निजली असतांना जो जागा असतो, असा (उलूक), स्थितप्रज्ञ शिवगुरु सौप्तिक अवस्थेंतील अखिल जड भूतसृष्टीचा परोक्षतेनें (कावळे[१] मारून) लय दाखवितो. पण त्या वेळीं अज्ञानरूपी काळपुरुष अथवा अज्ञानावस्थित बहिर्मुख इंद्रियस्वामी अथवा अविद्याग्रस्त जीव यांचा नाश करणारा जनार्दन अश्वत्थाम्याला भेडसावतो, तेव्हां तो अगतिक होऊन आपल्या अज्ञानावच्छिन्न जीवभावाचें ज्ञानाग्नींत बलिदान करतो. त्याबरोबर सौप्तिकावस्थेंत अत्यंत सन्निकट असलेलें शिवात्मलिंग प्रकट होतें व तो तुरीय शिवात्मा असंग शस्त्र हातीं

१ वायस किंवा काक याचा संस्कृत एकाक्षरी कोशाप्रमाणें अर्थः—जो प्रकृतींत पुरुषांश मानीत नाहीं तो (नास्तिक).

घेऊन अश्वत्थाम्याच्या शरीरात जणु अनुप्रविष्ट होऊन पांचालीचे मुलगे म्हणजे पंचज्ञानेंद्रियाचे विषय अथवा पंचभूतात्मक पंचपांडवाचे सुहृद् म्हणजे सारे भूतभौतिक जड विषय यास नाहींसे करतो मिथ्यात्वबुद्धीनें जणु नाहींसे करतो. याप्रमाणें अमर्त्य शिवात्मपद पावलेल्या अश्वत्थाम्याच्या ठिकाणचा हा जो शिवभाव तोच त्याच्या मस्तकातील दिव्यमणि असावा, अशी मी कल्पना करतो. यशस्वरूप पांचालीचे पुन म्हणजे पंचज्ञानेंद्रियाचे विषय नाहींसे झाल्यावर, भीमाच्या पराक्रमानें म्हणजे प्राणोपासनेनें तो शिवभाव पांचालीस म्हणजे ज्ञानेंद्रियास प्राप्त होतो व शबलशिवभाव सोडून अश्वत्थामा ब्रह्मवनात निर्गुणोपासनेसाठीं निवृत्त होतो असा हा रहस्यभाग मी मानतो भारतात याचें परोक्ष वर्णन आहे, असें मला वाटतें. एरव्हीं चिरजीवाच्या यादींत अश्वत्थामा पहिला कसा? गरुडेश्वरीं तो साक्षात्कृत कसा होतो याचा उलगडा होत नाहीं. अश्वत्थामा हा शिवांश आहे. परिक्षिति म्हणजे सर्व नामरूपकर्मांचें परीक्षण, अर्थात् समूळ निरसन पाहणारा जो लयसाक्षी परमात्मप्रसादानें अवध्य असतो त्याचा अश्वत्थाम्याकडून वध होणें शक्य नसतें इत्यादि प्रकारें या सौप्तिक पर्वाची तुरीय अवस्था ही पार्श्वभूमि अध्यात्म दृष्टीनें नीट पटवून घेण्यासारखी आहे, हें सुज्ञ वाचकास सहज पटेल. विस्तारभयास्तव येथें अधिक खोलात शिरून त्या तत्त्वज्ञानाची जास्त चिकित्सा करणें अप्रस्तुत आहे पण एवढीहि चिकित्सा करण्याचें कारण, आधुनिक चिकित्सकानीं आपली विघातक व व्यर्थ बुद्धिभेदक अशी कुतर्कपद्धति सोडून श्रुत्यनुकूल, विधायक व सत्त्वसवर्धक असे तर्क करावे, एवढेंच मला नम्रतेनें सुचवावेंसे वाटतें. आता युधिष्ठिराचा जो प्रश्न कीं, पांचालीचे

---

१ इंद्रियांचें प्रेरक मन होय (आत्मा नव्हे) अशी जी अश्वत्थाम्याची समजूत तो त्याचा मणि, असें थडाणी म्हणतात.

२ मनसा कर्मणा वाचा यदा क्षुभ्यति नो वपुः।
शान्तात्मा तिष्ठति स्वस्थो जीवधातुस्तदात्वसौ ॥ ४।१९।२० यो वा.
ॐ मनोबुद्ध्यहङ्कारचित्तानि नाहं न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे।
न च व्योमभूमिर्न तेजो न वायुश्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम्॥
नि. प. १

आत्मैव देवता. सर्वा. सर्वमात्मन्यवस्थितम्॥ मनु. १२।११९

अथवा पाडवाचे ( पंचज्ञानेंद्रियाचे किंवा पाचभौतिक असे विषय ) हे वीर ठार मारण्याचें सामर्थ्य अश्वत्थाम्यास ( या जीवास ) कसें प्राप्त झालें? याचें उत्तर श्रीकृष्णानें दिलें कीं, त्याचा नाश अश्वत्थाम्याकडून (जीवाकडून) झालेला नाहीं तो शिवाच्या ( शिवात्मलिंगाच्या ) असग शस्त्राचा प्रताप होय त्या शिवात्मलिंगाचा महिमाच पुढें सतरा व अठरा या अध्यायात सांगितला आहे

"शुद्धदेवसमायुक्ता शिवसृष्टिरुदीरिता। मलैरावृत्य शुद्धात्मा पशुसृष्टि प्रकीर्तिता॥" शिवसृष्टि ही अध्यात्मप्रधान व पशुसृष्टि ही भोगप्रधान असते शास्त्रात कर्माला आप असें म्हणतात कल्पपूर्व जीवाच्या प्राक्कर्मसलीलात शंकरानीं तप केलें म्हणजे त्याचा विचार केला. तेव्हा त्याना जीवाची अभुक व अव्यक्त कर्मसृष्टि पापी वासनानीं दूषित अशी दिसली अशी सृष्टि निर्माण करणें योग्य न वाटल्यामुळें शिवानें दीर्घकाल सृष्टि निर्माण न करता त्या जीवाना पावन करण्याकरिता आध्यात्मिक सस्कारांचें अन्न निर्माण केलें पण त्याना पापी वाटणारी सृष्टि प्रजापतीनें निर्माण केलेली पाहून शिवाला राग आला व त्यानीं शिवसृष्टि निर्माण करण्याचें हेतुस्वरूप लिंग उपासनेकरिता ठेवून देऊन ते मुजवान पर्वताकडे ( आत्मानात्मविवेक ) तपश्चर्येला गेले म्हणजे शास्त्रयोगाचें, सात्त्विक वासनाचें शुद्ध व पवित्र असें सगुण लिंग त्यानीं उपासनेकरिता बाहेर ठेवून भुजगवताच्या गाभ्याप्रमाणें शरीरात असलेल्या शुद्ध अतर्यामीशीं ते अतमुर्खतेनें समरसता पावले हें सात्त्विक गुणप्रधान शिवसृष्टिरूप लिंग हें शिवदृष्टीनें उपासनीय आहे, हा यातील भाव आहे किंवा ही सगुण शिवसृष्टि निर्माण करण्याचें प्रसवसामर्थ्य माझ्या ठिकाणीं आहे, हें मानवाच्या ठिकाणच्या प्रसवसामर्थ्यदर्शक पौरुषलिंगप्रतीकाच्या सकेतानें त्यानीं दिग्दर्शित केलें अर्थात् दार्ष्टांतीं शिवलिंग हें प्रतीक अभिन्न निमित्तोपादानकारणब्रह्माचें आहे, या भावनेनें त्या प्रतीकाची उपासना करा असेंच सांगितलें, असा रहस्यार्थ जाणावा

पण पुढें त्रेतायुगात या मुख्य व अध्यात्मप्रधान शिवात्मभावास विसरून इंद्रियदेवतानीं बहिर्मुख दृष्टीचे लोकेषणादि यज्ञ सुरू केले त्यात सर्व

१ या ठिकाणीं टीकेंत दृष्टातीं लिंग म्हणजे मेढ्र ( शिश्न ) असें नीलकंठ म्हणतात त्यानें व्यर्थ गैरसमज होण्याचा संभव आहे

शिवात्मार्पण न करतां सारें भोग्यजात, मन, बुद्धि इंद्रियदेवतांस अर्पण होऊं लागलें. तेव्हां जगद्गुरु शिव यांस तें जनहिताचें न वाटल्यामुळें त्यांनीं या इंद्रियदेवतांना विषय अर्पण करण्याऱ्या यज्ञाचा विध्वंस केला. तेव्हां इंद्रियदेवतांना पश्चात्ताप होऊन त्यांनीं अखिल भोग्यांचा अंश हविर्भाग म्हणून शिवास अर्पण करण्याचें कबूल केलें. तेव्हां शिव प्रसन्न झाले व अत्यंत अशांत झालेल्या जगाला शांति प्राप्त झाली. तात्पर्य, सर्व देवाधिदेव तोच महादेव होय. त्याच्याच शक्तीनें हें आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक जग चाललें आहे, हें जाणणारा अश्वत्थामा नामक जीव उगाच निमित्तमात्र आहे. हेंच तत्त्वज्ञान शिवलिंगमाहात्म्य या रूपांत श्रीकृष्णानें युधिष्ठिरास सांगितलें आहे. असा या आख्यानाचा श्रुत्यनुकूल रहस्यार्थ लावतां येईल. तसाच लावावा असें मला वाटतें. यांत मुळींच नसलेल्या अश्लीलतेच्या आक्षेपास सुज्ञांनीं थारा देऊंच नये.

महाभारतांतील हें सौप्तिक पर्व वाचलें म्हणजे काळभैरव, काळरात्री, विवेकप्रलय आणि जीवाचा रोजचा दैनंदिन प्रलय अथवा सौप्तिक अवस्था इत्यादि कल्पना त्याप्रमाणें मनापुढें येतात, त्याचप्रमाणें, निर्गुण अथवा अलिंग शिव व सगुण अथवा लिंगप्रकृति, तसेंच बृहदारण्यकांतील (४।४।६) कामयमान पुरुष व अकामयमान पुरुष हीं द्वंद्वें नजरेपुढें येतात. कठ. २।३।१४ व बृहदारण्यक. ४।४।७ या दोन्ही ठिकाणीं असलेल्या व पुढें दिलेल्या एकाच मंत्रावर अधिष्ठित असें हें आख्यानरूप भाष्य आहे, असेंहि मानतां येईल. पंचभूताचे अंश तेच पांडव; अर्थात् त्यांची संतति व त्याचे सुहृद् म्हणजे भौतिक नामरूपात्मक सृष्टि यांचा विलय तोच भारताच्या अखेरचा सौप्तिक पर्व. या वेळीं शिवात्मा बुद्धिजलांत जणुं तप करीत असतो. त्यानंतर जीव हाच कोणी विषयी जगत्स्रष्टा प्रजापति नामरूपात्मक सृष्टि पुन्हा निर्माण करतो. ती भूतसृष्टि भौतिक अन्नावर वाढत जाते. त्या कामयमान पराप्रकृतीचें सकाम मन हेंच प्राकृतिक लिंग. (तदेव सक्तः सह कर्मणैति लिङ्गं मनो यत्र निषक्तमस्य। बृ. उप ४।४।६.) पण अज्ञानरूप सौप्तिक अवस्थेंतून विक्षेपरूप विषयजागृतींत न येता तुरीयरूप शिवात्मजागृतींत जाण्यासाठीं "असंगशस्त्रेण दृढेन छित्वा।" (गीता १५।३) तें प्राकृतिक लिंग छाटून तें शाच शिवभावनेच्या उपासनेसाठीं सगुण भूमिकेवर टाकून तो अलिंग

*शिवात्मा ( मुंजवान म्हणजे मुंजगवताच्या लक्षणात्मक )* बुद्धिरूप गुहेंत उदासीन वृत्तीनें विराम पावतो. ( सौतिकपर्व, अ. १७ ).

शमादि षट्कसंपत्तियुक्त कृतयुग संपल्यावर यज्ञप्रधान त्रेतायुगांत विषयासक्त कामयमान जीव लोकैषणादि ऐहिक व पारलौकिक एषणांच्या भोगात्मक योगयागांत गुंतलेले राहतात, त्या वेळीं त्यांच्या इंद्रियदेवता शिवात्म्याशीं विन्मुख होऊन साऱ्या भावनाकामनांची म्हणजे विषयांची आहुति इंद्रियदेवताच घेतात. हें पाहून शिवात्मा आपल्या अनात्मभावनाशक घोर रुद्ररूपांत त्या प्रार्पचिकांच्या इंद्रियदेवतांच्या तृप्त्यर्थ चालविलेल्या अनिष्ट विषयभोगात्मक यज्ञांचा नाश करतो ( सौतिकपर्व, अ. १८ ). तेव्हां सर्व इंद्रियदेवता पश्चात्ताप पावून त्या ऐहिक व पारलौकिक विषयकामना सोडून अकामयमान होतात. शिवात्म्याला शरण जातात. त्यामुळें शिवात्मा प्रसन्न झाल्यावर योग्य अधिकारी साधक जीव म्हणजे ज्यांच्यापुढील पांचालीरूप ज्ञानेंद्रियांचे विषय नाहींसे झाले आहेत असा अश्वत्थामारूप साधक जीव—

> यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः ।
> अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुत इति ॥
>
> बृ. उप. ४।४।७ किंवा कठ. उप. २।३।१४.

यांत म्हटल्याप्रमाणें ऐहिक व पारलौकिक कामना सुटून याच देहांत मुक्त म्हणजे अमृतत्वाला प्राप्त अथवा चिरंजीव होतात. अर्थात् त्यानंतर त्यांस देहगेहात्मक सगुणभाव त्यांच्या निवृत्तिमार्गांत प्रतिबंधक होत नाहींत. प्रलयकालीं एकाकी असलेल्या सबीज सद्ब्रह्माप्रमाणें, किंवा सौतिक अवस्थेंत अंतरीं असलेल्या अव्यक्त शिवात्म्याप्रमाणें, जाग्रतावस्थेंतील सगुणभावरूप जगलिंगांतहि ते मुक्त पुरुष तोच शिवात्मा पाहतात. हेंच शिवलिंगोपासनेचें रहस्य आहे. तात्पर्य, हें सारें सगुण ब्रह्माड, अलिंग अशा शिवाचेंच शुद्ध शिवोपासनेसाठींच व्यक्त केलेलें प्राकृतिक लिंग होय.

प्रवृत्तिलक्षण अज्ञानें द्वैतात्मक मर्त्य संतति वाढते. उलट निवृत्तिलक्षण ब्रह्मोदनानें अद्वैतात्मक संतति म्हणजे नित्यत्व अथवा अमृतत्व प्राप्त होतें.

---

१ I would translate the verse ( तपसाधिगतं चान्नं प्रजार्थं मे पितामह । औषधयः परिवर्तेरन्यथैवं सततं प्रजाः ॥ २५ ॥ म. भा. सौ. प. अ. १७ ) thus :—By my austerity ( in water ) Food ( the

लोकेषणादि चार एषणात्मक यश हे प्रवृत्तिलक्षण आहेत. त्या शिवार्पण न केलेल्या यशांचा नाश करणारे व अमृतत्व देणारे शिवगुरु होत. त्यांच्या कृपेनें अश्वत्थामा मूळचा मर्त्य असून अमर्त्य म्हणजे चिरंजीव झाला. उपस्थलिंग जन्ममरणपरंपरा वाढविणारें आहे. उलट बुद्धींत गूढ असलेलें शिवात्मलिंग हें मर्त्य जीवांना अमृतत्व प्राप्त करून देणारें आहे. म्हणून सर्व इंद्रियदेवतांनीं त्याला सर्व भोग्याचें हविर्दान केलें पाहिजे. (पडिलें वळण इंद्रियां सकळां। भाव तो निराळा नाहीं दुजा॥) हाच आत्मयज्ञ अथवा ज्ञानयज्ञ श्रेयस्कर होय. सर्व इंद्रियकामांचा होम झाला (यदा सर्वे प्रमुच्यन्ते कामा येऽस्य हृदि श्रिताः। अथ मर्त्योऽमृतो भवत्यत्र ब्रह्म समश्नुत इति बृ. उप. ४।४।७; कठ. २।३।१४). म्हणजे साधकास सद्यः मुक्ति प्राप्त होते. तात्पर्य, निष्कामतेनें सगुणलिंगप्रतीकद्वारां अलिंग शिवोपासना हें या सर्वांचें सार आहे. जीवभावाचें बलिदान करणाऱ्या अश्वत्थाम्याच्या पुढील पांचाली। अगर पांडव यांचे पुत्र म्हणजे ज्ञानेंद्रियांचे भौतिक विषय शिवकृपेनें नाहींसे होतात व तो निवृत्तकाम अश्वत्थामा साधक याच लोकीं अमृतत्वाला प्राप्त होतो.

प्रिन्सिपॉल यडाणी यांच्या दार्शनिक उपपत्तीप्रमाणें (१) प्रकृति हीच कर्त्री आहे, (२) प्रकृति जड आहे, ती कर्त्री नव्हेच. पुरुषच कर्ता आहे, आणि (३) पुरुष प्रकृतीच्या ठिकाणीं कर्तेपण देतो अथवा पुरुषामुळें प्रकृतीकडे कर्तेपण येतें, असे तत्त्वज्ञानाचे मुख्य उत्तरोत्तर श्रेष्ठ असे तीन दार्शनिक पंथ आहेत. अर्थात् (१) कावळे प्रकृतिनिष्ठ म्हणून, (२) पांचालीचे पुत्रादिवीर अर्जुन आत्मा व कृष्ण ईश्वर हे तेथें नसल्यामुळें, (३) तसेंच उत्तरा ही स्त्री केवळ प्रकृति मानल्यामुळें, कावळे, पांचालवीर व परीक्षिति हे सर्व जडप्रकृतिनिष्ठ मृत ठरले. पण वेन्दातमताप्रमाणें ईश्वर प्रकृतीस कर्तेंपण देतो म्हणून उत्तरेचा गर्भ ईश्वराच्या कृपेक्षणेनें परीक्षितिरूपांत जिवंत झाला, ईश्वरानें (शिवाचें) प्रकृतिरूप लिंग ईश्वररूप मानल्यामुळें उपासनीय

Self) has been obtained for the purpose of (spiritual) issue (thinking that otherwise) the people might rotate like the plants forever.)— 'Indo-Aryan Mythology', Vol. I, p. 511).

ठरलें, तसेंच ईश्वरार्पणबुद्धीनें होणारे यज्ञ ( अ. १८ ) जगच्छातील कारण झाले, असें सौप्तिकपर्वाचें रहस्य दिसतें. या उपपत्तींत सौप्तिकपर्वातील सुचड व अश्वत्थामा ( आरमी ) तत्त्वज्ञानाच्या दुसऱ्या वर्गात येतात.

कोणी अशी कल्पना करतात कीं, पितामहाचा पहिला ज्ञानस्वरूप पुत्र शिव म्हणजे अद्वैत व द्वितीय पुत्र प्रजापति म्हणजे द्वैतप्रवृत्ति होय जन्मपरंपरा व प्रजावृद्धि हा द्वैताचा पसारा आहे त्यात 'जीवो जीवस्य जीवनम्' हा न्याय सुरू झाला शिवाच्या तपाचें फळ अद्वैत आहे. जन्मपरंपरेंत पडलेल्या द्वैती जगाला तें काय कामाचें ? म्हणून शिवानें तें पुरून ठेवलें, म्हणजे अंतर्यामी रूपानें बुद्धींत गूढ ठेवलें शिवानें जीवाकरिता जें अन्न निर्माण केलें तें ब्रह्मान्न होय. अन्न ब्रह्म समश्नुते। कठ २।३।१४, बृ ४।४।७ पुरुष या शब्दाचा अर्थ भोक्ता व भोग्य अन्न असा उभयविध होतो[१] तात्पर्य, इतकेंच कीं, सुज्ञांनीं या गूढ व संदिग्ध आख्यायिकेचा अर्थ असा लावण्याचा प्रयत्न करावा कीं, जो श्रुतिशास्त्रसमत व अध्यात्माला उपोद्बलक होईल.

सौप्तिकपर्वाची पार्श्वभूमि लक्षात घेता या आख्यायिकेंत अन्य निंद्यभाव संभवत नाहीं. अश्लील कथा निर्माण करण्याचा पुराणाचा हेतुच संभवत नाहीं; मग त्याची परोक्ष भाषा कशीहि असो, हें मुख्य धोरण लक्षात ठेवलेंच पाहिजे.

---

१ What then is the food got by his ( Mahadeva's ) tapas He Himself. His going into the waters indicates that he is Narayan in the deep depth of man's heart and from that depth He reveals Himself to the knower as his spiritual food. The knower's enjoying Brahman is called his eating Brahma +++ We have seen that Agni Rudra is identical with Bhargas ++ and according to the Gopatha Brahman, sages say that the Bhargas is food +++ *puru* or *pur*, much or full, and *asa*, eating, ( thus ) the Purusha would be Abundant food ( Indo-Aryan Mythology, Vol. I, p. 510. )

(३) आता तिसरें आख्यान व त्या आख्यानाचा खुलासा विस्तारभयास्तव थोडक्यातच सागतों समुद्रमथनानतर अमृतप्राप्तीकरिता देवासुरात भाडण सुरू झालें तेव्हा असुराना फसविण्याकरिता विष्णूनें मोहिनीचें रूप धारण केलें, तें पाहून शिव मोहित होऊन तिच्यामागें लागले तेव्हा तिनें शिवास तू नपुसक होशील, असा शाप दिला त्याचा शिवास राग आला. असें पाहून त्याच्या लिंगाची पूजा करण्याचें देवानें कबूल केलें. या कथेंत लिंग शब्दाचा जघन्य अर्थ भासत असला, तरी तो व्यर्थ आहे कारण विष्णु आणि शिव या प्रमुख देवाच्या ठिकाणीं असें अज्ञान, कामासक्ति व बाष्कळपणा आरोपित करणें अत्यत असबद्ध दिसतें या परोक्ष कथेंत विष्णुमायेच्या अनिवार मोहक सामर्थ्याचें वर्णन केलें आहे जगन्निर्मितीकडे पाहून शिवरूप परब्रह्म विष्णुरूप मायेनें आकृष्ट केलें म्हणूनच तें पदार्थमानात अनुप्रविष्ट झालें असलें पाहिजे, असें सामान्य जनास सहजच भासतें तेव्हा तेंच यातील परोक्ष वर्णन होय पण त्याच मायेनें ब्रह्म हें नपुसकलिंगी आहे, असें अनुभविलें आहे म्हणूनच नि सग ब्रह्माचा मायेशीं सबध वस्तुत कधींच घडत नाहीं. यामुळें असें जें नि सग अनासक्त निवृत्तिप्रधान शिवलिंग तेंच उपासनीय ठरतें हेंच या कथेंतील सार दिसतें 'भर्गस्', 'हरस्' हीं शिवाचीं मूळचीं नावें नपुसकलिंगीच आहेत तीं पुढें भर्ग, हर, अशीं पुल्लिंगी बनलीं कारण तो मायिक महेश्वर बनला

(४) आता चौथी कथा पाहू– काहीं याज्ञिकानीं शिवावर दुष्ट कामनेनें अभिचार प्रयोग केले. ते त्याच्यावरच उलटले तेव्हा त्यानीं आत्महिताकरिता निर्गुण व अरूप अशा शिवलिंगोपासनेला निष्कामतेनें आरभ केला यात सकाम, सगुणोपासनेचा पराभव व निष्काम, निर्गुणोपासनेचा विजय सूचित केला आहे इतकेंच समजावें.

(५) आता पाचवा मुद्दा पहा—एकदा भृगु शिवाच्या भेटीस गेले होते. तेव्हा शिवपार्वती दीर्घकाल क्रीडासक्त असल्यामुळें भृगूची खोटी झाली तेव्हा भृगूला राग येऊन त्यानें शाप दिला कीं, तू सयोनिलिंगरूपातच पूजला जाशील म्हणून शिवाची लिंगरूपात पूजा सुरू झाली या कथेचें रहस्य दोन तऱ्हेनें सागता येईल एक तर भृगूचा शाप हा वस्तुत शापच नव्हे ती सगुणोपासनेची वस्तुस्थिति आहे अभिन्न

निमित्तोपादानकारणरूप शिवाचें लिंग म्हणजे अविनाभूत शिवशक्तीचेंच प्रतीक होय. त्या दिव्य प्रतीकाची सयोनिलिंग ही एक फटकळ व भौतिक परिभाषा ठरली आहे, इतकेंच. " मायिनं तु महेश्वरम्। " (श्वे. उप. ४।१०) हेंच सगुण शिवाचें रूप आहे. शिवलिंग हें त्याचेंच प्रतीक होय.

यासंबधीं पद्मपुराणांतील महत्त्वाचें वचन असें आहे:—" लिंगे संपूजनं मुख्यमलाभे प्रतिमादिषु।" या वचनाचा विचार मागें द्रोणपर्वांतील अ. २०१ यांतील वचनानुसार पूर्वींच केला आहे. प्रतिमापूजा ही परिच्छिन्नरूपाची उपासना आहे. अरूप शिवलिंगोपासनेंत सर्वात्मभाव आहे. अशा रीतिनें भृगूचा शाप प्रच्छन्नवररूपच ठरतो.

तथापि येथें शिवनिंदाच गर्भित आहे असें मानलें, तर त्यासंबंधींहि एक-दोन मुद्दे चिंतनीय आहेत. ते असे कीं, पद्मपुराणासारख्या वैष्णवपुराणांत विष्णूच्या अनन्यसाधारण गुणगौरवासाठीं शिवाची केलेली निंदा हा निंदाभास असणेंहि शक्य आहे. तसेंच विरोधी भक्तानें केलेली देवाची निंदा म्हणजे निंदामिषानें त्याची आसक्तिच असते. आतां आणखी एक रहस्य लक्षांत घ्यावें कीं, वैदिक संस्कृतीचे वरुणसंस्कृति व इंद्रसंस्कृति असे दोन भेद आहेत. पैकीं शिव हे इंद्रसंस्कृतींतील उपास्य आहे. वरुणसंस्कृति ही असुरांनीं पत्करली व इन्द्रसंस्कृति ही देवांची झाली. भृगु, शुक्राचार्य हे सारे वरुणसंस्कृतीतील होत. म्हणूनच शुक्राचार्य हे असुरांचे गुरु सुरासक्त झाले. त्यांनीं आपल्या देवयानीचा विवाह प्रतिलोमपद्धतीनें क्षत्रियाशीं केला. परशुरामानें ब्राह्मण असून क्षात्रकर्म केलें. रामाशीं विरोध केला. आणि म्हणून वरुणसंस्कृतीच्या भृगूनें विष्णूला लाथ मारली. दक्षयज्ञांत शिवाची निंदा केली, दारुकवनाच्या कथेंत शिवाला शाप दिला व त्याच भृगूनें सयोनिलिंगरूपांत तुझी पूजा होईल असा दर्शनी शाप शिवास दिला. हा एक विरोधभक्तीचा अथवा व्याजस्तुतीचा प्रकार आहे. यांत अश्लीलतेस पोषक असें कांहींच नाहीं. कारण भागवतांत भृगूनें शिवस्तुति केलेली आढळतेच.

महाभारत अनुशासनपर्वांतील अ. १४ मधील उपमन्यूच्या कथेंत शिवाचा व शिवलिंगाचा महिमा वर्णन करतांना उपमन्यु " लिङ्गांकं च भगांकं च तस्मान्माहेश्वरी प्रजा॥ " असें प्रतिपादन करतो. त्यांतहि अभिन्न निमित्तोपादानरूप जें जगाचें आदिकारण तें उपलक्षणानें भगलिंगचिन्हानें

सर्व प्रजेंत व्याप्त असलेलें दिसत आहे व त्याचेंच शिवलिंग हें भौतिक प्रतीक आहे असें सांगतो. वस्तुतः पुरुषप्रकृतींत किंवा सयोनिलिंगांत शिवच व्याप्त आहे.

> यच्च स्वभावं पचति विश्वयोनिः ।
>
> —श्वे. ५।९
>
> स्त्रीलिंगमखिलं देवी प्रकृतिर्मम देहजा ॥ ३ ॥
>
> पुल्लिंगपुरुषो विप्रा मम देहसमुद्भवः
> उमाभ्यामेव वै सृष्टिर्मम विप्रा न संशयः ॥ ४ ॥'
>
> —लिं. पु., पू. अ. ३३

शिवाहून अन्यशी भासणारी प्रकृति अथवा माया ही परमार्थतः शिवाहून पृथक् नाहींच. मूळ मिथुनच नाहीं मग मैथुन कोणाचें ?

( ६ ) ' फॅलिक मिसलिनी ' पृ. ३९ वर एक अशी आख्यायिका आढळते कीं, प्रलयाच्या वेळीं सर्व वस्तु आकाशांत लीन झाल्या. एक लिंग मात्र उरलें. म्हणून तें ( प्राक्कर्मबीजरूप ) कारणलिंग पूजनीय ठरलें.

शिवलिंगपूजा कशी रूढ झाली यासंबंधीं वरील आख्यायिकांशिवाय अधिकाधिक लोकोत्तर कथाभाग आपल्या पुराणांत व श्रुतिशास्त्रांत वर्णिलेले आहेत. त्यांतील कांहीं भाग लैंगिक आक्षेपाला उत्तरादाखलहि होतील, म्हणून ते थोडक्यांत सांगतों.

सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी एक समय असा होता कीं, ज्या वेळीं सत्, असत्, स्थूल-सूक्ष्म, आकाश-पृथ्वी, कांहींच नव्हतें. त्यांतूनच विद्युत्प्रमाणें एक ज्योतिर्लिंग उत्पन्न झालें. तें क्षयवृद्धिविरहित, अवर्णनीय व अनाद्यनंत होतें. तें दिव्य अंड सहस्रमार्तंडांप्रमाणें द्युतिमान होतें. त्याच ज्ञानविज्ञान देणाऱ्या सत्यज्ञानानन्तरूप प्रकाशलिंगाचेंच पुढें योगी लोक ध्यान करीत. त्याच ज्योतिर्मय शिवाच्या ठिकाणीं पुढें इच्छा, क्रिया, शक्ति प्रकट झाली. तिलाच प्रकृति, शक्ति किंवा माया म्हणतात. या शिवशक्तींच्या मेलनालाच शिवलिंग म्हणतात. या मेलनांतूनच हें विश्व उत्पन्न झालें. मूळ अव्यक्त व अविनाशी परब्रह्मात विनाशी दृश्यसृष्टीचा हा पहिला संबंध होय. वस्तुतः निरंजन, निराकार, निरवयव शिवच लिंगरूप आहे. लिंग हा त्याचा

अवयव नव्हे. किंवा असें म्हणावें कीं, लिंग म्हणजे अज्ञात वस्तूचें ज्ञापक चिन्ह होय. म्हणजे तत्त्वतः महेश्वर ज्योतिर्लिंग हें ज्ञापक आहे, ज्ञेय नव्हे. शिवतत्त्व स्वयंप्रकाश आहे. (शिव एव स्वयंलिङ्गं लिङ्गं गमकमेव च। शिवेन गम्यते सर्वं शिवो नान्येन गम्यते॥ (ऋग्वेद १०।१२९, ६।९; मनू, १।५) असेंहि म्हटलेलें आढळतें कीं, ज्या वेळीं पचमहाभूतें उत्पन्न झालीं नव्हतीं, तेव्हांच उत्पन्न झालेलें ब्रह्मांड तेंच ज्योतिर्लिंग होय. त्याचा आदि-अंत देवाना लागेना. तेव्हांपासून देवांकडून लिंगपूजा सुरूच आहे. ज्योतिर्लिंग हें अग्नीचें किंवा तेजाचें चिन्ह वर्णिलेलें आढळतें. तेजांतूनच सृष्टि निर्माण झाली हें प्रसिद्धच आहे ह्या ज्योतिर्लिंगांतून एक पुरुष प्रकट झाला असेंहि सगुण-निर्गुण वर्णन पुराणांतरीं आढळतें. ("तत्तेजोऽसृजत।" छां. उप ६।२।३ पहा. लिं. पु. १।१७; शि. पु. हिंदी, नंदकिशोर प्रेस, पृ. ६०३)

ह्याच रहस्यभाग एक-दोन कथांत व्यक्त झालेला आहे. मागें एकदां देवासुरांचा मोठा संग्राम झाला. त्यांत महेश्वराच्या इच्छामात्रेंकरून देवास जय प्राप्त झाला असतां तो आमच्याच पराक्रमानें झाला, असा देवास गर्व झाला. तो त्यांचा मिथ्याप्रत्ययरूप अभिमान दूर करण्याकरिता महेश्वर आपल्या मायासंज्ञक शक्तीच्या योगानें त्या देवांच्या समोर एका अत्यंत उज्ज्वल विशेषरूपानें प्रादुर्भूत झाले. (केन-शांकरभाष्य ३।२।१५) पण त्याना प्रत्यक्ष पाहणारेहि देव तें काय आहे, हें जाणण्यास समर्थ झाले नाहींत. इतकेंच नव्हे तर त्यांच्यापुढें टाकलेली एक गवताची काडीहि त्या अग्नि–वायु देवांस जाळतां येईना किंवा हालवेना. तेव्हां इन्द्र पुढें गेला असता तें महेश्वर तत्त्व त्यास दिसेचना. याप्रमाणें हतगर्व झालेल्या त्या देवांपुढें सत्त्वप्रधान शक्ति अथवा ब्रह्मविद्यारूप हैमवती उमा तेथें प्रकट झाली व तिनें त्या सर्वशक्तिमान् महेश्वरलिंगाचें माहात्म्य सांगितलें. विजेप्रमाणें दिपविणारें हें त्याचें ज्योतिर्लिंग होय. हें त्याचें आधिदैव उपासन होय. मनाला अथवा मीपणाला आधार असलेलें जें कूटस्थ आत्मलिंग तेंच शिवब्रह्म होय, हें त्याचें अध्यात्म उपासन होय. अर्थात् स्थूल, द्रव्यात्मक शिवलिंग हें भौतिक उपासन त्याच ब्रह्माचें ठरतें. (केन उपनिषद् ३।४)

याच कथेसारखी कथा शिवपुराण (८।५।९), स्कंदपुराण—माहेश्वर खंड, लिंगपुराण अ. १७ ते २४ इत्यादि पुराणांतून आढळते. या कथेंत अति-

प्राचीन काळीं देवांत श्रेष्ठ कोण? ब्रह्मदेव कीं विष्णु? असा वाद उपस्थित झाला असतां त्यांच्यापुढें एक ज्योतिर्लिंग निर्माण झालें. त्याचा जो आदि व अंत शोधील तो श्रेष्ठ असें ठरून ब्रह्मदेव वरतीं व विष्णु खालीं पाताळांत शोधण्यास गेले. पण कोणास त्या लिंगाचा आदि-अंत लागेना. तेव्हां ते दोघे त्या ज्योतिर्लिंगास शरण गेले. या वादांत ब्रह्मदेवास ज्योतिर्लिंगाचा अंत लागला अशी सुरभीनें ब्रह्मदेवाच्या भिडेस्तव खोटीच साक्ष दिली होती. पण ती साक्ष खोटी असल्याची आकाशवाणी झाली. तेव्हां तिनें पण त्या ज्योतिर्लिंगाची क्षमा मागितली व मीं शिवलिंगावर दुग्धाभिषेक करीन असें वचन दिलें. तें तिनें उदेपूरचा एकलिंगजी, राजापूरचा श्रीधूतपापेश्वर, व दक्षिणेंतील मल्लिकार्जुन या शिवलिंगांवर दुग्धाभिषेक करून पुरें केलें. या कथेंत केनोपनिषदांतील अग्नि, वायु व इंद्र यांच्या ठिकाणीं ब्रह्मदेव व विष्णु हे दोघे श्रेष्ठ देव पराभूत झाल्याचें वर्णिलें आहे आणि या महाशिवरात्रीच्या दिवसापासून शिवलिंगपूजा सुरू झाल्याचें सांगितलें आहे. या आख्यानांत शिवमहापुराण व लिंगपुराण यांत शिवानें आपलें विराट् ज्योतिर्लिंग ब्रह्मा आणि विष्णु यांस दाखविलें असें वर्णन आहे. त्या ज्योतिर्लिंगाच्या वर्णनांत तें प्रणवरूप, तसेंच सर्ववर्णात्मक दिसूं लागलें, असें म्हटलें आहे. त्या लिंगाच्या उजव्या बाजूस सनातन आद्य वर्ण 'अ' (बीज, ब्रह्मा, सूर्य), डाव्या बाजूस 'उ' (योनि, विष्णु, अग्नि) व मध्यें 'म' (बीजी, चंद्रमा, नीललोहित भगवान्) मिळून ओम् असें महेश्वराचें रूप प्रकट झालें. त्या ठिकाणीं अ ते क्ष हे सर्व वर्ण निरनिराळ्या अवयवांच्या द्वारां व्यक्त झाले. त्यांत 'अ' हें शिर 'ह' हें आत्मरूप व 'क्ष' हें क्रोधरूप होय. तसेंच त्या ॐकाररूपापासून (१) सद्योजात प्रपद्यामि॰। (२) तत्पुरुषाय विद्महे॰ (३) अघोरेभ्योथ घोरेभ्यो॰ (४) ईशान सर्वविद्यानां॰ (५) वामदेवाय नमो॰ असे पांच मंत्र निर्माण झाले. तात्पर्य, तें महालिंग ब्रह्मांडव्यापी होतें असेंच रहस्य आहे. (लिं. पु. पू. अ॰ १७-१९; शिवपुराण, नंदकिशोर प्रेस, खंड १ अ॰ ४-८; वायुपुराण अ॰ ५५. शि. म. पु. वायवीय संहिता, उत्तरभाग अ॰ ३५ श्लो. सं. ९।१५, १६).

दक्षिणेंतील सुप्रसिद्ध शैव संतकवि तिरुमूलर यांनीं आपल्या 'तिरुमंदिर' या ग्रंथांत या आख्यायिकेचा असा अर्थ केला आहे कीं, या ज्योतिर्लिंगाचें

वरचें टोंक म्हणजे शिवज्ञान व खालचें टोंक म्हणजे शिवकृपा होय (श्लोक २४२९.)

या अनेक कथाभेदांमुळें शिवलिंगपूजा खरोखर केव्हां व कशी सुरू झाली, हें अनिश्चितच राहतें, असें कोणाला वाटेल व त्या दृष्टीनें या कथांत एक प्रकारचा विरोध किंवा विसंगतिहि मासेल. त्याचा खुलासा असा आहे कीं, शिवलीलामृतांतील शिवरात्रमाहात्म्याच्या व्याधाच्या कथेंत हें दिसून येतें कीं, शिवरात्रमाहात्म्य त्या कथेच्याहि पूर्वीपासून होतेंच. त्याप्रमाणें शिवलिंगपूजा ही अनादिकालापासून सुरूच आहे असें समजावें. (अथर्ववेद, का. ११, अ. १, सू ३, मं. १८; ऋ. ६।५।८।८. अथ प्रत्यावतारस्य शिवस्योपासनं श्रुतौ। प्रोक्तं तस्य निरासो नो कर्तुं केनापि शक्यते ॥ शंकराचार्य)

गौतम बुद्धानें पूर्वीपासूनच चालत आलेल्या बुद्धधर्माला व बसवाचार्यानें पूर्वींच सुरू असलेल्या वीरशैव धर्माला चालना दिली. त्याचप्रमाणें या कथा शिवलिंगोपासनेच्या पुनरुद्धारपर समजाव्या.

याप्रमाणें आक्षेपकांनीं दिलेला आपल्या पुराणांचा अति महत्त्वाचा लेखी पुरावा आक्षेपकांच्या उपयोगी पडत नाहीं. त्यांत ग्राम्य व अश्लील भावनास थारा मिळत नाहीं हें कोणासहि कबूल करावें लागेल ('सीक्रेट डॉक्ट्रीन्स' ५।१९२). शिवासंबंधीं खरोखर ग्राम्य आणि अश्लील असें भगवान् व्यासांनीं कांहींच लिहिणें शक्य नाहीं, आणि फार थोरामोठ्या शिवोपासकांच्या अनादि परंपरेंत तें टिकूनहि राहणार नाहीं. वास्तव "परोक्षप्रिया इव हि देवाः।" या सिद्धान्ताप्रमाणें साऱ्या शिवकथा लाक्षणिक म्हणजेच परोक्ष आहेत. त्या प्रत्यक्ष नव्हत, हेंच सत्य होय.

शिव आणि शिवलिंग यांसबधीं वाङ्मय वाचीत असतां पुढील सूचना लक्षांत घेणें फारच अगत्याचें वाटतें—

(१) गूढ गोष्टींच्या खुलाशाकरितां सामान्यतः अज्ञ जनांना उद्देशून एखादें आख्यान सांगितलें जातें. हें अज्ञांच्या समजुतीकरितां सांगितलेलें आख्यान पुष्कळ वेळां भूतार्थवाद अथवा सत्यकथा नसून अद्भुतरस आणि अतिशयोक्ति यानीं रंगविलेलें तें एक रूपक किंवा काल्पनिक वर्णन लौकिक मार्गेत केलेलें असतें. यास्तव त्यांतील रहस्य ग्रहण करतांना त्यांतील बराच तपशिलाचा भाग बाद करावा लागतो.

(२) ईश्वर हें समष्टिस्वरूप असल्यामुळें ईश्वर हा विरोधी धर्माश्रय असतो.

(३) 'अघटित घटना परीयसी माया' असें मायाशक्तीचें रूप असल्यामुळें 'असें कां?' या प्रश्नाला फारसें महत्त्व राहत नाहीं. मायेंत सर्व कांहीं शक्य असतें आणि तत्त्वतः सारेंच मिथ्या असतें. essentially non-existent cf. Buddhism

(४) उत्पत्ति-स्थिति-लय हे तीन विलक्षण भाव जसे जगत्कारणरूप शिवाच्या ठिकाणीं असतात, त्याचप्रमाणें शिवाचें जगद्गुरु योगी हें स्वरूप फार महत्त्वाचें आहे. या जगद्गुरुपदाच्या ठिकाणीं विवेकप्रलय, तीव्र वैराग्य, निर्भयता, दिगंबरता, मंगलामंगलसाम्यबुद्धि, पशुभावाची किंवा त्याज्य वस्तूंची हिंसा किंवा त्यावर आरोहण, अथवा त्यावर स्वामित्व, विदेहस्थिति, स्वैराचार, उन्मत्तावस्था, सत्त्वपरीक्षा इत्यादि कित्येक प्रकार व्यावहारिक लोकरीतीस सोडून असतात.

(५) दक्ष, भृगु, विष्णु, इन्द्र, इत्यादि जे शिवरुद्राचे प्रतिस्पर्धी किंवा निंदक म्हणून परोक्षतेनें कोठें कोठें वर्णिलेले असतात, ते सारे वस्तुतः शिवभक्त व शिवरूप होत. त्यांच्या साऱ्या कथा लाक्षणिक व गूढ असतात.

(६) महाभारत, भागवत, विष्णुपुराण अशा कांहीं ग्रंथांत कोठें कचित् शिव व शैव यांची निंदा आढळली तरी ती परोक्षस्तुतिच असते. निदान ती निंदेकरितां निंदा केलेली नसून अन्य देवतांचें माहात्म्य वर्णन करण्या-करितां तात्पुरती प्रवर्तित झालेली असते. ही गोष्ट त्याच ग्रंथांत अन्यत्र केलेल्या शिवस्तुतीवरूनहि कधीं कधीं उघड होते. तात्पर्य, समन्वय हीच खरी रहस्यदृष्टि होय.

(७) असेंहि कोणी संशोधक म्हणतात कीं, आपल्या पुराणांत जैनांनीं मुद्दाम आपल्या देवतांबद्दल अनादार वाटावा असा भाग प्रक्षिप्त केला आहे व आपल्या प्राचीन ग्रंथांच्या संग्रहांत अशा प्रक्षिप्त भागाचे ग्रंथ आपल्या संग्रहांत आले आहेत.

(८) आध्यात्मिक विषय अमूर्त असतो व आधिदैविक विषयहि अदृश्य व गूढ असतो, असें असतां आपल्या समजुतीकरितां अशा विषयांचें बाह्य दृष्टीनें केलेलें लौकिक भाषेंतील वर्णन किंवा समाधिभाषेंत केलेलें गूढ वर्णन अक्षरशः जसेंच्या तसेंच घेतां येत नाहीं. गूढार्थाच्या संकेतापुरतें तें

वर्णन असतें. म्हणून तेथील सांकेतिक शब्द व दृष्टान्त सोडून रहस्यच ग्रहण करावयाचें असतें.

( ९ ) आणखी एक मुद्दा असा आहे कीं, ज्या शिवलिंगोपासनेचें अधिष्ठान सामान्यतः अज्ञात ब्रह्म आहे व त्याची फलश्रुति अदृष्ट मुक्ति अथवा शिवसायुज्य ही आहे, त्यासंबंधीं केवळ तार्किकांच्या आशंकांना व अनुमानांना शिवभक्तांच्या साक्षात् दिव्य प्रत्ययांपुढें कांहींच किंमत देतां येत नाहीं. इतकेंच नव्हे तर पुराणांच्या प्राचीन टीकांपेक्षांहि साक्षात्कारी शिवभक्तांचे अनुभव यांचें प्रामाण्य श्रेष्ठ मानावें लागतें.

( १० ) अखिल जगत्कार्याचें अभिन्न निमित्तोपादानकारणरूप शिवशक्ति हें निर्द्वंद्व अखिल सृष्टपदार्थांत नित्य विद्यमान अथवा व्याप्त असल्यामुळें कोणत्याहि पदार्थांत किंवा त्याच्या निर्मितीच्या प्रक्रियेंत त्यांचा सत्यानृत मैथुनभावाभास असणारच. त्यांत तत्त्वतः मनाला लज्जा वाटण्याचा विषय, *मानवाचें शिवशक्तिस्वरूपाविषयीं अज्ञान अथवा ब्रह्मात्मस्वरूपाज्ञान* हा होय. तेथें अश्लीलता हें लज्जेचें कारण नसतेंच.

( ११ ) शिवमहापुराणाच्या विद्येश्वरसंहितेंतील बिंदुनादात्मक शिवलिंगाचें तात्त्विक वर्णन पहावें.

( १२ ) प्रख्यात शैव तत्त्वज्ञ तिरुमुलर यांनीं शैवपुराणांतील कांहीं शिवकथांचा अर्थ अध्यात्मपर लावला आहे. उदाहरणार्थ, *शिवाचें त्रिपुरदहन* म्हणजे तीन मल आणि तीन अशुद्ध तत्त्वांचा निरास होय. अगस्त्य ऋषींनीं शिवाज्ञेनें दक्षिणेंत जाऊन पृथ्वीचा तोल संभाळला, या कथेचा *अर्थ अगस्त्य ऋषींनीं संतोष किंवा शांतता प्रस्थापित केली.* येथें अगस्त्य याचा अर्थ मूलाधारचक्रापासून सहस्रारपर्यंत जाणारा कुंडलिनी शक्तीचा प्रभाव किंवा प्रकाश होय, असाहि त्यांनीं अर्थ केला आहे. शिवाचें विषप्राशन याचा अर्थ विश्वग्रास असा ते करतात. नंदी हें परात्पर शिवाचें रूप असून त्याच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांडाची धारणा आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. ते आणखी म्हणतात कीं, देवांनीं महादेवास प्रार्थना केली कीं, त्यांनीं विष कंठाखालीं जाऊं देऊं नये. कारण तसें झालें तर शिवाचें सगुण रूप नाहींसें होईल, म्हणजे विश्वाचाच अंत होईल.

शिवाच्या नटराजमूर्तीच्या हातीं जीं आयुधें दिलेलीं आढळतात, त्यांतील गूढभावहि तिरुमूलरनीसां गितला आहे. उदाहरणार्थ, मृग म्हणजे अशुद्ध माया, खड्ग म्हणजे ज्ञान, सर्प म्हणजे जीवात्मा, डमरू म्हणजे सृष्टि, अभयकर म्हणजे स्थिति, परशु म्हणजे संहारकार्य, नटराजाचा खालचा पाय म्हणजे तिरोभाव आणि वर उचललेला पाय म्हणजे अनुग्रह. याप्रमाणेंच नटराजाच्या नृत्यांतील सृष्टि, स्थिति, संहार, तिरोभाव आणि अनुग्रह असे भावहि त्यांनीं सांगितले आहेत. तिरुमूलर यांची ही विधायक रहस्यदृष्टि जर सुदैवानें आधुनिकांना प्राप्त झाली तर अलौकिक व असंबद्ध वाटणाऱ्या कित्येक शिवाच्या व शिवभक्तांच्या कथांचा योग्य रहस्यपूर्ण उलगडा लक्षणेनें करता येईल. उदाहरणार्थ, शिवलीलांपैकीं व्याधाची महाशिवरात्रीची कथा ही आकाशांतील नक्षत्रपर लावतां येईल. श्रियाळाची आपल्या पुत्राचें बलिदान केल्याची कथा पुरुषसूक्तांतील पुरुषयज्ञाच्या रहस्याप्रमाणें अध्यात्मपर लावतां येईल. तसेंच दाक्षिणेंतील त्रेसष्ठ नयनारांच्या अत्यंत त्रोटक चरित्रांवरून आपणांला त्यांच्या खऱ्या चारित्र्याची कल्पना करतां येत नाहीं; पण तिरुमूलरसारख्या महान् तत्त्वज्ञानें सुद्धां त्यांचें माहात्म्य मुक्तकंठानें वर्णिलें आहे, तें प्रमाण मानणें भागच आहे. 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।' हें भक्तीचें मूलग्राही तत्त्व नयनारांमध्यें पुरें बाणलें होतें असें दिसतें.

> तव तत्त्वं न जानामि कीदृशोऽसि महेश्वर।
> यादृशोऽसि महादेव तादृशाय नमो नमः ॥ ४२ ॥
>
> —शिवमहिम्न.

---

वर्णन असतें. म्हणून तेथील सांकेतिक शब्द व दृष्टान्त सोडून रहस्यच ग्रहण करावयाचें असतें.

( ९ ) आणखी एक मुद्दा असा आहे कीं, ज्या शिवलिंगोपासनेचें अधिष्ठान सामान्यतः अज्ञात ब्रह्म आहे व त्याची फलश्रुति अदृष्ट मुक्ति अथवा शिवसायुज्य ही आहे, त्यासंबंधीं केवळ तार्किकांच्या आशंकांना व अनुमानांना शिवभक्तांच्या साक्षात् दिव्य प्रत्ययांपुढें कांहींच किंमत देतां येत नाहीं. इतकेंच नव्हे तर पुराणांच्या प्राचीन टीकांपेक्षांहि साक्षात्कारी शिवभक्तांचे अनुभव यांचें प्रामाण्य श्रेष्ठ मानावें लागतें.

( १० ) अखिल जगत्कार्याचें अभिन्न निमित्तोपादानकारणरूप शिवशक्ति हें निर्द्वंद्व अखिल सृष्टपदार्थांत नित्य विद्यमान अथवा व्याप्त असल्यामुळें कोणत्याहि पदार्थांत किंवा त्याच्या निर्मितीच्या प्रक्रियेंत त्यांचा सत्यानृत मैथुनभावाभास असणारच. त्यांत तत्त्वतः मनाला लज्जा वाटण्याचा विषय, मानवाचें शिवशक्तिस्वरूपाविषयीं अज्ञान अथवा ब्रह्मात्मस्वरूपाज्ञान हा होय. तेथें अश्लीलता हें लज्जेचें कारण नसतेंच.

( ११ ) शिवमहापुराणाच्या विद्येश्वरसंहितेंतील बिंदुनादात्मक शिवलिंगाचें तात्त्विक वर्णन पाहावें.

( १२ ) प्रख्यात शैव तत्त्वज्ञ तिरुमुलर यांनीं शैवपुराणांतील कांहीं शिवकथांचा अर्थ अध्यात्मपर लावला आहे. उदाहरणार्थ, शिवाचें त्रिपुरदहन म्हणजे तीन मल आणि तीन अशुद्ध तत्त्वांचा निरास होय. अगस्त्य ऋषींनीं शिवाज्ञेनें दक्षिणेंत जाऊन पृथ्वीचा तोल संभाळला, या कथेचा अर्थ अगस्त्य ऋषींनीं संतोष किंवा शांतता प्रस्थापित केली. येथें अगस्त्य याचा अर्थ मूलाधारचक्रापासून सहस्रारपर्यंत जाणारा कुंडलिनी शक्तीचा प्रभाव किंवा प्रकाश होय, असाहि त्यांनीं अर्थ केला आहे. शिवाचें विषप्राशन याचा अर्थ विश्वग्रास असा ते करतात. नंदी हें परात्पर शिवाचें रूप असून त्याच्या ठिकाणीं सर्व ब्रह्मांडाची धारणा आहे, असें त्यांचें म्हणणें आहे. ते आणखी म्हणतात कीं, देवांनीं महादेवास प्रार्थना केली कीं, त्यांनीं विष कंठाखालीं जाऊं देऊं नये. कारण तसें झालें तर शिवाचें सगुण रूप नाहींसें होईल, म्हणजे विश्वाचाच अंत होईल.

शिवाच्या नटराजमूर्तीच्या हातीं जीं आयुधें दिलेलीं आढळतात, त्यांतील गूढभावहि तिरुमूलरनीं सांगितला आहे. उदाहरणार्थ, मृग म्हणजे अशुद्ध माया, खड्ग म्हणजे ज्ञान, सर्प म्हणजे जीवात्मा, डमरू म्हणजे सृष्टि, अभयकर म्हणजे स्थिति, परशु म्हणजे संहारकार्य, नटराजाचा खालचा पाय म्हणजे तिरोभाव आणि वर उचललेला पाय म्हणजे अनुग्रह. याप्रमाणेंच नटराजाच्या नृत्यांतील सृष्टि, स्थिति, संहार, तिरोभाव आणि अनुग्रह असे भावहि त्यांनीं सांगितले आहेत. तिरुमूलर यांची ही विधायक रहस्यदृष्टि जर सुदैवानें आधुनिकांना प्राप्त झाली तर अलौकिक व असंबद्ध वाटणाऱ्या कित्येक शिवाच्या व शिवभक्तांच्या कथांचा योग्य रहस्यपूर्ण उलगडा लक्षणेनें करता येईल. उदाहरणार्थ, शिवलीलांपैकीं व्याधाची महाशिवरात्रीची कथा ही आकाशांतील नक्षत्रपर लावतां येईल. श्रियाळाची आपल्या पुत्राचें बलिदान केल्याची कथा पुरुषसूक्तांतील पुरुषयज्ञाच्या रहस्याप्रमाणें अध्यात्मपर लावतां येईल. तसेंच दाक्षिणेंतील त्रेसष्ट नयनारांच्या अत्यंत त्रोटक चरित्रांवरून आपणांला त्यांच्या खऱ्या चारित्र्याची कल्पना करतां येत नाहीं; पण तिरुमूलरसारख्या महान् तत्त्वज्ञानें सुद्धां त्यांचें माहात्म्य मुक्तकंठानें वर्णिलें आहे, तें प्रमाण मानणें भागच आहे. 'सर्वधर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।' हें भक्तीचें मूलग्राही तत्त्व नयनारांमध्यें पुरें चाणलें होतें असें दिसतें.

तव तत्त्वं न जानामि कीदृशोऽसि महेश्वर।
यादृशोऽसि महादेव तादृशाय नमो नमः॥४२॥

—शिवमहिम्न.

---

प्रकरण ९ वें

# शिवपंचायतन, वेशभूषा आणि परिवार



स्मशानेष्वाक्रीडा स्मरहर पिशाचाः सहचरा-
श्चिता भस्मालेपः स्रगपि नृकरोटी परिकरः।
अमंगल्यं शीलं तव भवतु नामैवमखिलम्
तथापि स्मर्तॄणां वरद परमं मंगलमसि ॥ २४ ॥ महिम्न

सहस्रास्यो नागः प्रभुरपि मतः पंचवदनः।
षडास्यो हन्तैकस्तनय इतरो वारणमुखः।
गृहे भैक्ष्यं शश्वत्प्रभवतु कथं वर्तनमिति।
श्वसत्यां पार्वत्यामय जयति शम्भुः स्मितमुखः ॥ १ ॥

अत्तुं वाञ्छति वाहनं गणपते राखुं क्षुधार्तः फणी।
तं च क्रौञ्चपतेः शिखी च गिरिजा सिंहोऽपि नागाननम्।
गौरी जह्नुसुतामसूयति कलानाथं कपालाननो,
निर्विण्णः स पपौ कुटुंबकलहादीशोऽपि हालाहलम् ॥ १ ॥

परमशिव हें तत्त्व त्रिगुणातीत आहे. तेंच जगत्कारण होय. त्याचा सगुण-रूपांत जो प्रथम आविर्भाव तो तमरूपांत झाला असावा. कारण तम हा आदिगुण मानला आहे. तो सर्व गुणांत परम दुर्ज्ञेय आहे.

निर्गुण शिवाची अविनाभूत मानलेली चिच्छक्ति प्रथम मूळ माया व नंतर गुण माया बनली असेल. ज्या वेळीं त्या आदिमायेच्या ठिकाणीं प्रथमच गुणविक्षोभ झाला असेल, त्या वेळीं त्याचा साक्षी एक आदिनाथ; अन्य कोणीच द्रष्टा नव्हता. अर्थात् त्या गुणविक्षोभाचें अनुमान मागूनच्या सृष्टि-कार्यावरून केलें तरी तें यथार्थ असणें अशक्यच वाटतें.

'रसो वै सः।' असें परमशिवाचें लक्षण आहे. त्या आदिकारणरूप रस-रूपांतून उद्भूत झालेले नवरसांचे प्रथम आविर्भाव कोणत्या नामरूपकर्मांत, ज्ञानइच्छाक्रियेंत अथवा मनप्राणवाग्रूपांत कसे प्रकट झाले असतील तें कोण सांगणार!

या अनंत विश्वकुटुंबाचें प्रथम घटकरूप शिवपंचायतन, त्याची प्रभावळ, वेशभूषा आणि परिवार यांची काय कल्पना करावी! परंतु कवींच्या निरंकुश बुद्धीनें मनोविनोदार्थ तें साहस केलें आणि एखाद्या चतुर दाईनें नूतन बालकास त्याच अनिर्वाच्य जन्मरहस्य एखाद्या नवलकथेच्या रूपात रचून सांगावें, त्याप्रमाणें "तेजोवारिमृदां यथा विनिमयो यत्र त्रिसर्गोऽमृषा॥" इत्यादि प्रकारें पुराणकारांनींहि सर्गविसर्गांचे सर्ग लिहिले

याप्रमाणें या अचिंत्य जगत्कारणाच्या अनादि संसाराच्या वर्णनातील विशेषेंकरून बीभत्स, भयानक, अद्‌भुत आणि रौद्र या रसांत वर्णिलेले विशेष प्रकार वाचले असतां कित्येक आधुनिकांना त्यांत ग्राम्यता व अश्लीलता यापलीकडे कांहींच आढळलें नाहीं. तेव्हां त्यांच्या मतानें असें ठरलें कीं, घोर रुद्र, बली घेणारी काली रुद्राणी, विघ्नकारक विनायक, बालांतक स्कंद कुमार, त्याचप्रमाणें त्यांचीं वृषभादि वाहनें, भूतपिशाचादि परिवार, विलक्षण रूपें, वेशभूषा, स्मशाननिवास आणि तेथील त्यांचें अव्यवस्थित उन्मत्तासारखें तांडवनृत्य, या आपल्याच शास्त्रपुराणांतील वर्णनावरून हीं आदिनिवासी रानटी वनमानवाचीं अथवा अनार्यांचीं निंद्य दैवतें होत! या आक्षेपक पूर्वपक्षाचा विस्तार आधुनिक संशोधकांनीं अत्यंत तिरस्कारपूर्वक पुष्कळच केला आहे तो येथें सपशीलवार देण्यांत स्वारस्य नाहीं, म्हणून देत नाहीं, पण त्याचा यथाशक्य खुलासा करणें जरूर आहे, म्हणून तो यत्न पुढें करीत आहें

वर लिहिल्याप्रमाणें कित्येक आधुनिकांचें असें म्हणणें दिसतें कीं, सारेंच शिवपंचायतन अनार्यांचें आहे. शिवरुद्राची वेषभूषा, त्याचा परिवार व त्याचें स्मशानभूमीवरील तांडवनृत्य हा त्या अनार्यांच्या देवाच्या रानटीपणाचा पुरावा आहे. यासंबंधीं सकृद्दर्शनींच एक असा विचार मनांत येतो कीं, शैववाङ्मयांतून शैवोपास्य देवतासंबंधीं आढळणारें अलौकिक, अद्‌भुत व विलक्षण वर्णन अक्षरशः सत्यार्थवाचक किंवा निंदावाचक असणें अगदींच असंभवनीय आहे तेव्हां अन्य ठिकाणीं म्हटल्याप्रमाणें तें परोक्ष, लाक्षणिक, व गूढार्थवाचकच मानणें भाग आहे निदान शिवपुराणांत तरी शिव व त्याच्या परिवाराला अनार्य व रानटी मानणेंच भाग पडावें, असें वर्णन कसें असू शकेल? 'परोक्षप्रिया इव हि देवाः प्रत्यक्षद्विषः।' बृ उप ४।२।२ हें श्रुतिवचन येथें मनांत येतें या वचनाचे पडताळे आपल्या साऱ्या प्राचीन

वाङ्मयात पानोपानीं कसे येतात, हें ' इंडो-आर्यन मायथॉलजी ' नामक ग्रंथात सोदाहरण ठिकठिकाणीं दाखविलें आहे.

सर्व देवचरित्रात शिवचरित्र अतिगूढ आहे अर्थात् शिवाप्रमाणें शिवाचा परिवारहि अति विलक्षण आहे त्याचें ग्रंथातरीं जें वर्णन आढळतें, तें संकेतमात्र असलें, असेंच मानणें भाग आहे वस्तुत शिवपार्वती आणि त्याचे दोन मुलगे कोठें भूतान प्रातात अथवा मेरु, मुजवान, गौरीशंकर किंवा कैलास या पर्वतावरील एखाद्या गुहेंत, तुम्हाआम्हांसारखें राहत आहेत, तेथें एक नदीचा गोठा व भूतगणाची झोपडी आहेत, अथवा एखाद्या महास्मशानात डोंबाप्रमाणें त्याची एखादी कुटि आहे, अशी भौतिक वस्तुस्थिति नाहीं तसेंच रानटी कातकरी लोक दारू पिऊन व झिंगून जसे नाचतात, त्याप्रमाणें भगवान् नटराजाचें ताडवनृत्य ग्राम्य नव्हे तें अत्यंत गभीर व गूढार्थसूचक असल्याचें दिसून येतें.

सृष्टीची उत्पत्ति आणि प्रलय हे दोन प्रसग जसे आपणास अगम्यच आहेत, त्याचप्रमाणें त्यात सारे देवदेवता सामील होतात तें शिवाचें ताडवनृत्य हें वस्तुत आपणास अगम्यच आहे भगवतानें अर्जुनाला आपलें विश्वरूप दाखविलें महारुद्र हनुमतानें भीमाला आपलें विराटरूप दाखविलें, शकरानीं रामचद्राला आपलें विश्वरूप दाखविलें, त्या वेळीं त्या दर्शनानें त्यांचे डोळे दिपले! तें त्याना पाहावेना त्या रूपाचें आकलन होणें त्यास अशक्य झालें तेव्हां भगवतास आता आपलें विराटरूप आवरा, असेंच त्याना सागावें लागलें, असें पुराणातरीं वर्णन आढळतें पुराणानीं त्या विश्वरूपाचें जरी थोडें वर्णन केलें असलें, तरी तें त्यातील नि सीम अद्‌भूतता किंचित् दाखविण्यापुरतेंच आहे त्याचें यथार्थ वर्णन करता येणें शक्य नाहीं तसेंच शिवाचें ताडवनृत्य अगम्य जाणावें सृष्ट्युत्पत्तीच्या वेळीं अविनाभूत शिवशक्तींतून अहता आणि इदता, प्रकाश–विमर्श यानीं आपलें विराट रूप धारण केलें असेल त्या वेळच्या सतप्राणांच्या संघर्षांतून जेव्हा जगड्व्याळ प्रणवाचा खोल आणि गभीर नाद निघाला असेल, त्या नादनिनादांच्या स्पदातून ज्या वेळीं आकाशादि पचमहाभूतें प्रकट होऊन त्याची पचीकरणाची ब्रह्माण्डव्यापी क्रीडा सुरू झाली असेल, ज्या वेळीं स्वयभू, परमेष्ठि, सूर्य, चद्र, पृथ्वी हीं महामडळें अनत अवकाशात तीव्र वेगानें परिभ्रमण करूं लागलीं असतील, ज्या वेळीं असख्य तारकाचें रगण अनत

गगनाच्या अंगणांत शिवाच्या डमरूच्या निनादांत सुरू झालें असेल, ज्या वेळीं अगणित विद्युत्कण आणि असंख्य द्रव्यपरिमाणु, जीवाणु, प्रमाणु, कोषाणु यांचें भ्रमण आपआपल्या केन्द्रांभोंवतीं अति वेगानें सुरू झालें असेल, ज्या वेळीं सुरंग वर्णमाला आणि अक्षरमाला यांची संमिश्र रासक्रीडा शिवाच्या डमरूच्या ध्वनी-प्रमाणें नक्षत्रांच्या वाळवंटावर आकाशगंगेच्या काठीं होऊन राहिली असेल, त्या अद्भुत आणि अचिंत्य प्रसंगाची आपण काय कल्पना करावी !! शिवतत्त्व रसमय आहे त्यापैकीं नऊ दहा रसच काय ते आपणास किंचित् समजले आहेत आणखी त्याचे किती रस असतील कोणी सांगावें ? अशा त्या विराट पुरुषाच्या तांडवनृत्याचें वर्णन रौद्र आणि बीभत्स रसांतच केलेलें कोणी वाचलें असेल तर तेंच कांहीं शिवाचें व त्याच्या परिवाराचें संपूर्ण वर्णन नव्हे त्या विरोधीधर्माश्रय व लोकविलक्षण अशा शिवाचें यथार्थ वर्णन साक्षात् सरस्वतीलाहि करतां येणार नाहीं, असेंच पुष्पदंतादि साक्षात्कारी शिवभक्त स्पष्ट सांगतात सारांश, शिववेशभूषा व शिवपरिवार हें वर्णन सूक्ष्म आधि-दैविक जगांतील किंवा आध्यात्मिक जगांतीलच असणार त्याचें यथार्थ वर्णन आपल्या लौकिक कल्पनांनीं व भाषेनें भौतिक रूपांत करतां येणें शक्य नाहीं यास्तव पुराणांतील हें विस्तृत वर्णन रहस्यार्थानेंच जाणलें पाहिजे. गोलोकांतील भगवान् गोपालकृष्णाच्या गोपगोपींशीं होणाऱ्या दिव्य रास क्रीडेचें वर्णन वैष्णवग्रंथांतून आढळतें तें प्रेमरस, शृंगाररस, मधुररस यांनीं डवरलेलें असतें, तसेंच शिवाचें नटराजरूपानें शिवगणांसह होणारें तांडवनृत्य रौद्र, अद्भुत, बीभत्स, उन्माद, अशा विलक्षण रसांत वर्णिलेलें आढळतें त्याचा उत्तानार्थ खरा उद्बोधक नसून त्याचा अभौतिक अर्थच गुरुपरंपरेनें जाणला पाहिजे पुराणकारांनीं तें दृश्य आपल्या दिव्य दृष्टीनें पाहिलेंहि असेल पण ते त्यांचे पाहण्याचे डोळे वेगळे व त्यांचें वर्णन आपणास समजण्यासाठीं सांगण्याची त्यांची अलौकिक वाणीहि वेगळी वाणीला डोळे नसतात व डोळ्यांना वाणी नसते, ही मोठीच अडचण असते ! शिवाय निमात्राच्या वस्तूंची अगर व्यक्तींची आपणास कल्पना येते त्याहून अधिक मात्रा अगर परिमाणें यांची आपणास कल्पना करतां येत नाहीं तसेंच या स्पंदात्मक विश्वांत आपल्या जाणिवेच्या अल्प मर्यादेच्या खालील व वरील स्पंदात्मक जगाचें आपणास यथार्थ ज्ञान होणें शक्य नाहीं असें असतां अशा पदार्थांचें कोणी चित्र काढण्याचा

प्रयत्न केलाच, तर तें चित्र सामान्य माणसास विलक्षण व दुर्बोधच वाटेल.

अगोदरच आपल्या मनाच्या व इंद्रियांच्या शक्ति फारच मर्यादित असतात. साखरेची गोडी, निसर्गाचें प्रभातकाळचें सौंदर्य, उत्कट विषयानंद, लोकोत्तर परमाश्चर्य, यांचें वर्णन आपणांस करतांच येत नाहीं. दुसरी अशी कल्पना करावी कीं, आपल्याला पांचांहून अधिक ज्ञानेंद्रियें असतीं तर हें जग किती निराळें भासलें असतें, याची कल्पनाहि आपल्याला करवत नाहीं. मग भगवंताच्या अनंत इंद्रियांचें जें साक्षीमात्य त्याची तांडवनृत्य या शब्दांनीं आपण काय कल्पना करणार ? वस्तुतः सशक्तिक शिवाच्या अत्यंत व्यापक स्वरूपाची त्या रूपातिरिक्त निराळी परिच्छिन्न वेशभूषा आणि परिवार संभवतच नाहीं. पण असें असूनहि भगवंताच्या योगैश्वर्याची उपासकास किंचित् कल्पना देण्यासाठींच अथवा त्याच्या चिंतनासाठीं त्या परिवाराचें दिव्य दृष्टीच्या शास्त्रकारांनीं जें परोक्ष वर्णन केलें आहे, त्याची कांहीं कल्पना पुढें देत आहें.

( १ ) गौरी :— परब्रह्मरूप निर्गुण निराकार परमशिवाच्या ठिकाणीं हें जें नामरूपात्मक त्रैलोक्याचें ऐश्वर्य भासत आहे, तें जिच्यामुळें ती चिच्छक्ति गौरी होय. शंकराचार्य विनोदगर्भ स्तुति करतांना म्हणतात, "वृषो वृद्धो यानं विषमशनमाशाविवसनम् । स्मशानं क्रीडाभूर्भुजगविवहो भूषणविधिः । समग्रा सामग्री जगति विदितैव स्मररिपो- । र्यदेतस्यैश्वर्यं तव जननि ! सौभाग्यमहिमा ॥" (बोधसार शिवपूजा, ७० ते ८०.) आध्यात्मिक दृष्टीनें पाहतां शिवरूप आत्म्याची सुखरूप वामांगा गौरी म्हणजे मन-वाणीला अगोचर अशी परमलोभनीय व शुद्ध अशी ब्रह्माकार वृत्ति होय. ही ब्रह्मवादिनी भवानी सर्व पदार्थांत व सर्व अवस्थांत शिवालाच साक्षात्कृत करते. ह्या ब्रह्माकार वृत्तीचें सर्वस्व म्हणजे शिव होय. त्यास सर्वात्मना आत्मसमर्पण करणारी ती शैलकन्या म्हणजे ब्रह्माकार वृत्ति आपल्या ह्या स्वभावानेंच कृतकृत्य होते. या भगवतीनें भगवान् शिवालाच सदा सर्वत्र पाहिलें आहे. त्यालाच ऐक्यभावनारूपानें आलिंगन दिलें आहे व त्यास अत्यंत प्रेमादरानें आपल्या हृदयमंदिरांत चिंतिलें आहे. म्हणून या दिव्यपतिव्रता साध्वीच्या सौभाग्याचा महिमा ऋषिमुनिहि गात असतात. तिला दिव्ययोगिनी म्हणतात. तिच्यापुढें प्रेमानें साक्षात् शिव तांडवनृत्य करतो. परस्परांवरील अनुरक्तीनें वस्तुतः ऐक्यात्मभावापन्न अशा त्या

उभयतापुढें मुमुक्षु जन सदा नम्र होतात. खरोखर शकारापेक्षाहि ही गौरी-नामक ब्रह्माकार वृत्ति जाग्रत आदरणीय आहे. कारण शिवरूप जीवात्म्याचा आनंद द्विगत करण्याचें तिचें सामर्थ्य आहे यास्तव हिला साक्षात् परब्रह्मस्वरूपच समजलें पाहिजे जगद्गुरु हें हिचेंच स्वरूप आहे केनोपनिषदातील उमा हैमवती म्हणजे ब्रह्मविद्याच होय. शिवसंकल्प अथवा समष्टि इच्छा, ज्ञान, क्रिया हें तिचेंच रूप होय अन्य असंख्य तन्हांनीं व दर्शनीं या देवीचें वर्णन समवतें उमा आणि रुद्र या दोन अरणी मानल्या आहेत यांतूनच ज्ञानाग्नि प्रदीप्त होतो. उमा-गंगावाक् ही सारी एकाच चिच्छक्तीचीं नामांतरें आहेत तसेंच अनात्मवस्तूंची अत्यंत निषेधात्मक व संहारकारी कालीहि तीच जणु शवरूप निश्चेष्ट शिवावरील ताण्डवनृत्य करणारी महामाया ती हीच शिव या नामांतील इकाररूप जगतां-तील नित्यानित्य वस्तूंच्या समष्टीची शक्ति तेंच गौरीचें रूप होय [" यच्च किंचित्क्वचिद्वस्तु सदसद्वाखिलात्मके। तस्य सर्वस्य या शक्तिः सा त्वं। किं स्तूयसे तदा॥ बोधसार शिवपूजा, ७० ते ८०, केन उप भाष्य ४-२-२७ ]

मातृगण, दशमहाविद्या, नवदुर्गा, इंद्राणी आणि रुद्राणी, सीता आणि राधा, महालक्ष्मी आणि महासरस्वती, तसेंच मानसी शक्ति, प्राणशक्ति, द्रव्य शक्ति, आकर्षण विकर्षणशक्ति, विद्युच्छक्ति इत्यादि साऱ्या आधिभौतिक, आधियाज्ञिक, आधिदैविक व आध्यात्मिक शक्ति, विद्या आणि अविद्या शक्ति ह्या सर्व त्या एकाच चिच्छक्तीच्या अथवा महामायेच्या मूर्तामूर्त अवस्था आहेत.

अर्थात्, असंख्य ब्रह्माण्डें व्यापून उरणारें असें या जगत्कारणरूप शिव-शक्तीचें स्वरूप असल्यामुळें तिच्यासंबंधीं क्षुद्र, ग्राम्य व परिच्छिन्न अशा कल्पना समवतच नाहींत

'तम आसीत्तमसा गूहमग्रे' ही सृष्टीच्या पूर्वीची अवस्था होय तेंच मूळ शिवशक्तीचें स्वरूप होय अर्थात् जी स्वरूपत अज्ञेय ती काली होय महा-कालरूपिणी अशी जी सत्ता ती काली होय संहार करण्यास योग्य पदार्थांचा नाश ( विनाशाय च दुष्कृताम् । ) करणारी ती काली होय अशी जी दयाळू जगज्जननी ती काली ( वराभयकरा ) होय सारे कालीभक्त तिला दारिद्य,

१ अरूप भावनागम्य पर ब्रह्म कुलेश्वरि। अरूपा रूपिणीं कृत्वा कर्म-काण्डरता नरा ॥ —कुलार्णवतन्त्र

दुःख, भय हरण करणारी 'मा' म्हणजे आई म्हणतात.* परमार्थात .'शिवो भूत्वा शिवं भजेत्', असा शास्त्राचा आदेश आहे. त्यासाठीं 'दासोऽहम्' या वृत्तींतील 'दा'चें बलिदान हें शिवपूजेचें प्रधान अंग आहे. शिवशक्तीस शिवशक्त्युपासकानें करावयाचें बलिदान चार प्रकारचें आहे. आपल्या जीवभावाचें बलिदान हें उत्तम कोटीचें बलिदान होय. काम-क्रोध-विकाररूपी मेंढ्या-बकऱ्यांचें बलिदान हें दुसऱ्या कोटीचें बलिदान होय. मिठाई, कांदा, लसूण, मद्यादि इंद्रियप्रिय वस्तूंचा त्याग हें तिसऱ्या प्रतीचें बलिदान होय. कुष्मांड, लिंबू, ऊंस, पिठाचा पिंड, इत्यादि पदार्थांचें समर्पण हें चौथें सात्त्विक बलिदान होय.

जिच्यापासून पुढें सृष्टि उत्पन्न झाली तिच्या गळ्यांत अगोदरच मुण्डमाला कोठून असणार? अर्थात् ही मुण्डमाला म्हणजे पुढें होणाऱ्या नामरूपात्मक सृष्टीची बीजभूत अशी मातृका वर्णमाला होय. शिवरुद्र हें अग्नितत्त्व मानलें आहे. अर्थात् काली, कराली या रुद्राग्नीच्या शक्ति होत. (मुंडक उपनिषद्, १।२।४). ज्याप्रमाणें अदिति ही देवमाता उत्पत्ति व संहार दोन्ही भाव दर्शविते. त्याचप्रमाणें काली होय. वस्तुतः हे दोन्ही भाव सापेक्षच आहेत. विघटना आणि संघटना या एकाच वस्तूच्या दोन बाजू आहेत. बीजाची विघटना होते त्यांतच अंकुराची संघटना संभवते. स्वामी विवेकानन्द

* टीप – दारिद्र्यदुःखभयहारिणि का त्वदन्या सर्वोपकारकरणाय सदार्द्रचित्ता ॥ —मार्कंडेय पुराण.

१. कामक्रोधौ द्वौ पशू इमावेव मनसा बलिमर्पयेत् ।
कामक्रोधौ विघ्नकृतौ बलिं दत्त्वा जपं चरेत् ॥ —महानिर्वाणतंत्र

२. सात्त्विको जीवहत्यां वै कदाचिदपि नाचरेत् । इक्षुदण्डश्च कूष्माण्डस्तथा वन्यफलादिकम् । क्षीरपिण्डैश्शालिचूर्णैः पशुं कृत्वा चरेद् बलिम् ।
—महाकाल-संहिता अजसंज्ञानि बीजानि वै त्रिवर्षोषितानि च ।—महाभारत, शांतिपर्व

३ पञ्चाशल्लिपिभिरित्यादि ।

सोऽयं वाक्समाम्नायो वर्णसमाम्नायः पुष्पितः फलितश्चन्द्रस्तारकवत् प्रतिमण्डितो वेदितव्यो ब्रह्मराशिः । —पतञ्जलि महाभाष्य.

मोठ्या अभिमानानें म्हणत कीं, या संहारमूर्तीला आई म्हणणारे रामप्रसाद कमलाकान्त, श्रीरामकृष्णप्रभृति अनेक देवीभक्त या भरतभूमींतच निर्माण व्हावे, हें या धर्मभूमीच्या असाधारण तत्त्वज्ञानाचें वैभव होय. तरीपण सामान्यतः ज्यांत संहारक रौद्रधर्माचें अथवा क्रूरकर्माचें मूर्तीकरण परमेश्वरानें अथवा शास्त्रानें केलेलें असतें, तें रूप उपासनीय मानीत नाहींत. ध्यान-धारणेचें उपासनीय रूप सौम्य व मनोवेधक असेंच असतें. शिवपंचयातनां-तील पार्वती हें रौद्ररूप नाहीं. 'माता च पार्वती साक्षात्पिता देवो महेश्वरः।' अशीं शिवपार्वतीचीं रूपें उपासनीय मानलीं आहेत.

(२) गजानन :– हें स्पष्टच सांकेतिक रूप आहे. मेलेल्या हत्तीची सोंड तोंडाला लावून फिरणारी कोणी एक रानटी व्यक्ति तो गजानन, ही कल्पना आचरटपणाची आहे. जो केवळ पार्वतीचा म्हणजे प्रकृतीचा अंतःकरणरूप अंश असूनहि आपल्या बुद्धियोगानें व शिवप्रसादानें प्रत्यगात्मरूप पावला व आत्मानंदाच्या अतिशयानें तुंदिलतनु दिसूं लागला तोच विघ्नेश्वर गणपति होय. [ बोधसार शिवपूजा, ६२ ] जीवाहंकाराचा शिरच्छेद झाला कीं जीवच शिवकृपेनें मंगलमूर्ति गजमुख बनतो. विघ्न करणारा व विघ्नविनाशक, सृष्टि-साक्षी व मुक्तिसाक्षी अशीं हीं दोन मनाचींच रूपें आहेत. व्यष्टिसमष्टि-प्रज्ञा-प्राणांचा अथवा ज्ञानक्रियांचा जो मूलाधार, जो इंद्रियांचाहि अधिपति तो गणपति होय. ज्याचें प्राकृतिक शरीर क्रियांचा आधार आहे व ज्याचें शिवदत्त गजमुख बोधस्वरूप आहे तोच गजानन होय. ज्ञानकर्मात्मक, स्मृतिविस्मृति-रूप ( जीवांच्या प्राक्कर्मसंस्काराची स्मृति व स्वस्वरूपविस्मृति ) असें जें महादेवाचें स्वरूप तोच ब्रह्मणस्पति गणेश होय. नामरूपात्मक जगद्रूप जें कर्म आहे, त्यांत आद्यन्तव्यापकज्ञान हेंच गणेशरूप होय. अर्थात् श्रीगणेश हें कर्म-साधक आहे. 'व्यासोच्छिष्टं जगत्सर्वम्' असें म्हणतात. तो व्यासांचा अंतः-करणरूप संकल्पलेखक गणेश होय. काळ्या कांचेनें पलीकडील पदार्थ दिसत नाहींत. उलट दुर्बिणीच्या कांचेंतून दूरचा एरवीं न दिसणाराहि पदार्थ दिसूं लागतो. त्याप्रमाणें हा प्राकृतिक देव जसा प्रतिबंधक विघ्नेश म्हणजे विघ्नकारी आहे तसाच तो विघ्नविनाशक पण आहे. आघातास प्रत्याघात हें प्रकृतीचेंच एक रूप आहे. त्याचप्रमाणें विघ्न करणाऱ्या असुरांस उलट विघ्न करण्याकरितां विघ्नविनायक निर्माण झाले (लिं. पु. अ १०४।१०५ ), असें कथानकाच्या रूपानें

सांगितलें आहे. प्राणापानांचा संघर्ष हें त्याचें रूप असेंहि सांगतात. ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, अंतःकरणचतुष्टय, पंचप्राण, पचभूतें, काम, कर्म आणि अविद्या या पूर्यष्टकाचा जो नियंता तोच गणेश. कोणी लंबोदर हें आकाशतत्त्व असेंहि मानतात. कोणी शिवाच्या कंठाच्या आकाशतत्त्वांतूनच गणेशाची उत्पत्ति सांगतात. गणेशाचें मूषकवाहन म्हणजे संशोधक किंवा चिकित्सक बुद्धि वे गजमुख म्हणजे संयोजक बुद्धि असा कोणी अर्थ करतात. " ज्ञानार्थवाचकं गश्च णश्च निर्वाणवाचकः। तयोरीशं परं ब्रह्म गणेशं प्रणमाम्यहम्।" असा ब्रह्मवाचकहि गणेशाचा अर्थ करतात.

(३) षण्मुखः– केवळ शिवाचाच अयोनिसंभव अंश जो पिण्डांतर्गत दृष्टीनें षट्चक्ररूप सहा कृत्तिकांकडून पोसला जातो, तो प्रत्यगात्मरूप शिवांश म्हणजे षाण्मातुर स्कंद होय. हाच षट्चक्रभेदानें मेरुदंडरूप क्रौंचपर्वताचें (पाठीचा कणा) जणुं विदारण करतो व शिवसायुज्य पावतो. हाच नारदाचा उपदेष्टा बोधस्वरूप शिवात्मज सनत्कुमार स्कंद होय. कुंडलिनीरूप नागिणीचें अथवा आसुरप्राणरूप सर्पाचें विष हरण करणारा असा मयूर ज्याचें वाहन आहे, तोच हा पिण्डांतर्गत जीवात्मा ज्ञानेंद्रियांचा सेनानी होय. आत्मसूर्य आणि मनश्चंद्र यांची जी एकतानता त्याच (अमावास्यारूप) सिनीवाली देवसेनेशीं ज्याचा जन्मादारम्य संबंध जडला, तोच जीवशिवैक्यात्मक बोधस्वरूप सनत्कुमार होय. ('हनुमंताशीं हितगूज', पृ. २७९–३०८). तारकासुर म्हणजे रात्ररूप अज्ञान याचा नाश करणारा हाच. ('मंगलमूर्ति', पृ. ११६–१२६; 'कल्याण' शिवांक, पृ. ५०१) " बोधस्वसेनया येन मोहस्य स्कंदनं कृतम्। स बुद्धिमान् महासेनः स्कन्दो नाम शिवात्मजः ॥ ६१ ॥" (बोधसार शिवपूजा.) तात्पर्य, कार्तिकेय षण्मुख हेंहि स्पष्टच लाक्षणिक रूप आहे. शिवाचीं जशीं पांच मुखें तशींच याचीं सहा मुखें लाक्षणिक आहेत. याला रानटी म्हणणारेच अडाणी होत.

(४) शिवगणः– एकदां अलकापुरीजवळ शिव आपल्या गणांसह आल्याचें वर्णन शिवपुराणांत केलें आहे. तेथें शिवाबरोबर आलेल्या गणांचे प्रकार विविध आणि असंख्य असल्याचें आढळतें. रुद्र अर्थात् रुद्रांश असंख्यात असल्याचें वर्णिलेलें आहे. हा सारा आधिदैवत जगांतील वर्णनाचा प्रकार आहे. वेदविज्ञानवादी असें सांगतात कीं, पृथ्वीपासून बारा योजनें वरपर्यंत

अंतरिक्षांत एमप वराहनामक भूवायु असतो. त्यांत अनेक जीव राहतात. त्यांचें शरीर वायुमय असतें. त्यांच्या भूरसाच्या तारतम्यानें पिशाच्च, राक्षस, व यक्ष अशा जीवकोटि होतात. या भूत, पिशाच्च, राक्षसादि वायव्य प्राणांचा अधिष्ठाता भगवान् रुद्र आहे. वारणवायु ही आसुरप्राणांची प्रतिष्ठा होय. रुद्रप्राण जसे घातक तसे तारकहि असतात.

श्री. नरहरिस्वामीकृत बोधसारांत असें सांगितलें आहे कीं, शंभु हा स्वस्वरूपानें चिदानंद, विषयानंद इत्यादि समग्र आनंदांचा समुद्र आहे आणि त्याच्या शक्तीला आनंदवारी असें म्हणतात. समुद्राच्या क्षुद्र तुषारांप्रमाणें ह्या आनंदसागराचे जे अंश तेच शिव (समुद्राचे) गण होत. या भृंगि, तुंबरु इत्यादि शिवभक्तांचें व शिवगणांचें स्वरूप असत्, जड, दुःखरूप असलेल्या या आपल्या जगाहून अगदींच विलक्षण असल्यामुळें शिवगणांचें वर्णनहि विलक्षण आढळतें यांत नवल नाहीं. जगत्पराङ्मुख दृष्टि असलेले जे योगी तेच योगिनीगण होत. त्यांना भूतपिशाच म्हणून निंद्य व तिरस्करणीय मानणें हा मूर्खपणा आहे. जगद्रूपी जालाला विपरीत रूप देणारा तो कालभैरव, निरोधरूपी दण्डानें आपल्या संकल्परूप मनाला दण्ड करणारा तो दण्डपाणि, समष्टि-व्यष्टि स्थूल-सूक्ष्म शरीराचें पालन करणारे शिवांश जीव तेच क्षेत्रपाळ, शुद्ध भाव किंवा शिव बोध तोच नंदिकेश्वर, अथवा चतुष्पाद धर्म तोच नंदिकेश्वर, विभक्त नसलेला ज्ञानी भक्त म्हणजे भृंगि होय. [ बोधसार, शि. पु. ९९ ते ६० ].

शिवाच्या मस्तकीं चंद्र व गंगा, म्हणजे कुंडलिनीयोगातील मस्तकींच्या सहस्रार कमलाशीं मनश्चंद्रम्याचें व तेथून वाहणाऱ्या त्रिवेणीधारारूप गंगेचें साहचर्य असें मानतां येईल किंवा शिवाच्या विराटरूपाच्या कल्पनेंत आकाशगंगा आणि आकाशींचा चंद्र शिरीं धारण करणारा सूर्य मानतां येईल.

**(५) चिताभस्म व रुद्राक्ष :**—ज्ञानाग्नीनें देहत्रय जाळून जें आत्मप्रत्ययरूप शुद्ध अनुभवतत्त्व उरतें तें चिताभस्म होय. सत शिवभक्त हीच विभूति. सत्य-स्मरण, किंवा निर्विशेषाचें निदिध्यासन हेंच रुद्राक्षधारण जाणावें.

**(६) भस्म :**—शिव हें अग्नीचें रूप मानलें अथवा अग्निहि शिवाचें रूप मानलें म्हणजे सहजच तें भस्माच्छादित मानतात. ज्याप्रमाणें अग्नें हें जलाचें

अग्नीच्या तापानें होणारें भस्मच होय, [ श. प. ७।५।२।४८ ] त्याचप्रमाणें भृगुपति शिवयोगी हे आपल्या शरीरातील रेतरूप जलाचे षट्चक्रांच्या अग्नींत भस्म करून त्या ब्रह्मचर्यरूप भस्माच्या दिव्य कांतीनें शोभतात. [ गो. पू. ११३ ] भस्म म्हणजे पदार्थाचें अंतिम शुभ्रस्वरूप होय. त्याचें आणखी परिवर्तन कशानेंहि होत नाहीं. तें अपवित्रालाहि पवित्र करणारें आहे. म्हणून त्यास रक्षा अथवा राख म्हणतात. भस्मस्वरूपांत पदार्थांच्या नानात्वातील भेद नाहीसा होतो, हें भस्माचें एकरूप शिवास भूषणभूत वाटतें. ( बोधसार शिवपूजा ३१ ) पंचमहामंडलांपैकीं सर्वांत वरचीं परमेष्ठि व स्वयंभू हीं दोन मंडळें गुत आहेत. तीं अछिन्न आहेत. सौरप्राणांत सर्व रंग आहेत. अग्निद्वारां जेव्हां ते सारे रंग जळून जातात तेव्हां परमेष्ठींचा कृष्णवर्ण व्यक्त होतो. तोहि जळून गेल्यावर स्वयंभू या शिवमंडळाचा श्वेतभस्मरूप वर्ण व्यक्त होतो. त्याला आगि जाळूं शकत नाहीं. भस्म हें शिवाचे वीर्य होय, असें लिंगपुराणात ( पूर्वार्ध अ. ३४ ) सांगितलें आहे.

**( ७ ) डमरू :**— भक्तजनांना 'नेति नेति', अशा प्रकारें द्वैतनिरासपूर्वक आत्मरूपाची सूचना देण्याचें कार्य डमरू करीत आहे. ( बोधसार शिवपूजा ४५ ) तो डमरू म्हणजे शब्दब्रह्माचें मूर्त रूप होय. कंठ हाच डमरू होय. तो प्रणवाचा व्यंजक होय. या डमरूच्या ध्वनींतून व्याकरणशास्त्राचीं चौदा सूत्रें निघून संस्कृत भाषेची रचना झालेली आहे असें मानतात. [ नृत्तावसाने नटराजराजो ननाद ढक्कां नवपञ्चवारम्। उद्धर्तुकामः सनकादिसिद्धानेतद्विमर्शे शिवसूत्रजालम् ॥ नंदिकेश्वरकारिका ]. शिवसूत्रें अशींच आहेत. सूत्रमाह महेश्वरः – शिवसूत्र मरिचित्। ( भास्करानंद–कथासरित्सागर. )

**( ८ ) त्रिशूल आणि खट्वांग :**— "इच्छाज्ञानक्रियारूपास्त्रिशूलशक्तयो मताः। उत्कास्ता एक खट्वाङ्गं शुद्धसत्त्वप्रवर्तिकाः॥" याप्रमाणें त्रिशूल आणि खट्वांग यांचें वर्णन आढळतें.

> शान्तिवैराग्यबोधाख्यैः त्रिभिरग्रैस्तरस्विभिः ।
> त्रिगुणत्रिपुरं हन्ति त्रिशूलेन त्रिलोचनः ॥ ४४ ॥ बोधसार शिवपूजा

**( ९ ) कपाल :**— अनादिकालापासून नष्ट होत आलेल्या असंख्य ब्रह्माण्डांचीं कपालें किंवा त्यांच्या मुंडमाळा धारण करणारा हा अनाद्यनंतरूप असा

शिव आहे. ( योगसार शि. पु. ४६ ) मुंडमाळा म्हणजे वर्णमाला असेंहि मानतात. या वर्णमालेनें ब्रह्माण्डमालेचेंच दिग्दर्शन होऊन उपास्य शिवशक्तीचें विराट स्वरूप अथवा जगत्कारणत्व हेंच लक्षिलें जातें. सहस्रारचक्र ज्यांत असतें तें कपाल. हें पंचमंदिरांतील शिवाचें मंदिर मानलें आहे.

( १० ) विषारी पदार्थ :—कैलासासारख्या बर्फाच्छादित शांत प्रदेशांत निवास करणाऱ्या महादेवाला धोतरा, भांग, यांचा उपयोग मानला आहे. शिवयोग्याची उन्मनावस्था किंवा उन्मत्तावस्था त्यानें दर्शविली जाते. सामान्य जनदृष्टीहून योग्याचें जगासंबंधीं आत्मवत् अलौकिक दर्शन त्यामुळें संभवतें, अशी कल्पना केली आहे. ( यो. सा. शि. पु. ८९।९० ) अनात्मदृष्टि हें विष आहे, तें नीळकंठ शिवानें कंठांत धारण केलें आहे. तें त्यानें पिऊन टाकणें म्हणजेच विश्वप्रलय होय.

( ११ ) गजचर्मादि :—शिवानें धारण केलेलें गजचर्म, म्हणजे अभिमानाचें दमन; व्याघ्रचर्म व वृषवाहन म्हणजे कामाचें दमन. मृगधारण म्हणजे चंचल मनाचें दमन—असें मानतात. धर्ममेघनामक समाधीवर आरूढ होणें, हें वृषवाहनानें दाखत होतें. ( यो. सा. शि. पू. ४७. )

( १२ ) सर्पभूषण :—सर्प पवनाहार करणारे, दीर्घजीवी व बिळांत राहणारे म्हणून देहांत अंतर्यामी गूढ रूपांत विश्रांति घेणारे शिवयोगी सर्पभूषण मानले आहेत. कुंडलिनीची गति, रुद्रप्राणांची गति, खगोलांची गति, सर्पाप्रमाणें कुंडलाकार असते. ती धारण करणारे, ते सर्पभूषण महेश्वर होत. कोणी जीवांच्या प्राक्कर्मबंधालाच नाग मानतात. जगत्कारणरूप शिवाचे ते भूषणरूप होत.

( १३ ) स्मशान :—ज्या अंतःकरणांतून सारे विकार नाश पावले आहेत, तें अंतःकरण हें स्मशान होय. ( 'शक्ति आणि शाक्त' पृ. ८६ ) अखंड जन्ममरणपरंपरेंत जेथें असंख्य जीव मरण पावतात अशा या संसाररूप स्मशानालाच संहारभैरवरूप शिवाची क्रीडाभूमि मानतात. कोणी तिन्ही देहांना ज्ञानरूप अग्नींत जाळणें या योग्याच्या भूमिकेस स्मशान म्हणतात. बहुधा याच स्मशानास उद्देशून शिव म्हणतात कीं, स्मशानापेक्षां अधिक शुद्ध असें स्थळ मला या जगांत अद्याप सांपडलें नाहीं. ( म. भा. अनुशासन पर्व, अ. १४१ ;

-चोधसार शिवपूजा ५० ) सुषुप्तिरूप प्रलयालाहि कोणी स्मशानभूमि मानतात. जगद्विहरण स्मशानवासतुल्य मानलें आहे. शिव हें अनात्मनाशक अग्नीचें रूप मानल्यामुळें शिवरूपाशीं स्मशानाचें साहचर्य सहजच येतें.

याप्रमाणें शिववेशभूषा, शिवाचें पंचायतन, प्रभावळ, परिवार, आयुधें, निवास-स्थान यांचे लाक्षणिक अर्थ अनेक तऱ्हेचे असून त्या लक्ष्यार्थाकडे दृष्टि ठेवून त्याचा अर्थ निरनिराळ्या तऱ्हेनें सांगितला जातो. दिव्य किंवा विलक्षण निर-निराळ्या रत्नांचे पैलू, त्यांचे रंग, त्यांचें तेज, त्यांचें मूल्य यांत विविध प्रकार समवले तरी, त्यांचें वर्णन म्हणजे बहुरत्ना वसुंधरेचेंच स्तवन होतें, त्याच-प्रमाणें येथेंहि समजावें. शिव आणि शक्ति हीं वस्तुतः अरूप असूनहि वाटेल त्या विलक्षण रूपांत उपासकास प्रतीत होतील. त्यांच्या तात्पुरत्या व्यक्त रूपाचा वाच्यार्थ व त्याहून लक्ष्यार्थ गूढ व रहस्यमय असतो, हें ज्ञानी भक्त विसरत नाहींत.

पार्वतीनें शिवाचें वर्णन केलें आहे, त्यांत त्याच्या विचित्र वेशभूषेचा थोडा-फार खुलासा आहेच. पार्वती म्हणते "स आदिः सर्वजगतांकोऽस्य वेदान्वयं ततम्। सर्वं जगद् यस्य रूपं दिग्वासः कीर्त्यते ततः ॥ ७१ ॥ गुणत्रयमयं शूलं शूली यस्माद्बिभर्ति सः। अबद्धाः सर्वतो मुक्ताः भूता एव स तत्पतिः ॥ ७२ ॥ स्मशानश्चापि संसारस्तद्वासी कृपयार्थिनाम्। भूतयः कथिता भूतिस्तां बिभर्ति स भूतिभृत् ॥ ७३ ॥ वृषो धर्म इति प्रोक्तस्तमारूढस्ततो वृषी। सर्पाश्चदोषाः क्रोधाद्यास्तान् बिभर्ति जगन्मयः ॥ ७४ ॥ नानाविधान् कर्मयोगाञ्जटारूपाः बिभर्ति सः। वेदत्रयी त्रिनेत्राणि त्रिपुरः त्रिगुणं वपुः ॥ ७५ ॥ भस्मीकरोति तद्देवास्त्रिपुरघ्नस्ततः स्मृतः। एवंविधं महादेवं विदुर्ये सूक्ष्मदर्शिनः ॥ ७६ ॥ ...कथं कारं हि ते नाम भजन्ते नैव तं हरम् ॥ ७७ ॥" स्कन्द पु. महि. कौ. ख. २। २५. हा परमात्मा सर्व लोकांचें आदि-उद्भवस्थान आहे. त्याच्या यथार्थ ज्ञान कोणाला असूं शकणार आहे! संपूर्ण ब्रह्मांड हेंच त्याचें रूप असल्यामुळें त्याचें दिशा हेंच वस्त्र म्हणून त्यास दिगंबर म्हणतात. प्रकृतीचे सत्त्वरजतम हे तीन गुणच प्राण्यांना दुःख देण्यास साधनरूपशूल असल्यामुळें त्याला शूली म्हणतात. जे अबद्ध व मुक्त आहेत, त्या भूताचा तो भूतपति आहे. संसार स्मशानरूप असून त्यांत व्यापक असणाऱ्या परमात्म्याला स्मशानवासी म्हणतात. संपूर्ण संसारसंपत्ति ही त्याची भूति असल्यामुळें त्यास भूतिभृत म्हणतात. वृष हें

धर्माचें नांव आहे. त्यावर आरूढ होण्यास्तव त्यांना वृषवाहन म्हणतात. जगत्स्वरूप परमात्मा मन्यु आदि दोषरूप सर्व धारण करतो. नाना प्रकारचा कर्मयोग याच त्याच्या जटा होत. तीन वेद हेच त्याचे त्रिनेत्र होत. मुमुक्षूच्या त्रिगुणात्मक शरीररूप त्रिपुराचा तो नाश करतो. जे सूक्ष्मदर्शी लोक याप्रमाणें अशा महादेवाचें यथार्थ स्वरूप जाणतात, ते त्याची उपासना केल्यावाचून कसे राहातात ! अथवा वृषभ राशींतील सूर्य तोच शिव, याची प्रभा तीच गौरी, विद्युत्प्रभा त्याच जटा, आकाशींचा चंद्र आणि आकाशगंगा तीच शिरोभूषण, सूर्यगोलांतील डाग तेंच विष, तारका तेच शिवगण, सूर्यकिरण तेच सर्प ; किंवा वृषभ रास तोच नंदी, मिथुन तेंच शिवशक्तिदांपत्य, कर्क तोच गजानन, सिंह रास तेंच सिंहासन, अशा अनेक उद्बोधक कल्पना सोडून ईश्वरपंचायतना- संबंधी ग्राम्य कल्पना करणें यात पाखंडी कल्पकाचाच अप्रयोजकपणा दिसतो. खऱ्या शिवशक्त्युपासक साधकानें असल्या विघातक पाखंडी कल्पनांचा तिर- स्कारपूर्वक त्याग करावा, हेंच योग्य होय.

खऱ्या शिवशक्त्युपासकाची सद्बुद्धि हीच जलहारी साळुंखा व कूटस्थ तेंच शिवलिंग होय ( दक्षस्मृति द्रोणपर्व, अ २०१ पहा. )

उपासना ही कर्तृतंत्र आहे म्हणजे अधिकारी उपासकाच्या भावनाधीन आहे. अशा अधिकारी उपासकाचा कूटस्थ प्रत्यगात्मा तोच शिव, अतःस्फूर्ति तीच उमा, षट्चक्रभेद करणारा जीव तोच कार्तिकेय, प्रज्ञा आणि प्राण तोच ब्रह्मणस्पति गणेश, सद्गुण तेच शिवगण, मनोविकार तेच पशु किंवा प्राक्कर्म-वासना- संस्कार तेंच भूतपिशाच्चें, अशी पिंडांतर्गत धारणा करून अंतर्मुख स्फूर्ति- द्वारां शिवसायुज्य पावावें, हेंच श्रेयस्कर होय.

चरितानि विचित्राणि गुह्यानि गहनानि च ।
ब्रह्मादीनाञ्च सर्वेषां दुर्विज्ञेयोऽस्ति शंकरः ॥

---

## प्रकरण १० वें

# लैंगिक शब्द व शिल्प

प्रत्यक्षमिह देवेन्द्र पश्य लिङ्गं भगाङ्कितम्।

—म. भा. अनु. १४।२२७.

योनिलिङ्गप्रकारेण जगत्सृष्ट्यर्थकारणम्
तथा संयोगभावेन कर्मरूपमुदाहृतम्। वातुलशुद्धागम
पीठे लक्ष्म भगाकृतिस्तु पुरतस्तूर्ध्वाग्रकं पिण्डिका।
रन्ध्रस्यापि गुणांशभागयुगले मूले प्रमर्द्दद्वयुक्॥

—सिद्धान्तसारावलि.

उमायै भगरूपिण्यै लिङ्गरूपधराय च।
शंकराय नमस्तुभ्यम् ...... ।

—कामिकागम

जगत्कारणरूप प्रकृति-पुरुष या द्वंद्वाचा निर्देश वर ज्याप्रमाणें निरनिराळ्या चिन्हांनीं केला आहे, त्याचप्रमाणें जगताच्या आरंभीं प्रकट झालेलें शिवाचें दिव्य ज्योतिर्लिंग अंडाकृति होतें— "तदण्डमभवद्धैमं सहस्रांशुसमप्रभम्॥" १।९ असें मनूचें वचन प्रसिद्ध आहे. शिवलिंगाची अथवा बाणाची आकृति बहुधा अंडाकृतिच असते. 'अणोरणीयान् महतोमहीयान्' अशा सर्व पदार्थांचें मूलस्वरूप अंडाकारच असतें. येथें आणखी एक महत्त्वाची गोष्ट सांगावीशी वाटते ती ही कीं, हा मृत्युलोक सोडला तर आधिदैवत जगांत अथवा परलोकांत स्थूल शरीरें जीवांस नसतात. अर्थात् देवलोकांत या लोकाप्रमाणें स्थूल इंद्रियें, त्यांचें मैथुनकर्म व तद्वारां प्रजनन संभवतच नाहीं. वास्तव शिवादि देवाधिदेवांना देहाकार पुरुषविध मानले तरी त्यांच्या ठिकाणीं भगलिंगादि इंद्रियकल्पना व मैथुन कल्पना अत्यंत निराधार व असंबद्ध होय. पण शिवपार्वतीच्या कित्येक कथा-प्रसंग-वर्णनांत, शिव व शक्ति यांच्या प्रतीक-प्रतिमांच्या शिल्पांत व जगत्कारणरूप शिवशक्तीच्या उपपत्तींत अगर मीमांसेंत आक्षेपकांच्या आक्षेपक दृष्टीस जें क्वचित् अश्लील किंवा निंद्य आढळतें, त्या पिसाचा कावळा होऊन सारीच शिवलिंगोपासना निंद्य अशी कावकाव सुरू

होते पण विचारपूर्वक पाहू जाता, तेथें मुळात वस्तुत निंद्य असें काहींच नसतें आता आपल्या प्राचीन शास्त्रकारांनीं आपल्या संदिग्ध, लाक्षणिक, सांकेतिक, दूरान्वयी किंवा गूढ व परोक्ष भाषेनें अशा आक्षेपास का अवसर द्यावा, हें आता शास्त्रकारास कोण विचारणार? विश्वामित्र व दुर्वास यांची छळक बुद्धि, भृगूची शिवनिंदा, नारदाचा चहेलोर स्वभाव, याबद्दलचा जाब आता कोण कोणाकडून घेणार? तसेंच वैदिक अश्वमेधादि प्रकरणात, कित्येक तन्त्रात व आगम-ग्रंथात व पुराणात अश्लीलतेच्या आक्षेपास अवसर का असावा, हें कोण सांग-णार? कदाचित् असें असेल कीं, तरुण तरुणींस गुह्यगोपनाचें अगत्य वाटतें तसें अर्भकास व वृद्धास वाटत नाहीं कदाचित् काहीं वृद्ध शास्त्रकाराचा लैंगिक-भावातिशय हा प्रकृतिधर्महि असेल अर्वाच्य बोलणें हाच कित्येकाचा स्वभावधर्म असतो अत्याश्रमी व विधिनिषेधातीत झालेल्या शास्त्रकाराना श्लील आणि अश्लील हा भेद जाणवत नसला किंवा पामर व विषयी अशा सामान्य जनतेला चटकन् कळेल व पटेल अशी फटकळ भाषावर्णनशैली त्याना योग्य वाटली असल्यास काय सांगावें? काहीं असो शास्त्ररहस्यानुकूल दृष्टि ठेवून अर्थ लावणें हेंच आपलें कर्तव्य आहे

पुष्कळ वेळा शास्त्रातील शब्दाचे उत्तानार्थ सोडून त्याचे सूक्ष्म लक्ष्यार्थ मात्र ग्रहण करावयाचे असतात आपल्या प्राचीन वाङ्मयात वापरलेली परोक्ष भाषा कधीं कधीं इतकी विलक्षण असते कीं, तिच्या उत्तानार्थाच्या अगदीं उलट लक्ष्यार्थ असतो नागवें अगर नागडें सत्य यातील नागडें हा शब्द अश्लील वाटला तरी त्याचा अर्थ शुद्ध, केवल असा असतो कधीं कधीं अगदीं थोड्या साधर्म्यावरून मैथुनाचा दृष्टान्त देतात शिव या अधिष्ठानावर चिच्छक्तीच्या स्पंदनक्रीडात्मक क्रियेला विपरीत रति असा दृष्टान्त देतात मूळ पुरुष प्रकृति अरूप असूनहि त्यांचें दांपत्य मानल्यामुळें सृष्टिक्रिया म्हणजे त्याचा रतिविलास असें वर्णन ओघास येतें पण त्यात लैंगिक भावना नसते. लिंग, योनि, रेत, मिथुन या शब्दाच्या ग्राम्य उत्तानार्थाहून त्याचे लक्ष्यार्थ अगदींच वेगळे असू शकतात उदाहरणार्थ, लिंगपुराणात (पू अ. १७) प्रधा-नाला म्हणजे प्रकृतीलाच लिंग म्हटलें आहे शास्त्रात पृथ्वीला योनि किंवा माता म्हटलें आहे द्यौ हा पिता मानला आहे रेत म्हणजे मन किंवा विचार

अथवा बोध असाहि अर्थ संभवतो. कालिदासानें शब्द आणि अर्थ या जोडीला शिवपार्वतींचें मिथुन मानलें आहे. पण त्याच्या लक्ष्यार्थात अश्लीलता कोठेंच नाहीं. आतां प्रजोत्पादन करणाऱ्या अथवा सुखोपलब्धि करणाऱ्या अशा ग्राम्य मैथुनाची परिभाषाहि दृष्टान्ताखातर अथवा रूपकाखातर कोठें कोठें शास्त्रांत वापरलेली आढळली, तरी त्यायोगें दार्ष्टान्तिक विषयाला अश्लीलता येत नाहीं. साराश, शिवलिंगाच्या ठिकाणीं शिश्नयोनिमिथुनाची ग्राम्य कल्पना मुख्य नाहीं हें जरी खरें असलें, तरी कोठें कोणीं तशी कल्पना केली असली तरी उपासनेच्या वेळीं उपास्याच्या दिव्यभावांत भगलिंगांचा उत्तानार्थ न घेतां सूक्ष्मकारणरूपांत लक्ष्यार्थच उपासकांनीं ध्यानीं घेतला पाहिजे, हें कोणालाहि अमान्य होईल, असें वाटत नाहीं.

बचनागासारख्या काहीं वनस्पति विषारी असल्या तरी त्या शुद्ध करून रसायनरूप करून घेतात. जहद्जहल्लक्षणेंत शब्दप्रयोगांतील कांहीं अंश टाकावयाचा असतो. फणस, नारळ अशा फळांत टाकण्याचाच भाग जास्त असतो. त्याचप्रमाणें शिवलिंगाच्या वर्णनांत अश्लील भावना असली तरी ती टाकावयाची असते, असें समजावें. नाहीं तरी शिवलिंगाच्या ठिकाणचा निकृष्ट खनिज कोटींतील पाषाणभावाचा बाध करूनच उपासकाला शिव या उपास्याची उपासना करावी लागते. त्याचप्रमाणें कांहीं शास्त्रकारांनीं अथवा शिल्पकारांनीं तेथें क्वचित् जननेंद्रियाचा भाव गृहीत धरला असला तरी तो शिवशक्तींची सृष्टिकारणता दाखविण्यापुरता आलंबनमात्र आहे, हें ध्यानीं घेऊन, त्या ठिकाणची जघन्य इंद्रियांची दृष्टि सोडून द्यावी. अरूप अशा मूळपुरुष-मूळमायेला, पुरुषप्रकृतीला, किंवा अपुरुषविध अशा परमशिवशक्तीला इंद्रियें कोठून असणार! हा विचार अगदीं सरळ व उघड आहे. शिवपरिवाराला पुरुषविध अथवा आपल्याप्रमाणें देहाकार मानलें तर पंचमुखी शिव, हिमाचल पर्वताच्या पोटची पार्वती, गजमुखधारी गणेश, अग्नीनें गर्भ धारण केलेला व कृत्तिकांनीं पोसलेला षडानन कार्तिकेय, नंदी, कबंध, भृंगि, तुंबर असले विलक्षण देहधारी शिवभक्त, अशा लोकविलक्षण आधिदैविक व्यक्तींच्या ठिकाणीं मानवाप्रमाणें जननेंद्रियांची कल्पना करणें अत्यंत अयुक्तिक आहे. आधिदैविक जगांतील व्यक्तींना आपल्याप्रमाणें स्थूल शरीरें नसतात. अर्थात् तेथें मैथुन व मैथुनी प्रजाच संभवत नाहीं. हें आज आधुनिक परलोकविद्येच्या

प्रयोगातहि निर्विवाद कळून येतें वास्तव जघन्य जननेंद्रियाची सत्यवत् कल्पना आधिदैवताहूनहि अति सूक्ष्म व व्यापक अशा शिवशक्तीच्या ठिकाणी करणें याहून अविवेक तो कोणता? शिवाय मी यापुढें या प्रकरणात असें स्पष्टच दाखविणार आहें कीं, पृथ्वीवरील शिवशक्तीच्या असंख्य शिवलिंगात शिश्नयोनि या इंद्रियाचें सारूप्य अत्यंत अपवादभूत स्थळींच आढळलें तर आढळेल सामान्यत तें कोठें नाहींच नाहीं

व्यास आज आपण अश्लील समजतों अशा शिश्नयोनिमैथुनसंबंधीं कल्पना उपमेसाठीं वापरलेल्या आपल्या शास्त्रीय वाङ्मयात कोठें कोठें आढळतात, हें खरें असलें, तरी त्यात ग्राम्य व अश्लील भाव अभिप्रेत नाहीं, हें तितकेंच खरें आहे तसेंच लिंग या शब्दाचा शिश्न असा अर्थ होणें शक्य असलें तरी तो त्याचा मुख्यार्थ खास नव्हे लिंग याचे मुख्यार्थ स्वरूपबोधक चिन्ह, खूण, साधन, हेतु, आराध्यदैवत, प्रतिष्ठा, व्याकरणलिंग, उपाधि, सांख्याची प्रकृति, परमात्म्याचें प्रतीक असे संभवतात योनि या शब्दाचेहि मुख्यार्थ कारण, प्रकृति, जाति असे संभवतात

तसेंच रेतस याचा अर्थ बीज, कारण किंवा विस्तार असाहि होतो मिथुन म्हणजे जुळलेलें, जोडपें, युग्म असा अर्थ होतो शिश्नदेव याचा अर्थ अब्रह्मचारी, शिश्नपरायण इतकाच समजावा

कामदेव हें कांहीं शिवाचें मुख्य नाव नव्हे उलट कामारि हें शिवाचें अन्वर्थक नाव आहे शिव आणि रुद्र या नावाच्या व्युत्पत्तींत अश्लील असें कांहींच नाहीं शिव या शब्दाच्या शी या धातूपासून धूतपापेश्वर असा अर्थ

---

१ "तव वैकुंठपीठीचें लिंग", "आता शातीचें लिंग"–ज्ञा० १६।१२६

२ "तेथ मी नमस्कारा–। लागीं उरो दुसरा। तऱ्ही लिंगभेद पऱ्हा। जोडू जावों॥"–अमृतानुभव १।५१

३ "अव्यक्तात्तु पर पुरुषो व्यापकोऽलिंग एव च।" कठ २।३।८ "न चेशिता नैव च तस्य लिंगम्।" श्वे ६।९ "महदाद्य विशेषान्त लिंगम्।" मै ६।१०, ३०, ३१ लिंगधारणचंद्रिका

४ आपटे याचा संस्कृत कोश पहा यजु ३२।१९, शु॰ य १३।३; श्वे ४।११, गीता ५।५ पहा

होतो. तोच अर्थ रुद्र या शब्दाचा रुद् या धातूपासून संभवतो. रुद्राला यज्ञसाधम (ऋ. १।११४।४), परोपकारी देवता, असेंहि रुद्रसूक्तांत म्हटलें आहे. रुद्र आणि शिव तत्त्वतः एकच. (परमात्मा मुनिश्रेष्ठा नित्यशुद्धः स्वभावतः। विशुद्धोऽयं तथा रुद्रः पुराणे शिव उच्यते ॥ लिं. पु. पू. ३।१०.) शिवलिंगाच्या ठिकाणीं रुद्र व शिव हीं दोन्ही ईश्वराचीं रूपें अथवा अवस्था असतात. (लिं. पु. अ. १८।१-३). शिवपुराण सांगतें कीं, "भगवन्तं महादेवं शिवलिङ्गं प्रपूजयेत्। लोकप्रसविता सूर्यस्तच्चिह्नं प्रसवाद्भवेत्॥ १०५॥ लिङ्गे प्रसूतिकर्तारं लिङ्गिनं पुरुषो यजेत्। लिंगार्थगमकं चिह्नं लिङ्गमित्यमिधीयते॥ १०६॥ लिङ्गमर्थं हि पुरुषं शिवं गमयतीत्यदः। शिवशक्त्योश्च चिह्नस्य मेलनं लिङ्गमुच्यते ॥ शि. पु. वि. सं. १६।१०७. (तदेव लिङ्गं प्रथमं प्रणवं सार्वकामिकम्। इत्यादि).

चिउम हा हिन्त्यू लोकांचा शिश्नप्रतीक देव असला तरी आपला शिव हा त्यापेक्षां फार प्राचीन आहे. त्याना कांहीं संशोधकांच्या मताप्रमाणें चिउमशीं संबंध नाहीं. तसेंच कांहीं आधुनिकांच्या म्हणण्याप्रमाणें शिव हा द्राविडाचा देव मानला व शिवलिंग हें अवैदिक लिंगायतांचें उपास्य मानलें, तरी द्रविड व लिंगायत यांची त्यासंबंधीं अत्युच्च ब्रह्मभावना अगदीं स्पष्ट दिसून येते. [प्रा. साखरेकृत 'लिंगायतांचा इतिहास आणि तत्त्वज्ञान' पहा]

लिंग हा शब्द लिङ्-जाणणें या धातूपासून झाला आहे, असेंहि सांगतात. अर्थात् लिंग म्हणजे ज्ञान, आत्मज्ञान किंवा परमेश्वरी ज्ञान असा अर्थ होतो. कूर्मपुराण ११।२४, लिं. पु. १९, अग्नि पु. ५३ या सर्व ठिकाणीं लिंग म्हणजे परब्रह्माचें ज्ञापक मूर्त स्वरूप असें सांगितलें आहे. ॐकार हेंच लिंग होय, असें आगमवचन आहे. लिंग म्हणजे लयस्थान असाहि अर्थ पुराणांत दिला आहे. ("लयं गच्छन्ति भूतानि संहारे निखिलं यतः। सृष्टिकाले पुनस्सृष्टिस्तस्माल्लिङ्गमुदाहृतम् ॥" सुप्रभेदागम; "लयनात् लिंगमित्युक्तं तत्रैव निखिलं जगत् ॥" शि. पु. रु. सं. १०।२८) लिंगपुराण पूर्वार्ध अ० ३ च्या आरंभींच सांगितलें आहे कीं, "अलिंगो लिंगमूलं तु अव्यक्तं लिंगमुच्यते। अलिंगः शिव इत्युक्तो लिंगं शैवमिति स्मृतम् ॥ १ ॥" अर्थात् अलिंग (निर्गुण शिव) हा शिवलिंगाचें मूळ असून अव्यक्त प्रकृतीस लिंग ही संज्ञा देतात. तेव्हां शिव निर्गुण व शक्ति अव्यक्त, यांच्या युग्माच्या ठिकाणीं ग्राम्य भावना कशी संभवेल!

शाश्र, लिंग, योनि, उपस्थ इत्यादि जे शब्द कोणास अश्लीलभाववाचक वाटतात, तसेच ते मानले पाहिजेत असें नाहीं

आता शिवलिंग म्हणजे शिश्नयोनि यांची प्रतिमा, निदान प्रतीक असें जे कोणी संशोधक ठासून सांगतात, त्यात कितपत सत्यार्थ आहे किंवा ती त्यांची पूर्वग्रहदूषित अतिशयोक्ति आहे, तें पाहू आक्षेपक म्हणतात कीं, शिवलिंगासंबंधीं शिल्पशास्त्र असें सांगतें कीं, लिंगाचा वरचा पूजाभाग शिश्नाच्या वरच्या भागा ( मण्या ) सारखा आणि खालील पीठाचा भाग योनीसारखा करावा. तसेंच शिल्पशास्त्रात लिंगाकरिता, पुंशिला व पीठाकरिता स्त्रीशिला घ्यावी असेंहि सांगितलें आहे हें जरी खरें असलें तरी शिवलिंगें सामान्यत शिश्नयोनिमिथुनसदृश असतात, हें म्हणणें खरें नाहीं आधिदैविक शिवलिंगें, आध्यात्मिक शिवलिंगें, तसेंच भौतिक लिंगापैकीं ज्योतिर्लिंगें, स्वयंभू लिंगें, स्थलमाहात्म्यलिंगें, दैविक लिंगें, गाणपत्यलिंगें, आर्ष लिंगें, प्रतिष्ठित लिंगें अशा अनेक शिवलिंगात निंद्य लैंगिक भाव संभवतच नाहीं, हें मागें प्रथम खंडात त्यांच्या प्रत्यक्ष रूपाकृतीवरून दिग्दर्शित केलें आहे शिवलिंगाचे चल आणि अचल असे मुख्य दोन प्रकार आहेत यात चल लिंगें हीं शिश्नयोनीप्रमाणें असावींत किंवा शिश्नाच्या लिंगमणिदर्शक अशा त्यावर ब्रह्मसूत्राच्या रेषा असाव्यात, असा मुळींच नियम नाहीं व चल लिंगें हीं शिश्नयोनीप्रमाणें असतहि नाहींत चल लिंगात पिंडिका आणि लिंग असे दोन वेगळे भाग नसतात लिंगायताचें लिंग व सनातनी हिंदूंच्या पंचायतनातील बाण अशा बहुतेक चल लिंगात पिंडिकेचा ( साळुंकेचा ) आकारहि नसतो काहींत तो अगभूत अव्यक्त मानतात याप्रमाणें पार्थिव व कृत्रिम शिवलिंगांपैकीं चल लिंगांचा एक मोठाच वर्ग या जघन्य लैंगिक आक्षेपातून सहज वेगळा पडतो ( एलेमेंट्स् ऑफ हिंदु आयकॉनोग्रॅफी, २।१।७९ ) 'सिद्धान्तसारावली' प्रमाणें बाणलिंगाचा आकार एक अष्टमांश अंगुलापासून एक हाताइतक्या लांबीचा व गाईच्या सडाप्रमाणें किंवा अंड्याप्रमाण असतो व त्याचा वर्ण जांभूळ, मध, कसोटी या वर्णांचा किंवा काळा, निळा, भडक तांबडा किंवा हिरवा असतो यात जननेंद्रियाशीं सादृश्य दाखविण्याचा हेतु दिसत नाहीं ( सदर १।१।१२ )

लिंगपुराण, पूर्वार्ध, अ. ३१।३२ यात सांगितलें आहे कीं, " तम, रज, आणि सत्त्व हे तीन गुण किंवा अग्नि, ब्रह्मा आणि विष्णु ह्या तीन मूर्ति

शिवाच्या एका लिंगांत आहेत. या लिंगांतच ब्रह्म आहे, म्हणून श्रेष्ठ ब्राह्मण यथाशास्त्र लिंग करून त्याची पूजा करतात. लिंग हें अंगठ्याएवढें सुंदर असावें, तें वाटोळें अष्टकोनी किंवा षोडशकोनी असावें. त्याची साळुंका त्याच्या दुप्पट गोमुखासारखी असावी. वेदिकेचा विस्तार तिप्पट असावा. हिचा आकार वाटोळा, त्रिकोणी, चतुष्कोनी किंवा षट्कोनी करावा. ही स्वच्छ शुभ्र असावी. त्या लिंगावर "ॐकारासह पंचाक्षरी मंत्र म्हणून सद्योजातादि पांच मंत्रांनीं अभिषेक करावा." लिंगपुराणांतील लिंगसंबंधीं या शास्त्रीय "शब्द आणि शिल्पांत" शिश्नयोनिसादृश्य किंवा साधर्म्य अथवा ग्राम्य मैथुनभावना यत्किंचितहि नाहीं.

आतां अचल शिवलिंगाचे नऊ मुख्य प्रकार आहेत. ते स्वयंभू आदि पूर्वी सांगितलेच आहेत. त्यांपैकीं स्वयंभू लिंगें व ज्योतिर्लिंगें हीं निसर्गजन्यच असतात. त्यांचा आकार अमुकच प्रकारचा असेल असा मुळींच नियम नाहीं. महाबळेश्वर, केदारनाथ, त्र्यंबकेश्वर अशा अनेक ठिकाणीं खडकाच्या नैसर्गिक व अरूप भागासच शिवलिंग मानतात. दैविक लिंगें हीं अग्नीच्या ज्योतीप्रमाणें किंवा करांगुलीप्रमाणें असतात. त्यावरहि शिश्नयोनिदर्शक कांहींच चिन्ह नसतें. मानुष लिंगाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि स्थावर लिंगावर शिश्नयोनिसदृश चिन्ह असण्याचा संभवच नाहीं. मानुषलिंग (म्हणजे मनुष्यानें घडविलेलें शिवलिंग) हें सर्वांत निकृष्ट समजतात. (पं. गोपीनाथराव) आतां ज्या बहुविध लिंगप्रकारांपैकीं फक्त मानुष लिंगांत शिल्पकार शिश्नयोनिसादृश्य फारच क्वचित् दाखवीत असतील, त्यांचाहि विचार पाहूं.

या मानुष लिंगाचे तीन भाग असतात. पैकीं अगदीं तळाचा भाग चौकोनी असतो. त्याला ब्रह्मभाग म्हणतात. त्याच्यावरील भाग अष्टकोनी असतो. त्याला विष्णुभाग म्हणतात. त्याच्यावरील तिसरा म्हणजे सर्वांत वरचा भाग वाटोळा असतो. त्याला रुद्र भाग म्हणतात. अर्थात् ज्या शिवलिंगाच्या ठिकाणीं शिल्पशास्त्राप्रमाणें बुद्धिपुरःसर त्रिदेवांचे संकेत निरनिराळ्या आकारांत दाखविलेले असतात, त्यांत शिश्नसादृश्य असतें, असें कसें म्हणतां येईल? खालील चौकोनी आणि अष्टकोनी भागाचें शिश्न अगर योनि यांपैकीं कशाशींच सादृश्य नसतें.

आतां ज्यावर शिश्नदर्शक रेषा असतात असें म्हणतात, त्या रुद्र भागाचाच विचार पाहूं. या रुद्र भागाचे आकार शिल्पशास्त्राप्रमाणें छत्राकार, त्रिपुषाकार,

कुक्कुटाण्डाकार, अर्धचंद्राकार आणि बुद्‌बुदसदृश असे सांगितले आहेत. यांतहि शिश्नयोनिसादृश्य कोठेंच दिसत नाहीं. शिवाय या कृत्रिम मानुष लिंगात अष्टोत्तरशतलिंग, सहस्रलिंग, धारालिंग, शैवेष्ट्यलिंग आणि मुखलिंग असे मुख्य प्रकार आहेत. यातील पहिल्या दोन प्रकारात लिंगावर उभ्या पन्हळ्या पाडून त्यांत एकशें आठ किंवा हजार लिंगें कोरलेलीं दाखवितात. धारालिंगाला पैलू असतात. मुखलिंगाला एकापासून पांचपर्यंत मुखें असतात. तीं ब्रह्मा, विष्णु, महेश, सूर्य, किंवा सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष व ईशान अशीं असतात. कांहीं तर कायालिंगें असतात. त्यांत लिंगाला चिकटून उभी सबंध देहाकार मूर्तिच असते. लिंगोद्‌भव मूर्ति अशाच प्रकारची असते. तात्पर्य, या सर्व वर्णनावरून शिवालिंगें म्हणजे शिश्नयोनिचिन्हें असें म्हणतांच येतं नाहीं. आतां भीटा, गुडिमलम् व चैन्नतलाई हीं तीन लिंगें शिश्नयोनिसदृश आहेत, असें म्हणतात. परंतु भीटा येथील शिवलिंग हें मुखलिंग आहे, त्यावर पंचमुखें कोरलेलीं आहेत. तसेंच गुडिमलमचें शिवलिंग कायालिंग आहे म्हणजे लिंगांत सबंध मूर्ति कोरलेली आहे. अर्थात् त्यांना शिश्नसदृश म्हणणें व्यर्थच दिसतें. शिवाय तीं बौद्धकालीन असल्यास बौद्धांनीं तीं बुद्धिपुरःसरच तशीं केलीं असण्याचा संभव आहे. कारण कित्येक बौद्धकालीन शिवमूर्ति व गणेशमूर्ति मुद्दाम गौणगण्ड केलेल्या असल्याचें आढळतें. मोहनजोदडो येथील उत्खननांतून निघालेलीं शिवलिंगें व शिवलिंगाचे भाग, हे त्यांच्या फोटोवरून शिश्नयोनिसदृश आहेत असें म्हणण्याचें कांहींच कारण दिसत नाहीं. आतां शिल्पशास्त्र तसें आहे, असा कोणी आग्रह धरतील, तर त्याचा खुलासा असा करतां येईल कीं, येथील शुद्ध व पवित्र शिवलिंगाची अथवा जगत्कारणाच्या प्रतीकाची भगलिंगात्मक विकृत भावना जशी विदेशांत पसरली, तशी ती येथेंहि कोठें कोठें स्वीकारली गेली असल्यास त्यांत आश्चर्य नाहीं. तसेंच शिवलिंग हें जगत्कारणाचें प्रतीक तयार करतांना, प्रजोत्पादक इंद्रियाचें सादृश्य दाखविणें हें अंशतः सुसंगत वाटल्यावरून एखाद्या शास्त्रकारानें कदाचित् त्याहि साधर्म्याचा विनियोग शिल्पांतहि दाखवावा असें क्वचित् कोठें म्हटलेंहि असेल. पण इतर भरपूर पुरावा पाहतां त्या अपवादभूत कल्पनांना महत्त्व

१ Indian Budhist Iconography.

देण्याचें मुळींच कारण नाहीं. कारण जेथें शिश्नयोनिसादृश्य मुळींच मानतां येत नाहीं, अशींच शिवलिंगें असंख्य आढळतील.

बुद्धिपुरःसर विकृत भावनेचीं केलेलीं देशीविदेशी लिंगें कशींहि असोत, सामान्य भावनांच्या शिवलिंगप्रतीकांचा थोडक्यांत विचार करूं. शिवलिंगांत ( १ ) सूर्य व अग्नीप्रमाणें आधिदैविक लिंगें, आधिदैवत जगांत, ( २ ) स्वयंभू (मूलाधारचक्र), बाण (अनाहत चक्र), इतर किंवा पाताळ (आज्ञाचक्र) आणि पर ( स्वाधिष्ठानचक्र ) हीं मनोवृत्तिरूप अध्यात्मलिंगें आपल्या पिंडात व ( ३ ) भौतिक लिंगें भूलोकीं बाहेर मानलेलीं अगर स्थापन केलेलीं आढळतात. यापैकीं आधिदैविक लिंगें व आध्यात्मिक लिंगें यांत ग्राम्य व अश्लील भावना संभवतच नाहीं. तीं व्यापक शिवचैतन्याचीं ज्ञापक आहेत, म्हणून त्यांस शिवलिंगें म्हणतात. लिंगाष्टकस्तोत्रांतील सदाशिवलिंगें अशींच सूक्ष्म व गूढगंभीर आहेत. त्यांतील थोडा नमुना या प्रकरणाच्या अखेर पहा.

लिंगपुराणांत शिवलिंगाचें वर्णन केलें आहे तें असें:— "मूले ब्रह्मा तथा मध्ये विष्णुस्त्रिभुवनेश्वरः। रुद्रोपरि महादेवः प्रणवाख्यः सदाशिवः॥ लिङ्गवेदी महादेवी लिङ्गं साक्षान्महेश्वरः। तयोः संपूजनान्नित्यं देवी देवश्च पूजितौ॥" अर्थात् शिवलिंग हें त्रिदेवाचें प्रतीक आहे. त्याच्या पूजेंत सर्व देवदेवताची पूजा केल्याप्रमाणें होतें. हाच सूक्ष्म व व्यापक भाव बोधसारांत निराळ्या पद्धतीनें सांगितला आहे : "आकाराः कल्पिता यस्या ब्रह्माद्याः स्थिरजङ्गमाः। तन्मृत्तिकामयं शैवैः शिवलिंगं प्रपूज्यते ॥ ५ ॥ मृत्सत्या यच्छरावास्तु श्रुता ब्रह्माण्डकोटयः। हराय नम इत्येवं ग्राह्या सा मृत्तिका बुधैः ॥ ६ ॥ अखण्डाकारवृत्तिस्तु वेदान्ते या निरूपिता । नमो महेश्वरायेति लिंगसंघट्टनं हि तत् ॥ ७॥ त्यक्त्वा सम्भावनां तद्विपरीतत्वभावनाम्। शूलपाणिः प्रतिष्ठाप्य पीठे निष्ठामये बुधैः ॥ ८ ॥ सर्वगस्यापि देवस्य भक्तिरावाहनं तव । आवाहयामि भक्त्या तमित्यावाह्यः पिनाकधृत् ॥ ९ ॥ इ० " सारांश, त्रिकालाबाधित सत्य अथवा ब्रह्म हें जें सर्वोपादान त्या मृत्तिकेचें शिवलिंग तयार करावें. तें करतांना अष्टधा प्रकृति व आपला जीवभाव हें द्वैतजाल दूर करणाऱ्या हराला प्रणाम करावा. अर्थात् हरस्मरणांत समस्त द्वैतभाव विसरावा व ब्रह्माकार वृत्तींतच लिंगसंघटन झालें असें अनुभवावें व महेश्वराला वंदन करावें. नंतर शान्ति, वैराग्य व बोधरूप शूलपाणीला नमन करावें.

नंतर असंभावना व विपरीत भावना यांचा त्याग करून उपासकानें ब्रह्माचें, गुरु व परब्रह्म ह्यांच्या ऐक्यबोधस्वरूप शिवलिंगाचें प्रणवरूप पिनाकधृत् या नावानें आवाहन करावें यानप्रमाणें आध्यात्मिक शिवलिंगाचें वर्णन आहे. अग्नि आणि सूर्य हीं शिवलिंगें आधिदैविक असलीं तरी त्याचें अनश्लील रूप प्रत्यक्ष दृष्टिगोचर होतच असतें यानप्रमाणें त्रिविध शिवलिंगापैकीं निदान दोन-तृतीयांश शिवलिंगें ग्राम्य व अश्लील या दोषातून सर्वस्वीं मुक्त आहेत. आता भौतिक लिंगें राहिलीं. त्यासबंधीं विचार करू व्यासशिष्य सूत सांगतात कीं, सारी भूमि व जगत् लिंगमय आहे. लोकावर अनुग्रह करण्याकरिता लिंग-रूपानीं क्षेत्राक्षेत्राच्या ठिकाणीं शिव प्रकट झाले आहेत. जेथें जेथें शिव-भक्तांनीं स्मरण केलें तेथें तेथें लिंगरूपात शिव राहिले आहेत. याप्रमाणें शिवभक्तांनीं प्रस्थापित केलेल्या शिवलिंगाची संख्या असंख्य आहे त्यापैकीं पुष्कळांचीं वर्णनें स्कद, शिव इ. पुराणात स्थलमाहात्म्यासह सविस्तर केलेलीं आढळतात. त्यात ग्राम्य अथवा अश्लील भावनाचा लवलेशहि आढळत नाहीं. लिंग म्हणजे परमेश्वराचा अवयव नव्हे. देवभक्तांनीं स्थापन केलेलें लिंग तोच परमेश्वर [ य एव स्थापयेल्लिंग स एव परमेश्वर । लिं पु उ अ ४७।४९ ] अशी निरवयवाची भावना तेथें करण्यास सांगितलें आहे

आध्यात्मिक चरलिंगात उपस्थेंद्रियाप्रमाणें नाभि, जिह्वा, नाकाचा शेंडा, शिखा हीं आध्यात्मिक लिंगें मानलेलीं आहेत. हीं सर्व सामग्र्यानें लक्षात घेतलीं तर त्यात ग्राम्य अश्लीलता दिसत नाहीं. ( लिंग नाभिस्तया जिह्वा नासाग्रश्च शिखा क्रमात् । कट्यादिषु त्रिलोकेषु लिंगमाध्यात्मिक चरम् ॥ ४४ ॥ ( शि पु वि सं )गुरुभक्तीला गुरुलिंग म्हणतात (शि पु वि सं अ. १८)

साराश, वस्त्रात सूत अनुस्यूत असतें, त्याप्रमाणें शिव सर्वत्र ओतप्रोत व्यापून आहे, अशी दृढ भक्तिभावना करणें, हीच मुख्य शिवलिंगपूजा मानली आहे या विश्वात सत्, असत्, व्यक्त, अव्यक्त इत्यादि सर्व काहीं जें आहे तें महादेवच होय तो नित्य असून एक व अनेकरूप आहे. आदि, मध्य व अत यानीं तो रहित असून अचिंत्य ज्ञान व ऐश्वर्य त्याच्याच ठिकाणीं वास करतें. जें कोणत्याहि बीजापासून निर्माण झालें नाहीं; पण ज्या बीजापासून सर्व ब्रह्माण्ड निर्माण झालें आहे, असें तें सकल स्वरूप भगवान् शकरच जाणावे. असें उपमन्यु इद्राला सागत असल्याचें अनुशासनपर्व अ. १४ यात वर्णिलें आहे.

तात्पर्य, मी आतांपर्यंत या प्रकरणांत व खं. १, प्र. ६ यांत ज्या शिवलिंगाचें सविस्तर वर्णन केलें आहे, त्यांत ग्राम्य व अश्लील भावना कोठेंच संभवत नाहीं. वर जीं उपस्थादि अध्यात्मलिंगें सांगितलीं आहेत, त्यांची उपासना सांगितली नाहीं, हें लक्षांत घ्यावें.

श्रीमत् शंकराचार्यांचें ब्रह्मसूत्रभाष्य, अ. ३ पा. ३, सू. ५७ यांत म्हटल्याप्रमाणें श्रुतींत व्यस्त उपासनेची म्हणजे परिच्छिन्न कल्पनांच्या उपासनेची निंदा सांगितली आहे. मुख्यान्या समस्त उपासनेचेंच प्राधान्य आहे. (छां. ५।१८।१–२; ५।१२।१–२) यावरून शिवलिंग हें जननेंद्रिय मानल्यास ही देहाकार शिवाची व्यस्त उपासना निंद्य ठरेल [ पुढें ब्रह्मसूत्रें ५८, ५९, ६० पाहावीं ] अर्थात् आज हजारों वर्षें जी शिवलिंगोपासना या भारतवर्षांत शिष्टमान्य झाली आहे, ती इंद्रियप्रतीकांची उपासना नव्हेच, हें उघड होतें.

शिवाय प्रजोत्पत्तीला कारण शिश्न-योनि हीं इंद्रियें आहेत असें म्हणणें, हें अगदींच अशास्त्रीय व अयुक्तिक आहे. कारण अतिसूक्ष्म अशी शरीरोत्पादनप्रक्रिया गर्भाशयाच्या आंत होते. तसेंच अत्युत्कट विषयानंदाचें अनुभवस्थानहि इंद्रियें नव्हत. तें स्थान मेंदु किंवा मन होय. इंद्रियें हीं जड आहेत. त्याना सुख व आनंद या संवेदनाच नाहींत. वस्तुतः परमार्थांत वैषयिक भावना व आकांक्षा संभवत नाहींत. तरी ' तुष्यन्तु दुर्जनाः ' न्यायानें त्या स्वीकारल्या तरी त्या दृष्टीनेंहि स्थूल व जड इंद्रियगोलक हे उपासनीय ठरत नाहींत.

सूतसंहितेंत म्हटलें आहे कीं, (खं. ४ अ. २८) " शिव एव स्वयंलिंगं लिंगं गमकमेव हि। शिवेन गम्यते सर्वं शिवो नान्येन गम्यते ॥ २॥ अतः सत्यचिदानंदलक्षणः परमेश्वरः। स्वयमेव सदालिंगं न लिंगं तस्य विद्यते ॥ २९ ॥" अर्थात् शिवलिंग म्हणजे अवयव किंवा इंद्रिय नव्हे.

वस्तुतः शिवलिंग हें जगत्कारणाचें प्रतीक आहे. या जगत्कारणांत उत्पत्ति-स्थिति–लय; ब्रह्मा-विष्णु-महेश; सत्–चित्–आनंद व सत्त्व–रज–तम; अशा अनेक त्रिकांचा, चतुष्टयांचा, पंचकांचा व इतर समष्टींचा समावेश होतो. त्याचप्रमाणें या शिवलिंगाच्या ठिकाणीं तो होत असल्यामुळें यांपैकीं केवळ उत्पादनक्रियेलाच प्राधान्य देऊन शिवलिंगप्रतीकाचा स्वरूपनिर्णय करणें अपुरें व चुकीचें होईल. तसेंच प्राणिमात्राच्या पिण्डाच्या उत्पादनक्रियेंत ज्या

शिश्नयोनि या इंद्रियांना प्राधान्य असतें, त्या पिंडातर्गत इंद्रियांच्या प्रतीकांचा भास या ब्रह्माण्डाच्या कारणाच्या वर्णनांत किंवा प्रतीकांत क्वचित् कोठें दर्शविलेला असला, तरी तें शिवलिंगाचें यथार्थ स्वरूप आहे, असें म्हणतां येणार नाहीं. कारण ज्या ठिकाणीं हें सर्व समाविष्ट होतें व लय पावतें तें लिंग, अशी लिंग या शब्दाची व्याख्या आहे. अर्थात् या केवळ संहारकार्याला अनुलक्षून केलेल्या घोर स्वरूपाचें निदर्शन हेंहि शिवलिंगाचें यथार्थ व संपूर्ण स्वरूप असें म्हणतां येणार नाहीं.

याउलट जेव्हां जगत्कारणाला आदिब्रह्मा, महाविष्णु, महारुद्र, महादेव, सदाशिव, चिच्छक्ति इत्यादि नांवें दिलेलीं आढळतात, तेव्हां नामभेदानें सर्वांचा लक्ष्यार्थ एकच असतो. अर्थात् महिमाहि तोच तो असतो. रुद्रहृदयोपनिषदात हीच गोष्ट सुस्पष्ट केली आहे. त्यात जगत्कारणाचा व्यापक भाव उघड होतो.

दक्षिण हिंदुस्थानांत प्राचीन शिवभक्तांचीं मंदिरें आहेत. या भक्तांच्या ठिकाणीं उत्कट शिवभक्ति व त्यासाठीं निस्सीम त्याग हेच गुण प्रामुख्यानें दिसतात. या भक्तांच्या मंदिरांतून कांहीं ठिकाणीं भक्तांच्या मूर्ति तर कांहीं ठिकाणीं शिवलिंगप्रतीकेंच आहेत. साधुपुरुषांच्या समाधीवरहि शिवलिंग

---

१. सर्वदेवात्मको रुद्रः सर्वे देवाः शिवात्मकाः। रुद्रस्य दक्षिणे पार्श्वे रविर्ब्रह्मा त्रयोऽग्नयः ॥ ४ ॥ वामपार्श्वे उमादेवी विष्णुः सोमोऽपि ते त्रयः। या उमा सा स्वयं विष्णुर्यो विष्णुः स हि चन्द्रमाः ॥ ५ ॥ ये नमस्यन्ति गोविन्दं ते नमस्यन्ति शङ्करम्। येऽर्चयन्ति हरिं भक्त्या तेऽर्चयन्ति वृषध्वजम् ॥ ६ ॥ ये द्विषन्ति विरूपाक्षं ते द्विषन्ति जनार्दनम्। ये रुद्रं नाभिजानन्ति ते न जानन्ति केशवम् ॥ ७ ॥ रुद्रात् प्रवर्तते बीजं बीजयोनिर्जनार्दनः। यो रुद्रः स स्वयं ब्रह्मा यो ब्रह्मा स हुताशनः ॥ ८ ॥ ब्रह्मविष्णुमयो रुद्र अग्नीषोमात्मकं जगत्। पुँल्लिङ्गं सर्वमीशानं स्त्रीलिङ्गं भगवत्युमा ॥ ९ ॥ उमारुद्रात्मिकाः सर्वाः प्रजाः स्थावरजङ्गमाः। व्यक्तं सर्वमुमारूपमव्यक्तं तु महेश्वरम् ॥ १० ॥ उमाशङ्करयोगो यः स योगो विष्णुरुच्यते। यस्तु तस्मै नमस्कारं कुर्याद्भक्तिसमन्वितः ॥ ११ ॥ आत्मानं परमात्मानमन्तरात्मानमेव च। ज्ञात्वा त्रिविधमात्मानं परमात्मानमाश्रयेत् ॥ १२ ॥ —रुद्रहृदयोपनिषद्.

ठेवलेलें असतें. अशा या सर्व शिवालिंगाच्या ठिकाणींहि ग्राम्य व अश्लील भाव संभवत नाहीं.

स्कंदपुराण अवंतिखंड यांत चौऱ्यांशीं शिवलिंगांच्या स्थापनेच्या कथा आहेत. त्यांत कोणाकडून तरी पाप घडावें व त्याच पापाच्या क्षालनार्थ त्यानें ऋषींच्या सांगण्यावरून शिवलिंग स्थापन करून त्याच्या उपासनेनें मुक्त व्हावें व मग तें शिवलिंग त्या तपश्चर्येचें स्मारकस्थान म्हणून प्रसिद्ध व्हावें, असे प्रकार वर्णिले आहेत. तात्पर्य, अशीं जीं शिवलिंगें कोणा तरी व्यक्तीचीं किंवा त्याच्या तपश्चर्येसारख्या कांहीं एक विशेष घटनेचीं स्मारकचिन्हें आहेत, तेथें अश्लील किंवा लैंगिक भावनेचा हेतु संभवतच नाहीं.

शिवलिंगाची आकृति शिश्नयोनीसारखीच असते हें म्हणणें फार तर अगदींच थोडे अपवाद सोडून खरें नाहीं[1]. शिवलिंग म्हणजे शिवाचें जननेंद्रिय असें म्हणण्यांत, शिव हा मानवदेहधारी मानावा लागतो. त्याचेंच इंद्रिय पूजनीय कां, इतर देवांचें कां नाहीं, तसेंच ह्या पूज्यतम देवाचें जननेंद्रियच पूज्य कां; शिर, पाय हे पूजनीय का नाहींत, तें सांगतां येत नाहीं.[2]

---

1. *This also is merely prejudice and the result* of the obsession of the idea of phallic worship, when it is seen that innumerable Shivalingas everywhere else in the land are all of a common shape having not even the slightest resemblance to the phallus answernig the description of the Lingas of the places. The three exceptions in those places need not prejudice and lead to the idea that all Lingas are phallic in shape. They should not be seriously taken and affect the inner meaning and the basic idea of the Shivalinga. ( History and Philosophy of Lingayat's, Introduction, p. 315.)

2. Thus if Linga is the phallus of Shiva, he must have a human form; but it is gratuitous assumption and

( टीप पुढील पृष्ठावर पहा )

जन्मदुःखविनाशनलिंगं तत्प्रणमामि सदाशिवलिंगम् ।
कामदहं करुणाकरलिंगं दिनकरकोटिप्रभाकरलिंगम् ॥
सर्वसमुद्भवकारणलिंगं अष्टदरिद्र्यविनाशनलिंगम् ।
परात्परं परमात्मकलिंगं तत्प्रणमामि सदाशिवलिंगम् ॥

—लिंगाष्टकस्तोत्र

---

प्रकरण ११ वें

# शिवालयांतील इतर चिन्हें

**यादृशीं भावनां कुर्यात् । सिद्धिर्भवति तादृशी ॥**

कित्येक आक्षेपकांचें असें म्हणणें आहे कीं, शिवालयांतील सारीं चिन्हें ज्या अर्थी अश्लीलभावसूचक असतात, त्या अर्थी शिवलिंगांतहि तसाच भाव असला पाहिजे व मानला पाहिजे. कावीळ झालेल्या मनुष्याला सारेंच पिवळें दिसतें, त्याप्रमाणें लैंगिक पूर्वग्रह असणाराला सर्वत्र तसेंच दिसतें. उदाहरणार्थ,

---

(टीप मागील पृष्ठावरून चालू)

a mere fancy without any proof, simply because some men have imagined Gods to be after themselves. Moreover even if Linga is phallus why should it be the linga of Shiva only ? Did Shiva alone have phallus and no other Gods ? It is certainly unimaginable. And why phallus of Shiva alone be the object of worship and of no other God ? No satisfactory explanation can be given to this question. It is therefore clear that Linga is not phallus but only a mark. ( History and Philosophy of Lingayats by M. R. Sakhare, p. 323-24 ).

आक्षेपकांस (१) शिवलिंगावरील दुचोटी गंध व मध्यें तिलक, हें शिश्नयोनि प्रतीक, (२) शिवलिंगावरील बिल्वपत्राचें त्रिदळ हें शिश्नवृषण प्रतीक, (३) देवालयाच्या गर्भागाराचें लहान मेहरप असलेलें द्वार हें योनिद्वार, (४) पुढें गर्भागारांतील अंधारांत असलेलें शिवलिंग हें मैथुनप्रतीक, (५) देवालयांतील घंटा हें शिश्नयोनिप्रतीक, (६) देवालयाच्या घुमटा-खालील सभामंडपाच्या मधील कांसवाची बाहेर काढलेली मान शिश्नप्रतीक, (७) बाहेरचा नंदी वृषणप्रतीक, (८) देवालयापुढील निशाणकाठी, दीपमाळ, जवळच्या तळ्यांतील पुरलेला खांब, देवालयाच्या घुमटाचें टोंक, हीं सारीं शिश्न-प्रतीकें; याशिवाय (९) क्वचित् देवळाच्या भिंतीवर कोरलेलीं किंवा काढलेलीं साक्षात् मैथुनचित्रें, हा सारा आक्षेपकांचा शिवलिंगोपासनेच्या अश्लीलतेचा बिनतोड पुरावा आहे. याचा समुच्चयानें वाचकांच्या मनावर अनिष्ट परिणाम होण्याचा संभव आहे. पण त्यास माझा इलाज नाहीं. चिखलांतील धोंडा काढून टाकून देण्यासाठीं तो हातांत घ्यावा लागतो. असो. वरील आक्षेपाचा क्रमशः विचार करूं. हें एक खरें आहे कीं, या साऱ्या अश्लील लैंगिक भावना 'शिश्न-देवां'च्या शिवलिंगाच्या सन्निधच असतात असें आक्षेपकांस दिसतें. यामुळें खुलासा करतां येणें अंशतः सोपें होणार आहे.

(१) **सतिलक गंध** — हें चिन्ह केवळ शिवलिंगावरच असतें असें नाहीं. इतर अनश्लील मानलेल्या देवतांच्या मस्तकावर पण हें उभें आडवें गंध व तिलक असें चिन्ह असतेंच. "त्रिधेति व्रीडाजुगुप्सामंगलव्यंजकत्वात्" अशी 'काव्यप्रकाशा' त अश्लीलपदाची व्याख्या केली आहे. थोडक्यात अश्लील म्हणजे असभ्य असें म्हणतां येईल. पण देवतांच्या व थोर शिष्टांच्या मस्तकीं शोभणारें गंध असभ्यपणाचें द्योतक कसें असेल? उलट तें सुस्नात शुचिता-दर्शक व मंगलार्थींच मानलें जातें. शिवाय गंधाचें चिन्ह कपाळावर असतें. गुह्येंद्रियें त्याचें स्थान नव्हे. उलट शिवाचा मदन दहन करणारा तृतीय नेत्र हें मात्र त्याचें स्थान आहे. साधनाभ्यासी जेथें प्रकाशज्योति पाहतात, असें तें भ्रूमध्याजवळील स्थान आहे. तेथें मन एकाग्र केल्यास मनोविकारावर ताबा मिळतो. तेथें जवळच आज्ञाचक्र, मनश्चक्र, सोमचक्र अशीं सूक्ष्म शक्तिकेन्द्रें पण आहेत. तें गुरु-शिष्यांच्या भेटीचें स्थान आहे. अशा त्या मंगलमय स्थानीं सौभाग्यवती स्त्रिया पण प्रणवाकार गोंदतात व तेथेंच हळद-कुंकू

लपवतात. असें जें मस्तकावरील शुचिर्भूतपणाचें मंगलसूचक चिन्ह त्या ठिकाणीं शिश्नयोनीची कल्पना करणें याहून आचरट व असंबद्ध तें दुसरें काय असणार!

( २ ) बिल्वपत्रः— या ठिकाणींहि शिश्नरूपणाची कल्पना वरीलप्रमाणेंच अत्यंत अप्रयोजक व निराधार आहे. अगोदर शिवलिंग हेंच जर आक्षेपकांच्या मतें शिश्नयोनिप्रतीक आहे, तर त्याच्या अश्लीलतेच्या पुराव्यासाठीं आणखी वर बिल्वपत्र व गंध कशाला पाहिजे ? बरें, ही अशी कल्पना करण्यापूर्वी ज्या शास्त्रानें शिवलिंगावर बेलाचें त्रिदळ वाहावयास सांगितलें आहे, त्या शास्त्रानें बिल्व वृक्षाचें काय माहात्म्य सांगितलें आहे, तेंच अगोदर पाहावयास नको काय ? बेलाच्या झाडाखालीं महादेव अव्यक्तलिंगरूपानें असतो व सर्व तीर्थे तेथें असतात असें सांगितलें आहे ( शि. पु. वि. सं. अं. २२।२२–३१ ). बिल्वकाष्ठाचें गंध शंकराला प्रिय मानलें आहे. ( शिवगीता, १।२७ ) पारमार्थिक साधनाभ्यासाच्या पंचवटींत बिल्ववृक्ष हा एक असतो. असें हें गूढ बिल्ववृक्षमाहात्म्य आहे. आता बेलाच्या त्रिदळासंबंधीं स्कंद पुराणांत अशी भावना आहे कीं, बिल्वपत्राचें डावें पान ब्रह्मदेव, उजवें विष्णु, मध्य शिवपार्वती, पाठीवर यक्ष व देंठाच्या ठिकाणीं इंद्रादि लोकपाल मानलेले आहेत. बेलाचें माहात्म्य अग्नि आणि शिवलिंग या दोन्ही ठिकाणीं आहे. यूप ( ऐ. ब्रा. ६।१ ), त्र्यंबकेष्टीमधील समिधा ( शत. ब्रा. १।३।३।१९–२० ) व आहुति ( श ब्रा. २।६।२।८ मध्यमेन पर्णेन जुहोति तै. ब्रा. १।६।१० ) यांत बिल्वकाष्ठ व बिल्वपत्र यांचें महत्त्व आहे. " सर्वकामप्रदं बिल्वं दारिद्र्यस्य प्रणाशनम् । बिल्वात्परतरं नास्ति येन तुष्यति शंकरः " ( तिथि तत्त्व. ) बिल्व महादेवस्वरूप आहे असें शिवमहापुराणांतील विश्वेश्वर संहितेंत अ. २२ यांत म्हटलें आहे. रुद्र तोच अग्नि हें सुप्रसिद्ध आहे. अग्निसंबंधानें जें बिल्वमाहात्म्य आहे त्यांत लैंगिक भाव संभवतच नाहीं. शिवलिंग हें याज्ञिकांच्या अग्नीचेंच स्पष्ट प्रतीक असल्यामुळें तेथें अश्लील कल्पना अत्यंत अप्रस्तुत आहे. याप्रमाणें याज्ञिक कर्मांत पळसाच्या अभावीं बिल्वाचें महत्त्व मानलें आहे. आतां बेलाप्रमाणें पळसाचेंहि त्रिदळ असतें. पण त्यांत लैंगिकसादृश्य कांहींच नसतें. अर्थात् बिल्वाचें त्रिदळ, निर्गुंडीचें त्रिदळ, दुर्वेचें त्रिदळ हीं त्रिदळें त्रिगुणात्मक सर्व भावार्पण कदाचित् सूचित करीत असतील. या विधींतील उद्दिष्ट

जरी मला निश्चित सांगतां न आलें तरी ईश्वरोपासनेसारख्या गंभीर कर्मांत ग्राम्य व अश्लील भावना संभवत नाहींत, इतकें मला समजतें.

कर्तृतंत्र शिवशक्त्युपासनेंत बेलाच्या त्रिदळावर अन्य भावना करणें असेल तर त्या वृक्षाच्या व शिवाच्या पारमार्थिक माहात्म्याला साजतील अशा वाटल्यास कराव्या. उदाहरणार्थ; कर्म, उपासना आणि ज्ञान हे तीन नेत्र व श्रवण, मनन, निदिध्यासन हा त्रिशूळ धारण करणाऱ्या त्रिदेवात्मक त्र्यंबकाला त्रिगुणात्मक बिल्वत्रिदळ समर्पण केलें असता, जागृति, स्वप्न व सुषुप्ति या तीन अवस्थारूप जन्म दूर होऊन साधक जीवन्मुक्त होतो, अशी परमार्थोपकारक उत्कृष्ट भावना करावी. हें मी म्हणतों असें नाहीं, तर बिल्व वाहण्याचा मंत्रहि अशीच एक भावना सांगत आहे. पहा —" त्रिदलं त्रिगुणाकारं त्रिनेत्रं च त्र्यायुधम् त्रिजन्म पापसंहारमेकं बिल्वं शिवार्पणम् ॥" असा तो मंत्र आहे. तात्पर्य, शिवलिंगोपासना हें एक पारमार्थिक साधन आहे. अर्थात् त्या साधनास उपोद्बलक अशाच सद्भावना या कर्तृतंत्र उपासनेंत केल्या पाहिजेत हें उघडच आहे.

(३) **योनिद्वार**:—आतां शिवालयाच्या गर्भागाराचें द्वार लहान असण्याचें कारण यवनांच्या व स्मशानाच्या आजूबाजूस मोकाट सुटलेल्या गुरांच्या आक्रमणाची भीति हें एक असूं शकेल. शिवाय त्या पवित्र गर्भागाराच्या आंत येणाऱ्या उपासकानें मस्तक वांकवून नम्र होऊन यावें, असाहि त्यांत कदाचित् हेतु असेल. असें लहान द्वार इतरहि देवळांत नसतें, असें नाहीं. त्यावर गणपति कोरलेला असतो. अर्थात् गर्भागार या शब्दावरून त्यास योनिद्वार म्हणणें हा अगदींच अव्यवस्थित असा शब्दच्छल होईल. आकारानें चौकोनी असून वर गणेशपट्टी असलेल्या दाराचें योनिद्वाराशीं कांहींच साम्य दिसत नाहीं. शबल शिव हें सबीज सद्ब्रह्म असल्यामुळें त्याच्या प्रतीकाच्या स्थानाला गर्भागार म्हणत असावेत.

(४) **अंधार**:—शिवलिंगाच्या ठिकाणीं बराच अंधार असतो हें खरेंच आहे. याचें कारण शिवसृष्टींत तमाला फार महत्त्व आहे. तें आद्य तत्त्व आहे, शिवाय तेथें ध्यानधारणा करण्यासारखी लक्ष्मीनारायणाची प्रेक्षणीय मूर्ति नसते. पारमार्थिक साधनाभ्यासाला प्रखर प्रकाश हा बाधक असून अंधार हाच साधक असतो, असें आतां भौतिक शास्त्र व आधुनिक परलोकविद्याशास्त्र हीं स्पष्ट

सांगत आहेत. आधुनिक परलोकविषयीतील येरच महत्त्वाचे प्रयोग प्रकाशांत होऊंच शकत नाहींत. याबद्दल शास्त्रज्ञांची खात्री झाली आहे. छायाचित्रें (फोटो) काढणें व चित्रपट दाखविणें या प्रक्रियेंत काळोखच लागतो, हें आतां सर्वांनाच माहीत झालें आहे. ध्यानधारणेंत साधकानें डोळे मिटावे लागतात, यांतीलहि अर्थ तोच आहे. अंधार हा स्वभावतः प्रकाशापेक्षां शांत आहे व बाह्य नामरूपाकडे दृष्टि पागूं न देतां दृष्टि सूक्ष्म व अंतर्मुख करण्यास तोच उपकारक ठरतो. अंधारमय सौतिक अवस्थेचें महत्त्व पारमार्थिक तत्त्वज्ञानांत अनन्यसाधारण मानलें आहे. यांहून या मुद्याचा अधिक विचार करण्याचें कारण वाटत नाहीं. अंधारांतील शिवलिंगाचा विचार स्वतंत्र प्रकरणांत केलाच आहे.

(५) घंटा:—घंटा सर्वच देवळांत असते. इतकेंच काय तर ज्या देवळांत देवाचें प्रतीक अगर प्रतिमा नसते, अशा ख्रिस्ती देवळातहि घंटा असतेच. स्टेशनवरहि घंटा असते. गाडीच्या बैलाच्या गळ्यांत घंटा असतात. घंटा नादकारक आहे. तो नाद असुर, पिशाच, हिंसक प्राणी यांस दूर हांकलून लावतो. तसेंच तो इष्टांस निमंत्रणसूचक असतो. "आगमार्थं तु देवानां गमनार्थं तु रक्षसाम्। कुर्वे घंटारवं तत्र देवताह्वानलक्षणम्॥" ह्या घण्टेच्या पूजेंतील मंत्रांत इष्टदेवतांना बोलावणें व अनिष्ट राक्षसांना हांकलणें हेच हेतु दिसून येतात. ध्वनिकारक घण्टेच्या ठिकाणीं शरीराच्या अवयवांचीच कल्पना करावयाची तर तोंड व जीभ ही कल्पना जास्त समर्पक दिसेल. पण आश्चर्य असें कीं, तोंड व जीभ यांच्याहि ठिकाणीं उलट शिश्नयोनीची कल्पना केलेली आढळते! तेव्हां या शिश्नोदरपरायण जीवानें आहारांत द्विपादांत शिडी व चतुष्पादांत घडवंची एवढेंच सोडलें, असें सुभाषितकार म्हणतात! पण लैंगिक भावांत ह्यानें कांहींच सोडलें नाहीं, असें म्हणावें लागतें.

(६) कासवः—आता देवालयाच्या सभामंडपांत कूर्मशिला असते. ह्या कूर्माची पुढें आलेली मान आक्षेपकांस शिश्नसदृश वाटते. किंबहुना ह्याच साम्य सादृश्यासाठीं शिवालयांत कूर्मशिला स्थापन करतात, अशी ह्यांची कल्पना आहे. पण श्रुतिशास्त्राकडे न पाहतां केलेला तर्क अप्रतिष्ठित मानला आहे. शिश्नसादृश्यासाठीं देवालयांत कूर्मप्रतिष्ठा शास्त्रानें सांगितली नाहीं. सादृश्यच पाहावयाचें तर सादृश्याचे अनेक गंभीर अंश त्या ठिकाणीं आहेत. ते सांगण्यापूर्वी हेंहि सांगतों कीं, कूर्मशिला केवळ शिवालयांतच असते असें नव्हे,

तर ती इतरहि प्रतिमा–मंदिरांत असते. आतां कूर्मप्रतीकाची प्रतिष्ठा करतांना त्यांतील जे विशेष शास्त्रकारांनी अंगीकारले आहेत ते असे : ( १ ) कूर्माचें पोट जमिनीप्रमाणें सपाट असून त्याची पाठ आकाशाप्रमाणें घुमटाकार आहे. म्हणजे दृश्य जगाचे पृथ्वी, अंतरिक्ष व द्यौ या त्रैलोक्याशीं त्याचें साहश्य आहे. कूर्म हा उत्क्रांतितत्त्वाप्रमाणें जल-स्थलचर असा आदिप्राणी आहे. दुसऱ्यास आधारभूत होण्यासारखी त्याची पाठ अति टणक आहे. अर्थात् त्याच्या ठिकाणीं घन, तरल, विरल हे सर्व रस आहेत.

कश्यप अथवा कूर्म हा विष्णूचा दुसरा अवतार आहे. सृष्टीच्या आरंभीं जल होतें. त्या जलांत सृष्टि उत्पन्न करण्याकरिता शिव शिरले. तेच जलहरींत लिंगरूपानें प्रतिष्ठित आहेत, असा अर्थ मानतां येईल. ( म. भा. सौ. अ. १७ ) कूर्म हा सृष्टिविधाता, तिचा द्रष्टा, स्रष्टा जलस्थलचर असा दाखवितात. जगत्सृष्टीच्या उपलब्धीसाठीं प्रकृतिजलाचें मंथन केलें, तेव्हां त्या उत्क्रांतिरूप मंथनदंडाला जो आधार झाला तो कूर्म होय. ( मा० ८।७।८ ). तो सृष्टीच्या पूर्वीपासूनच आहे. ( पद्मपुराण उ० अ० २३१ ). कूर्म ( अकरोत् ) या शब्दांत जगत्कारणता आहे. तो आदिपुरुष आहे. ( मा० २।७।१३. शत. ब्रा० ५।१।५ ; ७।४।१ ). कश्यप म्हणजे पश्यक ( कश्यपः पश्यको भवति । तै. आ. १।१।८ ). यांत सृष्टीसंबंधीं ईश्वराचा पश्यंतिभाव आहे. कूर्माची दृष्टि अलौकिक मानली आहे. तो आपल्या दृष्टीनें आपल्या प्रजेचें पालनपोषण करतो. तसेंच या अग्निषोमात्मक यज्ञस्वरूप जगताचा तो आधार आहे. म्हणून कूर्म उत्तरवेदीखालीं पुरतात. ( तै. सं. ५।२।८ ). तो जसा जगत्कारण आहे, तसा तो ( प्रतीकरूपानें ) विश्वरूपहि आहे कूर्म आपले अवयव कधीं व्यक्त करतो, व कधीं तिरोहित करतो, हें त्यांतील एक परमार्थसूचक रहस्य आहे. अखिल व्यक्त नामरूपकर्मात्मक जगताचा तो रसरूप आधार आहे. ( रसो वै कूर्मः । द्यावापृथिव्यौ हि कूर्मः । मार्कंडेय अ. ५८. यद्करोत तस्मात् कूर्मः । कश्यपो वै कूर्मः । शत. ब्रा. ७।४।१ इ. ) शिवलिंग हें जगत्कारणाचें प्रतीक आहे. त्या जगत्कारणाच्याच एका अवस्थेचें कूर्म हें प्रतीक आहे. वैज्ञानिक उपपत्तीप्रमाणें या ब्रह्मांडाच्या मोठ्या पहिल्या स्वयंभू मंडळांत दुसरें परमेष्ठि मंडळ असतें व ( जलतत्त्वरूप ) परमेष्ठि मंडळांत तिसरें सूर्यमंडळ असतें. ह्या-सूर्यमहिमामंडळासच कूर्म समजतात. आपली

एक कल्पना सांगतों. "विभावसु" हें कांसव व अग्नि या दोहोंचें नांव आहे. "द्वासुपर्णा सयुजा" या सुप्रसिद्ध मंत्रांतील जो शिव तोच सुप्रतीक व विभावसु या दोहोंपैकीं कांसवाचें रूप घेणारा दुसरा होय. (म. भा. १।२०-३४ ; तै. स. ४।२।३)

याप्रमाणें शिवालयाच्या त्रैलोक्यसदृश मेघडंबरीच्या खालीं सभामंडपांत मध्यमार्गीं असणारी जी कांसवाची प्रतिमा त्यांत अनेक आधियाज्ञिक, आध्यात्मिक, आधिदैविक म्हणजे, विश्वकर्मा, प्रजापति, कश्यप, अंतर्यामिन्, पृथ्वीरूप वेदीचा आधार, स्रष्टा व द्रष्टा, समुद्रमथनाच्या वेळचा मंदराचलाचा आधार किंवा आदित्य असे त्याचे अनेक अर्थ संभवतात. (तै. आ. १।१।८; १।२३।२५; तै. सं. ५।२।८ शत. ब्रा. ५।१।५) पवित्र व गंभीर अशा शिवालयाच्या ठिकाणीं या प्रतिमेच्या ठिकाणीं अशा शास्त्रानुकूल उत्कृष्ट भावना करण्याचें सोडून शिश्नसादृश्याची ग्राम्य भावना करणें, हें अत्यंत अयोग्य होय. कूर्म ज्याप्रमाणें आपलीं इंद्रियें आवरून धरतें, त्याप्रमाणें शिवसन्निध साधकानें आपलीं इंद्रियें विषयांपासून आवरावीं ही सूचना सम्यक् दिसते. हा भाव भगवद्गीतेंतहि सांगितला आहे.

(७) नंदीः—आतां शिवदर्शनाच्या पूर्वी नंदीच्या वृषणाला स्पर्श करण्याची कोठें कोठें चाल आढळते, आणि कामशास्त्राचा मूळ प्रणेता नंदी असल्याचें वात्सायन सूत्रांत सांगितलें आहे. तसेंच शिलाद ऋषींचा पुत्र नंदी हा शैव पुराणांचा मुख्य प्रवक्ता आहे. असें पाहून काहीं आक्षेपकानीं या तिन्ही नंदींना एकच मानून त्यास शिवलिंगोपासनेंतील अश्लीलतेच्या पुराव्याचा साक्षीदार किंवा पुरस्कर्ता बनविला आहे. त्याचा विचार पाहू. प्रथम एक गोष्ट उघड आहे कीं, शिवलिंगापुढील नंदी हा पशुरूपांत दाखवितात. त्यास शिवाचें वाहन मानतात. कामशास्त्र लिहिणारा नंदी हा त्या शास्त्रात शिवाचा अनुचर वर्णिला आहे; वाहन नव्हे. तोच शैवपुराण सांगणारा शिलादपुत्र नंदी असेल किंवा बहुधा नसेलहि. नंदी या नावानें या तीनच व्यक्ति दर्शविल्या जात नसून नंदी व वृषभ या शब्दांचे आणखी अनेक निर्देश आढळतात. ते सर्व लक्षात घेतले, म्हणजे नंदी आणि नंदीचा वृषण याचे लाक्षणिक अर्थ असे निष्पन्न होतील कीं, त्यात ग्राम्य अगर अश्लील कल्पना संभवणारच नाहींत.

आतां शिवलिंगापुढें पश्चिमाभिमुख नंदी तीन पाय दुमडून कां असतो, याचा एक खुलासा याज्ञिक कर्मांतच सांपडतो. यज्ञमार्गात अग्निमंथनाच्या वेळीं असुरांकडून प्रतिबंध होऊं नये म्हणून घोडा किंवा वृषभ पश्चिमाभिमुख उभा करतात. ( कात्यायन श्रौत सूत्र ४।८।२५, शत. ब्रा. २।१।४।१५-१७ ) कारण, अग्नि हा बैलाचा सोयरा अथवा बंधु होय, अशी प्राचीन याज्ञिकांची भावना असे. ( आग्नेयो वा अनड्वान, श. ब्रा. १३।८।४।६ ).

तसेंच सोमयागांतील प्रायणेष्टि नामक इष्टीत यजमानाला दीक्षा देण्यासाठीं कृष्णमृगचर्माचें कांतडें पूर्वाभिमुख हांतरावें लागतें, त्या वेळीं त्याचे तीन पाय दुमडावे, असें ( शत. ब्रा. ३।२।१।४; कात्यायन श्रौतसूत्र ७।३।२१ व कृष्णयजुर्वेद कल्पसूत्र पहा ) शास्त्रांत सांगितलें आहे. तसेंच ज्याचे प्राय अशा प्रकारें दुमडलेले आहेत, अशा मृगचर्मावर बसण्यापूर्वी त्या चर्माच्या मागील वृषणाच्या जागीं असलेल्या शुक्लकृष्ण केशांस तुम्ही ऋक् आणि साम यांच्या प्रतिमा आहांत असें म्हणून स्पर्श करावयास सांगितलें आहे. या ( शत. ब्रा. ३।२।१।५ ) याज्ञिक प्रक्रियेंत वृषभाच्या वृषणाच्या स्पर्शाचें मूळ असण्याचा संभव आहे. ( विविधज्ञानविस्तार, सन १९१२ व २२ पहा. ) वृषभ हा अग्नीचें पूर्वस्वरूप असल्याचें शास्त्रांत सांगितलें आहे. नंदीसंबंधी आणखी अनेक धारणा आहेत. अग्नि, वायु, सूर्य, दिशा; किंवा वाचा, श्वास, दर्शन, श्रवण, किंवा जाग्रतादि चार अवस्था हेच त्याचे चार पाय कल्पिले आहेत. दिवसालाहि बैल म्हणतात ( आर्क्टिक होम, पृ. १०४।५ ) अर्थात् वृषभाचें वृषण म्हणजे दिवसाचा पश्चाद्भाग किंवा प्रदोषकाळहि मानीत असतील. नंदी हा जगाचा आधार मानला आहे. ( स्कंदपुराण ). नंदी हा विराट ऋषभ अथवा वृषभ होय. सूर्यसत्तेने ज्योतिः, गौ आणि आयु असे तीन विभाग मानले आहेत. गौ आणि वृषभ तत्त्वतः एकच ( ऐ. ब्रा. ६।१० ) यज्ञो वै गौः। तै. ब्रा. ३।९।८।३; गौर्वा इदं सर्वं बिभर्ति । शत. ब्रा. ३।१।२।१४. भूमाचा जो महिमा तोच शिवाचा नंदी होय. छां. ७।२४।१; ८।१।६. भूमा आपल्या महिम्यावर प्रतिष्ठित आहे, तसाच शिव वृषभावर प्रतिष्ठित आहे. शिवाचा महिमा, त्याचें विश्वप्रेम त्यासहि कोणी शिवापुढील नंदी समजतात. नंदी याचा अर्थ आनंदस्वरूप असाहि होतो. ( इंडोआर्यन मायथॉलजी १।२६२ ) पुरुषर्षभ, पुरुषसिंह किंवा पुरुषव्याघ्र या शब्दांतील सिंह, व्याघ्र-

प्रमाणेंच वृषभ हा शब्द मोठेपणाचा गुणवाची समजावा वाल्मीकि रामायणांत रामाला वृषभ म्हटलें आहे. साराश, शिव आणि नंदी मिळून पुरुषोत्तम समजावा "चत्वारि शृङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्ता सो अस्य त्रिधा बद्धो वृषभो रोरवीती महोदेवो मर्त्यां आविवेश।" ऋ ४।५८।३ ह्या लाक्षणिक मन्त्रातील त्रिगुण मायेनें आवृत्त असलेला नादरूप वृषभ महादेव म्हणजे नंदीसहित शिवालिंग प्रतीकानें दिग्दर्शित केलेला अतर्यामी पुरुष होय. (इंडोआर्यन मायथॉलजी, भाग १, पृ. ३६१. लिं. पु. पू अ. ७६.)

वरील मंत्राचा भावार्थ असा:—मन, बुद्धि, चित्त, अहकाररूपी चार शिंगें, भूत, भविष्य, वर्तमान अथवा जागृत, स्वप्न, सुषुप्तिरूप तीन पाय, मर्त्य आणि अमृत अशीं दोन शिरें व सप्तप्राणरूप सात हात ज्याला आहेत, असा हा मेरुदण्डाला (म्हणजे पाठीच्या कण्याला) त्रिविधपाशानें बद्ध असलेला वस्तुतः महादेवच असलेला जीव म्हणजेच वृषभ नदी होय. तोच कोऽहम् कोऽहम् असें ओरडतो आहे याप्रमाणें जीवाच्या शिरस्थानीं वर मस्तकरूप कैलासगिरीवर मुक्तशिव असून खालीं मूलाधाराजवळ या बद्ध वृषभरूप जीवशिवाचें (महादेवाचें) मदिर आहे तात्पर्य, "देवा यद्यज्ञ तन्वाना अबध्नन्पुरुष पशुम्" कुडलिनीच्या साडेतीन वळशानीं गुरफटलेलें मूलाधाराजवळील जें स्वयंभूलिंग तोच हा जीवपशु, कुडलिनी हीच पाश आणि सहस्रारातील शिव हेंच पशुपति, अशी भावना करता येईल. नदी हा शिवभक्ताचा अग्रणी आहे. उलट ह्याला परात्पर शिवाचें प्रतीकही मानलें आहे.

यजुर्वेदात (३५।१२) या मत्राचा भावार्थ असा आहे कीं, आमचें कल्याण व्हावें एतदर्थ गाईचें अपत्य जो हा खोंड त्या खोंडाप्रत आम्ही स्पर्श करतों. हे सुरभिपुत्रा! तू आमचा तारक हो इन्द्र हा जसा देवाचा पुढारी तसा तूं आमचा अग्रेसर हो कोणी इद्र तोच नदी असें म्हणतात कोणी म्हणतात कीं, दीर्घ रात्र जर दुर्गा तर नंदी हा दीर्घ रात्रीसह दिवस होय वेदात "९९ बैलाचे ८८-७७ करा," असें लाक्षणिक वचन आहे ही जी एकादश रुद्राची पट ते दिवस होत (आर्क्टिक होम इन् दि वेदाज्, पृ १०४५) दीर्घतमा हे दिवसाचें रौद्र स्वरूप महादेवानें आवरावे म्हणजे तसे दिवस कमी व्हावेत असा त्यातील भाव सागतात दीर्घतमा रात्र हीच

आतां शिवलिंगापुढें पश्चिमाभिमुख नंदी तीन पाय दुमडून कां असतो, याचा एक खुलासा याज्ञिक कर्मांतच सांपडतो. यज्ञभागांत अग्निमंथनाच्या वेळीं असुरांकडून प्रतिबंध होऊं नये म्हणून घोडा किंवा वृषभ पश्चिमाभिमुख उभा करतात. ( कात्यायन श्रौत सूत्र ४।८।२५, शत. ब्रा. २।१।४।१५-१७ ) कारण, अग्नि हा बैलाचा सोयरा अथवा बंधु होय, अशी प्राचीन याज्ञिकाची भावना असे. ( आग्नेयो वा अनड्वान, श. ब्रा. १३।८।४।६ ).

तसेंच सोमयागांतील प्रायणेष्टि नामक इष्टींत यजमानाला दीक्षा देण्यासाठीं कृष्णमृगचर्माचें कांतडें पूर्वाभिमुख हांतरावें लागतें, त्या वेळीं त्याचे तीन पाय दुमडावे, असें ( शत. ब्रा. ३।२।१।४; कात्यायन श्रौतसूत्र ७।३।२१ व कृष्णयजुर्वेद कल्पसूत्र पहा ) शास्त्रांत सांगितलें आहे. तसेंच त्याचे पाय अशा प्रकारें दुमडलेले आहेत, अशा मृगचर्मावर बसण्यापूर्वी त्या चर्माच्या मागील वृषणाच्या जागीं असलेल्या शुक्लकृष्ण केशांस तुम्ही ऋक् आणि साम यांच्या प्रतिमा आहात असें म्हणून स्पर्श करावयास सांगितलें आहे. या ( शत. ब्रा. ३।२।१।५ ) याज्ञिक प्रक्रियेंत वृषभाच्या वृषणाच्या स्पर्शाचें मूळ असण्याचा संभव आहे. ( विविधज्ञानविस्तार, सन १९१२ व २२ पहा. ) वृषभ हा अग्नीचें पूर्वस्वरूप असल्याचें शास्त्रांत सांगितलें आहे. नंदीसंबंधीं आणखी अनेक धारणा आहेत. अग्नि, वायु, सूर्य, दिशा; किंवा वाचा, श्वास, दर्शन, श्रवण, किंवा जाग्रतादि चार अवस्था हेच त्याचे चार पाय कल्पिले आहेत. दिवसालाहि बैल म्हणतात ( आर्क्टिक होम, पृ. १०४।५ ) अर्थात् वृषभाचे वृषण म्हणजे दिवसाचा पश्चाद्भाग किंवा प्रदोषकाळहि मानीत असतील. नंदी हा जगाचा आधार मानला आहे. ( स्कंदपुराण ). नंदी हा विराट ऋषभ अथवा वृषभ होय. सूर्यसत्तेचे ज्योतिः, गौ आणि आयु असे तीन विभाग मानले आहेत. गौ आणि वृषभ तत्त्वतः एकच ( ऐ. ब्रा. ६।१० ) यशो वै गौः। तै. ब्रा. ३।९।८।३ ; गौर्वा इदं सर्वं बिभर्ति । शत. ब्रा. ३।१।२।१४. भूमाचा जो महिमा तोच शिवाचा नंदी होय. छां. ७।२४।१ ; ८।१।६. भूमा आपल्या महिम्यावर प्रतिष्ठित आहे, तसाच शिव वृषभावर प्रतिष्ठित आहे. शिवाचा महिमा, त्याचें विश्वप्रेम त्यासहि कोणी शिवापुढील नंदी समजतात. नंदी याचा अर्थ आनंदस्वरूप असाहि होतो. ( इंडोआर्यन मायथॉलजी १।३६२ ) पुरुषर्षभ, पुरुषसिंह किंवा पुरुषव्याघ्र या शब्दांतील सिंह, व्याघ्र-

प्रमाणेंच वृषभ हा शब्द मोठेपणाचा गुणवाची समजावा. वाल्मीकि रामायणांत रामाला वृषभ म्हटलें आहे. सारांश, शिव आणि नंदी मिळून पुरुषोत्तम समजावा. " चत्वारि शृंङ्गा त्रयो अस्य पादा द्वे शीर्षे सप्त हस्ता सो अस्य त्रिधा बद्धो वृषभो रोरवीती महोदेवो मर्त्यां आविवेश। " ऋ. ४।५८।३ ह्या लाक्षणिक मंत्रांतील त्रिगुण मायेनें आवृत्त असलेला नादरूप वृषभ महादेव म्हणजे नंदीसहित शिवलिंग प्रतीकानें दिग्दर्शित केलेला अंतर्यामी पुरुष होय. (इंडोआर्यन मायथॉलजी, भाग १, पृ. ३६१. लिं. पु. पू. अ. ७६.)

वरील मंत्राचा भावार्थ असा:—मन, बुद्धि, चित्त, अहंकाररूपी चार शिंगें; भूत, भविष्य, वर्तमान अथवा जागृत, स्वप्न, सुषुप्तिरूप तीन पाय, मर्त्य आणि अमृत अशीं दोन शिरें व सप्तप्राणरूप सात हात ज्याला आहेत, असा हा मेरुदण्डाला (म्हणजे पाठीच्या कण्याला) त्रिविधपाशानें बद्ध असलेला वस्तुतः महादेवच असलेला जीव म्हणजेच वृषभ नंदी होय. तोच कोऽहम् कोऽहम् असें ओरडतो आहे. याप्रमाणें जीवाच्या शिरस्थानीं वर मस्तकरूप कैलासगिरीवर मुक्तशिव असून खालीं मूलाधाराजवळ या वृद्ध वृषभरूप जीवशिवाचें (महादेवाचें) मंदिर आहे. तात्पर्य, " देवा यद्यज्ञं तन्वाना अबध्नन्पुरुषं पशुम् " कुंडलिनीच्या साडेतीन वळ्यांनीं गुरफटलेलें मूलाधाराजवळील जें स्वयंभूलिंग तोच हा जीवपशु, कुंडलिनी हीच पाश आणि सहस्रारांतील शिव हेच पशुपति, अशी भावना करतां येईल. नंदी हा शिवभक्तांचा अग्रणी आहे. उलट ह्याला परात्पर शिवाचें प्रतीकही मानलें आहे.

यजुर्वेदांत (३५।१२) या मंत्राचा भावार्थ असा आहे कीं, आमचें कल्याण व्हावें एतदर्थ गाईचें अपत्य जो हा खोंड त्या खोंडाप्रत आम्ही स्पर्श करतों. हे सुरभिपुत्रा! तूं आमचा तारक हो. इन्द्र हा जसा देवांचा पुढारी तसा तूं आमचा अग्रेसर हो. कोणी इंद्र तोच नंदी असें म्हणतात. कोणी म्हणतात कीं, दीर्घ रात्र जर लुप्त तर नंदी हा दीर्घ रात्रीसह दिवस होय. वेदांत " ९९ बैलांचे ८८-७७ करा," असें लाक्षणिक वचन आहे. ही जी एकादश रुद्रांची पट ते दिवस होत. (आर्क्टिक होम इन् दि वेदाज्, पृ. १०४।५) दीर्घतमा हें दिवसांचें रौद्र स्वरूप महादेवानें आवरावें म्हणजे तसे दिवस कमी व्हावेत असा त्यांतील भाव सांगतात. दीर्घतमा रात्र हीच

दुर्गाकाली (ऋ. १०।१२७) शिव हाच सूर्य व वृषभ नंदी हाच दिवस; अथवा दीर्घतमा रात्र हीच गाय (ऋ. १०।१२७।८) व वृषभ नंदी हाच तिच्या पोटी उत्पन्न होणारा दिवस अशी कल्पना करावी.

प्रिन्सिपॉल थडाणी यांच्या उपपत्तीप्रमाणें ईश्वर म्हणजे नंदी. तसेंच शिवपुराणांत त्रयोदशीव्रत सांगतांना म्हटलें आहे कीं, त्रयोदशीच्या दिवशीं सायंकाळीं शिवपूजन करावें. चोहोंकडे दिवे लावावे. आपला मनोरथ शिवास निवेदन करावा. मग बैलाचा अण्डकोश पहावा. नंतर त्याच्या शिंगाच्या मधून पाहावें. अखेर पुच्छाचें दर्शन करून सर्व पापांतून विमुक्त व्हावें. जगांत जेवढीं म्हणून तीर्थें आहेत तेवढीं सर्व बैलाच्या अंडकोशांत आहेत, म्हणून बैलाला दाणा-वैरण घालून त्याची हरएक प्रकारची सेवा करावी. (शि. पु. हिन्दी भाषा ग्रंथ, पृ. ९२०; उत्तरार्ध अ. १३) या लाक्षणिक वर्णनांत मुक्तिसाक्षी वासनेच्या आनंदमय कोशाला स्पर्श करून ,जीव आत्मलिंग पाहातो असा भाव नंदीच्या ठिकाणीं मानावा लागेल.

महाभारतांत अनुशासनपर्वांत अशी कथा आहे कीं, ब्रह्मदेवानें दीर्घ तपानंतर रोहिणी किंवा सुरभी निर्माण केली, आणि एक वृषभ निर्माण केला. तो वृषभ सुरभीसंबंधीं कामार्त झाला, म्हणून त्यास "मा-आर्त" असें ते म्हणाले, म्हणून त्याचें नांव मार्तण्ड झालें. या सुरभी-मार्तण्डा-पासून पवित्र अशी प्रजा निर्माण झाली. प्रथम त्यांना अकरा रुद्र झाले. पुढें त्यांना दक्ष नामक वृषभ झाला. तो या सुरभीनें महेश्वरांना ध्वजासाठीं दिला. या कथेवरून नंदी म्हणजे सूर्यगोल या कल्पनेस दुजोरा मिळतो. (वृषो दक्ष इति ख्यातः कण्ठे मणितलप्रभः। सुरभ्यनुमते दत्तो ध्वजो माहेश्वर-स्तु सः।) याच पर्वांत अन्यत्र असें वर्णन आढळतें कीं, गोवत्साच्या तोंडचा अमृतरूप दुग्धाचा फेंस पृथ्वीवरील रुद्राच्या अंगावर पडल्यामुळें क्रुद्ध झालेल्या रुद्रांना शांत करण्याकरितां ब्रह्मदेवानें त्यास एक वृषभ दिला. त्याला रुद्र प्रसन्न झाला. रुद्रानें त्यास आपलें वाहन व ध्वज चिह्न केलें. (वृषभं च ददौ तस्मै भगवान् लोकभावनः। प्रसादयामास मनस्तेन रुद्रस्य भारत। प्रीतश्चापि महादेवश्चकार वृषभं तदा। ध्वजञ्च वाहनं चैव तस्मात्स वृषभध्वजः।; शुद्धस्फटिकसंकाशो धर्मरूपो वृषः स्मृतः। असें नंदीचें वर्णन आहे. शिवपुराण विद्येश्वर संहिता अ. १७ यांत वृषभाला धर्म किंवा

ब्रह्मचर्यरूपच मानलें आहे. "तद्रूर्ध्वें वृषभो धर्मो ब्रह्मचर्यस्वरूपधृक् । सत्यादिपादयुक्तस्तु शिवलोकाग्रतः स्थित. ॥ ८५ ॥ क्षमाश्रृगः शम श्रोत्रो वेदध्वनिविभूषित ॥ आस्तिक्यचक्षुर्निश्वास गुरुबुद्धिर्मनो वृषः ॥ ८६ ॥ क्रियादिवृषमा ज्ञेयाः कारणादिषु सर्वदा ॥ तं क्रियावृषभं धर्मं कालातीतोऽधितिष्ठति ॥ ८७ ॥ या खुलाशानें सारा अश्लीलभाव निराधार ठरतो. हें सारें लाक्षणिक वर्णन आहे, हें सुज्ञ वाचक सहज जाणतील.

आणखीहि पुढें पाहू. अग्नि आणि बैल हे सोयरे मानले आहेत. अग्नि आणि बैल म्हणजे प्रकाश आणि दिवस असाहि यांचा सोयरेसंबंध मानतां येईल शिवोपासनेला प्रदोषकाळ युक्त म्हणून गणलेला आहे. हा प्रदोषकाळ म्हणजे मागें सांगितल्याप्रमाणें बुडालेल्या दिवसाचा पार्श्वभाग मानावा. केदारनाथाच्या पृष्ठभागाप्रमाणें त्याला स्पर्श, व वदन करून शिवोपासनेस आरंभ करावा. असा लाक्षणिक हेतुहि असेल. पुढें हें रहस्य लोपून उत्तानार्थच कदाचित् रूढ झाला असेल.

रसायनाचें अनुपान हें जसें वाहक असतें, त्याप्रमाणें शिवकृपेचा वाहक नंदी मानून तो शिवाचा मुख्य गण असल्यामुळें त्याच्या खुषामतीचा निदर्शक वृषणस्पर्श असावा असें कोणी सुचवितात. कांहीं अतिप्राचीन नाण्यांवरून नुसत्या नंदीचेंच चिन्ह आढळतें. त्यावरून नंदी ही एके काळीं स्वतंत्र देवता मानली होती असें दिसतें. भागवतांत धर्माला चतुष्पाद म्हटलें आहे शिवाचें धर्ममेघ नामक समाधीवर आरूढ होणें यासच वृषवाहन असें म्हणतात. (बोधसार शि. पु. ४७) नरसिंह, पुरुषसिंह अशा शब्दप्रयोगांत सिंह हा शब्द स्तुत्यर्थच असतो. त्याप्रमाणें आपल्या सान्या वाङ्मयांत वृषभ हा शब्द पशु या गौणार्थी वापरलेला नसून तो प्रत्येक ठिकाणीं श्रेष्ठ अर्थानेंच वापरलेला आढळेल, हें लक्षात घ्यावें. नंदी हा हिंदूंप्रमाणें झोरॅस्ट्रियन्स, खाल्डियन्स व इजिप्शियन्स यांच्या धर्मांतहि पवित्र मानला आहे; ग्राम्य मानला नाहीं (सीक्रेट डॉक्ट्रिन्स, २।३८३; ५।२०६) याप्रमाणें शिवलिंगापुढील नदीचा खुलासा करणान्या अनेक तात्त्विक अनश्लील अशा गूढगंभीर भावना ग्रथांतरीं आढळतात. देवदर्शनादि उपासनाकर्मांत त्यांचेंच ग्रहण उचित दिसतें.

उपासनेंतील भावना केवळ वस्तुतंत्र नसून त्या कर्तृतंत्र असतात, तरी

उपासकानें शास्त्रानुकूल योग्य त्याच भावना केल्या पाहिजेत हें उघड आहे. ब्रह्मसूत्रांत स्वैर तर्क अप्रतिष्ठित मानला आहे. आता शिवालयांत पशुरूपात नंदी शिवालयासमोर कां स्थापन करतात, याचा स्पष्ट खुलासा करणारें निदानशास्त्र अगर स्थापत्यशास्त्र आज उपलब्ध नसेल, अथवा तें उपलब्ध असून बहुतांस ठाऊक नसेल, तर त्यासंबंधीं प्रतिष्ठित तर्क करण्यास आपल्या प्राचीन वाङ्मयांत पुष्कळ गमकें सांपडतील. त्यावरूनच कांहीं उदाहरणें वर दिलीं आहेत. त्यांहून अन्य स्तुत्यभावहि त्यांत असूं शकेल.

नंदी हें शिवाचेंहि नांव आहे. अर्थात् पशुपतिशिवाचें जीव म्हणजे पशुरूप तें प्रतिबिंब आहे, असें मानावें. तसेंच तें दुर्गा व विष्णु यांचेंहि नांव आहे अर्थात् शिवशक्ति किंवा हरिहर अशीहि तेथें जोडकल्पना समवेल. नंदी हा शिवाचा अवतारहि आहे. म्हणजे तो जीवरूपाचें प्रतीक आहे ( लिंगपुराण, पृ. ४२ ते ४४ ) कोणी नंदीला प्रणवस्वरूप मानतात ( कल्याण शिवाक, पृ. ११७ ) काशीखंड अ. २ यांत नंदीला अग्नि, वरुण, वायु यांचा अवतार मानलें आहे. त्याच्या मुखापासून लक्ष्मीचा जन्म झाला असें लाक्षणिक वर्णन आहे.

आतां वादाकरिता लैंगिक भावाचा अंगीकार केला व वृषभाला रेतवर्धनशील काम असें मानलें, तरी कामावर आरूढ होणारा शिव स्तुत्यच ठरतो रघुवंश २।३५ ( कैलासगौरं वृषमारुरुक्षोः पादार्पणानुग्रहपूतपृष्ठम् । अवेहि मां किङ्करमष्टमूर्तेः कुम्भोदरं नाम निकुम्भमित्रम् ॥ ) यांत असें म्हटलें आहे कीं, कैलासगिरीप्रमाणें शुभ्र अशा वृषभावर आरूढ होतांना शिवाला कुम्भोदरावर आरूढ व्हावें लागलें. याचा अर्थ शिश्नोदरपरायणतेवर शिवानें पूर्ण ताबा मिळविला होता. काम = वृष व रसना. पोट = कुम्भोदर यावर कामदहन करणाऱ्या व विषप्राशन करणाऱ्या महादेवानें जय मिळविला होता, अशी स्तुत्य भावना करतां येते.

आतां लैंगिक दृष्टीनें विचार करतांहि असें दिसून येतें कीं, लिंगाप्रमाणें अण्ड ही एक बीजभूत कल्पना आहे. परमाणूपासून तो ब्रह्माण्डापर्यंत ' अणोरणीयान् महतो महीयान् ।' सारें अंडरूपच आहे. अर्थात् जगत्कारणाच्या उपासनेंत लिंग हें अण्डाकार असावें व नंदीच्या वृषणांडाला महत्त्व यावें यांत कल्पनासादृश्य असलें तरी त्यांत अश्लील मानण्यासारखें कांहीं नाहीं.

(८) आतां देवापुढील ध्वजस्तंभ, त्रिपुर, देवळाचे कळस, जवळच्या तळ्यांतील खांब हीं चिन्हें राहिलीं. वस्तुतः उंच ध्वजस्तंभ किंवा स्कंभ, गगनचुंबित कळस, उंच त्रिपुर, हीं सारीं श्रेष्ठ व उदात्त भावदर्शक चिन्हें आहेत. यांच्या ठिकाणीं ग्राम्य व अश्लील भाव संभवतच नाहीं. कळस म्हणजे कलश व त्यांवर जणूं आम्रपल्लव व नारळ ठेवावा असें तें मंगलकारक प्रतीक असतें. तळ्यांतील खांब हा तळ्याच्या खोल पाण्यांत शिरणाऱ्याला आधार एवढ्याचसाठीं असावा. त्यांत अश्लील भावना करणें अगदींच अनुचित दिसतें. त्रिपुराच्या ठिकाणींहि शिश्नभावना अगदींच असमंजसपणाची वाटते.

(९) क्वचित् कांहीं देवालयांवर मैथुनचित्रें असतात, त्यांस स्तुत्ययांनें शिवानंदाचीं परोक्ष चिन्हें मानावीं. आतां उलट आरण अश्लील किंवा ग्राम्य दृष्टीनेंच पाहूं लागलों तर संसारांतील अगदीं साध्या वस्तु आणि क्रियासुद्धां आपल्याला अश्लीलतेनें पाहतां येतील. उलट रुग्णितळांतील अथवा सूतिकागृहांतील गुह्येंद्रियचिकित्सेंत जननेंद्रियाचें साक्षात् दर्शन व स्पर्शनहि अश्लील ठरणार नाहींत. याच न्यायानें शिव या वैराग्यमूर्तीच्या पवित्र व गंभीर मंदिरांत पारमार्थिक उपासनाकर्मांत अश्लील भावनांना अवसर देणें याहून जास्त गर्ह्य तें आणखी काय असणार! मीं वर प्रत्येक प्रकाराबद्दल एकच एक निश्चित भावना न सांगतां अनेक शुभ भावना शास्त्राला धरून सांगितल्या आहेत. त्यांतील हेतु इतकाच कीं, कर्तृतंत्र उपासनाकर्मांत साधकानें त्यांपैकीं कोणतीहि शुभभावना आवल्या अभिरुचीप्रमाणें करावी. तें उपासनेंत उपकारकच होईल.

द्रष्टा च दर्शनं दृश्यमिति पत्रत्रयान्विता ।
शिवे समर्प्या चिद्रूपे प्रथमा बिल्वपत्रिका ॥ १०० ॥
—बोधसार, शिवपूजा.

---

१ या प्रकरणांतील कांहीं मुद्दे व ग्रंथसंदर्भ कै. विद्याभूषण कृष्णशास्त्री घुले यांच्या 'स्वाध्याय' व 'विविधज्ञान विस्तार' (सन १९१२–२२) यांतील निबंधांतून घेतले आहेत.

## प्रकरण १२ वे

# आक्षेपांची अखेरची उतारी

> यो देवः सर्व देवानां दुर्विज्ञेयः सनातनः।
> संहितेयं महापुण्या शिवस्य परमात्मन ।
>
> — नारदपुराण

शंका निरंकुश असतात त्यास अंत नसतो अर्थात् त्याचा समग्रतेने विचार करणें अशक्यच आहे तरी राहिलेल्या काहीं आक्षेपांचा विचार या व पुढील प्रकरणांत करीत आहें.

**आक्षेप (१)** — शिवलिंगोपासना आद्य वनमानवाची अथवा अनार्यांची न मानता ती जरी आर्यांची किंवा वैदिकांचीच मानली, तरी प्राचीन वैदिकांनी मूळपुरुष मूळप्रकृति यांची उपासना त्यांच्या भेददर्शक 'भगांक' आणि 'लिंगांक' या जननेंद्रियचिन्हद्वाराच रूढ केली असेंच प्राचीन लिंगोपासक उपमन्यु यांच्या पुढील उद्गारावरून सिद्ध होतें

> न पद्माङ्का न चक्राङ्का न वज्राङ्का यत प्रजाः
> लिङ्गाङ्का च भगाङ्का च तस्मान्माहेश्वरी प्रजा ॥ २३३॥
> देव्या कारणरूपभावजनिता सर्वा भगाङ्का स्त्रियो
> लिङ्गेनापि हरस्य सर्वपुरुषा प्रत्यक्षचिन्हीकृता ।
> योऽन्यत्कारणमीश्वरात् प्रवदते देव्या च यन्नाङ्कित ।
> त्रैलोक्ये स चराचरे स तु पुमान् मूढो भवेद्दुर्मति ॥ २३४॥
> पुल्लिङ्ग सर्वमीशान स्त्रीलिङ्ग विद्धि चाप्युमाम् ।
> द्वाभ्या तनुभ्या व्याप्त हि चराचरमिदं जगत् ॥ २३५॥

**खुलासा १** — वरील वचनावरून शिवलिंगोपासना हे शिश्नयोनी चिन्हाचे देव्हारे असें म्हणता येत नाहीं सशक्तिक शिव हें कारणब्रह्म असल्यामुळें सर्व प्राणिमात्रांत शिवशक्ति हेंच निर्द्वंद्व तत्त्व व्यापक करीत आहे, हें प्राणिमात्राचे स्त्री पुरुष हे दोन विभाग कल्पून त्यांच्या व्यावर्तक

स्थूल चिह्नद्वारा लौकिक मार्गेत या वचनांत सांगितलें आहे, इतकेंच. पण या स्थूल अवयवरूप चिन्हांनीं चिन्हित अशी मैथुनसृष्टि निर्माण होण्याच्या पूर्वींचें सशक्तिक शिवतत्त्व आहे व शिवलिंगोपासना पण जगदारंभापासूनच आहे. (लिंग पु. पू. अ. १७-१९, शिवपुराण वि. सं. ११७-११.). " न सन्न चा सच्छिव एव केवलः । " म्हणजे सृष्टीच्या पूर्वी सत् नव्हतें, असत् नव्हतें, केवल शिवतत्त्व मात्र होतें. असा जगत्कारणरूपांत शिवाचा गौरव सर्व वेदसंहितांत व कांहीं उपनिषदांतून केलेला आढळतो. त्याचप्रमाणें उमा, शिवा, अम्बिका, कात्यायनी, दुर्गा या नांवांनीं शक्तीचाहि महिमा अनादि वैदिक वाङ्मयांत वर्णिलाच आहे. त्यांच्यासंबंधीं अश्लील भावना संभवत नाहीं.

स्त्री-पुरुषांचीं भगलिंगें हीं स्थूल गोलकचिन्हें म्हणजे त्यांचीं वास्तविक जननेंद्रियें नव्हत. जननेंद्रियें सूक्ष्म व अदृश्य असतात. हें मागें चवथ्या प्रकरणांत सांगितलेंच आहे. त्या सूक्ष्म जननेंद्रियापेक्षांहि स्त्री-पुरुषांतील प्रजननकारक योषा-वृषा प्राण हे अधिक सूक्ष्म असतील, आणि इतकेंहि असून स्त्री-पुरुषमैथुनावांचून प्रजा निर्माण होत नाहीं, असेंहि नाहीं. नुसत्या स्त्रीच्या ठिकाणीं पुरुषाच्या संयोगावांचून प्रजा निर्माण होणें अनेक तऱ्हांनीं शक्य असतें. याउलट कांहीं प्रजा अयोनिसंभव असते. पण हें कांहीं असलें तरी जडचेतन कोणतीहि सृष्टि अज्ञात अशा शिवशक्ति संयोगावांचून व्यक्त होत नाहीं; म्हणून सारें जडचेतन भगांकित व लिंगांकित असो नसो, तें शिवशक्तिमय आहेच आहे; आणि हें शिवशक्तियुग्म अविनाभूत निर्द्वंद्व असल्यामुळें त्यांचीं प्रकाशविमर्श याप्रमाणें व्यावर्तक चिन्हें सर्वांस समजतील अशीं सांगतांच येत नाहीं. असें जें वस्तुतः निर्द्वंद्वरूपजगत्कारण त्याचें प्रतीक शिवलिंग आहे. त्यांत साळुंका आणि पिंडी हा भेद उगाच समजुती-

---

१ ऋग्वेदांतील रुद्रसूक्तें— यजुर्वेदांतील रुद्राध्याय, अथर्ववेदांतील स्कंभमहिमा. श. ब्रा. ६।१।३।७-१९. शांखायन ब्राह्मण ६।१।१-९. मांडुक्य, कैवल्य, नारायण, जाबाल, रामोत्तर तापिनी, रुद्रहृदय, बृहज्जाबाल, रुद्राक्षजाबाल, गर्भोपनिषद, श्वेताश्वतर इत्यादि अनेक उपनिषदें.

२ वाजसनेयि संहिता (३।५७; १६।१); तै. आ. प्र. १०. तलवकार उपनिषद् ३।११-१२; ४।१-२. केन उप. ३।४.

करता आहे त्र्यंबकेश्वर व महाबळेश्वर येथें पिंडी कोठें आहे? उलट देवळाच्या तील बाणात साळुंका कोठें असते? तात्पर्य, मायामाहेश्वरी सृष्टीच्या शिवलिंग या प्रतीकात भगलिंगादि भेद मानले तर आहेत; नाहीं तर नाहींत उपासकानें शिवलिंगाच्या ठिकाणीं तशी द्वैतमूलक भगलिंगात्मक भावना न करणेंच योग्य होईल असें मला वाटतें. सशक्तिक शिव हाच एकमेव ईश्वर त्याचेंच शिवलिंग हें प्रतीक जाणावें तें बरें.

**आक्षेप (२)**— शिवाचें लिंग उभें असतें, तें मोठें असतें, तें ऊर्ध्वरेतस् असतें अशीं महाभारतात वचनें आहेत. (ऊर्ध्वकेशो महाशेफो नग्नो विकृत लोचनः।)

**खुलासा २ :**— हीं सारीं लाक्षणिक वर्णनें आहेत. दोन ध्रुवामधील उभी लकेरेषा तें पुरुष (Positive) चिन्ह असें थिऑसफीसारख्या कांहीं शास्त्रात संकेत आहेत. शिव हा ऊर्ध्वरेतस आहे. हें शिवाच्या योगैश्वर्याचें लाक्षणिक वर्णन आहे. शिवाचें महालिंग म्हणजे जगत्कारणत्व तें कार्यरूप जगाहून मोठें आहे. शिव नग्न म्हणजे दिग्वास, दिगंबर, अथवा निरावरण आहे. निरनिराळ्या अर्थानें तो 'त्र्यबक' आहे. यांत ग्राम्य किंवा अश्लील कांहींच नाहीं.

**आक्षेप (३)**—महाभारत अनुशासनपर्व, अ. १४ यांत अबा उपमन्यूला म्हणते, "तो शिव ऋषिपत्न्या व ऋषिकन्या याजबरोबर खेळतो त्याचे केश लाच आहेत. त्याचें लिंग मोठें आहे. तो नग्नच असतो"

**खुलासा ३ :**— उपमन्यु म्हणजे श्रीकृष्णाला ज्यानें शिवदीक्षा दिली तो महर्षि. त्याच्या आईचा त्याच्याशीं संवाद अश्लील कसा समजेल? याच संवादात अशा शिव हा अरूप असल्याचेंच वर्णन करते. (दिशा हेंच त्याचें वस्त्र होय सर्वांचा तो आच्छादक आहे. त्याला रूप नाहीं, त्यास आदि नाहीं व अंत नाहीं, इत्यादि). तें वाचावें व सर्व संवादाचा काय अर्थ जुळेल तोच लावावा म्हणजे तेथेंच अनश्लीलतेचा उलगडा होईल.

**आक्षेप (४)**— तांत्रिकाच्या लतासाधनात भगलिंगाचें सविस्तर वर्णन करून अखेर शिवशक्तिसयोगातून स्त्रवणाऱ्या अमृतधारेचें कुंडलिनी ग्रहण करते इत्यादि वर्णन आहे ते अश्लील आहे.

**खुलासा ४ :**— तांत्रिकांच्या कांहीं साधनांत क्वचित् वाच्यार्थच व्यवहारतः अभिप्रेत असला, तरी लक्ष्यार्थाच्या कर्तृतंत्र दिव्य भावनेनें अश्लील वाटणाऱ्या वाच्यार्थातील अश्लीलता दूर करावयाची असते. विषारी वत्सनाग शुद्ध करून त्याचाच औषधि म्हणून उपयोग करावा अशी ही दुर्घट प्रक्रिया असते. हीं साधनें सामान्य साधकांकरितां नसतात. सद्गुरूंच्या देखरेखीखालीं फक्त अपवादभूत अशा परम संयमी वीर साधकांनांच तीं शक्य तर अनुसरावयाचीं असतात. अशा गूढ व गहन विषयाचा येथें अधिक विचार अप्रस्तुत आहे.

**आक्षेप (५)**— शंभुगीतेतील अध्याय ७ मधील शिवलिंगनिरूपण श्लोक ७८ ते ८४ यांत सांगितलेल्या उपास्याच्या विभूतियोगांत सामान्य मैथुनालाच सहज पीठ म्हटलें आहे.

**खुलासा ५ :**— हें निरूपण सांगण्यापूर्वी त्याचा रहस्यार्थ समजावा म्हणून शंभूनीं पितरांना दिव्य ज्ञानदृष्टि दिली होती. त्यानंतर शंभु म्हणतात कीं, माझ्या चिन्मयलिंगाच्या यथार्थस्वरूपदर्शनानें तुम्ही कृतकृत्य व्हाल. (चिन्मयस्यास्य लिङ्गस्य स्वरूपं मे यथायथम्। यूय पश्यत येनाद्य जायतां वः कृतार्थता ॥ १२ ॥) ही गोष्ट सामान्य वाचकांनीं लक्षांत घेणें आवश्यक आहे. त्यांत त्या महान् पितरांनीं शिवस्तुति करतांना शिवलिंग हें उत्पत्तिस्थितिलय पावणाऱ्या अनेक ब्रह्माण्डांना व्यापणारें अनाद्यनंत, अलिप्त, सर्व कारणाचें कारण, असें शिवलिंगाचें वस्तुतः अनिर्वचनीय स्वरूप असल्याचें सांगितलें आहे. (अ० ७, श्लोक २० पहा) अशा ज्ञात्या पितरांस पुढें शिवानें सांगितलेल्या सहजपीठाच्या ठिकाणीं, दिव्य पितृलोकीं, ग्राम्यमैथुनभाव अत्यंत अप्रस्तुत वाटतो. हें सुज्ञ वाचक सहज जाणतील.

पुढें परामक्ति उत्पादक अशा श्रेष्ठ विभूतियोग सांगतांना सदाशिव पितरांना म्हणतात, " मी जलाशयांत सागर, मंत्रांत प्रणव, अक्षरांत ओंकार, यज्ञात जपयज्ञ, वषट्कारात काल, आकर्षकांत देश, पूजा उपयोगी विग्रहांत शिवलिंग, भक्तिक्रियेंत चक्र, देवीपीठसमूहांत सहज पीठरूपी मिथुनपीठ, प्रासादांत उपासनास्थान, नमस्क्रियांत उपासनाक्रिया, शिक्षाक्रिया, दीक्षाक्रिया आणि कामोन्मादरहित मैथुनक्रिया, आहे इ. इ (७७ ते ८२) असा हा शिवाचा समग्र विभूतियोग पाहिला म्हणजे शिवसत्ता सर्वमय आहे,

इतकाच त्यांतून अर्थ निघतो. त्यांत मैथुनक्रियेचीच विवक्षा नाहीं. भगवद्गीतेंत "धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि भरतर्षभ ॥" ७।११; "प्रजनश्चास्मि कंदर्पः" १०।२८; "द्यूतं छलयतामस्मि" १०।३६; ह्या जशा भगवंताच्या विभूति त्याचें व्यापकत्व दाखवितात किंवा रुद्राध्यायांतील तिसऱ्या अनुवाकांतील "स्तेनानां पतये" किंवा "तस्कराणां पतये" हीं वचनें रुद्राचें व्यापकत्व दाखवितात, त्याचप्रमाणें शंभुगीतेंतील हें वर्णन समजावें.

**आक्षेप (६)— शिवलिंगोपासनेचें अर्वाचीनत्व.** पुराणांत सात्त्विक, राजसिक व तामसिक असे तीन वर्ग आहेत. त्यांपैकीं—

१. शिव आणि वायु अशा कांहीं तामसीपुराणांत शिवोपासनेचें माहात्म्य वर्णिलें असलें तरी तीं पुराणें अगदींच अर्वाचीन सांप्रदायिकांनीं आपल्या संप्रदायाच्या बडेजावासाठीं रचलेलीं असल्यामुळें त्यांस प्रामाण्य देतां येत नाहीं. मत्स्यपुराणांतील अठरा पुराणांच्या यादींत शिवपुराण नाहीं आणि भागवतपुराणांतील यादींत वायुपुराण नाहीं. अर्थात् हीं मागूनचींच ठरतात.

२. बाकीच्या पुराणांत व महाभारतांत शिवमहिमा कोठें कोठें वर्णिलेला आढळतो. तो भाग उघड उघडच प्रक्षिप्त दिसतो. शैवसांप्रदायिकांनीं आपल्या शिवाचें माहात्म्य मागाहून शैवेतर पुराणांतून वाढविलें आहे. तसेंच मूळचें व्यासकृत भारताचें सौतीनें महाभारत केलें, त्या वेळीं शिव-विष्णुविरोध दूर करण्यासाठीं कित्येक अध्यायांत शिवमहिमा व शिवसहस्रनाम असे विषय मागाहून वाढविलेले आहेत, असें उघड दिसतें.

**खुलासा ६:**— शिवलिंगोपासनेच्या अर्वाचीनत्वाबद्दल वरील मुद्दे फोल आहेत. शिवपुराण व वायुपुराण हीं अर्वाचीन आहेत असें म्हणण्यास कांहींच पुरावा नाहीं. शिवपुराणास वायुपुराण हें नांव अद्यापिहि दिलेलें आढळतें. मत्स्यपुराणातील यादींत शिवपुराण नसलें तरी वायुपुराण आहेच. आणि भागवतपुराणांतील यादींत वायुपुराण नसलें तरी भागवतादि नऊ पुराणांत उल्लेखित शिवपुराण आहेच. मुद्गलपुराणांत शिवपुराण व वायु-पुराण दोहोंचा उल्लेख आहे. मत्स्य, नारद, देवीभागवत यांत वायुपुराण उल्लेखित आहे. वायुपुराणांत म्हटलें आहे :— "यथा शिवस्तथा शैवं

पुराणं वायुनोदितम्। शिवभक्तिसमायोगात्नामद्वय विभूषितम्॥" तसेंच "चतुर्थं वायुना प्रोक्तं वायवीयमितिस्मृतम्। शिवभक्ति समायोगात् शैवं तच्चापराख्यया॥" शैवपुराणाची श्लोकसंख्या एक लक्ष आहे. त्यांत विश्वेश्वरसंहिता (दहा हजार), वायुप्रोक्तसंहिता (चार हजार), धर्मसंहिता (पांच हजार) याप्रमाणें बारा संहिता आहेत. त्यांतल्या कांहीं आज उपलब्ध नाहींत. विल्सनसाहेबांच्यादि मतें सर्व पुराणांत वायुपुराण पहिलें आहे. आपस्तम्ब धर्मसूत्र २।२६।२५ व आद्य शंकराचार्य, बाण कवि यांच्या ग्रंथांतून अठरा पुराणांचा उल्लेख आहे.

प्रक्षिप्तवाद :—प्राचीन ग्रंथांतील जो भाग आपल्याला पटत नसेल त्याला प्रक्षिप्त ठरविणें सोपें नाहीं व सयुक्तिक नाहीं. वैदिक वाङ्मय, उपनिषदें, सारीं पुराणें, रामायण-महाभारत हे इतिहास, यांत शिवमहिमा भरपूर व अनन्यसाधारण वर्णिलेला असतां प्रक्षिप्त काय काय व कशावरून ठरवावें? महाभारतांत श्रीकृष्णाविशीं शिवाचा महिमा अधिक असा प्रक्षिप्त भाग कोण घालून देईल? ज्यांत शिवमहिमा वर्णिलेला नाहीं, अशी एखादी तरी भारत-भागवताची प्रत उपलब्ध झाली आहे काय? श्वेताश्वतर, रुद्र-हृदयोपनिषद् अशीं अनेक समंघ उपनिषदें व पुराणें शिवमहिमापर आहेत. तेथें प्रक्षिप्त काय म्हणावें? दहा पुराणें शैवच आहेत. त्यांतहि प्रक्षिप्त तें काय? पद्मपुराण हें वैष्णवपुराण फार प्राचीन मानतात. त्यांत शिवगीता आहे. वायुपुराणहि फार प्राचीन मानतात. तें तर शैवपुराणच आहे. नारद-मत्स्यादि पुराणातील पुराणांच्या यादींत पुराणांची जी श्लोकसंख्या दिली आहे, तितक्या श्लोकांची संख्या आज उपलब्ध असलेल्या पुराणांत आढळत नाहीं. शिवपुराणाची तर एक लक्ष संख्या सांगितली आहे. पण दहा हजार (फार तर तेरा हजार) श्लोकांविशीं अधिक श्लोकांची एकहि संहिता उपलब्ध नाहीं. तात्पर्य, प्राचीन पुराणांत प्रक्षिप्त भागाचा वाढवा नसून उलट बऱ्याच अंशाचा लोप झाला आहे, हेंच सिद्ध होतें.

आक्षेप (७)— ऐतिहासिक दृष्टीनें संशोधन करणारांस असें दिसतें कीं, शैवांचें पाशुपतदर्शन हें बौद्ध आणि हिंदु यांच्या वामाचारांचें अर्वाचीन मिश्रण आहे. ज्या अर्थी ह्युएन्संग या चिनी यात्रिकरूनें लिंगपूजेचें वर्णन केलें नाहीं, त्या अर्थी ती त्याच्या प्रवासाच्या वेळीं भरतखंडांत सुरू नसलीच पाहिजे. हें

उघड सिद्ध होतें. मूर्तिभंजक परकीयांच्या आक्रमणांत हिंदूंच्या शिवाच्या मूर्तींची फोडतोड होऊं लागली, म्हणून महमूद गजनवीच्या आक्रमणाच्या सुमारास शिवमूर्तीच्याऐवजीं शिवलिंगपूजा सुरू झाली असावी. जैन व बौद्ध याच्या अनाचाराच्या प्रतिक्रियारूप शिवलिंगोपासक वाममार्गी शैवपंथ त्यानंतर निघाला, असें स्पष्ट दिसतें. याला वैदिक साहित्यांतील आसुरी प्रभाव असें एक आक्षेपक ठरवितात.

**खुलासा ७ :—** जेथें शिवलिंगोपासनेच्या प्राचीनत्वाचे हजारों पुरावे निर्विवाद उपलब्ध आहेत, तेथें ह्युएन्संग याच्या प्रवासवर्णनाची मातबरी ती काय? श्रीरामकृष्ण परमहंस एक नक्कल सांगत, एका गृहस्थानें एका घराला रात्रीं आग लागल्याचें सांगितलें. तें ऐकणारांस खरें वाटेना. तेव्हां त्यांपैकीं एक शहाणे गृहस्थ म्हणाले कीं, आजच्या दैनिकांत छापलें आहे का पहा. तेव्हां तो पहिला गृहस्थ रागानें म्हणाला, " अहो, मीं समक्ष डोळ्यांनीं पाहिलेलें सांगितलें. तेथें दैनिकांतील बातमीपत्राची किंमत काय!"

मुसलमान मूर्ति फोडतात म्हणून शिवाची लिंगपूजा सुरू झाली असें म्हणावें, तर मग मथुरेच्या कृष्णाची व अयोध्येच्या रामाची मूर्तिपूजा कशी सुरू राहिली? शिवाय सोरटी-सोमनाथ, काशीविश्वेश्वर इत्यादि मूर्ति नसून शिवलिंगें होतीं म्हणून तीं मूर्तिभंजकांच्या आक्रमणांतून थोडींच वांचलीं आहेत!

जैन आणि बौद्ध यांच्या धर्मस्थापनेच्या हजारों किंबहुना लक्षावधि वर्षांपूर्वीपासून शिवलिंगोपासना रूढ असल्याचें मागेंच सांगितलें आहे. ती जैन-बौद्धांच्या अनाचाराची प्रतिक्रिया म्हणणें हें अत्यंत निराधार साहस आहे. ( पृ. १६१ ते १६३ ).

**आक्षेप ८ :—** शिवलिंगोपासना अवैदिक, अयुक्तिक व अर्वाचीन आहे. वैदिक वाङ्मयांत मूर्तिपूजेला आधार नाहीं. त्याचप्रमाणें त्यानंतरचीं ब्रह्मसूत्रें गीता-भागवतादि शास्त्रें, संतवाङ्मय व आधुनिक धर्मसुधारक समाज या सर्वांनीं मूर्तिपूजेचा निषेध केला आहे. **खुलासा नं. ८** हा खुलासा येथें त्रोटक रीतीनें न करितां पुढील स्वतंत्र प्रकरणांत केला आहे.

इदंद्वयंयदानासीत्सदसदात्मकं च यत्।
तदा ब्रह्ममयं तेजो व्याप्तिरूपं च संततम्॥ शि. पु २।१५

---

## प्रकरण १३ वें

# मूर्तिपूजाविरोधाभास

अग्नौ क्रियावतां देवो दिवि देवो मनीषिणाम्
प्रतिमा स्वल्पबुद्धीनां योगिनां हृदये हरिः ॥
—ऋग्विधाने शौनकाः ।

या प्रकरणांत ज्या श्रुतिशास्त्रसंतादींच्या आप्तवचनांत आक्षेपकाला मूर्तिपूजाविरोध वाटतो तो वस्तुतः विरोध नसून विरोधाभास आहे, हा विचार करावयाचा आहे. ते मुद्दे कारणापुरते त्रोटक रूपांत पुढें खुलाशांसह देत आहें. प्रथम श्रुतींचा अभिप्राय पाहूं.

**मुद्दा पहिला:**— केनोपनिषदांतील पहिल्याच खंडांतील आरंभींच्या मंत्रांपैकीं ४ ते ८ मंत्र पुढीलप्रमाणें उद्धृत करून त्यांचा खालीं दिल्या-प्रमाणें आक्षेपक अर्थ सांगतात व त्यायोगें शिवलिंग हें उपासनीय नाहीं, असा निष्कर्ष काढूं पाहतात. ते मंत्र आक्षेपकांच्या अर्थासह असेः—

यद्वाचानभ्युदितं येनवाग्भ्युद्यते । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ १ ॥ (४) यन्मनसा न मनुते येनाहुर्मनो मतम् । तदेव ब्रह्म त्वं विद्धि नेदं यदिदमुपासते ॥ २ ॥ (५) यच्चक्षुषा न पश्यति येन चक्षूंषि पश्यन्ति । तदेव० ॥ ३ ॥ (६) यच्छ्रोत्रेण न शृणोति येन श्रोत्रमिदं श्रुतम् ॥ तदेव० ॥ ४ ॥ (७) यत्प्राणेन न प्राणिति येन प्राणः प्रणीयते ॥ तदेव० ॥ ५ ॥ (८) (आक्षेपकाचा अर्थ) (१) जो परमेश्वर वाणीचा विषय नाहीं (जसें हें पाणी घे) व ज्याच्या धारणेनें व सत्तेनें वाणीची प्रवृत्ति सुरू असते त्यालाच तूं ब्रह्म आहे असें जाण व त्याची तूं उपासना कर. याच्या-हून जे भिन्न आहेत ते उपासनीय नाहींत. (२) जो परमेश्वर मनानें इयत्ता करून जाणला जात नाहीं, पण जो मनाला जाणत असतो, त्यालाच तूं ब्रह्म आहे असें जाण व त्याचीच उपासना कर. त्याच्याशिवाय जीव

१ याप्रमाणें मूळ हिंदींत आहे. (दयानंद तिमिरभास्कर, पृ. ३६४ व पुढें)

व अंतःकरणादिक जे पदार्थ आहेत त्यांची ब्रह्माच्या ठिकाणीं उपासना करूं नकोस. (३) जो परमेश्वर डोळयाला दिसत नाहीं, पण ज्याच्या योगानें डोळयाला दिसत असतें, तेंच ब्रह्म आहे, असें जाण व त्याचीच उपासना कर. त्याशिवाय सूर्य, विद्युत्, अग्नि वगैरे जे जड पदार्थ आहेत, त्यांची उपासना करूं नकोस. (४) ज्या परमेश्वराचें ग्रहण कान करूं शकत नाहींत, पण ज्याच्या योगानें कान शब्द ऐकूं शकतात, तेंच ब्रह्म आहे असें जाणून तूं त्याची उपासना कर. याच्याशिवाय जे शब्दादि विषय आहेत, त्यांची उपासना त्या ठिकाणीं करूं नकोस. (५) जो परमेश्वर प्राणाच्या योगानें गतिमान् होत नाहीं, पण ज्याच्या योगानें प्राण गतिमान् होतात, तें ब्रह्म आहे, असें तूं समज व त्याचीच उपासना कर. याशिवाय वायु वगैरे जे इतर पदार्थ आहेत त्यांची उपासना करूं नकोस.

**खुलासा** :— या आक्षेपाचा खुलासा करतांना प्रथम हें सांगितलें पाहिजे कीं, वरील उद्धृत केलेल्या मंत्रांत व त्यांच्या भावार्थांत अनेक चुका आहेत. (१) मूलमंत्र ६ यांत 'येन चक्षूंषि पश्यति ।' असें आहे. पश्यन्ति असें नाहीं. (२) या प्रकरणांत व मंत्रांत उपासनेचा विधि किंवा कोणत्याहि उपासनेचा निषेध हा विषयच नाहीं. उलट ब्रह्म हें सर्व प्रमाणांचा व इंद्रियांचा अविषय, स्वप्रकाश आणि सर्व प्रमाणांचें व इंद्रियांचें प्रकाशक आहे, असें शुद्ध ब्रह्माचें वर्णन करून तेंच उपासकाच्या कूटस्थ आत्म्याचें स्वरूप आहे हें सांगणें, हाच या केनांतील प्रथम खंडाचा विषय आहे. उपास्य ईश्वर अगर त्याची प्रतिमा किंवा ब्रह्माचें एखादें अनात्म प्रतीक हीं स्वरूपतः ब्रह्म नव्हत एवढाच या पांची मंत्रांतील भावार्थ आहे.

अर्थात् वरील पहिल्या (मूळ ४ त्या) मंत्राच्या अर्थात, (१) 'जसें हें पाणी घे.' (२) 'त्याची तूं उपासना कर.' (३) 'त्याच्याशिवाय जे दुसरे पदार्थ आहेत, ते उपासनीय नाहींत' हा सारा अर्थ स्वकपोलकल्पित आहे. मूळ मंत्रांत या अर्थाचे वाचक शब्द मुळींच नाहींत. वस्तुतः ब्रह्म ही इष्ट वस्तु आहे. ती उपास्य किंवा उपासनीय आहे, असें या खंडांत कोठेंच सांगितलेलें नाहीं. ब्रह्म हें एकमेवाद्वितीय असें आहे. जेथें द्वैतच संभवत

१ हा व यापुढील कांहीं खुलासे पंडित ज्वालाप्रसाद मिश्रजी यांच्या 'दयानंदतिमिरभास्कर' या ग्रंथाधारें केले आहेत.

नाहीं, तेथें विषयविषयीभाव कोठला असणार? अर्थात् स्वरूपतः हें अविषयरूप असल्यामुळें तें परमार्थतः उपासनीय म्हणतांच येत नाहीं. ब्रह्माला उपासनीय मानलें तर तें दृश्य अथवा विषयस्वरूप ठरेल. तसें परमार्थतः ब्रह्म नाहीं. आतां वरील दुसऱ्या म्हणजे मूळच्या ५ व्या मंत्राच्या अर्थात "(१) त्याच्याशिवाय जीव व अंतःकरणादिक जे पदार्थ आहेत, (२) त्याची ब्रह्माच्या ठिकाणीं उपासना करूं नकोस." या दोन्ही विधानांना मूळ मंत्रांत मुळींच आधार नाहीं. हा सारा अर्थ मनःकल्पित आहे. इतकेंच नव्हे तर, अशास्त्रीय व अव्यवस्थित आहे जें ब्रह्म मनालाहि अविषय आहे, त्याच्या ठायीं दुसऱ्या वस्तूची उपासना संभवेल कशी? शिवाय जीव व अंतःकरण ह्या कोणीच उपास्य वस्तु मानीत नाहींत. उलट अहंच्या ठिकाणीं व मनाच्या ठिकाणीं ब्रह्माची धारणा करण्यास शास्त्र सांगत आहे. आतां वरील तिसऱ्या (मूळच्या ६ व्या) मंत्राच्या अर्थांत (१) व त्याचीच उपासना कर. (२) त्याशिवाय सूर्य, विद्युत्, अग्नि वगैरे जे जड पदार्थ आहेत, त्यांची उपासना करूं नकोस. या दोन्ही वाक्यास मुळांत मुळींच आधार नाहीं. शिवाय, वरील अर्थांत सूर्य, अग्नि, विद्युत् हे पदार्थ जड आहेत, ते उपासनीय नाहींत, हें म्हणणें शास्त्रविरोधी आहे. या केन उपनिषदांतच तृतीय खंडात सूर्य, अग्नि व वायु या देवतांचा संवाद आहे. हे देव शास्त्रात उपास्य मानले आहेत. आदित्य ही गायत्री मंत्रातील देवता प्रसिद्धच आहे तसेंच 'विद्युद्ब्रह्मेत्याहु- र्विदानात्।' बृ. उप. ७।७ या मंत्रांत विद्युतच्या ठिकाणीं ब्रह्मधारणा स्पष्ट सांगितली आहे. अर्थात् हे पदार्थ जड नाहींत व अनुपासनीय पण नाहींत. आणि मूळ मंत्रांत या अर्थाचा लवलेशहि नाहीं अद्वैत तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें उपासना ही द्वैती असल्यामुळें 'कृपण' म्हटली जाते. हा कांहीं उपासनेचा निषेध नव्हे. याप्रमाणेंच शेवटच्या दोन मंत्रांच्या अर्थांतील शेवटलीं दोन वाक्यें निराधार आहेत. येथें आणखी एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे ती ही कीं, ब्रह्माचें विद्युद्रूपांत अधिदैव उपासन, मनरूपात अध्यात्म उपासन व 'वन' या गुणवाचक संज्ञेत सगुण उपासन याच केनोपनिषदात खंड ४।६, मंत्र २९ ते ३१ यात सांगितलें आहे.

मुद्दा दुसरा:—'अन्धतमः प्रविशन्ति येऽसंभूतिमुपासते। ततो भूय इव ते तमो य उ संभूत्यां रताः॥' ईश. उप. १२ या मंत्राचा भावार्थ कोणी

असा काढतात कीं, जे परमात्म्याच्या (ब्रह्माच्या) अधिष्ठानाच्या ठिकाणीं असंभूत म्हणजे अनुत्पन्न अनादि प्रकृतिकारणाची म्हणजे शक्तीची उपासना करतात, ते अंधकार, अज्ञान, दुःख यांत बुडतात आणि जे ब्रह्माच्या ठिकाणीं संभूताची (जड पाषाणलिंगाची) उपासना करतात ते अधिकच क्लेशदायक नरकात पडतात.

**खुलासा:—** पण येथेंहि मागचा-पुढचा संदर्भ श्रीमच्छंकराचार्यांच्या भाष्यासह पाहिला तर सम्यक् देवताज्ञानासह प्रतीकोपासना-कर्म ईशश्रुतीस व आचार्यांस संमतच आहे असें दिसेल. वर जो मंत्राचा अर्थ केला आहे तो वस्तुतः रूढ कर्तृतंत्र उपासनेच्या अगदीं उलट आहे. वस्तुतः ब्रह्माच्या ठिकाणीं कार्यकारणरूप प्रतीकाची धारणा कोणीच उपासक करीत नाहींत. उलटें प्रतीकाच्या ठिकाणीं ब्रह्मभावना किंवा ईश्वरभावना करतात. शिवाय ईशावास्यांतील ९ ते १४ या मंत्रांत जो निषेध किंवा, जी निंदा आहे ती निंदेकरितां प्रवृत्त झालेली नाहीं. तर त्याहून श्रेष्ठ उपासनेच्या स्तुतीकरितांच केलेली आहे, हें रहस्य लक्षांत घेतलें पाहिजे.

**मुद्दा तिसरा:—** यजुर्वेदांत असा मंत्र आहे:—

न तस्य प्रतिमाऽअस्ति यस्य नाम महद्यशः।

हिरण्यगर्भऽइत्येष मा मा हिꣳसीदित्येषा यस्मान्न जातऽइत्येषः ॥३२-३

या मंत्रांतील 'न तस्य प्रतिमाऽअस्ति' याचा अर्थ असा करतात कीं, जो परमेश्वर सर्व जगांत व्यापलेला आहे, त्या निराकार परमेश्वराची (ज्याचें नांव महादेव म्हणजे मोठा देव असें आहे त्या महादेवाची) प्रतिमामूर्ति मुळींच नाहीं किंवा त्याचें परिमाण किंवा सादृश्यहि नाहीं. यावरून निष्कर्ष असा निघतो कीं, शिवलिंगपूजा अवैदिक आहे, अतएव त्याज्य आहे

**खुलासा:—** या मंत्रांतील 'तस्य' याचा अर्थ निराकार नाहीं. पूर्वापार संदर्भानें व्यापक साकार असा आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, या मंत्रांतील प्रतिमा शब्दाचा अर्थ मूर्ति असा करतां येत नाहीं. कारण येथें

१ मंत्र ११ व १४ यावरील शांकरभाष्य पहा.

२ ब्रह्मसूत्र ४।१।५ पहा.

कार्यरूप हिरण्यगर्भाची प्रतीकोपासना विधेय म्हणूनच सांगितली आहे.[1] अर्थात् येथें प्रतिमा या शब्दाचा अर्थ उपमा असा केला पाहिजे. नाहीं तर मंत्राच्या अर्थात आत्मविरोध उत्पन्न होईल. त्या व्यापक साकार हिरण्यगर्भाला दुसरी उपमा नाहीं असा याचा अर्थ होय.

याच्या पुष्टीकरणार्थ ब्रह्मसूत्र ३।२।१७ यावरील शांकरभाष्य पाहावें. येथें श्वेताश्वतरांतील ४।१९ या मंत्राचा उल्लेख आहे. त्या मंत्रावरील शंकराचार्यांचें भाष्य पहा.

मंत्रः—नैनमूर्ध्वं न तिर्यञ्च न मध्ये परिजग्रभत् । न तस्य प्रतिमा अस्ति यस्य नाम महद्यशः ॥ १९ ॥

शांकरभाष्य—परिच्छिन्नं वस्तु ग्रहीतुं निरोद्धुं वा शक्यते परेशस्तु सर्वदिग्देशकालेष्वपरिच्छिन्नोऽस्ति तादृशाखण्डैकरसोऽद्वितीयः कोपि नास्ति यनोपमीयेत, भगवतः पूजार्थं प्रतिमानिर्माणमवतारविग्रहाणां क्रियते न तु दिगाद्यनवच्छिन्नस्याखण्डस्य, भगवतो नाम जपो महद्यशः करोति ॥

भावार्थः—परिच्छिन्न वस्तूला धारण अगर ग्रहण करतां येतें. पण परमेश्वर सर्व दिक्कालांत आकाशाप्रमाणें अखण्ड व अपरिच्छिन्न आहे. असा अखंड, एकरस दुसरा कोणताच पदार्थ नाहीं कीं, ज्याची या ईश्वरस्वरूपाला उपमा साजेल. आतां भगवंताच्या पूजेकरितां जी प्रतिमा म्हणजे मूर्ति करतात ती त्याच्या अवतारांच्या शरीराची केलेली असते. एकरस, अखंड व व्यापक परमेश्वराची नव्हे. भगवंताचें नामस्मरण हें महान् यशदायक आहे.

तेव्हां साकार विश्वरूप परमात्म्याला दुसरी उपमाच देतां येत नाहीं, हाच अर्थ दोन्ही ठिकाणीं पूर्वापर संदर्भ पाहतां योग्य आहे. उलट प्रतिमा म्हणजे मूर्ति असा अर्थ जेथें अभिप्रेत आहे, अशा अन्य वैदिक वचनांत परमेश्वराच्या

---

१ दयानंद तिमिरभास्कर, पृ. ३६८ पासून पुढें पहा. शतपथ ब्रा. ७।४।१-१५; कात्यायन कल्पसूत्र १७।४।३. ऋग्वेद ८।७।१८।३ पहा. यजुर्वेद १३।३, ४ पहा.

२ न तस्य प्रतिमास्तीति च ब्रह्मणोऽनुपमानत्वं दर्शयति ।

प्रतिमेचें ग्रहणच केलें आहे. उदाहरणार्थ :— सहस्रस्य प्रतिमासि, यजु. १५।६५. प्रतिमा असि, तै. आ. ४।५. प्रतिमामसृजत, शत. ब्रा. ११।१।८।३; ११।१।६।१३; अथर्व. ३।१०।३. ऋग्वेद. ८।८।१३।३; ८।७।१८।३. शिवाय, शिवलिंग हें कारणब्रह्माचें प्रतीक आहे; शिवाची प्रतिमा नव्हेच. आतां शिवाच्या सगुणविग्रहाच्या प्रतिमा कोठें कोठें असतात, त्यांतहि अशास्त्रीय कांहीं नाहीं, असें श्वेताश्वतरांतील शांकरभाष्य स्पष्टच दर्शवितें. तात्पर्य, वरील वचनांत मूर्तिपूजाखंडन नाहीं हें उघड आहे.

**मुद्दा चौथा** :— " न प्रतीके न हि सः ।" ( ब्रह्मसूत्र ४।१।४ ) या सूत्राचा आक्षेपक असा अर्थ करतात कीं, अनंत असा परमात्मा (अथवा परमशिवतत्त्व) अल्प (उ० पिंडी अथवा बाण) प्रतीकांत सामावत नाहीं. अल्पप्रतीक परमात्म्याशीं साधर्म्य अगर सारूप्य पावत नाहीं. ब्रह्माचें प्रतीक अशी जगतांत कोणतीच वस्तु नाहीं. शिवाय मूर्तिपूजा हा इंद्रियांचा विषय आहे. उलट परमात्मोपासनेंत इंद्रियग्राह्य विषयांतून आत्मा निवृत्त झाल्यानेंच ती साधणारी आहे.

**खुलासा** :— प्रकृत सूत्राच्या मागच्या व पुढच्या सूत्रांचा संदर्भ पाहिला म्हणजे या सूत्राचा अर्थ आक्षेपक करतात तसा होत नाहीं हें स्पष्ट होतें. कसें तें पहा : " आत्मेति तूपगच्छन्ति ग्राहयन्ति च ॥ ३ ॥" या तिसऱ्या सूत्राचा भावार्थ असा आहे कीं, जीवेश्वरांचा विरोध औपाधिक आहे. वास्तव आत्मत्वानें ब्रह्माचें ग्रहण करावें.[२] याप्रमाणें तत्त्ववेत्ते " अहं ब्रह्मास्मि ।" बृ. १।४।१०. " अयमात्मा ब्रह्म ।" मांडुक्य. २, इत्यादि महावाक्यांनीं आत्मत्वानेंच ब्रह्माचें ग्रहण करतात.

---

१ येथें जे आधार उदाहरणार्थ दिले आहेत, त्याप्रमाणें प्रतिमापूजा हा वैदिक विधि असल्याचे दुसरे पुष्कळ आधार देतां येतील. दयानंद तिमिरभास्कर, पृ. ३५०–३७८. धर्मविज्ञान प्रथमखंड, पृ. ४२३–२६ पहा.

२ औपाधिको विरोधोऽत आत्मत्वेनैव गृह्यताम् ।
गृह्णन्त्येव महावाक्यैः स्वशिष्यान्ग्राहयन्ति च ॥
—वैयासिक न्यायमाला, ४।१।४.

पण जेथें ब्रह्माचें प्रतीक उपासनेकरितां घेतलेलें असतें तेथें उपासकानें प्रतीकामध्येंहि अहंग्रह करावयाचा नाहीं, म्हणजे प्रतीक आत्मत्वानें ग्रहण करतां येत नाहीं असा पुढील 'न प्रतीके न हि सः' ४।१।४ या सूत्राचा अर्थ आहे. आतां ब्रह्मद्वारां म्हणजे उपासक जीव व प्रतीक या उभयतांचें अधिष्ठानरूप ब्रह्माच्या दृष्टीनें जर उपासक जीव प्रतीकाच्या ठिकाणीं ब्रह्मैक्य-दर्शन करूं पाहील, तर तेथें प्रतीकत्व व उपासकत्वच उरणार नाहीं. उलट तसें ब्रह्मैक्य न पाहिल्यास प्रतीक व जीव यांत भिन्नत्व आहे ( मागील सूत्रांतील आत्मा व ब्रह्म याप्रमाणें ऐक्य नाहीं ). यामुळें प्रतीकाच्या ठिकाणीं अहंदृष्टि योग्यताच नाहीं. तात्पर्य, उपासक जीव किंवा प्रतीक कोठेंहि ब्रह्मदृष्टि ठेवल्यास अनुक्रमें उपासकत्व व प्रतीकत्व नाहींशीं होतात.[1]

याच्या पुढील सूत्र ब्रह्मदृष्टिरुत्कर्षात् । ४।१।५ या सूत्रानें सूत्रकार सांगतात कीं, निकृष्ट अशा प्रतीकांत उत्कृष्ट अशी ब्रह्मदृष्टि ठेवावी. कारण निकृष्टांत उत्कृष्ट दृष्टि ठेवली असतां, निकृष्टाची उत्कृष्टता होते. अर्थात् शिवलिंगाच्या ठिकाणीं कर्तृतंत्र उपासनेंत परमशिवाची अथवा कारण-ब्रह्माची धारणा करण्यास प्रत्यवाय नाहीं. उपासना कर्तृतंत्र म्हणजे कर्त्याच्या स्वाधीन असल्यामुळें उपासक जड प्रतीकाच्या ठिकाणीं ब्रह्मभावना करण्यास स्वतंत्र आहे. तसें करणें योग्यच आहे. तात्पर्य, बाणाच्या ठिकाणीं शिवाची धारणा उपासनेसाठीं करणें योग्यच ठरतें. या परोक्ष ध्यानधारणेच्या परिपाकानें शिव परमात्मा अपरोक्ष होतो, असें हें उपासना-तंत्र आहे. कोणीहि प्रतिमाप्रतीकपूजक त्या प्रतिमाप्रतीकाशीं परमेश्वराचें साधर्म्य आहे, अथवा त्या प्रतिमाप्रतीकांतच परमात्मा पूर्णत्वानें सामावलेला आहे, असें मानीत नाहीं. पण व्यापक असलेल्या परमात्म्याचा अंश त्या प्रतिमाप्रतीकातहि आहे, असें तो जाणत असतो. उदाहरणार्थ—श्रीतुकोबाराय

१ प्रतीकत्वोपासकत्वहानिर्ब्रह्मैक्यवीक्षणे ।
अवीक्षणे तु भिन्नत्वान्नाहम्यहंदृष्टियोग्यता ॥
— वैयासिक न्यायमाला, ४।१।६.

२ उत्कर्षोंति परत्वाभ्यां ब्रह्मदृष्ट्यान्याचिन्तनम् ।
अन्योपास्त्या फलं दत्ते ब्रह्मातिथ्याद्युपास्तिवत् ॥ ८ ॥
— वैयासिक न्यायमाला, ४।१.

म्हणतात, "अवघें ब्रह्मरूप, रिता नाहीं ठाव। प्रतिमा तो देव कैसा नव्हे ?॥" त्यांतहि आणखी गायीच्या सर्व शरीरांत दुग्धाचें मूळ स्वरूप असलें तरी दुग्धोपलब्धीचें विशेपस्थान गाईचे आचळ असतात. त्याप्रमाणें व्यापक परमात्म्याच्या उपलब्धीचें विशेष स्थान शिवलिंगादि प्रतीकें असतात. कारण, (१) अधिकारी पुरुषानें योग्य मंत्रानें तेथें देवतेची प्राणप्रतिष्ठा केलेली असते. (२) भक्त पूजकाच्या सद्भावनारूप ऋणविद्युच्छक्तीनें ईश्वररूप घनविद्युच्छक्ति प्रतिमाप्रतीक या माध्यमाच्या ठिकाणीं आकर्षिली जाते. (३) उपासक भक्त आपल्या हृदयस्थ असलेल्या इष्टदेवतेला पूजेकरितां हृदयांतून काढून तात्पुरती त्या प्रतिमाप्रतीकाच्या ठिकाणीं ती प्रस्थापित करीत असतो. (४) व्यापक ईशतत्त्वाचें स्फुलिंग त्या प्रतिमाप्रतीकांत अगोदरच जें असतें तेंच पूजक पूजाविधानानें व भक्तिभावनेनें जणूं प्रज्वलित करून तेथें इष्टदेवतेचें दिव्य तेज प्रदीप्त करूं शकतो असें हें मूर्तिपूजारहस्य आहे. यांत अयोग्य तें काय ? उपासकानें आत्मकल्याणासाठीं निकृष्ट प्रतीकावर आधिदैवतांची धारणा करावी व आधिदैवतानें उपासकाच्या कल्याणार्थ निकृष्ट प्रतीकांत अवतरावें, असे हे देवभक्तांचे उभयविध सापेक्ष संबंध आहेत. सगुणसाक्षात्कारी संतांना भावसमाधींत जें देवतेचें स्वरूप प्रतीत होतें त्याप्रमाणें त्या देवतेची प्रतिमा करतात. मूर्ति कशा कराव्या याचें शास्त्र आहे.

**मुद्दा पांचवा :**— कांहीं भगवद्गीतावचनांस धरून आहे. तो असा :—

अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः ।
परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ गीता–७।२४

भावार्थ :— निर्बुद्ध लोक माझें श्रेष्ठ व अत्युत्कृष्ट आणि अव्यय स्वरूप न ओळखतां मी सगुणरूपधारी आहें असें समजतात.

अवजानन्ति मां मूढा मानुषीं तनुमाश्रितम् ।
परं भावमजानन्तो मम भूतमहेश्वरम् ॥ गीता–९।११

भावार्थ :— मी सर्व भूतांचा परम ईश्वर आहें. माझें सत्यस्वरूप न ओळखणारे मूर्ख लोक माझ्या मनुष्यधारी स्वरूपाची अवहेलना करतात.

या श्लोकांवरून आक्षेपक असा निष्कर्ष काढतात कीं, जर ईश्वरी अवताराला मनुष्यरूप मानणें निंद्य आहे तर शिवाची पाषाणप्रतीकांत पूजा करणें अधिकच अविचाराचें ठरतें.

**खुलासा:**—या आक्षेपांत उपासनेच्या प्रक्रियेचेंच अज्ञान दिसून येतें. वस्तुतः देवदेवतांनीं जी लीलाविग्रहरूपें किंवा अवताररूपें घेतलीं, तशा मूर्ति उपासनेकरितां तयार करणें यांत अवास्तविक काय आहे ? उपासनेला आरंभ त्यानंतर होतो व ह्या उपासनेंत पाषाणमूर्तीच्या ठिकाणीं उत्कृष्ट ईशभावना किंवा ब्रह्मभावना करावयाची असते. ती शास्त्रसंमत आहे. ब्र. सू. ४।१।५. त्या उलट ईश्वराच्या ठिकाणीं पाषाणमूर्तीची अगर शिवलिंगाची भावना कोणीच उपासक करीत नाहींत. पाषाणमूर्ति किंवा शिवलिंग हें कोणाचेंच ध्येय नसतें. आतां या आक्षेपकानें आणखी दोन मुद्दे लक्षांत घ्यावे ते असे कीं, आक्षेपकांच्या वर्गांतील लोक शिवाजी, टिळक, गांधी यांच्या पुतळ्यांना हार घालतात, यास एका अर्थी मिथ्याचार म्हणतां येईल. कारण त्या व्यक्ति तेथें नसतात. पण ईश्वर हें व्यापक तत्त्व असल्यामुळें ईश्वराच्या पाषाणमूर्तीला केलेले उपचार ईश्वरासच केल्याप्रमाणें होतात व ते उपचार ईश्वरासच पोंचतात. कारण त्यास उद्देशूनच ते केलेले असतात व त्यांचा स्वीकार करण्यास व्यापक ईश्वर तेथें असतोच.

शिवाय वरील श्लोकांत आक्षेपक समजतो त्याप्रमाणें मूर्तिपूजकांचा तर निषेध नाहींच, उलट आक्षेपकांच्या वर्गांतील अनेक विद्वान् श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीशिव यास ऐतिहासिक मानव व्यक्ति समजात, त्यांचा मात्र येथें निषेध आहे. वास्तविक पाहतां उपासक हे व्यक्त प्रतीक किंवा प्रतिमाच्या ठिकाणीं अव्यक्त ईश्वर, परमात्मा किंवा परब्रह्म यांची धारणा करतात, मग ते श्रीराम, श्रीकृष्ण, श्रीशिव या परमात्म्यांच्या लीलाविग्रहाच्या ठिकाणीं अथवा त्याच्या मूर्तीच्या ठिकाणीं सामान्य मानवदेही पुरुषाची भावना करणारच नाहींत. अर्थात् वरील श्लोकांचा कटाक्ष मूर्तिपूजकांवर नसून तो वरीलप्रमाणें आक्षेपक वर्गावरच उलटण्याचा संभव दिसतो.

**मुद्दा सहावा:**—श्रीमद्भागवतांतील वचनांस अनुलक्षून आहे तो असा :—

अहं सर्वेषु भूतेषु भूतात्मावस्थितः सदा। तमवज्ञाय मां मर्त्यः कुरुतेऽर्चाविडम्बनम् ॥ २१ ॥ यो मां सर्वेषु भूतेषु सन्तमात्मानमीश्वरम्। हित्वाऽर्चां भजते मौढ्याद्भस्मन्येव जुहोति सः॥ २२॥ भागवत, अ. २९

**अर्थः**— माते, मी सर्व प्राण्यांचा आत्मा असल्यामुळें सर्व भूतांमध्यें नेहमीं आहेंच; असें असतांना मनुष्यानें **माझी अवज्ञा करून** मूर्तीची पूजा करणें म्हणजे माझा उपहास करणें आहे (२१) सर्व समर्थ असा मी सर्व भूतांमध्यें आत्मरूपानें वास करीत असतांना जो मनुष्य **माझा अपमान करून मूर्खपणानें** मूर्तीची पूजा करतो, तो भस्मामध्येंच होम करतो, असें म्हटलें पाहिजे. (२२) असा हा भागवतपुराणाकडून होणारा मूर्तिपूजा-विरोध दाखवितात.

**खुलासाः**— या श्लोकांत जे कोणी मूर्तींतील अंतर्यामीरूप ईश्वराची **उपेक्षा करून** केवळ जडमूर्तीची उपासना करतात, त्यांची निंदा केली आहे ती वास्तविकच आहे. खरी सगुणोपासना मूर्तीतील ईश्वराची व निर्गुणोपासना ब्रह्मदृष्टीची असते.

केला मातीचा पशुपती । परी मातीसि काय महती ॥
शिवपूजा शिवासी पावे । माती मातीमाजीं सामावे ॥

असें तुकोबाराय म्हणतात. अर्जुनानें मातीचें शिवलिंग करून विजयप्राप्त्यर्थ त्याला फुलें वाहिलीं, तीं किरातरूप शंकराच्या मस्तकावर दिसूं लागलीं, असें वनपर्वांत वर्णन आहे. यांत अर्जुनानें पूजा कोणाची केली तें स्पष्ट दिग्दर्शित केलें आहे. मूर्तीची प्राणप्रतिष्ठा मूर्तीच्या ठिकाणीं देवकळा आणण्यासाठींच करावयाची असते. अर्थात् उपासना मूर्तीतील देवकलेचीच असते अथवा उपासकानें आपल्या हृदयस्थ असलेल्या इष्टदेवतेची मूर्तीच्या ठिकाणीं आपल्या भक्तिभावनेनें स्थापना करून मगच त्या मूर्तिद्वारा किंवा प्रतीकद्वारा इष्ट-देवतेचीच पूजा करावयाची असते. अशी मूर्तीची अगर प्रतीकाची उपासना भागवतशास्त्रास अमान्य असती तर भागवताच्या एकादश स्कंधाच्या सत्ताविसाव्या अध्यायांत "शैला दारुमयी लौही लेप्या लेख्या च सैकती । मनोमयी मणिमयी प्रतिमाष्टविधा स्मृता ॥ १२ ॥" म्हणजे दगडाची, काष्ठाची, धातूची, मृत्तिकेची, चित्ररूप, वालुकामय, मनोमय व रत्नमय अशा चलाचल प्रतिमा हीं पूजेचीं अधिष्ठानें म्हणून कशीं सांगितलीं असतीं? बहुतेक सारे भागवतधर्मी ईश्वराच्या प्रतीक-प्रतिमांचे पूजकच आहेत.

**मुद्दा सातवा**!— कांहीं रूढ वचनावर अधिष्ठित आहे. तीं अशीं—
(१) प्रतिमा स्वल्पबुद्धीनाम् ॥ (२) मूर्खैश्च प्रतिमापूजा ॥ (३)

अधमा मूर्तिपूजाश्च ॥ (४) बहि पूजाधमाधमा ॥ या वचनांत मूर्तिपूजेचा निषेध केला आहे, असें आक्षेपक मानतात.

**खुलासाः**—अशा सुभाषितांत निंदा निंदेकरितां प्रवृत्त झालेली नसून मूर्तिपूजेहून (१) सहजावस्था, (२) ब्रह्मसद्भाव, (३) ध्यानधारणा अशा श्रेष्ठतर साधनांच्या तौलनिक स्तुतीकरितां ती केलेली असते असेंच ज्ञाते समजतात. तसें नसतें तर मूर्तिपूजेचा स्वीकार व पुरस्कार करणारीं शेंकडों वचनें शास्त्रांत सांपडलीं नसतीं व मूर्तिपूजा हजारों वर्षें शिष्टमान्य झाली नसती.

उदाहरणार्थ पुढील वचनें पहाः—द्वे वाव ब्रह्मणो रूपे मूर्तं चैवामूर्तं च ॥ (बृ. उप. २।३।१,) उपासकानां कार्यार्थं ब्रह्मणो रूपकल्पना। आयो धर्माणि प्रथमः ससादत ततो वपूंषि कृणुते पुरूणि, (अथर्व०), नमः किंट शिलाय च (रुद्र) प्रतिमादिषु हरिहरादेव पूजनम् (कुल्लूक), अथ मृत्पिण्डमुपादाय महावीरं करोति। शत० १४।१।२।१७; एहि अश्मानमातिष्ठ अश्मा भवतु ते तनुः (अथर्व० २।१३।४) यस्य पृथिवी शरीरम् यस्य अग्निः शरीरम्। (अंतर्यामी ब्राह्मण). ऋषीणां प्रस्तरोऽसि। नमो देवाय प्रस्तराय। (अथर्व संहिता); अदो यद्दारुप्लवते सिन्धोः पारे अपूरुषम्। तदा रमस्व दुर्हणो तेन गच्छ परस्तरम् ॥ ऋ. ८।८।१३।३; गवां सर्वाङ्गजं क्षीरं स्रवते स्तनमुखाद् यथा। तथा सर्वागतो देवः प्रतिमादिषु राजते ॥ १ ॥ (कपिलतंत्र)

आभिरूप्याच्च बिम्बस्य पूजायाश्च विशेषतः।
साधकस्य च विश्वासात् देवतासन्निधिर्भवेत् ॥

देवतायतनानि कम्पन्ते दैवतप्रतिमा हसन्ति, रुदन्ति, नृत्यन्ति स्फुटन्ति, स्विद्यन्त्युन्मीलन्ति निमीलन्ति ॥ सामवेद ब्राह्मण ३६. याशिवाय मूर्तिपूजकांच्या ईश्वरसाक्षात्काराच्या सत्यकथा असंख्य आढळतील त्या वेगळ्याच.

**मुद्दा आठवाः**—वरीलप्रमाणेंच एका रूढ वचनावर अवलंबून आहे. "न काष्ठे विद्यते देवो, न पाषाणे, न मृण्मये। भावे हि विद्यते देवो, तस्माद्भावो हि कारणम् ॥ १ ॥" हें वचन मूर्तिपूजाविरोधक आहे असें आक्षेपक मानतात.

**खुलासाः**—"भाव तोचि देव" हें खरें असलें, तरी तो अंतर्देवाचा भाव ठेवण्यास स्थूल मूर्ति-प्रतीकांचें आलंबन लागतें. नाहीं तर पूजा कशाची

करायची? जे मूर्तिपूजक नाहींत त्यांनाहि उपासनेसाठीं विशिष्ट स्थान, स्थंडिल, ध्येयकल्पना असें कांहीं तरी आलंबन लागतेंच. तात्पर्य, भाव हाच श्रेष्ठ असला तरी उपासनेंत आलंबनाची गरज असतेच.

**मुद्दा नववा:**— हा संतांच्या वचनांतून संदेह उत्पन्न करणारा आहे तो असा:—

श्रीसमर्थ रामदास म्हणतात कीं, "मी तूं हाहि भ्रम। ईश्वरभाव हाहि भ्रम। उपासना हाहि भ्रम। निश्चयेंसीं॥" दा. बो. १०।६।११, "जें जें रूप आणि नाम। तो अवघाचि भ्रम। नामरूपातीत वर्म। अनुभवें जाणावें॥" ६।२।१३ दासबोध. याचा खुलासा पुढें केला आहे.

**मुद्दा दहावा**— वेदेश्वरींत चारी प्रकारच्या उपासना सांगून हंसराजस्वामी पुढें म्हणतात कीं, एवं संपद्विधि आरोप अध्यास। चौथें सवर्गनाम योगक्रियेस। या चत्वारीही उपासनेस। बहिरंगता बोलिजे॥२४२॥ तस्मात् तरावें ऐशी इच्छा जयासी। तेणें त्यागावें बहिरगासी। अतरगें साधावें दृढ ध्यानासी। सगुण अथवा निर्गुण॥२४३॥ वेदेश्वरी १२.

आतां मूळ शिवगीतेंत जरी तसें स्पष्ट म्हटलें नाहीं, तरी त्याजवरील ज्ञानयोगिराज श्रीहंसस्वामी यांच्या वेदेश्वरी टीकेंत ही चार प्रकारची बहिरंग उपासना सांगण्यापूर्वी ते स्पष्टच बजावतात कीं, "तें बहिरंग जें उपासन। त्यागावेंचि विधानरूप कीं अविधान। जया साधका यथार्थ वाटे तरणें। तेणें अंतर्ध्यान करावें॥१७३॥ परि ते बहिरंगाचीं लक्षणें। कळलीं पाहिजेत कोणकोणें। तेचि बोलिजेताहेति ऐकोनि करणें। त्यागचि साधकें॥१७४॥ वेदेश्वरी १२. याचा खुलासा पुढें केला आहे.

**मुद्दा अकरावा**— सर्व संतांच्या वाङ्मयात हा मूर्तिपूजानिषेध त्यांनी मुग्ध ठेवला नाहीं. उदाहणार्थ:— (३) संतशिरोमणी ज्ञानेश्वर म्हणतात-"निर्जिवा दगडाची काय करिसी सेवा। तो तुज निंदवा देईल काय?" (४) श्रीविठ्ठलाचे परमभक्त नामदेव म्हणतात-"देव दगडाचा। भक्त हा भावेचा। संदेह दोघांचा। फिटे कैसा॥ ऐसे देव हेहि फोडिले तुर्की। घातले उदकीं बोभातीना॥ ऐसीं लोहदेवतें। नको दावूं आतां। नामा म्हणे केशवा। विनवीतसे॥" तसेंच आणखी-"भजन चालिलें उफराटें। कोण जाणे खरें खोटें॥" "सजीव तुलसी तोडा। पूजा निर्जीव दगडा॥

चेला करी तोडा तोडी। शिवा लाखोली रोकडी ॥ सिंदूर मावोनिया धोंडा। त्यासि भजती पोरारांडा॥ अग्निहोत्राचा सुकाळ। कुशपिंपळाचा काळ॥" (५) लोकसंग्रहकारी श्रीसमर्थरामदास दासबोधांत म्हणतात, "देव्हारांचा उठोनि देव। करूं नेणे सर्व जीव। तयाचेनि ब्रह्मकटाव। निर्मिला न वचे॥ देवें निर्मिली सृष्टि हे क्षिती। तिचे पोटीं पाषाण होती। तयासीच देव म्हणती। विवेकहीन॥ ८।१।५९॥" "देव घडिला सोनारी। देव वोतिला वोतारी। एक देव घडिला पाथरी। पाषाणाचा॥३७॥ नर्मदा गंडिका तीरीं। देव पडले लक्षवरी। त्याची सख्या कोण करी। असंख्यात गोटे॥" ८।१।३८. साक्षात् संतांकडूनच होणारा हा मूर्तिपूजाविरोध असंदिग्ध आहे, असें आक्षेपक म्हणतात.

खुलासा:—या आश्चर्यकारक व असंदिग्ध वाटणाऱ्या आक्षेपक संतवचनांचा खुलासा त्या त्या संतांची चरित्रें व त्यांचींच अन्य असंख्य वचनेंच करतात. या उपरिनिर्दिष्ट संतांनीं अखेरपर्यंत मूर्तिपूजा कधींच सोडली नाहीं. उलट लोकांस मूर्तिपूजेस लावलें. ज्ञानदेव व नामदेव यांची पंढरीची वारी अखेर पर्यंत जोरात सुरूच होती व समर्थ रामदासहि शेणाचुन्याचे मारुति लोकांस अखेरपर्यंत थापून देतच होते. आणि अगदीं आयुष्याच्या अखेरीस आपल्या समाधीवर बसविण्याकरितां सीतारामाच्या मूर्ति त्यांनीं मुद्दाम घडवून आणविल्या होत्याच. तेव्हां हें उघडच होतें कीं, या संतवचनांतील विरोध वस्तुतः मूर्तिपूजेला नव्हता. तो केवळ जडोपासनेला होता. तो उपास्य आणि उपासक ह्यालेला याच्यामधील दृष्टिभेद, अवस्थाभेद व अधिकारभेद यांच्या योगानें उत्पन्न विरोधाभास होय. मूर्तिपूजेची उपयुक्तता व महत्त्व त्यांनीं स्वतः अनुभविले होतें व त्यानंतरच "तुज सगुण म्हणूं कीं निर्गुण रे। सगुणनिर्गुण एक गोविंदु रे।" ही त्यांची उपासनेंतील उपाधिनिरपेक्ष द्वंद्वातीत दृष्टि झाली होती. "एकाच द्रव्याला कोळसा म्हणावें आणि हिराहि म्हणावें, हायड्रोजन आणि ऑक्सिजन यांस ज्वालाग्राही म्हणावें आणि त्यांच्या मिश्रणाला ज्वालानाशी पाणी म्हणावें, ज्वरिताला, "अंथरुणावरून हलूं नकोस," म्हणून सांगावें, आणि जवानाला तालीम करण्यास लावावें, लहान मुलास पागुलबोवाची भीति घालून रस्त्यांत बाहेर जाऊं देऊं नये, आणि रणांगणावरून पळून आलेल्या बाप्याला घरांत घेऊं नये, या प्रकारांत विसंगति नाहीं.

उगाच विरोधाभास आहे. अंतर्देवाला न विसरता मूर्तिपूजा करावी असा संतांचा भाव आहे. योग्य भावनेनें होणाऱ्या मूर्तिपूजेचा ते पुरस्कारच करतात. उदाहरणार्थ,

श्रीज्ञानदेव म्हणतात :—

अनुपम्य मनोहर। कांसे शोभे पीतांबर। चरणीं ब्रीदाचा तोडर। देखिला देवो॥ योगियाची कसवटी। दावितसे नेत्रपुटीं। उभा भीवरेच्या तटीं। देखिला देवो॥ बाप रखुमादेवीवरु। पुंडलिका अभयकरु। परब्रह्म साहाकारु। देखिला देवो॥ ३॥

नामदेव म्हणतात :—

पंढरीचा वास। चंद्रभागे स्नान। आणीक दर्शन। विठोबाचें॥
हेंच मज घडो जन्मजन्मांतरीं। मागणें श्रीहरी नाहीं दुजें॥

श्रीसमर्थ रामदास म्हणतात :—

पांचवी भक्ति तें अर्चन। अर्चन म्हणजे देवतार्चन। शास्त्रोक्त पूजाविधान। केलें पाहिजे॥ धातुपाषाणमृत्तिकापूजन। चित्रलेप सत्पात्रपूजन। आपले गृहींचें देवतार्चन। या नांव पांचवी भक्ति॥ नाना तीर्थक्षेत्रांस जावें। तेथें त्या देवाचें पूजन करावें। नाना उपचारीं अर्चावें। परमेश्वरासी॥ दा. बो. ४।५.

याप्रमाणें श्रीसमर्थ रामदास यांच्या व इतर सर्व संतांच्या वाङ्मयांत मूर्तिपूजेचा पुरस्कार करणारीं सहस्रावधि वचनें सांपडतील. उदाहरणार्थ, श्रीसंतश्रेष्ठ तुकोबाराय यांचा पुढील अभंग पहा. "विठ्ठल मुक्तिदाता। नव्हे, मरो हे बोलतां॥ मज न साहावे कानीं। विष उत्तर लागे मनीं ++ सुना काळतोंडा। जो या देवा म्हणे धोंडा॥ अहं ब्रह्म। नेणें भक्तीचें तें वर्म॥ तुका म्हणे क्षण। नको तयाचें दर्शन॥ १॥"

अशा अनेक स्वानुभवसंपन्न संतवचनांप्रमाणें त्यांचीं साक्षात्कारी चरित्रें मूर्तिपूजासमर्थकच आहेत.

आतां श्रीसमर्थांनीं "मी तू हाहि भ्रम। ईश्वरभाव हाहि भ्रम। उपासना हाहि भ्रम। निश्चयेसीं॥" दा. बो. १०।६।११ असें म्हटलें आहे. तें त्यांच्या भ्रमनिरूपण प्रकरणांत "एक परब्रह्म संचलें। कदापी नाहीं विकारलें। त्यावेगळें भासलें। तें भ्रमरूप॥" १०।६।९॥ याप्रमाणें शुद्ध पारमार्थिक सत्तेच्या

दृष्टीनें व्यावहारिक सत्तेला भ्रम म्हटलें आहे. पण व्यावहारिक सत्तेच्या दृष्टींत उपासनेला ते अत्यंत महत्त्व देतात व मूर्तिपूजेचा पुरस्कार करतात. उपासना ही भावना अथवा कल्पनारूपच असते. त्यास भ्रम म्हटलें तरी परिणामीं हितकारक ठरणारा तो संवादी भ्रम असतो. तसेंच श्रीहंसराजस्वामी हे ज्ञानयोगी होते. त्या दृष्टीनें त्यांनीं श्रवण-मनन-निदिध्यास या अंतरंगसाधनांपेक्षां मूर्तिपूजारूप बहिरंगसाधनांस सापेक्षतेनें निकृष्ट ठरविलें असलें तरी मंदप्रज्ञ साधकास मूर्तिपूजा हेंच साधन त्यांनीं सांगितलें आहे.

**मुद्दा बारावा**:—

उत्तमो ब्रह्मसद्भावो ध्यानभावस्तु मध्यमः।
स्तुतिर्जपोऽधमोभावो बहिःपूजाधमाधमा ॥ १४।१२२

**खुलासा**:—या महानिर्वाण तंत्रांतील वचनांत साधनांचा तारतम्यभावानें अनुक्रम सांगितला आहे. (१) पाणी, (२) अग्नि, (३) सूर्यबिंब, (४) हृदय, (५) मातीचा ढीग व (६) प्रतिमा-प्रतीक हीं शास्त्रानें पूजास्थानें सांगितलीं आहेत. त्यांत मंदप्रज्ञावंतांनीं मूर्तींत म्हणजे प्रतिमा-प्रतीकाच्या ठिकाणीं परमेश्वराची पूजा करावी असें शास्त्र आहे. एरवीं ईश्वराची स्तुति, नामजप आणि त्याच्या मूर्ति–प्रतीकांची पूजा-अर्चा यांचा निषेध केला म्हणजे बहुतांशीं भक्तिमार्गच संपला असें म्हणावें लागेल! इहलोकींचे उपासक भक्तच काय पण परलोकींचे दिवंगत महान् पुरुषहि नामजपांत दंग असतात असें समजतें. भागवतोत्तम प्रल्हादानेंच "श्रवणं, कीर्तनं, विष्णोः स्मरणं पादसेवनम्। अर्चनं वंदनं दास्यं सख्यं आत्मनिवेदनम्॥" अशी नवविधाभक्ति सांगितली. तिला अधम कसें म्हणतां येईल? याचा सुज्ञांनीं विचार करावा. आपले संत व आपलीं वेदशास्त्रें यांनीं असा निषेध करणें केवळ असंभवच आहे. विशेषेंकरून मंदप्रज्ञांनीं व सामान्यतः स्त्री-शूद्रादि मूर्तिपूजकांनीं मूर्तिपूजा न करावी तर परमार्थलाभासाठीं व ईश्वर-कृपा संपादन करण्यासाठीं त्यांनीं ईश्वरोपासना कशी करावी? आपलें सारें भरतखंड शिवलिंगमय आहे तें या मूर्तिपूजेचाच पुरावा करतें. शिवाचा आधिदैविक संबंध पंचमहाभूतांपैकीं पृथ्वीशीं मानला आहे हें ध्यानीं ध्यावें. या आक्षेपखंडनार्थ याहून काहीं अधिक सांगावयास पाहिजे असें जरूर

१ शिवगीता १६।२६–३२ यावरील वेदेश्वरी पहावी.

वाटत नाही उपासकाच्या अधिकारानुसार त्याला ज्या वेळीं जें साजेल तें त्या वेळीं संत सत्पुरुष सांगतात वरील वचनांत जशी मूर्तिपूजेची निंदा केल्याचा आभास होतो, तसा उलट ब्रह्मस्थिति, मुक्ति, योग, याग यांचाहि प्रसंग विशेषीं तिरस्कार केलासें ते दाखवतात उदाहरणार्थ, "नको ब्रह्मज्ञान आत्मस्थितिभाव। तू देव मी भक्त ऐसें करीं॥ योगयागविधि येणें नव्हे सिद्धि॥" असें संतश्रेष्ठ श्रीतुकाराम व श्रीज्ञानेश्वर म्हणतात ही वरवर दिसणारी निंदा निषेधात्मक नसून भक्तिमहिमा सांगण्यासाठीं आहे असेंच सुज्ञ समजतात

**मूर्तिपूजा हा अध्यात्माचा सेतु**—आधिभौतिक आणि आध्यात्मिक यांची सांगड घालणारें आधिदैविक आहे पण आध्यात्मिकाप्रमाणें आधिदैविकहि अदृष्ट असल्यामुळे लौकिक विद्योपासनेला ज्याप्रमाणें स्थूल भौतिक ग्रंथ आणि स्थूल देहधारी गुरु लागतात, त्याचप्रमाणें देवदेवतांच्या साक्षात्कारासाठीं त्यांच्या उपासनेला भौतिक प्रतिमा प्रतीकाची गरज अवश्य आहे सर्व धर्मांत अशीं प्रतीकें निरनिराळ्या रूपांत असतातच आरसा म्हणजे कांहीं तसबीर नव्हे, कांच म्हणजे कांहीं ज्योत नव्हे, सूर्यकान्त मणि म्हणजे कांहीं अग्नि नव्हे तरी पण या उपाधीद्वारा मुखावलोकन, दीपज्योतिप्रकाश, व दाहक अग्नि यांची उपलब्धि होते, हें जसें अनुभवसिद्ध आहे, त्याप्रमाणें

१ But as a matter of fact, religion cannot escape from Symbolism, from icons, and crucifixes, from rites and dogmas Three forms are employed by religion to focus its faith, but when they become more important than the faith itself, we have idolatry A symbol does not subject the infinite to the finite, but renders the finite transparent It aids us to see the infinite through it When, however, we confuse the symbol with the reality, exalt the relative into the Absolute, difficulties arise and an unjustified idolatry develops. (Cultural Heritage of India, Vol I, p XXV, Introduction by Sir Radhakrishnan)

निष्ठावत मूर्तिपूजकांना ईश्वराचा सगुणनिर्गुण साक्षात्कार प्रतीक-प्रतिमा द्वारां होऊं शकतो, हें अनुभवसिद्ध सत्य आहे. म्हणून मूर्तिपूजा कधीं सुरू झाली या ऐतिहासिक चिकित्सेंत महत्त्व नाहीं.

**युक्तिवाद** :—येथपर्यंत या प्रकरणांत कांहीं श्रुतिसंतादींच्या आप्तवचनांतील विरोधाभासाचा विचार केला. आतां याच प्रकरणांत आक्षेपकांच्या कांहीं युक्तिवादाचा विचार कर्तव्य आहे. विरोधाभास उत्पन्न करणाऱ्या वचनांना मर्यादा होती, तशी युक्तिवादाला मर्यादा नाहीं. किंबहुना शंकांचें स्वरूपच असें असतें कीं, त्या कधींच संपत नाहींत. यास्तव या प्रकरणांत कांहीं ठळक आक्षेप किंवा शंका नमुन्याकरितां घेऊन, त्यांच्यापुरताच विचार करण्याचें योजलें आहे. या बाबतींत कांहीं सद्गृहस्थांनीं मला असें सुचविलें कीं, कित्येक शंकाखोरांच्या शंका करानेंच फिटणार नाहींत. त्यांच्या शंकांतील हेतु निंदा एवढाच असतो. आपल्या प्रामाणिक शंकांचें कोणीं तरी निरसन करावें अशी आतुर जिज्ञासा त्यांच्या ठिकाणीं नसते. उलट त्यांचें शंकानिरसन हा जणूं त्यांचा पराभव, अशी वैषम्यबुद्धि त्यांच्या ठिकाणीं जागृत होते. यामुळें शंकानिरसनाचें समाधान बाजूलाच राहून व्यर्थ शंकाभिनिवेश उत्पन्न होतो. हीच अनिष्टापत्ति टाळण्याकरितां मी प्रतिपक्षीय व त्यांचे ग्रंथ याचा नामनिर्देश बहुधा टाळीतच आहें. कांहीं असो. संभाव्य आक्षेपांना अथवा शंकांना दुसरी बाजू आहे, एवढें तरी दिग्दर्शित करणें हें ग्रंथाचा लेखक या नात्यानें माझें कर्तव्यच आहे. तें मला टाळतां येत नाहीं. मात्र पूर्वोत्तर पक्षाच्या खडाजंगी वादांतील अभिनिवेश जितका टाळतां येईल तितका मीं टाळला आहे. हेतु इतकाच कीं, माझी ही चर्चा कोणास बुद्धिभेदक किंवा उलट बोचक व अपमानकारक वाटूं नये.

**युक्तिवादांतील आक्षेपक मुद्दे** :—(अ) १. अनेक ओसाड देवांच्या मंदिरात देवाच्या प्रतिमा-प्रतीकावर पाकोळया वगैरे प्राणी घाण करतात. २. एका शिवरात्रीं एका शिवलिंगावर वाहिलेल्या अक्षता खाण्यासाठीं उंदराचें पिलूं चढून खुशाल अक्षता खात होतें. ३. दक्षिणेश्वर देवस्थानांतील एका प्रतिमेवरील जडजवाहिराचे दागिने चोरांनीं लांबविले. महाराष्ट्रांतील अनेक देवींच्या अंगावरील दागिने चोरीस जातात. या सर्व अतिक्रमणास

देवतामूर्तींकडून प्रतिकार होत नाहीं. ४. नामदेव विसोबा खेचर यांच्याकडे गेले, तेव्हां ते एका शिवालयांत शिवलिंगावर पाय ठेवून पडले होते. नामदेवानें त्यांचे पाय रागानें दूर केले, तरी त्याखालीं पुन्हां शिवलिंग होतेंच. यावरून शिवलिंगाची तुच्छता दिग्दर्शित होते. ५. महंमद गझनी व इतर मुसलमान सुलतानांनीं सोमनाथाचें ज्योतिर्लिंग अनेक वेळां फोडलें इत्यादि उदाहरणांवरून असें मनांत येतें कीं, या प्रतिमा-प्रतीकांतील समर्थ देवतांनीं वरील लहान-मोठ्या अत्याचारांचा प्रतिकार ज्या अर्थी केला नाहीं, त्या अर्थी त्या प्रतिमा-प्रतीकांत देव-देवता नसतातच. प्रतिमा-प्रतीकें म्हणजे केवळ जडपाषाणच होत. मग त्यांची पूजा करण्यांत अर्थ काय?

**सामान्य खुलासा:**— देवदेवतांच्या जड प्रतिमा-प्रतीकांत आक्षेपकांच्या अपेक्षेप्रमाणें प्रतिकारक्षमता येण्यास त्यांची प्राणप्रतिष्ठा करणारे व त्यानंतर त्यांची पूजाअर्चा करणारे दिव्य सिद्धसंकल्पशक्तीचे उपासक असावे लागतात. सामान्यतः सर्व प्रतीक-प्रतिमांची जरी प्राणप्रतिष्ठा केलेली असली, तरी बॉम्बगोळ्यांत जसें धक्का लागतांच स्फोट पावणारें द्रव्य भरलेलें असतें, तशी विनाशक शक्ति प्रतिमा-प्रतीकांत भरलेली नसते. ज्याप्रमाणें लांकडांतील अव्यक्त अग्नि त्या लांकडास किंवा लांकडाच्या पेटींत ठेवलेल्या कागदांस जाळीत नाहीं, तो त्या लांकडांत घर्षणादि तंत्रानें व्यक्त करावा लागतो, अथवा ज्याप्रमाणें ज्ञानस्वरूप व्यापक परमात्म्यांतील सामान्य ज्ञप्तिस्वरूप अज्ञानाचें विरोधी नसतें. उलट तें अज्ञानालाहि आधारभूत होतें. अज्ञानाचा नाश करण्यास विशेष वृत्तिज्ञान लागतें. त्याप्रमाणें प्रतिमा-प्रतीकांच्या ठिकाणची धनशक्ति कार्यक्षम होण्यास उपासकांतील ऋणशक्ति तशी प्रभावी व आकर्षक असावी लागते. उदाहरणार्थ, वरील उदाहरणाच्या अगदीं उलट उदाहरणें अनेक प्रसिद्ध आहेत. श्रीधूतपापेश्वर देवस्थानावर आलेलें पेंढार, श्रीधूतपापेश्वराच्या पिंडींतून निघणाऱ्या भुंग्यांनीं परतविलें. श्रीविठ्ठलमंदिरांत श्रीशिवछत्रपति श्रीतुकोबारायांच्या कीर्तनाला बसले असतां त्यांच्यावर यवनांचा छापा आला, तो श्रीविठ्ठलमूर्तीनें परतविला, नामदेवाच्या भक्तिमहिम्यामुळे ओंढ्या नागनाथाचें देऊळ देवानें फिरविलें, हें इतिहासप्रसिद्ध आहे. शिवलिंगाजवळ उपासनेस बसलेल्या मार्कंडेयास नेण्यास यम आला असतां त्यास लिंगोद्भव शिवानें परतविलें. असे प्रतीक-प्रतिमांचे अनेक साक्षात्कार योग्य

अधिकारी उपासक असतां घडून येतात. भक्ताची भावना जितकी उज्ज्वल असेल, त्यामानानें त्याचे उपास्यप्रतीकांतील देवभाव जागृत होतो.

तुकोबाराय आत्मविश्वासानें निक्षून सांगतात :— " भावापुढें बळ । न चले कोणाचें सबळ ॥ १ ॥ करी देवावरी सत्ता । कोण त्याहूनि परता ॥ २ ॥ बैसे तेथें येती । न पाचारितां सर्व शक्ति ॥ ३ ॥ तुका म्हणे राहे । तयाकडे पाहे ॥ ४ ॥"

तात्पर्य, भाव हें गमक हातीं घेतलें असतां वरील शंकाकुल करणारे प्रश्न सरळ सुटतात. कसे ते वरील मुद्यांच्या अनुक्रमानेंच पहा.

**विशेष खुलासा १ :**—पाकोळ्या व इतर घाण करणाऱ्या प्राण्यांची शिवलिंगाच्या ठिकाणीं देवताबुद्धि कोठून असणार! त्यांचा जडभाव तसा जडदेव.

२ शिवलिंगाच्या ठिकाणच्या सामान्य चैतन्याच्या ठिकाणीं द्वैतभावच नाहीं. तेथें प्रतिकार कसला करणार! अज्ञानी जीवाप्रमाणें शिवाच्या ठिकाणीं शिवलिंगासंबंधीं देहात्मबुद्धि संभवतच नाहीं. त्या चैतन्याच्या ठायीं आपपरभावच नाहीं तेथें रागवायचें कोणावर ! नातवानें मांडीवर चहिंदिशा केली तरी आजोबा किंवा आजीबाई रागावत नाहींत. उलट तीं अज्ञान लीला पाहून हंसतात. शिवाय पाषाण या उपाधीपासून शिव निःसंगपणें दूर असतात. आपल्या सावलीवर डांस बसला तर त्याचा काय प्रतिकार करायचा ? गुळाचा गणपति केला तर त्याला डोंगळे डसणारच ! त्याची गणपति देवाला बाधा होत नाहीं.

३. अशा आक्षेपकास श्रीरामकृष्ण परमहंस म्हणाले, अरे वेड्या! त्या जडजवाहिराची किंमत तुला ! देवतेला तुझे जडजवाहीर आणि मृत्तिका सारखींच. एकदां श्रीसमर्थांच्या मठांतील चांदीचीं भांडीं घेऊन चोर पळत असतां त्यास पकडून शासन करण्याकरितां शिष्य काठ्या, बडगे घेऊन धावले. तें पाहून समर्थ शांतपणें हंसत त्यास म्हणाले, " अरे, धावता कोठें ? नेऊं द्या त्यांना. तुम्हाला चांदीचीं भांडीं पाहिजेत, तशीं त्यांना हवींशीं नाहीं का वाटणार ? "

४. विसोबा खेचर यांची कथा लाक्षणिक आहे. त्यांस नामदेवास हें पटवून द्यावयाचें होतें कीं, ईशसत्ता व्यापक आहे. ती केवळ पंढरीच्या विठ्ठलमूर्तीत,

एकाच ठिकाणीं असते असें नाहीं 'ईशावास्य, जगत्सर्वे यत्किंच जगत्या जगत्।' ईश उप १. अर्थात् सारी पृथ्वी शिवलिंगमय आहे त्याशिवाय पाय ठेवायला जागाच नाहीं दुसरा एक असा भाव समवतो कीं, भृगुपदलांछन श्रीविष्णूनें आपल्या हृदयीं भूषणभूत मानलें, त्याप्रमाणें येथें शिवानें विसोबाचा महिमा वाढविण्याकरिता ही लीला दाखविली असेल. श्रीतुकोबारायांनी या घटनेचा अर्थ याहून मार्मिकपणें वेगळाच केला आहे, तो असा —

खेचरें खेंचरीं। बुद्धि अगोचरी। नामा झडकरी। देवो केला॥ १॥ गुरु शिष्य जाले। एक तत्त्व देखीले। देही देह निमाले। निज तत्त्वीं॥ २॥ ओहम् सोहम् भाव। हारपल्या श्रुति। नामयाची तृप्ति खेंचरीं जाली॥ ३॥ तव पाहे भोंवते। तव लिंग नाहीं तेथें। आता चरण ते केऊते। कोठें ठेऊ॥ ४॥ ( महाराष्ट्र सारस्वत ) याचा गूढ भावार्थ असा दिसतो कीं, श्रीसद्गुरु विसोबा खेचरानें आपल्या कृपाकटाक्षानें मनबुद्धीस अगोचर अशा आपल्या आत्मतत्त्वात नामदेवाच्या आत्म्याला समरस केलें म्हणजे त्यास सद्गुरूंनी तत्त्वोपदेशानें किंवा अचिंत्य अशा शक्तिपातानें आत्मरूप केलें तेव्हा नामदेवाचा सोह भाव हरपला श्रवणाचें कार्य सपलें नामदेव गुरुरूपात विलीन झाला, तृप्त झाला तेव्हा तो जणू समोंवार साक्षित्वानें पाहू लागला असता त्यास लिंग म्हणजे आपलें सूक्ष्म शरीरच हरपल्याचें आढळल मग अर्थातच त्या उभयताच्या स्थूल देहभावाला लिंगदेहाच्या अभावीं पाय ठेवण्यासहि जागा राहिली नाहीं. अशी ही दिव्य अनुभवाची परोक्ष आख्यायिका आहे कदाचित् दिव्य गुरुपद व लिंग ( शरीर ) याची समसत्ता यात दाखविली असेल

५ या कथेंत शिवलिंग हा पाषाण आहे, ही यवनाची भावना व तेथील उपासकाची शिवलिंग म्हणजे साक्षात् शिवच होय, ही भावना यात लढाई लुपली त्यात यवनाची भावना जास्त बलवती ठरली, हें रहस्य आहे तेथें त्या वेळीं सिद्ध संकल्पशक्तीचा व दृढ निष्ठेचा एकहि शिवलिंगोपासक नव्हता, म्हणूनच हे अत्याचार होऊ शकले भक्ति आणि तंत्र यांची ती ( सोमनाथ क्षेत्र ) विनाशभूमि म्हणून मागवतात व शाक्तवाङ्मयात प्रसिद्ध आहे म्हणूनच तेथें भयंकर यादवी होऊन सर्व यादवकुलाचा संहार झाला

१ Cf Rev. Lead beater's Christian Creed (1904) pp. 161–62.

**सामान्य विचार**—दुसरा असा एक खोल विचार आहे की, जगात दोन प्रकारच्या शक्ति असतात. एक स्वत क्रियाशील ( Active ) व दुसरी परत क्रियाशील ( Passive ) कोणाचें घर जाळणें किंवा त्याच्या घरातील पाकसिद्धि करणें, यापैकीं कोणतीच गोष्ट अग्नि आपण होऊन करीत नाहीं दुसऱ्याच्या योजनेनें व प्रेरणेनें अग्नीच्या ठिकाणीं हा क्रियाभेद समवतो देवाच्या प्रतिमाप्रतीकातील शक्ति परत क्रियाशील असते यामुळे वरील प्रसगीं मूर्तिभजक व मूर्तिपूजक यांचें भावनासामर्थ्यच कसोटीस लागतें याशिवाय देवालयात होणाऱ्या अनेक शास्त्रविरोधी अनाचारानें तेथील प्रतीक प्रतिमातील दैवी सामर्थ्य कमी होऊन तें महाचैतन्यात विलीन होतें. हें प्रतिमा प्रतीकातील दैवी सामर्थ्य टिकविण्याचे व त्याची वृद्धि करण्याचे शास्त्रीय नियम कोणते आहेत, ते विस्तारभयास्तव येथें देता येत नाहींत

विद्युद्वाहक तारेतील विद्युच्छक्ति जिवत शरिरालाच धक्का देते. मृतशवाला चेतना देत नाहीं त्याप्रमाणें ज्याच्या ठिकाणची ईशनिष्ठा मृतप्राय अथवा बधिर झालेली आहे, त्याना ईश्वरी साक्षात्कार कसा होणार ?

परंतु नामदेवाबरोबर विठ्ठलमूर्ति नाचत असे, भोळ्या रामाच्या हातचें श्रीराममूर्तीला जेवावें लागे, श्रीरामकृष्ण परमहसाची कालीमाता त्याच्याशीं खाणें पिणें, बोलणें-चालणें असे अनेक व्यवहार करी याप्रमाणें अधिकारी मूर्तिपूजकाच्या सानिध्यात देवताच्या मूर्ति कशा जागृत होतात, यासबधीं अनेक उदाहरणें सापडतील तेव्हा या प्रकरणातील सार इतकेंच कीं, मूर्तिपूजकानीं आपला अधिकार वाढवावा व तेणेंकरून मूर्तिपूजेचें श्रेयस्त्व जगाच्या निदर्शनास आणावें यात्रिकाचे यत्र, सैनिकाचें हत्यार, शेतकऱ्याचें औत, वाद्य वाजविणाराचें वाद्य, त्याच्या त्याच्या हयगयीमुळें गजून काम देईनासें झालें, तर हा दोष कोणाचा हा विचार पाहावा

> आवाहनं न जानामि न जानामि तवार्चनं ।
> पूजा चैव न जानामि क्षमस्व परमेश्वर ।
> मन्त्रहीन क्रियाहीन भक्तिहीनं सुरेश्वर ।
> यत्पूजितं मयादेव परिपूर्ण तदस्तु मे ॥ १ ॥

---

१ धर्मविज्ञान खड, पृ ४०० ते ४२६.

## प्रकरण १४ वें

## वस्तुमाहात्म्य

श्मशानेष्वा क्रीडा स्मरहर पिशाचाः सहचरा-
श्चिताभस्मालेपः स्रगपि नृकरोटी परिकरः ।

—शिवमहिम्न

वक्त्रं पुरभिदस्तत्र अन्तर्ब्रह्माण्ड कोटयः ।
चटका इव लक्ष्यन्ते ज्वालामालासमाकुलाः ॥ १६ ॥

—शिवगीता

कराल वदनां घोरां मुक्त केशीं चतुर्भुजाम् ।
दक्षिणा कालिकां दिव्यां मुण्डमाला विभूषिताम् ।
शिष्यः पुत्र इति प्रोक्तः सदाशिष्यत्व योगतः ।
जिह्वा लिंगान्मंत्रशुक्रं कर्णयोनौ निषिच्य वै ॥ ९० ॥

—शि. पु. वि. अ. १८

अनार्य, अवैदिक व अश्लील या निंदाव्यंजक अपशब्दांनीं शिव-ध्द आणि शिव-शक्ति यांच्यासंबंधानें आधुनिक जो क्षुद्र व तिरस्करणीय भाव व्यक्त करतात तो अयथार्थ आहे, हें मागील प्रकरणांत दाखविलें. पण आतां अखेरीस या प्रकरणांत आक्षेपकांचें अवैदिक, अनार्य, अश्लील, रौद्र, ग्राम्य, अर्वाचीन, बौद्धानुकरण, अयुक्तिक, इत्यादि शिवलिंगोपासनेसंबंधीं सारे विकल्प अथवा आक्षेप वादाकरितां मान्य करूनहि वरील देवता व त्यांची उपासना यांचें वस्तुमाहात्य, त्यांतील लक्ष्यार्थाच्या सिद्धभक्तांना झालेल्या दिव्य अपरोक्षानुभूतीमुळें, यत्किंचितहि कमी मानावें लागत नाहीं, हें या व या पुढील प्रकरणांत दाखवावयाचें आहे. संपूर्ण कृतार्थता प्राप्त करून देणाऱ्या सिद्ध साधूंच्या साक्षात् अनुभवापुढें वरीलप्रमाणें आणखीहि अनेक आक्षेप शिवलिंगोपासनेवर घेतले, तरी ते आकाशाकडे वर पाहून थुंकण्याप्रमाणें व्यर्थ उपहासास्पदच ठरतील ! "जरि उकिरड्यांत पडला, मळला न हिरा तथापि सामान्य" या पंतांच्या व्यावहारिक दृष्टान्ता-प्रमाणें शिवलिंगोपासनेचें स्वयंसिद्ध वस्तुमाहात्म्य आहे. परिस दगडा-सारखा दिसला तरी त्याचें वस्तुमाहात्म्य कमी मानतां येत नाहीं.

प्राचीन द्राविड संस्कृति किंवा आधुनिक भौतिक विज्ञान अवैदिक म्हणून कांहीं निंद्य किंवा व्यर्थ ठरत नाहीं. निसर्गानें वनवासी अनार्यांना दिलेल्या वनस्पतिज्ञानादि गूढ दीक्षा अनार्य म्हणून त्याज्य ठरत नाहींत. बृहदारण्यकासारख्या उपनिषदाचा (श्रुतीचा भाग) अथवा वात्स्यायनादि अनेक थोर महर्षींच्या शास्त्रीय विवेचनाचा विषय झालेलें सामान्य मैथुनकर्म अश्लील म्हणून कोणी सोडीत नाहीं. पुत्रकामेष्टि यज्ञ केला तरी पतिपत्नीच्या संभोगावांचून पुत्रलाभ घडत नाहीं. उत्कट आनंद आणि प्रजोत्पादन हे असामान्य धर्म त्यांत आहेत हें नाकबूल करतां येत नाहीं. शिवपार्वती व राधाकृष्ण यांच्या विलासांत जें गूढ तत्त्वज्ञान आहे त्यास अश्लील मानणें हें अज्ञान आहे. रात्र काय कमी भयानक असते. पण तिच्या कुशींत जीव अनुपमेय असें विश्रांति सुख भोगतो. व्याघ्रीचीं पिलें निर्भयतेनें तिच्याच स्तन्यपानावर वाढतात. क्रूर व्याघ्री तिच्या पतिराजाला लावण्यसुंदरच दिसते. आतां ग्राम्य म्हणजे काय? ईशसृष्ट तें ग्राम्य आणि जीवसृष्ट तें सुसंस्कृत व सुंदर काय? हवा, पाणी हीं जीवनतत्त्वें ग्राम्यच आहेत, सारें निसर्गसौंदर्य ग्राम्य आहे, सार्‍या वनौषधि ग्राम्य आहेत, पण यांपैकीं काहींच तिरस्कार्य नाहीं. शिवलीलामृतांतील श्रीकर आणि शबर, दक्षिणेंतील कण्णप आणि नंद, महाराष्ट्रांतील रोहिदास आणि चोखा यांच्या निस्सीम उपासनेला ग्राम्य म्हणून तुच्छ लेखणारे पढतमूर्ख ठरतील. 'बालादपि सुभाषितं ग्राह्यम्।' असें आप्तवचन आहे. मग बौद्धानुकरण निंद्यच मानलें पाहिजे असें म्हणतां येणार नाहीं. पक्ष्यांपासून चरित्र घेण्याचा उपाय व वारुळांतील मुंग्यांपासून समाजव्यवस्थाशास्त्र सुद्धां शिकले आहेत. तात्पर्य, इष्टफलप्राप्ति हेंच वस्तुमाहात्म्याचें अनुभवसिद्ध गमक आहे.

या वस्तुमाहात्म्याप्रमाणें वस्तूची हेयोपादेयता द्रष्ट्याच्या दृष्टीवरहि अवलंबून असते. ग्राह्यार्थ कोणता व त्यागार्थ कोणता हे भागत्यागलक्षणेनें जाणावें लागतें. अलंकाराच्या नाना नामरूपांतून सराफ एक सुवर्णच पाहातो. शिवशक्तीच्याच वाङ्मयांतून नमुन्याकरतां चार वचनें या प्रकरणावर उद्धृत केलीं आहेत. त्यातील पुष्पदंत या श्रेष्ठ शिवभक्ताच्या ज्ञानचक्षूला स्मशानांतील पिशाच्चांसह क्रीडा करणाऱ्या शिवाचें रूप कसें दिसलें असेल? तें त्यालाच ठाऊक. शिवाच्या विश्वरूपदर्शनांतील भाव श्रीराम काय समजले?

तें तेच जाणोत. श्रीरामकृष्णपरमहंस किंवा रामप्रसाद या देवभक्तांचें अत्यंत रौद्रस्वरूप कालीदेवीवर निःस्सीम मातृप्रेम कसें जडलें असेल तें त्यांसच माहिती. सद्गुरूंच्या गूढ शक्तिपात करणाऱ्या अमोघ वाणींकडून मनाचें रेतरूप महावाक्य प्रज्ञावत आणि अनन्य अशा सच्छिष्याच्या कर्णपुटांत शिरून त्याच्या विज्ञानकोषांत अथवा आनंदकोषांत ब्रह्मात्मैक्यबोधरूप पुत्र कसा जन्मास येत असेल, हेंहि कल्पनेनें जाणतां येण्यासारखें नाहीं. मग यावरील रहस्यज्ञानाच्या अभावीं वरील वचनें ग्राम्य, रौद्र व अश्लील वाटल्यास त्यांत नवल तें काय? आधुनिकांच्या या गैरसमजांस आपलेंच प्राचीन शास्त्र व शिल्प यांचें परोक्षदर्शन कारण व्हावें हा एक दैवदुर्विलास होय! तिजोरीच्या किल्लया कर्मधर्मसंयोगानें हरवाव्या व मग त्यांतील अतुल धनास पारखें व्हावें अशी ही दुःस्थिति प्राप्त झाली आहे. अशा वेळीं 'क्ष' किरणाप्रमाणें अपरंपार जाणाऱ्या प्रपन्नतेच्या शुद्ध भावना-किरणांनीं आपल्या विद्याधनाचा, अथवा देवताविज्ञानाचा कांहीं शोध लागला तर पाहण्याचा या ग्रंथांत अल्प यत्न केला आहे. ज्या ग्राम्य, रौद्र व अश्लील वर्णनानें आधुनिकांचीं मनें आपल्या देवतांबद्दल कलुषित केलीं, त्याच आश्चर्यजनक वर्णनानें श्रद्धावान् भाविकाच्या मनाचा असा ग्रह होतो कीं, शिवमहिम्नस्तोत्र, शिवगीता किंवा शिवमहापुराणाची गंभीर विद्येश्वरसंहिता यांचा या वर्णनांतील उत्तानार्थ हा वास्तविक भाव नसलाच पाहिजे. हें ग्राम्य, रौद्र व अश्लील वाटणारें सारें वर्णन परोक्ष अथवा लाक्षणिकच असावें. महामांत्रिक भट्ट भास्कराचार्यांना शिवरुद्राच्या सगुणरूपाचा कदाचित् अधिक परिचय असेल असें अनुमान होतें. कांहीं असो. या प्रकरणांत उपोद्बलक होईल असें वाटल्यावरून त्यांच्या रुद्रभाष्यांतील एक विस्तृत उतारा पुढें देत आहें.

(1) The formulas to solve the problems contained in these valuable literature were forgoetten. +++ and the keys furnished to unlock the secrets for the purpose of untilising the hidden treasures were almost lost or unconsciously thrown away with the natural result that all rude and wrong processes now employed to open, unavoidebly end in breakage and damage (Permanent History of Barat-Varsha, p. 3)

(परम शिव) ब्रह्माचीं रूपें तीन आहेत पैकीं एक कार्यरूप असून सर्वांचें उपादानकारण असल्यामुळें सर्वात्मक आहे दुसरें पुरुषसंज्ञक रूप उत्पत्तिस्थितिलयाचें कारण आहे. हीं दोन्ही रूपें अविद्यामूलकच आहेत त्याहून भिन्न असें जें तिसरें रूप तें मात्र निर्गुण व निरंजन असून सत्य, ज्ञान व आनंद ह्या लक्षणांनीं युक्त आहे "जड विश्व व सचेतन प्राणिसमुदाय असें चेतनाचेतन रूप जें विचित्र जगत् आणि त्याचप्रमाणें पूर्वी पुष्कळ वेळा होऊन गेलेलें आणि पुढें होणारें जगत, हा सर्व रुद्रच होय" असें नारायणोपनिषदांत सांगितलें आहे त्याचप्रमाणें "विश्वापेक्षा अधिक आणि सर्व देवापेक्षा पहिला असा जो महर्षि रुद्र," असेंहि त्याच उपनिषदांत आहे. "चेतन व अचेतन ह्याहूनहि कोठें कोठें भिन्न, कोठें कोठें संसारी, कोठें कोठें निर्मल अशा रूपांनीं हा जन्ममरणशून्य महादेव विश्वरूप महासागरांत झळकत असतो" असेंहि वचन असून "आठ रूपें घेऊन तो हें चराचर धारण करीत असतो आणि तीन रूपें घेऊन सृष्टि वगैरे करीत असतो" असेंहि वचन आहे. त्यापैकीं जो हा संहारकर्ता त्यावर देवाचा सर्वदा अधिकार असतो (तत्र योऽसौ संहारकर्ता त सर्वदा देवाऽधितिष्ठति) कार्यकालीं जी अन्य तनु असते, ती देवाची घोर तनु होय. दुसरी एक कल्याणकारक तनु आहे, "अग्नि हा रुद्र असून त्याच्या घोर व कल्याणकारक अशा दोन तनु आहेत. शतरुद्रीय होमानें घोर तनु शांत होते" असें श्रुतींत सांगितलें आहे शिवशक्ति सर्वदा विचित्र असून संहारकारिणी आहेत व त्या महादेवाच्या संहार वगैरे करणाऱ्या घोर तनु आहेत त्याच्यापासून भय मनांत भय येणें साहजिक आहे तस्मात् पहिल्या अनुवाकानें तशा प्रकारच्या क्रुद्ध देवाला प्रसन्न करून घेऊन 'नम' इत्यादि मंत्रांनीं त्याच्या उपसंहारसाधनांना नमस्कार करून तीं प्रसन्न करून घ्यावीं "शतरुद्रीय होमानें घोर तनु शांत होत असून वसोर्धारेनें कल्याणकारक तनु प्रसन्न होत असते," अशी श्रुति आहे, तेव्हा घोर तनूचा उपसंहार करून दुसऱ्यापासून आठ अनुवाकांनीं महादेवाची विश्वरूपत्वानें स्तुति करून त्याला नमस्कार करावे याप्रमाणें केलें असतां उत्कृष्ट प्रकारें तो प्रसन्न होतो नंतर दहा व अकरा या अनुवाकांनीं अभय मागावें, हा रुद्राध्यायाचा ठोकळ अर्थ होय

"पहिल्या अनुवाकानें क्रुद्ध देव प्रसन्न करून घेऊन नतर कोणत्या स्थानाचें अवलंबन करून देव राहात आहे हें समजत नसल्यामुळें सर्व चराचर त्याचें निवासस्थान कल्पून आठ अनुवाकांनीं सर्व चराचराला नमस्कार करावा आणि शेवटल्या दोन अनुवाकांनीं अभय मागावें. कारण, देव म्हणजे स्वातंत्र्याची पराकाष्ठा होय. इच्छेस येईल त्याचें अवलंबन करून तो जगतावर निग्रहानुग्रह करीत असतो. उदाहरणार्थ—यक्षरूपानें प्रगट होऊन त्यानें देवाना मोहित केलें; विटवेष घेऊन सपत्नीक मुनींना भ्रष्ट केलें (व्रताद् भ्रेपयामास). किरातरूप धारण करून अर्जुनाशीं युद्ध केलें; भैरवरूप धारण करून कांहीं तरी वेष धारण केलेल्या देवीसह गजाननाला उत्पन्न केलें; इंद्ररूप धारण करून एका सेवकाला तपापासून भ्रष्ट करण्याचें मनांत आणलें, अर्भकरूपानें देवीच्या अंकावर शयनहि केलें; उल्लूक पक्ष्याचें रूप घेऊन एका ऋषीला ज्ञानोपदेशहि केला; उन्मत्त वेष धारण करून आपलें भूषित जननेंद्रियच जगताचें कारण असल्याचें दर्शविलें; (उन्मत्तवेषभूपितो देवोत्तमायाऽऽत्मप्रजननमलंकृतं जगत्कारणत्वेन दर्शयामास।); अपराधी म्हणून स्वत:चा वध करण्यास उद्युक्त झालेल्या एका सेवकाचें निवारण करण्याकरितां वस्त्रें धुण्याच्या पापाणापासूनच रूप प्रगट केलें; आणि भूमीच्या चिळांतून गळलेलें हवि तेथें समीपच राहून त्यानें भक्षणहि केलें. ह्याप्रमाणें इच्छेनुरूप नाना प्रकारचे वेष धारण करून क्रीडा करणाऱ्या देवाधिदेवाची ही विश्वलीला आहे. म्हणून विश्वरूपत्वानें स्तवन करून देवाला नमन केलें आहे. कारण, "हे शंकरा, तुझीं चरित्रें विचित्र, गुह्य, व अतर्क्य असून ब्रह्मादि सर्व देवांनाहि तुझें ज्ञान होणें दुर्घट आहे (चरितानि विचित्राणि गुह्यानि गहनानि च। ब्रह्मादीनां च सर्वेषां दुर्विज्ञेयोऽसि शंकर इति॥)" असें वचन आहे" असेंहि कांहींचें म्हणणें आहे.

ब्रह्मवन हें विवर्तरूपांत महाभयाण आहे. ब्रह्मरसांत कटु, तुरट इत्यादि अथवा रौद्र, बीभत्स, भयानकादि सारे रस आभास रूपांत असतात. अवाच्य नाम व अदर्शनीय रूप हे माया महेश्वराच्या व्यावहारिक सत्तेंतीलच अंश आहेत. हें कटु सत्य पचनीं पाडणें हें त्या विषप्राशन करणाऱ्या नीलकंठाच्या उपासनेंतीलच एक दुर्गम रहस्य आहे. ह्याच विचार या प्रकरणांत किंचित् विस्तारपूर्वक करावयाचा आहे.

अर्जुनाला व उद्धवाला उपदेश करणारा वासुदेव कृष्ण थोर आणि गोकुळांतील पेंद्या, बोबड्या, वांकड्या यांच्या तोंडांतलें उष्टें ताक मोठ्या आवडीनें पिणारा गोपाळकृष्ण ग्राम्य ही भेदभावना प्राचीनांनीं केली नाहीं. योग्यांनाहि जो सुदुर्लभ तो थोर महादेव आणि भूतपिशाचादिकाचा उद्धार करणारा पशुपति रौद्र किंवा ग्राम्य ही हेयोपादेय कल्पनाच चुकीची आहे.

मागें पृष्ठ १६ वर वर्णन केल्याप्रमाणें धोपेश्वराच्या देवळाच्या बाहेरचे गोटे पूजणाऱ्या शिवभक्ताची पूजा ग्राम्य म्हणणें मूर्खपणाचें आहे. माझ्या गुरुपरंपरेंतील एक सत्पुरुष रावसाहेब कोल्हटकर एकदां बैलगाडीनें रानातून प्रवास करीत असता एके ठिकाणीं पाण्याच्या स्वच्छ झरीजवळ प्रातःकाळच्या नित्य कर्मांकरितां उतरले व स्नानोत्तर नित्याप्रमाणें पूजा करण्याकरितां त्यांनीं बरोबरच्या अंधू नामक गड्यास निर्मळ जागेवरील पांच दगड आणावयास सांगितलें. ते दगड आणल्यावर त्यांनीं त्यांची पूजा केली व पूजा विसर्जन केल्यावर "ते दगड जेथून आणलेस तेथें नेऊन ठेव" असें सांगून ते बैलगाडींत बसले. अंधूनें ते दगड होते तेथें नेऊन न ठेवतां टाकून दिले व तोहि गाडीबरोबर चालण्यास परत आला. पण थोड्याच वेळांत त्याच्या पोटांत भयंकर शूळ उत्पन्न होऊन त्याची मरणान्तिक अवस्था झाली! तें पाहून त्याचे धनी त्यास म्हणाले कीं, "अरे अंध्या! मीं पूजलेले दगड जेथून आणलेस तेथें नेऊन ठेवलेस का?" अंधू नाहीं म्हणाला व कसा तरी धडपडत मागें जाऊन त्यानें ते दगड पूर्वस्थळीं नेऊन ठेवले. तेव्हांच त्याचा असह्य पोटशूळ थांबला! ग्राम्य देवता या शब्दाच्या व्याख्येकरितां ही सत्यकथा थोडक्यांत सांगितली आहे. या शिवमय सृष्टींत "भाव तोचि देव, भाव तोचि देव, ये अर्थीं संदेह धरूं नका॥" हेंच देवताविज्ञानांतील गूढ रहस्य आहे. म्हणून श्रीसमर्थ अर्चन भक्तीवरील समासांत (४।५) सांगतात—

"शिळा सप्तांकित नवांकित। शालग्राम शकलें चक्रांकित। लिंगें सूर्यकांत सोमकांत। बाण तांदळे नर्मदे॥ ६ ॥ भैरव भगवती मल्हारी। मुंजा नृसिंह बनशंकरी। नाग नाणी नानापरी। पंचायतनपूजा॥ ७ ॥ गणेश शारदा विठ्ठल मूर्ति। रंगनाथ जगन्नाथ तांडव मूर्ती। श्रीरंग हनुमंत गरुड मूर्ती। देवार्चनीं पुजाव्या॥ ८ ॥"

सगुण उपास्य आणि सकाम उपासना दोन्ही अविद्यामूलकच आहेत. पण भट्टभास्करांचें भाष्य त्यावरच आहे. सगुण शिवरुद्राच्या सकाम अनुष्ठानांत

साधकास जे अलौकिक अनुभव घडतात, त्यामुळेंच शिवाच्या अचिंत्य शक्तीवर त्याची निष्ठा बसते आणि मग तीच शिवशक्ति शिवगुरुरूपात त्यास बोध करून त्रिगुणातीत, नामरूपातीत, प्रियद्वेष्यभावातीत, असें परमशिवाचें निर्गुण तत्त्व पटविते. "सगुणाचेनि आधारें। निर्गुण पाविजे निर्धारें॥" हें श्रीसमर्थांचें भक्तिसूत्र आहे त्यानीं सगुण रामाची व मारुतीची उपासना रूढ केली, अशासाठीं कीं, उपासकानीं निर्गुण आत्मारामास पावावें. "नेति नेति" म्हणजे हें नव्हे, हें नव्हे, असें व्यतिरेकपद्धतीनें शिवस्वरूप जाणणें जसें कठिण आहे; तसेंच "नेति, नेति" म्हणजे इतकेंच नव्हे, इतकेंच नव्हे, शिव-शांत सुंदर इतकेंच नव्हे, तर रौद्र, ग्राम्य, अश्लील, असें सारें निर्गुणरूपाप्रमाणें अवगुणरूपहि शिवरुद्रच होय हें व्यापक अन्वय ज्ञान पटणेंहि कठिणच आहे या प्रकरणात नमुन्याकरिता तोच विचार कर्तव्य आहे एरव्हीं जेथें अर्स्टेट ऑफ मॅनसारख्या अनेक ग्रथात आज भौतिक शास्त्रज्ञच भौतिक जग वास्तविक नाहींच, एक आध्यात्मिक जग मात्र आहे असें म्हणू लागले आहेत. तेथें आपण अध्यात्मवाद्यानीं मिथ्या अविद्यामूलक सगुणाची भीड ती काय म्हणून धरावी? परतु भौतिक जगत् हें आध्यात्मिक जगताचें व्यक्त स्वरूप आहे असें ज्याप्रमाणें भौतिक शास्त्रज्ञ मानतात, त्याप्रमाणें व्यावहारिक सत्तेंतील देवताविज्ञान व सगुणोपासना निर्गुणोपासनेचेंच व्यक्तस्वरूप मानणें अध्यात्मिकासहि भागच आहे. व्यतिरेकदृष्टीनें आर्य, वैदिक व पवित्र असें शिवतत्त्व जाणल्यावर अनार्य, अवैदिक, अपवित्र, रौद्र, ग्राम्य, अश्लील, सारें एक रुद्रच हें अन्वयदृष्टीनें जाणावयाचें असतें तें जाणलें म्हणजे मग आक्षेपास उभें करण्यास जागाच उरत नाहीं असो

देवदेवताचीं प्राचीन वर्णनें, चित्रें व प्रतीकें आज आपणास विचित्र वाटलीं तर तें आपलें अज्ञान समजावें, त्याचा उपहास किंवा तिरस्कार करू नये[१] महाभारत, रामायण, भागवत हीं तीन अत्यत महत्त्वाचीं व लोकप्रिय झालेलीं पुराणें शोकपर्यवसायी आहेत; हें वैराग्यसूचक गमक जसें पार

(१) It is not wise for the votary of modern Science to redicule or despise either the learning of old time or the Strange and fanciful Symbols in which it was

[ टीप पुढील पृष्ठावर पहा ]

महत्त्वाचें, तसेंच देवांच्या विरूपतेबद्दल समजावें. अनेक मधुर वाद्यांच्या तालसुरांत होणारें देवांचें भजन वाद्यांच्या तालसुरांच्या उपाधींतच रंगतें. भजनांतील रहस्याकडे लक्ष राहात नाहीं. यासाठीं भजनाला नुसते टाळ घेतले म्हणजे पुरे. नटराजाचें नृत्य नुसत्या डमरूच्या नादावरच होत असे. देवींची मूर्ति सुंदर असेल तर तिच्या बाह्य सौंदर्यावरच उपासकांचें मन मोहित होईल.' यासाठीं देवींच्या उग्र अथवा कुरूप मूर्ति किंवा अरूप प्रतीकें धरीं. वात्सल्यप्रेमांत अगर मातृप्रेमांत प्रेमाविषयाच्या ठिकाणीं शरीरसौष्ठव असावें हा हेतु नसतो. सद्गुरूंची सत्त्वपरीक्षा रोमांचकारी कठोर असते !' नामरूप माया आहे. ईश्वराचें ऐश्वर्य, नामरूप, बरें वाईट, मंगलामंगल, या सर्व द्वंद्वांच्या अतीत आहे. भयंकर उग्र अशा कालीला आई म्हणून आळवणें, हें हिंदु धर्माचें विशिष्ट गूढ रहस्य आहे, असें स्वामी विवेकानंद म्हणत. भक्ताच्या सर्वात्मभावात मायेच्या नामरूपकर्मासंबंधीं हेयोपादेयता राहात नाहीं. ती राहातां कामा नये असा शास्त्राचा कटाक्ष आहे. आचार्यांनीं योजलेल्या पंचप्रतीकोपासनेंत हा देवतांच्या सुंदर रूपांचा मोहच टाळला आहे.

---

[ टीप मागील पृष्ठावरून चालू. ]

expressed, for many of these ancient symbols are pregnant with meaning—often with meaning showing deeper knowledge than the outer world now possesses.

( Inner life by Rev. C. W. Lead beater )

( १ ) Greatest mysteries were concealed in Symbols. The most beautful of the Gods may often be depicted as dark visaged and in ugly forms, first because no age could indicate such supernal beauty and second because, were even an attempt to be made the worshippers attention would be distracted from the hidden life to a mere external form. (Lotus fire, see pp. 633—638)

( २ ) हंसपद्धति यातील चरित्रें किंवा श्री. गोंदवलेकर महाराज व निरंजन रघुनाथ यांच्या चरित्रांत अथवा श्रीबाळ-चरित्रांत करुणासागर अशा श्रीगुरु-माउलीच्या रौद्रस्वरूपाची कल्पना येते.

हें जसें रौद्रतेचें व अरूपतेचें रहस्य सांगितलें, तसेंच देवतानिरावरण असणें हें त्यांचें ज्ञानलक्षण मानावें. देवतांना अनेक हात व अनेक मुखें असणें हा त्यांच्या ठिकाणच्या अमर्याद सामर्थ्याचा पुरावा होय. तसेंच त्यांची सिंह-वृषभादि वाहनें व्याघ्रचर्मादि वसनें, हातांतील विविध आयुधें, हें त्यांचें लाक्षणिक स्वरूप होय. त्यांतील भाव शास्त्रात कोठें कोठें सांगितले आहेत. बिंदु आणि रेषा या परिमाणशून्यगमकाचीं अक्षरें बनतात. अनेक अक्षरांचे शब्द होतात व घटाकाशप्रमाणें त्या शब्दांतील अवकाशांत अथांग अशा ज्ञानसागरातील अर्थ सामावला जातो. हा दिव्य नामातील अर्थ व दिव्य रूपाकृतींतील संकेत तज्ज्ञांस मात्र जाणवतो. ऐतिहासिक संशोधकांना जसे जीर्ण कागदांचे गळाठेहि निरीक्षणीय वाटतात, त्याप्रमाणें देवताविज्ञानाचे जे खरे जिज्ञासू व तज्ज्ञ असतात त्याना प्राचीन व गूढ विज्ञानशास्त्र रौद्र व कुरूप अशाहि प्राचीन मूर्तींच्या विज्ञानांत व शिल्पांत उपलब्ध होतें. चांगलें उदाहरण द्यावयाचें तर सुप्रसिद्ध नटराजाच्या मूर्तीवरील विस्तृत भाष्य हें त्याचें ठळक उदाहरण होय.

आतां भैरव-भैरवी, रुद्र-रुद्राणी, काली-कराली, अशा रौद्र व संहारक देवतांची वर्णनें थोड्या-फार अतिशयोक्तीनेंहि उग्र अशीं वर्णिलेलीं असावींत यांत नवल नाहीं. व्याघ्रीचें क्रौर्य तिच्या पिलांस जसें भासत नाहीं, त्याप्रमाणें शिवशक्तीच्या उपासकांस त्यांच्या उपास्यांचें संहारक क्रौर्य भेडसावीत नाहीं. "भीषाऽस्माद्वातः पवते। भीषोदेति सूर्यः। भीषाऽस्मादग्निश्चेन्द्रश्च। मृत्युर्धावति पञ्चम इति॥ (तै. उप. २।८) अर्थात् ज्याच्या भयानें वायु वाहतो, सूर्य वेळेवर उगवतो, अग्नि, इंद्र, मृत्यु आपापल्या कामामागें धावतात, असा भय-कारण कोण? तें सांगतांना श्रीमच्छंकराचार्य आपल्या भाष्यांत सागतात कीं, "तच्च भयकारणमानन्दं ब्रह्म।" भयाचें कारण आनन्दब्रह्म होय. शिवशक्त्युपासनेंत भाविक व जाणत्या उपासकाची हीच योग्य धारणा असते. तो घोरस्वरूप रुद्र-भैरव आणि ती भयानक कालिका अथवा चंडिका हीं मंगलमय शिवशक्तींचींच रूपें होत, असें तो जाणत असतो. फणस आणि अननस, अथवा महाळुंग आणि नारळ अशा ओबडधोबड दिसणाऱ्या फळांतील उत्तम रस रसज्ञ भोक्ता जाणत असतो. दुसरें असें कीं, शिव, रुद्र, काली या संहारकारक देवतांची निःस्सीम वैराग्य ही गुणोपाधि

आहे. त्यांच्या स्पष्ट निदर्शनासाठीं मेसूर व रौद्र नामरूपांचीं आवरणें शास्त्रकारांनीं आपल्या वर्णनात योजावीं हें सहज आहे.

शिव आणि रुद्र व शक्ति यांची शास्त्रांत सौम्य आणि उग्र अशीं दोन रूपें वर्णिलीं आहेत. "दया तिचें नांव भूतांचें पाळण। आणिक निर्दळण कंटकाचें॥" या संतोक्तीप्रमाणें शिव आणि घोर हीं एकाच भोळ्या शंकराचीं रूपें संभवतात.व तीं दोन्हीहि स्तुत्य असतात. अदिती म्हणजे देवमाता व अदिती म्हणजे सर्वभक्षक; असे दोन्ही अर्थ संभवतात. संत म्हणतात, "मऊ मेणाहुनी आम्ही विष्णुदास। कठीण वज्रास भेदूं ऐसे॥" उत्पत्ति, स्थितीप्रमाणें लय हेंहि ईश्वराचें अपरिहार्य कर्तव्यच आहे. शरिराच्या आरोग्यासाठीं शल्यचिकित्सा करावी लागते, त्यास कोणी क्रौर्य म्हणत नाहींत. समष्टीच्या हितबुद्धीनें हिंसाहि कधीं कधीं अपरिहार्यच असते. अन्नपाक दिजविण्याकरिता विळीवर आडवीं घालून पडवळें, भोपळे वगैरे भाजी खसाखस चिरणाऱ्या आईला विघातक म्हणावें का विधायक म्हणावें हें कोण ठरवील? सृष्टिचक्राचे घटि यंत्रास लावलेले पोहरे भरलेले असले तर ते पुन्हां भरण्याकरितां त्यास अधोमुख होऊन रिकामें व्हावें लागतें. असेंच हें संघटनेविघटनेचें चक्र आहे.

गुणमायेचे सत्त्व, रज, तम असे तीन गुण आहेत. तिन्ही गुणांचे सामर्थ्य सारखेंच आहे. फार काय मधुर भक्तीपेक्षाहि विरोध भक्ति जास्त प्रभावी ठरते! निरनिराळ्या काचातून कंदिलाच्या शुद्ध ज्योतीचा प्रकाश निरनिराळ्या रंगभेदानें पडावा, त्याप्रमाणें सत्त्वगुणप्रधान, रजोगुणप्रधान व तमोगुणप्रधान व्यक्ति व पदार्थ दिसतात. पण या उपाधिभेदांत अनुस्यूत असलेली शुद्ध ज्योति अवर्ण असून ती शुद्धच प्रकाश देत असते. व तीच उपास्य होय. श्रीमंतानें सोन्याचा बाळकृष्ण केला व गरिबानें तांब्याचा केला किंवा मातीचा केला, म्हणून उपास्यांत न्यूनाधिक्यपणा येत नाहीं. कारण उपास्य देव माती, तांब्या, सोन्याहून वेगळाच असतो.

---

१ तो आनंद कसा तर ज्याच्यापुढें हिरण्यगर्भाचा महानंद समुद्राच्या जलांतील सूक्ष्म थेंबाप्रमाणें असतो, असा तो निरतिशय परमानंद होय.

(स एको ब्रह्मण आनन्दः। श्रोत्रियस्य चाकामहतस्य॥ तै० २।८ यावरील शांकरभाष्य पाहा).

गुणोपाधींच्या सत्त्वाधिक्यांतहि ईश्वरविभूति दिसेल यांत नवल नाहीं. तमाधिक्यांतहि ती पाहतां आली पाहिजे. हें प्रतीकोपासनेचें दुर्गम रहस्य आहे. भगवंताचे विश्वरूपदर्शन भयानक दिसतें. तेथें भगवान् पाहावयाचा असतो. अत्यंत रौद्र आणि भयावह अशा अति अमंगल शीलाच्या व बीभत्स रूपाच्या कालीची जगज्जननी प्रियमाता, म्हणून स्तुतिस्तोत्रें श्री. रामप्रसाद कवीनें केलेलीं श्रीरामकृष्ण परमहंस इत्यादि देवीभक्तांनीं जीं उत्कट प्रेमभरानें गायलीं आहेत, तीं पुन्हां पुन्हां मनःपूर्वक सार्थ वाचली म्हणजे सर्वांगीण भक्तीचें रहस्य कळून येईल. नारसिंहाचें रूप पाहून प्रल्हाद बाळ भयानें पळून गेला नाहीं. साक्षात् पोटच्या एकुलत्या एका सुंदर राजकुमाराचा बळी मागणाऱ्या नरमांसभक्षक अशा अघोरी व कुत्सि अशा शिवरूप अतिथीचा श्रीयाळ-चांगुणा यांनींच काय, पण त्यांच्या चिलया बाळानेंहि तिरस्कार केला नाहीं. रुद्रच काय भगवान् श्रीकृष्णहि आपल्या विभूतियोगांत "द्यूतं छलयतामस्मि," असें सांगतात. श्रीकृष्णाच्या चरित्रात वर वर पाहतां तो चोर आणि छिदल, कपटी आणि कावेबाज होता असें कोणास भासलें तरी पण गोप आणि गोपी, अर्जुन आणि उद्धव, युधिष्ठिर आणि भीष्माचार्य, तसेंच श्रीनारदांसारखे सिद्ध ऋषि आणि मुनि यांची श्रीकृष्णभक्ति पराकोटीला गेली नव्हती काय? यावरून हें लक्षांत घ्यावें कीं, विचार करण्याची आक्षेपकांची आणि त्यांची पातळी यांत जमीन-अस्मानाचा भेद आहे. या भेदाचा शांतपणें, निर्विकार चित्तानें व अंतर्मुखवृत्तीनें पुन्हां पुन्हा विचार करावा म्हणजे हे आक्षेप अयथार्थ वाटूं लागतील. Evil to him that evil Thinks.

एकच अमूर्त राजसत्ता मुख्य प्रधानापासून गांव महार-मांगापर्यंत निरनिराळ्या व्यक्तींत भिन्न भिन्न तऱ्हेनें व्यक्त झाली, तरी त्यानें राजसत्तेला न्यूनाधिक्य प्राप्त होत नाहीं. रहदारी रोखणारा शिपाई राजाचीही गाडी रोखून धरतो. तेव्हां तो राजाहून श्रेष्ठ ठरत नाहीं. त्या शिपायांतील तें प्रतिबंधक सामर्थ्य राजसत्तेचेंच असतें. तीच राजसत्ता जुलमी वृत्तीच्या अधिकाऱ्यांत शिरून जुलूम करते, सैनिकांत शिरून हिंसा करते, दुर्वृत्त न्यायाधिशांत शिरून लांच खाते, महार व मंगी यांच्या शरिरांत शिरून घाण उचलते, मांगाच्या शरिरांत शिरून खुनी इसमास फांसावर

चढविते; अथवा एकच विद्युच्छक्तिप्रकाश, गति, ध्वनि, रोगनिवारक किंवा प्राणहारक शक्ति इत्यादि निरनिराळ्या कार्यांत व्यक्त होते. निरनिराळ्या रंगाच्या व शक्तीच्या गोलकातून निरनिराळा प्रकाश पाडते. पण त्यामुळें मूळ विद्युच्छक्तीच्या शक्तिस्वरूपात इष्टानिष्ट असा भेद करता येत नाहीं. श्रेष्ठ, कनिष्ठ, सुकृत, विकृत, विधायक, विनाशक, सुरूप, कुरूप, सत्त्व, रज, तमोगुणी हे भेद उपाधींचे जाणावे, मूळ शिवसत्तेचे अथवा आदिशक्तीचे नव्हत. एकाच मळ्यातील जलमृत्तिका सुंठ, हळद, कांदा, गाजर, ऊस, मिरची, द्राक्ष, एरंड्या, काळीं, काकडी अशा विविध कंदफलमूल यांच्या रसात व्यक्त होते.

याप्रमाणें कार्यब्रह्मरूप शिवरुद्र व त्याच्या शक्ति याचें व त्याच्या रूपाचें जें एकदेशी व विकृत वर्णन केलें जातें, तें उपाधिसापेक्ष व परोक्षच असतें हें विसरू नये त्यामुळें मूळ शिवाचें किंवा चिच्छक्तीचें माहात्म्य कमी होत नाहीं. आणखी असें पाहावें कीं, एखाद्या परम भाग्यशाली सम्राटाच्या कुंडलींतहि राहु, केतु, शनि इत्यादि तथाकथित पापग्रह असतातच. त्याप्रमाणें या विश्वाच्या कुंडलींत रुद्र, रुद्राणी, कराली, काली, चंडी, नवदुर्गा, याना योग्य तें स्थान आहेच

गायीचें शेण आणि मूत्र हीं पवित्र मानतात. मेंढ्याचे केस व काहीं किड्याचे मल यांचींच सदा सोवळीं अशीं वस्त्रें करतात. मृगनाभींतील मळाचा राजे लोक कपाळीं तिलक लावतात मधमाशाची उष्टी मध हें औषधास उत्तम अनुपान समजतात. राखेनें देवाचीं उपकरणें घासतात व रांगोळी घालणें मंगलसूचक समजतात. शंखानें विष्णूला व वनगाईच्या शिंगानें शंकराला अभिषेक करतात. याप्रमाणें पवित्र मानलेल्या ग्राम्य वस्तूंचीं अनेक उदाहरणें देता येतील.

दुसरें असें कीं, या त्रिगुणात्मक विश्वात तमोगुणप्रधान वस्तु आणि व्यक्तिहि असणारच. नाश करण्यास योग्य अशाचा नाश न होईल तर उत्पत्ति व स्थितीच समवणार नाहीं. शिवाय लय आणि उत्पत्ति, विघटना आणि संघटना, शल्यचिकित्सा आणि आरोग्य प्रतिबंधनिरास आणि इष्टप्राप्ति, आवरणभंग आणि स्वयसिद्धाची उपलब्धि, शिक्षा आणि शिक्षण, सयम आणि स्वातंत्र्य, मृत्यु आणि जन्म, अशा विरोधात आपणाला वाटतें तेवढें

अंतर नसलें. रात्र आणि दिवस एकमेकांचे कारक असतात व एकमेकांत मिळलेले असतात. दुःख ही सुखाची पार्श्वभूमि आहे. इतकेंच काय तर "जनीं दुःख तें सुख मानीत जावें।" असा श्रीसमर्थ रामदासांचा दडक आहे. लेखकाच्या बंधूंनीं शिवाजीचा सुंदर मोहक पुतळा तयार केला होता, तो पाहून लोकमान्य टिळक म्हणाले, "या चेहऱ्यात क्रौर्य कमी दिसतें, तें अवश्य दिसलें पाहिजे" क्षत्रिय रणगाजीच्या ठिकाणीं क्रौर्य हा गुण आहे. दोष नव्हे.

या विश्वात उत्पन्न होणाऱ्या हरएक वस्तूचा व व्यक्तीचा ग्रास करणारा काल आहे. त्या कालाची शक्ति ती काली होय. ती अज्ञात असल्यामुळें कृष्णवर्ण मानली आहे. ती संहारक असल्यामुळें अति उग्र अशी वर्णिली आहे. ती अशी कीं, कोणाहि उन्मत्ताला तिचा धाक वाटावा. दैन्य आणि दुःख पराकाष्ठेचें का असेना, दुष्ट, दुरात्मे, वैरी कितीहि प्रबळ का असेनात, ही कालसत्ता त्याचाहि नाश करते म्हणूनच ती काली अत्यंत उग्र असूनहि मातेप्रमाणें प्रेमळ व प्रियहि आहे. ती ज्या वस्तूंचा व व्यक्तींचा नाश करते, त्यापैकीं कांहीं आपणांस प्रिय वाटत असल्यामुळें तिच्या निष्ठुर क्रौर्याचा राग येतो; पण त्या प्रिय वस्तूंच्या नाशाबरोबर ती आपली ममता व अहंता या मूळ प्रतिबंधक दोषांचाहि नाश करते. ही फार मोठी इष्टापत्तीच असते. फार काय, पण त्या महासंहारक देवतेनें आपल्या जीवभावाचा बळी घ्यावा, असाच त्यांच्या परमार्थसाधनांतील हेतु असतो. सारांश, नामरूपाचा नाश हा स्वरूपतः अनिष्ट आहे असें आपणास वाटतें, तो आपला भ्रम आहे. नाशाला योग्य त्याचाच नाश होतो. शाश्वताचा नाश होत नाहीं. या माझ्या सूचनांचा खोलवर विचार केल्यास तसेंच पुराणातील व वैदिक वाङ्मयातील वर्णनें बहुधा परोक्ष व लाक्षणिक असतात हेंहि न विसरल्यास आक्षेपकाच्या दृष्टींत इष्ट तो फरक पडेल. लाक्षणिक वर्णनें ज्याप्रमाणें जाणरस्यात रहस्यबोध व्हावा म्हणून तशीं केलेलीं असतात, तशीं अतिशयोक्तीचीं वर्णनें अजाणत्याच्या मनावर परिणाम व्हावा म्हणून तशीं करावीं लागतात. शिवगीतेंत पार्वतीचें वर्णन करताना म्हटलें आहे कीं, "नक्षत्रांनीं युक्त व विंध्य पर्वतासारख्या अत्युच्च स्तनांच्या भारानें झालेली रात्रच काय, किंवा मध्यभाग (कटि) आहे किंवा नाहीं याचीच शंका उत्पन्न व्हावयाची

अशी—" अशा अलंकारिक वर्णनाच्या शब्दशः अर्थाकडे पाहावयाचें नसतें. प्रथसदर्भावरून ग्रथकाराचा हेतु जाणावयाचा असतो शिवानें आपल्या अपराधाची क्षमा करून आपणावर प्रसन्न व्हावें म्हणून शिवमहिमाच गाणारा पुष्पदत " अमगल्य शीलम् " अशा शब्दांनीं शिवाची निंदा कशी करील ? " तथापि स्मर्तॄणां वरद परम मङ्गलमसि " ॥ २४॥ याप्रमाणें शिवस्तुति करण्याचाच कवीचा उत्कट भाव तो त्या श्लोकाच्या चवथ्या चरणांत स्पष्ट करीत आहे जड पाषाणाचें शिवलिंग, स्मशानाचा शेजार, ग्राम्य वाटणाऱ्या वेशभूषा, रौद्रस्वरूप हे सारे एकाच ईश्वरी मायेंतील नामरूपात्मक प्रकार आहेत व त्याचें अधिष्ठान परमशिवाशिवाय दुसरें कोणतेंच संभवत नाहीं रौद्र, बीभत्स, भयानक, अश्लील हे सारे रस त्या एकाच अक्षरसावरील विवर्त आहेत. शारीरिक कुरूपपणा आणि मानसिक दुर्गुण सामान्य दृष्टीला दिसतात तसे ते योग्याच्या दृष्टीला दिसत नाहींत ते त्यास यथार्थ व खरोखरच दिसतात सच्चिदानंदमय शक्तीचा तो चिद्विलास आहे, असेंच योग्यांना दिसतें. श्रीरामकृष्ण परमहंस वेश्यांनाहि मातेसमान वदन करीत. विवेकानंद मद्यप्याला सद्गुरूच मानीत शिवाय व्यष्टिज्ञान सापेक्ष असतें तें यथार्थ नसतें एकाला एक वाटेल दुसऱ्याला तसें वाटेलच असें नाहीं असो

आतां प्रलयकालच्या भैरव-भैरवीचें योगवासिष्ठांत अति विस्तृत वर्णन केलें आहे ( ६।२।८१।८३ ) त्यांतील थोडा नमुना येथें देतों श्रीवसिष्ठ म्हणतात, " हे राघवा ! त्यानंतर मीं त्या महाकाशांत त्या रुद्राला नाचतांना पाहिलें त्या वेळीं आपलें विभुत्व सोडून आकाशच साकार झालें आहे असें भासलें. त्याचें शरीर फारच मोठें, सजल मेघाकार व दाही दिशांना व्यापून सोडणारें होतें सूर्य, चद्र, अग्नि हे त्याचे नेत्र होते दशदिशा हें त्याचें चंचल वस्त्र होतें तो जणु काय नीलवर्ण प्रभेच्या ज्वालाचा घन स्तंभच आहे असें वाटत होतें वडवाग्नि याच ज्याच्या दृष्टि आहेत, चंचल भुजा हाच ज्यांतील भयंकर लाटांचा समूह आहे, असा हा एकार्णव समुद्रच जणु काय शरीर धारण करून उभा राहिला आहे असें वाटलें त्यानंतर त्याच्या शरीरापासून

१ मुक्ताभरणसंयुक्तां रात्रिं ताराञ्चितामिव, विन्ध्यक्षितिधरोत्तुङ्ग कुचभारभरालसाम् ॥ ३२ ॥ सदसत्तत्त्वयाविष्टमध्यदेशान्तराम्बराम् ॥ ३३ ॥ शिवगीता अ ४

एक छाया उत्पन्न झालेली मीं पाहिली. ती त्या रुद्राच्यापुढें उभी राहून नृत्य करूं लागली. ज्वालांनीं व्यापलेल्या अग्नीमुळें चंचल झालेल्या वन-समृद्धीप्रमाणें तिचें कृष्णवर्ण मस्तक पुष्प-पल्लवादिकांनीं भूषित केलें होतें. तेल घालून खणलेल्या काजळाप्रमाणें ती काळी होती. ती तम श्रीच देहयुक्त झाली आहे असा भास झाला. ती इतकी उंच होती कीं, मोठ्या प्रयत्नानें, योगबलानें, मनोवेगानें अनेक सहस्र वर्षेंपर्यंत खालीं-वर जेव्हा धावलों तेव्हा तिचें मस्तक व पायाचीं नखें पाहिलीं. देवादिकांच्या शिरकमलाची विचित्र माला तिनें आपल्या गळ्यांत घातली होती. तिच्या वस्त्राचे अचल वायूनें प्रदीप्त केलेल्या अग्नीचेच आहेत असें भासत होतें. तिच्या दीर्घ कर्णांवरून नाग लोंबत होते. एकदा ती एकमुखाकार दिसत होती. काहीं वेळ अनंत उग्र मुखांनीं ती युक्त होत असे. तीन लोक हे तिच्या अंगावरील रत्नजडित आदर्शच होते. कानामध्यें हिमालय व मेरू हींच एक रुप्याचें व दुसरें सोन्याचें अशीं कुंडलें होतीं. ज्याच्या योगानें प्रचंड पर्वतहि तृणाप्रमाणें उडून जात होते, अशा निश्वास वायूच्या योगानें तिनें सर्व दिशा दुमदुमून सोडल्या होत्या. हीच ती कालरात्री होय असें मीं तिच्या देहावरून अनुमान केलें. हीच ती भगवती काली होय. याप्रमाणें ती फार मोठी भैरवी देवी सर्व आकाशाला व्यापून त्या भैरवाकार रूपरुद्राच्या पुढें नाचत होती. तिच्याकडून वंदन केला गेलेला तो आकाशभैरवहि तिच्याप्रमाणेंच विलक्षण आकारानें त्या वेळीं जोरानें नर्तन करूं लागला. रक्तरूपी आसवानें भरलेलें यमाच्या रेड्याचें मोठें शृंग हातांत घेऊन, वक्षःस्थलावर रुंडमाला धारण करणारा, गरुडाच्या अति विस्तीर्ण पंखांनीं आपलें मस्तक भूषित करणारा व प्रलयकालीं जगत् भक्षण करून आनंदित झालेल्या कालरात्रीकडून वंदन व स्तुति केला गेलेला तो महाभयानक भैरव "डिंबं डिंबं सुडिंबम् पचपच सहसा झम्य झम्यं प्रझम्यं" इत्यादि तालव्यंजक शब्दवाद्यांनीं नाचणारा तो कालभैरव तुमच्या ज्ञानप्रतिबंधक दोषाचें निरसन करून रक्षण करो!"

(त्या डिंबं डिंबं इ. गीताचा भावार्थ—"हे भरवे! सर्व प्राण्यांच्या डिंबाला म्हणजे अनर्थभोगाची उपाधि अशा स्थूल शरीरादि प्रपंचाला खाऊन त्यानंतर डिंब म्हणजे सूक्ष्म शरीरादि प्रपंचालाहि भक्षण करून त्यानंतर "सुडिंब" मूलोपाधिभूतकारणशरीरालाहि चरमसाक्षात्कारानें

वेळीं तत्त्वत आविर्भूत होऊन पूर्णपणें भक्षण करून टाक. नंतर पाचव्या, सहाव्या व सातव्या योगभूमिकावर क्रमानें आरूढ करून त्या सर्व प्राण्यांच्या जीवन्मुक्तीचा सत्वर परिपाक कर आणि शेवटीं विदेह कैवल्यानें त्यांना आपल्या उदरांत पचवून सोड. ) वसिष्ठ पुढें सांगतात—

" रामा! वस्तुत तो पुरुषहि नव्हे व ती स्त्रीहि नव्हे तें नृत्य नव्हे व तीं दोघेंहि नव्हेत. आणि तशाच त्या दोघांच्या तशा प्रकारच्या आकृतिहि नव्हेत अनादि चिन्मात्र आकाश कीं, जें कारणाचेंहि कारण, अनंत व शांत आहे, तेंच अव्यय तत्त्व हें असें आभासमय पसरलें आहे निरतिशय आनंद रसरूप असलेलें तें सद्ब्रह्मच नीळकंठ, त्रिनेत्र इत्यादि शिवस्वरूप होऊन प्रलयकालीं उपासकाकडून भैरवाकार पाहिलें जातें. कारण त्याच्या वासनेच्या अनुसार तो परमाकाशच त्या आकृतीनें जगत् शांत झालें असता स्थित होतो "

" रामा! हा जो चिन्मात्र परमाकाश मीं तुला सांगितला तोच शिव आहे अविद्याभ्रांतीचें निरसन करून तात्त्विक शिवस्वभावदृष्टि उघडावी म्हणून मीं वर जगत्प्रलय रुद्राचें नृत्य इत्यादिकाचें स्वानुभवानुसार वर्णन केलें. तें चिन्मात्र घन आकाश असून तेंच तसें नुसतें भासतें त्यांत तत्त्वार्थ कांहीं नाहीं तो भैरव चिदाकाश असून त्याला शिव असें म्हणतात, व त्याहून भिन्न नसलेली जी मनोमय स्पंदनशक्ति तीच त्याची माया आहे असें जाण तिलाच गुहा, चंडिका उमा इत्यादि नांवें प्राप्त झालीं आहेत ती शिवरूपच असून तिचें क्रिया स्वरूप केवळ अज्ञानदर्शीत तेवढें दिसतें." इत्यादि यावरून मनोहर आणि रौद्र, ग्राम्य आणि भव्य हे सारेच तत्त्वत मायाभ्रम आहेत, असें म्हणावें लागतें.

आता याचप्रमाणें अनार्य, अर्वाचीन व अश्लील या आक्षेपाचा विचार पुढील प्रकरणांत करू

शूलटंकपाशदंडपाणिमादिकारणं श्यामकायमादिदेवमक्षरं
निरामयम्। भीमविक्रमप्रभुं विचित्रतांडवप्रियं
काशिकापुराधिनाथ कालभैरवं भजे ॥ ३ ॥

कालभैरवाष्टकम्

---

## प्रकरण १५ वें

# अवैदिक व अश्लील

स कस्य स्तोतव्यः कतिविधगुणः कस्य विषयः।
पदे त्वर्वाचीने पतति न मनः कस्य न वचः ॥ २॥
—महिम्न

व्रीडोत्तरोष्ठोऽधर एव लोभो धर्मः स्तनोऽधर्मपथोऽस्य पृष्ठः ॥
कस्तस्य मेढ्रं वृषणौ च मित्रौ कुक्षिः समुद्रा गिरयोऽस्थिसङ्घाः ॥३२॥
भागवत २।१

जगत्कारणाधीश्वर अशा निर्गुण व अनादि म्हणजे अतिप्राचीन परम शिवाची कल्पना येण्याकरितां अर्वाचीन, सगुण व स्थूल अशा अनेक प्रतिमा-प्रतीकादि गमकांनीं त्यास निर्दिष्ट करतात. या सर्व परोक्ष गमकांना त्याच्याच-कडून सत्ता मिळत असल्यामुळें तद्द्वारांहि त्या कारणात्म्याची परोक्ष कल्पना करतां येणें अशक्य नाहीं. म्हणून अशा विकल्पांचा स्वीकार करूनहि अधिष्ठानरूप अथवा निमित्तोपादानरूप शिवस्वरूपास गौणता येत नाहीं. "तुका म्हणे जें जें बोलो। तें तें साजे या विठ्ठला॥" या न्यायानें मागील व या प्रकरणांत विचार सुरू आहे. मूर्तिपूजा प्राचीन आहे का अर्वाचीन आहे या मुद्याला महत्त्व नाहीं. तसेंच शिवलिंग अनार्य व अश्लील नाहीं, या पूर्वविवेचनाशीं ही विसंगति आहे, असें समजूं नये. अशी सूचना देऊन प्रकरणास आरंभ करतों.

शिव हें नाम ऋग्वेदांत नाहीं म्हणून शिव अवैदिक आहे, मोहनजोदारो येथील उत्खननांत शिवलिंगें पुष्कळ सांपडलीं म्हणून शिवलिंगोपासना द्राविड संस्कृतीची आहे, याउलट ह्यूएनत्संग यांच्या प्रवासवर्णनांत कोणाहा शिवलिंगोपासनेचा उल्लेख आढळत नाहीं, म्हणून शिवलिंगोपासना बौद्ध धर्माच्या ऱ्हासांतून बौद्धांच्या स्तूपांच्या पूजेंतून मागाहून निघालेली असावी, अर्थात् ती अर्वाचीन व अमंगल आहे, तसेंच लिंगयोनि हीं शिवपार्वतींची

प्रतीकें मानल्यामुळें लिंगोपासना अश्लील आहे, या सर्व आक्षेपांनीं शिवलिंगोपासनेचें स्वयंसिद्ध वस्तुमाहात्म्य कमी होत नाहीं, हा विचार मागील प्रकरणाप्रमाणें याहि प्रकरणात करावयाचा आहे. शिवशक्ति हीं तत्त्वें जशीं प्राचीन तशीं अर्वाचीन पण आहेतच. तीं निर्गुण आहेत, तशीं सगुण आहेतच. सर्व ग्राम्य भव्य मंगलामंगल क्रियाकर्मांत कारणरूपानें तीं आहेतच. गीता म्हणते त्याप्रमाणें मैथुन हें सहजपीठ त्यांचेंच आहे. मेढ्र व वृषणाचें उपादानकारण तींच. बौद्धांचे स्तूप हीं जीं स्मारकपूज्य चिन्हें असतात, त्यात व्यापक शिवतत्त्व असणारच. ज्याचें चित्त शुद्ध आहे, त्याला सारें सर्वदा शिवमयच आहे. हाच विचार पुढें थोड्या विस्तारानें सांगावयाचा आहे.

शिवलिंगोपासना ही अवैदिक, अर्वाचीन व निंद्य आहे, हें दाखविण्यासाठींच बौद्धधर्माच्या भ्रष्ट स्वरूपाशीं तिचा संबंध जोडण्यांत येतो. आता बौद्ध आणि शैव यांचें कांहीं बाबतींत परस्परानुकरण होत होतें असें जरी मानलें, अथवा कोठें कोठें शैव–बौद्ध स्तूपांची शिवलिंग म्हणून उपासना करूं लागले होते, हें जरी खरें असलें, तरी त्यामुळें शिवलिंगोपासना निंद्य न ठरतां स्तुत्य कशी ठरते, तेंहि विधायक दृष्टीनें दाखवितां येईल. पण पश्चिमेकडील प्राच्य विद्या संशोधकांचें अनुकरण करणाऱ्या आपल्याकडील आधुनिकांच्या अति दक्ष अशा ऐतिहासिक दृष्टीला श्रुतिसमन्वयाचें, अध्यात्मज्ञानाचें व धर्मभावनेचें अगत्य व जिव्हाळा क्वचितच आढळतो. म्हणून बौद्धांच्या स्तूपांची का म्हणाना कधीं काळीं शिवलिंग म्हणून उपासना रूढ झालेली असली तरी ती स्तुत्य कशी ठरते, तें दाखविण्याचा विधायक प्रयत्न त्यांच्याकडून होत नाहीं, तो मी या प्रकरणात मुद्दामच नमुन्याकरता करीत आहे.

तें करताना अगोदर दुसरें एक तत्सदृश ठळक उदाहरण घेऊं. ईजिप्त येथील आठ कोटी घनफूट इतक्या प्रचंड आकाराच्या व चार हजार वर्षांपूर्वीच्या सुप्रसिद्ध मनोऱ्यांशीं (Pyramids) बौद्धधर्माचा जरी संबंध नसला, तरी थोर मृतांच्या अवशेषांवरच उभारलेले ते अतिप्रचंड स्तूपच आहेत. या मनोऱ्यासंबंधीं संशोधन करण्याचे अनेकांनीं भगीरथ प्रयत्न केले व लक्षावधि रुपये त्यापायीं खर्च केले. या संशोधकांच्या मालिकेंतील डॉ. पॉल ब्रंटन हे धर्म व तत्त्वज्ञानाची आस्था बाळगणारे असे अगदीं अलीकडील संशोधक होत. त्यापूर्वीचे एक सुप्रसिद्ध संशोधक सर विलियम जोन्स यांनीं

त्यांस महादेवाचीं प्रतीकें असें म्हटलें आहे. डॉ. पॉल ब्रंटन हे योगाभ्यासी, साहसी व कट्टे जिज्ञासु होते. त्यांची संशोधनाची पद्धत व मनाची तयारी इतर सामान्य संशोधकाहून अगदीं वेगळी होती. ईजिप्तच्या अधिकाऱ्यांची परवानगी घेऊन ते एका रात्रीं ईजिप्तमधील एका प्राचीन मनोऱ्याच्या पोटांत शिरले. तो सारा प्रांत भुताळलेला होता. रात्रीं तेथें अनेक भूतचेष्टा होत. अशा सूक्ष्म परलोकांच्या अनेक भुतावेतांनीं त्यांना प्रथम भीति व किळस उत्पन्न केला. पण तो सारा सहन करून ते धैर्यानें हातांत (टॉर्च) बत्ती घेऊन त्या मनोऱ्याचा आंतील गुप्तमार्ग हुडकीत होते. त्या मनोऱ्याच्या पोटांत काहीं खोल्या, कांहीं गुप्त दरवाजे व कठिण मार्ग होते. डॉ. पॉल ब्रंटन यांच्या यापुढील संशोधनांत त्यांच्या अंतर्मुखतेच्या एकाग्रतेनें त्यांचा ऐहिक देहभाव सुटला. ते त्यांच्या संवादी सहृदयतेमुळें परलोकांतील स्थिति अनुभवूं लागले. त्यांना तेथें त्यांच्या परिचित अशा अनेक दिवंगत व्यक्ति दिसल्या. नतर तेथील गुरुमहाराज (High Priest) यांचें त्यांना दर्शन झालें. त्यांनी त्यास परत जाण्याबद्दल पुष्कळ सांगितलें. पण त्यांच्या दुर्दमनीय जिज्ञासेमुळें त्यांनीं तें ऐकलें नाहीं. त्यापुढील उभयतांचा संवाद वाचीत असतां कठोपनिषदांतील यम व नचिकेता यांच्या संवादाचें स्मरण होतें. पण नचिकेत्याहून पॉल ब्रंटन यांची जिज्ञासा वेगळ्या प्रकारची होती. त्यापूर्वी कोणाही आधुनिक संशोधकाला न उकललेलें त्या मनोऱ्यांचें अति गूढ रहस्य त्यांना समजून घ्यावयाचें होतें. त्या गुरुमहाराजांनीं त्यांची दृढ जिज्ञासा पाहून त्यांस थोडी माहिती दिली. ते म्हणाले कीं, येथें परलोकांच्या चित्रगुप्ताचें वास्तव्य आहे. पण त्या ठिकाणीं जाण्याचा तुला अद्याप अधिकार प्राप्त झाला नाहीं. तथापि तूं अध्यात्माचा अभ्यास केला आहेस, म्हणून मी तुला तेथें नेण्याचा यत्न करतों. मग पॉल ब्रंटन त्या गुरुमहाराजांच्या मागोमाग कसल्या तरी अज्ञात मंद प्रकाशांत गुप्त मार्गानें चालूं लागले. पण त्या

1 Sir william Jones says that the Pyramids of Egypt, as well as those discovered in Ireland, and probably also the tower of Babel seem to have been intended for images of Mahadeo (Phallic miscellanies, p. 91)

मार्गाच्या अखेर त्याना पुढील मार्ग बंद केलेला आढळला ! व एका अदृश्य शक्तीनें त्याना मागें पूर्वस्थळीं लोटलें नंतर त्याना त्या परलोकच्या गुरु- महाराजाच्या तोंडून एक दिव्य संदेश मिळाला त्यांतील आशय असा होता– "माझ्या मुला, यापुढील येथील मार्गदर्शन तुला होण्याला अद्याप अवाध आहे पण याचप्रमाणें तुझ्या अंतरात असलेला गूढ मार्ग शोधून पहा म्हणजे तुला तुझ्या सूक्ष्म बुद्धिरूप गुहेंत तुला जें पाहण्यास योग्य तें पाहण्यास मिळेल या मनोऱ्याचें जें गूढ रहस्य तेंच तुझें आत्मरहस्य होय येथील गुप्त दालनें व त्यातील गूढ वाङ्मयसंग्रह तू आपल्या पिंडाच्या ठिकाणींच पहा या मनोऱ्याचा गूढ संदेश असा आहे कीं, मानवानें अंतर्मुख होऊन आपल्या पिंडाच्या आतील गूढ जीवनकेंद्रात शिरून आत्मप्रत्यय घ्यावा तुझें कल्याण असो !" हें गूढ गुंजन येथें थोडें विस्तारानें देण्याचें कारण, याचप्रमाणें उपास्य व त्याचें प्रतीक यातील गूढ रहस्य सामान्य ऐतिहासिक दृष्टीच्या आटोक्याच्या बाहेरचें आहे, हें ऐतिहासिकानीं अवश्य जाणलेलें बरें इतकी सूचना देऊन आता आपण पुन्हा बौद्धस्तूपाकडे वळू

---

1 "My son," came a murmur from the High Priest, "it matters not whether thou discoverest the door or not. Find but the secret passage within the mind that will lead thee to the hidden chamber within thine own soul, and thou shalt have found something worthy indeed The mystery of the great Pyramids is the mystery of thine own Self The secret chambers and ancient racords are all contained in thine own nature The lesson of the pyramid is that man must turn inward, must venture to the unknown centre of his being to find his soul, even as he must venture to the unknown depths of this fane to find its profoundest secret Farewell!" (A search in Secret Egypt, by Paul Brunton pp 77 78)

कोठें कोठें शैवांनीं शिवलिंग म्हणून बौद्धाच्या लहान स्तूपाचा उपयोग केला असला किंवा अशा स्तूपांचें अनुकरण केलें असलें, तरी तेवढ्यानें शिवलिंगोपासना अर्वाचीन, ग्राम्य, निकृष्ट किंवा निंद्य ठरत नाहीं. कारण धातुगर्भ स्तूप हें बौद्धांचें वंदनीयच स्मारक असतें. त्या अनुकरणांत धर्मभ्रष्टतेची ऐतिहासिक दृष्टीची कल्पना अगदींच अनुचित व अप्रयोजक वाटते. कोणा थोर मानवाच्या मृत शरिराची अंतिम शेषरूप रक्षा हें त्याच्या वास्तविक अमृतत्वाचेंच जणुं स्मारक आहे, असें मानतां येतें. देहोपाधि जळून गेल्यानंतर जी कधींच न जळणारी पांढरी रक्षा राहते, तें निरुपाधि अशा अंतर्यामिनचेंच एक प्रतीक असें मानतां येईल. रक्षा अथवा राख या संज्ञाच नित्यता दर्शवितात. ही रक्षा अथवा चिताभस्म शिवास अति प्रिय मानलें आहे. ज्ञानाग्नीनें तिन्ही देहास (अथवा सर्व भेदास) जाळून उरणारें भस्म म्हणजे विज्ञानरूप होय. ज्ञानवैराग्याच्या अग्नीनें शुद्ध झालेली विभूति हें ईश्वराचेंच स्वरूप असल्यामुळें उपासनीय आहे. भस्मधारणविधींत असें हें रहस्य आहे. लिंगायतपंथांत अथवा शैवपंथांत भस्मधारणविधीला फार महत्त्व मानलेलें आहे. शाक्तांनीं शक्तिविरहीत ( इकार वर्जित शिव ) हा लक्षणेनें निश्चेष्ट

१ Buddhism by Rhys Davids pp. 182–185

२ ऐक्यरूप आत्मत्वामाझारी । यातेअग्निभस्मादि या मंत्रीं । ज्ञानाग्नि सांठवून विज्ञानाउरी । भस्म तें हुडकून निजांगीं लावावें ॥ २६८ ॥ या रीतीं ज्ञानही मावळलें । यासाठीं यातेअग्नि हें बोलिलें । पुढें विज्ञानरूप भस्म उरलें । भस्मादायादि मंत्रें ॥ २७२ ॥ वेदेश्वरी. अ. ३

३ सुमुहूर्तें शिवलिंग स्थापून । दोघें पूजिती एकानिष्ठेंकरून । चिता भस्म नित्य नूतन । आणिती मेळवून साक्षेपें ॥ ९।१२० ॥ शिवलीलामृत. शिवमहिम्नस्तोत्र २४

४ चिताभस्म म्हणजे देहत्रय जाळून । आत्मप्रतीतीनें अंगीं लावी ॥ २५५ ॥ वेदेश्वरी अ. १५. विज्ञानरूप अंगीं भस्म लावी । कीं मी निजांगें ब्रह्म गोसावी । तोचि विद्वान् जगतीं सर्वीं । येर ते अविद्वांस ॥ २८२ ॥ वेदेश्वरी अ. ३

भासते भिन्नभावानामपि भेदो न भस्मनि । स्वस्वभावस्वभावेन भस्म भर्गस्य वल्लभम् ॥ ३१ ॥ बोधसागर शिवपूजाशतक.

५ भगवान् बसवेश्वर चरित्र पहा.

शवरूप मानला आहे अर्थात् शवभस्म म्हणजे श्रीज्ञानेश्वराच्या नाथपंथातील शून्याचा निष्कर्ष होय तो निष्कर्ष शून्यैवादी बौद्ध मताप्रमाणें निरात्मरूप नाहीं देह जळाल्यानंतर राहाणाऱ्या अवशेषरूप अस्थींबद्दलची धारणा अशीच करता येईल दधीचि ऋषींच्या अस्थि वज्ररूप झाल्या सारे देहोपाधि ज्ञानाग्नीनें जाळण्यात त्यागाची सीमा आहे. तेंच अमृतत्व होय. त्यानेंच शेषास्थि हें प्रतीक मानता येईल थोर हिंदु सत्पुरुषाच्या समाधीवर शिवलिंग असतें. त्या ठिकाणीं अशी धारणा सम्यक दिसते हेंच विज्ञान विभूतिरूप शिवलिंग श्रीविठ्ठलानें शिरोधार्य मानलें असें म्हणण्यास हरकत नाहीं कर्तृतन्त्र उपासनेंत भावनास्वातंत्र्य असतें, वास्तव शिवलिंग स्तूपरूप मानलें तरी त्या प्रतीकाच्या ठिकाणीं नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्ताची धारणा करता येते असें असता शिवलिंगाला बौद्ध व ब्राह्मणी धर्मांचें भ्रष्टरूप मानणें हें पाखंडी, परमार्थभावनाशून्य व रुक्ष अशा आधुनिक ऐतिहासिक दृष्टीचें अज्ञान होय! तिचा अपशकुन निष्ठावंत शिवलिंगोपासकास न होवो! शेवटीं परकीयाचे ऐतिहासिक दृष्टीचे उपनेत्र घालणाऱ्या कित्येक भ्रांत बुद्धीच्या आंग्लशिक्षित विद्वान् चिकित्सकांना मी स्वामी विवेकानंद यांच्या समग्र ग्रंथातील पुढील उद्बोधक उतारा नजर करतों

"—The various methods of explaining the dicta of the scriptures, are only for the enjoyment of the learned, they do not attain perfection, they are simply desirous to show their learning, so that the world may praise them, and see that they are learned men. You will find that no one of the great teachers of the world went into these various explainations of the texts,

१ शवरूपमहादेवहृदयोपरिसंस्थिता। असें कालीचें वर्णन आहे कल्याण शक्त्यंक, पृ. ५३३

२ श्रीज्ञानेश्वरीचें तत्त्वज्ञान पृ. १७६, १७९

३ It is the apparent void itself which is solid (Lotus fire, Book II, Ch iii)

४ कैवल्योपनिषद् २

on their part there is no attempt of 'text-torturing' no saying "this word means this and this is the philological connection between this and that word You study all the great teachers the world has produced and you will see that no one of them goes that way. Yet they taught; while others, who have nothing to teach, will take up a word and write a three volume book on its origin and use As my master used to say, what would you think of men who went into a mango orchard, and busied themselves in counting the leaves, and examining the colour of the leaves, the size of the twigs, the number of branches and so forth; while only one of them, had the sense to begin to eat the mangoes So leave this counting of leaves and twigs, and this note taking to others—That work has its own value in its proper place, but not here, in the spiritual Men never become spiritual through such work, you have never once seen a strong spiritual man among these 'leaf-counters' Religion is the highest aim of man, the highest glory, but it does not require 'leaf-counting' If you want to be Christian, it is not necessary to know whether Christ was born in Jerusalem or Bethlehem or just the exact date on which He performed the Sermon on the mount, you only require to *feel* the sermon on the mount, it is not necessary to read two thousand words on when it was delivered All that is for the enjoyment of the learned, let them have it, say 'amen' to that, let us eat mangoes."

सर्वांचा निषेधावधि जो शिव त्याची उपासना अनादि आहे तिचा बहिर्मुख स्थूल ऐतिहासिक दृष्टीनें कालनिर्णय ठरवू पाहणें हास्यास्पद आहे ! पंढरीच्या श्रीविठ्ठल मूर्तीच्या चरणीं अनन्य भावानें मस्तक ठेवून कृतकृत्य होणारे अशिक्षित वारकरी, त्या विठ्ठल मंदिराची, " बौद्ध का भागवत धर्म ! " ही ऐतिहासिक चिकित्सा करीत बसणाऱ्या विद्वानांच्या विद्वत्तेची कींवच करतील ! शिवलिंगोपासना हें भ्रष्ट बौद्धानुकरण आहे, या ऐतिहासिक दृष्टीच्या क्लिष्ट चिकित्सेला हें थोडक्यात उत्तर आहे

आता लिंगयोनि यांच्या नग्नतेतील असभ्यता व त्यांच्या मैथुनभावातील अश्लीलता याचा थोडा विस्तारानें विचार करू या सत्यानृत, प्रकाश विमर्श, शिव घोर, हेयोपादेय, स्तुत्य निंद्य, सुरूप कुरूप, इत्यादि असंख्य द्वंद्वें धारण करणाऱ्या निर्द्वंद्व शिवतत्त्वात, सर्वसमावेशन आहे ब्रह्मदेवानें सुंदर स्त्री पुरुषांचा चेहरा घडविताना अनेक नयनमनोहर आकर्षक रस जणु त्या कल्पनामुर्शीत ओतले यामुळें उपस्थेंद्रियें घडविताना त्यांच्या ठिकाणीं ओतण्यास सौंदर्यलेशहि त्याच्यानवळ उरला नाहीं अशीं ही उपस्थेंद्रियें स्वभावत अत्यंत परस्पाकर्षक असूनहि तीं दिसण्यात कुरूप व अश्लील वाटतात ज्यांच्या ठिकाणीं परमावधीचें आकर्षण आहे, त्यांच्याच-संबधीं घृणा उत्पन्न व्हावी, असें मैथुनवैराग्य मानवाचे ठिकाणीं विधात्यानें सहजसिद्ध ठेवलें आहे. हा त्याच इंद्रियासंबधीं आकर्षक विकर्षक किंवा हेयोपादेय भाव वासनासक्ति व वासनाराहित्य यामुळेंच प्रत्ययास येतो, हें उघड आहे यावरून अश्लीलता हा नियमाव वस्तुनिष्ठ नसून तो काम-वासनासापेक्ष आहे असेंच मानावें लागतें आता इतर कोणत्याहि अवयवा संबधीं इतकी घृणा न वाटता ती याच इंद्रियासंबधीं वाटावी, म्हणून विधात्यानें मलोत्सर्गाच्या इंद्रियाजवळच त्यास स्थान देऊन शिवाय त्यासच मूत्रेंद्रियें पण बनविलीं आहेत. हें सर्व विषय त्यागार्थच केलें असावें असें शास्त्रकारांनीं व संतांनीं वैराग्य प्रकरणीं त्या इंद्रियांची जी विटंबना केली आहे, त्यावरून दिसतें एरव्हीं तीं इंद्रियें स्वरूपत दोषास्पद व निंदास्पद मानण्याचें काहींच कारण नाहीं

आता शिवाच्या भिक्षाटण मूर्ति व भैरव मूर्ति नग्न असतात गोपी-वस्त्रहरणात गोपाल कृष्णानें गोपींना विवस्त्र केलें, शुकदेवासारखे संत महंत

नग्नत्व वावरत आले आहेत. कुंभमेळ्यांत असे नगे साधु अनेक असतात. श्रीरामकृष्णाचे वेदांतगुरु तोतापुरी यांस ते नागडा म्हणत. जैन-तीर्थंकरांच्या मूर्ति नग्न असतात. अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. आपल्या नजरेला नग्नता अश्लील वाटते म्हणून नग्नतेचा थोडा विचार करूं.

**नग्नत्व**—लिंगपुराण, पूर्वार्ध, अध्याय ३४ यांत नग्नत्व व कामत्व यासंबंधीं विचार सांगितला आहे. "लज्जा, मोह, भय यांनीं युक्त अशी सर्व सृष्टि ईश्वरानें उत्पन्न केली आहे. देव, मुनि, आणि सर्व मानव नग्न असेच जन्मास येतात. ज्यानें आपलीं इंद्रियें दमन केलीं नाहींत, त्यानें अंगावर कितींहि वस्त्रें घातलीं तरी तो नग्नच समजावा. उलट ज्याचीं इंद्रियें स्वाधीन आहेत, त्याला वस्त्राची जरुरी नाहीं. क्षमा, धृति, अहिंसा, वैराग्य आणि मानापमानाविषयीं मनाची समता या प्रावरणांसारखें उत्तम प्रावरण दुसरें कोणतेंहि नाहीं. असें हें नग्न मत होय. +++ सारांश, भवभक्त जे असतात ते मग जटी, मुंडी, नग्न, विकृतरूप असोत, त्यांची पूजा व आदरातिथ्य करावें. असें शास्त्र सांगतें. सिद्ध व साधु कधीं कधीं बालोन्मत्त पिशाचवत् असतात. "चोखा डोंगापरी। भाव नाहीं डोंगा॥ काय भुललासी, वरलिया अंगा॥" इत्यादि संतवचनांत हाच भाव आहे.

शास्त्रांतून तत्त्वतः अरूप शक्तीचें देहाकार देवीच्या रूपांत वर्णन आढळतें. त्यांत तिचे स्तन व नितंब पुष्ट असल्याचें बहुधा वर्णिलें जातें. पण हें साक्षात् देवतेचें वर्णन ग्राम्य भोगकामानें केलेलें असणें संभवतच नाहीं. तें मातृभावनेनें केलेलें असतें. मातेचे ते अवयव गर्भपोषण व बालसंगोपन या कामीं फार उपकारक असतात. याप्रमाणें शास्त्रीय परिभाषेंतील उदात्त व गंभीर असे परोक्षभाव लक्षांत घ्यावे.

नग्नतेसंबंधीं विचार करतां असें दिसून येतें कीं, पशूंना चर्म व त्वचा असते, तशी माणसांना नसते, म्हणून त्यांस वस्त्राच्छादनाची गरज भासली

(१) शेषाश्चाश्रमिणः सर्वे पश्चात्सृष्टा स्वयंभुवा सृष्टि रेवा मया सृष्टा लज्जा मोह भयात्मिका॥ १२॥ नग्ना एव हि जायन्ते देवता मुनयस्तथा ये चान्ये मानवा लोके सर्वे जायन्त्य वाससः॥१३॥ इंद्रियैरजितैर्नग्नो दुकूलेनापि संवृतः तैरेव संवृतैर्गुप्तो न वस्त्रं कारणं स्मृतम्॥ १४॥

असावी, नाहींपेक्षां सर्व मानवसृष्टीहि सदा नग्नच राहिली असती. दुसरें असें दिसतें कीं, मलमूत्रेंद्रियें हीं स्वाभाविकच अशुद्ध व अमंगल वाटतात. अर्थात् मलमूत्रोत्सर्गधर्मामुळें तीं स्वरूपतः दर्शनीय नसतात. पशुपक्ष्यांचीं तीं इंद्रियें इतकीं उघड दिसत नाहींत. कांहींचीं तीं पुच्छानें आच्छादित असतात. *कांहींचीं तीं पिसाखालीं किंवा पोटाखालीं आड असतात. मनुष्यांचें तसें* नसल्यामुळें त्यांनीं या अदर्शनीय इंद्रियांस वस्त्रांनीं झांकण्याचा प्रघात पाडला असेल; किंवा मैथुन हें सृष्टीचें एक परम गुह्य आहे, हेंच त्यांनीं आपल्या वस्त्राच्छादित जननेंद्रियाच्या गुह्यगोपनानें निदर्शित केलें असेल. अरूप असलेल्या शिवलिंगांत हें गुह्यगोपनाचें रहस्य आहे, असें कदाचित् मानता आलें तरी भोग्य-भोक्ता, विषय-विषयी, अहंता-इदंता अशा तात्त्विक भावांत किंवा पुरुषप्रकृति, शिवशक्ति, ब्रह्ममाया अशा द्वंद्वांच्या अविनाभूत गुह्यभावांत अश्लीलता ती काय! अहंताच इदंता बनली आणि तिनें इदंतेचा भोग घेतला या कल्पनेंत अश्लील तें काय?

वस्त्राभरणांनीं खचित अशा युवयुवतींच्या गाढालिंगनाला कोणी मैथुन म्हणत नाहीं. मैथुनाला वस्त्राभरणांचे प्रत्यवाय पत्करत नाहींत; याप्रमाणें स्थूल भोगात्मक मैथुनालाहि जर निरावरण व्हावें लागतें, तर पुरुषप्रकृतीच्या आध्यात्मिक मैथुनाला देहादि स्थूल-सूक्ष्म उपाधिभावांचें आवरण फेडून खरें व पुरें नग्न व्हावयास पाहिजे हें उघड आहे. त्या नग्नतेंत अश्लीलतेचा लेशहि संभवत नाहीं.

हें अखिल ब्रह्माण्ड हेंच ईश्वराचें इदंताप्रधान रूप असल्यामुळें व त्याला आच्छादित करणारें दुसरें कांहींच नसल्यामुळें ईश्वर हा सदा दिगंबरच आहे. म्हणून शिवपार्वतींचें दिगंबर-दिगंबरी असें वर्णन आढळतें. जेथें द्वैतभावच नाहीं, तेथें लज्जा, मोह, भीति कसची! अर्थात् अश्लीलता कसची! या नग्नदृश्यांत अश्लीलता संभवत नाहीं. अश्लील नग्नता ही स्थूल इंद्रियवासनाप्रधान भोगासक्तींत किंवा द्वंद्वात्मक लैंगिक विषयासक्त मनोविकारात संभवेल. माडीवरील उघड्या खिडकींत नटून थटून उभी असलेली वेश्या व तिच्या शेजारीं उभा असलेला एखादा कामासक्त लक्ष्मीधर हीं दोघें वस्त्राभरणांनीं आच्छादित असलीं, तरी त्यांची कामासक्ति नागवी उघडीच दिसते! याउलट सिद्ध शुकाचार्य अथवा संत मुक्ताबाई यांस आपली उघडी नग्नता

अश्लील वाटलीच नाहीं, हें उघड आहे मैथुनानें काम जणु जाळल्यावर मागून राहिलेली नसता जशी निश्चेष्ट व वैराग्यपूर्ण अवस्थेंत पडून असते, त्याप्रमाणें आत्मानात्मविचारमथनानें साधकानीं आपला काम जाळल्यामुळें त्याची नग्न निष्कामता पाषाणमय शिवलिंगाप्रमाणें निर्विकार व निश्चेष्ट असते, असा मनात विचार आणावा.

कधीं कधीं जीं वर्णनें आपल्याला असभ्य, ग्राम्य व अश्लील वाटतात तीं प्राचीनास अयोग्य व निंद्य वाटलेलीं नसतात, हें वर सांगितलेंच. कालमान, रीतरिवाज, शिष्टाचार, नैतिक कल्पना, समाजसुधारणा, इत्यादि बदलत जाणाऱ्या फरकामुळें व सवयीमुळें हा दृष्टिभेद होत असतो. आपलें प्राचीन वाङ्मय अध्यात्मप्रधान आहे आता अशा सौम्य, पवित्र व वैराग्यशील विष यात वरील प्रकारचीं वर्णनें व शिल्पें आपणास कदाचित् जास्तच अनुचित व अप्रयोजक वाटतील पण वस्तुतः पूर्ण आध्यात्मिक दृष्टीचे लेखक व शिल्पकार अशा वर्णनाकडे अगदींच वेगळ्या दृष्टीनें पाहतात. काशी येथें राहणारे श्री शिवशरण या नावाचे हिंदुत्वाची दीक्षा घेतलेले एक फ्रेंच तत्त्वज्ञ, मी त्यास लिहिलेल्या एका पत्राच्या उत्तरात (रोमहून), लिहितात कीं, लौकिक कल्पनास नाकें मुरडण्याचा हा शिष्टाचार हिंदूनीं अलीकडे आधुनिक ख्रिस्ती संस्कृतींतून घेतला आहे. प्राचीन हिंदूची दृष्टि अशी नव्हती.[1]

कामेश्वर आणि कामारी, शृंगार आणि वीर, उत्पत्ति आणि संहार शिव आणि घोर, पुरुष आणि प्रकृति, असे विरोधाभासात्मक अतिशय शिव-रुद्राच्या व शिवलिंगप्रतीकाच्या वर्णनात आढळावेत यात नवल नव्हे

1 "The present attitude in India that sex is unclean, improper, contrary to religion, is, to my belief, an entirely Christian interpretation No trace of this attitude can be found in ancient Hindu books and this, for a good reason, that it is a moralistic and unphilosophical idea completely contrary to the logic of Hindu thought and that when brought to its logical conclusions, it is fundamentally dualistic."

(देवीभागवत, ९।१।११ पहा)

ईश्वर हा सर्व विरोधी धर्मांचा आश्रय आहे ही सगुण द्वंद्वें एका अर्थी विरोधी दिसतात, तरी तीं दुसऱ्या सर्वभावात्मक अर्थी पूरकरण असतात, हें थोडा सूक्ष्म विचार केला असतां पटेल.

शिवलिंग व शक्तिपीठ या प्रतीकासंबंधीं व शिवपार्वतीच्या काही कथासबंधीं अश्लीलतेच्या आक्षेपाबद्दल अनेक प्रकरणात विविधतेनें विचार झालाच आहे. तूर्त येथें इतकेंच सुचवितों कीं, आपण आज ज्यास अश्लील असें मानतों, त्यास प्राचीन लोक अश्लील समजत नसतें. दुसरें असें कीं, शृंगारमंदिरातील अथवा सामान्य बंद केलेल्या शेजघराच्या भिंतीआड होणारे कामुकाचे जे उत्तान शृंगाराचे व त्याहिपलीकडचे आचरट प्रकार नित्य घडत असतील, ते अश्लील म्हणून जर व्यवहारत. तिरस्कृत केले जात नाहीत, तर त्याची बाहेर अश्लील म्हणून निंदा करणें हें एक प्रकारचें शिष्टाचाराचें अवडंबर व ढोंगच म्हणावें लागेतें. शिवाय हें ध्यानीं घ्यावें

१ In the same way all life originates from the organ of procreation and as such it is naturally taken as the emblem of the source of life, of the Divine Creator. Creation and destruction are but the opposites of the same thing. There is therefore nothing surprising in the Phallus being the symbol of the Lord of Destruction. In the traditional symbolism of all countries Love and Death are eveer associated. The Procreator is in all religions represented as the giver of seed. Whether the Christians call him the Father instead of the Phallus. This only places a sentimental image in the place of a technical one. (Shri Shiva Sharan).

२ Every religion being the property of the young and the old, the wise and the foolish, must always be a kind of compromise, and (thus) while protesting against real corruptions and degradations, we must learn to bear with those whose language differs from our own.
*(Physical Religion, p. 203)*.

३ He (the Sadhak) is taught that there is nothing

की, ज्याप्रमाणें एखाद्या दिव्य सिद्ध पुरुषाच्या ठिकाणीं, अथवा सूर्यासारख्या प्रतीकाच्या ठिकाणीं ईश्वरभावना कोणीहि करू शकेल, पण पाषाणाच्या सामान्य ओबडधोबड लिंगयोनिरूप शिवलिंगाच्या ठिकाणीं अथवा पच प्रतीकाच्या ठिकाणीं किंवा उग्र देवतामूर्तींच्या ठिकाणीं तीं करणें यातच उपासनेचें भावनासामर्थ्य कसास लागतें जागतिक सर्व व्यवहारात भगवद्भाव पाहताना त्यात रौद्र, ग्राम्य, अमगल किंवा अश्लील हीं द्रव्यें वगळता येत नाहींत तंत्रशास्त्राचें हें रहस्य आहे जी गोष्ट पतनाला कारण होते असें वाटतें तीच उद्धाराला पण साधन होऊ शकते (यैरेव पतन द्रव्यै सिद्धिस्तैरेव चोदिता ॥ ५।४८ कुलार्णवतंत्र) हें तन्त्रशास्त्राचें एक मुख्य सूत्र आहे यामुळें तान्त्रिकाचें अति गूढ तत्त्वज्ञान उघड उघड लौकिक परिभाषेंतच लिहिलें आहे तें अनधिकारी वाचकास निंद्य व अश्लील वाटतें, पण त्याच्या साऱ्या अश्लील वर्णनात व अमगल सकेतात सारा मगलार्थच लक्षित आहे, हें तज्ज्ञ मात्र जाणतात. कित्येक विरोध हे आभास असतात काळी पोलादी तलवार पाढरी दिसते उलट चिनई चादीवर काळी छाया दिसते क्रूर रणगाजी हे रमणींच्या प्रेमाचे प्यार असतात रणक्दन करणाऱ्या

---

impure in itself in natural functions, though they be made by misuse or abuse the instruments of impurity Here again impurity consists not in the act *per se* but in the way and in the intention with which it is done (Shakti & Shakta, p 334)

१ To a vira (वीरसाधक) all things, acts, and functions done with the right intention may be instrument of worship. + + + If these functions (like मैथुन) are set apart as something common or impure, victory is not easily won There is still some part of his life into which Brahma does not enter and which remains the source of distraction By associating them with religion it is the religious feelings which works first through and then supersedes them He thus gradually attains *divya bhava* and the state of Devata he has worshipped (Shakti & Shakta, p 335)

श्रीरांस कुचमर्दनाचा विषयपालट लागतोच. प्रेमलक्षणाभक्ति आणि विरोधी
कि दोहोंचें आकर्षण सारखेंच असतें. सौंदर्याप्रमाणेंच रौद्रता दृष्टीला थक्क
रते. सद्घन ब्रह्माला शून्याकाश हाच दृष्टांत. ब्रह्मानंदाला मैथुनानंद हीच
पमा. सोन्याला सूक्ष्मतेनें तोलणाऱ्या गुंजा. महात्म्याच्या समदृष्टीला गाय
ाणि श्वान, ब्राह्मण व चांडाळ, विष्ठा व सुवर्ण सारखेंच दिसतें. ज्यांची दृष्टि
ामरूपातीत झाली त्या समदर्शी साधकांना सुंदर आणि कुरूप, मंगल
ाणि अमंगल, श्लील आणि अश्लील कोणतेंहि दृश्य प्रतिबंधक होत नाहीं. अशा
ोणत्याहि दृश्यानें उपासकाची दृष्टि यत्किंचितहि विचलित होतां कामा
ये, ही शाक्तपंथांतील वीर व दिव्य या कोटींतील उपासकाची कसोटी
ासते. मागें एका स्थळीं सांगितल्याप्रमाणें श्रीरामकृष्ण परमहंस एका

१ गीता, ५।१८, ६।२९.

२ (i) That the abstinence from sexual pleasure is 'ery useful for spiritual ends, is emphatically shown n all works on Yoga. But that does not imply that the ›ractice is evil. A merely physical abstention which ›erverts the mind and disorganises the body cannot be ›f any values. ( Shri Shiva Sharan ).

(ii) A great familiarity with sex and its possibilities and images is essential to the Yogi. The man who is healthy and properly fed can fast with peace and profit, not so the half starved who will break down. It s the same with sex, abstinence has to be *conscious and* measured, otherwise the Yogi fails. I heard it *said by* men of great knowledge and saintliness *that they* lost n a day of desire the fruit of months of *patient* labour in Yoga and finally had to give up. This is because their subconscious mind was not clear enough on these matters and is probably one of the main difficulties of those who wish to practice Yoga in this time. If you can not meditate without fear of sex, nay make the sex organ itself the subject of your meditation, how can you ever be freed from it. This is nothing new and

योगिनीजवळ तंत्रसाधना शिकत असता एक तरुण नग्न युवयुवतींचें साक्षात् मैथुनकर्म त्यांच्या माडीजवळ मुद्दाम घडवून आणलेलें पाहून त्यांना भावसमाधि लागली ! त्या उत्कट विषयानंदाच्या प्रतीकात त्यांनी ब्रह्मानंद अनुभविला ! ही अगदीं अलीकडलीच सत्यकथा त्यांच्या महाचिकित्सक शिष्यांनीं त्यांच्या चरित्रात स्पष्ट नमूद केली आहे कोंबड्या कुत्र्याचें उघड उकिरड्यावर होणारें मैथुन आपल्याला अश्लील वाटत नाहीं माणसांचें वाटतें. यात तात्त्विक विचारभेद काहींच नाहीं हा केवळ सवयीचा परिणाम होय. सर्व कर्मेंदियाच्या कर्मांत मैथुनकर्म हें अत्यंत आनंददायक असून प्रजोत्पादन या फलश्रुतीमुळें अत्यंत आश्चर्यकारक, गंभीर व महत्त्वाचें मानलें आहे. या ईश्वरी घटनेंतील दिव्यता जे त्या ठिकाणीं पाहतात, त्यांना त्यात अश्लील असें काहींच वाटत नाहीं. उलट तें उद्धारक होतें आधुनिक जगातील एक सामान्य उदाहरण द्यावयाचें तर पाश्चात्य सुधारलेल्या देशात नग्न समाजाची एक नवीन प्रथा सुरू झाली आहे त्या पथातील स्त्री पुरुषास नग्नतेनें वावरणें यात अश्लील काहींच वाटत नाहीं इतकेंच नव्हे त

elementary a principle that it seems surprising that it may be questioned. ( Shri Shiva Sharan – एक फ्रेंच तत्त्वज्ञ)

१ It is a fact that right sexual union may, if associated with meditation and ritual, be the means of spiritual advance, though persons who take a vulgar and animal view of this function will not readily understand it. The function is thereby ennobled and receives a new significance + + + If the union be legitimate, what I may ask is wrong in this ? On the contrary the physical function is ennobled and divinised. An act which is legitimate does not become illegitimate because it is made a part of worship ( Shakti & Shakta by Sir John Woodroffe, p. 359 )

२ To visit a nudist club is considered a yearly pilgrimage ( p. 28 ) Nudism is the greatest aid to spiritual relaxation I have ever known (p. 164) (The naked truth about nudism by William Welby ).

आध्यात्मिक धारणेला तें पोषक वाटतें. तात्पर्य, अश्लीलता वाटणें हा केवळ संवयीचा परिणाम आहे. स्वरूपतः अश्लील कांहीं नाहीं.

जें मैथुनकर्म कामशास्त्रांतील अत्यंत रहस्यमय विषय असें गणलें जातें, जें विवाह-गर्भाधानादि गंभीर संस्कारांत व त्याहिपेक्षां जास्त गंभीर अशा पुत्रप्राप्तीकरतां होणाऱ्या यज्ञ-याग व अन्य तपादि कर्मांत पुढें गृहीत धरलें जातें, ज्याचा मोह मोठमोठ्या विश्वामित्र, पराशरादि ऋषींनाहि आवरला नाहीं, जें ब्रह्मदेवाच्या अखिल प्राणिसृष्टीचें कारक आहे, ज्या मैथुनक्रियेचीं चित्रें अनेक प्राचीन देवालयावर उघडीं कोरलेलीं दिसतात, व ज्याचा वैदिक वाङ्मयांत उघड उघड उल्लेख आढळतो, त्याला ग्राम्य आणि अश्लील मानलेंच पाहिजे, यास कांहीं सयुक्तिक कारण दिसत नाहीं. सृष्टि ही आनंदांतूनच उत्पन्न होते, आनंदातच स्थित आहे, व आनंदांत विराम पावते. त्या आनंदाचेंच हें एक वैषयिक प्रतीक आहे. वैदिक वाङ्मयांत व अनेक शास्त्रोक्त यज्ञयागादि विधिविधानांत ही मैथुनाची कल्पना, उपमेकरितां, दृष्टांताकरता व अनुकरणाकरतां अनेक ठिकाणीं घेतलेली आढळते. त्याला शिमग्यांतील तमाशाप्रमाणें ग्राम्य व अश्लील मानणें अयुक्तिक वाटतें. किंबहुना असें तें ग्राम्य व अश्लील वाटणें समान्य असतें, म्हणूनच तांत्रिकांच्या वामाचार पंथात त्याची वगळ न करतां त्याचा दिव्य भावनेंत उद्धार करण्याकरतां त्यांस तांत्रिक उपासनेंतच गोंवलें आहे. पण असें असूनहि तंत्रशास्त्रांत या विषयाला गुह्यगोपनत्व दिलें आहे. याचें

१ I do not believe that sexual symbolism in places of worship should be harmful. + + + any more than any other form of symbolism. In fact ancient temples were full of sexual symbols and representations. I do not believe that this indicated a lesser spiritual life among those who built these temples, than that of the hypocrites of to-day, who want them destroyed. Sex is the highest enjoyment man can have, and is as such the natural symbol of divine bliss. ( Shri Shiva Sharan. )

२ Here sexual union takes on the grandeur of a great rite ( यज्ञ ) compared with which the ordinary mere animal copulation to ease desire, whether done grossly,

कारण त्यास अधिकारवादाची मर्यादा न ठेवली तर त्यांत अनाचार व अधः पाताचाच संभव अधिक वाटला. हा तांत्रिक गुह्यगोपनाचा साधनविचार सोडला तरी कित्येक उघड व सोज्वल घटनाहि चिंतनीय वाटतात सृष्टीच्या आरंभापासूनचे बहुतेक देव व ऋषिमुनि विवाहित आढळतात कित्येक ब्रह्मवेत्त्यांनींहि एकेक, दोन-दोन लग्नें करून प्रजोत्पादन केलें आहे यासंबंधीं जनार्दनस्वामी, एकनाथ, तुकाराम, रामदासी–उद्धवसंप्रदायांतील कित्येक हंस, श्रीगोंदिवलेकर, अशीं अनेक उदाहरणें देतां येतील. त्याशिवाय पराशर, विश्वामित्र, श्रीमच्छंकराचार्य, श्रीमच्छेंद्रनाथ अशांच्या कथा अधिक चिंतनीय वाटतात. तात्पर्य, एकाच पूर्ण व्यक्तीचे अथवा उभय लिंगी जीवाचे ब्रह्मदेवानें एकमेकांस पूरक असे हे जे दोन लैंगिक विभाग केले, त्यांतील आकर्षण अत्यंत स्वाभाविक, नैसर्गिक व बहुतांशीं अपरिहार्यहि दिसतें

सत्य हें स्वरूपतः निरावरणच असतें. असें हें नग्न सत्य अश्लील म्हणजे असभ्य नसतें. धर्म व शास्त्र हीं सत्यान्वेषण करणारीं असतात. त्यांत अश्लीलता संभवत नाहीं. अध्यारोपापवादरूप जें प्रकृतिपुरुषाच्या द्वैताचें ऐक्य त्या मिथुनैक्यभावांत श्लील व अश्लील या शिष्टाचारांस अवसरच नसतो. याप्रमाणें उपासनेंतील दिव्य भावांत अश्लीलता उरत नाहीं. धर्मशास्त्रीय कर्मांत अश्लीलता असत नाहीं. उदाहरणार्थ, ऋतुशांति, गर्भाधान हे शिष्टमान्य संस्कार आहेत. यांत पुढेंमागें गृहीत असलेल्या मैथुनकर्माकडे कोणी अश्लील दृष्टीनें पाहत नाहीं. मैथुनकर्माच्या ठिकाणीं वाजपेयाची भावना करून प्रजोत्पादनासाठीं मैथुनकर्म शास्त्रविहित मानलें आहे. या न्यायास अनुसरून आपल्या धर्मशास्त्रांनीं उपासनीय ठरविलेल्या शिवलिंगाच्या ठिकाणीं कोठें कोठें क्वचित् भगलिंगाची कल्पना गृहीत धरली असली, तरी ती कल्पना उपासनेंत ग्राम्यरूप न राहतां तिला दिव्यता देतां येते. कारण ती कल्पना ज्या अव्यक्त अशा पुरुषप्रकृति अथवा शिवशक्ति या तत्त्वांचे संकेत मात्र असतात, त्या युग्मांत जघन्य इंद्रियांचें अस्तित्व व त्यांची अश्लीलता संभवत

shamefacedly or with flippant gallantry, is mean and base. (See Pranatoshini and Tantrasara)

१ बृ. उप. ६।४ पहा.

२ हीच भावना गृहीत धरावी असें नाहीं. दुसऱ्या अनेक उदात्त भावना त्याहून इष्ट आहेतच.

नाहीं. अविनाभूत अशा शिवशक्तींचें मिथुन हें अशरीर, सूक्ष्म, अव्यक्त व दिव्य आहे तें ग्राम्य नव्हे. त्यात द्वद्वाची उगाच कल्पना मात्र आहे कोणताहि धर्म अथवा पथ आपलें उपास्य निंद्य अर्थानें अश्लील किंवा असभ्य कल्पनेचें कसें योजील ? अर्थात् शिवलिंगोपासनेच्या प्रवर्तकाना व शिवलिंगोपासकाना शिवलिंग हें अश्लील व निंद्य वाटत नसलेंच पाहिजे, हें उघड आहे. त्याना तें तसें वाटत नसून आजच्या आक्षेपकाना मात्र तें अश्लील वाटत असेल, तर हा त्याच्याच भावनेचा दोष आहे असें म्हणावें लागतें.

ज्ञान-इच्छा-क्रिया यापैकीं क्रिया अथवा कर्म हें तारतम्यानें जास्त अविद्यात्मक असतें कर्मात आपली आवरणात्मक उपाधि जास्त स्थूल होते. यास्तव कर्मासक्तीचा शास्त्रानें निषेधच केला आहे दोन अरणींच्या मथनांतून निघणारा अग्नि त्या अरणींस जाळून आपणहि शांत व्हावा, त्याप्रमाणें मैथुनक्रियेंत स्त्रीपुरुषाच्या संघर्षांतून उत्पन्न होणारा कामाग्नि त्या स्त्रीपुरुषांस मैथुनांनीं निःक्षिप्त करून आपणहि शांत होतो

जेथें जळावयाचें काहींच राहात नाहीं तेंच वैराग्याचें अथवा शांतीचें भस्म होय त्या निर्द्वंद्वतेच्या व निष्कामतेच्या भस्मानेंच सदा आच्छादित राहणें हें पाशुपतव्रतासारखेंच एक रहस्य मानता येईल. कामदहन केल्यानंतरच्या शिवपार्वती-विलासात अश्लीलता ती काय राहिली ? वस्तुतः शिवपार्वतीची देहाकाररूप कल्पना हें कवीचें उगाच लाघव आहे. त्यातहि निष्कामता हें गृहीत सत्य आहे साधकानें चित्तशुद्धि करून ध्यावयाची ती निष्कामतेचें भस्मरूपच मी समजतों. शिवाय मैथुनक्रियेंतील द्वद्वसामरस्यात जो प्रेमैक्यभाव साधतो तो अनश्लील असतो. तोच रहस्यार्थ उपासनेंत असतो. वस्तुत. स्त्री आणि पुरुष हे एकाच जीवाचे दोन अर्ध आहेत. ते एकजीवरूप होणें हेंच या विषयानदाचें निर्द्वंद्वात्मक रहस्य समजावें. दुसरें असेंच उदाहरण द्यावयाचें तर जीव आणि ईश्वर या दोन सोपाधिक भावाच्या पूर्ण सामरस्यात जी द्वद्वातीत अवस्था प्राप्त होते तें लक्ष्यार्थानें ब्रह्मात्मालिंगनच खरें ध्येय होय.

१ परात्मनस्यास्य शक्तेरतयोरैक्य सदैव हि। अभिन्न तद्वपुर्ज्ञात्वा मुच्यते सर्वे दोषतः॥ ६।१५।४९ देवी भागवत.
सा च ब्रह्मस्वरूपा च नित्या सा च सनातनी ॥ १० ॥ अतएव हि योगीन्द्रे स्त्रीपुभेदो न मन्यते ॥ ११ ॥ दे. भा. ९।१.

स्थूलावरून सूक्ष्माकडे जावें, सगुणाकडून निर्गुणाकडे जावें, सोपाधिकाकडून निरुपाधिकाकडे जावें, ही उपासनेंतील ज्ञानप्रक्रिया दिसते. स्थूलांत जें अज्ञान, भ्रम, कठोरता, ओबडधोबडपणा, अमांगल्य, बीभत्स अथवा अश्लीलपणा भासतो, तो सूक्ष्मांत राहत नाहीं. हत्ती, घोडे, रेडे, बैल त्याचप्रमाणें मानव यांची स्थूल मैथुनक्रिया जशी अश्लील वाटते, तशी लहान किंवा सूक्ष्म प्राण्यांच्या मैथुनांत किंवा वनस्पतींतील स्त्रीपुंकेसराच्या संभोगांत वाटत नाहीं अर्थात् अश्लीलता ही आपल्याच मनाची भावना ठरते. मानवी मैथुनांत अश्लीलता वाटली तरी त्या क्रियेंत उभयतांच्या मनाचें व प्रेमाचें जें रहस्यमय मधुमीलन होतें, तोच त्यांतील हेतुभूत विषयानंद आहे. आणि त्या सूक्ष्म प्रेमैक्यांत अथवा विषयानंदांत अश्लीलता मुळींच वाटत नाहीं. स्थूल व्यवहारांत आपण मूत्रेंद्रियांस लिंगयोनि म्हणतों. पण उपासनेंत त्या स्थूलभौतिक लिंगयोनीचा खालून वर उद्धार होऊन भोग्य आणि भोक्ता, इदंता आणि अहंता अशा सूक्ष्म विचारांत परिवर्तन होतां होतां मूलाधारांतून वर खेचलेलें लिंग हृदयस्थ जें आत्मलिंग त्या अध्यात्मलिंगरूपांत प्रचीतीस येतें, मग त्यांत अश्लीलता संभवत नाहीं.

उपासनेंत जहद् जहल्लक्षणेचें महत्त्व फार असतें. किंबहुना या लक्षणेनेच खरी उपासना संभवते. उपास्याचें प्रतीक व उपासकाचा देह या दोन्ही उपाधींचा बाध करून अंतरंगउपासना संभवते. शिवशक्तीचें अविनाभूत सामरस्य शिश्नयोनिमैथुनद्वारांच शिवलिंगप्रतीकांत दर्शविलें असलें तरी तो प्रतीकांतील स्थूलभाव सोडून शिवशक्तीचें अथवा सगुणनिर्गुणाचें मीलन प्रतीकाचे ठिकाणीं व अहंता इदंतेचें मीलन आपल्या ठिकाणीं मानून त्या द्वंद्वातीत भावनेंत ब्रह्मात्मैक्य किंवा जीवशिवैक्य साधावयाचें आहे असें समजावें.

शिवलिंगांतील उपास्य हें कारणब्रह्म आहे, उपासक हा कार्यब्रह्म आहे. या कार्यकारणभावाचें ऐक्यभावांत विसर्जन हीच उपासनेची प्रक्रिया आहे. कारण हें तत्त्वतः अलिंगच आहे. त्या ठिकाणीं स्त्रीपुरुषभावना संभवतच नाहीं. जो मूळपुरुष तीच मूळमाया आणि जी मूळमाया तोच मूळपुरुष[१].

१. मूळमाया तोचि मूळपुरुष। तोचि सकळांचा ईश। अनंतनामी जगदीश तयासीच म्हणावें ॥ ८।३।२० दासबोध.

(सदैकत्वं न भेदोऽस्ति सर्व दैव ममास्य च। योऽसौ साऽहमहं योऽसौ भेदोऽस्ति मति विभ्रमात्॥ ३।६।२ देवी. भा.)

त्यांचा मिथुनभाव ही उगाच समजुतीपुरती भावना आहे. कारण ब्रह्माच्या प्रतीकांत ती दिसली काय अगर न दिसली काय सारखीच. ब्रह्म+माया आणि मायेंत ब्रह्माचें प्रतिबिंब तोच इदंताप्रधान ईश्वर, तेंच हें जगद्रूप आहे. जग हा एक गुणाकार आहे. बारा या संख्येचे गुणक २×६ किंवा ३×४ असे भिन्न मानतां येतील. बारा या गुणाकाराच्या रूपांत ते व्यक्त नाहींत. उलट क्ष×ज्ञ=क्षज्ञ या बीजगणिताचे गुणाकारांत गुणकांचें द्वैत स्पष्ट दिसतें. या उदाहरणांत, तीन गुणिले चार, क्ष गुणिले ज्ञ किंवा मायेंत ब्रह्माचा प्रतिबिंबरूपानें अनुप्रवेश या परिमापेला मैथुनाच्या कल्पनेची जोड दिली, तर तेवढ्यानें मूळ कल्पनेंत अश्लीलता येते असें म्हणतां येणार नाहीं. त्याचप्रमाणें शास्त्रकारांनीं कांहीं विशेषांचें साधर्म्य पाहून निमित्तोपादानरूप कारणब्रह्माचे ठिकाणीं प्रजोत्पत्तीच्या व्यावहारिक कारणरूप मैथुनाची कल्पना केली असली तरी त्या योगानें दार्ष्टांतील विषयाला निंद्य अश्लीलपणा येण्याचें कांहींच कारण नाहीं. दोन पदार्थांच्या संघर्षांतून अथवा संसर्गांतून तिसरा पदार्थ उत्पन्न होणें हें प्रजोत्पादनाचें मैथुनकर्म हा दृष्टांत सर्वपरिचित व फार सम्यक् वाटल्यामुळें, अरणि मंथनादि निरनिराळ्या याज्ञिक व इतर शास्त्रीय प्रक्रियास तो दिलेला असला, तरी त्यामुळें अभिकरणास अश्लीलता येत नाहीं. त्याचप्रमाणें शिवलिंगप्रतीकाचे ठिकाणीं शिश्नयोनीमिथुनाची भाषा कोणीं वापरली असली, तरी त्या योगानें त्या भाषेंतील ग्राम्यता शिवलिंगाला अगर त्यांतील देवताबुद्धीला चिकटत नाहीं. मुखाला एकदां कमलाची उपमा दिली कीं तीच कल्पना वाढत जाऊन नेत्रांना कमलावरील भ्रमर अशीहि कल्पना करण्यांत येते. पण असें सारूप्य किती दाखवलें तरी कमलाच्या पाकळ्या, केसर, निळा रंग व सुगंध हे कांहीं सारे प्रकार मुखाचे ठिकाणीं पाहावयाचे नसतात. सुंदर कोमलांगीला गजगति व सिंहकटि म्हटलें तरी त्यांत तादात्म्यभाव नसतो. याप्रमाणें विचारसौकर्याकरतां केलेल्या शिवलिंगासंबंधीं कल्पनांचे दार्ष्टांताशीं सर्वांशानें तादात्म्य मानावयाचें नाहीं. जगत्कारणाच्या ठिकाणीं प्रकृतिपुरुष, शिव-शक्ति अशा दंपत्याच्या विलासाच्या कितीहि भावना केल्या तरी त्यानें कांहीं जगत्कारणाचे ठिकाणीं

स्थूल स्त्रीपुरुषाच्या जननेंद्रियांचा मैथुनभाव सिद्ध होत नाही. जगत्कारण भेदातीतच राहतें. मग त्या जगत्कारणाचें प्रतीक जें शिवलिंग तें तसेंच भेदातीत कां मानूं नये? तें भेदातीतच मानलें पाहिजे. भेद हा परिणामी आधारभूत अभेदाचा उपोद्‌बलक होतो, म्हणून उगाच समजुतीकरतां निर्द्वंद्वाच्या ठिकाणीं अगोदर द्वैतभाव गृहीत करावा लागतो. पण शिवलिंगाचे ठिकाणीं तो प्रकृतिपुरुषभेद गृहीत असला, तरी तो लक्ष्मीनारायणाच्या मूर्तीप्रमाणें स्पष्ट नसून प्रकृतिपुरुष अथवा शिवशक्ति त्या ठिकाणीं अविनाभूत आहेत असेंच दर्शविलें आहे. अर्थात् अविनाभूत तत्त्वांत मैथुनादि इंद्रियांचे अश्लील भाव कसे संभवतील? दिव्य म्हणजे पूज्यभावानें भगलिंगात्मक मैथुनाला गुणलें म्हणजे अश्लीलताहि पूज्यता म्हणजे शून्यता पावते.

आतां अश्लील किंवा बीभत्स असें वर्णन ज्या अर्थी आपल्या सांस्कृतिक ग्रंथांत ठिकठिकाणीं आढळतें, त्या अर्थी शिवलिंगोपासनेस अश्लील अतएव निंद्य असें उघड म्हणण्यास संकोच वाटावयास नको, असें जें आक्षेपकांचें म्हणणें आहे, त्याला अनुलक्षून मला असें सांगावेंसें वाटतें कीं, सारे रस आनंदरसातूनच उद्भवतात, त्यांतच ते स्थित असतात व पर्यवसानहि त्यांतच पावतात. मग अश्लील आणि बीभत्स हे रस तरी वेगळे कोठून येणार? असणार व राहणार? एकदां सारीं चित्रें साखरेचीं आहेत इतकें कळल्यावर साखरेच्या कार्ल्यांत कटुता उरत नाहीं. तें कार्लें आहे, तें त्याज्य आहे, हें वर वर पाहणाऱ्या परिच्छिन्न बुद्धीचे भाव अज्ञानद्योतक होत. सारांश, लज्जा, मोह आणि भय अशा कांहीं प्राथमिक मनोविकारांमुळेंच हेयोपादेयता व श्लीलाश्लीलता वाटते, अशी आपली नीट समजूत करून घ्यावी. चतुर्विध पुरुषार्थांत काम हा वगळला नाहीं. न्यासप्रक्रियेंत गुह्येंद्रियें वगळलीं नाहींत. वैद्यशास्त्रानें अश्लीलता मानली नाहीं. अर्थात् शास्त्रकारांना कामशास्त्राचाहि विचार करावाच लागला. सुप्रजाजनन आणि असामान्य दांपत्यसुख हे दोन विषय सृष्टिक्रमांत व व्यवहारांत अत्यंत महत्त्वाचेच आहेत. त्या विषयांचें अगत्य व अनिवारता जर सर्वांनाच पटते तर अश्लील, बीभत्स अशा अनिष्ट भावनांनीं निंदा करीत त्याचें सेवन करण्यापेक्षां त्या स्थूल सहजप्राप्त अनुभवांतून तांत्रिकांप्रमाणें सूक्ष्मसूक्ष्मतर विचार व अनुभव यांचा शक्य तो लाभ संपादणें हेंच इष्ट आहे. श्रीदत्तगुरूंनीं इंद्राला सप्तगाथा सांगितल्या, त्यांत कामशास्त्राच्या अनुशीलनानें क्रममुक्ति

प्राप्त होते असेंच सांगितलें आहे. धर्म, अर्थ, काम हे तीन पुरुषार्थ साधून नंतर ज्ञानानें मोक्षप्राप्ति करून घ्यावी, असेंच वात्सायन मुनि सांगतात. सारांश, शिवलिंग हें शिश्नयोनि मिथुनाचें प्रतीक मानलें, तरी त्यांत अश्लीलता मानण्याचें *कारण नाहीं. किंबहुना साक्षात् शिश्नयोनिमैथुनांतहि स्वरूपतः व व्यवहारतः* निंद्य असें कांहींच नाहीं. शिवलिंगोपासनेचा सुधारकांनीं Phallus worship म्हणून जो व्यर्थ शिमगा चालविला आहे तोच निंद्य आहे!

शिवलिंग हें शिश्नयोनिप्रतीक मानलें तरी उघड उघड जननेंद्रियांचेच आचरट देखावे माजविणाऱ्या पाश्चात्यांच्या (Phallus worship) *जननेंद्रियांच्या उत्सवांपेक्षां आपली शिवलिंगोपासनाच काय,* साक्षात् रतिशास्त्र अथवा कामशास्त्रहि जास्त गंभीर आहे.

आपल्या संस्कृतीचा हा एक विशेष नेहमीं लक्षांत ठेवावा कीं, धर्मशास्त्र, अर्थशास्त्र, वैद्यकशास्त्र, संगीतशास्त्र, कामशास्त्र कोणतेंहि शास्त्र असेना, त्याचें मोक्षपुरुषार्थ हेंच अंतिम ध्येय मानलें आहे. हें पारमार्थिक ध्येयाचें अनुसंधान आपलीं शास्त्रें कधींच सोडीत नाहींत. ही त्यांची समग्र व रहस्यदृष्टि लक्षांत घेतली कीं आपल्या सांस्कृतिक वाङ्मयांत अश्लील व निंद्य कांहींच असणार नाहीं, हें एक गृहीत सत्यच मानावें लागतें. कोणत्याहि ग्रंथाकडे समग्र दृष्टीनें पाहिल्यावांचून लेखकाचें हृद्गत कळत नाहीं. यास्तव आपल्या प्रमाणभूत साऱ्या वाङ्मयाकडे समन्वयाची समग्र दृष्टि ठेवावी म्हणजे गैरसमज राहणार नाहीं. तसेंच मीमांसकांच्या उपक्रमोपसंहार पद्धतीप्रमाणें शिवलिंगोपासनेचें अधिष्ठान कारणब्रह्म आहे व फलश्रुति मोक्ष आहे व या दोन टोकांमधील लिंगार्चनपद्धतीहि अर्थात् तदनुकूलच आहे. हा शुद्ध रहस्याचा विचार मनांत जागृत ठेवला म्हणजे अश्लीलतेचा संपर्कहि आपल्या भावनेस स्पर्श करणार नाहीं.

सारांश, शिवशक्त्युपासनेंत अथवा शिवलिंगोपासनेंत ग्राम्य, रौद्र, अश्लील व अर्वाचीन इत्यादि आक्षेपांस अवसर आहे, असें गृहीत धरूनहि ते आक्षेपक भाव साधकानें कसे निर्विष किंवा निर्दोष करावे याचें किंचित् दिग्दर्शन या प्रकरणांत केलें आहे. पण याचा अर्थ शिवलिंगोपासनेंत हे भाव मानले पाहिजे अथवा हे भाव मुख्य आहेत, असें वाचकांनीं समजूं नये. शिवलिंगोपासनेंत अन्य परम उदात्त भाव आहेत. त्यांसंबंधीं विवेचन ही चिकित्सा

संपल्यावर मगच केलेलें बरें. या प्रकरणात अश्लील लैंगिक भावासंबधीं आक्षेप अथवा सदेहाची जी मळमळ साधकाच्या पोटांत असेल ती त्यानें विवेकानें पचवून त्याच्या अतीत कसें व्हावें हेंच सुचविलें आहे, इतकेंच.

**एवमर्थं च कामं च धर्मं चोपाचरन्नरः।**
**इहामुत्र च निःशल्यमत्यन्तं सुखमश्नुते ॥**

—१।२।४९ वात्सायन कामसूत्र.

**सुविदितपरमार्थः कामशास्त्रस्य विद्वान्, विविधरतिविनोदैः कामिनीनां मनांसि ॥ अनुदिनमनुरागाद्रंजयेद्यः सलीलं, फलमविकलमेवप्राप्नुयान्मान वः सः ॥**

—१।१।६ कल्याणमल्ल रतिशास्त्र.

---

## प्रकरण १६ वें

# विरोधाचा परिहार

**एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा।**
**कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षीचेता केवलो निर्गुणश्च ॥**

—६।११ श्वे. उप.

आतांपर्यंत श्रीशिवलिंगोपासनेसंबधीं विरोधी मतांची चिकित्सा ईश्वरानें जशी करविली तशी केली. त्यांत कटुता, पाल्हाळ, द्विरुक्ति, अपसिद्धांत इत्यादि लेखकोपाधि-प्रमाद कोठें घडले असतील, तर त्याबद्दल ईश्वरानें व वाचकांनीं मला क्षमा करण्याची कृपा करावी. आतां अखेर एकच विरोधाचा परिहार सांगावयाचा राहिला आहे. तो विरोध अथवा संभाव्य आक्षेप म्हणजे शिवलिंगोपासना, शिवलिंगोपासनेवरील हें ग्रंथप्रकाशन व त्या ग्रंथाचें वाचन ह्या गोष्टी आज-उद्याच्या देशकालानुसार असामयिक आहेत हा होय. ही असामयिकता मीं या खंडाच्या भूमिकेंत पूर्वी ध्वनित केलीच आहे. अशा विसंगतींत इष्ट काय व अनिष्ट काय? स्थिर काय व अशाश्वत काय? स्वतंत्र कार्य व परतंत्र काय? आत्मवश काय व परवश काय? हाच विवेक करावा लागेल.

यासंबंधीं एका अर्थी लिहावें तितकें थोडेंच होईल. पण आजउद्यांचा नवयुगाचा काळ, त्यांतील आचारविचारप्रवाह, मानवी जीवन, भारतवर्षाचें वैशिष्टय, आजचें या धर्मभूमीचें निधर्मी राज्य आणि शिवलिंगोपासना यांसंबंधीं अतिव्याप्ति व अव्याप्ति हे दोष टाळून लिहितां येणें कठिण आहे. तथापि तसा समालोचनात्मक या खंडाचा सविस्तर उपसंहार मीं लिहिला होता. पण या शाश्वत उपयुक्ततेच्या ग्रंथांत सद्यःकालीन तात्पुरत्या परिस्थितीवर इतकें तपशीलवार व विस्तृत लिहिणें अप्रस्तुत वाटलें; म्हणून या विरोधपरिहारासंबंधीं कांहीं सारभूत मुद्दे मात्र या प्रकरणांत लिहीत आहें.

या खंडाच्या आरंभींच्या भूमिकेवर निराशावादाची छाया आहे. या प्रकरणांत तत्संबंधीं आशावादाची बाजू थोडक्यांतच दिग्दर्शित करावयाची आहे. शिवाय हेंहि लक्षांत घेणें योग्य आहे कीं, ज्याप्रमाणें धर्मग्लानि हाच ईश्वरी अवताराला योग्य समय असतो, त्याचप्रमाणें अवर्षण, दुष्काळ, सांथीचे रोग, पाखंड इत्यादि आपत्तींच्या काळींच ईश्वरी सहाय्यार्थ शिवलिंगोपासनेचें अगत्य विशेष जाणवतें असा या पूर्वींचा अनुभव आहे. सध्यांचा धर्माचा ऱ्हास ही तर मूलग्राही आपत्ति आहे.

तथापि, अद्यापिहि कांहीं अल्पसंख्य आधुनिकांचे विचार सोडून दिले, तर भारतीय हिंदूंचा बहुजनसमाज सनातनी विचारांसच बहुतांशीं धरून आहे. प्राचीन श्रुतिस्मृतिपुराणेतिहास हें वाङ्मय, त्याचप्रमाणें अर्वाचीन भारतीय संत आणि कवि, त्यांहि अलीकडील श्रीरामकृष्ण परमहंस आणि विवेकानंद, रामतीर्थ आणि लजपतराय, लोकमान्य टिळक आणि महात्मा गांधी, रवींद्रनाथ आणि सुभाषचंद्र, बाबू अरविंद आणि चित्तरंजन दास, रमण महर्षि आणि अनेक आधुनिक संत यांच्या देवधर्मनिष्ठेसंबंधीं सद्विचारांचे भारतीय समाजावरील संस्कार अजून बुजाले नाहींत. त्यांतहि आपल्या आजच्या स्वराज्यसंस्थेचे अध्यक्ष व उपाध्यक्ष हे ईश्वरनिष्ठ व स्वधर्मपरंपरेचे अभिमानी आहेत. तसेंच आपल्या स्वराज्याच्या यापूर्वींच्या गृहमंत्र्यांच्या पुरस्कारामुळेंच आजच्या आपल्या राष्ट्राध्यक्षांच्या हस्तें सोरटी सोमनाथ या ज्योतिर्लिंगाचा नुकताच मोठ्या थाटानें जीर्णोद्धार झाला आहे. ही परिस्थिति आशाजनक आहे आणि म्हणून शिवलिंगोपासनेस आजच्या धर्मग्लानीच्या काळींहि असामायिक न म्हणतां उलट समयोचित म्हणणेंच योग्य ठरतें.

शिवाय, आज जगाकडे पाहिलें तर जगांतील अनेक विचारी थोर पुरुष जास्त अंतर्मुख होत चाललेले आढळतात. जगास शांति देणारी भारतीय संस्कृतीच आहे; आधुनिक राजकारण, प्रागतिकाचा ऐहिक जडवाद व भौतिक विज्ञान हीं जगास शांति देणार नाहींत, असें अनेक तज्ज्ञ आतां म्हणूं लागले आहेत. आज आपल्या देशांत धर्मौदासीन्य, वर्णाश्रमधर्मविरोध, व ऐहिक जडवाद यांचे विचारप्रवाह वरवर सुरू झालेले दिसत असले, तरी परदेशांतील कित्येक सुज्ञांस भारतीय संस्कृतींतील अध्यात्मविद्या, धर्मशिक्षण, जन्मसिद्ध जातिव्यवस्था, बालविवाहादि प्रथा या गोष्टींचें समाजधारक महत्त्व चांगलेंच जाणवूं लागलें आहे. तसेंच समाजाच्या शीलसंवर्धनासाठीं धर्मशिक्षण अवश्य आहे, त्यासाठीं कायद्याची दंडनीति अयुक्तिक व अपुरीच ठरते, असेहि विचारप्रवाह जगांत सुरू झाले आहेत; आणि जगातील कित्येक थोर पुरुष विश्वशांतीसाठीं विश्वधर्माच्या कल्पनेचा पुरस्कार करीत आहेत. या सर्वांचा इष्ट परिणाम आजच्या कित्येक आधुनिक भारतीय समाजसुधारकांच्या बहिर्मुख व उच्छृंखल वृत्तीवर थोडाफार झाल्यावाचून राहणार नाहीं.

जगाचा एकच एक विश्वधर्म होणें हें पुढें व्यवहार्य ठरो न ठरो, ज्या अर्थी आज जगांतील अनेक थोर पुरुष त्या विचारांत आहेत असें दिसतें, त्या अर्थी हेंहि येथें सांगावेंसें वाटतें कीं, अशा विश्वधर्मांत शिवलिंगोपासना ही एकच एक योग्य परमार्थसाधनरूप होईल. याचीं थोडक्यांत कारणें अशीं सांगतां येतील.

(१) प्राचीन काळीं साऱ्या जगभर शिवलिंगोपासना रूढ होती.

(२) सृष्टीच्या आरंभापासूनची ती श्रेष्ठ व तात्त्विक उपासना आहे.

(३) एका शिवलिंगाला मात्र धूतपापेश्वर, विश्वेश्वर, सिद्धेश्वर, याप्रमाणें प्रतीकरूपात ईश्वर ही संज्ञा आहे. ईश्वर साऱ्या जगाचा एकच एक आहे हें सर्व धर्म मानतात.

(४) शिवलिंग हें अप्रतीम व अरूप असल्यामुळें त्याचा दुसऱ्या कोणत्याहि ध्येयरूप अथवा आलंबनरूप धार्मिक प्रतिमेशीं व प्रतीकाशीं विरोध नाहीं.

(५) शिवलिंगानें निदर्शित होणारी शिवशक्ति यांत आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक सर्व शास्त्रें व सर्व सामर्थ्यें अंतर्भूत होतात. शिवशक्ति हेंच विश्वाचें ऐश्वर्य होय. तेंच तत्त्वतः कोणत्याहि धर्मातील ईश्वराचें *सगुणरूप* होय.

(६) ज्यानें पाषाणाच्या शिवलिंगांत उपासनाद्वारां ईश्वर पाहिला, त्याला सर्वत्र ईश्वर दिसेल.

(७) शिवलिंगोपासना म्हणजे ईशशक्त्युपासना होय.

(८) शिवशक्त्युपासनेविना विश्वधर्म अर्थशून्य ठरेल. कारण ती जगत्कारणाधीश्वराची उपासना आहे.

(९) शिवलिंगोपासना ही अत्यंत साधी व सोपी आहे. हेंच श्रीकर–कण्णप–नंदादि शिवभक्तश्रेष्ठांनीं सिद्ध केलें आहे.

(१०) आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीर गृह ।
पूजा ते विषयोपभोग रचना निद्रा समाधिस्थितिः ॥
संचारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो ।
*यद्यत्कर्म करोति तत्तदखिलं शंभो तवाराधनम् ॥ ४ ॥*

ही धर्मभेदनिरपेक्ष तात्त्विक शिवमानसपूजा अथवा ईश्वराची अंतर्मुख उपासना साऱ्या जगाचा उद्धार करील.

(११) याप्रमाणें हिंदूंचाच काय अनेक अहिंदूंचा उद्धार शिवबोध करील. ज्याच्या कृपेनें देव, दैत्य, राक्षस, यक्ष, गंधर्व, किन्नर, दानव, मानव, भूत, प्रेत, पिशाच्च अशा सर्व योनींचा उद्धार होतो, तो जगत्कारण मायामहेश्वर साऱ्या विश्वाचा एकच एक देवाधिदेव महादेव होय.

आतां या खंडांतील यापूर्वींची शिवलिंगोपासनेसंबंधीं माहिती आणि चिकित्सा वाचून कोणी नवीन शिवोपासक बनेल असें नाहीं. त्यासाठीं वैराग्य आणि अभ्यासपूर्वक एकनिष्ठेनें प्रत्यक्ष उपासनाच हातून घडली पाहिजे. म्हणून शिवलिंगोपासनेंतील योगरूप कर्म, भक्ति आणि ज्ञान या त्रिकांडांतील *सारभूत मुद्द्यांचें किंचित् दिग्दर्शन अखेरच्या साधनसार खंडांत करण्याचें* योजलें आहे.

वस्तुतः हा शेवटला साधनसार खंड जितका विस्तृत लिहावा तितका थोडाच आहे. पण स्थलाभावास्तव साधनरहस्याचें सार थोडक्यात सूचित करण्यापलीकडे मला अधिक कांहीं करतां येत नाहीं. शिवाय शिवलिंगोपासनेचा प्रत्यक्ष साधनमार्ग साधकांनीं श्रीसद्गुरु व सच्छास्त्र यास शरण जाऊनच अवलंबिला पाहिजे. तें मार्गदर्शनाचें महत्कार्य या ग्रंथाच्या कक्षेच्या व अधिकाराच्या बाहेरचें आहे. असो.

**करविली तैशी केली कटकट । वांकडें कीं नीट देव जाणे ॥ ४ ॥**
**कोणा कारणें हें जालेसें निर्माण । देवाचें कारण देव जाणे ॥ २ ॥**
— तुकाराम

## लिंगाष्टकम्

श्रीगणेशायनमः । ब्रह्ममुरारिसुरार्चितलिंगं निर्मलभासित शोभितलिंगम् । जन्मजदुःखविनाशकलिंगं तत्प्रणमामि सदाशिवलिंगम् ॥ १ ॥ देवमुनिप्रवरार्चितलिंगं कामदहं करुणाकरलिंगम् । रावणदर्पविनाशनलिंगं तत्प्रण० ॥ २ ॥ सर्वसुगंधि सुलेपितलिंगं बुद्धिविवर्धनकारणलिंगम् । सिद्धसुरासुरवंदितलिंगं । तत्प्र० ॥ ३ ॥ कनकमहामणि भूषितलिंगं फणिपतिवेष्टित शोभितलिंगम् । दक्षसुयज्ञविनाशवलिंगं । तत्प्र० ॥ ४ ॥ कुंकुमचंदनलेपितलिंगं पंकजहार सुशोभितलिंगम् । संचित पाप विनाशनलिंगम् । तत्प्र०॥ ५ ॥ देवगणार्चित सेवित लिंगं भावैर्भक्तिभिरेवच लिंगम् । दिनकरकोटि प्रभाकरलिंगं । तत्प्र० ॥ ६ ॥ अष्टदलोपरिवेष्टितलिंगं सर्वसमुद्भवकारणलिंगम् । अष्टदरिद्र विनाशितलिंगम् । तत्प्र० ॥ ७ ॥ सुरगुरु सुरवरपूजितलिंगं सुरवनपुष्पसदार्चितलिंगम् । परात्परं परमात्मकलिंगम् । तत्प्र० ॥ ८ ॥ लिंगाष्टकमिदं पुण्यं यः पठेच्छिवसन्निधौ । शिवलोकमवाप्नोति शिवेन सह मोदते ॥ ९ ॥ इति श्रीलिंगाष्टकस्तोत्रं संपूर्णम् ॥

द्वितीय खंड समाप्त

# ( ३ ) साधनसार खंड

प्रकरण १ लें

## मंगल

ॐ नमस्ते गणपतये ॥ त्वमेव प्रत्यक्षं तत्त्वमसि ॥ त्वमेव केवलं कर्तासि ॥ त्वमेव केवलं धर्तासि ॥ त्वमेव केवलं हर्तासि ॥ त्वमेव सर्वं खल्विदं ब्रह्मासि ॥ त्वं साक्षादात्मासि नित्यम् ॥ १ ॥
—अथर्व०

हरिः ॐ नमस्ते रुद्र मन्यव उतो त इषवे नमः । नमस्ते अस्तु धन्वने बाहुभ्यामुत ते नमः ॥ १ ॥ —रुद्र.

ॐ ब्रह्मवादिनो वदन्ति — किं कारणं ब्रह्म कुतः स्म जाता, जीवाम केन क च संप्रतिष्ठाः । अधिष्ठिताः केन सुखतरेषु वर्तामहे ब्रह्मविदो व्यवस्थाम ॥ १ । १ ॥ + + + यस्य देवे पराभक्तिर्यथा देवे तथा गुरौ । तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः प्रकाशन्ते महात्मनः ॥ —६ । २३ ॥ श्वे. उप.

विश्वेश्वर विरूपाक्ष विश्वरूप सदाशिव । शरणं भव भूतेश करुणाकर शंकर ॥ —ऋ. प.

प्रपद्ये देवमीशानं शाश्वतं ध्रुवमव्ययम् ।
महादेवं महात्मानं सर्वस्य जगतः पतिम् ॥ —वायुपुराण १।२.

नमो रुद्राय हरये ब्रह्मणे परमात्मने ।
प्रधान पुरुषेशाय सर्ग स्थित्यंतकारिणे ॥ —लिंगपुराण १।१.

आद्यन्त मंगलमजातसमानभावमार्यं तमीशमजरामरमात्म देवम् । पंचाननं प्रबलपंचविनोदशीलं संभावये मनसि शंकरम-म्बिकेशम् ॥ —शि. पु. वि. १।१.

यस्याज्ञया जगत्स्रष्टा विरञ्चिः पालको हरिः ।
संहर्ता कालरुद्राख्यो नमस्तस्मै पिनाकिने ॥ —स्कंद मा. के. के. खं.

त्रयी सांख्यं योगः पशुपतिमतं वैष्णवमिति
प्रभिन्ने प्रस्थाने परमिदमद: पथ्यमिति च ।
रुचीनां वैचित्र्यादृजुकुटिल नाना पथ जुषां
नृणामेको गम्यस्त्वमसि पयसामर्णव इव ॥ ७ ॥ —महिम्न.

अहं निर्विकल्पो निराकाररूपो विभुत्वाच्च सर्वत्र सर्वेन्द्रियाणाम् ।
न चासङ्गतं नैव मुक्तिर्नमेयश्चिदानन्दरूपः शिवोऽहं
शिवोऽहम् ॥ ६ ॥ —निर्वाणषट्कम्.

विषयप्रवेश:— चिकित्सेची वाटाघाट सपली. आतां ज्याच्यासाठीं ही चिकित्सा केली, त्या साध्याच्या साधनगृहाशीं आपण आलों आहोंत. आजच्या *बुद्धिवादी जगांत तत्त्वचिकित्सक पुष्कळ आहेत. जी फार मोठी उणीव* सर्वत्र जाणवते, ती पारमार्थिक अनुभवाची होय. त्यासाठीं साधनाच्या अनुष्ठानाची फार गरज असते. पैशाशिवाय नुसती तिजोरी, सौभाग्यतिलकावाचून सौंदर्य, मिठावीण स्वयंपाक, प्राणावांचून शरीर जसें व्यर्थ, त्याप्रमाणें शिवानुभवावांचून नुसती शिवलिंगोपासनेची चर्चा व्यर्थ होय. हेंहि पुन्हां परोक्षशब्दांनींच या खंडांत सांगावयाचें आहे. त्यास निरुपाय आहे.

आजकाल मानवास आपल्या वास्तविक ध्येयासंबंधीं भूल पडली आहे. मानवाच्या ध्येयसाधनेंत परंपरेचें अनन्यसाधारण महत्त्व आहे त्या आपल्या *अति प्राचीन व विश्वमान्य परंपरेलाच हिंदुधर्म संस्कृति असें म्हणतात.* त्या संस्कृतीचें एकमेव ध्येय भगवत्प्राप्ति हें आहे. त्या शिवभगवानाचीं लक्षणें सत्, चित् आणि आनंद हीं तीन आहेत. आणि कर्मकांड, ज्ञानकांड व भक्तिकांड हीं तीन त्या तीन लक्षणांचीं परिचायक साधनें शास्त्रांत सांगितलीं आहेत. याशिवाय योग हें शैवधर्माचें मुख्य लक्षण मानतात. योग हें जसें स्वतंत्र साधन आहे, त्याप्रमाणें योग म्हणजे चित्तवृत्तिनिरोध हें योगाचें मुख्य अंग वरील तिन्ही साधनमार्गांत लागतें किंवा आपोआप साधतें असें म्हणतां येईल.

या मुख्य परमार्थसाधनांच्या वर्गीकरणाला अनुसरून हा साधनसार खंड सारांशरूपानें रचला आहे. पण सत्त्व, रज आणि तम हे मायेचे गुण नसे

स्वतंत्र कोठेंच असूं शकत नाहींत. त्यांचें कमजास्त प्रमाणांत मिश्रण आढळतें, त्याचप्रमाणें या साधनत्रयीसंबंधीं म्हणतां येईल. त्याचप्रमाणें परमात्म्याचे सत्, चित् व आनंद या लक्षणांसंबधींहि म्हणावें लागतें. जेथें एक प्रधानत्वानें असतें तेथें दुसरीं दोन्ही पण अप्रकट असतातच. म्हणजे ज्ञानावांचून कर्म नाहीं, कर्मावांचून ज्ञानमार्ग नाहीं व ज्ञानकर्मावांचून भक्तिमार्ग नाहीं. अशी वस्तुस्थिति असल्यामुळें या खंडांतील कोणत्याच साधनास केवळ ज्ञान, केवळ भक्ति अथवा केवळ कर्म अथवा केवळ योग म्हणतां येणार नाहीं. देव आणि धर्म हे या साधनमार्गाचे मुख्य सेतु असल्यामुळें त्यांचाहि विचार आरंभीं केला आहे. या सार खंडांतील कित्येक मूळचीं हस्तलिखित प्रकरणें चिकित्सापूर्ण आहेत. पण आतां त्यास स्थलावकाश राहिला नाहीं, म्हणून यापुढें चिकित्सा शक्य तों टाळली आहे.

तसेंच " साधनानां अनेकता । " असें हिंदुधर्माचें जरी लक्षण आहे तरी त्या अनेक साधनांचा विचार या प्रकरणांत करतां येणें शक्य नाहीं. यज्ञ-याग, मांत्रिक व तांत्रिक पुरश्चरणें व शवसाधनादि साधनें, उपोषणें व देहदंडणें, पंचाग्निसाधन व होमहवन, बलिदानें व अन्नसंतर्पणें, काम्निक अनुष्ठानें आणि विविध व्रतवैकल्यें, इत्यादि साधनांचे विविध प्रकार व उपप्रकार आहेत. एका भक्तिमार्गांत किती तरी प्रकार आहेत. कर्ममार्गांत अनेक प्रकार आहेत. योग अनेक आहेत, या सर्वांचा नुसता उल्लेखहि या प्रकरणांत करतां येणें शक्य नाहीं. या साधनांच्या अति विस्तृत पसान्यापैकीं मी सारभूत अंशमात्र या प्रकरणांत सांगणार आहें; आणि तोहि कोणत्याहि परमार्थ-साधनाचें अनुष्ठान प्रत्यक्ष कसें करावें त्या तपशिलाची सर्व माहिती येथें देण्याचा हेतु नाहीं. साधनाचें स्थूल स्वरूप व त्यांतील युक्तिवाद यांचें किंचित् दिग्दर्शन मात्र येथें करणार आहें. याचें कारण इतकेंच कीं, परमार्थांतील केवळ शाब्दिक तत्त्वज्ञानानें परमार्थलाभ घडतोच असें नाहीं. त्यास कोणत्या तरी साधनाच्या अनुष्ठानाची गरज असते असें साधनाचें अनन्य-साधारण महत्त्व आहे हें या शिवलिंगोपासना ग्रंथांत सांगणें अवश्य आहे.

**मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये ।**
**यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥** —७।३ गीता.

---

## प्रकरण २ रें

# हिंदुधर्म संस्कृति

एको देवः सर्व भूतेषु गूढः । सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा ।
कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः । साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥
—६।११ श्वे. उप.

धर्मो विश्वस्य जगतः प्रतिष्ठा ॥ —महानारायण उप. १७।६.

धर्मार्थकाममोक्षाख्यं य इच्छेच्छ्रेय आत्मनः ।
एकमेव हरेस्तत्र कारणं पादसेवनम् ॥ —४।८।४१ भागवत.

आर्षं धर्मोपदेशं च वेदशास्त्राऽविरोधिना ।
यस्तर्केणानुसंधत्ते स धर्मं वेद नेतरः ॥ —१२।१०६ मनु.

न साङ्ख्यं न शैवं न तत्पाञ्चरात्रं
न जैनं न मीमांसकादेर्मतं वा
विशिष्टानुभूत्या विशुद्धात्मकत्वात्
तदेकोऽवशिष्टः शिवः केवलोऽहम् ॥ ४ ॥
—श्रीमच्छंकराचार्यकृत दशश्लोकी स्तोत्र.

**संस्कृति आणि धर्मः**—संस्कृति आणि धर्म यांत कोणी असा भेद मानतात कीं, धर्म हा केवळ शास्त्रैकसमधिगम्य असतो. संस्कृतींत शास्त्राशीं अविरोधी असणाऱ्या लौकिक कर्मांचाहि समावेश होतो. या रीतीनें विचार करतां संस्कृति धर्माहून व्यापक ठरते. पण तत्त्वतः धर्म हा संस्कृतीहूनहि व्यापक आहे असें म्हणतां येईल. कारण धर्माला तत्त्वज्ञानाचें सूक्ष्म व व्यापक स्वरूप आहे. संस्कृति म्हणजे संस्कार अथवा सम्यक् क्रियाविशेष असें कोणी म्हणतात. कोणी धर्म आणि संस्कृति एकच मानतात. निदान हिंदुधर्म संस्कृतीचें तसें म्हणतां येईल. मात्र आधुनिक पुढाऱ्यांची ध्येयरूप जी अखिल हिंदुस्थानी मिश्र अथवा संकर संस्कृति तिला संस्कृति म्हणणेंच

फोल आहे. सकर म्हणजे संस्कृति नव्हे व सुधारकांचा तथाकथित उदार धर्महि धर्म नव्हे. तो अधर्मच होय. " स्वधर्मे निधनं श्रेयः परधर्मो भयावहः। " हा हिंदूंचा शास्त्रसिद्धान्त आहे. वैदिक संस्कृतिरूप भूमि, हिंदुधर्मस्वरूप वृक्ष व शैव-वैष्णवादि संप्रदाय म्हणजे त्या वृक्षाच्या व्यक्तिगत शाखा होत. धर्म एक, त्यांतील देवता व साधनें अनेक. असे भेद असले तरी हिंदुधर्माचें साध्य एकच आहे.

**हिंदुधर्म संस्कृति**:—लौकिक, पारलौकिक, धार्मिक, आध्यात्मिक, आर्थिक, राजनैतिक, अशा सर्वांगीण अभ्युदयाला व निःश्रेयसाला उपयुक्त अशा ज्या देहेंद्रिय, मन, बुद्धि, अहंकाराच्या भूषणभूत सम्यक् क्रिया तिला संस्कृति असें कोणी म्हणतात. आध्यात्मिक, आधिदैविक, आधिभौतिक व आधियाज्ञिक अशा चतुर्विध दृष्टींनीं आपल्या श्रुतिस्मृतिपुराणेतिहासरूप वाङ्मयांत जीं अनेक दिव्य सूक्तें, सूत्रें, आख्यानकें, सुभाषितें व विधिविधानें आहेत, तींच हिंदुधर्म संस्कृतीचीं मुख्य गमकें आहेत. अर्थात् हिंदुधर्म संस्कृति अनादि परंपरागतशास्त्र व अनुभव यांच्या सम्यक् संस्कारांवर अधिष्ठित आहे. त्यांत प्रपंच-परमार्थ, आचार-विचार यांत सामंजस्य आहे. हिंदुधर्म संस्कृति एक प्रकारें स्वयंभू आहे. मनुष्यानें आपल्या बुद्धीनें कृत्रिम बनवलेली नाहीं. बुद्धिजन्य शिष्टाचार परिवर्तनशील असतात. जिची दृष्टि अंतर्मुख आहे, जिला आधिभौतिकापेक्षां अधिदैव व अध्यात्म यांचें जास्त महत्त्व आहे, तिलाच भारतीय संस्कृति असें म्हणावें. ती अध्यात्मप्रधान संस्कृति दिक्कालातीत आहे आणि म्हणून ती परिवर्तनशील नाहीं. वैदिकवर्णाश्रमधर्मसंस्कृति हीच आजच्या हिंदूंची नित्य संस्कृति होय. नवमतवाद, रशियन साम्यवाद, समाजसत्तावाद, भौतिक अभ्युदयवाद, मानवतावाद, उदारमतवाद, भौतिक विज्ञानवाद, जन्मसिद्धजातपातनिरपेक्ष, संकरवाद इत्यादि बौद्धिक प्रणाली शाश्वत सुखाला कारण नाहींत.

**प्रामाण्यविचार**:—हिंदुधर्म संस्कृति हा समग्र विषय या प्रकरणांत न सामावण्याइतका व्यापक आहे. पण तो मूलाधार असल्यामुळें वगळतां येत नाहीं. हिंदु संस्कृति म्हणजे हिंदूंचें समग्र इहपर लोकींचें जीवन होय. हिंदुधर्म म्हणजे पाताळापासून ब्रह्मलोकापर्यंत आणि स्थिरजंगमकोटीपासून ईश्वरकोटीपर्यंत उभा असणारा मळसूत्राप्रमाणें सोपान मार्ग आहे. हिंदुधर्म म्हणजे

केवळ अभ्युदयकारक व समाजधारक धर्म नव्हे तर जीवशिवैक्य जोडणारा जो मध्यस्थ सेतु तो हिंदुधर्म होय हिंदुधर्म म्हणजे कोणा एका अगर अनेक प्राचीन महापुरुषांची मतमतांतरें व विधिविधानें असें नव्हे हिंदुधर्म हा अपौरुषेय आहे इहलोकींच्या कोणाहि महापुरुषानें तो रचलेला नाहीं. हिंदुधर्म हा प्राधान्यानें व्यक्तिनिष्ठ आहे व्यक्तिजीवाचें आपल्या ब्रह्मात्मस्वरूपासबंधीं अज्ञान दूर करणें हेंच त्याचें मुख्य उद्दिष्ट आहे. "स्वरूपीं राहाणें हा स्वधर्म" असें श्रीरामदास म्हणतात. दु.खाची अत्यंत निवृत्ति व निरतिशयानदाची नित्यप्राप्ति ही त्याची दिव्य फलश्रुति आहे. श्रोत्रिय व ब्रह्मनिष्ठ अशा सद्गुरूची प्रचीति, श्रुत्यनुकूल शास्त्रप्रचीति व सदसद्विवेकबुद्धीची आत्मप्रचीति मिळून हिंदुधर्माचें प्रामाण्यरहस्य होय. आपण आपल्या धर्माचें पालन करावें म्हणजे तो आपलें धारणपोषण करतो, असा आपला स्वधर्माशीं अन्योन्य संबंध आहे आजवर धर्मानेंच जगाची हानि केली आहे असें मानणं हा अत्यत अविचार आहे

**धर्माची उपपत्ति** :— कायदा हा मनुष्यकृत असतो, धर्म हा मनुष्यकृत नसतो, अशीच सर्वत्र समजूत दिसते. ईजिप्त, बाबिलोनिया, चीन, हिंदुस्थान, अमेरिका इत्यादि देशांतील प्राचीन धर्मांच्या उगमाकडे पाहिलें तर तो उगम पितृपूजेंत झालेला आढळतो असें कोणी म्हणतात. आर्यांच्या काहीं धर्मांचा उगम निसर्गशक्तींच्या मागें देवता आहेत या समजुतींत आढळतो अशी काहींची समजूत दिसते याशिवाय तिसरी एक श्रेष्ठ अध्यात्मदृष्टि आहे. त्या दृष्टीनें धर्माचा उगम इंद्रियातीत अंतर्मुख वृत्तींत आहे असें आढळतें कारण वेदाचे मन्त्रद्रष्टे ऋषि किंवा इतर धर्मांचे संस्थापक व प्रणेते याना त्यांच्या अतर्मुखवृत्तींतच अनेक कल्पनापरंपरेच्या प्राचीन धर्मांचीं मूलतत्त्वें प्रतीत झालीं असें दिसून येतें.

**नियाम्यनियामक** :— आपल्या हिंदूंच्या प्राचीन धर्मशास्त्रांत अध्यात्मज्ञानराज्याचे संचालक ऋषि, अधिदैव कर्मराज्याचे संचालक देवतागण, आणि अधिभूत स्थूल राज्याचे संचालक नित्यपितर, हे उपासनीय मानले आहेत. वस्तुत' हे तीन नियामक वर्ग ज्याचे प्रतिनिधि असा एकच एक कारणाधीश मुख्य उपासनीय होय सारी सत्ता, सारें ज्ञान व निरतिशय आनद तसेंच सारें कर्तृत्व व भोक्तृत्व आणि त्याचें अधिष्ठान व उपादान

एकच ब्रह्म आहे. कोणी त्यास समन, सगुण, सक्रिय, सदाशिव म्हणतात. कोणी त्यास उन्मन, निर्गुण, निष्क्रिय परमशिव म्हणतात.

**जीवशिवैक्य** :— या एकच एक उपादानाधिष्ठानाचे अंश अगर विवर्त आपण सारे आहोंत. या भावनेंतच हिंदूंचे सारे धर्म, न्याय, नीति यांचे धागेदोरे विणले गेले आहेत. ईश्वराच्या समष्टि मनाशींच सारें जग जोडलें गेलें आहे. जीवजगताच्या बाह्य स्थूल विशेष भावांत जरी असंख्य भेद असले तरी सर्वांच्या बुडाशीं असलेल्या अधिष्ठानस्वरूप सशक्तिक शिव या सूक्ष्म तत्त्वांत ऐक्य असल्याचें प्राचीनांनीं जाणलें आहे. जीव व शिव यांत स्थूल दृष्टीनें जमीनअस्मानाचें अंतर असलें, तरी जीव हा अंतर्यामीं ह्या अंशत्वानें शिवरूप आहे, हा प्रथमपरोक्ष विचार व मागून त्याचा अपरोक्ष अनुभव प्रज्ञावंत योग्यांच्या प्रतीतीस आलेला आहे. हेंच एकंदरींत धर्माचें आद्यंत स्वरूप आहे. स्वामी विवेकानंद म्हणतात :— Religion is the manifestation of the Divinity already in man. म्हणजे मानवाच्या ठिकाणीं अव्यक्त असलेल्या शिवतत्त्वाचें प्रकटीकरण यास धर्म म्हणतात.

हें धर्माचें स्वरूप जसें अगदीं स्वाभाविक आहे तशी त्यासंबंधीं अंतःप्रेरणा पण नैसर्गिक व अनिवार्य आहे. आपल्या मूळ स्वरूपाकडे जाणें ही जी प्राणिमात्राच्या ठिकाणची नैसर्गिक ज्ञाताज्ञात ओढ, तेंच धर्माचें बीज आहे. ' शिवो भूत्वा शिवं भजेत् ' हाच शैवधर्म होय.

**सामान्य विशेषभाव** :— जाति आणि व्यक्ति या प्राण्यांतील भेदांप्रमाणें सामान्य आणि विशेष हे सापेक्ष भाव आहेत. अर्थात् कोणताहि सामान्य धर्म हा त्याहून मोठ्या सामान्यांतील एक विशेष धर्म असतो. तसेंच कोणताहि विशेष धर्म त्याहून लहान विशेषांचा सामान्य-धर्म असूं शकतो. प्रत्येक वस्तुमात्रांतील विशेष धर्म हेंच त्या वस्तूला तें विवक्षित स्वरूप देणारें अदृष्ट असतें. माणसापासून तों त्याच्या शरीरांतील सूक्ष्मातिसूक्ष्म जीवाणूंपर्यंत, त्याचप्रमाणें प्रचंड खगोलांपासून तों अणु, परमाणु अथवा धन-ऋण विद्युत्कणांपर्यंत सर्वांच्या पोटांत त्यांचा त्यांचा

१. Religion is the greatest motive power for realising that infinite energy, which is the birth-right and nature of every man. (Vivekananda).

विशेष धर्म अदृष्टरूपात असतो. तोच धर्म तीं तीं विशेष रूपें धारण करतो. तो धर्म सुटला की तीं तीं विशेष रूपें पण लयास जातात. प्रत्येक विशेषभाव त्याच्या सामान्य भावाशीं ऋणानुबंधी असतोच. उदाहरणार्थ, प्राणी, माणूस, पुरुष, हिंदु, ब्राह्मण, महाराष्ट्रीय, कोंकणस्थ, पुरुष, स्त्री, बालक, यांतील प्रत्येक विशेषभाव त्याच्या वरच्या वरच्या सामान्य भावाचा अंशभूत व नियम्य आहे. जें महासामान्य दुसऱ्या कोणत्याहि सामान्याहून मोठें असतें तें परमशिवाचें रूप होय. त्या परमशिव सामान्याशीं जीवविशेषांचे जे ऋणानुबंधी नियम्य नियामकादि संबंध त्यालाच धर्मसंस्कृति म्हणतात.

**विशेष धर्मांचें अगत्य :—** प्राणी या सामान्य भावाप्रमाणें "जीवो जीवस्य जीवनम्" हें अनुसरण शक्य तों कमी करणें हा विशेष दयाशील मानवताधर्म आहे. मानवता या सामान्य भावांत हिंदूंनीं आपला वर्णाश्रम धर्म पाळणें हा त्याचा विशेष धर्म होय. सनातन वर्णाश्रम धर्माच्या सामान्य भावांत देशाचार, कुलाचार, शैव, वैष्णवादि संप्रदाय, गुरुसंप्रदाय, जन्मजाति-संस्कार कौटुंबिक संबंध तसेंच देशकालनिमित्त इत्यादींसंबंधीं विशेष धर्म पाळावेच लागतात. ते जर न पाळावे तर तो अधर्म होईल.

परंपरागत व रूढिप्रधान धर्मांना संकुचित मानून त्यांचा तिरस्कार करणें ही चूक आहे. वस्तुमात्र अथवा व्यक्तिमात्र यांच्या स्वत्वाचें रक्षण करणें हेंच धर्माचें लक्षण आहे. तोच धर्म पुरुषार्थ होय. जगांतील असंख्य पदार्थांनीं जर आपआपले स्थूल-सूक्ष्म विशेष धर्म सोडून दिले, तर जग-प्रलयाची स्थिति येईल. गुणांची साम्यावस्था म्हणजे प्रलय होय. कोणत्यादि जड द्रव्याचे परमाणूहि आपले विशेष धर्म सोडीत नाहींत, तोंवरच त्या द्रव्याचें स्वरूप टिकतें. मानवतावादाच्या मोहात हिंदूंनीं आपलें हिंदुत्व गमावणें व ब्राह्मणांनीं आपली वर्णाश्रमांचीं व्यावर्तक कर्तव्यें सोडणें हा अधर्म आहे. अधर्मालाच पातक म्हणतात व त्याचें सवडतर प्रायश्चित्त भोगावेंच लागतें. प्रत्येक देशाचें एकेक विशेष लक्षण असतें. उदा०, ग्रीसचें सौंदर्य, रोमचा कायदा त्याचप्रमाणें हिंदुस्थानचें विशिष्ट लक्षण धर्म हेंच आहे. ती धर्मनिष्ठा आहे तोंवरच हिंदु व हिंदुस्थान यांचें अस्तित्व वास्तविक अर्थानें मानता येईल.

**भेदाभेद :—** निरुपाधिक परब्रह्म हेंच काय तें एक सम आहे. त्या ठिकाणीं

कोणताच भेद अथवा द्वैत राहत नाहीं. सारे भेदभाव निःशेष सोडावे, तेंव्हांच ब्रह्मानुभव येतो. पण ही परमार्थता नुसती भेदातीत नाहीं. तर ती भेदाभेदातीत आहे. हें सूक्ष्म रहस्य फार महत्त्वाचें आहे. अभेद ही भावना सोपाधिक भेदसापेक्ष आहे. शुद्धनिरपेक्ष अखंड एकरसतेंत अभेद या भावनेला हेतु उरत नाहीं. भेदाभेदातीत अवस्था हें तत्त्वज्ञान आहे. सामान्य विशेषभाव धारण करणारा तो व्यवहारधर्म होय. सामान्य विशेषभावाच्या मर्यादा राखणें तो धर्म. श्रीसमर्थ म्हणतात, 'ईश्वरें नाना भेद केले। भेदें सकळ सृष्टी चाले॥' १७।१०।२० दा. बो. सृष्टीच्या व्यवहारांत विशेष धर्मभेद पाळावेच लागतात. सर्व गोलंकार करू पाहणारे मानवतावादी हें महत्त्व जाणत नाहींत.

साकर माती पृथ्वी होये। परी ते माती खातां न ये। गरळ आप नव्हे काये। परी तें खोटें॥ ११॥ पुण्यात्मा आणि पापात्मा। दोहींकडे अंतरात्मा। साधु भोंदु सीमा। सांडूंच नये॥ १२॥ अंतर येक तो खरें। परी सांगातें घेऊं न येती माहारें। पंडित आणि चाट पोरें। येक कैसीं॥ १३॥ दा. बो. १३।१०. भेद ईश्वर करून गेला। त्याचे वाचें न नवचे मोडिला। मुखामध्यें घांस घातला। तो अपानीं कैसा घालावा॥ १७।४।२७॥ दा. बो.

**विशेषधर्म :**—विशेष धर्मापेक्षां सामान्य धर्म व्यापक व श्रेष्ठ हें खरें, पण तो अनुसरतांना देश, काल, निमित्त, हेतु अधिकार अशा अनेक सोपाधिक मर्यादांचें विवेकपूर्वक पालन व्यवहारांत करावेंच लागतें. देवाची मूर्ति व देवळाची पायरी दोन्ही दगडच. पण दोन्ही पूजनीय नव्हत. मानव आणि व्याघ्र दोन्ही प्राणीच. पण अहिंसा हा सामान्य धर्म दोघांत सारखाच लागू नाहीं. हिंदु आणि मुसलमान दोन्ही मानवच खरे; पण ईश्वराच्या घरच्या केवळ मानवतेचे सामान्यभाव दोघांस सारखेच लागू असले तरी शास्त्रोक्त कर्म, रोटीबेटी व्यवहार व उपासना इत्यादि आचारधर्माच्या प्रांतांत त्यांस समान छेखतां येणार नाहीं. ब्राह्मण व ब्राह्मणेतर दोघे हिंदूच असले तरी वंशशुद्धीकरतां रोटीबेटीव्यवहारांत वैषम्य पाळणेंच आवश्यक आहे. स्त्रीपुरुष दोन्ही मानव प्राणीच. पण त्यांनीं आपआपले विशेषधर्म सोडणें, हानिकारकच ठरेल. हरी-हर दोन्ही देवच. पण उपासनेंत आरंभीं तरी, "एको देवो केशवो वा शिवो वा," हा भेद न पाळला तर सगुणध्यान सिद्धच

होणार नाहीं. तुलसीदासांना गोकुळवृंदावनांतील मुरलीधर कृष्णाची मूर्ति व समर्थ रामदासांना पंढरीच्या विठोबाचें ध्यान पटलें नाहीं हा संतांचा अनुभव महत्त्वाचा आहे.

**तत्त्वज्ञान व निष्ठा:**—नरहरि सोनार, नामदेव यांच्या चरित्रांतील उपास्यांतील साम्य भावाचें महत्त्व नैमित्तिक आहे. नरहरि सोनार विठ्ठलाचा द्वेष करी तो दूर करावयाचा होता. नामदेवाची सगुणोपासना सिद्ध होती. त्यास व्यापक निर्गुणोपासनेचा धडा घ्यावयाचा होता. श्रीरामकृष्ण परमहंसांनीं सर्व धर्मांतील साधनानुष्ठानें करून पाहिलीं. ते जेव्हां मनानें तात्पुरते अल्लोपासक मुसलमान बनले होते, तेव्हां ते त्यांच्या प्राणप्रिय कालीकडे ढुंकून पाहत नसत. ही एकनिष्ठा फार महत्त्वाची आहे. तात्पर्य, हिंदु उपासकांनीं सर्व धर्मांतील प्रार्थना म्हणणें, शिवमंदिर, मशीद आणि ख्रिस्ती चर्च सारीं आपल्या उपासनेस समान मानणें हा निंद्य अनाचार आहे. सकाळीं ख्रिस्ती देवळांत प्रार्थना, दुपारीं मशिदींत नमाज, सायंकाळीं विष्णुमंदिरांत शेजारती असें करून कांहींच साधणार नाहीं. फार काय शिवलिंग व शाळीग्राम यांपैकीं एकास बिल्वपत्र व दुसऱ्यास तुलसीपत्र इत्यादि उपासनेंतील विशेष धर्म उपासकांनीं अवश्य पाळलेच पाहिजे. मानवतावाद, विश्वधर्म हे व्यवहारतः भ्रम आहेत. तंतूंना वेगवेगळा पीळ भरून बळकट व्यक्तिसंपन्न करावें तेव्हांच त्यांच्या दोरखंडांत बल येतें. नुसता मोकळा काड्या आणि कापूस यांच्या गठ्यांत तें बळ असूंच शकत नाहीं. आधुनिकांचा अभेदात्मक उदार धर्म असाच अव्यावहारिक, तत्त्वशून्य, निर्बल व भ्रष्ट असतो.

जड पदार्थमात्रांच्या विशेष धर्माकडूनच त्यांचें विशिष्ट स्वत्वरूप धारण केलें जातें. जड पदार्थांच्या बाबतींत हें सर्व निसर्गच करतो, पण प्राण्यांच्या ठिकाणीं व त्यांतहि माणसांच्या ठिकाणीं अंशतः इच्छास्वातंत्र्य व आचारस्वातंत्र्य असल्यामुळें, मानवांना त्यांच्या विशेष स्वत्वरूपांत धारण करण्याचें काम चोदनास्वरूप विधिनिषेधात्मक विशिष्ट धर्मशास्त्रास करावें लागतें. माणूस आपल्या स्वत्वाला मुकूं नये, त्याची उन्नति व्हावी, अधोगति होऊं नये, त्याचें खरें हित म्हणजे श्रेय कशांत आहे व तात्पुरतें श्रेय परिणामीं कसें हानिकारक होतें, देश, काल, निमित्त, समाज, इहलोक, परलोक इत्यादीसंबंधीं जीवाचें त्यांच्या अधिकारानुसार कर्तव्य काय, हें सारें प्रत्येक व्यक्तीला

ठरवितां येणें अति कठिण असतें. म्हणून "धर्मस्य तत्त्वं निहितं गुहायां महाजनो येन गतः स पंथः" अथवा "तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ ॥" असें आपला धर्म सांगतो. कारण पहिल्या वचनांतील महाजन व दुसऱ्या वचनांतील शास्त्रकार हे मानवाचे सामान्य धर्म व व्यक्तिपरत्वें अधिकारानुसार विशेष धर्म सामर्थ्यानें जाणतात. शिव, शिवगुरु आणि शास्त्र ह्या तिन्ही मिळून शिवशरण्युपासकांचा विशेष धर्म बनतो. तोच त्यांस आदरणीय असतो.

आज ज्यास कोणी कोणी आधुनिक हिंदुत्वनिष्ठा म्हणतात, त्यांत हिंदुधर्मनिष्ठेच्या भावरूपतेपेक्षां अभावरूपताच जास्त स्पष्ट व ठळक दिसून येते! Change or perish हें एक सुधारकांचें ब्रीदवाक्य असतें. माझ्या मतें Change and perish हेंच सत्य आहे. जें बदलतें तें नाश पावतें. बदलणें म्हणजेच नाश पावणें होय. जें त्रिकालाबाधित असतें, तेंच सत्य होय. शिवपुराण व लिंगपुराण हीं केव्हां रचलीं गेलीं यांची चिकित्सा व्यर्थ आहे. सृष्टीच्या आरंभींच शिवलिंग प्रकट झालें तेंच उपासनीय आहे, हें त्यांतील त्रिकालाबाधित सत्य आहे. शिवलिंगोपासना हें हिंदुधर्म संस्कृतींतील महत्तम तत्त्वज्ञान आहे. तें त्रिकालाबाधित आहे. सनातन वैदिक वर्णाश्रम धर्म तत्त्वतः त्रिकालाबाधित आहे. कालाच्या ओघाबरोबर बदलणारा नाहीं. महाजनो येन गतः स पंथः ॥ यांतील महाजन कालप्रवाहाबरोबर वाहवत जाणारे नसतात! ते कालाचे कर्ते असतात. कालाचे गुलाम नव्हत. डोंगरावरून येणाऱ्या पाणलोटाबरोबर गडगडत येणारे मोठमोठाले पाषाण आपल्याबरोबर अनेकांचा अधःपात करतात. त्याप्रमाणें कालाबरोबर पुढें सरसावणाऱ्यास कोणी क्वचित् उत्तम पुढारी समजतात. माझ्या मतें ते केवळ कालकिंकर होत! श्रीरामकृष्ण परमहंस, श्रीरमणमहर्षि व इतर अनेक खरे संत हे नवयुगाच्या कालप्रवाहाबरोबर वाहवले नाहींत. जे मेरुप्रमाणें स्थिर असतात तेच संत. तेच जगद्गुरु होत. कालचक्राच्या जात्यांत जे चंचल असतात ते सारेच भरडले जातात. कालचक्राबरोबर न फिरणारा जो मध्य खुंटा त्याचा आश्रय करणारे जागचे हालत नाहींत व भरडलेहि जात नाहींत. अविचलित व स्थिर अशी देवधर्मावरील दृढनिष्ठा हाच तो संरक्षक आधारस्तंभ होय.

**कांहीं व्याख्या :—** हिंदुधर्माच्या भव्य प्रासादाचें अंतरंग पाहण्यास अनेक व्याख्यारूप दरवाजे अगर मार्ग आहेत. त्यांपैकीं कांहीं येथें देतों :—

(१) जो समाजाचें धारण करतो तो धर्म.

(२) स्वस्वरूपीं राहणें तो स्वधर्म.

(३) सिद्ध तें ब्रह्म, साध्य तो धर्म.

(४) अहिंसा, सत्य, अस्तेय, पावित्र्य, इंद्रियनिग्रह इत्यादि दैवी गुण म्हणजे धर्म.

(५) सत्पात्रीं दान, ईशप्रेम, आईबापांची सेवा, पूज्यांबद्दल आदर, अन्नदान असे सदाचार तो धर्म.

(६) अभ्युदय व निःश्रेयस सिद्ध करणारा तो धर्म.

(७) श्रुतिशरणश्रेष्ठांनीं सांगितला तो धर्म, त्यांनीं निषेध केला तो अधर्म.

(८) वेदांनीं इष्टप्राप्तीकरतां जो सांगितला तो धर्म.

(९) *श्रुतिस्मृतिसदाचार व आत्मतुष्टि यांनीं प्रेरित तो धर्म.*

(१०) जन्मजात वर्णाश्रम नियम पाळणें तो सनातन हिंदुधर्म.

(११) सत्त्वसंशुद्धि व वृद्धि हा धर्म होय.

(१२) देव, ऋषि, पितर, मानव व भूतमात्र यांच्यासंबंधीं शास्त्रोक्त ऋणविमोचनार्थ पंचमहायज्ञ व इतर कर्तव्यें करणें हा धर्म.

(१३) पिंडब्रह्मांडाचें धारणपोषण करणारी चिच्छक्तिहि सामान्य विशेष धर्मस्वरूप आहे.

(१४) नवविधाभक्ति हा धर्म.

(१५) कर्म, उपासना, योग, ज्ञान हा परमार्थसाधनमार्ग म्हणजे धर्म.

**हिंदुधर्माचीं गमकें :—** एका माहात्म्यानें हिंदुधर्म संस्कृतीचे पुढील सोळा मूलाधार सांगितले आहेत : (१) धर्मानुकूल सदाचार, (२) आत्माभिमुख सद्विचार, (३) जन्मजात वर्णधर्म, (४) स्त्रियांचा सतित्व धर्म, (५) आश्रमधर्म, (६) देवजगतावर विश्वास, (७) भगवंताच्या दैवी शक्तीवर स्थिर विश्वास, (८) योगमूलक व भक्तिमूलक उपासनापद्धति, (९) मूर्ति व पीठें यांच्या ठिकाणीं सर्वव्यापक भगवत्सत्तेची उपासना, (१०) शुद्धाशुद्ध व स्पर्शास्पर्शविवेक, (११) यज्ञ, महायज्ञ यांवर विश्वास, (१२) श्रुति व श्रुत्यनुकूल स्मृति, पुराणें व तंत्रें यावर विश्वास, (१३) कर्म, कर्माचें बीज, आणि संस्कार यांवर विश्वास, (१४) जन्मांतरावर विश्वास,

(१५) अखेर निर्गुण व सगुण उपासनांचे शास्त्रोक्त विधि हें स्वधर्माचें पंधरावें अंग व (१६) जीवाची कैवल्यप्राप्ति हें सोळावें अंग होय. (१) आधिभौतिक, (२) आधिदैविक, (३) आधियाज्ञिक व (४) आध्यात्मिक अशी हिंदुधर्म संस्कृतीची चतुर्विध दृष्टि आहे. धर्ममीमांसा, दैवी मीमांसा म्हणजे भक्तिमीमांसा व ब्रह्ममीमांसा अशा तीन मीमांसांचा अंतर्भाव हिंदुधर्म संस्कृतींत आहे. सारांश, हिंदुधर्म संस्कृति ही शबल व शुद्ध ब्रह्माची म्हणजेच शिवशक्तीची सगुणनिर्गुणोपासनाच आहे.[२]

**आस्तिक्यभाव** :— हा हिंदुधर्म संस्कृतीचा प्राण आहे. या आस्तिक्य-भावांत (१) परलोक (२) वेद व (३) ईश्वर यांवर पूर्ण विश्वास, यांचा अंतर्भाव होतो.

**(१) परलोकनिष्ठा** :— सर्व कर्मांचा बदला येथें भोगतां येणें शक्य नाहीं, इत्यादि कर्मविपाकशास्त्रांतील अनेक प्रमेयें परलोकाचें अस्तित्व मानल्यानें उलगडतात. आपले श्रुतिस्मृतिपुराणें व योगवासिष्ठ हे ग्रंथ व त्याच-प्रमाणें आधुनिक परलोकविद्येतील असंख्य प्रयोग व ग्रंथ यांनीं परलोकाचें अस्तित्व निर्विवाद सिद्ध केलें आहे. आतां पाश्चात्य भौतिक शास्त्रज्ञांनाहि तें पूर्णपणें मान्य झालें आहे. या विषयाच्या अधिक तपशिलांत जाण्यास येथें अवकाश व आवश्यकता नाहीं.

---

१ या प्रकरणास आधारभूत शास्त्रवचनें देऊं जातां ग्रंथविस्तार फार वाढेल. तरी संदर्भग्रंथांसाठीं *कल्याण हिंदु संस्कृति विशेषांक*, *कल्याण* कल्पतरु धर्मतत्त्व विशेषांक, (हिंदी) धर्मविज्ञान (सनातनी स्वामी-दयानंदकृत) हे ग्रंथ पाहावे.

२ Hinduism is coeval with God. (Vedant Kesari, Jan. 1950, p. 406.)

३ Bradley — Appearance and Reality, ch. XXII. *Schiller Riddle of Sphinx*, p. 299. *Rational-mysticism*, p. 101. Leibnitz Monadology paragraphs 66-68. New revalation, Raymond. News from the next world. Dawn beyond death. Beyond life's Sunset, University of spiritualism. *The other side of Death*. *Personality of Man*. My life in two worlds इत्यादि ग्रंथ पाहावे.

(२) वेद:— हे हिंदुधर्मसंस्कृतीप्रमाणें अपौरुषेय मानले आहेत व म्हणून ते स्वतःप्रमाण आहेत. जे उपाय प्रत्यक्ष किंवा अनुमानप्रमाणानें जाणणें शक्य नाहीं, असे अलौकिक साधक उपाय म्हणजे (१) यज्ञ-याग, (२) ब्रह्मज्ञान, (३) अनेक अलौकिक मंत्रसिद्धि हे श्रुतिवाङ्मयावरूनच समजतात. असे हे सर्वज्ञ वेद सर्वांत प्राचीन आहेत. अर्थात् त्यांची प्रेरणा करणारें ईश्वरावांचून कोणीच संभवत नाहीं. ह्या वेदप्रामाण्यासंबंधीं थोडक्यांत युक्तिवाद आहे. सर्व स्मृतिपुराणें व आस्तिक दर्शनें यांस वेदप्रामाण्य मान्य आहे.

(३) ईश्वरनिष्ठेबद्दल पुढें स्वतंत्र प्रकरण आहे.

**हिंदुधर्मशास्त्राची रचना:—** हिंदुसंस्कृतींतील धर्मशास्त्राची व तत्त्वज्ञानाची रचना व त्यांतील विषयाचें पृथक्करण व वर्गीकरण यांचें किंचित् दिग्दर्शन येथें करण्याचें फार मनांत होतें. पण ग्रंथविस्तारभयास्तव तो मोह आवरणेंच भाग आहे.

ऊर्ध्वे बाहुर्विरौम्येष न च कश्चिच्छृणोति मे ॥
धर्मादर्थश्च कामश्च स किमर्थं न सेव्यते ॥

—म. भारत १८।५।६२.

---

## प्रकरण तिसरें

## साधनसिद्धि

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्व कर्मणि ॥ २।४७

भगवद्गीता.

वरील श्लोकांत भगवान् बजावून सांगतात कीं, कर्म करण्यापुरताच तुझा अधिकार आहे; फल मिळणें किंवा न मिळणें हें केव्हांहि तुझ्या अधिकारांतलें म्हणजे ताब्यांतलें नाहीं. म्हणून माझ्या कर्माचें अमुक फळ मिळावें असा हेतु मनांत ठेवून काम करणारा होऊं नकोस; आणि कर्म न करण्याचाहि तूं

आग्रह धरूं नको. कौषीतकी उपनिषत् यापुढें जाऊन म्हणतें ( ३।८ ) कीं, कर्मे कर्ताकरविता ईश्वरच आहे. कोणापासून पुण्यकर्म घडवावें व कोणापासून पापकर्म घडवावें हें सारें ईश्वराच्या हातीं आहे. " कर्ताकरविता। देतादेवविता। नेता नेवविता देव एक ॥ ३ ॥ निमित्ताचा धनी केला असे प्राणी। पाहातां निर्वाणीं देव एक ॥ ४ ॥ " रामदास. श्रीनरहरिस्वामी चोवसारांत यांच्याहि पुढें जाऊन सांगतात कीं, " शिवः कर्ता शिवो भोक्ता शिवो वेत्ता शिवः प्रभुः। उपसर्जन मात्रं या तां वन्दे शक्तिमद्भुतम् ॥ ४ ॥ पृ. ७५. ही सिद्धान्तवचनें साधकाला कांहीं मार्गदर्शन करितात, त्याप्रमाणें उलट तीं त्यास दिङ्मूढ करणेंहि संभवतें. यामुळें जीव कांहीं काळ किंकर्तव्यमूढ होऊन त्याचा थोडाफार कोंडमारा होणें शक्य आहे.

पुढें थोड्या विचारांतीं त्याला असें वाटूं लागतें कीं, ईश्वर कर्ताकरविता असला तरी तो जीवाच्या फलोन्मुख प्राक्कर्मानुसारच करणें तें करतो किंवा करवितो व भोक्ता असला तरी जीवद्वारांच भोगतो. श्रीज्ञानेश्वर म्हणतात कीं, " जन्म जन्मांतरीं असेल पुण्य सामग्री। तरीच नाम जिव्हाग्रीं येईल श्रीरामाचें। " " जें जन्म सहस्रीं वोळगिजे। एक वेळ यावया ॥ " ( ९।२०६ ज्ञानेश्वरी ) " पूर्वसुकृताची जोडी। तरीच विठ्ठलीं आवडी ॥ " भक्तींतील मधुर भावाचे प्रणेते श्रीगौरांगप्रभु श्रीकृष्णचैतन्य म्हणतात, " नाम्नाकारि बहुता निज सर्व शक्तिस्तत्रार्पिता; नियमितः स्मरणे न कालः एतादृशी तव कृपा। भगवन् ममापि दुर्दैवमीदृशमिहाजनि नानुरागः ॥ " म्हणजे हे भगवंता, माझें दुर्दैव असें आहे कीं, तुझ्या नामामध्यें अजून मला हवें तसें प्रेम उत्पन्नच होत नाहीं! " " प्रेम सुख देई प्रेम सुख देई। प्रेमेंविण नाहीं समाधान ॥ " असा कळशोष एकनाथांना करावा लागला! " बोलविशीं तैसें आणी अनुभवा। नाहीं तर देवा विटंबना ॥ " ही तुकोबारायांची लाचारी होती! " अचपळ मन माझें नावरे आवरीतां ॥ " तसेंच " सदा खळपट निर्गुणाची घडे। सगुण नावडे ज्ञानगर्वे ॥ ! " अशीं करुणाष्टकें यत्नवादी समर्थांना म्हणावीं लागत होतीं. हें पाहून साधकाचा यत्न, त्याचें पूर्वप्रारब्ध, ईशानियति व ईश्वराची कृपा, यांचे सापेक्ष विचार साधकाला गोंधळांत घालतात.

**अटल नियति**—सुभाषितकार म्हणतात कीं, एखाद्या रामबाण रसायनानें मी राजाला आठ दिवसांत बरा करीन, ही राजवैद्याची प्रतिज्ञा ऐकून मृत्यु

मनात हंसतो! कारण ती गोष्ट वैद्याच्या व त्याच्या रामबाण औषधांच्या सामर्थ्याबाहेरची असते. तीच गोष्ट इतर साधनांची मानावी लागेल. वस्तुतः समष्टीच्या ठिकाणीं भूत-वर्तमान-भविष्य असे तीन काळ नसून एक (छापलेल्या कादंबरींतील कथानकाप्रमाणें) वर्तमानकाळच असतो. त्या घटनास आपण भविष्यकथन म्हणतों, कारण ज्या अजून घडलेल्या नसतात, त्या हस्तसामुद्रिक, ग्रहलाघव इत्यादि फलज्योतिषाच्या साहाय्यानें व ज्योतिष-शास्त्राच्या मदतीशिवायहि बिनचूक जाणण्याची शक्ति इहपरलोकींच्या कांहीं असामान्य व सामान्य व्यक्तींतहि असल्याचें शेंकडों प्रयोगांतीं आतां सिद्ध झालें आहे. तात्पर्य, भविष्यकाळच्या घटना आजच ठरलेल्या आहेत. त्या पुरुषप्रयत्नानें बदलतां येतीलच असें म्हणणें व्यर्थ आहे असें वाटतें. प्राचीन पुराणेतिहासांतील पानें याच अटल नियतीची साक्ष देतात. उदाहरणार्थ, श्रीराममातांचें वैधव्य, सीतेचें हरण व तिचा त्याग, वसुदेव-देवकीचा कारागृहवास, यादवांचा नाश, द्रौपदीची विटंबना, अभिमन्यूचा वध, अथवा कौरवपांडवी युद्ध यांतील कोणतींच संकटें पुरुषप्रयत्नांनीं टाळतां आलीं नाहींत. योगवासिष्ठ तर स्पष्टच म्हणतें कीं,—

सर्वज्ञोऽपि बहुज्ञोऽपि माधवोऽपि हरोऽपि च । अन्यथा नियतिं कर्तुं न शक्तः कश्चिदेव हि ॥ ५।८९।२६ ॥ आमहारुद्रपर्यन्तामिदमित्थमितिस्थितेः । आतॄणा पद्मजस्पन्दं नियमान्नियतिः स्मृता ॥ ६।३७।२२॥ म्हणजे ईशनियतीला देवाधिदेवहि टाळूं शकत नाहींत. यावर कोणी असें विचारतील कीं, तर मग कांहींना संख्यायुक्त नामजपयज्ञानें आपल्या कुंडलींतील सारीं स्थानें शुभ-प्रद करतां आलीं व याहिपुढें जाऊन अंतिम पारमार्थिक कृतार्थता प्राप्त करून घेतां आली असें म्हणतात, हें खोटेंच मानावें काय? यावरहि उलट असें दाखवितां येतें कीं, अनेक नामनिष्ठ सत्पुरुषांना दारिद्र्य व व्याधि यांनीं अखेरपर्यंत सोडलें नाहीं! तसेंच जडभरतासारख्या कित्येक दुसऱ्या साधकांना वर्षांन् वर्षे साधन करूनहि एका जन्मीं कृतार्थता प्राप्त झाली नाहीं असें

१. News from the next world, ch. IX, X; Life beyond death with evidence, ch. XIII; Death and its mystery before death, ch. VIII, IX; The Survival of Man, ch. X; The University of spiritualism, ch. XXI.

आढळतें. व्यवहारांतलें दुसरें एक उदाहरण द्यावयाचें तर गेल्या जागतिक महायुद्धांत जर्मन व जपानी यांचे आटोकाट प्रयत्न वायां गेले हें प्रसिद्ध आहे. हा साधनसिद्धीतील पूर्वपक्ष उभारून मी येथेंच थांबत नाहीं. याच्या उत्तर-पक्षाची यथाशक्य चिकित्सा पुढें करीत आहें.

सामान्यतः पाहतां जे अभागी व अपयशी असतात, तसेंच जे आळशी, निराश व निरुत्साही असतात, त्यांस दैववाद दूरस्थच वाटतो. दैववाद व पुरुषार्थवाद हे वाद जगाच्या आरंभापासून सुरू आहेत व ते जगाच्या अंता-पर्यंत सुरू राहणारच. दैव आधीं कीं यत्न आधीं? दैव प्रबल कीं प्रयत्न प्रबल? या वादांत आणखी पुरुषार्थ श्रेष्ठ कीं ईशनियति श्रेष्ठ, हा एक तिसरा वाद उभा राहतो. या वादांचें आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक या भिन्न दृष्टींनीं भिन्न प्रकारचें उत्तर मिळतें. केवळ भौतिक दृष्टीनें प्रारब्ध व ईशनियति यांचें प्राबल्य ठरतें. आधिदैविक दृष्टीनें प्रयत्नास पुष्कळ अवसर मिळतो. आध्यात्मिक दृष्टींत हे वादच राहत नाहींत. श्रीसमर्थरामदासांनीं यावर एक सुंदर स्वतंत्र प्रकरणच लिहून ईश्वरानें प्रथम सृष्टि निर्माण केली, हा यत्नच पहिला, दैव त्यामागूनचें असें ठरविलें आहे. उलट त्यांनीं आपल्या दासबोधांत यत्नास देव मानून जीवाचा यत्न व देवाची कृपा यांचा सुंदर मेळ घातला आहे.

---

१. विचारावें आधीं, प्रेत्न कीं प्रारब्ध। शास्त्रांतरीं भेद, ऐसा आहे ॥९१॥
आहे निराकार, निर्मळ, निश्चळ। तेथुनी चंचळ प्रेत्न जाला ॥९२॥
प्रेत्न जाला आधीं म्हणोनियां थोर। प्रारब्धविचार ऐलीकडे ॥९३॥
ऐलीकडे कर्म पाहातां भूतळीं। प्रेत्न अंतराळीं मूळारंभ ॥९४॥

× × ×

केल्यानें होत आहे रे। आधीं केलेंचि पाहिजे ॥ श्रीसमर्थहृदय, पृ. ४२.

× × ×

यत्न तो देव जाणावा। अंतरीं धरितां बरें ॥ ३०४ ॥
श्रीसमर्थहृदय, पृ. १४६.

माग्यासी काय उणे रे। यत्नावांचुनि राहिलें।
यत्न तो करावा कैसा। हें चि आधीं कळेचिना ॥ २१ सदर

नियति म्हणजे सृष्टीचा नियम. त्या ईशनियतीबाहेर देवताहि (म्हणजे कार्यब्रह्म) जाऊं शकत नाहींत. परंतु ती परमेश्वराला बंधनकारक नाहीं. शिवसंकल्प तोंच नियति. ती त्याच्या स्वाधीन असते. जीव हा वस्तुतः परमेश्वराचा अंश आहे. देवतांचा नव्हे. अर्थात्, जीवानें आपल्या मूळस्वरूप परमेश्वराला वश केल्यावर नियति त्यास बाधा करूं शकत नाहीं व जीवन्मुक्ताच्या ब्रह्मात्मैक्य भावांत तर ती जाणवतच नाहीं तथापि शक्यतों मूळ शिवसंकल्परूप नियतींत तशाच कारणावांचून ढवळाढवळ करूं नये अशी ईश्वराची व संतांची दृष्टि असते. असें असूनहि परमेश्वर-कृपेनें, संतकृपेनें अथवा यत्नशील जीवाच्या योग्य प्रयत्नानें नियति पालटली असें अनेक देखावे दिसतात. पण पुष्कळ वेळा ते पालट ह्या नियतींतच ठरलेल्या घटना असतात. ईश्वराच्या कृपेचें व संतभक्त उपासक यांच्या भक्तीचें माहात्म्य जगाला पटवावें असाहि त्यांतील कधीं कधीं हेतु संभवतो. वर्षाकालांत पाऊस पडावा ही एक अटळ नियति आहे; पण घरें बांधून अथवा छत्री घेऊन पावसाचें निवारण करतां यावें हाहि ह्या नियतींतीलच प्रकार आहे. नदीचा प्रचंड प्रवाह ही नियति आहे. पण ह्या ओघांत उलट-सुलट, खालीं-वर जलचरांनीं स्वैर संचार करावा, हें ह्या नियतीच्या विरुद्ध नाहीं. फलज्योतिष ही नियति आहे. तसेंच ग्रहशांति ही पण नियतीच आहे.

या सर्व गोष्टींचा साधक-बाधक सारासारविचार करून शास्त्रकारांनीं व अन्य थोर पुरुषांनीं पुरुषार्थवादाचाच पुरस्कार केला आहे. त्यांतील कांहीं मुद्दे पुढें सांगतों. त्यानें साधकास बराच धीर येईल अशी आशा आहे.

**ईशनियति, दैव व पुरुषयत्न—**

(१) दैव म्हणून कांहीं एक स्वतंत्र वस्तु अगर शक्ति नाहींचें.

---

१- पौरुषं न परित्याज्यमेतामाश्रित्य धीमता। पौरुषेणैव रूपेण नियतिर्हि नियामिका॥ ३।६२।२७ यो. वा.

नियतिं यादृशीमितस्सङ्कल्पयति सा तथा। नियतः नियतान्काश्चिदर्थान् नियतानपि॥ ५।२४।२१ यो. वा.

२ दैवं नाम न किञ्चन। (२।५।२८) दैवं न विद्यते (२।८।१३) दैवं न किञ्चित्कुरुते केवलं कल्पने दृशी। (२।९।३) यो. वा.

( २ ) दैववाद ( Fatalism ) व ईशनियतिवाद ( Determinism ) हे अगदीं भिन्न आहेत. पहिला खरा नाहीं. दुसरा खरा आहे.

( ३ ) या जन्मीं अगर पूर्वजन्मीं आपणच केलेल्या अदृष्ट कर्मास दैव हें नांव व्यर्थ लावतात.

( ४ ) आपलें प्राक्कर्म व वर्तमानकालचें कर्म या दोन बोकडांचें युद्ध सुरू असतें. जो बलवान् असतो, तो विजयी होतो.

( ५ ) क्षीण प्रारब्ध टाळतां येतें. तीव्र प्रारब्ध बहुधा अटळ ठरतें.

( ६ ) फार जन्माचें प्राक्कर्म फार खडतर असेल तर तें भोगावें लागतें.

( ७ ) ईश्वरी अवतार व संत ह्यांस प्रारब्ध टाळतां येणें शक्य असूनहि ते तें टाळण्याचा यत्नच करीत नाहींत. यामुळें दैववादी लोकांच्या दैववादास तो एक मोठा आधार मिळतो.

( ८ ) पुरुषयत्न शास्त्रानुसार व शास्त्रविरुद्ध दोन प्रकारचा असतो. पहिल्यानें परमार्थप्राप्ति व दुसऱ्यानें अनर्थप्राप्ति होते.[३]

( ९ ) जगांत जर आळस नसता तर कोणासहि धनवान् व विद्वान् होता येणें शक्य होतें.[४] पुरुषप्रयत्नानें नराचा नारायण होतां येतें.

( १० ) कर्ता पुरुष असतो. नियति ही कर्ती नव्हे. नियति म्हणजे नैसर्गिक नियम, धर्म अथवा कार्यकारणभाव, इतकेंच.

( ११ ) स्वप्नासारख्या अवस्थांत नियति-अनियतींचा भेद उरत नाहीं. ज्या वेळीं जें घडेल तीं नियति. व्यवहारांतहि समष्टीकडून जशी नियतीची कल्पना संभवते तशी अनियतीची कल्पनाहि ( समष्टि ) मनाकडून संभवते.

---

१ पुरुषार्थफलप्राप्तिर्देशकालवशादिह । प्राप्ता चिरेण शीघ्रं वा याऽसौ दैवमिति स्मृता। २।७।२१ यो. वा.

२ द्वौ हुडाविव युद्ध्येते पुरुषार्थौ परस्परम् । य एव बलवांस्तत्र स एव जयति क्षणात् ॥ ( २।६।१० ) यो. वा.

३ योगवासिष्ठ २।५।४, २।६।२४

४ योगवासिष्ठ २।५।३० -

५ योगवासिष्ठ ५।२४।३१

(१२) नियति ही पुरुषार्थद्वारां फलदायी होत असते. ती पुरुषार्थाच्या विरोधी नाहीं; म्हणून पुरुषप्रयत्न सोडूं नये. प्राक्कर्मरूपदैव बदलणें आतां आपल्या हातीं नाहीं. पण आजचें कर्म आपल्या हातीं आहे त्यांत कसर करूं नये.

(१३) भविष्यवाद्यांना जें भविष्य दिसतें, तें अटळ असतें असें नव्हे. अर्थात् तें तसें घडतेंच असें नियमानें सांगतां येत नाहीं. ते तसें घडण्याचा संभव त्यांना दिसतो इतकेंच. एखाद वेळीं मूल जिन्यावरून पडणार—पडलेंच असें वाटतें. पण तें सांवरतें, पडत नाहीं, असें घडतें. याप्रमाणें भविष्यकथन हें एक अनुमान असतें.

(१४) ज्याप्रमाणें दूरदर्शी Clairvoyant माध्यमाला देशाचें अंतर प्रत्यवायभूत होत नाहीं, त्याप्रमाणें भविष्यवाद्यांना कालाचें अंतर प्रत्यवायभूत होत नाहीं, असेंहि म्हणतां येईल. आपण ज्या स्थळीं जे अति दूरचे तारे पाहतों, तीं त्या ताऱ्यांची स्थिति कित्येक वर्षांपूर्वीची असते. आपण प्रत्यक्ष ते तारे पाहतों त्या वेळीं ते नष्टहि झालेले असणें शक्य असतें. त्याचप्रमाणें भविष्यकाळच्या सूचनांचें समजावें. शिवाय वस्तुतः पाहतां कालाला स्वतंत्र सत्ताच नाहीं. काल ही एक मानसिक भावना आहे.

(१५) ज्याप्रमाणें आपण वाचीत असलेल्या कादंबरींतील पुढील भाग दुसऱ्या कोणा वाचकास माहीत असावा असें हें अदृश्य समष्टिग्रंथांतील भविष्यकथन संभवतें.

(१६) हें भविष्यज्ञान परलोकाच्या व्यक्तींकडून प्रेरित होणेंहि संभवनीय असतें. त्यांना ह्या ज्ञानाची शक्यता अधिक असते.

(१७) ज्याप्रमाणें कानांना आकाशांतील ढगांचें गडगडणें ऐकूं येण्यापूर्वीच डोळ्यांना त्याच संघर्षाचा विद्युत्प्रकाश दिसतो, त्याप्रमाणें बहिर्मनाच्या प्रत्यया अगोदर अंतर्मनाला बाह्यार्थ ज्ञान होणें शक्य आहे.

---

१ योगवासिष्ठ ३।६२।२७

२ पौरुषं न परित्याज्यमेतमाश्रित्य धीमता। पौरुषेणैवरूपेण नियतिर्हि नियामिका ॥ ३।६२।२७.

३ One does not see what must happen, but what will happen. (Death and mystery before Death, ch. VIII)

त्याला आपण आपल्या परिच्छिन्न दृष्टीनें भूतवर्तमानभविष्य असा त्रिकालात्मक प्रवाह मानतों तो वस्तुतः नित्यवर्तमानकालीन अनंत चित्सागर असतो. तळमजल्यावरील गवाक्षांतून बाहेरचें पाहतां रस्त्यावरून जाणाऱ्या रहदारींत अनुक्रम दिसतो, माडीच्या गच्चीवरून समग्र रहदारी एकदम दिसते.

( १८ ) भौतिक शास्त्रज्ञांची अशी कल्पना आहे कीं, आपल्या परिच्छिन्न मनाला तीन परिमाणांतच ( लांबी, रुंदी, खोली अगर उंची ) बाह्यार्थ ज्ञान ग्रहण करण्याची सवय आहे. यामुळें चार, पांच, अथवा त्यांहून अधिक परिमाणांत स्थिर असलेल्या नित्यवर्तमानकालीन शिवसंकल्परूप विश्वाचें आपण तीन परिमाणाच्या निपुटींत जे ग्रास घेतों, त्यानें बाह्य सृष्टिज्ञानांत नसती कालानुक्रमाची कल्पना निर्माण होते.

( १९ ) हा विषय येथें अधिक वाढवितां येत नाहीं. तरी आणखी एक दोन अति महत्त्वाचे मुद्दे सांगून कर्मस्वातंत्र्य आणि ईशनियति हा वाद येथेंच खुंटवितों. वर म्हटलें ते मुद्दे असे कीं, इंद्रियप्रत्यक्षानुसारी दृष्टीनें ही भौतिक बाह्य सृष्टि सत्य व नित्य वाटते, आधिदैविक दृष्टीनें भक्ताच्या मनाला ही सृष्टि मायामय, भगवन्मय अथवा शिवसंकल्परूप दिसते व आध्यात्मिक म्हणजे पारमार्थिक दृष्टीनें या बदलणाऱ्या जगाचा त्रैकालिक अभावच सिद्ध होतो. अर्थात् या शेवटल्या आध्यात्मिक दृष्टींत या जगदाभासांत नियतिवाद व पुरुषार्थवाद यांना कांहींच महत्त्व उरत नाहीं. जो ज्या क्षणीं आभास भासेल तोच त्याची नियति. त्यांत कार्यकारणभाव किंवा कालानुक्रम नसतोच. यामुळें आध्यात्मिक दृष्टींत वैयक्तिक अगर जागतिक घटनांतील कोणताहि आभास टाळण्याची आस्था नसते. भौतिक दृष्टींत भूत-वर्तमान-भविष्य या त्रिकालांची स्पष्ट कल्पना व त्यामुळें उत्पन्न होणारी कर्मस्वातंत्र्य व नियतिवाद या तत्त्वास महत्त्व येतें. त्याचा विचार वर केलाच आहे. आतां तिसऱ्या ईश्वरभक्तीच्या मध्यस्थ प्रकारात या वादाला अगदींच वेगळें स्वरूप प्राप्त होतें. भक्ताच्या दृष्टीला जग ही ईश्वराची माया आहे असें दिसतें. याचा आणखी स्पष्ट खुलासा असा कीं, जागतिक स्थितीचें व घटनांचें उपादानकारण माया असून निमित्तकारण ईश्वर आहे असें तो मानतो. ही जी जगद्रूप गुणमाया तीच प्रस्तुत वादांतील नियति होय. ती नियति जरी स्वरूपतः दुर्लंघ्य वाटली अगर असली, तरी ती परमेश्वराधीन

असते. संत म्हणतात, " स्मरतां नित्य हरी । मग ती माया काय करी ! ॥ " अर्थात् पूजानामजपादि साधनांच्या योगानें निमित्तकारणरूप ईश्वर प्रल्हादाला वश झालेला असल्यामुळें, प्रल्हादाचा डोंगरावरून कडेलोट होणें ही मायेची घटना जरी टळली नाहीं, तरी त्या नियतीमागील ईश्वराच्या अमोघ कृपेमुळें प्रल्हादाची त्यामुळें मुळींच हानि झाली नाहीं. अशा रीतीनें भक्ताचा भागवतधर्मरूप पुरुषार्थ आणि ईश्वराच्या गुणमायेची अव्खलता या दोहोंचा मेळ घालतां येतो. इतकेंच नव्हे तर भक्त आपलें व्यक्तीचें इच्छास्वातंत्र्य व कर्मस्वातंत्र्य यांचा मुळींच अहंकार न बाळगतां तो सर्वतोपरि त्याचा प्राणेश्वर जो भगवान् व त्याची नियति शक्ति त्या शिवशक्तीस आनंदानें प्रपन्न झालेला असतो. जीवाचें स्वतंत्र कर्तव्य व भोक्तव्य यांस त्यानें आनंदानें तिलांजलि दिलेली असते. मग ईश्वर अशा निष्ठावंत भक्तांचें प्रारब्धहि कधीं बदलून टाकतो, किंवा कधीं तें त्यांस " जगीं दुःख तें सूख मानीत जावें । " या समदृष्टीनें भोगावयासहि लावतो. येथें भक्ताचें इच्छास्वातंत्र्य व कर्मस्वातंत्र्य हे प्रश्न शून्यवत् ठरतात. कारण भगवंताच्या इच्छेहून भक्ताची इच्छा वेगळी नसते. यासंबधीं संत काय म्हणतात, तें ऐका—

अग्निकुंडामाजीं घातला प्रल्हाद । तरी तो गोविंद विसरे ना ॥ १ ॥
पितयासी म्हणे व्यापक श्रीहरी । नांदतो मुरारी सर्वां ठायीं ॥ २ ॥
अग्निरूपें माझा सखा नारायण । प्रल्हाद गर्जून हांक मारी ॥ ३ ॥
तुका म्हणे अग्नि जाहला शीतळ । प्रताप सबळ विठो तुझा ॥ ४ ॥

* * *

आलिया भोगासी असावें सादर । देवावरी भार घालूनियां ॥ १ ॥
मग तो कृपासिंधु निवारी सांकडें । येर तें बापुडें काय रंक ॥ २ ॥
भवाचिया पोटीं दुःखाचिया राशी । शरण देवासी जातां भलें ॥ ३ ॥
तुका म्हणे नव्हे काय त्या करितां । चिंतावा तो आतां विश्वंभर ॥ ४ ॥

* * *

आवडीनें भावें हरिनाम घेसी । तुझी चिंता त्यासी सर्व आहे ॥ १ ॥
नको खेद करूं कोणत्या गोष्टीचा । पती लक्ष्मीचा जाणताहे ॥ २ ॥
सकळ जीवांचा करितो सांभाळ । तुज मोकलील ऐसें नाहीं ॥ ३ ॥
जैसी स्थिति आहे तैशापरी राहे । कौतुक तूं पाहें संचिताचें ॥ ४ ॥
एका जनार्दनीं भोग प्रारब्धाचा । हरिकृपें त्याचा नाश आहे ॥ ५ ॥

पण वर लिहिल्याप्रमाणें आपला सर्व भार परमेश्वरावर टाकणें, हें भक्ताचें कर्तव्य वाटतें तितकें सोपें नाहीं. त्यास अत्यंत निरहंकारी व निःस्वार्थी होऊन सारा कर्ताकरविता ईश्वर अशी दृढ भावना करावी लागते. श्रीरामकृष्ण परमहंस व्यसनाधीन व छंदीफंदी अशा गिरीश बाबूंस एकदां म्हणाले, "तुला जर दिवसांतून नेमानें एकदांहि ईश्वराचें नांव घेतां येणार नसेल, तर तूं मला तुझा कुलमुखत्यारनामा लिहून दे! मग मीच तुझ्यासाठीं सर्व करतों." गिरीश बाबू त्यास कबूल झाले व त्यातील इतःपर कर्तेकरविते एक श्रीरामकृष्ण या रहस्यबोधानें त्यांच्या आचरणांत आमूलाग्र पालट पडला, व पुढें ते महापाप्याचे संतकोटीस पोंचले!

श्रीगुलाबरावमहाराज म्हणतात, परमार्थाचा भार केवळ परमेश्वरावर टाकून देऊन, जेवणाचा भार आपल्यावर घेणारेच मीं पुष्कळ पाहिले आहेत. ते पूर्वप्रारब्धाबद्दल आणखी लिहितात कीं, मृदु व मध्यम परमेश्वर-स्मरणानें अवश्य दूर होतें. योगसहित परमेश्वरस्मरणानें तर तीव्र प्रारब्धहि दूर होतें. पण आपल्या अगात कार्याविषयींचें सामर्थ्य दिलें असतानाहि जो मनुष्य देवावरच पुनः भार घालतो, तो मनुष्य देवावर प्रेम करणारा नसून प्रत्येक कामांत देवाची परीक्षा पाहतो, असें समजावें. तेव्हां अशांच्या विश्वासाची एखाद्या जन्मांत परमेश्वरानें परीक्षा पाहिल्यास नवल नाहीं. शिवाय भक्तिमार्गांत असल्याशिवाय–"असेल माझा हरि तर देईल खाटेवरी" अथवा "देव जर रक्षक आहे तर प्लेग काय करील?"–अशा प्रकारचा आग्रह धरणें देहबुद्धि असणाऱ्यांना उचित नाहीं. जरी देव संकटात धांवून येतो, तरी चहूंकडून नाइलाज झाल्यासच येतो, एरव्हीं नाहीं, असें समजावें हें बरें. देवाला आपल्यासाठीं यत्किंचितहि तसदी देणें खऱ्या भक्तास बहुधा आवडत नाहीं.

एकदा एक ज्ञानी व एक भक्त असे दोघे रस्त्यानें जात असतां, त्यांना एक वाघ भेटला. तेव्हां ज्ञानी म्हणाला, "वाघांतही परमेश्वर आहे व आपल्यांतहि आहे, मग आपण पळून कां जावें?" भक्त म्हणाला, "परमेश्वरानें आपल्याला दूर होण्याचें सामर्थ्य जर दिलें आहे, तर मग त्या दयावंताला आणखी श्रम कशाला द्यावेत?" असे उद्गार श्रीरामकृष्ण परमहंस नेहमीं काढीत असत. God helps those who help themselves. या इंग्रजी म्हणींतील रहस्य असेंच आहे.

श्रीगुलाबरावमहाराज दैववाद व प्रयत्नवाद यांसंबंधीं असें म्हणतात कीं, "वेदान्त कपाळावर हात देऊन बसणाऱ्याला (पुराणांतील दाखले देऊन) दैववाद शिकवितो, आणि निधड्या छातीच्या मनुष्याला आत्मा नित्य आहे, म्हणून तो प्रयत्नवाद शिकवितो. दैववाद खरा आहे म्हणून प्रयत्न सफळ होत नसला, तरी " रामादपि च मर्तव्यं मर्तव्यं रावणादपि। उभयोर्यदि मर्तव्यं वरं रामो न रावणः॥ " या मारीचोक्तीला अनुसरून शहाणे शुभ प्रयत्नाकडेच धांव घेतात. दैव हा अजिंक्य शत्रु असला, तरी त्याच्याशीं झगडतांना त्याच्या हातून युद्धांत मरावें, म्हणजे स्वर्ग आंदण आहे. वाघ्या म्हणून खातो व वाघोबा म्हणूनहि जर खातो आहे, तर त्यानें त्याला लाथ मारावी, मस्तक लववूं नये. ज्याला दैवानें स्वर्ग मिळाला आहे, त्यापेक्षा प्रयत्नानें पाप करून नरकांत जाणारा धन्य होय." स्वामी विवेकानंद हताश व आळशी तरुणांस म्हणत, " अरे, तुम्हांला दुसरें कांहींच साधत नसेल तर चोरी करायला तरी शिका. " मनुष्यानें यत्नशील असावें, हाच त्यांतील भाव दिसतो. या विवेचनाचा या प्रकरणापुरता अर्थ इतकाच कीं, माझ्या दैवीं असेल अथवा देवाच्या मनांत असेल तर माझ्या हातून साधन घडेल व तें सिद्ध होईल, असा दुबळा विचार मनांत न आणतां मी ईश्वराचा अंश आहें तर माझ्या भगीरथ प्रयत्नाला यश देण्याला त्यामागें भगवानाचें अमोघ सामर्थ्य आहेच आहे. त्यापुढें माझ्या प्रतिकूल प्रारब्धाचा तो पाड काय! अशा जबरदस्त आत्मविश्वासानें साधनांचें अनुष्ठान करावें, म्हणजे मग साधनसिद्धि कांहीं दूर नाहीं. प्रयत्नांतीं परमेश्वर. आपला सुदृढ प्रयत्न व ईश्वराची कृपा या दोन पात्यांच्या कातरीनें दृढ प्रारब्धहि कातरलें जातें. मग या दोन पात्यांत विशेष कारक पातें कोणतें, हा प्रश्न न सुटो.

कोणतेंहि कर्म आपलें फळ दिल्यावांचून कधींच राहत नाहीं, हा अटळ कर्मसिद्धांत आहे. असें असतां पुष्कळ वेळां कर्माचें फळ मिळत नाहीं, असा

१. उद्योगिनं पुरुषसिंहमुपैति लक्ष्मीर्दैवं प्रधानमिति कापुरुषा वदन्ति। दैवं विहाय कुरु पौरुषमात्मशक्त्या यत्ने कृते यदि न सिद्ध्यति कोऽत्र दोषः॥ " कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन। गीता २।४७ "
यत्नो हि सततं कार्यस्ततो दैवेन सिद्ध्यति॥ १२।१५३।५०–महाभारत
" असाध्य तें साध्य करितां सायास। कारण अभ्यास तुका म्हणे॥ "

अनुभव येतो. याचा खुलासा अनेक तऱ्हांनीं करावा लागतो : ( १ ) केलेल्या पुण्यकर्माचा म्हणजे त्यानें उत्पन्न होणाऱ्या अदृष्ट शक्तीचा विनियोग फलसिद्धीला प्रत्यवायभूत असलेल्या अदृष्ट दोषांचें अंशतः निवारण करण्याकडे झालेला असतो. ( २ ) कर्मरूप दगडांच्या राशींच्या राशी अगोदर खोल पायांत गडप होतात, तेव्हां कोठें पुण्याईची इमारत वर उभारण्यास आरंभ होतो. ( ३ ) अक्रोडाच्या झाडाप्रमाणें कर्मफलोन्मुख होण्यास कधीं कधीं कालावधीची अपेक्षा असते. "तुका म्हणे येथें न चले तातडी। प्राप्त काळ घडी आल्यावीण ॥" ( ४ ) एका हौदाचें पाणी येण्याचा व जाण्याचा असे दोन्ही नळ सुरू असले तर तो हौद भरण्यास फार वेळ लागतो. इतकेंच काय तर पाणी जाण्याचा नळ मोठा असला तर पाणी येण्याचा नळ सतत सुरू राहूनहि हौद पाण्यानें कधींच भरण्याचा संभव नसतो. आपण पारमार्थिक साधन अल्प काळ करतों व आपला बाकीचा सारा वेळ सात्त्विक, राजस, किंवा तामस कर्मांत जातो. तें कर्म साधनफलश्रुतींत साधक-बाधक होतें. औषध थोडें आणि कुपथ्यें फार, मग गुण कसा यावा? ( ५ ) समष्टि कर्माच्या गुंतागुंतींत दुसऱ्यांचेंहि कर्म आपणास सहाय्यक किंवा प्रतिबंधक होऊं शकतें. हे सारे युक्तिवाद लक्षांत घेऊन आपला यत्न सर्वांगीण व्हावयास पाहिजे. ( ६ ) एकाच साधनाच्या ठिकाणीं दृढतर निष्ठा पाहिजे. सकाळीं वैद्याचें, दुपारीं हकीमाचें, संध्याकाळीं अॅलोपथीचें व रात्रीं होमोपथीचें अशीं औषधें बदलून रोग बरा न होतां रोगाचें वानरखट बनतें! श्रीरामकृष्ण परमहंस एक दृष्टान्त देत. एकानें नदीकांठीं पाण्यासाठीं एकेक हात खोल असे पाच डोहरे खणले; पण कोठेंच पाणी लागेना. त्यानें असें न करता एकच डोहरा पांच हात खोल खणला असता तर खचित पाणी लागतें. ( ७ ) कधीं कधीं आळशी, मूर्ख, दुष्ट, अथवा पापी मनुष्य चैन भोगतो व यत्नशील, सुज्ञ, दयाळू व सत्त्वस्थ मनुष्य हालांत असतो असें आढळतें. याचें कारण असें संभवतें कीं, पापपुण्य सम असतें, तेव्हाच मनुष्य-जन्म येतो. मग अशा या मानवजन्मपरंपरेंत जेव्हां पाप्याचें पुण्यकर्म फलोन्मुख होतें, तेव्हां पाप्यानेंहि सुख भोगावें यात नवल काय? पुण्य आणि पाप याची वजाबाकी होत नाहीं. दोन्ही प्रकारच्या कर्मांचीं फलें पृथक्पणें भोगण्यास मिळतात. ( ८ ) दुसरें असें कीं, सूक्ष्म शरीर ( म्हणजे मन ) व स्थूल शरीर यांच्या उन्नतीचे मार्ग समांतर-सारखे नसून भिन्न असतात. यामुळें बाह्यतः दारिद्र्य-

पीडित व व्याधिग्रस्त साधु मनानें आत्मसंतुष्ट असूं शकतात. उलट श्रीमंतींत लोळणारे गलेलठ्ठ मनानें असंतुष्ट व दुःखी असूं शकतात.

तात्पर्य, आधिभौतिक दृष्टीनें उपादानकारणरूप नियति अटळ ठरते. आधिदैविक दृष्टीनें निमित्तकारणरूप कर्तेकरवितें जीवेश बलवान् ठरतात. अध्यात्मदृष्टीने परमसाध्य हें नित्यसिद्धच असतें. त्याला ज्ञानापरत्या अन्य कोणत्याहि साधनाची अपेक्षा नसते. देहबुद्धीला दास्यादि कष्ट करावे लागतात. जीवबुद्धीला 'शिवोऽहम्' हें चिंतन अखंड ठेविलें तर पुरतें. आत्मबुद्धीला कांहींच कर्म उरत नाहीं. शनिवारी स्वयंवर नाटकाचा खेळ लागला कीं नटांना त्या तयारींत असावेंच लागतें. पण सूत्रधार आयत्या वेळीं एखादा प्रवेश गाळूं शकतो. कर्णाला दासीपुत्राचा क्षत्रिय होण्यास विश्वामित्रासारखें तप करावें लागलें नाहीं. तो कौंतेय क्षत्रियच होता. तें समजण्यास एक कुंतीचा शब्द पुरेसा झाला. एका बाईनें काम करतांना आपली नथ गळ्यांत मंगळसूत्रांत अडकविली. तें ती विसरल्यामुळें आपली नथ हरवली असें समजून ती चिंतेंत पडली. तिनें शोकाकुल होऊन तें पतीस सांगितलें. त्यानें हंसत तिला "आरशांत पहा" म्हटलें. आरशांत पाहतां नथ गळ्यांतच आढळली. ती सांपडली म्हणावी तर हरवलीच नव्हती. याप्रमाणें कर्ममार्गांत निष्कामतेनें कर्मास तयार असावें लागतें. भक्तिमार्गांत ईश्वर (वरील उदाहरणांतील कुंती किंवा पतीप्रमाणें) निमित्तमात्र साहाय्यकारी ठरतो. वस्तुतः अंतिम साध्य हें सिद्धच असतें. समग्र कारण व कार्य यांत अंतर नसतें. कारण आणि कार्य, साधन आणि साध्य यांच्या घुडाशीं सातत्य असतें. श्रीरामकृष्ण परमहंस म्हणतात कीं, भक्त, भागवत आणि भगवंत तत्त्वतः एकरूप असतात. परमार्थांत कार्यकारणभेदभावाला अवसरच नसतो. त्यांना अधिष्ठानरूप जें सातत्य, ती जी एकता तेंच साधनसिद्धीचें ईशसत्तारूप रहस्य होय. त्या रहस्यावर जर साधकाची दृष्टि खिळेल तर साधनसिद्धीचें कोडें उरणार नाहीं. एरवीं तें निःशेष सुटणार नाहीं. शिवयोग तो हाच. शिवबोध तो हाच. खरी ईश्वरनिष्ठा ती हीच असें मी समजतों. प्रपंच दैवाधीन आहे व परमार्थ पुरुषार्थाधीन आहे असें म्हणतात. तो पुरुषार्थ म्हणजे—

योगस्थः कुरु कर्माणि संगं त्यक्त्वा धनञ्जय।
सिद्ध्यसिद्ध्योः समो भूत्वा समत्वं योग उच्यते॥ २।४८ गीता

## प्रकरण ४ थें

# ईश्वरनिष्ठा

नसे ठावा ब्रह्मा न शिव अथवा श्रीपति हरी।
हरी जो तापातें उचलुनि कृपासिंधुलहरी॥
हरी वाटे फाळा-करिस विपति मृत्युभुजगा॥
जगाचा तूं ऐसा धणि कवण तो पाव भज गा॥ १॥

* * *

सकळ गुणें संपन्न। एक देवाचें लक्षण॥ १॥
वरकड कोठें कांहीं। एक आहे एक नाहीं॥ २॥
षड्गुणैश्वर्यसंपन्न। एक भगवंतीं जाण॥ ३॥
तुका म्हणे जें जें बोला। तें तें साजे या विठ्ठला॥ ४॥

* * *

असितगिरिसमं स्यात्कज्जलं सिंधुपात्रे
सुरतरुवरशाखा लेखनी पत्रमुर्वी।
लिखति यदि गृहित्वा शारदा सार्वकालं
तदपि तव गुणानामीश पारं न याति॥ ३२॥

—शिवमहिम्न

We worship not what we can but what we can not understand.

— Sir S. Radhakrishnan.

ईश्वरभाव हा उपासनेचा प्राण आहे. पण आश्चर्याची गोष्ट अशी कीं, उपासना ही ज्ञात वस्तूंची नसून अज्ञात ईश्वराचीच घडत असते. खरें साध्य साधनातीत असतें. खरें ध्येय ध्यानापलीकडलें असतें. सृष्टिज्ञानांत आस्तिक मानवाच्या तार्किक बुद्धीचें अंतिम पर्यवसान तोच ईश्वर. पण तो तर्काच्या अथवा युक्तिवादाच्या आटोक्याच्या बाहेर आहे. श्रुति, युक्ति, आणि अनुभूति किंवा प्रत्यक्ष, अनुमान व शब्द, (आप्तवचन, श्रुतिशास्त्रें) हीं तीन मुख्य प्रमाणें आहेत. त्यांत अनुक्रम आहे असेंहि सकृद्दर्शनीं वाटतें. पण तो अनुक्रम वरील दोन्ही त्रयींप्रमाणें आढळतो हें नवल आहे. म्हणजे अगोदर अनुभव

आणि मग त्याचें शास्त्र असा अनुक्रम फलज्योतिष, वैद्यक, गुरुत्वाकर्षणादि पदार्थविज्ञान वगैरे विषयांत येतो. परमार्थांतहि कोठें कोठें सोंच अयुक्तिक वाटणारा अनुक्रम असावा असा विचार वरचेवर मनांत डोकावतो. अगोदर काशी पहावी व मग काशीचा नकाशा तयार करावा, असा प्रकार ईश्वरी साक्षात्काराबद्दल कांहीं अंशीं आढळतो. शास्त्रप्रचीति व गुरुप्रचीति यांचे संस्कार नसतां आत्मप्रचीतीनें ईश्वर जाणल्याचीं उदाहरणें श्रीरमण-महर्षीसारखीं क्वचित् आढळतात.

या नास्तिक गणलेल्या नवयुगांत ज्यांनीं "होय, मीं देव पाहिला आहे व हवा तर तुलाहि दाखवीन" असें निश्चयपूर्वक ठांसून सांगितलें व पुढें तसें करूनहि दाखविलें, ते नवयुगधारी संतश्रेष्ठ श्रीरामकृष्ण परमहंस हे बहुतांशीं निरक्षर होते. प्रस्थानत्रयीचें तोंडहि त्यांनीं पाहिलें नव्हतें. त्यांचे एक अद्वितीय शिष्य श्रीअद्भुतानंद अथवा लाटूमहाराज हे त्यांच्याहिपेक्षां कट्टे निरक्षर व आडमुठे होते. पण सद्गुरुसेवा व नामनिष्ठा या दोनच साध्यसाधनांनीं ते उच्च कोटीचे संत व तत्त्वज्ञ बनले. तेव्हां पाश्चात्य देशांतील बडे तत्त्वजिज्ञासु त्यांच्या पायाशीं बसून आपलें शंकानिरसन करून घेत.

श्रीरामकृष्णांची निरक्षर पत्नी श्रीशारदामणिदेवी हें या संप्रदायांतलें असेंच तिसरें उदाहरण आहे. या कडक पडदा वापरणाऱ्या महान् साध्वी बाई श्रीरामकृष्ण परमहंसांची निस्सीम सेवा श्रीसद्गुरु माउली या अनन्य मातृभावनेनें जगाच्या दृष्टीआड करीत असत. याशिवाय अन्य परमार्थ-साधन त्यांनीं केल्याचें ऐकिवांत नाहीं. या एकनिष्ठ सेवेनें व श्रीरामकृष्णांनीं उलट त्यांच्या ठिकाणीं केलेल्या कालीमातेच्या भावनेनें तो दिव्य भाव त्यांच्या ठिकाणीं प्रादुर्भूत झाला. पण त्याचा यत्किंचितहि दंभ न दाखवितां कलकत्त्याच्या या अत्यंत लोकप्रिय मातेनें हजारों साधकांचा आपल्या दिव्य व अनुपम वात्सल्यप्रेमानें उद्धार केला!

वरील लाटूमहाराज लहानपणीं एक अनाथ पोरका हरकाम्या पोऱ्या म्हणून एकाकडे होते. तेव्हां त्यानें आपल्या मालिक धन्याच्या तोंडून एकदां ऐकलें होतें कीं, "ज्याचें मन निष्कपट आहे व भाव उत्कट आहे, त्याला ईश्वर भेटल्यावांचून राहत नाहीं. त्यासाठीं एकांतीं जाऊन सद्गदित अंतःकरणानें

त्याची करुणा भाकावी व पोटभर रडावें ! म्हणजे देव भेटतोच भेटतो ! ” लाटूचें शास्त्राध्ययन वरील दोन महावाक्यांपलीकडे अक्षरशः नव्हतें. जन्मभर हीं दोन वाक्यें त्यांनीं हृदयीं कोरून ठेवलीं व त्याप्रमाणें आचरण ठेवलें. एवढ्याच साधनानें अत्यंत निरक्षर लाटू स्वतांच अक्षररूप पावला ! जणुं शुद्ध दगडालाच देवकळा प्राप्त झाली !

एकदां एका साधकानें खऱ्या आतुरतेनें त्यास विचारलें कीं, “ ज्याला आम्हीं कधींच पाहिलें नाहीं, त्या देवाला आम्हीं शरण कसें जावें ? ” त्यावर हे हजरजबाबी लाटूमहाराज म्हणाले, “ तूं ईश्वराला ओळखत नसलास म्हणून काय झालें ! त्याचें नांव तर तुला माहीत आहे ना ? तें घेत राहा. म्हणजे तुझें काम होईल. तुम्ही नोकरीकरतां ज्याच्याकडे अर्ज करतां, त्या साहेबाला कोठें ओळखतां ? त्याप्रमाणें ईश्वराकडे नामस्मरणपूर्वक अर्ज करावा, म्हणजे खचित दाद लागेल. ”

यालाच मी ईश्वरनिष्ठा म्हणतों. अशा ईश्वरनिष्ठाचे अनुभव ऐकून पुढें दुसरे कोणी पंडित तदनुसार शास्त्र बनवितात. श्रीसमर्थ रामदास हें असेंच एक जुनें ईश्वरनिष्ठेचें उदाहरण आहे. त्यांनीं अगोदर देव पाहिला व मग इतरांस त्याची ओळख पटविण्याकरतां दासबोध लिहिला. त्यांत ते म्हणतात—

“ देव कोणास म्हणावें । कैसें तयासी जाणावें । तेंचि बोलणें स्वभावें । बोलिजेल ॥ १६ ॥ जेणें केलें चराचर । केलें सृष्टयादि व्यापार । सकळकर्ता निरंतर । नाम ज्याचें ॥ १७ ॥ तेणें केल्या मेघमाळा । चंद्रबिंबीं अमृतकळा । तेज दिधलें रविमंडळा । जया देवें ॥ १८ ॥ ज्याची मर्यादा सागरा । जेणें स्थापिलें फणिवरा । जयाचेनि गुणें तारा । अंतरिक्ष ॥ १९ ॥ च्यारी खाणी च्यारी वाणी । चौऱ्यांसि लक्ष जीवयोनि । जेणें निर्मिले लोक तिनी । तया नांव देव ॥ २० ॥ ब्रह्माविष्णु आणि हर । हे जयाचे अवतार । तोचि देव हा निर्धार । निश्चयेसीं ॥ २१ ॥ सर्वकर्ता तोचि देव । पाहों जातां निरावेव । ज्याची कळा लीळा लाघव । नेणती ब्रह्मादिक ॥ २४ ॥ जो सृष्टिनिर्माणकर्ता । तो ये सृष्टिपूर्वी होता । मग हे तयाची सत्ता । निर्माण जाली ॥ ३० ॥ अवधी सृष्टि जो कर्ता । तो ते सृष्टीहूनि पर्ता । तेथें संशयाची वार्ता काढूंचि नये ॥ ३४ ॥ दासबोध–८।१. म्हणोनि देव वोळखावा । जन्म सार्थकचि करावा । न कळे तरी सत्संग धरावा । म्हणजे कळे ॥ ६।१५ ॥ दा. बो.

ईश्वरासंबंधीं नास्तिक्य अथवा अज्ञान दोन प्रकारचें संभवतें: (१) असत्त्वापादक म्हणजे ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल अविश्वास. (२) अभानापादक म्हणजे ईश्वराच्या अस्तित्वाबद्दल अविश्वास नसला तरी स्वत ला ईश्वराचें भान म्हणजे साक्षात्कार नसणें व त्याच्या शक्यतेबद्दल अविश्वास असणें. यापैकीं पहिलें अज्ञान शास्त्रश्रवण व शास्त्रानुकूल युक्तिवाद यांनीं होणाऱ्या परोक्षज्ञानानें अथवा अपराविद्येनें दूर होऊं शकतें. श्रद्धावतास हें अज्ञान (असत्त्वापादक) स्वभावतःच जाणवत नसावें असें वाटतें. दुसरें अज्ञान जाणण्यास पूर्वसुकृत, सत्संगति, योग्य अधिकार, नामजप, ध्यान, देवतार्चन, सतसेवा, मनन, निदिध्यासन, योग, पराविद्या व श्रीसद्गुरुकृपा अशीं एक अगर अनेक साधनें लागतात.

ज्याप्रमाणें नाटकातील उत्तम नटाला समग्र नाटकाचें रहस्य ध्यानीं बिंबवून घेणें जरूर असतें, त्यासाठीं त्यानें सूत्रधार म्हणजे नाटककार याच्याशीं समरस अथवा सहृदय होणें हाच सर्वोत्कृष्ट उपाय असतो. त्याप्रमाणें आपआपल्या भूमिका नीट करता याव्यात म्हणून या जगन्नाटकातील समग्र रहस्य जगत्सूत्रधार जो ईश्वर त्याच्याशीं तादात्म्य पावून जाणणें अवश्य ठरतें. याच दृष्टीनें भगवान पुन्. पुन्हा सांगतात कीं, "मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ॥ मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥" ९।३४, १८।६५. भगवद्गीता. शिवगीता १४।४३ ते ४५ अशा ईश्वरभक्तींत सारे दैवी गुण सहज प्राप्त होतात.

पण जगाकडे पाहता जगात खरे आस्तिक व खरे नास्तिक फारच थोडे असतील असें वाटतें. कारण, बहुतेक लोक आपणांस आस्तिक म्हणवीत असले तरी त्यांचा आस्तिक्यभाव हृदयात पूर्ण बाणलेला नसतो. तसेंच आपणास नास्तिक म्हणणें हा एका अर्थी मी मुका आहें असें म्हणण्याप्रमाणें आत्मविरोध आहे. कारण मी नास्तिक आहें, असें बोलणारे व जाणणारे नाहीं त्याचें जड शरीर नव्हे. तेंच त्यांच्या ठिकाणचें आत्मचैतन्यस्वरूप ईशस्फुलिंगच होय. शिवाय नास्तिकाची इच्छा असो नसो तो स्वाभाविकच ईश्वराकडे ओढला जात असतो. कारण नास्तिकाचीं सारीं ध्येयें हीं ईश्वरी ऐश्वर्याच्या बाहेर कोठून असणार?

मीं नित्य असावें, मीं ज्ञानवान् असावें, मीं सुखी असावें, मीं सर्वतोपरि

स्वतंत्र असावें, माझ्या अधीन सर्व कांहीं असावें, हीच मानवी ध्येयवादाची पराकाष्ठा होय. आणि हींच ईश्वराचीं लक्षणें होत. याप्रमाणें ईश्वरच नास्तिकाचा ध्येय ठरतो. शिवाय नास्तिक ज्यास पदार्थमात्राचा स्वभाव असें गृहीत मानतात, तीच ईश्वराची सत्ता होय. नास्तिक ज्या नामरूपांना अलंकार म्हणतात तेंच वस्तुतः अधिष्ठान व उपादानरूप सुवर्ण असतें. याप्रमाणें अखिल जगाचें अधिष्ठान व उपादानरूप ईश्वर मानावाच लागतो. असें आहे तरी या नामधारी नास्तिकास असें वाटतें कीं, ईश्वराचें अस्तित्व मानल्यावांचून जगाचें कोठेंच अडत नाहीं. उलट सामान्य रोजच्या प्रापंचिक दिनक्रमापासून आंतरराष्ट्रीय युद्धें, तह, व्यापार, मुत्सद्देगिरी, तसेंच यांत्रिक सामर्थ्य व शास्त्रसंशोधन अशा लहानमोठ्या व्यवहारांत कोठेंच अज्ञात ईश्वराचा हात आहे, असें कोणीच जाणत नाहींत व मानीत नाहींत. इतकेंच नव्हे तर तसें मानणें अत्यंत अव्यवहार्य होईल. ज्याप्रमाणें अंकगणितांत अज्ञात मूल्याचें 'क्ष' हें बीजाक्षर घेऊन अंकगणित करतांच येणार नाहीं, त्याप्रमाणें रोगचिकित्सा, राजकारण, शास्त्रसंशोधन अशा अनेक व्यक्त भौतिक व्यवहारांत कल्पित व अज्ञात अशा ईश्वराची अधिदैव सत्ता कारक मानून कोणताच व्यवहार विचारपूर्वक करतां येणार नाहीं. पण असें खात्रीपूर्वक म्हणणाऱ्या नास्तिकांनीं त्यांच्या देहपिण्डांतर्गत घटना कोण घडवून आणतो, याचाहि कधीं पुरा विचार केलेला नसतो. मग ते अखिल ब्रह्माण्डाच्या चालकाचा काय विचार करणार! त्यांच्या पिण्डांतील बदल करणारे षड्विकार जर त्यांच्या स्वाधीन नाहींत, तर बाह्य व्यवहाराच्या कर्तृत्वाचा वृथा अभिमान त्यांनीं धरून काय उपयोग! ज्यांचें जागतिक ज्ञान वाळवंटांतील कणाइतकेंहि नसतें; ते कसल्या उपपत्त्या लावणार! सरड्याची धांव कुंपणापर्यंत. याप्रमाणें तार्किकांची बुद्धि पदोपदीं कुंठित होत असते. ईश्वरी सत्तेकडे दुर्लक्ष करून राजवैद्याच्या चिकित्सेनें जर रोगी राजे जगते तर यापूर्वी कोणीच राजा मरताना! फार काय; नामवंत वैद्य आणि डॉक्टर हे खास स्वतांच वरून येण्याचा हुकूम सुटला कीं येथें एक क्षणभरहि थांबूं शकत नाहींत! सुखसाधनें स्वतःच्या हिकमतीनें वाढवूं पाहणाऱ्या भौतिक शास्त्रज्ञांना सुखवासना व ती पुरी करण्याचें मानवी सामर्थ्य यांचें व्यस्त प्रमाण अजून सुधारतां आलें नाहीं. सर्व मुत्सद्यांच्या एकवटलेल्या

अक्लेनें जागतिक युद्धें टळलीं नाहींत व जगांत शांतता स्थापित करतां आली नाहीं. नवरा-बायकोंतील घटस्फोट, कुटुंबांतील बेदिली, प्रजेंतील असतोष, व्यवहारांतील कपट, शेजाऱ्यांतील चुरस, तरुणांतील बेशिस्त स्वैर वृत्ति, बेकारी, अस्वास्थ्य, हीन स्वार्थ, एक ना दोन हजारों वैगुण्यें जागतिक व्यवहारांत आज वाढतच आहेत ! अहंमन्य मानवाच्या बहिर्मुख वृत्तीला तिचें ध्येय क्षितिजाप्रमाणें कधींच गांठतां येत नाहीं. असा सर्वतोपरि मानवी कर्तृत्वाचा बोजवारा दिसत असतां, ईश्वरी सत्ता न मानणाऱ्या नास्तिकाच्या अज्ञानाची कींवच करावी लागते ! आतां वर वर पाहतां केवलाद्वैत वादांत ज्याप्रमाणें जगाचें मिथ्यात्व किंबहुना अजाति म्हणजे " अरे जें जालेंचि नाहीं " अथवा " ईश्वर हाहि भ्रम निश्चयेसीं " असें मानणें भाग पडतें, त्याप्रमाणें जड भौतिक व्यवहारांत अधिदैव व अध्यात्म हीं मिथ्या मानणेंच नास्तिक बुद्धीस सयुक्तिक वाटतें. याप्रमाणें ब्रह्मवादांत व जडवादांत कोठेंच ईश्वरवादाला अवसर मिळत नाहीं, असें सकृद्दर्शनीं भासतें.

पण याप्रमाणें जडाद्वैत व केवलाद्वैत या तात्त्विक वादांत जरी कांहीं काळ ईश्वरवादाचा विचार न करून चाललें, तरी व्यष्टि-समष्टीच्या वैयक्तिक व जागतिक प्रत्यक्ष व्यवहारांत व पारमार्थिक साधनमार्गांत तो फार वेळ टाळून चालत नाहीं. म्हणून केवळ हिंदुधर्मांतच नव्हे तर सर्व धर्मांत, इतकेंच काय तर आधुनिक भौतिक विज्ञानवाद्यांच्या जगांत, कोणत्याना कोणत्या रूपांत पुढेंमागें तो मान्य केलेला दिसतो. यासंबंधीं आपल्याकडील सर्व आस्तिक नास्तिक दर्शनांचा सारांश पुढें देत आहें.

सकृद्दर्शनीं पाहतां ईश्वरवादापुरतें आपल्याकडील सारेच दर्शनकार प्रथम निरीश्वरवादी वाटतात. दु:खाची अत्यंत निवृत्ति व निरतिशयानंदाची नित्य प्राप्ति–हें साऱ्या नास्तिक आस्तिकांचें परमध्येयाचें स्वरूप निर्विवाद आहे. ऐहिक सुखवाद ऐहिक सुखसाधनांच्या समृद्धीनें पुरा होतो, असें नास्तिकांस प्रथम वाटलें ; तसेंच पारमार्थिक सुखलाभ तत्त्वज्ञानानें अथवा आत्मज्ञानानें दु:खनिवृत्तिरूप मिळतो, असें मूळ सर्व आस्तिक दर्शनकारांनीं प्रथम मानलें असलें, तरी पुढें वरील दोन्ही पक्षांना सुखाचा सेतुरूप ईश्वर मानल्यावांचून गत्यंतर नाहीं असें कळून आलें आहे. व पुढें सारेच विचारी पुरुष आस्तिक ईश्वरवादी बनले आहेत. इतकेंच नव्हे तर सुज्ञांस असें निश्चित कळून आलें आहे,

की, ईश्वराचें आस्तिक्य सिद्ध करणें जितकें कठिण आहे, त्याहूनहि ईश्वराचें नास्तिक्य सिद्ध करणें अधिक कठिण आहे. कारण जगाची व्यावहारिक सत्ता कोणासच नाकबूल करतां येत नाहीं व ती सत्ता ईशसृष्ट आहे असें मानणें भाग पडतें. मग त्या ईश्वराचें वास्तविक स्वरूप कोणास कळो वा न कळो. इतकेंच नव्हे तर, राजसत्ता जरी अमूर्त असली, तरी ती सत्ता ज्या विभूति-रूपांत कार्य करते ते ते लहानमोठे अधिकारी व्यक्त असतात व त्यांचें विभूतिमत्त्व त्यांच्यातील राजसत्तेच्या अंशामुळेंच असतें हें जसें सामान्य मनुष्यासहि पटतें; अथवा दुसरें उदाहरण घ्यावयाचें तर विद्युत् केवळ रूपांत कोणासच कळली नाहीं, तरी गति, प्रकाश, रोगनिवारण इत्यादि अनेक कार्यरूपांत तिचें अस्तित्व विविध रूपांत निर्विवादपणें प्रत्ययास येतें; त्याप्रमाणें अज्ञात ईश्वराची सामान्य सत्ता जरी अव्यक्त असली तरी त्या सामान्य सशक्तिक शिवाचे कार्यानुमेय असणारे ऋषि, देवता, पितररूप विविध शक्ति-केन्द्रें मानणें विचारी मनुष्यास भागच पडतें. कारण कोणतींहि शक्तिकेन्द्रें यंत्राप्रमाणें जड मानतां येत नाहींत. त्यांच्या मागें ज्ञान, इच्छा, क्रियावान्, चेतन शक्तिमान् मानावेच लागतात. असें हें ईश्वरवादाचें व देवताविज्ञान-वादाचें थोडक्यांत स्वरूप आहे. त्याचेंच थोडें स्पष्टीकरण पुढें करीत आहें.

## सर्वदर्शनकारांचें आस्तिक्य

(१) न्यायदर्शनांत—मोक्षाच्या ज्ञानभूमिकेवर ईशसत्ता मानण्याची गरज प्रथम न भासली, तरी कर्मफलाला ईश्वराची निमित्तकारणता पुढें मानवीच लागली; म्हणजे जीवाच्या कर्मांचें फल त्यांना योग्य वेळीं योग्य प्रकारें मिळणें हें ज्याच्या अधीन आहे, अशी ईशसत्ता मानणें, तसेंच या कार्यब्रह्मरूप जगताकडे पाहून त्याचा स्रष्टा कोणी ईश्वर मानणें न्यायशास्त्रास भागच पडलें.

---

१ ईश्वरः कारणं पुरुषकर्माफल्य दर्शनात्। न्यायदर्शन.

२ क्षित्यादिकं सकर्तृकं कार्यत्वाद् घटवत् ॥२१॥ सूत्र. न्यायवृत्तिकार विश्वनाथ.

(२) वैशेषिकदर्शनांत—वरीलप्रमाणें तत्त्वज्ञानानेंच दुःखनिवृत्तिरूप मुक्ति मानल्यामुळें प्रथम ईश्वर मानण्याची गरज वाटली नाहीं. तरी पुढें घटपट इत्यादि संज्ञांनीं तत्तत्पदार्थाचा बोध होतो, याचें कारण तसा ईश्वरी संकेत होय, असें मानावें लागतें. त्याचप्रमाणें जगदुत्पत्तीला घटकुलाला-प्रमाणें निमित्तकारण ईश्वर मानावाच लागतो. तसेंच पदार्थसमूहाचें तत्त्व-ज्ञान ईश्वरप्रेरणाजनित धर्मामुळेंच उत्पन्न होतें आणि सकलभुवनपति जो मायामहेश्वर त्याच्या अलौकिक इच्छेमुळेंच परमाणूंत स्पंदनशक्ति उत्पन्न होऊन जगाची उत्पत्ति, स्थिति व लय संभवतात, असेंहि मानणें भाग पडतें.

(३) योगदर्शन—इतर दर्शनांप्रमाणें प्रकृतीशीं संबंध सोडल्यामुळें दुःखनिवृत्ति होऊं शकते; म्हणून इतर दर्शनांप्रमाणें याहि दर्शनाच्या ज्ञानभूमिकेनुसार मुक्तीशीं ईश्वरसत्तेचा साक्षात् संबंध येत नाहीं. पण या दर्शनांत साधनरूपांत ईश्वरसत्तेचा संबंध येतोचें; म्हणून या दर्शनांत ईश्वररूपाचें किंवा परमगुरुरूप ईश्वराचें वर्णन अवश्य येतेंचें. ईश्वरप्रणि-धानाचा उल्लेख साधनरूपानें योगदर्शनांत अनेक प्रकारें आला आहे. "सगुणाचेनि आधारें ॥ निर्गुण पाविजे निर्धारें।" हा साधनमार्ग आहे. ईश्वरी कृपेवांचून ब्रह्मात्मैक्यज्ञान होत नाहीं.

(४) सांख्यदर्शन—यांतहि मुक्तीसाठीं ईश्वरी सत्ता मानण्याची गरज प्रथम वाटली नाहीं. पण अलौकिक प्रत्यक्षाच्या साहाय्यानें ईश्वराची सत्ता पुढें मानली आहे ईश्वराची इच्छा सांख्य मानोत न मानोत, ईश्वराचें प्रकृतीशीं (लोहचुंबकाप्रमाणें) सान्निध्य पुरुष म्हणून त्यांस मानावेंच लागलें आहे. त्यांत असलय पुरुषरूप समष्टि ईश्वराचें अस्तित्व सहजच सिद्ध होतें. मुक्त

१ "संज्ञाकर्मत्वस्मद्विशिष्टाना लिङ्गम्" "प्रत्यक्ष प्रवृत्तत्वात्संज्ञाकर्मणः"
—वै. दर्शन

२ तच्च ईश्वरेनोदनाभिव्यक्ताद्धर्मादेव। —प्रशस्तपादाचार्य

३ "ईश्वरप्रणिधानाद्वा।" समाधिसिद्धिरीश्वरप्रणिधानात्।
—कल्याण ईश्वरांक, पृ. ३०७.

४ तस्मिन् परमगुरौ सर्वकर्मार्पणम्। —वेदव्यास

५ "तत्सन्निधानादधिष्ठातृत्वं मणिवत्।" "अनेनैवजीवेनात्मनाऽ-नुप्रविश्य नामरूपे व्याकरोत्।" —छांदोग्य उप.

पुरुषांनीं व सिद्ध उपासकांनीं अनेक शास्त्रांत वरचेवर ईशस्तुति केली असल्यामुळें ईश्वरासंबंधीं संदेह मानतां येत नाहीं असेंहि सांख्य म्हणतात.

(५) **कर्ममीमांसा**—कर्ममीमांसाकार जैमिनीनें ईश्वर नाहींच असें जरी स्पष्ट म्हटलें नाहीं तरी वैदिक धर्म-कर्म फलदातें आहे; त्यासाठीं ईश्वराचें अस्तित्व मानण्याची गरज नाहीं, असें त्यांचें मत दिसतें. पण कट्टा कर्ममार्गी कुमारिल शिवभक्त होतां, इतकेंच नव्हे तर शिवमहिम्न रचणार पुष्पदंत आणि कुमारिल एकच, असें कोणी म्हणतात. पण तो सृष्टिकर्ता ईश्वर मानीत नव्हता असें दिसतें. कांहीं असो, पुढील मीमांसक ईश्वर मानूं लागले हें खरेंच. देवता ते पूर्वींच मानीत होते. या दर्शनांत परमात्म्याचें ऐश्वर्य, माधुर्य आणि ज्ञानभाव यांची क्रमशः पूर्णतेनें सिद्धि केली आहे. या दर्शनांत कर्मप्रेरक देवतांचा महिमा, यज्ञस्वरूप भगवान् विष्णूचा महिमा व वेद ज्याचे निःश्वास आहेत त्या वेदकर्त्या ईश्वराचा महिमा, वर्णिलाच आहे आणि सर्व देवतागण त्याच्या आज्ञाधारक व्यक्ति मानल्या आहेत.

(६) **भक्तिमीमांसा**—या शास्त्रांत ईश्वराच्या माधुर्यभावाचें स्पष्टीकरण आहे. या भावांत भगवान् दयामय, स्नेहमय, प्रेममय, प्रभु आदि असें वर्णिलें आहे. भक्तिमीमांसेचा मुख्य विषयच देवदेवता हा असल्यामुळें यांत ईश्वरास्तिक्याबद्दल प्रश्नच संभवत नाहीं.

(७) **ब्रह्ममीमांसा**—ब्रह्मात्मैक्याची म्हणजे केवलाद्वैताची अपरोक्षानुभूति हेंच या मीमांसेचें अंतिम रहस्य आहे. तरी या दर्शनशास्त्रांत

---

१ मुक्तबद्धयोरन्यतराभावान्न तत्सिद्धिः ।

२ Indian Philosophy by Sir Radhakrishnan, Vol. II, pp. 424–29.

३ कल्याण शिवांक.

४ श्लोकवार्तिक, वेदान्त देशीकाची सेश्वरमीमांसा. —तन्त्रवार्तिक पहा.

५ आम्नायस्य क्रियार्थत्वादानर्थक्यमतदर्थानाम् ।

—कल्याण ईश्वरांक, पृ. २१०.

६ शांडिल्य व नारद यांचीं भक्तिसूत्रें. महर्षि अंगिराकृत दैवी मीमांसा-दर्शन पहा. रसो वै सः। इ. श्रुति तेंच दर्शवितात.

जगाचें निमित्त व उपादानकारण म्हणून ईश्वराची सत्ता मानलीच आहे. नित्य, शुद्ध, बुद्ध, निखिलकारण, परमकरुणामय अशी ईश्वरस्वरूपांत सम्यक् उपलब्धि झाल्यानेंच मुमुक्षूचें संसारबंधन निरस्त होतें असें या शास्त्रांत मानलें आहे. तसेंच कर्माचा फलदाता ईश्वरच मानला आहे. ईश्वराची व्यावहारिक सत्ता केवलाद्वैती वेदान्ताला मान्य आहेच आहे.

येथपर्यंत आपल्या आस्तिक दर्शनांचा विचार सांगितला. आतां नास्तिक दर्शनांचा विचार पाहू.

**(८) जैनदर्शन** — जैन पंथ हा जरी मूळचा नास्तिक म्हणजे वेद-प्रामाण्य न मानणारा व निरीश्वरवादी असला तरी याहि पंथांतील जिन म्हणजे पूर्ण पुरुष अथवा मुक्त, अर्हत व तीर्थंकर यांची हिंदूंच्या देवतां-प्रमाणें परमात्मभावनेनें भक्ति व उपासना त्यांच्यांत पुढें सुरू झालीच. तसेंच जीव, जगत् आणि ईश्वर या एकाच मूळ तत्त्वाच्या तीन अवस्था ते मानूं लागले. आजच्या जैनांत पुष्कळ वैष्णव आहेत. पूर्वीहि ते इंद्रादि देवता मानीतच होते[३]. शिवाय जैनधर्मसंस्थापक ऋषभ देव हा नारायणाचा अवतार होय असें भागवतांत म्हटलें आहे[४].

**(९) बौद्धदर्शन**—हें मत आरंभीं वेदविरोधी व निरीश्वरवादी असें होतें. पण पुढें कांहीं जैन जसे वैष्णव बनले तसेच कांहीं बौद्ध शैवपंथी बनले. शिवाय कांहीं बौद्धांवर भगवद्गीताधर्माची विशेष छाप पडली. गौतम बुद्ध हा विष्णूचा नववा अवतार मानतात. पुढें पुढें तर "धर्मकाय" म्हणजे निर्विशेष ब्रह्म, "संभोगकाय" म्हणजे सगुण ब्रह्म, "निर्माणकाय" म्हणजे अवतारी पुरुष, अशी परिभाषा बौद्धधर्मांत सुरू झाली. आणि अखेर बौद्धधर्म हिंदुस्थानांतील मूळच्या हिंदुधर्मांत विलीन झाला. तात्पर्य, मूळ बौद्धदर्शनांत ईश्वर हा जरी शब्द नाहीं तरी त्यांचा अवलोकितेश्वर हा

---

१ जन्माद्यस्य यतः। ब्र. सू. १।१।२. योनिश्च हि गीयते। ब्र. सू. १।४।२७; तस्माद् ब्रह्मकार्यं वियदिति सिद्धम्। अपाणि पादोजवनो ग्रहीता। श्वे. उ. ३।१९. लोकवत्तु लीला कैवल्यम्। ब्र. सू. २।१।३३.

२ फलमतः उपपत्तेः। ब्र. सू. ३।२।३८; १।४।२३ ते २७.

३ तीर्थंकर महावीर यांचें चरित्र पहा.

४ भागवत ५।४–६

शब्द ईश्वरवाचीच आहे. तसेंच जगतातील अतस्थ समतावाचक जो "धर्म-काय" शब्द हा परमेश्वर या शब्दाचाच पर्याय आहे. मानवाच्या जीवनाच्या अतर्गुहेंत जी समान अनुभूति ते मानतात, तीच परमेश्वरसत्ता होय जगाचें नियत्रण करणारी व अवश्यमेव आज्ञापालनीय अशी ती (परमेश्वरी) सत्ता ते मानतातच या सत्तेचा अनुभव शाब्दिक ज्ञानानें होत नाहीं तो उपासनेचा विषय आहे, असेंहि बौद्ध पुढें मानू लागले व गौतम बुद्ध या ईश्वरी अवताराची ते उपासनाहि करू लागलेच तात्पर्य, बौद्ध हे केवळ शून्यवादी किंवा निरात्मवादी आहेत असेंच मानावयास नको.

(१०) **नास्तिकदर्शन**—जडवादी नास्तिक अनादि व परिवर्तनशील अशा जडद्रव्याचीच सर्वत्र सर्वकाल सत्ता मानतात चेतन हा जडातून उद्भूत होणारा आगतुक व अशाश्वत गुण आहे असा त्याचा सिद्धान्त दिसतो पण याप्रमाणें जडद्रव्याची अनादि सत्ता मानणारा जडवादी ह्या जडाच्या अनादि सत्तेचा चेतन साक्षी नकळत गृहीत धरीत असतोच अनादि या कल्पनेची कल्पना जशी कल्पकावाचून सभवत नाहीं, त्याप्रमाणें अनादि सत् चित्च्या ज्ञानप्रकाशावाचून सिद्ध कसें होईल? आता तर आईनस्टीन, एडिंग्टन, सर जेम्स जीन्स, मॅक्स प्लैंक, बर्नहार्ड वेवनिक, जे मॅकेंझी, रसेल, एडिसन, पाश्चूर इत्यादि बहुतेक सारे प्रमुख आधुनिक शास्त्रज्ञ या अनादि कल्पक समष्टिमनाची म्हणजे ईश्वराची सत्ता निर्विवाद सिद्ध मानतात या विश्वामागें ज्ञान, इच्छा, क्रियावान् कोणी चेतन ईश्वर मानल्यावाचून गत्यतरच नाहीं असें भौतिकशास्त्रज्ञास आता पटलें आहे जड विषयापासून विषयी ज्ञाता मागून उत्पन्न होतो असें मानणें अत्यत असबद्ध आहे विषय-ज्ञान ही मानसिक क्रिया आहे इतकेंच नव्हे तर ज्या दिक्कालात विषय भासतो, ते दिक्काल हे स्वतत्र पदार्थ नसून ते द्रष्ट्याच्या मानसिक क्रियारूपच

१ सवालबन धर्मश्च सर्वतत्त्वैरशेषत । सर्व क्लेशाशये शून्य न शून्य परमार्थत ॥

२ अनेक आधुनिक भौतिक तत्त्वज्ञाच्या अशा आस्तिक्य भावाच्या स्पष्ट वचनाचा सग्रह श्री कोलगडे याच्या याज्ञवल्क्यदर्शन या ग्रथात केला आहे येथें विस्तारभयास्तव तो गाळला आहे तसेंच डॉ आत्रेय याचें योगवासिष्ठ व मॉडर्न फिलॉसफी हा इग्रजी ग्रथ पहावा

असतात. दृश्य विषयाची द्रष्ट्याच्या प्रतीतिमात्र सत्ता असते. अर्थात् ज्याची मूळ प्रतीति तो एक ज्ञाता ईश्वरच काय तो असतो. त्याहून पृथक् अन्य कांहींच नसतें, हें आतां भौतिक शास्त्रज्ञांना पटलें आहे. सृष्टि ही शिवसंकल्पमात्र आहे. मग त्या ईशसृष्टीचें मानवाच्या सदोष दृष्टीला थोडेंफार अयथार्थ दर्शन घडत असेल ती गोष्ट वेगळी.

व्यष्टिजीवाचें बाह्यार्थज्ञान आत्मभानपूर्वक असतें. गाढ झोंपेंत आत्मभान नसतें. तेव्हां जगभान नसतें. अहं हा मानवाच्या अंतर्गत जगाचा केन्द्र आहे. त्याचप्रमाणें ईश्वर हा अंतर्बाह्य सर्व जगताचा केन्द्र मानावाच लागतो. गाढ झोंपेंत देहभान नसतें अशा वेळीं पिंडांतर्गत अज्ञात क्रिया चिच्छक्तीच्या प्रेरणेनें चालतात असें मानल्यावांचून गत्यंतर नसतें. आतां ईश्वर असता तर दिसला असता, तो दिसत नाहीं म्हणून नाहीं, हें म्हणणें अविचाराचें आहे. वस्तुस्थिति अशी आहे कीं, ईश्वरावांचून अन्य कांहींच नसतें. पण जें जें दिसतें तें आत्मभिन्न म्हणून अनात्मजात नामरूप तत्त्वतः नसतेंच. शिवाय अदृश्य विश्वाच्या मानानें दृश्य जग हें वाळूच्या कणाप्रमाणें अगण्य आहे.

वस्तु असूनहि दिसत नाहीं याचीं कारणें अनेक सांगतां येतील. उदाहरणार्थ, (१) अति सामिप्य —डोळ्यांत घातलेलें काजळ डोळ्यांना दिसत नाहीं. पोटांतील गर्भाला मातेचें ज्ञान नसतें. त्याप्रमाणें ईश्वर आपल्या अति सन्निकट आहे. त्याच्याच पोटांत आपण आहोंत म्हणून तो या चर्मचक्षूंना दिसत नाहीं. (२) ज्ञानेंद्रियांचा अपघात झाला असेल तर बाह्य वस्तु असून भासत नाहीं. अंधास दिसत नाहीं. बधिरास ऐकूं येत नाहीं. याप्रमाणें ईश्वरास जाणण्याची जी दिव्य दृष्टि म्हणजे ज्ञानेंद्रिय संतांस असतें तें आपलें उघडलेलें नसतें, म्हणून ईश्वर-स्वरूपास साक्षात्कृत होत नाहीं. (३) मनाचें विषयग्रहणाकडे अवधान नसेल तर डोळ्यांपुढील विषयहि दिसत

१ Kingsland rational Mysticism, Wisdom of the overself by Paul Brunton. Man and his becoming by Rene Guenon. Personality of man by Tyrell पहा. याशिवाय जेम्स मार्टिन्यू, डॉ. एम्. पेपिन, कर्टची मॅथ्यू, जॉन फिरक इत्यादींचे ग्रंथ पहा.

नाहीं. याप्रमाणें आपल्या बुद्धीचें अंतर्मुखतेनें ऐकाग्र्य होत नसल्यामुळें हृदयस्थ देव दिसत नाहीं. आपलें मन ऐहिक विषयांत गुंतलेलें असतें. यामुळें "देव जवळी अंतरीं। भेटी नाहीं जन्मवेरी।" अशी स्थिति आहे. (४) पदार्थ अति सूक्ष्म असेल तर तो जवळ असूनहि दिसणार नाहीं. त्याप्रमाणें ईश्वर हा सूक्ष्मातिसूक्ष्म पदार्थ आहे. ईश्वरच जगरूपांत नटला आहे. कोणत्याहि देहाकार नामरूपांत तो व्यक्त होतो हें जरी अनुभवसिद्ध सत्य असलें तरी आपण जागे होण्याच्या प्रथम क्षणांतील अहंप्रतीति जशी अव्यक्त, अरूप व निर्विकार असते तसें सुषुप्तिनुमुख ईश्वराचें मूळचें स्वरूप निर्गुणनिराकार आहे. तें इंद्रियें, मन, बुद्धि यांच्या अन्य विषयांहून अति सूक्ष्म आहे. विद्युत्कण, आकाश, गुरुत्वाकर्षणशक्ति, संक्रमित होणारे विचार, रेडिओंतून येणाऱ्या ध्वनिवाहक परिवर्तित विद्युल्लहरी व द्रव्यपरमाणु सूक्ष्मतेमुळें इंद्रियगोचर होत नाहींत. या सर्वांहून ईश्वर अति सूक्ष्म आहे. ईश्वराला पुरुष म्हटलें तरी वस्तुतः तें सच्चिदानंदलक्षणतत्त्व आहे. (५) बाह्य वस्तु व आपण यांच्या मध्यतरीं भिंतीसारखें कांहीं व्यवधान असेल तर ती वस्तु दिसत नाहीं. पेटींतील किंवा खिशांतील वस्तु जवळ असून दिसत नाहीं. याप्रमाणें ईश्वर आणि आपण यांच्यामध्यें सत्त्वरजतमात्मक, किंवा नामरूपकर्मात्मक मायेचा पडदा आहे. यामुळें त्यापलीकडील सच्चिदानंद परमात्मा असून दिसत नाहीं. (६) अभिभव म्हणजे पराभव झाला असतां बाह्यवस्तु असून दिसत नाहीं. सूर्यप्रकाशांत नक्षत्रें दिसत नाहींत. याप्रमाणें ब्रह्मात्मैक्याच्या प्रकाशांत ईशस्वरूप जाणवत नाहीं. (७) समानाभिहार म्हणजे पावसाचे थेंब पाण्यांत मिसळले तर ते दिसत नाहींत. ईश्वराचें द्वैत-अद्वैत सत्यांत मावळतें. (८) अनुद्भव म्हणजे वस्तु आपल्या उपादानकारणांत पाषाणांतील अव्यक्त मूर्तीप्रमाणें अव्यक्त असेल तर ती दिसणार नाहीं. जसें दुधांत तूप दिसत नाहीं. सुषुप्तींत जीवमान नसतें. त्याप्रमाणें ब्रह्मांत सुषुप्तिनुमुखता आली नाहीं तोंवर ईश्वर अव्यक्तच असतो. (९) अति दूरची वस्तु असूनहि दिसत नाहीं. कोट्यवधि तारे आकाशांत असूनहि अति दूर असल्यामुळें दिसत नाहींत. ईश्वर कोठें तरी आकाशांत अति दूर आहे, अशा

१ जें देखलियाचि सवें। दृश्य द्रष्टा हें आघवें। एकवट कालवे। सामरस्यें॥
—१३।९३७ ज्ञानेश्वरी

अंतराच्या दृढ भावनेमुळें तो जवळ असून दिसत नाहीं. सूक्ष्मता आणि दूरता हीं न दिसण्याचीं कारणें तत्त्वतः एकरूपच वाटतात.

आवरणशून्य त्याचप्रमाणें बाह्य सत्तेचा संबंधशून्य अशा विशुद्ध विश्वोपादानकारणांत जी ज्ञानशक्तीची व क्रियाशक्तीची व्यक्तता होते, ती अपरिच्छिन्न, अप्रतिहत आणि अनंत असते. तेंच ईश्वराचें नामांतर होय. दृष्टिसृष्टिवादांतील एकच एक द्रष्टा तो ईश्वरच. ज्या अवस्थेंत अतीत आणि अनागत हें वर्तमानकालरूपच असतें, ज्या पूर्णज्ञानभूमींत कालभेद, घटनाभेद, भावभेद, क्रियांचें तारतम्य इत्यादि कांहीं व्यक्त नाहीं, अशा कारणजगताचा अधिष्ठाता ईश्वर होय. प्रामाणिक भविष्यत् दर्शनद्वारां, सदा वर्तमानकालस्वरूप अशा ईशसत्तेचें अनुमान होऊं शकतें. या नित्य परिवर्तनशील जगताचा जो एक स्थिर नित्य द्रष्टा तोच ईश्वर होय. शैवांच्या छत्तीस तत्त्वांचा अनुक्रम असा आहे—(१) परमशिव किंवा परासंवित, (२)शिवतत्त्व (उन्मनी शक्ति), (३) शक्तितत्त्व (समनी शक्ति), (४) सदाख्यतत्त्व (नादशक्ति), (५) ईश्वरतत्त्व (बिंदुशक्ति). अहं आणि इदं हीं दोन तत्त्वें ईश्वरतत्त्वांत संमीलित असून तें तत्त्व इदंताप्रधान आहे. सदाख्यतत्त्व (सदाशिव) अहंताप्रधान आहे. त्याच्या ठिकाणीं इदंतारूप जगताचा लय आहे. ब्रह्म + सत्त्वप्रधान माया व त्यांत ब्रह्माचें प्रतिबिंब तोच मायामहेश्वर ईश्वर होय, असें वेदान्तमत दिसतें.

शिवगीतेवरील वेदेश्वरी टीकेंत शिवाचे तोंडीं स्वानुभवी संत श्रीहंसराजस्वामी यांनीं पुढीलप्रमाणें निरूपण घातलें आहे. "देव हो सृष्टीपूर्वी मी एक, असतां मीच झालों सकळिक। भूतभावीवर्तमान तिन्ही लोक। दुजें काय येथें मजहुनी ॥ २२३ ॥ हे सृष्टिनामरूपात्मक सारी। झालीच नव्हती चित्सागरीं। तरंगेंवीण समुद्रापरी। मी एकलाचि असें ॥ २२४॥ वायूवीण जेवीं आकाश। तेंवी मायेवीण मी परेश। सच्चिद्घन अविनाश। परब्रह्म ॥२२५॥ मनेंवीण जेंवी प्रत्यगात्मा। तेवी मायेवीण मी परमात्मा। अभेद परी दिधली उपमा। शिष्य बोधार्थ ॥ २२६ ॥ आत्मा अस्तिभातिप्रिय जाणावा।

१ मागें पुढें ब्रह्म दाटे। म्हणती देव आहे कोठें ॥ १ ॥ जयासवें येती जाती। तया कोणी नोळखती ॥ २ ॥ मृगनाभीचा परिमळ। परि तो हिंडे रानोमाळ ॥ ३ ॥ तुका म्हणे ऐसी भ्रांति। देव असतां नाहीं म्हणती ॥ ७ ॥

परमात्मा सच्चिदानंद ओळखावा । येथें वाउगाचि प्रीत्यर्थनावा । भेद झाला ॥ २२७ ॥ मीठ मोतीं आणि गार । हे पाणीयाचे तीन प्रकार । तेवींच जडचंचळ आणि मिश्र । अन्यथा भाव स्वरूपाचे ॥ २३५ ॥ तस्मात् सर्व जगीं मी ब्रह्म असें । विकारामाजीं ही पाणी जैसें । मज वेगळें जगीं कांहीं नसे । तरंगीं पाण्याविण ॥ २३६ ॥ घटामाजीं जेवीं माती । पटीं तंतूच आदि अंतीं । तेवीं मी या सर्व जगतीं । मजवीण यांत काय दुजें ॥ २४८ ॥ सुवर्णांचे मणी केले । सुवर्ण तंतूनें ओंविले । वरी सुवर्णपत्रियें मढिले । तया व्याप्य व्यापलें म्हणावें ॥ २५० ॥ जग हें अस्तिभातिप्रियात्मक । त्या अंतरीं मी अनंत व्यापक । बाहेरींही मी सच्चिद्घन एक । व्याप्यव्यापक या नांवें ॥ २५१ ॥ सविशेष तरी झालेंचि नाहीं । निर्विशेषाचि असे कालीं तिहीं । परी सविशेषावीण निर्विशेष कहीं । अनुभवासी न ये ॥ २५७ ॥ अ० ६

अशा ईश्वराचा साक्षात्कार केव्हां होतो, त्याचें ज्ञानदृष्टीनें उत्तर असें आहे की, मानवी बुद्धींत सात प्रकारच्या स्वाभाविक प्रेरणांचे तरंग असतात. ते नाहींसे झाले तर तेथेंच तो साक्षत्कृत होतो. या ज्ञानप्रेरणा अशा- ( १ ) प्रेप्सा = कांहीं तरी प्राप्तीची इच्छा. ( २ ) जिहासा = कांहीं नसावें ही इच्छा. ( ३ ) जिज्ञासा = कांहीं जाणावें ही इच्छा. ( ४ ) चिकीर्षा = कांहीं तरी करावें ही इच्छा. ( ५ ) शोक = गत गोष्टींबद्दल दुःख. ( ६ ) भय = आगामी संकटाची चिंता आणि ( ७ ) अतृप्ति = विषयाविषयीं असंतोष. ज्ञानी भक्ताच्या या साती प्रेरणा निःशेष मावळलेल्या असतात, म्हणून त्याला अखंडानंदाची अपरोक्षानुभूति सहज प्राप्त होते.

नुसत्या शब्दपाडित्यानें किंवा युक्तिवादानें ईश्वराची सिद्धि करतां येणें शक्य नाहीं. फार फार तर ईश्वराच्या अस्तित्वाची संभाव्यता जाणवेल. त्यांत खरें समाधान नाहीं. तुकोबाराय म्हणतात कीं, "अन्नाच्या परिमळें जरि जाय भूक । तरि कां हे पाक घरोघरीं ॥ ", " शिवो भूत्वा शिवं यजेत् । " ही शिवभक्तीची व्याख्या आहे. निष्काम कुमारिकेला संभोगसुखाची कल्पना करतां येणार नाहीं. शब्दपंडितांच्या बुद्धीचें ईश्वरासंबंधीं परोक्ष ज्ञान आणि अशिक्षित भक्ताच्या अंतस्फूर्तीची तत्संबंधीं अपरोक्षानुभूति यांत महदंतर आहे.

ईश्वरी साक्षात्कार कसा असेल म्हणजे ईशसत्तेची प्रचीति कशी येत असेल, हा मुद्दा चिंतनीय आहे. अर्जुनास ईश्वर त्याच्याचसारख्या मानव-

देहरूपात, चतुर्भुज विष्णुरूपांत व दिव्य विश्वरूपांत दिसला. द्रौपदीस तो वस्त्ररूपांत प्रचीतीस आला, असे ईशप्रत्ययाचे असंख्य प्रकार संभवतात. भाविक भक्तांस, संकटग्रस्त व असहाय्य अशा सात्त्विक व्यक्तींस, त्यांच्या उत्कट भावनांनुसार किंवा पूर्वसुकृतानुसार व प्रसंगानुसार ईश्वर शिव, राम, कृष्ण, देवी अशा एखाद्या पुराणोक्त दिव्य स्वरूपात किंवा अन्य अगदीं साध्या रूपांतहि प्रत्यक्ष व्यक्त होतो. अशा असंख्य घटना ठिकठिकाणीं घडत आलेल्या आहेत. अशा वेळीं उपकृत व्यक्तीस ईशसाक्षात्कार घडल्याबद्दल मनोमय निःसंदेह खातरी पटते. याचप्रमाणें ईश्वराची अपुरुषविध निराकार रूपांतहि प्रचीति येत असते. उदाहरणार्थ, दिव्य ज्योतिस्वरूपांत, अथवा प्रकाशरूपांत, व्यापक चिद्रूपांत अथवा निरतिशयानंदरूपांतहि ईश्वर साक्षात्कृत होतो. ब्रह्मात्मैक्याचा अद्वयानंद हेंहि त्याच्या प्रतीतीचें रूप संभवतें. समष्टि-भावांत साधकाचें मन समरसता पावणें असाहि शिवानुभव असतो. अकल्पित व अचूक प्रेरणा, अचानक संकटनिरसन, असामान्य मनःशांति असे शिवसान्निध्यदर्शक अनेक प्रकार घडत असतात.

शास्त्र सांगतें कीं, सगुण ईश्वराची मूर्ति असो किंवा अन्य कोणतेंहि दृश्य अगर मनोवेद्य असो, ईश्वर त्या अतीत आहे. या पुढें ठाकलेल्या जगांतील नामरूपकर्मादि उपाधींचा बाध करून त्यांत नुसता सच्चिदानंद पाहावा. बाह्यार्थांच्या भिन्नाकृतींकडे दुर्लक्ष करून त्यांतील नुसता "आहेपणा" निरखावा. विषयज्ञानाचे सारे परिच्छिन्न भाव सोडून केवळ "ज्ञान" जाणावें. विषयानंदात विषयांचीं चारखंडें उपेक्षून वासनाशांतिरूप अथवा

---

१ पंधरा दिवसामाजीं । साक्षात्कार झाला । विठोबा भेटला । निराकार ॥
—तुकोबाराय

वस्तु वृत्तीस कवळे । तेणें वृत्ति फाटोन वितळे ।
निर्गुण आत्माच निवळे । जैसा तैसा ॥ दासबोध ९।९।३७

"मैं समझता था कहीं भी कुछ पता तेरा नहीं । आज शंकर तू मिला तो अब पता मेरा नहीं ।॥"

एकदां श्रीरामकृष्णांनीं आपल्या शिष्यांना शब्दब्रह्म म्हणजे काय तें सांगितलें. त्यानंतर त्यांच्या राखलनामक शिष्यास तो त्याच दिवशीं योग-साधन करीत असतां झाडांवरील सर्व पक्षी वेदघोष करीत आहेत असा साक्षात्कार झाला !

निर्वासनरूप निरुपाधिक शुद्ध आनंद चाखावा, अशा अनेकविध शास्त्रोक्त युक्तिवादानें किंवा विचारसूत्राच्या आधारानें देवदेवता विज्ञानाचा स्वर्ग प्रत्यक्ष गांठतां येत नाहीं. आकाशलाहि गाळून गगनाच्या गाभारूप ईशतत्त्वंत कसें समरस व्हावें तें अखेर समजतच नाहीं. Love is God in essence and God is love in solution अशा शास्त्रानुकूल पुष्कळ युक्तिवाद केला अथवा शास्त्र श्रवण केलें तर त्यानें फार तर ईश्वराच्या अस्तित्वावरील अविश्वास दूर होईल; पण ईश्वराचें अभानात्मक अज्ञान त्यानें दूर होणार नाहीं. वर सांगितल्याप्रमाणें अज्ञात ईश्वरासंबंधीं परोक्ष कल्पना होणें व त्याच्या अस्तित्वाचा अपरोक्ष साक्षात्कार होणें यांत महदंतर आहे. तसें पाहतां ज्यांना सूक्ष्म युक्तिवाद करता येत नाहीं व शास्त्रश्रवण घडलें नाहीं, अशा शिक्षणशून्य निरक्षर शूद्रातिशूद्र संतांनीं एका उत्कट व निर्मळ भगद्भावाच्या बळावर तें ईश्वरस्वरूप आकलन केलें, असें त्यांच्या कृतार्थतेच्या धन्योद्गारां-वरून स्पष्ट दिसतें! त्यांना शब्दब्रह्मासंबंधीं शाखाचंद्रन्यायदृष्टि आणि जहदजहल्लक्षणा कोणीं शिकविली? त्यांना योग, याग, तप इत्यादि दुर्घट साधनें अप्राप्तच होतीं. फार काय देवळाच्या गाभाऱ्यांत जाऊन देवाच्या मूर्तींच्या पायांवर आपलें मस्तक ठेवण्याची व देवाच्या मूर्तीला अगदीं जवळून प्रेमार्द्र दृष्टीनें न्याहाळण्याची अथवा त्याच्या कानाशीं लागून हितगूज करण्याची संधि त्यांस मिळत नव्हती. मग त्यांनीं या जगमायेचा नामरूप-कर्मात्मक पडदा कसा दूर करावा, जीवाच्या अंगभूत झालेली अहंता, ममता त्यानें कशी तोडावी, हें कोणीं शिकविलें? मानवाची देहबुद्धीची भौतिक पातळी ओलांडून आधिदैविक ईशतत्त्वाच्या भावराज्यांत त्यांचा प्रवेश कसा झाला? त्यांना वेदशास्त्राध्ययन कोठचें? श्रीतुकोबाराय यावर निश्चयपूर्वक उत्तर देतात कीं, " वेदांचा तो अर्थ आम्हासचि ठावा ॥ ", " वेद अनंत बोलिला। अर्थ इतुलाचि साधिला ॥ १ ॥ विठोबासी शरण जावें। निजनिष्ठें नाम गावें ॥ २ ॥ सकळ शास्त्रांचा विचार। अंतीं इतुलाचि सार ॥ ३ ॥ अठरा पुराणीं सिद्धान्त। तुका म्हणे हाचि हेत। " ॥ ४ ॥

त्यांनीं ईश्वराच्या नामाचें भोळ्या भावानें, प्रेमपूर्वक सतत स्मरण आणि चिंतन केलें; व तो जसा वास्तविक असेल त्या रूपांत भेटावा, असा अत्युत्कट व अखंड छंद धरला. यापलीकडे ते गरीब आशिक्षित भक्त अधिक काय करणार!

ईश्वराच्या कृपेनें हे साधेभोळे आस्तिक्याचे ज्ञानप्रदीप समाजाच्या अगदीं मागासलेल्या गणलेल्या थरांतहि कसे प्रज्वलित होतात, ते त्यांच्या पुढील स्वानुभवपूर्वक उद्गारांवरून पहावें.

(१) " सांवतानें केला मळा। विठ्ठल देखियला डोळां ॥ "
(२) " दिवस मध्यान्हीं आला। सेना वैकुंठासी गेला ॥ "
(३) " चोखा म्हणे माझा। संदेह फिटला।
देव प्रगटला। देहामाजीं ॥ "
(४) " सुखाचा सागर। भक्तांचा कैवारी। ब्रीद चराचरीं। गाजतसे ॥
बंका म्हणे ऐसा। जयाचा महिमा। सुलभ तो आम्हां। भाविकांसी ॥ २ ॥ "
(५) धन्य ती मोलकरीण जनाबाई, तिनें देवाचें मोल केलें. ती म्हणते—
माय तूं माउली। आम्हां कृपेची साउली ॥ १ ॥
तुझें नाम वाचें गातां। नाहीं जन्ममरणचिंता ॥ २ ॥
नको योग याग तप। पाहें तिकडे तुझें रूप ॥ ३ ॥
सर्व व्यापुनी भरला। जनी म्हणे उभा ठेला ॥ ४ ॥
(६) चोख्या महाराची बहीण निर्मळा म्हणते—
मज नामाची आवडी। संसार केला देशधडी ॥ १ ॥
सांपडलें वर्म सोपें। विठ्ठल नाममंत्र जपें ॥ २ ॥
नाहीं आणीक साधन। सदा गाई नारायण ॥ ३ ॥
निर्मळा म्हणे देवा। छंद येवढा पुरवावा ॥ ४ ॥

गीतामाउली हेंच सांगते—

यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः।
यस्मिन्स्थितो न दुःखेन गुरुणापि विचाल्यते ॥
—गीता. ६।२२

शिव तव परिचर्या संनिधानाय गौर्या
भव मम गुणधुर्यां बुद्धिकन्यां प्रदास्ये।
सकल भुवन बन्धो सच्चिदानंद सिन्धो
सदय हृदय गेहे सर्वदा संवसत्त्वम् ॥
—शिवानंदलहरी

## प्रकरण ५ वें

# नामलिंग

सर्व साधनांचें सार। वाचे उच्चार शिवनाम ॥
न लगे योगाची कसवटी। शिवनाम उच्चार होटीं।
घडे जपतप अनुष्ठान। वाचे वदतां शिव जाण ॥
एका जनार्दनीं सोपें। शिवनामें जाती पापें॥ ९७२ ॥

— एकनाथ गाथा

**सुलभसाधन**—जप-तप-योग अशा परमार्थसाधनांचें सार शिवनाम हें आहे असें श्रीएकनाथ वरील अभंगांत सांगतात. अज्ञात वस्तूच्या ज्ञापक चिन्हाला लिंग म्हणतात. याप्रमाणें शिवनाम हें एक शिवलिंगच ठरतें. अर्थात् शिवनामस्मरण ही शिवलिंगोपासनाच होय. जडमूढ आबालवृद्ध स्त्री-शूद्रांस अति सुलभ व अति साधी अशी ही शिवनामसाधनरूप शिवलिंगोपासना आहे. ही साधना जशी साधी तशी अचूक फलदायी आहे. म्हणून या अल्पमोली व बहुगुणी अशा नामसाधनाचा विचार या व पुढील प्रकरणांत सारांशरूपानें प्रथमच करीत आहें. वस्तुतः हा अनुभवाचा विषय आहे. तो बोलून व लिहून दाखविण्यासारखा नाहीं. पण ग्रंथकार लेखनापलीकडे काय करून दाखविणार ?

श्रीशिवलिंगोपासना म्हणजे निर्गुणपरमशिवाची त्याच्या ज्ञापक सगुण चिन्हद्वारां उपलब्धि. सृष्टीकडून पाहतां उन्मन परमशिवाची जी सृष्ट्युन्मुख समानावस्था त्यासच मायामहेश्वर असें म्हणतात. "तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत्" श्वे. ४–१० म्हणजे त्याच्या अवयवरूपी जीवांनीं हें सर्व जग व्यापलें आहे. म्हणून अशा आपण सृष्टिरूप जीवांनीं अंतर्मुख होणें, म्हणजे मनाचें उन्मन करून आपल्याच अंतर्यामीं असलेल्या शिवात्म्याला अपरोक्ष करणें, म्हणजे जीवाला आपलेंच वास्तविक शिवस्वरूप उपलब्ध होणें, हीच या उपासनेची परिणति होय. शिवसायुज्य, शिवयोग, शिवबोध तो हाच. " यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः ॥" ६–२२ गीता. याहून श्रेष्ठ असा जगांत दुसरा लाभ संभवतच नाहीं. हें परम श्रेय सारें अंतरायभूत

पाप निरसन करून एका शिवनामस्मरणानें जोडलें जातें, असें निश्चयपूर्वक सारे साक्षात्कारी नामधारक संत सांगतात. "नामब्रह्म, नामब्रह्म, येणें पुरती सकळ काम ॥"–एकनाथ. "तुका म्हणे नाम। चैतन्य निजधाम॥"–तुकाराम. असे नामनिष्ठ संतांचे असंख्य दाखले आहेत.

*अवैदिक*—पण *नामस्मरण हें साधन अवैदिक आहे अशी कांहीं कट्टया* वैदिकांची व याज्ञिकांची समजूत दिसते ; तीं बरोबर नाहीं. हा विषय वाढविला तर वाढवितां येईल. पण येथें तसें न करतां थोडक्यांत पूर्वपक्षाची छाया दाखवून सिद्धान्तपक्षाचें उत्तरहि थोडक्यांत साधार सांगतों.

(१) देव हे परोक्षप्रिय आहेत, त्यांना त्यांचें प्रत्यक्ष नांव घेतलेलें आवडत नाहीं, असें ऐ. उप. भाष्य ४–३, व बृ. उप. ४–२।२ यांत म्हटलें आहे. यास उत्तर—तो व्यवहार आहे. परमार्थसाधन नव्हे. शिवाय अनाम *ईश्वराचीं सारीच नामें परोक्ष होत. जेथें नामस्मरणाचा साक्षात् विधि* सांगितला आहे, तेथें त्याचेंच अनुसरण करणें भाग आहे.

(२) वेदांत नामसाधन सांगितलेलें नाहीं. यास उत्तर—ऋग्वेदांत १–१५६–३ या मंत्रावरील सायण भाष्यांत स्पष्टच सांगितलें आहे कीं, "विष्णु याचा अर्थ व्यापक, तो सर्वांतर्यामी आहे. म्हणून त्याचें नाम घेणें हें सर्व पुरुषार्थप्रद आहे, ही गोष्ट लक्षांत घेऊन तुम्ही स्तुतिपाठकांनीं सर्वांनीं मिळून विष्णूच्या नामाचें संकीर्तन करावें. विष्णु यज्ञस्वरूप असल्यामुळें विष्णूचें नाम स्वर्ग व मोक्ष यांना साधनीभूत होतें ; ही गोष्ट जाणणारे तुम्ही स्तुतिपाठक विष्णूचें नामस्मरण करा व त्याची स्तुति करा."

(३) ऋग्वेद १।२४।१-२ या मंत्रांत मरणाच्या द्वारीं असलेला शुनःशेप म्हणतो कीं, "मी बंधमोक्षार्थ कोणत्या देवाच्या सुंदर नांवाचा धांवा करावा?"

(४) शुक्लयजुंत (३२।३) या मंत्रात परमात्म्याचें नाम महद्यशकारक आहे असें म्हटलें आहे.

(५) छांदोग्यांत (७।१।४) "नामाची ब्रह्मभावनेनें उपासना कर" (यथा प्रतिमां विष्णुबुद्ध्योपास्ते तद्वत्,—शांकरभाष्य) असें सनत्कुमारानें नारदांस सांगितलें आहे.

(६) केन उपनिषदांत (४।६।३१) असें म्हटलें आहे कीं, ब्रह्मसंभजनीय

आहे वन हे त्याचें नाव आहे वास्तव त्याचें तसेंच भजन करावें जो याचें असें भजन करतो त्याची सर्व भूतें सेवा करितात

(७) प्राणदृष्ट्या व अधिदैवदृष्ट्या ओंकाराची व उद्गीताची उपासना छांदोग्यात (१।१।१, १।२) पुन पुन्हा सांगितली आहे.

(८) "नामसंकीर्तनादेव शिवस्याशेष पातकै +++प्रमुच्यते।" १।२०॥ असें वचन शिवोपनिषदात आहे

(९) ऋग्वेदाच्या खिल सूक्तात "विश्वेश्वर विरूपाक्ष विश्वरूप सदाशिव।" इत्यादि चार शिवनाममंत्र आहेत व शेवटीं "एतानि शिवनामानि मण्डलान्ते सकृत्पठेत्।" अशी टीप आहे

(१०) श्री गुलाबरावमहाराज आपल्या संप्रदाय सुरतरूत (पृ ८०) म्हणतात कीं, "नाममहात्म्य अर्थवाद असतें। तरी "नामाचरितव्य" हें विधिवाक्य नसतें। +++ "२५७॥

(११) वैदिक कर्माचीहि पूर्तता नामस्मरणानें होते असें स्पष्ट मानलेलें आढळतें (यस्य स्मृत्या च नामोक्त्या तपोयज्ञक्रियादिषु। न्यून संपूर्णता याति सद्यो वन्दे तमच्युतम्॥ प्रायश्चित्तान्यशेषानि तप कर्मात्मकानि वै। यानि तेषामशेषाणां कृष्णानुस्मरण परम्॥

(१२) नामस्मरण अवैदिक असतें तर त्याचा महिमा मनु (प्रायश्चित्ताचा अध्याय) व गीता (अ ९) यात इतका वर्णिला नसता

(१३) वैदिक कर्मकांडास अधिकारवादाचे निर्बंध आहेत तसे नाम स्मरणास नाहींत, म्हणून तें अवैदिक अथवा वेदविरोधी असें म्हणता येणार नाहीं वस्तुत श्रुति आणि नाम एकच दोघाचे विषय एक तसेंच श्रुतिशरण व नामनिष्ठ यांची अंतिम कृतार्थता एकच

**अधिकारवाद**—नामसाधनास शास्त्रात अधिकारवाद सांगितला नाहीं म्हणजे अज्ञ सुज्ञ, आबालवृद्ध, स्त्री शूद्र कोणीहि या साधनाचा अवलंब

१ ' वेदमार्ग बहिष्ठाना जनाना पापकर्मणा। मन शुद्धावहीनाना हरि नाम्नैव निष्कृति ॥ १०९॥ हरिस्मरण निष्ठाना शिवनामरतात्मना। सत्य समस्तकर्माणि यान्ति संपूर्णता द्विज "॥ १११॥ नारद पुराण, अ ४१ आणि "बोलिलें तें साब पुराणीं। कर्मसाद्गुण्य नाहीं नामा लागुनी "॥ २५२॥ संप्रदायसुरतरू अ २,"यद्यन्यत्कुरुते कर्म यदि वा न करोति च। कृतेन जपयज्ञेन परा सिद्धिमवाप्नुयात्॥" सांब पु अ ४७

करावा, असा शास्त्रकाराचा हेतु दिसतो. याप्रमाणें या नामसाधनाचा कोणींहि आरंभ केल्यानंतर, त्याच्या वर सांगितलेल्या अंतिम फल-श्रुतीला जो अधिकार प्राप्त व्हावा लागतो, तो याच साधनानें यथावकाश साधला जातो असें आढळतें. "जेणें विठ्ठलमाना ध्यावी। तेणें पथ्यें समा-ळावीं। कामक्रोध तिखट मिर्वी। याची घेऊं नये रुचि॥" असें तुकोबाराय सांगतात. आता पद्मपुराण ब्रह्मखंड अ. २५।१३–१५ यांतहि सतनिंदादि दहा नामापराध सांगितले आहेत. पण त्या नामापराधांचा परिहार नामस्मरणानेंच होतो ( श्लोक २१ ) असेंहि सांगितलें आहे. तसेंच नामसाधनावर अनन्य-साधारण श्रद्धा नसणें हाहि एक नामापराध मानला आहे "हरेर्नामैव नामैव नामैव मम जीवनम्। कलौ नास्त्येव नास्त्येव नास्त्येव गतिरन्यथा॥" हेंच त्या नामनिष्ठेचें स्वरूप आहे. ही निष्ठा आरंभीं नसली तरी पुढें सतत नामस्मरणानेंच प्राप्त होत असावी असें दिसतें.

कारण नारदपुराण ( अ २ ) म्हणतें कीं, "अश्रद्धयापि यन्नाम्नि कीर्ति-तेऽथ स्मृतेऽपि वा। विमुक्त' पातकैर्मर्त्यो लभते पदमव्ययम्॥" यावर संप्रदाय सुरतरूत श्री. गुलाबराव असें भाष्य करतात कीं, "वस्तुशक्तीच्या ठायीं। श्रद्धादिकाची अपेक्षा नाहीं। नाम वस्तुतन्त्र लवलाही। वचन सिद्ध"॥२।२८२॥ धर्मकर्मांत श्रद्धेची गरज असते. पण नामस्मरणात ती नसते. भागवत ६।२।१४ यात म्हटलें आहे 'सांकेत्य पारिहास्य वा स्तोभं हेलनमेववा। वैकुंठ नाम-ग्रहणमशेषाघहरं विदु'॥" नाममहिमा वस्तुतन्त्र आहे. कर्तृतन्त्र नाहीं. वैदिक यज्ञयागादि धर्मकर्म कर्तृतंत्र आहे. त्यास जरूर ती श्रद्धा व अन्य साधना-नुकूलता कलियुगात दुर्लभ आहे. याप्रमाणें कलियुगांत इतर साधनें यथासांग होणें फार कठिण असल्यामुळें "कलियुगीं साधन नामचि सार," असें संत सांगतात. ह्या नामाचा वस्तुतन्त्र महिमा सांगताना श्रीधरस्वामी म्हणतात— "संकेतें अथवा हास्येंकरून। मलत्या मिसें घडो शिवस्मरण। न कळता परिसासी लोह जाण। संघटता सुवर्ण करी कीं॥ २॥ नकळता प्राशिलें अमृत। परि अमर करी कीं यथार्थ। औषधी नेणता भक्षित। परि रोग सत्य हरी कीं"॥ ३॥ शिवलीलामृत. अ. २. वामनपंडित म्हणतात—"अजित नाम घडो भलत्या मिसें। सकल पातक भस्म करीतसे॥" नामसुधा वामन पंडित आणखी म्हणतात—"कन्या आणि दासी। श्वशुर दे जामातासी। नाम आणि

कर्म दोन्ही जनांसी। वेदाचे देती ये रीतीं"॥ ९।१११११४॥ यांत कर्माहून नामाचा महिमा अधिक दर्शविला आहे.

या विषयांत चिकित्सेला पुष्कळ अवसर आहे व ती मूळ हस्तलिखितांत केलीहि आहे. पण येथें स्थलाभावास्तव साधनसार तेवढेंच सांगत आहें. नाममहिमा वस्तुतंत्र असला तरी तो अयुक्तिक असणार नाहीं. तसेंच नामाच्या या स्वतंत्र वस्तुमाहात्म्याचा अनुभव पुष्कळांना येत नाहीं. या गैरमेळाच्या खुलाशासाठींहि युक्तिवादाची गरज आहेच. तो युक्तिवाद येथें थोडक्यांत इतकाच सांगतों कीं, नामाचें स्वतंत्र वस्तुमाहात्म्य आपलें कार्य करीतच असतें. पण ज्याप्रमाणें दिव्य रसायनें प्रथम रोगनिवारण करून नंतर शक्तिवर्धन करतात, त्याप्रमाणें नामाच्या वस्तुमाहात्म्याची नामनामी-अभेदप्रत्यय ही दिव्य फलश्रुति प्राप्त होण्यापूर्वीं नामसाधन हें नामधारकाच्या असंख्य पूर्वजन्मींच्या पापाचें सावकाश क्षालन करीत असतें. तें नाम-धारकाच्या लक्षांत येत नाहीं. नामसाधनानें नामधारकाच्या नकळत त्याचें पूर्वपाप किंवा प्रारब्धदोष नाहींसे होत राहणें, याचाच अर्थ नामसाधनांच्या अंतिम फलश्रुतीला जरूर तो अधिकार नामसाधनानेंच प्राप्त होणें, असाच करावा लागेल. अशा रीतीनें नाममाहात्म्याची दिव्यता सयुक्तिक ठरते.

**नामनामीअभेदप्रत्यय**—ही नामसाधनाची अखेरची परिणति अथवा नाममहिम्याची अंतिम फलश्रुति आहे. ती अभाविकास व अनभ्यस्तास अयुक्तिक व असंभवनीय वाटणें स्वाभाविक आहे. या साधनास आरंभ कर-णारास कोणताच अधिकारवाद शास्त्रानें सांगितला नाहीं. हें जरी खरेंच आहे, तरी त्याच्या अंतिम फलश्रुतीसाठीं भगवद्गीतेच्या १७ व्या अध्यायांतील १४ ते १७ श्लोकांत सांगितल्याप्रमाणें कोणत्या तरी रीतीनें कायिक, वाचिक, मानसिक

१ जेवढी नामाची शक्ति। तेवढें पाप नाहीं त्रिजगतीं॥
नामापाशीं चारी मुक्ती। जाण निश्चितीं विदेहा॥ ५९१॥ ए. भा.

२ समश्लोकी—देवद्विज गुरुज्ञानी पूजा शुद्धि अवक्रता, ब्रह्मचर्य अहिंसा हें शारीर तप बोलिजे॥ १४॥ नेदी क्लेश असें वाक्य सत्यही प्रियही हित, वेद वेदार्थ अभ्यास वाचेचें तप बोलिजे॥ १५॥ मन प्रसन्नता, मौन सौम्यत्व मननिग्रह। चित्तीं निष्कामता ऐसें बोलिजे तप मानस॥१६॥ यासंबंधीं जिज्ञासूंनीं स्वानंदसाम्राज्य, उत्तरखंड वाचावा.

तप झालें पाहिजे असेंहि दिसून येतें. यासच मखोपासना, तपोपासना, जपोपासना व ध्यानोपासना अशीं शास्त्रीय नामें आहेत. या श्रेष्ठ श्रेष्ठतर साधनावस्थांची अनुक्रमें निष्ठा, निग्रह, संयम अथवा निजध्यास व प्रेम हीं द्वारें अथवा पायऱ्या आहेत. अर्थात् हे दैवी गुण ज्यास सहजप्राप्त आहेत, त्याचा वरील चतुर्विध उपासनांचा व्याप त्यामानानें हलका व्हावा, हें पण सयुक्तिकच ठरतें.

आतां अनेकांच्या मनांत असें आल्यावांचून राहात नाहीं कीं, नुसत्या नामस्मरणानें काय होणार? कोठें शिव हें नाम व कोठें परमशिव हें निर्गुण तत्त्व! "बोलाचीच कढी बोलाचाच भात। जेवूनियां तृप्त कोण झाला।" असि म्हणतांच असीचा प्रत्यय कोठें येतो? शिवाय, "नाम घेतां हे वैखरी। चित्त धांवे विषयांवरी ॥१॥ कैसें होताहे स्मरण। स्मरणांमाजीं विस्मरण ॥२॥ नामरूपा नाहीं मेळ। अवघा वाचेचा गोंधळ॥" अशीं संतवचनेंहि आदळतात. पण याउलट "नामें तरला नाहीं कोण। ऐसा दावा निवडोन॥" "मुखीं नाम हातीं मोक्ष। ऐसी साक्ष बहुतांसीं॥" अशी संतश्रेष्ठ—नामनिष्ठ तुकोबाराय ग्वाही देतात. तसेंच अशा या नाममहिम्याला अर्थवाद म्हणजे अयथार्थ अतिशयोक्ति अथवा अवास्तव स्तुति मानणें हें महत्पाप आहे,[1] तो नामापराध आहे,[2] असें शास्त्र बजावून सांगतें. नामनिष्ठ संत श्रीसमर्थ रामदासहि म्हणतात—"रामनामें कोटी कुळें उद्धरती। संशय धरती तेचि पापी॥" अशी ही निस्सीम नामनिष्ठा हा जरी प्रामुख्यानें श्रद्धेचा विषय वाटला तरी तत्त्वतः श्रद्धा हें अव्यक्त युक्तिवादाचेंच सार असतें. म्हणून श्रद्धेला डोळस करून तिच्या मुळांतील या अप्रकट असलेल्या युक्तिवादाचा थोडा शोध घेऊं व त्याहि अगोदर नामनिष्ठेचा पुरावा पाहूं या.

**नामनिष्ठाः**—विचारवंत वाचकांनीं भक्ताची अंतर्मुखवृत्ति अथवा सर्वात्मभावसंपन्न अशी नामनिष्ठा ध्यानीं घ्यावी; म्हणजे त्या भक्तांच्या अलोट भगवत्प्रेमाच्या प्रवाहांत नाममहिम्याबद्दल अर्थवादाचा संदेह केव्हांच

---

१ अर्थवादं हरेर्नाम्नि संभावयति यो नरः। स पापिष्ठो मनुष्याणां नरके पतति स्फुटम्॥—कात्यायनसंहिता

२ "तथाऽर्थवादो हरिनाम्नि कल्पनम्॥ १४॥"—पद्मपुराण, ब्रह्मखंड अ० २५.

देकळासारखा विरून जाईल. नामयोग्याची निष्ठा अशी असते अथवा असावी लागते :—

न नामसदृशं ज्ञानं न नामसदृशं व्रतम् ।
न नामसदृशं ध्यानं न नामसदृशं फलम् ॥
न नामसदृशस्त्यागो न नामसदृशः शमः ।
न नामसदृशं पुण्यम् न नामसदृशी गतिः ॥
नामैव परमा मुक्तिर्नामैव परमा गतिः ।
नामैव परमा शान्तिर्नामैव परमा स्थितिः ।
नामैव परमा भक्तिर्नामैव परमा मतिः ।
नामैव परमा प्रीतिर्नामैव परमा स्मृतिः ।
नामैव कारणं जन्तोर्नामैव प्रभुरेव च ।
नामैव परमाराध्यो नामैव परमो गुरुः ॥

तुकाराममहाराज हाच आपला एकनिष्ठभाव कसा सांगतात तें थोडी द्विरुक्ति पत्करून पुढें पाहा. जेथें "सततं कीर्तयन्तो माम्" असें भगवान् म्हणतात, तेथें द्विरुक्ति हा दोष नव्हे.

संतश्रेष्ठ नामनिष्ठ श्रीतुकोबाराय ईश्वरास उद्देशून म्हणतात—

हेंचि माझें तप हेंचि माझें दान । हेंचि अनुष्ठान नाम तुझें ॥ १ ॥
हेंचि माझें तीर्थ हेंचि माझें व्रत । सत्य हें सुकृत नाम तुझें ॥ २ ॥
हाचि माझा धर्म हेंचि माझें कर्म । हाचि नित्य नेम नाम तुझें ॥ ३ ॥
हाचि माझा योग हाचि माझा यज्ञ । हेंचि जपध्यान नाम तुझें ॥ ४ ॥
हेंचि माझें ज्ञान श्रवण मनन । हेंचि निजध्यासन नाम तुझें ॥ ५ ॥
हाचि कुळाचार हाचि कुळधर्म । हाचि नित्यनेम नाम तुझें ॥ ६ ॥
हा माझा आचार हा माझा विचार । हा माझा निर्धार नाम तुझें ॥ ७ ॥
तुका म्हणे दुजें सांगायासी नाहीं । नामेंविण कांहीं धन वित्त ॥ ८ ॥

आता या नामनिष्ठांचें प्रेम कसें अनन्य असतें तें पहा.

सुंदरदास म्हणतात—

प्रेम लग्यो परमेश्वरसों तब । भूलि गयो सिगरो घरबारा ॥
ज्यों उन्मत्त फिरे जितहीं तित । नेकु रही न शरीर संभारा ॥

श्वास उश्वास उठै सब रोम। चले दृग नीर अखण्डित धारा ॥
सुंदर कौन करै नवधा विधि। छाकि पऱ्यो रस पी मत वारा ॥

आपले महाराष्ट्रीय कवि म्हणतात—

भावभक्ती अंगीं उठे। प्रेमभरें कंठ दाटे ॥ १ ॥
दाटे प्रेमाश्रु लोचनीं। रोम राहे उभारूनी ॥ २ ॥
उठोनियां आलिंगाया। आनां जाता नये पायां ॥ ३ ॥
पायां पडुनि स्तवूं जरी। तरि शब्द नुमटे हरी ॥ ४ ॥
हरिलें त्वां देहमान। आतां कोणा करूं नमन ॥ ५ ॥
जन दत्तरूप होतां। वासुदेवा ये धन्यता ॥ ६ ॥

तुकोबाराय म्हणतात—

सद्गदित कंठ दाटो। येणें फुटो हृदय ॥ १ ॥
चिंतनाचा एक लाहो। तुमच्या आहो विठ्ठला ॥ २ ॥
नेत्रीं जळ वाहे सदा। आनंदाचे रोमांच ॥ ३ ॥
तुका म्हणे कृपादान। इच्छी मन हे जोडी ॥ ४ ॥

* * *

नामा गहिंवरें दाटला। पूर धरणीये लोटला ॥

* * *

रोमांच जीवन आनंदाश्रु नेत्रीं। अष्टांगही गात्रीं प्रेम तुझें ॥
सर्वही शरीर वेंचो या कीर्तनीं। गाऊं निशीदिनीं नाम तुझें ॥

* * *

सकळ इंद्रियें झालीं ब्रह्मरूप। ओतलें स्वरूप तयांमाजीं ॥

स्वानुभवी संतशास्त्रांचा विचार येथवर पाहिला. आतां युक्तिवादाचा आपला विचार थोडक्यांत पाहूं या. उन्मन तें निर्गुण ब्रह्म व समन तें सगुण जग, या भेदास मन हें कारण दिसतें. जीवाच्या बंध-मोक्षाला मनच कारण मानलें आहे या पिण्डब्रह्मांडाच्या रचनेचे पांचभौतिकाप्रमाणें अन्नमयादि ५ कोश व वागादि ५ कला असे विभाग मानले आहेत. त्यांत मनोमय कोश किंवा मन ही कला मध्यवर्ती आहे. आनंद, विज्ञान, मन, प्राण, वाक्, या अव्ययाच्या पंचकला किंवा आनंदमय, विज्ञानमय, मनोमय, प्राणमय, व अन्नमय हे व्यष्टिसमष्टीचे पांच कोश या पंचविभागांत मध्यवर्ती मनाची

सृष्टिसाक्षी अथवा सृष्टयुन्मुख अवस्था हीच जगाची उभारणी आणि जीवाची बद्धावस्था आहे. उलट त्याच मध्यवर्ती मनाची विज्ञान व आनंद या आतर्कोशाकडे अंतर्मुख मुक्तिसाक्षी वृत्ति हीच उपासकाची खरी अंतरंग-साधना होय. एकाच सविदेचे हे अवस्थाभेद आहेत. यात एका टोंकाला सगुण भक्ताचा आनंदमय नामी म्हणजे ईश्वर व दुसऱ्या टोंकाला वाङ्रूप शब्द अथवा नाम आहे. दोन्ही टोंकें सविद्रूपच आहेत. तत्त्वत दोन्ही शिवरूपच आहेत

वनचर राम लक्ष्मणाच्या मध्यें सीतामाई असे, यामुळें लक्ष्मणाच्या राम-दर्शनांत व्यत्यय येई. त्याप्रमाणें या भवारण्यात जीवशिवाचे मध्यें माया-महेश्वराची माया अथवा अविद्या असते. ती जशी अपारदर्शक–अतरायभूत असते, तशी ती पारदर्शक व परित्रायक पण होते. निष्ठा, निर्धार, व सूक्ष्म विचाराचे 'क्ष' किरण अपारदर्शक मायेला पारदर्शक करू शकतात. सृष्टिसाक्षी शिवाचें अथवा महेश्वराचें सृष्टिसाक्षी समष्टि मन अतरायभूत मायेचें रूप आहे. त्या मायेचे सत्त्व, रज, तम, (mind, motion, matter) असे तीन गुण आहेत. नाम-रूप-कर्म, शब्द-अर्थ-प्रत्यय हे याच गुणाचे पर्याय आहेत. 'जें ब्रह्मांडीं तें पिंडीं' या न्यायानें जीवपिंडात हेच मायेचे गुण आहेत जीव-शिवात भेदाभास उत्पन्न करणें हा मायेचा धर्म असल्यामुळें तिनें वरील त्रिकूटात भेदाभास उत्पन्न केला आहे म्हणूनच नाम-नामीअभेदप्रत्यय अभाविकास अशक्यप्राय वाटतो शब्द आणि अर्थ हे वेगवेगळे पदार्थ वाटतात. इतकेंच नव्हे तर शब्दाचा अर्थ विवर्तरूप भासतो. आई प्रेमानें अरे वेड्या! म्हणते, तें गोड वाटतें व परकी उपरोधिकपणें अरे शहाण्या! असें म्हणतो त्याचा राग येतो. पोपट 'विठ्ठल विठ्ठल' म्हणतो त्याचें देवाला काहींच वाटत नाहीं उलट वाल्या 'मरा मरा' असा उलटा जप करीत होता तो ईश्वराला गोड वाटला. असा हा शब्द-अर्थप्रत्ययाचा विषय सूक्ष्म आहे नामाचा वाच्यार्थ, शक्यार्थ, लक्ष्यार्थ यात अनेक भेद संभवतात. किंवा नामजप ही नुसती वाचेची अवधानशून्य व अर्थ-प्रत्ययशून्य अशी नुसती बडबड्हि संभवते अनेकाचा नामजप म्हणजे बहुधा असेंच एक यांत्रिक कर्म घडत असणें संभवनीय वाटतें. म्हणून शब्द, अर्थ आणि प्रत्यय याचा थोडा अधिक विचार करणें कदाचित् कोणास उद्बोधक वाटेल.

शब्द-अर्थ-प्रत्यय यांचा परस्पर संबंध असून ते पृथक्त्वानें अनुभवास येतात. चिच्छक्तीच्या स्पंदांचे ते व्यक्त परिणाम असतात. मूळांत ते एकरूप असतात. शब्द-अर्थ-प्रत्यय हे मूळच्या चित् स्पंदाचे वेगवेगळे अंश नव्हत. मूळचा चित्स्पंद किंवा शब्दब्रह्म याच्या ठिकाणीं अर्थस्पंद, प्रत्ययस्पंद व अर्थरूप स्पंदाचा शब्द हे *मूळांत एकरूप असतात.* हा तादात्म्याचा अनुभव परावाणींत येतो. नाद, ध्वनि, वर्ण, अक्षर, शब्द, मंत्र व देवतासाक्षात्कार इत्यादि सापेक्ष विषय फार सूक्ष्म व क्लिष्ट आहे. कालिदासानीं वागर्थाला पार्वती-परमेश्वराची उपमा दिली आहे. तो केवळ काव्यालंकार नव्हे. त्याच्या मागें सखोल व व्यापक उपपत्ति आहे. *ती उपपत्ति नामनामीअभेदप्रत्ययशाच्या बुडाशीं आहे.* पण, ज्योतिर्गणिताचा गंधहि नसतां खुडबुडे ज्योतिषी पटेलसें फलज्योतिष सांगतात व आयुर्वेद हा शब्दहि माहीत नाहीं असे वैदु गुणकारी औषधें देतात. त्याप्रमाणें या उपपत्तीची ज्यांस मुळींच कल्पना नाहीं, इतकेंच नव्हे तर ती सांगून ज्यांस समजणें *शक्य नाहीं, अशा अनेक साध्या-भोळ्या भक्तांस* नामनामीअभेदप्रत्यय येतो, असें कोठें कोठें आढळतें. म्हणून त्याच्या उपपत्ती-च्या चिकित्सेचे तितकेंसें महत्त्व वाटत नाहीं. तथापि प्रथम जे शब्दनिष्णात असतात ते पुढें ब्रह्मनिष्णात होतात. म्हणून आतां यापुढें नामसाधनांतील शब्द-अर्थ-प्रत्ययरूप जो *नामनामीचा अभेदप्रत्यय त्याची थोडी प्रक्रिया* सांगण्याचा यत्न करितों.

परावाणी द्विधा भासते : (१) शब्द म्हणजे विशिष्ट अर्थानें उच्चारलेला ध्वनि व (२) त्या शब्दानें निर्दिष्ट होणारा विषय. लहान मुलाला फळ दाखवून हा आंबा असें सांगतां येतें व त्यास तें समजतें. पण साधकाला या प्रत्यक्ष वस्तुपाठाप्रमाणें मंत्र ही अमुक देवता एवढें नुसतें सांगण्यानें त्यास ती देवता दिसत नाहीं. या वेळीं ती देवता श्रोत्रग्राह्य ध्वनीनें आच्छादित असते. त्या ध्वनीनें कांहीं विवक्षित विचारलहरी किंवा वृत्ति उत्पन्न होतात. अर्थात् त्याच्या पुढची पायरी मंत्रसाधनानें देवता साक्षात्कार करून घेणें ही होय. ध्वनीचा वेध करून देवता पाहावी लागते. देवता म्हणजे जड सृष्ट पदार्थाप्रमाणें एक पदार्थ नाहीं. मंत्रशक्ति म्हणजे नामशक्ति आणि साधक शक्ति यांच्या सहकारितेनें देवतासाक्षात्कार संभवतो. साधनाशक्तीनें साधकास अधिकार प्राप्त होतो. पुढें साधकाचे दृढ प्रयत्नानें म्हणजे साधना-

शक्तीनें दोन्ही शक्तींचें एकीकरण होतें व साक्षात्कार होतो. हें देवतेचें सगुण वाचकरूप होय. अखेर सगुण देवतेनें वाच्यस्वरूप साधकास कळतें. देवतेची मंत्रमयी अथवा स्थूल आणि ज्योतिर्मयी अथवा सूक्ष्म अशीं दोन रूपें असतात. परोक्ष ज्ञानापासून प्रत्यक्ष ऐक्यात्मक ज्ञानापर्यंत हा मार्ग आहे. गूळ हा शब्द लिहितां–वाचतां येणें, गूळ तयार होतांना पाहणें, गुळानें हात चिकट होतात, त्यास डोंगळे येतात, हें गुळाचें कार्य पाहणें, गुळांत मधुर रस असतो, याचें अर्धवट ऐकीव ज्ञान असणें व गूळ प्रत्यक्ष खाऊन पाहणें व त्याच्या गोडीची संस्काररूप स्मृति राहणें, अशा शब्दअर्थप्रत्ययाच्या पायऱ्या संभवतात.

शब्दब्रह्म ही व्यापक अविशेष शक्ति आहे. मंत्र अथवा नाम हें त्या शक्तीचें विशेष व्यक्त स्वरूप आहे. मनःसंकल्पाप्रमाणें वर्णोच्चारानें इंद्रियांचा आकाशांत वायूशीं संबंध येऊन श्रोत्रगोचर होणारा वर्णात्मक शब्द उच्चारला जातो. प्रत्येक शब्दानुरूप अर्थ ( विषय ) असतो. अर्थ सूक्ष्म किंवा स्थूल असतो. स्थूल अर्थ म्हणजे बाह्य पदार्थ. सूक्ष्म अर्थ म्हणजे मनोवृत्तीनें पदार्थांचा धारण केलेला आकार. मन ग्राह्य विषयांचा आकार धारण करतें व त्याचें ग्राहक पण आपणच होतें. ह्या सर्व मानसिक क्रियेंत शब्द सहकारी असतो. जगाच्या विकासांत शब्दब्रह्म, सूक्ष्म शब्द आणि सूक्ष्म अर्थ यांत विभागलें जातें. त्यांतून स्थूल शब्द आणि स्थूल अर्थ उद्भूत होतात. समष्टि मन जो सूक्ष्म अर्थ इंद्रियगोचर पातळींत व्यक्त करतें त्यांतून स्थूल शब्दाचा स्थूल अर्थ सिद्ध होतो. जाणिवेसह सूक्ष्म शब्दाला मातृका म्हणतात. सूक्ष्म अर्थाला मानसिक वासना, भावना, स्मृति, संकल्पें, संस्कार असें म्हणतात. वर्णात्मक शब्द हे स्थूल, तसाच त्यांचा बाह्य वाच्यार्थ हा स्थूल अर्थ होय. स्पंदात्मक शिवसंकल्पाची, अदृश्य सूक्ष्म वाफ व बर्फाचा खडक अशा, अत्यंत भिन्न अवस्था भासतात.

*स्थूल-सूक्ष्म हीं जशीं शरीरें आहेत, त्याचप्रमाणें पश्यन्ती,* मध्यमा व वैखरी ह्या वाणी होत. पश्यन्ती हा सामान्य स्पंद, मध्यमा हा विशेष स्पंद आणि वैखरी हा स्पष्ट स्पंद होय. अर्थात् शब्द आणि अर्थ अशा दुहेरी सृष्टीचा सारखाच अनुक्रम आहे. वैखरी ही अतस्थ नामकरणाची किंवा विचाराची

१ अर्थ–री जाणणें–मागणें.

व्यक्तावस्था आहे. मध्यमा वाणींतील सूक्ष्म अर्थांतर सर्व मानवांचें एकसारखेंच असतें. यामुळें दुसऱ्याची भाषा न समजली तरी दुसऱ्याचे मध्यमेंतील विचार योग्यांस किंवा अशाच तज्ज्ञांस ( माध्यमांस ) समजणें शक्य असतें. ज्या मनःसंकल्पाची वैखरी वाणी व्यक्त होते, त्याच मन.संकल्पाच्या दार्ढ्यानें तो संकल्पित पदार्थ निर्माण करणें शक्य असतें. यालाच मंत्रचैतन्य अथवा मंत्रसामर्थ्य म्हणतात. या वेळीं विचार बाह्यांगांत गुंतत नसून आंतल्या चैतन्यानें मूर्तमान जिवंत होतो. सृष्ट्युत्पत्तींत जी क्रिया समष्टि मन करतें तीच ही प्रक्रिया होये.

पदार्थांच्या निर्मितींत उत्पन्न होणारा ध्वनि हेंच त्या वस्तूचें नैसर्गिक नाम असल्यामुळें तेंच नाम शक्तिपातयुक्त उच्चारलें असतां तो पदार्थ मूर्तिमान निर्माण होतो. याचप्रमाणें मंत्रांतील चैतन्य जाग्रत करतां आलें कीं देवतारूप सिद्ध होतें. मंत्र आणि देवता एकच. लौकिक दृष्टांतांत शंभराची नोट व शंभर रुपये एकच. जीव हा तत्त्वतः शिवरूप आहे. तो प्रयत्न करील तर शिवाचें सामर्थ्य त्याच्या संकल्पांत येईल. निजलेल्या मनुष्याला हांक मारून जागें करावें, तेंच कार्य नामजपानें होतें.

शिव आणि शक्ति हे साधकाचे जणुं दोन ओंठ होत. त्यांच्या संयोगास मैथुन म्हणतात. या ओठांतून निघणारा शब्द हा बिंदु होय. त्यांतून प्रगट होणारी देवता म्हणजे साधकाचे अपत्याप्रमाणें समजावी. वस्तुतः निष्क्रिय व निर्गुण अशा परम शिवाचा साक्षात्कार होत नाहीं. साधक आपल्या भावनेनेंच देवतारूप निर्माण करतो. या शास्त्रीय परिभाषेचा अथवा प्रक्रियेचा बाऊ वाटण्याचें कारण नाहीं. नाम्याची जनी, चोखयाची माहारी सोयराबाई आणि बहीण मगळा अशा निरक्षर भाविक संतिणींना त्यांच्या एका

१ आधुनिक मनोविज्ञानाच्या ( Mentalism ) प्रक्रियेप्रमाणें समष्टि मनांतील पदार्थसंकल्प व्यष्टि मनांत येतो व त्याच सूक्ष्म संकल्पाचें परिवर्तन व्यष्टि मनांकडून इंद्रियांच्या तन्मात्राद्वारां बाह्यार्थरूपांत व्यक्त होतें किंवा अनुभविलें जातें. जणुं सिनेमा फिल्ममधील सूक्ष्म आकृति बाहेर पडद्यावर मोठी करून फेंकली जाते. तिलाच आपण स्थूल जड प्रत्यक्ष पदार्थ मानतों. वस्तुतः स्थूल व जड हे केवळ संकल्पित गुणधर्म असतात. तत्त्वतः बाह्यार्थ काहीं नसतो.

उत्कट भक्तिभावनेनें असे ईश्वरी साक्षात्काराचे अनुभव हरघडीं आलेले आहेत. गुळाची गोडी म्हणजे काय, यावर एक मला मोठा शास्त्रग्रंथ लिहून जें कळणार नाहीं तें तान्ह्या मुलास गूळ खाऊन कळतें. "वद तूं रामनाम अति मधुर मधुर मधुर मधुर ॥" असें स्वानुभवी संत सांगतात. "रसो वै सः ।" हेंच शब्द-अर्थप्रत्ययाचें पर्यवसान आहे. "ब्रह्मरसगोडी तयांसी फावली। वासना निवाली सकळ ज्यांची ॥ १ ॥ तुका म्हणे त्यांचे पायीं पायपोस होऊनियां वास करीन तेथें" ॥ ५ ॥ "नाम गोड नाम गोड। पुरे कोड सकळही" ॥ हा संतांचा अनुभव होय.

**नामरूपसापेक्षसंबंध**:—पण बुद्धिवादी नामधारकास हा गोड अनुभव नसल्यामुळें उपपत्तीची उपयुक्तता व आवश्यकता वाटते. म्हणून या अति महत्त्वाच्या विषयासंबंधीं कांहीं सूचक शास्त्रीय स्फुट विचार पुढें देत आहे. वैदिक विज्ञानाप्रमाणें सृष्ट्युन्मुख अव्यय परमात्म्याच्या मन, प्राण, वाक् या कला एकांतून एक उद्भूत झाल्या असून वाक् या कलेंतून आकाश, वायु इत्यादि भूतें निर्माण झालीं. पंचमहाभूतात आकाश आणि वायु हीं मूळ तत्त्वें आहेत. शब्द हा वाग्जन्य आकाशाचा गुण असून सारी रूपेंहि आकाशांतूनच निर्माण होतात. चित्त हें मनाचें सूक्ष्म स्वरूप आहे. चित्ताचे स्फुरण व स्मरण हे धर्म आहेत. स्फुरण नवीन विषयाचें होतें तर स्मरण ज्ञात विषयाचें होतें. वाक्मध्यें प्रतिष्ठित होऊनच प्राण गान गातो. अर्थात् शब्दोच्चार करतो, असें बृ. उप. १।३।२७ यांत म्हटलें आहे. या प्रमाणें प्राणाकडून वाणीच्या द्वारां 'शिव' ह्या नामाचा उच्चार झाला. पण शिवाचें रूप उपासकास अज्ञात आहे, असें आपण मानलें आहे, मग 'शिव' या नामाच्या स्मरणानें 'शिव' या नामीचा प्रत्यय कसा येत असावा तें आतां आपण निरनिराळ्या उपपत्तीनें पाहूं.

योगदर्शनांत महर्षि पतंजलीनें 'स्वाध्यायादिष्ट देवता सम्प्रयोगः' या सूत्रद्वारां असें सांगितलें आहे कीं, मन्त्रजप, पुरश्चरण, स्तुतिपाठ या योगानें इष्टदेवतेचें दर्शन होतें. "उपह्वरे गिरिणा सङ्गमे च नदीनां। धिया विप्र अजायत ॥" या सामवेदांतील वचनांत असें सांगितलें आहे कीं, नदी-संगमादि योग्य स्थळीं योग्य मंत्रद्वारां इष्टदेवाचें दर्शन होतें. श्रीमद्भागवतांत म्हटलें आहे कीं, "त्वं भावयोगपरिभावित हृत्सरोज आस्से श्रुतेक्षितपथो

मनु नाथ पुंसाम् । यद् यद् धिया त उरुगाय विभावयन्ति, तत्तद्वपुः प्रणयसे सदनुग्रहाय ।" म्हणजे, "हे नाथ! भाव आणि भक्तीनें तुमची उपासना केली तर तूं उपासकाला साक्षात्कृत होतोस आणि भक्त ज्या भावनेनें तुझी स्तुति करतो त्या रूपांत तूं त्याला दिसतोस."

याप्रमाणें स्मरणमात्रेंकरून श्रीकालीदेवी, श्रीदत्त, श्रीकृष्ण, श्रीमारुतिराय, श्रीव्यास, श्रीसमर्थ रामदास अशा दिव्य मूर्ति प्रकट झाल्याच्या अनेक सत्य कथा प्रसिद्ध आहेत. आधुनिक परलोकविद्येच्या प्रयोगांत मनोमय कोणा दिवंगत व्यक्तीचें स्मरण करतांच दोन-तीन मिनिटांचे आंत इष्ट व्यक्ति येऊन तिचा माझ्याशीं अनेक वेळां ओजा बोर्डवर संवाद सुरू झालेला आहे. याप्रमाणें दिवंगत तीस-चाळीस व्यक्तींशीं माझे सुमारें पाऊणशें प्रयोग झाले आहेत. माध्यम जास्त शक्तीचा असेल तर *याप्रमाणें येणाऱ्या दिवंगत व्यक्तींचा फोटो घेतां येतो. आणखी थोड्या प्रयत्नानें या व्यक्ति मूर्तिमान* दिसतात व आपणाशीं प्रत्यक्ष बोलतात. (हे अनुभव मीं घेतलेले नाहींत.) श्रीव्यासांनीं भारती युद्धांतील गतप्राण झालेल्या अनेक योध्यांना स्मरण-मात्रेंकरून इहलोकीं प्रगट केलें होतें. मंडणमिश्र व श्रीएकनाथ यांनीं स्मरण-*मात्रानें आपल्या दिव्य पितरांस खालीं आणलें होतें. तात्पर्य, तशाच योग्यतेच्या* शिवभक्तानें शिवनामस्मरण करतांच, दोरीनें पतंग ओढावा त्याप्रमाणें, प्रेम-रज्जूनें शिवास आकर्षित करून, त्यानें इष्टरूपांत प्रगट होणें अशक्य वाटत नाहीं. किंबहुना शुद्ध उत्कट भावनेनें उच्चारलेलें नाम आणि रूप हीं दोन नाहींत असाच संतांचा अनुभव दिसतो.

वरील कल्पनेंत शिव आपणापासून आकाशांत उडविलेल्या पतंगाप्रमाणें परिच्छिन्न आकृतिमान असा दूर आहे, असें उगाच आपल्या समजुतीकरतां म्हटलें आहे. वस्तुतः इह व परलोक हे जर स्थूलसूक्ष्म भेदांनीं एकाच ठिकाणीं संमिश्र आहेत तर समष्टिरूप जो शिव तो आपणापासून दूर नसून वस्तुतः आपण त्याच्या पोटांतच आहों व तो आपल्या हृदयांत आहे, हेंच बहुतांस अननुभूत असें सत्य आहे.

या त्याच्या अभानापादक अज्ञानाच्या निरसनापूर्वी असत्त्वापादक *अज्ञान दूर करणें बरेंच सोपें असतें. तेंच मी करीत आहें.* फ्रान्स देशांतील एक विदुषी एम. मॅडम, फिनलांग हिनें अनेक वर्षांच्या संशोधनानंतर हें सिद्ध

केलें कीं, विवक्षित गीत विवक्षित रागांत म्हटलें असतां तत्सापेक्ष विवक्षित रूपाकृति यंत्रानें काढली जाते. याप्रमाणें एका रोमन कॅथॉलिकानें एक गाणें म्हणतांच मांडीवर मुलगा ( जीसस ) घेतला आहे, अशा एका बाईचें (मेरी) चित्र यंत्र-शलाकेनें काढलें. तसेंच जर्मनींत एका बंगाली विद्यार्थ्यानें काल-भैरवाष्टक म्हटलें, त्याबरोबर एका कुत्र्यासह एका भयंकर मूर्तीचें चित्र त्या यन्त्र-शलाकेनें रेखाटलें. एक सामवेदांतील ऋचा सतारीवर वाजविली, तेव्हां वीणा-पुस्तकधारिणी सरस्वतीचें चित्र निघालें. याप्रमाणें ( Voice figures ) शब्दचित्रें पाहून एक विदुषी लेखक मिसेस वाट्स ( Hughes ) हिनें निरनिराळे प्रयोग करून पुढील सिद्धान्त सप्रयोग प्रस्थापित केले आहेतः ( १ ) ध्वनीच्या उच्चाराबरोबर तत्सापेक्ष विवक्षित आकृति काढली जाते. ( २ ) विवक्षित रागाच्या ठरलेल्या विवक्षित रगींत आकृतीच रेखाटल्या जातात. ( ३ ) आपल्याला जर अमुक आकृति दिसावी अशी इच्छा असेल तर त्यासाठीं ठरलेलें गीत ठरलेल्या स्वरसप्तकांत म्हटलें पाहिजे. त्यांत थोडा जरी फरक झाला तर इष्ट आकृति उठत नाहीं. याचप्रमाणें उलट *एका जर्मन शास्त्रज्ञानें नागरी संस्कृत लिपीच्या आकृतीच्या पोकळ पितळी* नळ्या करून त्यांतून ध्वनि उत्पन्न केला. तो त्या त्या वर्णोच्चाराप्रमाणें निघाला या यांत्रिक प्रयोगात ईशनियतीचे सूक्ष्म नियम कळून येतात.

ईशनियति ही जड आहे तिच्या मार्गे अथवा तिच्यातच ओतप्रोत ईश व्याप्त आहे. पण गुळाचा खडा अगदीं तोंडाशीं नेऊनहि त्याची गोडी कळत नाहीं अथवा शर्करावगुंठित कोयनेलची गोळी जिभेवर ठेवूनहि कोयनेलची रुचि जाणवत नाहीं, तसा नामनामींत मायेचा पडदा आड जाणवतो.

नामनामी-अभेद-प्रत्यय दुर्घट असला, तरी त्यास असंभवनीय असें म्हणता येत नाहीं. वाच्य-वाचकाचा अभेद आपणांस जाणवतो. अग्नि शब्द उच्चारतांच अग्नीचें स्वरूप मनापुढें येतें. गाय शब्द ऐकतांच गायीचें स्वरूप मनापुढें येतें. आतां अग्नि हा शब्द व अग्नि हा पदार्थ जरी जाग्रत व्यवहारांत एकरूप नसले तरी स्वप्न-मनोराज्यांत ते एकरूपच असतात. भौतिक पदार्थ ईशसृष्ट असल्यामुळें आपण त्या पदार्थांचीं उच्चारलेलीं व्यावहारिक नामें व ते पदार्थ एकरूप असूं शकत नाहींत. परंतु अभौतिक पदार्थांचें तसें

असत नाहीं शास्त्रात मंत्र याच देवता मानतात, त्याप्रमाणें ईश्वराचें नाम हें ईश्वररूप मानता येईल नामब्रह्म, शब्दब्रह्म, नादब्रह्म हे शब्द हेंच सुचवितात " तुका म्हणे नाम । चैतन्य निजधाम ॥ " श्रीतुलसीदास म्हणतात, " नामरूप दोऊ ईश उपाधि । " कठीं, सरी या नामांना सुवर्णाहून पृथक् सत्ता नसते " वाचाऽऽरमण विकारो नामधेय मृत्तिकेत्येव सत्यम् ॥" (छा उप ६।१।४) श्रीगुलाबरावमहाराज संप्रदाय सुरतरूत (पृ ४७) म्हणतात कीं, " अनभ्यस्त विवर्त शब्द तो नाम । अनभ्यस्त विवर्त रूप मेघश्याम । येथ प्रधान गौण संभ्रम । करूं नये तुकाराम वदती " ॥ ५० ॥

यासंबधीं संप्रदायसुरतरूतील पुढील वचनें चिंत्य आहेत " नामकवच लेयावें । तेथ निर्गुणहि ओळखावें । जे शक्तिमत्त्वें स्वभावें । तेंचि होय॥६१३॥ नामें परोक्ष नोहे हरि । लक्ष्यांश अपरोक्ष प्रगटे अंतरीं । प्रणव लक्ष्यांतम पुरी । लक्षणा होय ॥ ६१४॥ परी प्रणवाहोनि येथ विशेष । न त्यागिता मानांश । भलतिया ठायीं परेश । अधिष्ठानत्वें कळे ॥ ६१५॥ नामें सिद्ध कळे तें निर्गुण । आणि अनभ्यस्त विवर्त कळे सगुण । हेंहि गुरुगम्य वचन । अवधारिजे ॥ ६१७॥ " (संप्रदाय सुरतरु, पृ १५१) याचा भावार्थ असा कीं, ज्याप्रमाणें भगवच्छरीर भूतमय नाहीं तसें भगवन्नाम हा आकाशाचा गुण नव्हे तें भगवच्छरीराप्रमाणेंच अनादि नित्य आहे म्हणून भगवन्नामें साक्षात् भगवद्रूप असून भगवत्प्रादुर्भावक मानलीं आहेत (उज्ज्वल नीलमणी श्लोक १८, आनंदचंद्रिका) प्रणव हें ब्रह्मरूप आहे अकार ही ईश्वरविभूति आहे अशीं वचनें श्रुतिस्मृतींत आढळतात (छा उप व गीता)

दुसरें असेंहि म्हणता येईल कीं, ज्या अर्थी जीव हा तत्त्वत ब्रह्मरूप आहे आणि मायेच्या दृष्टीनें ईश्वराचा अंश आहे, त्या अर्थी त्याला ब्रह्माची व ईशाची ओळख आहेच ते अज्ञातत• ज्ञात आहेत कारण तेंच त्याचें स्वरूप आहे त्याच्या विस्मृतीचा अनुभव जर जीवाला येतो तर स्मृतिरूप उपलब्धीचा अनुभव येण्यास काय हरकत आहे? योगवासिष्ठात म्हटलें आहे कीं, " पूर्वं दृष्टमदृष्ट वा प्राग्दृष्टमिति निश्चये । यदैवेदा विघत्तेऽन्तस्तदाह स्मृतिरुद्राहृता " ॥ ३।९६।२४. म्हणजे पूर्वकालीं एखाद्या वस्तूचा अनुभव झालेला असो अथवा नसो, ज्या वेळीं त्या वस्तूची प्रत्यभिज्ञा निश्चित जाणवते तेव्हा त्यास स्मृति म्हणतात.

किंवा याउलट ज्या वेळीं नामयोगी प्राणायामादि साधनानें मनाला हृदयांत नेऊन अन्य कोणत्याहि विषयाची स्मृति होऊं न देतां भगवन्नामांत लीन करतो, त्या वेळीं त्या मनाचें उन्मन होऊन मीच तो नामी असा अभेदप्रत्यय येतो, असें आचार्यांच्या हरिमीडे स्तोत्रांतील सहाव्या श्लोकावरून म्हणतां येतें. तो श्लोक असा :

प्राणानायम्योमिति चित्तं हृदि रुध्वा नान्यत्स्मृत्वा तत्पुनरत्रैव विलाप्य ।
क्षीणे चित्ते मादृशिरस्मीति विदुर्यं तं संसारध्वान्त विनाशं हरिमीडे ॥ ६ ॥

यांत सांगितलेली प्राणायामाची क्रिया शुद्ध एकाग्रचित्तानें नामस्मरण करतांना सहज सिद्ध होत असली पाहिजे असें म्हणावें लागतें.

**वाच्यवाचकाभेद :—** ज्याप्रमाणें वाचक शब्द व वाच्य अर्थ हीं दोन्ही एकाच सत् ब्रह्मात कल्पित आहेत, त्याचप्रमाणें नाम आणि नामी पार्वती-परमेश्वराप्रमाणें *अविनाभूत रूपांत एकाच अधिष्ठानावर माया कल्पित आहेत.* ( मांडुक्य भाष्य १।१ पहा ). सत् ब्रह्म उभयातीत आहे. अथवा "तैसी तयें ईश्वरी । अंगुली नव्हे चि दुसरी । किंबहुना सरोमरीं । शिवेसीचि ॥" ( अमृतानुभव १०।३० ). म्हणजे शिवब्रह्माहून शिवनामाला पृथक् सत्ताच नाहीं. म्हणून ( दोहा ) "नामवाच्यगत साडुनी । सत्तालक्ष्य सुजाण ॥ ब्रह्मरूप साधक सदा । सोडुनि तनु अभिमान ॥" ( सूक्ति रत्नावलि प्रथम यष्टि १।३६ ). नामश्रवणाच्या मननद्वारां निजध्यासाचा हा मार्ग आहे. अज्ञानजन्य स्वप्नसृष्टींतील नामनामी अभेदप्रत्ययाप्रमाणें हा ज्ञानाच्या जागरांतील निदिध्यासजन्य अभेदप्रत्यय शक्य असतो.

उत्तम पुरुष अथवा प्रथम पुरुषवाचक सर्वनाम 'मी' हें हृदयस्थ आत्म-देवाचें नांव आहे. आपलें उपास्य आणि हा आत्मदेव एकच. त्या आत्म-देवाची म्हणजे नामीची प्रतीति येण्यासाठीं श्रीरमणमहर्षि रमणगीतेंत तीन मार्ग सांगतात : ( १ ) नेति नेति या व्यतिरेकपद्धतीचा अंतर्मुख वृत्तीचा सूक्ष्म विचार अथवा शोध. (२) आपला अहंभाव सूक्ष्म करीत करीत हृदाकाशांत

---

१. हृदयकुहरमध्ये केवलं ब्रह्ममात्रं, ह्यहमहमिति साक्षादात्मरूपेण भाति । हृदि विश मनसा स्वं चिन्वता मज्जता वा, पवनचलनरोधात्मनिष्ठो भव त्वम् ॥ २।२ ॥ –रमणगीता.

अथवा दहराकाशांत लीन करणें (३) प्राणगति निरोधानें चित्तवृत्ति-निरोध करून आत्मनिष्ठ होणें.

**अभेदानुभूतीची आणखी एक प्रक्रिया**—नाम म्हणजे शब्द हा आकाशाचा गुण मानला तरी खऱ्या नामस्मरणांत त्या शब्दास म्हणजे नामास धरून त्याचा वैखरी, मध्यमा, पश्यंती व परा या वाणींच्याद्वारां ग्रास करीत करीत आकाशवत् शून्य स्थितीला हृदाकाशांत प्राप्त व्हावयाचें आणि पुढें त्या शून्याचाहि ग्रास करून शून्यातीत स्थितीला (म्हणजे नामीचे ठायीं) पोंचावयाचें असतें. संत म्हणतात, "रामनाम ध्वनि उमटे। लक्ष लावी तेथें नेटें। रामरूप हृदयीं प्रगटे, नदुर, नदुर, नदुर, नदुर ॥ १॥" याचा स्पष्टार्थ असा कीं, प्रथम वैखरी वाणीनें स्पष्ट नामोच्चारण करावें. पुढें डोळे मिटून कंठगत मध्यमा वाणीनें दुसऱ्यास ऐकूं न जाईल असें नामस्मरण करावें. *त्या वेळीं सूक्ष्म ध्वनीची व श्रवणाची एकधारा तुटूं देऊं नये मग* जीभ न हालवितां श्वासोच्छ्वासाच्या धारेंतच नामोच्चाराचें गुप्त अवधान ठेवावें. तेथें मनच अखंड गुंतवावें. असें करीत असतां अंतरांत तें नाम दिव्य प्रकाशरूपांत दिसूं लागतें. तेथें पश्यन्तीनें एकाग्रध्यानदृष्टि ठेवावी. पुढें हळूहळू नाभिस्थानीं परा वाणींत वृत्तीनें संचार केला म्हणजे तेथें जीं दिव्य नामाक्षरें पूर्वी भावनादृश्य होतीं, तें दृश्यदर्शन द्वैत मावळून केवळ आत्म-सत्तारूप अस्तित्व मात्र उरतें. हें परा वाणीच्या स्वविषयगोचारिणी भावनेचें तन्मयानुष्ठान होय. हें पूर्ण अंगीं बाणलें म्हणजे नाम-नामी ऐक्यरूपाला प्राप्त होतात. तो कृतार्थतेचा निरतिशयानंद शब्दांनीं वर्णन करणें शक्य नाहीं. नुसती प्रक्रिया सांगणें सोपें आहे.

**भक्तिविरक्तिभगवत्प्राप्ति**—अशा या नामनिष्ठांच्या भगवद्भक्तीची फलश्रुति सांगतांना नाथभागवतात (अ० २) नवयोगींद्रापैकीं कवींच्या मुखानें श्रीएकनाथ म्हणतात :— "करिता हरिनामस्मरण कीर्ती। एकाएकीं एवढी प्राप्ति। झाली म्हणशी कैशा रीतीं। ऐकें नृपति तो भावो॥ ६०२॥ करितां पूजाविधि विधान। कां श्रवण स्मरण आणि कीर्तन। सर्वदां चिदैक्य भावनापूर्ण। पूर्ण प्राप्ति जाण त्यातेंचि वरी॥६०३॥ आइके विदेहा चक्रवर्ती। ऐशी जेथें भगवद्भक्ती। तीपाशीं विषयविरक्ति। ये धावती गोवत्सन्यायें॥ ॥ ६०४॥ हें असो जेवीं जावळीं फळें। हो नेणें वेरयेरां वेगळें। तेवीं भक्ति-

विरक्ति एके काळें। भक्त तेणें चळे चळिष्ठ होती॥ ६०५ ॥ जेथें भक्ति आणि विरक्ति। नांदो लागती सहज स्थिति। तेथेंचि पूर्णप्राप्ति। दासीच्या स्थितीं सर्वदा राबे ॥ ६०६ ॥ जेवीं कां भुकेलियापाशीं। ताट वाढलें पड्रसीं। तो पुष्टि तुष्टि क्षुधा नाशासी। जेवीं ग्रासोग्रासीं स्वयेंचि पावे ॥ ६१० ॥ सद्भावें करितां भगवद्भक्ती। भक्ति विरक्ति भगवत्प्राप्ती तिनी एके काळीं होती। ऐशि या युक्तीं जाणिजे राया ॥६१३॥ भक्ति म्हणजे सर्वभूतीं। सप्रेम भजन युक्ति। प्राप्ति म्हणिजे अपरोक्ष स्थिति। भगवत्स्फूर्ती अनिवार ॥ ६१४ ॥ विरक्ति म्हणजे ऐशी पहा हो। स्त्रीपुत्रदेहादि अहंभावो। समूळ तेथें होय वावो। विरक्ति निर्वाहो या नांव राया ॥ ६१५ ॥ यापरी भजनाचे पोटीं। भक्ति विरक्ति प्राप्ति त्रिपुटी। ऐक्यभावें सद्भक्तां उठी। हरिभजन दिठीं एकेचि काळीं ॥ ६१६ ॥ यालागी राया निज हितार्थी। आदरें करावी हरिभक्ति। तेणें अवश्य भगवत्प्राप्ती। उपसंहारार्थी कवी सांगे" ॥ ६१७ ॥

शब्द-अर्थ-प्रत्यय यांच्या अभेदासंबंधीं आपणांस सूक्ष्म विचार करतां यावा, यासाठीं अशा प्रत्ययाचे निरनिराळे अगदीं साधे प्रकार आपण लक्षांत घेणें फार उपयुक्त होईल. उदाहरणार्थ, कित्येक उपासकांना संस्कृत मुळींच येत नसतां आपला उपास्य ग्रंथ म्हणून गीता, भागवत, अध्यात्म रामायण अशा प्रासादिक ग्रंथांचें ते नित्य पठण करतात. तें असें कीं, पठणाचे वेळीं ग्रंथांतील प्रत्येक अक्षर डोळ्यांनीं स्पष्ट पाहिल्यावांचून त्याचा वाणीनें उच्चार करूं नये व तो प्रत्येक उच्चार कानांनीं ऐकल्यावांचून पुढील अक्षर पाहूं नये व वाचूं नये. याचा अर्थ तें पठण शुचिर्भूतपणें एकान्तांत अति सावकाश नेत्र, वाणी आणि कर्ण या तिन्ही इंद्रियांच्या वृत्तींची संतत एकधारा करून करतात. याप्रमाणें नित्यनियमानें व एकनिष्ठेनें ज्या एकच एक ग्रंथाचें पठण श्रद्धापूर्वक अनेक वर्षे होतें, त्या ग्रंथांतील शब्दार्थ व वाक्यार्थ, साधकास ती भाषा येत नसली तरी, उत्कृष्ट कळूं लागतो. दुसरा याहि पुढील असा एक प्रत्यय आढळतो कीं, ज्यांस ब्रह्मात्मज्ञान पटलें आहे, त्यांस त्यांना अवगत नसलेल्या भाषेंतीलहि असे अध्यात्मिक ग्रंथ सहज अल्पायासानें समजतात. भाषेचें अज्ञान त्यांस फारसें आड येत नाहीं. यासंबंधीं याहून साधें उदाहरण द्यावयाचें तर परभाषेच्या प्रांतांत राहण्यास गेलेल्या लहान मुलांना वस्तुपाठाप्रमाणें बाह्यार्थ ज्ञान अगोदर होतें आणि

नंतर त्यांच्याबरोबरीच्या तेथील स्थानिक मुलाच्या तोंडून रोज ऐकत असलेली त्या वस्तूसबंधीं परभाषा त्याना नडत नाहीं. ती लवकरच ती आत्मसात् करू शकतात. तात्पर्य, नाम आणि अर्थ यापैकीं कोणतेंहि एक माहीत असलें म्हणजे त्या आधारें दुसरेंहि कळूं शकतें.

एकाग्रतेनें उपास्य ग्रंथपठणाचा प्रकार वर सांगितला. त्याचप्रमाणें नामनिष्ठाचें नामस्मरण कसें पाहिजे तें कबीरसाहेब सागतात तें पहा :—

सुमिरणकी सुधि यों करो, जैसे कामी काम।
एक पलक ना बीसरे, निसिदिन आठों याम ॥
सुमिरणकी सुधि यों करो, ज्यों सुरभी सुतमाहि ॥
कह कबीर चारो चरत, बिसरत कबहूं नाहि ॥
सुमिरणकी सुधि यों करो, जैसे दाम कंगाल।
कह कबीर बिसरे नहीं, पलपल लेत सम्हाल ॥
सुमिरण सों मन लाइये, जैसे नाद कुरग।
कह कबीर बिसरे नहीं, प्राण तजे तेहि संग ॥
सुमिरणसों मन लाइये, जैसे दीप पतग।
प्राण तजै छिन एकमें, जरत मोडे अङ्ग ॥
सुमिरणसों मन लाइये, जैसे कीट भिरंग।
कबीर बिसारे आपको, होय जाय तेहि रंग ॥
सुमिरणसों मन लाइये, जैसे पानी मीन।
प्राण तजै पल बीछुडे, सत कबीर कह दीन ॥

एकनाथ म्हणतात :— नवल स्मरणाची ठेव। स्मरणामाजीं प्रगटे देव। एका जनार्दनीं नाम। नामीं प्रकटे आत्माराम ॥

**नाममहिमा** — आतां सतश्रेष्ठ ज्ञानेश्वर नामाचा महिमा सांगतात, त्याचा एक नमुना देतों :—

"तरी कीर्तनाचेनि नटनाचे। नाशिले व्यवसाय प्रायश्चित्तांचे। जे नामचि नाहीं पापाचें। ऐसें केलें ॥ १९७॥ यमदमा अवकळा आणिली। तीर्थें ठायांवरूनि उठविलीं। यम लोकींची पुंटली। वाहटी आघवी ॥ १९८॥ यमु म्हणे काय यमावें। दम म्हणे कवणातें दमावें। तीर्थें म्हणती काय खावें। दोष औखदासी नाहीं ॥ १९९ ॥ ऐसें माझेनि नामघोषें। नाहींचि करिती

विश्वाचीं दुःखें । अवघें जगाचि महासुखें । दुमदुमित भरलें ॥ २०० ॥ जयांचे वाचेपुढां भोजे । नाम नाचतसे माझें । जे जन्म सहस्रीं वोळगिजे । एक वेळ यावया ॥ २०६ ॥ तो मी वैकुंठीं नसें । वेळ एक भानुबिंबींहि न दिसें । वरी योगियांचीं हीं मानसें । उमरडोनी जाय ॥ २०७ ॥ परी *तयापाशीं पांडवा । मी हारपला गिवसावा । जेथ नामघोष बरवा । करिती* माझा ॥ २०८ ॥ कैसे माझ्या गुणीं धाले । देशकाळातें विसरले । कीर्तनें सुखी झाले । आपणपांचि ॥ २०९ ॥ कृष्ण विष्णु हरि गोविंद । या नामांचे निखळ प्रबंध । माजी आत्मचर्चा विशद । उदंड गाती ॥ २१० ॥ ज्ञानेश्वरी, अ. ९."

**सारांशः**—शुद्ध व उत्कंठित अंतःकरणाच्या सतत नामस्मरणानें नामी जो ईश्वर तो प्रसन्न होतो व नामनामी यांच्यामधील मायेचा आड-पडदा तोच दूर करतो. कारण नामनामीअभेदप्रत्यय हा वस्तुतंत्र आहे. कर्तृतंत्र म्हणजे उपासकाच्या स्वाधीन नाहीं. ईश्वराचा अगर ब्रह्माचा साक्षात्कार सगुणनिर्गुण परमेश्वराच्याच अधीन आहे. तो प्रत्यक्ष साधनसाध्य नाहीं. आवरणविक्षेपादि प्रत्यवाय ईश्वरकृपेनें दूर होऊन त्याच्याच इच्छेनें त्याचा प्रत्यय अथवा साक्षात्कार होत असतो. फार काय नामस्मरण हेंहि त्याच्याच स्वाधीन आहे. त्यानें कृपा केली तरच नामस्मरणाची बुद्धि होणार व तें सतत एकाग्रतेनें घडत राहणार, असें म्हटल्यास चालेल. यासाठीं त्याची अनन्यगतिकत्वानें प्रार्थना करणें एवढेंच फार तर आपल्याकडे आहे. अशा रीतीनेंच या क्लिष्ट व दुर्घट मुद्द्याचा उपसंहार करणें बरें.

यमेवैष वृणुते तेन लभ्यस्तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्॥
१।२।२३ कठ. उप.

तुका म्हणे त्याच्या नांवें । तोचि होईल स्वभावें ॥
गोविंद गोविंद । मना लागलिया छंद ।
मग गोविंद ते काया । भेद नाहीं देवा तया ॥ —तुकाराम

---

प्रकरण ६ वें

# जपयज्ञ

> यज्ञानां जपयज्ञोऽस्मि ॥ —गीता १०।२५
>
> जपात्सिद्धिर्जपात्सिद्धिर्जपात्सिद्धिर्न संशयः ॥
>
> मौन एव परो जपः ॥ —कुलार्णवतंत्र

भगवंताच्या सत्, चित् आणि आनंद या तीन भावांच्या साक्षात्कारासाठीं कर्म, ज्ञान आणि भक्ति हे तीन मार्ग सांगितले. त्याचप्रमाणें पूर्वमीमांसा, उत्तरमीमांसा व भक्तिमीमांसा हीं त्यांचीं अनुक्रमें तीन दर्शनें सांगितलीं. विराट कार्यब्रह्मांत ईश्वराचा सद्भाव पाहणें हें कर्ममीमांसादर्शन होय, कारणब्रह्माच्या ठिकाणीं चिद्भावाचा प्रत्यय घेणें ही ज्ञानमीमांसा होय आणि सच्चिदांत व्यापक असणारा आनंदभाव अनुभविणें ही भक्तिमीमांसा किंवा दैवी मीमांसा होय. या तीन मार्गांत अथवा मीमांसांत कोठें कोठें विरोधाचा भास झाला[1], तरी वस्तुतः त्या एकमेकांस पूरकच आहेत; आणि म्हणून *यज्ञांतील जपयज्ञ तो मी असें भगवान् गीतेंतील विभूतियोगांत* सांगून कर्म आणि भक्ति यांचा संधि साधतात. कलियुगांत वैदिक यज्ञ यथासांग होणें कठिण, शिवाय त्यांत सर्वांना अधिकार नाहीं, हें जाणून यज्ञाला भगवंतांनीं सर्वसुलभ भक्तिमार्गांत जपाचें रूप दिलें असें वाटल्यास म्हणावें. या जपाचे वैखरीच्या मोठ्यानें नामघोषापासून तों परेच्या मौनापर्यंत अनेक प्रकार आहेत. त्यांत वैयक्तिक दृष्ट्या स्थूल नामघोषापेक्षां सूक्ष्म नामचिंतन श्रेष्ठ हें तर खरेंच, पण याउलट सामुदायिक दृष्ट्या मौनापेक्षां मोठ्यानें भजनकीर्तनाचा गजर हा जास्त श्रेयस्कर ठरतो. नामजपासंबंधीं सर्व माहिती या[2]

---

१ उदाहरणार्थ, याज्ञिक आणि श्रीकृष्ण, याज्ञिक आणि शिव यांच्या अनेक आख्यानांत असा विरोधदर्शक भास होतो.

२ या विषयावर मराठींतील श्रीगुलाबरावमहाराज यांचा संप्रदाय सुरतरु, श्री. जठार यांचें स्वानंदसाम्राज्य, तसेंच श्री. रा. कृ. कामत यांचें नाम

( टीप पुढील पानावर पहा. )

प्रकरणांत देतां येणार नाही. तरी शिवलिंगोपासनेला धरून कांहीं ठळक गोष्टी योडक्यांत पुढें सांगत आहे.

पांतजल योगानुशासनांत म्हटल्याप्रमाणें "तस्य वाचकः प्रणवः ॥ २७ ॥ तज्जपस्तदर्थभावनम् ॥ २८ ॥" ॐ या एकाक्षरापासून सहस्त्रनामें, रामरक्षादि स्तोत्रें, शतरुद्रीय जप, गायत्रिजप, असे अनेक जप शास्त्रांत सांगितले आहेत. बृहदारण्यकांत (१।३।२०) "असतो मा सद्गमय। तमसो मा ज्योतिर्गमय। मृत्योर्माऽमृतं गमय।" अशा प्रकारें प्राणोपासकांकरतां जपाचें विधान सांगितलें आहे. जसा नाममंत्राचा जप तसाच गायत्रि मंत्राचा जप, रुद्रीय जप व रामरक्षास्तोत्रजप, हे सर्वांत जास्त रूढ असे मंत्रजप दिसतात. शिवाचीं दश हजार नावें ब्रह्मदेवानें देवांना सांगितलीं. त्यांपैकीं विशेष प्रसिद्ध असलेल्या शिवसहस्त्रनामाचा तंडी, उपमन्यु इत्यादि अनेक ऋषि, सिद्ध, मुनि यांनीं जप केला, असें महाभारत, अनुशासनपर्व, अ. १७ यांत सांगितलें आहे. दक्षानें आठ हजार शिवनामांचा जप केला, असें वायुपुराण, अ० ३० यांत आहे. तथापि ईश्वराच्या एकाच लघुतम अक्षरांच्या नामाचें स्मरण करण्याची चाल अधिक दिसते; व तीं नामें म्हणजे शिव, राम, दत्त, हरि इत्यादि होत. पण दीक्षा घेतलेला जपाचा मंत्र अनेक अक्षरांचा संभवतो.

जप हें एक अनुष्ठान आहे. त्याच्या मागें शास्त्राचे नियम, विधिनिषेध आणि होमहवनादि विधानें आहेत. ज्याप्रमाणें कणप्प व श्रीकराची साधी शिवपूजा वेगळी व लिंगार्चन वेगळें, त्याप्रमाणें ईश्वराचें साधें नामस्मरण आणि नामजपजाप्य यांच्या तंत्रांत पुष्कळ अंतर आढळतें. नामनिष्ठास नामनामीअभेदप्रत्यय प्रारब्ध-प्रतिबंध दूर झाल्यावर होतो. नामस्मरण ही एक निष्काम व निःसंकल्प गूढशक्ति आहे, जप हें संकल्पपूर्वक संख्यायुक्त अनुष्ठान आहे. तें प्रारब्धदोषनिरसनार्थ उपयुक्त असावें, असें दिसतें. नामस्मरणाचा हिशेब ठेवायचा नसतो. पण संख्यायुक्त जपाचा हिशेब

---

( टीप मागील पानावरून चालू )

चिंतामणि व नामजपाचें महत्त्व हीं पुस्तकें जिज्ञासूंनीं पाहावीं. श्रीस्वामी शिवानंदजी यांचेंहि या विषयावर एक पुस्तक आहे असें समजतें. संस्कृतांत अनेक पुस्तकें आहेत. कल्याण मासिकाचा एक विशेष अंकच भगवन्नामांक म्हणून आहे. याशिवाय कल्याण मासिकांत या विषयावर नेहमीं लेख येतातच.

ठेवावा लागतो. जपाचे अनेक प्रकार आहेत. संख्यायुक्त जप केल्यानें साधकाच्या जन्मलग्नकुंडलींतील बारा स्थानें यथावकाश शुद्ध होतात.

**संख्यायुक्त जपाची आणखी फलश्रुतिः—** संख्यायुक्त जप करीत गेल्यानें इष्ट संख्या पुरी करण्यासाठीं मनाचा नामध्यास वाढत जातो व शुभेच्छा, विचारणा, तनुमानसा, सत्त्वापत्ति व असंसक्ति या ज्ञानाच्या पांच भूमिका नामधारक सहज चढून जातो. अर्थात् हा सारा विषय नुसतें बोलण्याचा अगर लिहिण्याचा नाहीं. निष्ठापूर्वक अनुभव घेण्याचा आहे हें उघडच आहे.[१]

**जपयज्ञाच्या उपपत्तिः—** (१) वामनपंडितांची पुढीलप्रमाणें आहे. "यज्ञानां जप यज्ञोऽस्मि।" असें भगवंतांनीं गीतेच्या दहाव्या अध्यायांत (श्लोक. २५) विभूतियोगांत सांगितलें आहे. त्याचा वामनपंडित असा खुलासा करतात कीं, "सकळ यज्ञ मी अर्जुना। कीं सर्व योग माझा जो मज वेगळा असेना। परि जपयज्ञासम कोणी दिसेना। विभूतिरूपें मी जपयज्ञ तो ॥७०९॥ अगा उपाधि जीवांचा। शब्दरूप चारी वाचा॥ त्यांत थोर चाळा अहंपणाचा। कीं मी माझें मज अमुकें पाहिजे॥७१०॥ अखंड कल्पनेच्या घडामोडी। ते पश्यंती वाचा न राहे घडी। जपकाळीं तिची उडी। मंत्रावरी पडतसे॥७११॥ कल्पना संसाराचें मूळ। जी करिता चिदंश केवळ। जीवत्व पावला कीं सत्त्वसागरीं कल्लोळ। सर्वदा राजस तामस कल्पनेचे॥७१२॥ नारायणाचा मंत्र जेथवां। पश्यंतीमध्यें आठवे तेथवां। चिदंश केवळ पावे विसांवा। संसार कल्पनेपासुनी।७१३॥ मनरूप झाली कल्पना। ते चित्स्फूर्ति मंत्रामींत होमिती अर्जुना॥ तेव्हां कैवल्यच फळ यजमाना। जपयज्ञाचिया ॥७१४॥ मासिया नामाचे मंत्र। वैखरीस येतां करिती पवित्र। पश्यतींस जप होतां तावन्मात्र। मंत्ररूप उपाधिच होतो जीवाचा॥७१५॥ पश्यंती मंत्र म्हणे। बुद्धि आत्मप्रत्ययें तितुकेंचि जाणें। तेव्हां समाधिलक्षणखुणें। जवाळि जीवोपाधि पावला॥७१६॥ कीं मनाचेंहि स्फुरण राहे। बुद्धि

---

१ यस्तु द्वादशसाहस्रं नित्यं प्रणवमभ्यसेत्।
तस्य द्वादशभिर्मासैः परब्रह्म प्रकाशते॥ —यतिधर्मप्रकाश

एवं व्रतः स्वप्रियनामकीर्त्या जातानुरागो द्रुतचित्त उच्चैः।
हसत्यथो रोदिति रौति गायत्युन्मादवन्नृत्यति लोकबाह्यः॥ भाग ११।२।४०
[illegible] सिद्धो भवत्यमृतो भवति तृप्तो भवति। —नारदभक्तिसूत्र ४

स्वात्मस्वरूपातेंचि पाहे ॥ तोहि अनुभव होत आहे । क्षण अर्धक्षण परि अविथेनें ओळखेना ॥ ७१७ ॥ हाच राजा ऐसें न वाटे । तथापि तो जरी घडि घडी भेटे । तरी लौकरीच दरिद्रपण फिटे । कीं हा राजाधिराज कनवाळू ॥ ७१८ ॥ काय बोलोनि बहुत । जपयज्ञासम यज्ञ नाहीं निश्चित । इतर यज्ञ मीच योगैश्वर्यशरीर भगवंत ॥ परि तारक विभूतिरूप जपयज्ञ मी ॥ ७१९ ॥
यथार्थदीपिका, अध्याय १०.

जपयज्ञाला सात्त्विक व अहिंसक मानला आहे. म्हणून तो कर्मकांडांतील विधियज्ञापेक्षां श्रेष्ठ आहे. त्यांत कोणाची हिंसा असेलच तर अहंकाररूप 'अजाची' मात्र आहे, असें म्हणता येईल.

"विधियज्ञाज्जपयज्ञो विशिष्टो दशभिर्गुणैः । उपांशुः स्याच्छतगुणः साहस्रो मानसः स्मृतः ॥ ८५ ॥ ये पाकयज्ञाश्चत्वारो विधियज्ञसमन्विताः । सर्वे ते जपयज्ञस्य कलां नार्हन्ति षोडशीम्" ॥ ८६ ॥ मनु. अ० २. दर्शपौर्णिमासादि विधियज्ञ तसेंच वैश्वदेव, होम, बलिकर्म, नित्यश्राद्ध व अतिथिभोजन हे चार पाकयज्ञ, यांपैकीं कशासच जपयज्ञाची योग्यता नाहीं. तो जपयज्ञ मानस केला असतां त्याचें वरील विधियज्ञापेक्षां सहस्र पट फळ मिळतें.

(२) उपपत्ति—अग्नींत सोमाची आहुति हें यज्ञाचें स्थूलस्वरूप आहे. नामधारकानें स्वता शिवरूप झाल्यावांचून शिवाचें अद्वय भजन संभवत नाहीं. 'अग्निषोमात्मकं जगत्' असें हें जग वस्तुतः ज्ञानाग्निरूपच आहे. कारण अग्नींत टाकलेली आहुति अग्निरूपच होते. आपल्या मनबुद्धिरूप सूक्ष्म कोपांत असा निरधन संविदाग्नि सदा प्रज्वलित आहे. त्या ठिकाणीं नामनामीच्या अभेदप्रत्ययांत शैवतत्त्वज्ञानांतील छत्तीस तत्त्वरूप जगताचें हवन होतें व एकच एक शिवसंवित् मात्र नित्य उरतें. नामजपयज्ञ-साक्षात्काराचें तत्त्वतः असें रूप आहे.[1]

---

१ अन्तर्निरन्तरमानिन्धनमेधमाने
मोहान्धकार परिपन्थिनि संविदग्नौ,
कस्मिंश्चिदद्भुत मरीचिविकासभाने
विश्वं जुहोमि वसुधादि शिवावसानम् ।

(३) हकार शिवाचा वाचक व अहंचा पर्याय आहे सकार शक्तीचा वाचक व इदंतारूप जगाचा पर्याय आहे 'सोऽहम् हंसः' हें रोजच्या २१६०० श्वासो-च्छवासरूपाचें तात्त्विक स्वरूप आहे. 'सोऽहम्' ही अंतर्मुख ब्रह्मवृत्ति आहे. 'हंस.' ही शक्तीची बहिर्वृत्ति आहे 'शिवोऽहम् शिवोऽहम् शिव. केवलोहम्' अशी अजपाजप करणारांची अखंड शिवाकार सूक्ष्म वृत्ति असते. अशी जी सूक्ष्म निर्वृत्तिक स्थिति तीच "जीवशिवयोरैक्य सिद्धि.।" जाणावी.

(४) एकनाथी भागवतांत भगवंताच्या पूजास्थानाचें माहात्म्य सांगतांना प्राणवायु या विभूतीबद्दल पुढीलप्रमाणें माहात्म्य सांगितलें आहेः—

"वायूच्या ठायीं भगवद्‌बुद्धि । ज्याची ढळों नेणे कधीं । वायूचेनि भूता चेतनसिद्धि । जगातें त्रिशुद्धि धरिता तो ॥ १४१६ ॥ वायुरूपें मीचि जाण। जालों सर्वभूतांचा प्राण । प्राणाचा मी मुख्य प्राण । मद्रूपें पवन या हेतु ॥ १४१७ ॥ प्राणाचें गमनागमन । तेथ सोहंहंसाचें नित्य ध्यान । तेंचि करितां नित्य सावधान । हेंचि पूजन वायूचें ॥ १४२० ॥ मद्रूपें दृढभावन । वायूचें जो करी आपण । तें पवनाचें पूजन । पूजास्थान सातवें ॥ १४२१ ॥"

ए. भागवत, अ. ११

(५) आतां जपयज्ञाची भौतिक परिमार्पेत थोडी स्थूल उपपत्ति पाहूं यो. आपल्या शरिरांत स्थूल, सूक्ष्म, कारण अशी स्थूल, सूक्ष्म, सूक्ष्मतर शरीरें, किंवा अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनंदमय हे कोष, तसेंच वैखरी, मध्यमा, पश्यन्ती, परा अशा चार वाणी आहेत. हीं शरीरें कोष, वाणी, एकापेक्षां एक सूक्ष्म व श्रेष्ठ आहेत. अर्थात् यांतील श्रेष्ठ तत्त्वाकडून कनिष्ठाचें नियंत्रण होत असतें. दीर्घकालीन दृढ अभ्यासानें, पूर्वप्रारब्धफलानें किंवा श्रीशिवगुरूंच्या कृपेनें प्रत्येक श्वासाबरोबर नामस्मरण सहजगत्या घडूं शकतें, असा कित्येक जण आपला अनुभव सांगतात. याप्रमाणें प्राणाबरोबर नामरसायन रक्तांत भिनून त्याचा परिणाम स्थूल शरिरावरहि होऊं शकतो. तसेंच उपासक ज्याचें नाम घेतो, तें ईशतत्त्व अति सूक्ष्म, नित्य आणि व्यापक, असें जगाचें उपादानकारण असल्यामुळें ईश्वरनामोच्चारांबरोबर प्रथम परोक्षतेनें जाणवणाऱ्या नामीच्या म्हणजे ईशतत्त्वाच्या सान्निध्यानें नामधारकाची

१ कल्याण कल्पतरु.

अतर्बाह्य शुद्धि होत जाते.[१] तत्त्वमसि महावाक्य परमात्म्याचा लक्षणेनें बोध करतें. शिवनाम त्याच्या शक्तिवृत्तीनें बोध करतें. म्हणून तें महावाक्यापेक्षां श्रेष्ठ मानलें आहे. आपण पश्यन्ती वाणीनें म्हणजे ओठ व जीभ न हालवितां केवळ मनानेंच अखंड नामस्मरण केलें तर त्याचा पडसाद ईश्वराच्या समष्टि मनाकडून लगेच मिळत राहील. प्रथम कांहीं दिवस मिळाला नाहीं तरी अखंड जपाच्या आवृत्तींनीं तो लवकरच मिळूं लागेल. ओलें लांकूड पेट घेण्यास थोडा वेळ लागतो. पण तें केव्हां तरी पेटतेंच. तुका म्हणे नाम । चैतन्य निजधाम ॥ हा नामनामीचा अभेद हें अभौतिक जगांतील नामाचें जें वस्तुमाहात्म्य आहे, तें कर्तृतंत्र नाहीं, म्हणजे त्याला उपासकाच्या भावनेची नेहमींच गरज नाहीं. नामस्मरणांतीं जो साक्षात्कार होतो त्याला उपासकाच्या प्रयत्नाचें फल म्हणण्यापेक्षां त्याला स्वतंत्र नाममाहात्म्य असेंच संतांनीं मानलें आहे. त्याचा अधिक विचार पुढें करूं. मनुष्याच्या शरिरांतील चढत्या कोषमाहात्म्याप्रमाणें उलट त्याच्या खालच्या वाणीचें महत्त्वहि वाढत जातें. औषध जितकें सूक्ष्म असतें तितकें तें लवकर गुणकारी होतें. कारण त्याचें सात्म्य सहज होतें. उदाहरणार्थ, सहस्रपुटि अभ्रक किंवा होमोपथी व बायोकेमिकचीं सूक्ष्म शरीरधारी औषधें हीं जीवाच्या सूक्ष्म शरिरावर लवकर परिणाम करतात, म्हणून जास्त प्रभावी ठरतात. सूक्ष्म हें स्थूलाचें नियामक असतें. तोच अनुभव "स्पिरिट हीलींग" मधें येतो. डॉक्टर क्लोरोफार्म देऊन स्थूलाच्या संवेदनाच बंद करतात, योगी चित्तवृत्तिनिरोध करून तेंच करतात. मोहनविद्येंत रोगनिवारणाचें अगर अन्य चमत्काराचें हेंच तंत्र असतें. स्थूलाचा प्रत्यवाय दूर झाल्यामुळें सूक्ष्माकडून अद्भुत कार्यें होऊं शकतात. नामरसायन हें आकाशाहूनहि अति सूक्ष्म असून तें नामीशीं तत्त्वतः एकरूप असल्यामुळें अति प्रभावी असतें[२]. यास्तव स्थूल श्वासोच्छ्वासाचे वाहनावरोबर किंवा त्याहिपेक्षां सूक्ष्म असलेल्या मननिदिध्यासनांत ज्ञानेंद्रियें व मन यांच्या सूक्ष्म ज्ञानतंतूद्वारां

१ मन रामीं रंगलें । अवघें मनचि राम झालें । सबाह्य अभ्यंतरीं अवघें रामरूप कोंदलें हो ॥

२ संप्रदाय सुरतरु ॥ अ. २, पृ. ९२ ते ९४.
उज्ज्वल नीलमणी ॥ १८ प्र. सू. १।२।२८. वृ. १।२।४. मनु १।२१.

दिव्य नाम हें मूलग्राही असा परिणाम करतें. ज्ञानतत्त्वाचा एकमेव विषय सत्ता किंवा नाम हाच नामीरूप झाला म्हणजे जीव शिवरूप होतो संताच्या मन व इंद्रियांना असेंच सहज वळण मिळतें[1].

**जप कोणत्या नामाचा करावा ?** —महाराष्ट्रीय प्रमुख संत बहुतेक वैष्णव असल्यामुळें श्रीविठ्ठल, राम, कृष्ण, हरि या नामाचें त्यांनीं माहात्म्य सांगणें स्वाभाविक आहे पण आतां या प्रश्नाला अनुसरून या मुद्द्यासंबंधीं सयुक्तिक विचार करावयाचा आहे. श्वेताश्वतर उपनिषदांत, " कस्मै देवाय हविषा विधेम ? " ४।१३ ॥ म्हणजे कोणत्या देवाला हवि देऊन पूजा करावी ? असा प्रश्न उपस्थित करून त्याच्याच पुढील मन्त्रांत " ज्ञात्वा शिवं शान्तिमत्यन्तमेति ॥ ४।१४ " शिवाला जाणून मनुष्य शांति पूर्णपणें पावतो असें उत्तर दिलें आहे त्याचप्रमाणें कूर्मपुराणांत ( १८ ) " कलौ देवो महेश्वर ।" असें वचन आहे तसेंच " कलौ चंडी विनायकौ । " असेंहि पुराणोक्त वचन प्रसिद्ध आहे त्यावरून कलियुगांत शिवशक्ति हींच मुख्य उपासनीय दैवतें होत असें उघड होतें स्वामी विवेकानंद नेहमीं म्हणत कीं, भारताचा उपास्य देव वैराग्यमूर्ति शिव हाच आहे ते असेंहि सांगत कीं, महाभारताचा नायक श्रीकृष्ण नसून महादेव होय महाभारताचें अनुशासनपर्व, सौप्तिकपर्व, द्रोणपर्व, शांतिपर्व अशा अनेक पर्वांतून शिवाचें विशेष माहात्म्य वर्णिलें आहे सर्व पुराणांत त्याचा महिमा सांगितला आहेच आतां श्री शंकराचीं अनेक सहस्रनामें असल्याचा पुराणांत ( महाभारत, ( अनु प ), वायुपुराण इत्यादि ) उल्लेख आढळतो पण त्या सहस्रनामांत शिव या नामासच अग्रपूजेचा मान आहे शिवपंचाक्षरी व शिवषडाक्षरी मंत्र, शिवोऽहं शिवोऽहं शिव केवलोऽहम् । इत्यादि घोषणा, शिवानंदलहरी, शिवसहस्रनाम, शिवपुराण, शिवकवच, शिवलिंग, शिवालय, शिवगीता, शिवमहिम्न स्तोत्र इत्यादि सर्वांत शिव हेंच नाम उपयोगांत येतें, म्हणून या कलियुगांत शिव हेंच नामस्मरण करावें

---

१ पडलें वळण इंद्रियां सकळां ।
भाव तो निराळा नाहीं दूजा ॥
विषय तो झाला अवघा नारायण ॥ —तुकाराम

जप कोणता करावा असा जाबाल उपनिषदांत प्रश्न विचारला असतां "रुद्राचा" असा खुलासा केला आहे. पन्नास-पाऊणशें वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत बहुतेक प्रत्येक ब्राह्मणाला रुद्रपाठ शिकविला जात असे. बोधसारांत म्हटलें आहे कीं, "शिवः कर्ता शिवो भोक्ता शिवः सर्वेश्वरेश्वरः। शिव आत्मा शिवो जीवः शिवादन्यत्र विद्यते ॥ १९ ॥" (पृ. ९८), 'यज्ञानां जपयज्ञोऽस्मि।' असें म्हणणारे भगवान् 'रुद्रांतील शंकर तो मी' असेंहि गीतेंत (१०।२३) सांगतात. शिवपंचाक्षरस्तोत्रांत शिवनामाचाच महिमा आहे. श्वेताश्वतरादि कित्येक उपनिषदें शिवाचाच महिमा सांगतात. शिवमाहिम्याचीं पुढील वचनें पहा :—

नागेन्द्रहाराय त्रिलोचनाय
भस्माङ्गरागाय महेश्वराय
नित्याय शुद्धाय दिगम्बराय
तस्मै नकाराय नमः शिवाय ॥ १ ॥

मन्दाकिनीसलिल चन्दनचर्चिताय
नन्दीश्वर प्रमथनाथ महेश्वराय।
मन्दार पुष्प बहुपुष्पसुपूजिताय
तस्मै मकाराय नमः शिवाय ॥ २ ॥

शिवाय गौरी वदनाब्जवृन्द—
सूर्याय दक्षाध्वर नाशकाय।
श्रीनीलकण्ठाय वृषध्वजाय
तस्मै शिकाराय नमः शिवाय ॥ ३ ॥

वसिष्ठकुम्भोद्भव गौतमार्य
मुनीन्द्र देवार्चित शेखराय।
चन्द्रार्क वैश्वानर लोचनाय
तस्मै वकाराय नमः शिवाय ॥ ४ ॥

यक्षस्वरूपाय जटाधराय
पिनाकहस्ताय सनातनाय
दिव्याय देवाय दिगम्बराय।
तस्मै यकाराय नमः शिवाय ॥ ५ ॥

पंचाक्षरमिदं पुण्यं यः
पठेच्छिव सन्निधौ ।
शिवलोक मवाप्नोति
शिवेन सह मोदते ॥ ६ ॥ ( श्रीमच्छंकराचार्य )

सर्वगं सर्वकर्तारं सर्वं सर्वावभासकम् । सर्वावलम्बनं शान्तं शिवं पूर्ण मजाम्यहम् ॥ विना यस्य कृपां नैव जीवाना मोक्ष संभवः । कथं तं शंकरं त्यक्त्वा देहं मोहमयं भजे ॥ १ ॥

सारूप्यं तव पूजने शिव महादेवेति संकीर्तने । सामीप्यं शिवभक्ति धुर्य जनता साङ्गत्य सम्भाषणे । सालोक्यञ्च चराचरात्मकतनुध्याने भवानीपते । सायुज्यं ममसिद्धमत्र भवति स्वामिन् । कृतार्थोऽस्म्यहम् ॥ शिवानंदलहरी

कुं–हरहर जपिये मन्त्रवर । पढिये शिव–सद्ग्रंथ । कीजे शंकर चिन्तवत यह ही सच्चा पन्थ ॥ यह ही सच्चा पन्थ । सर्वमें शम्भु निहारे । अधिष्ठान शिवसत्य । विश्व अध्यस्त विचारे ॥ भोला ! भूला शम्भु, तभीसे फिरता दर दर । दर दर अब मत घूम । प्रेमसे भज रे हर–हर ॥

नामतश्चार्थतश्चापि महादेवो महेश्वरः । तदन्ये केवलं देवा महादेवा न तेऽनघ ॥ महादेवं विना यो मां भजते श्रद्धया सह । नास्ति तस्यविनिर्मोक्षः संसारा–ज्जन्मकोटिभिः ॥ ५२ ॥ –स्कंद सूत सं., यज्ञवैभव, अ० २५

*यस्य यस्य पदार्थस्य या या शक्तिरुदीरिता । सा सा सर्वेश्वरी देवी स स सर्वो महेश्वरः ॥*

पारमार्थिक साधनमार्गात सामान्यतः सृष्टीच्या अनुक्रमाचा व्युत्क्रम दिसून येतो. सृष्टीची परिणत अवस्था म्हणजे गुणवैषम्यावस्था होय. सृष्टीचा आरंभ गुणसाम्यावस्था विचलित होऊन होत असतो. तो मूळारंभ आरंभ *प्रणव या नामरूपांत निनादित झाला. तेंच सशक्तिक शिवाचें किंचित् व्यक्त* स्वरूप होय. म्हणून पारमार्थिक साधनमार्गात तेंच प्रणवस्वरूप शिवलिंग आद्य उपास्य मानलें आहे. विनाश करण्यास योग्य असें जें मूलाज्ञान त्याचा निरास या शिवनामरूपाच्या निदिध्यासनांत आहे. शिव या नामाचा अर्थ धूतपापेश्वर असा आहे. अज्ञान हेंच सर्व पातकांचें मूळ आहे. गुरु या शब्दाचा अर्थहि अज्ञाननाशक असाच आहे. असे जे अज्ञाननाशक आदि गुरु तेच शिव होत. शिव हें प्रकाशतत्त्व आहे. शक्ति हें विमर्श तत्त्व आहे.

म्हणून आद्य देवता व आद्य गुरु या दोन्ही दृष्टींनी शिव हें नामरूप प्रथम उपास्य आहे असा अर्थ ध्यानीं घेऊन मूलाज्ञाननाशक शिवस्मरण करणें म्हणजे नामी जो सर्वेश्वर अथवा शिवगुरु त्याच्याशीं एकरूप होणें होय. हें प्रथम सारें परोक्ष ज्ञान असलें, तरी शाखाचंद्रन्यायानें अपरोक्षानुभूतीस उपोद्‌बलक आहे हें सहज लक्षांत येईल. शिवाच्या पडक्षर मंत्रजपानें किंवा अथर्वशिरस अथवा कैवल्योपनिषद् यांच्या जपानें शिवसायुज्य प्राप्त होतें असें शिवगीता सांगते.[1] आणखीहि पुढील वचनें पहा:—

(१) शिवइत्यस्ति यन्नाम तद्धि नामोत्तमोत्तमम्।
तदेव परमं ब्रह्म तदेव हि वरानने ॥
शिवनाम स्वरूपेण व्यक्तं ब्रह्माहमेवहि।
शिवनामाहमेवेति विजानीहि यथार्थतः ॥
यदव्यक्तं परं ब्रह्म वेदान्तप्रतिपादितम्।
तदेवेदं विजानीहि शिवइत्यक्षरद्वयम् ॥
तारकं ब्रह्म परमं शिवइत्यक्षरद्वयम्।
नैतस्मादपरं किञ्चित् तारकं ब्रह्म सर्वथा ॥

—शिवरहस्य, सप्तमांश, अध्याय २३.

(२) सकळ यज्ञामाजी जपयज्ञ थोर। म्हणाल कोणता जपावा मंत्र। तरी मंत्रराज शिवपडक्षर। बीजसहित जपावा ॥ ४२ ॥ हा मंत्र आत्मप्राप्तीची खाणी। कैवल्य मार्गींचा प्रकाशतरणी। अविद्या कानन दाहक ब्रह्माग्नि। सनकादिक ज्ञानी हाचि जपती ॥ ४१ ॥ स्त्रीशूद्र आदि करूनी। हाचि मुख्य चहूं वर्णी। गृहस्थ ब्रह्मचारी आदि करुनी। दिवस रजनीं जपावा ॥ ५० ॥ जागृतीं स्वप्नीं येतां जातां। उभें असतां निद्रा करतां। कार्या जातां बोलतां भांडतां। सर्वदाही जपावा ॥ ५१ ॥ न्यास मातृकाविधि आसन। नलगे जपावा प्रीती करून। शिव शिव उच्चारितां पूर्ण। शंकर येऊन पुढें उभा ॥ ५३ ॥ मंत्रजपका लागुनी। शिव म्हणे मी तुमचा ऋणी। परी तो मंत्र गुरुमुखें करुनी। घेईजे आधीं विधीनें ॥ ५५ ॥ —शिवलीलामृत, अ. १.

---

१ यस्तु रुद्रं जपेन्नित्यं ध्यायमानो ममाकृतिम्। पडक्षरं वा प्रणव निष्कामो विजितेंद्रियः ॥ ५९ ॥ तथाथर्वशिरोमंत्रं कैवल्यं वा रघूत्तम। स तेनैव च देहेन शिवः संजायते स्वयम् ॥ ६० ॥ —शिवगीता अ० १६.

(३) गच्छंस्तिष्ठन् स्वपञ्जाग्रदुन्मिषन्निमिषन्नपि ।
शुचिर्वाप्यशुचिर्वापि शिवं सर्वत्र चिंतयेत् ॥–शिवधर्मपुराण, अ. ११

ब्रह्मोत्तरखंडीं स्कंद पुराणीं । शिव पंचाक्षरी जपावा चहूं वर्णी । आणि संकरही योनी हा जपोनि । तरती हें वदले ॥२३०॥ –संप्रदायसुरतरु, पृ.७७.

(४) शिवनामजपास दुसरे कांहीं निर्बंध नाहींत. त्याला सिद्धारिचक्र शोधन वगैरे खटाटोप नाहींत, पण शिवनाम गुरूपदिष्ट असावें तें बरें.

(५) "सकळांमध्यें श्रेष्ठ । शिवनाम जें वरिष्ठ॥ आवडीनें नाम जपा । शिव शिव मंत्र सोपा ॥ २ ॥ ऐसा भक्तांचा अंकित । स्मरतांचि मोक्ष देत ॥ ३ ॥ एका जनार्दनीं उदार । देवें त्रिभुवनीं साचार ॥ ४ ॥

नित्य शिव शिव आठव । तुटेल जन्ममरण भेव ॥
दुजें नाहीं पैं साधन । वाचे वदावा ईशान ॥
ऋद्धिसिद्धि पायां लागे । ह्रदयीं सदाशिव जागे ॥
शंकर हा जयाचित्तीं । जवळी तया भुक्तिमुक्ति ।
एका जनार्दनीं सर्वदा । महादेव वाचें वदा ॥ ५ ॥

शिवा ऐसा मंत्र सुलभ सोपारे । जपावा परिकर नित्यनेमें ॥
न बाधीच विघ्न संसाराचें भान । धन्य तें भजन शिवनामें ॥
एका जनार्दनी नाम शिव ईशान । वदतां घडे पुण्य कोटियज्ञ ॥ ३ ॥

(६) साठी सहस्र विघ्नांवरी । शिव नाम पंचाक्षरी ॥ —नामदेव

(७) "निकटा एव दृश्यन्ते कृतान्तनगरद्रुमाः । शिवं स्मर शिवं ध्याय शिवं चिन्तय सर्वदा" हें सौरपुराण, अ. ४७ यांतील वचन केवळ वृद्धांनींच नव्हे, सर्वांनींच ध्यानीं घेणें योग्य आहे. फार काय या ग्रंथांत जी व्यापक दृष्टि अनुसरली आहे त्या दृष्टीप्रमाणें तें म्लेच्छांनाहि तारक होईल. शिवपुराणांत (वा. सं. उ. अ. ११) असें स्पष्टच म्हटलें आहे कीं, "ममानुस्मरणं नित्यं यश्चमामुपजीवति । एवमष्टविधं चिन्हं यस्मिन् म्लेच्छेऽपि वर्तते ॥" यवनांनाहि शिवनाम तारक झाल्याच्या आख्यायिका प्रसिद्ध आहेत.

ॐ नमः शिवाय । हा शिवलिंगोपासकांचा षडक्षरी मंत्र प्रसिद्धच आहे. रुद्रयामळांत शिवषडक्षरस्तोत्र आहे. पण शिव हा अप्रसिद्ध आहे. म्हणजे ईश्वर हा उपासकानें पाहिलेला नसतो. त्याला वस्तुतः नाम आणि रूप

दोन्ही नाहींत. अशा स्थितींत वरील शास्त्रवचनांवरून किंवा आप्तवचनांवरून त्याच्या नामरूपाची परोक्ष कल्पनाच उपासकानें करावयाची असते. ही कर्तृतंत्र उपासना हा तत्त्वतः कल्पनाविलास म्हणजे भ्रमच आहे, असें क्वचित् वाटतें. परंतु शास्त्रांवरून किंवा आप्तवचनांवरून होणारें उपास्याच्या नामरूपाचें परोक्ष ज्ञान हा कांहीं भ्रम नव्हे, असें विद्यारण्य पंचदशींत तृप्तिदीप, श्लोक ५३ व ५४ यांत सांगतात. तसें म्हटल्यास स्वर्गादि परलोक आहेत याहि परोक्ष ज्ञानास भ्रम म्हणावें लागेल. म्हणून श्रीगुलाबराव आपल्या *संप्रदाय सुरतरूंत लिहितात कीं,* ईश्वराची स्मृति कोठें प्रत्यक्षप्रमाणसाध्यसंस्कारानें होते, कोठें अनुमानप्रमाणसाध्य संस्कारानें होते, कोठें शब्दप्रमाणसाध्य संस्कारानें होते. यद्यपि भगवत्प्रत्यक्ष योगी किंवा (श्रेष्ठ) भक्तांवाचून अन्यांना होत नाहीं, तरी अनुमानसाध्य संस्कारजन्य स्मृति किंवा वेदपुराणशब्दसाध्यसंस्कारजन्यस्मृति भगन्नामाबरोबर उत्पन्न होते. तो संवादि भ्रम नव्हे. "जाणोनि नाम घेतां वासनाक्षय। नेणोनी नाम घेतां पापमात्र क्षय। हें वामनें बोलिलें होय। तें वाचोनी पहावें॥ २९२॥

—संप्रदायसुरतरु, अ. २.

नाम हें वस्तुतंत्र आहे या म्हणण्याचा भाव असा दिसतो कीं, नाम हें स्वयंभू आहे. ती रूपाची पूर्वावस्था आहे. अथवा रूपाला निर्मितें नाम आहे. म्हणून "*वागेवेदंसर्वम्*" असें *म्हणतात. नामाच्या ठिकाणीं नामीचा प्रत्यय* घडवून आणण्याची शक्ति ईश्वरानेंच ठेवली आहे, किंबहुना ती स्वयंभू आहे. म्हणून नाम साक्षात् भगवद्रूप आहे. ईश्वराच्या नामांतील अर्थशक्ति कोणीं लौकिक नांवाप्रमाणें कल्पिलेली नाहीं. ती ईश्वराच्याच ठिकाणची आहे. फार काय साऱ्या पदार्थांचीं नांवें मनुष्यांनीं मागून कल्पिलीं असें मानलें, तरी तीं कल्पित नामें ठेवण्यापूर्वी ते पदार्थ असलेच पाहिजेत. अर्थात् त्यांचा आद्यसाक्षीहि असलाच पाहिजे. सृष्टिपूर्वी स्रष्टा मानावाच लागतो. तो नव्हता हें कोण कसें सिद्ध करणार? तेव्हां त्या आद्यसाक्षीला साक्षीभास्य पदार्थांचा जो *प्रत्यय तेथेंच त्या पदार्थांच्या नामसंकल्पाचें अनुमान* होतें. ही जेथें *सामान्य* पदार्थांची स्थिति आहे, म्हणजे पदार्थाला कोणती ना कोणती आकृति अथवा रूप जसें असलेंच पाहिजे, तसेंच त्या रूपाच्या आंतल्या बाजूला रूपोद्भवभूत नाम असलेंच पाहिजे. तें नांव मानवांनीं मागून ठेविलेलें असलें तरी त्याला

समष्टिप्रेरणाच कारण असते. सर्व पदार्थनामांची जर ही स्वयंभू स्थिति तर ईश्वराचें नांव व ईश्वर हे उभयतां नित्य अनादि सिद्धच आहेत हें वेगळें सांगावयास नकोच. असेंच सर्व शास्त्रांनीं मानलें आहे व सर्व संतांनीं अनुभविलें आहे. म्हणून नामाचा महिमा त्याच्या अंगभूत आहे. त्याला दुसऱ्या सहकारी कारणांची अपेक्षा नाहीं. नामरूपकर्म असें हें ईश्वरी मायेचें त्रिकूट आहे. उदाहरणार्थ, ओम् हें परमेश्वराचें वेदोक्त स्वयंभू नाम आहे. त्यासंबंधीं भगवद्गीता व ज्ञानेश्वरी काय म्हणते तें पाहावें.

ह्या हृदयांतील दहराकाशांत उपलब्ध होणारा जो ब्रह्मात्मा त्याचेच ओम् तत्सत्, (गीता १७।२३ ते २८) सोऽहम्, शिवोऽहम् असे अन्य निर्देश अगर नांवें आहेत. साऱ्या नामरूप कर्माला आधार ह्याच आहे. या नामीला जणुं अति सामीप्यामुळें आपण ओळखत नाहीं. वस्तुतः अनामा असा जो नामी त्याची हें नाम ही सांकेतिक खूण आहे. श्रीज्ञानेश्वर म्हणतात कीं, संसारदुःखानें पोळलेल्या आर्त जीवांनीं आपलें कष्टाचें गाऱ्हाणें सांगण्यासाठीं त्या नामानें परमात्म्याला हांक मारली असतां तो नामी ओ देतो, तें हें दिव्य नाम आहे. परमात्म तत्त्व वाचेच्या प्रांतांत यावें आणि त्याचें अद्वैत स्वरूप व्यक्त रूपानें अनुभवास यावें, यासाठीं वेदशास्त्रांनीं व संतांनीं हें दिव्य ईशनाम उपलब्ध केलें. मग त्या नामानें परमात्म्यास आळवलें असतां तो दयामय परमात्मा आपल्या संमुख उभा ठाकतो. ज्ञानेश्वर पुढें म्हणतात कीं, या नाममहिम्याच्या रहस्याचा जो विचार करील त्याला तें नाम म्हणजे

१ कष्टले संसारशिणें । जें दवों येती गाऱ्हाणें । तया ओ दे नांवें जेणें । तो संकेतु हा ॥ ३२१ ॥ ब्रह्माचा अबोला फिटावा । अद्वैतु द्वैतत्वें भेटावा । ऐसा मंत्रु देखिला कणवा । वेदें बापें ॥ ३२२ ॥ मग दाविलेंनि जेणें एकें । ब्रह्म आळविलें कवतिकें । मागां असत ठाके । पुढां उभें ॥३२३ ॥ ज्ञा. अ. १७.

२ घेऊनि येथिंचें वर्म । जैं विचारिसी हें नाम । तैं केवळ हेंचि ब्रह्म जाणसी तूं ॥ ४०० ॥ पाहें पां ॐतत्सत् ऐसें । हें बोलणें तेथ नेतसे । जेथूनि का हें प्रकाशे । दृश्यजात ॥ १ ॥ तें तव निर्विशिष्ट । परब्रह्म चोखट । तयाचें हें आतुवट । व्यंजक नाम ॥ ४०२ ॥ परि आश्रयो आकाशा । आकाशचि कां जैसा । या नामानामीं आश्रयो तैसा अभेदु असे ॥ ४०३ ॥ उदयिला आकाशीं । रवीचि रवीतें प्रकाशी । हे नामश्क्ति तैसी । ब्रह्मचि करी ॥ ४०४ ॥ ज्ञानेश्वरी, अ. १७.

परब्रह्मरूप नामीच होय हें अनुभवास येईल. ज्या ठिकाणाहून या नाम-रूपात्मक वस्तुमात्राचा उद्भव होतो, त्या ठिकाणाप्रत हें दिव्य नाम जीवाला पोंचवितें. तें ठिकाण म्हणजे केवळ, अखंड, शुद्ध परब्रह्म होय; आणि त्याचें अंतस्थ सामर्थ्यदर्शक असें हें दिव्य नाम आहे. आकाशाला जसा आकाशाचा आधार असतो, तद्वत् या नामाला या नामांतच अखंड आधार आहे. आकाशांत उगवलेला सूर्य जसा स्वतःला प्रगट करतो, तसेंच हें नाम आपल्या ब्रह्मस्वरूपाला स्वतःच प्रगट करतें.'

श्रीज्ञानेश्वर आणखी पुढें म्हणतात कीं, हें दिव्य नाम म्हणजे केवळ वर्ण-समूह नव्हे, तर हें ब्रह्मनाम ब्रह्मच जाणावें. येथें नामनामीचा अभेदप्रत्यय जाणावा. त्यापुढें दुसऱ्या अश्वमेधादि साधनांची प्रतिष्ठा ती काय ! म्हणून या ब्रह्मनामाविषयीं श्रद्धा न बाळगतां, जो व्यवसाय करावा तो इहपरलोकीं नुसता क्षीण होयें. असें हें ब्रह्मनाम (उ. हंसः) सदा अंतरांत घोळत असतां त्याचें रहस्य व विनियोग माहीत नसल्यामुळें, तें वायफळ होऊं पाहतें. यथार्थदीपिकाकार म्हणतात कीं, वर जीं ॐ तत् सत् हीं ब्रह्मनामें सांगितलीं तशींच देवाचीं इतर शिव, हरि, हर, राम, कृष्ण, वासुदेव, नारायण इत्यादि नामें समजावीं. याच अर्थानें या ब्रह्मनामास त्रिविध असें गीतेंत (१७।२३) म्हंटलें आहे.

१ "तस्य वाचकः प्रणवः।" "तज्जपस्तदर्थभावनम्।" ततः प्रत्यक्चेतनाधिगमोऽप्यन्तरायाभावश्च ॥ —योगदर्शन.

२ म्हणौनि त्र्यक्षर हें नाम। नव्हे जाण केवळ ब्रह्म। यालागीं कर्म। जें जें कीजे ॥ ४०५ ॥ ज्ञानेश्वरी, अ. १७.

३ म्हणौनि ब्रह्मनामश्रद्धा। साड्डनि कीजे जो धांदा। हें असो सिणु नुसधा। इहाहर्षी तो ॥ ४२२ सदर.

४ तैसें तोंडीं ब्रह्मनाम। हातीं तें सात्त्विक कर्म। विनियोगें वीण काम। विफळ होय. ॥ ३४९ ॥ सदर.

५ त्यांत हीं तिन्ही। नामें गहन भावें करूनी। बोलिलीं कीं या जाती-चींच नामें म्हणोनी। त्रिविधत्व सुचविलें नामाचें ॥ ३७९ ॥ अ. १७. प्रणव एकाचि अक्षर। म्हणूनि हें ब्रह्म एकाक्षर। तैसेंच ब्रह्म चतुरक्षर। वासुदेव नारायण म्हणोनी ॥ ५६० ॥ अ. ८.

६ ॐतत्सदिति निर्देशो ब्रह्मणस्त्रिविधः स्मृतः ॥ १७।२३ गीता.

## नामी जो शिव तो न्यायनिष्ठुर का दयाळू ?

आतां हा अज्ञात नामी शिव प्रत्यगात्मरूपच असो अगर परमात्मरूप असो, कर्मफलदाता ईश्वर दयाळू आहे, न्यायी आहे का निष्ठुर आहे ? असा दीर्घकाल नामसाधन करून निराश झालेल्या साधकाला पुष्कळ वेळां व्यामोह पडतो. याचें उत्तर असें देतां येईल कीं, उपादानत्वेंकरून सत्त्विक शिव न्यायनिष्ठुर असला तरी निमित्तकारणरूपांत तो भोळा सांब दयार्द्र असणें अगर होणें संभवतें. यांतच शिवोपासनेचें महत्त्व आहे. श्रीगुलाबरावमहाराज संप्रदाय-सुरतरु, अध्याय दोन यांत म्हणतात कीं, "दैवाधीन आघवें जग । तथापि दयार्द्र उमारंग (रमारंग) । तो दैवामार्जीहि प्रसंग । तरणीयाचा करी ॥४९४॥ जीवाचियां पापवृत्तीं । साक्षी प्रकाश न लोपे निश्चितीं । तैसे जीव सांपडलिया दैवावरती । भगवान दया लोपवीना ॥ ४९५ ॥ व्यष्टि प्रारब्धाचें फळ । सुख दुःखें येती पळपळ । समष्टि प्रारब्धाचें फळ । कृतत्रेतद्वापारकलियुगादि ॥ ४९६ ॥ व्यष्टि दैव व्यष्टि प्रयत्नीं । जय होय व्यष्टि प्रयत्नीं । परि समष्टि-दैवी निर्वाणीं । दैव जय ॥४९७॥ यास्तव दैव प्रेरणें जीव जाती । परी निष्कामें जे भगवद्भक्ति । करिती तया समष्टि दैव नियाति । कल्पांतीं बाधूं न शके पैं " ॥४९८॥

मग भगवंताचीं नांवें घेणाऱ्यास भगवान् लवकर कां पावत नाहीं ? या प्रश्नाचें मार्मिक उत्तर श्रीगुलाबरावमहाराज असें देतात कीं, त्याचें नांव घेणारा जेव्हां त्याला हांका मारतो, तेव्हां तो येणार नाहीं, असेंहि त्याला वाटत असतें ! आणि भक्ताची मनोवृत्ति ( संशय ) खरी करणें हें परमेश्वराचें ब्रीद आहे; म्हणून तो पावत नाहीं ! ( —व्यवहारधर्मबोध, पृ. २९, प्रश्न ५५ )

पावसाच्या झोडीनें सारी दुनिया भिजली असतां छत्रीचा आश्रय करणारा कोरडा राहतो. तसा भक्ताला नामाचा आधार होतो. छत्री भिजते. पण छत्रीच्या आंतला भिजत नाहीं. शिवाई बाळाला पदराआड पोटाशीं घेते.

> ज्ञानाचें जें अधिष्ठान । महादेव एकचि जाण ॥ १ ॥
> कर्म उपासना साधन । पैं शिवची अधिष्ठान ॥ २ ॥
> तेथून प्राप्त सर्व देवां । मुखीं शंकर वदावा ॥ ३ ॥
> *याकारणें शिवभक्ति । जन हो करा दिन रात्रीं ॥ ४ ॥*
> एका जनार्दनीं शंकर । पाववी भवसिंधूचा पार ॥ ५ ॥

प्रकरण ७ वें

# मूर्तिपूजाविधि – प्रकार



तुवांचि कल्पाचिया आदी । हेचि पूजाविधानविधि ॥
उपदेशिला पुत्रबुद्धि । स्वयें निशुद्धी विधाता ॥ २३ ॥
तेणेंही कल्पादीसीं आपण । नाभिकमळासनीं बैसोन ॥
भृगुकश्यपादि पुत्रांसीं जाण । हें पूजाविधान उपदेशी ॥ २४ ॥
श्रीमहादेवेंही आपण । हें क्रियायोगविधिविधान ॥
भावें भवानीसी जाण । केलें निरूपण एकांतीं ॥ २५ ॥

—एकनाथी भागवत, अ. २७

Those who cannot understand lofty ideas when presented in ritual and symbolic garb, will serve their reputation best by not speaking of them.

—Sir J. Woodroffe.

परमार्थसाधनमार्गांतील नामसाधनाप्रमाणें मूर्तिपूजा अथवा प्रतीक-पूजा हें दुसरें सर्वांत सुलभ, साधें व अधिकार न लागणारें असें साधन आहे. या साधनासंबंधीं आक्षेपखंडण मागील खंडांत मूर्तिपूजाविरोधाभास या प्रकरणांत केलें आहे. मूर्तिपूजाविधि-प्रकार हें चिकित्सक प्रकरण त्याचेंच मावंड आहे. तें या साधनसार-खंडांत घेणें उपयुक्त वाटल्यामुळें यांतील कर्मकांडांत आरंभींच गोंवलें आहे.

आपल्या हिंदुधर्मांतील विधिविधानें, विधिनिषेध व सामान्यतः सर्व कर्मकांड हे तुच्छ, अनवश्यक अवडंबर, तूस, भूस, किंवा खूळ आहे, रहस्याशीं त्याचा कांहीं संबंध नाहीं. हें कर्मतंत्र प्राचीन ब्राह्मण पुरोहितांनीं आपल्या चरितार्थाकरतां समाजावर लादलेलें आहे, तें निरर्थक व उपहासास्पद आहे, असें स्पष्ट सांगत सुटणें हें आधुनिक विद्वत्तेचें व मार्मिकतेचें एक लक्षण

समजलें जातें. म्हणून मूर्तिपूजेंतील अशा कर्मकांडाचा नमुन्याकरतां थोडा विचार या प्रकरणांत करण्याचें योजिलें आहे. मूर्तिपूजा या रूढ वाक्प्रचारांत शिवलिंगोपासनेचाहि अंतर्भाव होतो हें सुज्ञ वाचकांस सांगावयास नकोच.

उपासनेंतील समग्र पूजाविधि सांगणें, किंवा त्याचें समर्थन करणें, एवढा व्यापक या प्रकरणाचा विषय नाहीं. पूजाविधींतील प्रत्येक क्रियेचा हेतु ज्यात विशद करून सांगितला आहे असा ग्रंथ माझ्या पाहाण्यांत किंवा निदान ऐकिवांत तरी नाहीं. हे धार्मिक विधि हेतुसहित समजावून सागण्याची प्रथा फार करून कोठें आढळत नाहीं. उलट धर्मशास्त्र हें गूढ असलें तरी त्यांतील आज्ञांना " कां " असें विचारतां येत नाहीं, अशी सामान्य समजूत आहे. असें सांगतात कीं, नेपोलियननें आपलें यशाचें बीज कशांत आहे हें कोणांस दाखवितांना आपल्या लष्करांतील शिस्त पाहाण्यास समुद्रकिनाऱ्यावर नेलें व तेथें नेलेल्या सैनिकांना अगदीं अनपेक्षित असा हुकूम केला कीं, "ढोप्याभर पाण्यांत उभें राहून कोळी जाळ्याची सुतळ विणतात, त्याप्रमाणें वाळूच्या दोऱ्या वळा" नेपोलियनचा असा हुकूम होतांच, तशा दोऱ्या वळूं पाहाणें हें किती अव्यवहार्य आहे, याचा यत्किंचित् विचार न करतां ते सैनिक लष्करी शिस्तीनें रांगेंत पाण्यांत उभें राहून हातीं समुद्रांतील वाळू घेऊन तिचे दोर वळण्याचा यत्न करूं लागले. त्यावर नेपोलियन म्हणाला, " अशी माझी शिस्त आहे. हेंच माझ्या यशाचें बीज होय." धार्मिक विधींतील शिस्त अशीच चिकित्सा न करतां पाळावयाची असते. नेपोलियननें असा हुकूम कसा केला, तें त्याला ठाऊक. त्याचा विचार आपण करावयाचा नाहीं. हुकमाप्रमाणें वागणें एवढेंच आपलें कर्तव्य. असेंच त्याचे सैनिक समजत. त्याचप्रमाणें " तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ।" अशा श्रद्धेनें शास्त्रविधि पाळावे लागतात. पण आजच्या बुद्धिवादी जगांत कर्माची सयुक्तिकता पटल्यावांचून कर्मप्रवृत्तीकडे मन वळत नाहीं. " बाबा वाक्य प्रमाणम् " हें एक उपरोधिक वचन समजतात. इतकेंच नव्हे तर धर्मांतील रहस्य लोपलें व पोकळ धार्मिक कर्मांची कवाईत राहिली, धान्य गेलें आणि सालपट राहिलें, काप गेले, पण भोकें राहिलीं, अशा व्यंग्यार्थानें

१ श्रीलौगाक्षींचा अर्थसंग्रह किंवा आह्निकचंद्रिकाभाष्य हे ग्रंथ मला पाहाण्यास मिळाले नाहींत.

आधुनिक विद्वान् रूढ धार्मिक विधींचा उपहास करतांना नेहमीं आढळतात. या उपहासात फारसें तथ्य नसून उपहासकाचें अज्ञान, अहंमन्यता, कर्मविन्मुखता व आळस हेच दोष दिसून येतात. परंतु याप्रमाणें आक्षेपकांचा नुसता निषेध करूनहि कांहीं उपयोग नाहीं. त्यापेक्षां प्रत्येक शास्त्रविधीच्या मार्गे कांहीं ज्ञाताज्ञात सद्हेतु असतोच, ही संभाव्यता दाखविण्यासाठीं मूर्तिपूजाविधींतील कांहीं शंकासमाधानें नमुन्याकरतां पुढें देत आहें. हे माझे खुलासे अपुरे व गैरमाहितीमुळें चुकीचेहि कदाचित् असतील; कारण मी कांहीं शास्त्री नव्हे, पण शास्त्रविधींच्या सयुक्तिकतेबद्दल शंका वाटूं लागल्यास त्या विधींचा अवमान न करता शास्त्रहेतु शोधून काढण्याकरतां ग्रंथ धुंडाळावे, तज्ज्ञांस विचारावें, किंवा आपण श्रुत्यनुकूल उपपत्ति बसवावी, याचें एक उदाहरण म्हणून हें प्रकरण लिहीत आहें. त्यात जें अपूर्ण किंवा चुकीचें असेल तें सुज्ञांनीं पुरें व दुरुस्त करून घ्यावें अशी माझी नम्र विनंती आहे. " आज नाहीं तरी ब्राह्मणांचें ब्राह्मण्य व सर्व हिंदूंचा वर्णाश्रमधर्म आचारांत राहिला आहे कोठें ? " असें नुसतें संभावितपणें म्हणून प्राचीन परंपरेंतील स्वधर्माचरणाचा त्याग न करतां, उलट धर्माचरणांत जें औदासीन्य, वैगुण्य व मालिन्य आलें आहे तें यथाशक्य दूर करण्याचा यत्न करणें, हेंच सुज्ञाचें कर्तव्य होय.

आतां शंकाकारांची सामान्य भूमिका सांगतों. " ज्या गोष्टी आपल्याला प्रिय असतात त्या देवाला अर्पण करणें, हें पूजाविधानांतील एक सामान्य तत्त्व असावें. आपल्या घरीं कोणी थोर पुरुष आले, तर त्यांच्या सत्कारासाठीं जे उपचार त्यास आपण अर्पण करूं किंवा अन्य जे शिष्टाचार करूं, तसेच किंबहुना त्याहून थोडे जास्त आपण आपल्या घरीं अगर देवालयांत, आलेल्या नव्हे तर केवळ मनानें आवाहन केलेल्या, देवास अर्पण करणें, हें भोळें, भाविकपणाचें असलें, तरी एक वेळ सयुक्तिक मानतां येईल; पण शिवलिंगादि देवांच्या प्रतीकाप्रतिमांच्या पूजाविधानांत जे पांचपासून एकशें आठपर्यंत उपचार अर्पण करण्यांत येतात व त्या देवाप्रीत्यर्थ जे दुसरे अनेक शिष्टाचार

१ माझा एक वात्रट बालमित्र लहानपणीं म्हणे कीं, " नदींत उतरल्यावर एर्वीतिर्वी धोतर भिजतेंच. मग त्यातच लघुशंका करण्यास काय हरकत आहे ! " कांहीं अंशीं असेच हे युक्तिवाद असतात.

पाळण्यात येतात, ते अगदींच अवास्तव दिसतात उदाहरणार्थ, (१) तीं पचोपचारी स्नानें (२) ते अभिषेक (३) ती सततधार (४) जिवत झाडांचीं पानें–फुलें तोडून दगडाऱ्या देवाना वाहिलेल्या लाखोल्या (५) तसेंच त्या आरत्या आणि प्रार्थना, देवे व स्तुतिस्तोत्रें आणि (६) तीं अगावर शहारा उत्पन्न करणारीं बलिदानें, किंबहुना (१) पाद्य (२) अर्घ्य, (३) आसन, (४) आचमन, (५) स्नान, (६) वस्त्रोपवस्त्र, (७) गधादि, (८) पत्रपुष्प, (९) धूप, (१०) दीप, (११) नैवेद्य व फल (१२) ताम्बूल (१३) दक्षिणा (१४) प्रदक्षिणा, (१५) नमस्कार, मत्रपुष्प आणि (१६) प्रार्थना या सोळा उपचारांपैकीं बहुतेक सारे उपचार आतिथ्य सत्कार म्हणून कोणत्याहि पाहुण्यास रुचणार नाहींत तो या सर्व प्रकाराचा तिरस्कारपूर्वक निषेधच करील तेव्हा हीं स्तुतिस्तोत्रें, आरत्या–प्रार्थना याचा उपयोग काय? कर्मविपाकशास्त्रप्रमाणें अथवा नियतीच्या अटल कार्यकारणभावाप्रमाणें ज्या घटना घडावयाच्या त्या घडणारच असतील, तर या उपासनेची व प्रार्थनाची गरज काय? बद पडलेलें एजिन प्रार्थनेनें कसें चालू होईल? उलट तें प्रार्थनेवाचूनच एजिनियर चालू करील एखाद्या बँकेत जर आपले पैसे नसलेच तर चालकाची प्रार्थना करून ते कसे मिळतील? उलट तशी ठेव असेल, तर ती प्रार्थनेवाचून हक्कानें मिळू शकेल आपण आपल्या पुढाऱ्यापुढें अथवा आईबापापुढें असीं स्तुतिस्तोत्रें गात बसलेलें त्याना आवडणार नाहीं. ते म्हणतील कीं, "उठा आणि काहीं तरी सत्कार्याला म्हणजे उद्योगाला लागा" नुसती खुशामत कोणाच सुज्ञाला आवडत नाहीं मग नैवेद्य, विडा, दक्षिणा व स्तुतिपाठ अशी लाच सर्वज्ञ देव कशी स्वीकारील? तसेंच "दधिक्रावरणो" सारखे अर्थशून्य अथवा विसगत मत्राची बडबड व दूध, दहीं, तूप, मध व साखरेचें स्नान हें त्याला कसें आवडेल?" इत्यादि प्रकारें मूर्तिपूजेंतील अप्रयोजकता व व्यर्थता आक्षेपक रंगवून सागतील हा मूर्तिपूजेसबधी आक्षेपाचा किंवा आग्रहाचा नमुना झाला अशा शका न येणें भागलें हें खरें. पण त्या आल्याच, अगर कोणाच्या तोंडून ऐकल्याच, तर त्याचें समाधानकारक उत्तर रूढिमात्र मूर्तिपूजा करणाऱ्या असख्य मूर्तिपूजकापैकीं किती देऊ शकतील? हा विचारच पडतो, आणि त्यामुळें अशा शका क्वचित् बुद्धिभेदक होतात म्हणून त्या नुसत्याच निषेधपूर्वक दाबून

न टाकतां उलट त्यांचा खुलासा करण्याचा यत्न करणें, हें आजच्या बुद्धि-वादी जगांत आवश्यक झालें आहे, असें मला वाटत असतें. "तें आम्ही कांहीं जाणत नाहीं. आपले धर्मनिबंधकार आणि इतर पूर्वज कांहीं मूर्ख नव्हते. ते करीत आले तसें आम्ही करणार!" असल्या सडेतोड मार्थेनें वाद खुंटविला तरी समाधान होणार नाहीं. आज धर्माला अति झपाट्यानें येत असलेली ग्लानि पाहातां तिच्यांत पालट पाडण्याकरितां ईश्वरानेंच अवतार घेतल्यास तो अवतार घेऊन कोणत्या मार्गाचा अवलंब करील, हें सांगतां येत नाहीं. पण तो सुयोग वेळींच घडून येण्यासाठीं व तो येईपर्यंत ईश्वरोपासना ही आवश्यकच ठरते. एक-दोघांच्या प्रार्थनेवरून ईश्वर अवतार घेत नाहीं. त्याला सर्वांचीच तशी तीव्र उत्कंठा लागते. यासाठीं आपलें परंपरागत सांगोपांग उपासनाकर्म अविश्वासू बनत चाललेल्या समाजास सयुक्तिक रीतीनें पटवून देणें, मला तरी फार आवश्यक वाटतें आणि त्याचसाठीं हा माझा अल्प यत्न आहे.

**सामान्य खुलासा :**— शिवलिंगोपासनेपुरती वरील आक्षेपकांची सर्वांगीण भूमिका लक्षांत घेऊन त्यांच्या सामान्य खुलाशाचे कांहीं ठळक मुद्दे पुढें सांगतों. उपासकांतील जीव व उपास्य शिव दोन्हीहि स्वरूपतः अमूर्तच असतात. या दोहोंमधील उपासनादि व्यवहार होण्यासाठीं जसें उपासकाचें शरीर असतें तसेंच शिवाचें शिवलिंग हें प्रतीक लागतें. उभयतांच्या या भौतिक उपाधिप्रमाणेंच त्या भौतिक उपाधींना भौतिक पूजोपचारांचीहि गरज लागतेच. दोन दूरस्थ प्रियजनामधील प्रेमसंवाद, पत्रव्यवहार अगर अन्य विचारविनिमयाचा व्यवहार होण्यासाठीं दौत, शाई, लेखणी, कागद, टपालखात्यांतील सर्व व्यवस्था इत्यादि सामग्री लागतेच; तसेंच हें समजावें. कंदिलाची काच धुऊन निर्मळ केल्यावांचून व आंतील दिवा पेटविल्यावांचून अथवा बत्तीमध्यें विद्युद्दीपाचा रासायनिक मसाला भरल्यावांचून प्रकाश कसा दिसेल?

आतां शिवलिंग या प्रतीकापुढें अर्पण केलेले उपचार ऐनजिनसी शिव-पार्वतीला कसे पोंचतात? असा प्रश्न कोणी करील, तर तारेच्या अगर साध्या मनिऑर्डरीनें अगर हुंडीनें पाठविलेल्या रकमेच्या दृष्टांतावरून अर्पण केलेल्या वस्तु ऐनजिनसी न गेल्या तरी अन्य तन्हेनें त्यांची पोंच संभवते हें

लक्षांत येईल. श्राद्धकाळीं पितरांस अर्पण केलेलें द्रव्य जसेंच्या तसें त्यांच्याकडे जात नाहीं. पण त्याचा जो अव्यक्त सूक्ष्म अमृतांश जातो त्यानें त्यांना संतोष वाटतो. हें शास्त्रसिद्ध आहे. व आधुनिक परलोकविद्येच्या प्रयोगांत होणाऱ्या पितरांशीं संवादांत याला पूर्ण दुजोरा मिळत आहे. मग सगुणस्वरूप शिवपार्वतीस आपण अर्पण केलेलें साररूपानें त्यास पोंचत असलेंच पाहिजे हें उघड आहे. आतां व्यापक ईश्वरास जें अर्पण करावयाचें व सांगावयाचें त्यास मध्यें प्रतीकप्रतिमा कशाला ? याचें उत्तर असें कीं, अमूर्त राजसत्तेचा कारभार घेण्याकरतां व्यक्त तलाठीसारखे प्रतिनिधि लागतातच. शिवशक्ति तत्त्वें व्यापक असलीं तरी तीं अतिसूक्ष्म असल्यामुळें एक प्रकारें दूरच आहेत. मग दूरच्या व्यक्तीजवळ संवाद करण्यास जसें टेलिफोनप्रमाणें किंवा तारायंत्राप्रमाणें माध्यम यंत्राजवळ जाऊन बोलावें लागतें, तसेंच प्रतीक व प्रतिमांचें समजावें. प्रत्येक प्रतिमेंत विशिष्ट देवतेची प्राणप्रतिष्ठा केलेली असते हें लक्षांत घ्यावें. ध्वनिलहरी, विचारलहरी, प्रकाश, विद्युत् इत्यादींच्या लहरी या संचार पावतात, नाश पावत नाहींत व त्यांच्या संसर्गानें चिकटलेले संस्कार स्थूल पदार्थांस सोडीत नाहींत. हें रेडिओ ॲक्टिव्हिटी, टेलिपथी, स्पिरिटिझम, सायकोमेट्री इत्यादि अनेक आधुनिक भौतिकशास्त्रांनीं प्रयोगसिद्ध केल्यामुळें प्राणप्रतिष्ठादि प्रक्रियेनें शक्तिसंचार होणें, तसेंच स्तुतिस्तोत्रें-प्रार्थना यांतील आशय इष्ट स्थळीं पोंचणें यांत असंभवनीय वाटण्यासारखें कांहीं उरलें नाहीं. बागेंतील झाडांशीं प्रेमानें वागलें व बोललें तर तें त्यांस कळतें असें संशोधक बागवान् सांगतात. बोस यांचे प्रयोग हेंच दर्शवितात. आतां पाषाणमय देवाच्या मूर्तीकरतां जिवंत झाडाचीं पानें-फुलें तोडण्याबद्दल उगाच कांगावा करण्यांत कांहींच अर्थ नाहीं. ' जीवो जीवस्य जीवनम् ' हा सृष्टीचा व्यवहार सुरूच आहे. मांसाहारी मानव इतर प्राण्यांच्या जिवावर व शाकाहारी मानव वनस्पतीकोटीच्या जिवावरच जगतात. यास्तव बेलाचीं पानें आणि धोतऱ्याचीं फुलें शिवलिंगावर वाहण्यांतच त्यांचें सर्वांत अधिक सार्थक आहे, असें शास्त्र व रूढीनुसार श्रद्धापूर्वक मानून चालणेंच ठीक दिसतें. कोणत्या देवतेला काय अर्पण करावें हें देवताविज्ञान व पदार्थविज्ञान उत्तम जाणणाऱ्या प्राचीनांनीं ठरविलें आहे. अज्ञात अशा विषयांत शास्त्ररूप आप्तवचन हेंच प्रमाण मानलें

पाहिजे. रसायनशास्त्रादि भौतिक शास्त्रें जर आपण दृष्ट विषयांतहि प्रमाण मानतों तर अदृष्ट विषयांत धर्मशास्त्र प्रमाण मानणेंच योग्य ठरतें.

शिवपूजा व शिवशक्त्युपासना हे तत्त्वतः अलौकिक व्यवहार आहेत. त्यांस लौकिक व्यवहाराचे दृष्टांत अगर उपमा नेहमींच लागूं पडणार नाहींत. दिव्य दृष्टीच्या व अनुभवांच्या शास्त्रकारांनीं पूजाविधींत जे मंत्रतंत्रादि विनियोग सांगितले आहेत, त्यांचा परिणाम अव्यक्त व अदृश्य शिवशक्तींवर व पर्यायानें उपासकांवर काय होत असेल, तें आपणांस अनुमानानेंहि जाणतां येणार नाहीं. तो केवळ श्रद्धेचा व अनुभवाचाच विषय मानला पाहिजे.

*श्रद्धेचा आश्रय केल्यावर आपल्याला उघड उघड हें रहस्य दिसतें की,* कायावाचामनानें व नित्यनेमानें शक्य तितकें अधिक काल उपासकाकडून शिवाप्रीत्यर्थ निष्काम कर्म घडत राहिलें पाहिजे, अर्थात् ज्या कर्माचें लौकिक दृष्टया कांहींच फल नाहीं, म्हणून जें शिवार्पण बुद्धीनेंच होऊं शकतें, असें सुदीर्घ शिवपूजा-अर्चा-विधान शास्त्रकारांनी रचलें असावें. त्याप्रमाणें हिशेब करतांना लहान बालकानें चिंचोके घेतले का खडे घेतले अथवा त्यांच्या पंतोजींनीं त्यास घातलेल्या उदाहरणांत केळीं होतीं, का पेरू होते, तें त्रैराशिक होतें, पंचराशिक होतें, का बहुराशिक होतें, यांत महत्त्व नाहीं. गणित विषय मुख्य. त्यासाठीं कोणता तरी व्यावहारिक तपशील पाहिजे. म्हणून तो निमित्तमात्र असतो; तसेंच पूजासाहित्याचें समजावें. स्थूल-पार्थिव पूजेपेक्षां मानसिक पूजेचें महत्त्व शास्त्रानें जास्त मानलें आहे. त्यावरूनहि हें उघड होतें कीं, 'येन केन प्रकारेण' मनानें दीर्घकाळ शिवानुसंधान राखणें, हेंच अतिरुद्र करणें, शिवलिंगावर संतत धार धरणें, बेलाच्या लाखोल्या वाहाणें, अशा कालावधि घेणाऱ्या विधींतील एक रहस्य दिसतें. दुसरें रहस्य असें कीं, भक्तानें भक्तीनें नुसतें पाणी दिलें, तरी तें भगवान् आनंदानें सेवन करतात[1].

श्रीनरहरस्वामींच्या बोधसारग्रंथांत संपूर्ण तपशीलवार शिवपूजा, त्यांतील ध्यानधारणा व सारे षोडशोपचार यांसुद्धां आध्यात्मिक दृष्टीनें शुद्ध निरुपाधिक, पारमार्थिक, ज्ञानपर रचली आहे. म्हणजे पूजेंतील प्रत्येक अंशाचा

१ भगवद्गीता ९।२६,२७.

अर्थच केवळ आध्यात्मिक ज्ञानपर लावला आहे. मानसपूजेंत सारे उपचार मनानें जसेच्या तसे कल्पून ते शिवार्पण करतात. त्यांत त्यांचा अध्यात्मपर अर्थ लावीत नाहींत. याचें एक उत्कृष्ट उदाहरण म्हणजे निरंजन रघुनाथ यांची श्रीदत्ताची मानसपूजा त्यांच्याच आत्मचरित्रांत वाचावी. गरीब भाविक भक्त दोन हस्तकमळें व तिसरें शिरकमल ही देवाच्या पायीं अर्पण करतात, अधिक कांहीं करीत नाहीं. शिवलीलामृत ग्रंथांतील श्रीकराचा शिव दगडाचा व त्याचे पूजोपचारहि खापऱ्यांचे होते. कण्णप शिवस्नानाकरतां तोंडांत चूळ भरून पाणी आणी आणि शिकार केलेल्या जनावरांच्या मांसाचा नैवेद्य दाखवी. असे शिवलिंगोपासनेचे विचित्र प्रकार पेरीय पुराण, शिवभक्त-विलास या उपपुराणांत व कांहीं शिवानंदलहरी स्तोत्रात वर्णिले आहेत. त्यांत भक्तांचा उत्कट भावच विशेष आहे. रुद्रावरील भट्टभास्करांच्या भाष्यांत अनेक होमहवनादि सकाम अनुष्ठानें सांगितलीं आहेत. त्यांची उपपत्ति दिलेली नाहीं. शिवपूजेचे शास्त्रोक्त जे विधि रूढ आहेत ते या सर्वांहून वेगळे आहेत. असे जे सामान्य शास्त्रोक्त रूढविधि त्यांचाच किंचित् विचार या प्रकरणांत केला आहे. अर्थात्, त्यातील कांहीं ठळक विधि चिकित्सेकरतां घेतले आहेत. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें या सर्व विधींचें व अनुष्ठानांचें सूक्ष्म संशोधन लाभदायक होईल असें प्राचीन तज्ज्ञांस कां वाटलें नाहीं तें सांगवत नाहीं.

आतां शिवलिंगावर अभिषेक, संततधार, शिवलिंगाला अवर्षण दूर होण्यासाठीं पाण्यांत कोंडणें, इत्यादि विधींची चिकित्सा करतांना माध्यमरूप जलतत्त्वाचा विचार करावा लागेल. त्यांतील कांहीं मुद्दे माझ्या अल्पमतीस वाटतात ते असे :

( १ ) शिव हें अग्नितत्त्व मानलें आहे. जल हें तज्जन्य तत्त्व आहे. तें त्यास स्वभावतःच प्रिय आहे तें त्यास शांत करतें.

( २ ) सूर्यमंडल हें शिवतत्त्वाचें प्रतीक आहे. त्या मंडलावरील परमेष्ठि मंडल व त्याच्या खालील चंद्रमंडल हीं जलतत्त्वें आहेत. तीं शिवास प्रिय आहेत.

---

१ ईश्वरस्य प्रसादेन भासतेऽन्यादृशं जगत् ।
स्वसमानगुणत्वेन धत्तूरः शिववल्लभः ॥ ८९ ॥
धूपप्रदीपनैवेद्यफलताम्बूलदक्षिणाः ।
शिवाय नम इत्येव सर्वमेवास्य पूजनम् ॥ ९८ ॥

( ३ ) जल हें प्रवाही तत्त्व संस्कारवाहक आहे. आचमन, तर्पण, अघमर्षण, मार्जन, अर्घ्य, दानोदक, राज्याभिषेक, पूर्णाभिषेक, शांत्योदकसिंचन, चाशिरसा देणें इत्यादि अनेक क्रियांत संकल्पसंस्कारवाहक म्हणून जलाचा उपयोग करतात.

( ४ ) संतानप्राप्ति किंवा अशाच अन्य फलश्रुतींसाठीं अभिमंत्रित जल दिल्याचे दाखले अनेक आढळतात जल हें पृथ्वीचें जनकतत्त्व आहे तें जिवाचें जीवन म्हणजे सर्वस्व आहे म्हणून अर्पणक्रियेंत त्याचा माध्यम म्हणून उपयोग करीत असतील.

( ५ ) पावसाचें अवर्षण हें ईश्वराचा कोप सूचित करतें, म्हणून सतत-धारादि उपचार ईश्वरास शांत करण्याकरता करीत असतील.

( ६ ) ईश्वराला पाण्याच्या समृद्धींत ठेवल्यानें जीवहि जीवनसमृद्ध होईल अशी भावना असेल.

( ७ ) किंवा तो एक सत्याग्रहासारखाच प्रकार असेल

( ८ ) सोम हें जलतत्त्व आहे तसेंच सोम म्हणजे शिव असेंहि म्हणता येईल.

( ९ ) कर्म हें विश्वाच्या बुडाशीं असलेलें एक कारणरूप सलिलच मानलें आहे आप म्हणजे कर्म अथवा कर्माचें प्रतिनिधि होय सृष्टि उत्पन्न करण्याकरता शिव पाण्यात तपश्चर्या करीत होते, असें सौप्तिक पर्व, अ १७, यांत सांगितलें आहे

( १० ) रुद्र जलाय भेषजम् । हें एक सूचक श्रुतिवचन आहे.

( ११ ) शिवाच्या मस्तकीं चंद्र व गंगा हीं जलतत्त्वें आहेत.

( १२ ) सततधारेच्या घर्षणात शिवाचें विद्युद्रूप जाग्रत होत असावें

( १३ ) आता व्यक्ति तितक्या प्रकृति या न्यायानें अनेक देवतांच्या पूजनांत शास्त्रकारांनीं उपचारभेदहि सांगितला आहे उदाहरणार्थ, " नमस्कार प्रियो भानुरूपवास प्रियोहरि. । अभिषेक प्रियो रुद्रो, गणेशो मोदकप्रिय । ( चातुर्मास्यमाहात्म्य )

( १४ ) आपल्या धर्मसंस्कृतीची रचना अशी आहे कीं, गरिबापासून तो श्रीमानापर्यंत ती सर्वांना सुकर वाटावी, यासाठीं पितरांना व शिवादि देवतांना नुसतें श्रद्धाजल दिलें तरी भागतें, असा शास्त्रसंकेत आहे.

( १५ ) आपलें मस्तक हें एक अभिषेकपात्र आहे. पडजीभ ही त्याची खालची तोटी आहे. त्यांतून अमृतस्राव होत असतो, असा योगी अनुभव सांगतात. शिवलिंगावरील अभिषेक ही त्याचीहि प्रतिकृति असेल.

( १६ ) " ज्ञानप्रवाहा विमलाऽऽदिगङ्गा ॥ " अर्थात् ज्ञानगंगा, विचारधारा, इत्यादि शब्दप्रयोगांत जल हें स्थूल-सूक्ष्म दृष्टया वाहक तत्त्व मानलें आहे.

( १७ ) जल ही सृष्टिकार्यांतील कोठें कोठें पहिली वस्तु मानतात. जल परमशिवतमरसाचें प्रतिरूप आहे. प्रतीकरूप उपाधीवरील मलापकर्षण हा त्याचा महत्त्वाचा धर्म आहे.

*नमः शिवायै गंगायै शिवाय च नमो नमः । नमस्त्रिपथगामिन्यै विश्वमूर्त्यै* नमो नमः ॥ इडा भगवती गङ्गा । पिंगला यमुना नदी । तयोर्मध्यगतानाडी सुषुम्नाख्या सरस्वती ॥ ज्ञानहृदे ध्यानजले रागद्वेष मलापहे ॥ यः स्नाति मानसे तीर्थे स याति परमां गतिम् ॥

अथवा--मनोनिवृत्तिः परमोपशांतिः । सा तीर्थवर्या मणिकर्णिका च । ज्ञानप्रवाहा विमलादि गंगा । सा काशिकाहं निजबोधरूपा ॥

या व्यष्टि जीवाच्या धारणानुरूप समष्टि भगवानासंबंधीं तीर्थधारणा करतां येतील. तात्पर्य, व्यर्थ विकल्पापेक्षां असे अन्वर्थक संकल्प बरे.

( १८ ) तीर्थे पापक्षयः स्नानैस्तीर्थैसाधुसमागमः । तीर्थं वैराग्यचर्चा स्यात्तीर्थमीश्वरपूजनम् ॥ *तीर्थं शीतोष्ण सहनं तीर्थं निःसंगचारिता । इति जानन्ति ये तीर्थं तीर्थतत्त्वविदो हि ते ॥*

या तीर्थासंबंधीं केलेल्या धारणेप्रमाणें जलासंबंधींहि भावना करतां येतील.

( १९ ) उदाहरणार्थ, " सेव्यः श्रीगुरुवेदवाक्यजनितश्चिद्बोध आवाहनं । सर्वव्यापकताविनिश्चयमतिः पूर्णं पवित्रासनं ॥ त्वत्तो नान्यदवैमि किंचिदिति तत्पुण्याम्बु पादोदकं । त्वय्येवास्त्वचला ममेश माति रित्यर्घोस्तु ते सुन्दरः॥ २ ॥ बोधसार, पृ. २०९.

असेर एक महत्त्वाचा मुद्दा सुचविते. पंचमहाभूतें एकाच शिवशक्तीचीं वेगवेगळीं गतिरूप असतात. त्यात जलतत्त्वाची अधोगति असते. तेव्हां शिवलिंगावर अभिषेक किंवा संततधार याचा अर्थ त्यांतील शिवचैतन्याचें जड शिवलिंगांत आवाहनपूर्वक अवतरण होय. जलाचा दुसरा धर्मशक्तीचा संकोच आहे. व्यापक शिवशक्तीचा शिवलिंगाचे ठिकाणीं जास्तींत जास्त

संकोच म्हणजे संग्रह करणें, व सवेग वाढविणें हा जलाचा धर्म होय. या संकोचांत शक्तिसामर्थ्य अव्यक्तरूपांत वाढत आहे. जड पाषाणलिंगात पार्थिवसंयोगगतीनें प्राप्त झालेलें तमस्वरूप काठिण्य व त्यांत जलधारेच्या अवतरणगतीबरोबर आंत येणारें शिवमार्दव असा हा भाव दिसतो अशा रीतीनें जलतत्त्वाचें महत्त्व आपण जाणल्यावर जलानें शिवलिंगावर होणाऱ्या अनेक उपचाररूपविधींचें रहस्य निश्चित न समजलें, तरी तो विधि निदान श्रद्धेय व चिंतनीय तरी वाटेल.

आतां पूजेंतील पचामृतस्नानांच्या विधीमार्गे कोणत्या उपपत्ति समवतात, तो विचार करू. अति प्राचीन काळीं या भूगोलावर इक्षुरसोद ( आशिया-मायनर, अरबस्तान, पूर्व रशिया इ. ठिकाणीं ), घृतोद ( सहारा, दक्षिण व पश्चिम आफ्रिका इ. ठिकाणीं ), दधिमेण्डोदक ( भूमध्य समुद्र, आयरिश समुद्र, रशियाखेरीज सर्व युरोप ), क्षीरोद ( बुडालेलें ॲटलांटिक खंड ), स्वादूदक ( दक्षिण व उत्तर अमेरिका ) असे सागर होते असें म्हणतात. ( प्राचीन चरित्रकोष ). देवतामूर्तीच्या प्राणप्रतिष्ठेच्या वेळीं, वास्तुपुरुषाच्या स्थापनेच्या वेळीं, राज्यारोहणाच्या वेळीं व अशाच अन्य महत्त्वाच्या मंगल प्रसगीं दूरवरच्या तीर्थक्षेत्रांतील व राजधान्यांतील जल व मृत्तिका आणण्याचा विधि व प्रघात आहे. ह्यांतील उपपत्ति अशी दिसते कीं, प्रस्थापित होणाऱ्या देवतेच्या, वास्तुपुरुषाच्या, अगर राजाच्या सत्तेची व्यापकता शक्यतितकी जास्त मनात धारण करावी व ती सिद्ध होईल असा प्रयोग करावा.

आता यातहि देवताची सत्ता केवळ भूलोकावरच नसून परलोकव्यापीहि असते, तेंहि प्रयोगानें भावित करणें व सिद्ध करणें इष्ट असल्यामुळें पचामृत-स्नानसंस्काराची योजना केली असावी. कारण हीं पचामृतें म्हणजे केवळ या भूपृष्ठावरीलच सागर नसून या भूपिण्डासभोंवार असलेल्या अदृश्य महाद्रव्यांतील हे सागर आहेत. आपल्या भूपिण्डाच्या सभोंवार सप्तद्वीपें व सप्त सागर असल्याचें शास्त्रांत वर्णिलेलें आहे.[2] या आपल्या भूपिण्डाभोंवतीं घन,

---

१ शिवगीता अ. १५, श्लोक ३५-३७, पचामृतस्नान व अभिषेकमाहात्म्य.

२ क्षारोदेक्षुरसोदौ च सुरोदश्च घृतोदकः। क्षीरोदां दधिमण्डोदः शुद्धोदश्चेति ते स्मृताः। देवी भागवत ८।४; मार्कंडेयपुराण ५४; विष्णुपुराण २।२; भागवत ५.

तरल, विरल, विरलतर अशीं जीं स्पन्दात्मक आवरणें आहेत, त्यांचींच लवण, घृत, दधि, मधु, इक्षुरससमुद्र हीं नांवें आहेत. अर्थात् ते पदार्थ हीं त्यांचीं प्रतीकें आहेत व त्या सागरांस त्यांचींच नांवें आहेत. 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' या न्यायानें ही सप्तविधता आपल्या पिंडांतर्गत घटक सप्त धातूतहि आहे. कूर्माच्या शरिराची अशीच घन तरल विरलभावाची रचना आहे. लवणसमुद्रावरील समुद्रफेंस याचा पुराणकाळीं अस्त्र म्हणून उपयोग केलेला आहे. दधि हा घनभाववाचक शब्द अस्थींना लावून दधीचि ऋषींच्या अस्थींचें इंद्रानें वज्र केलें असा कथाभाग प्रसिद्धच आहे.

आपल्या शरिरांतील रक्ताला सोमादि नांवें आढळतात. मधु हें नांव जीवनरसाला किंवा ब्रह्मविद्येला दिलेलें आढळतें. अशा रीतीनें हीं पंचामृतें पिण्डब्रह्माण्ड शरिरांतील ओजस्वी व बलवान् धातुरूप अथवा तत्त्वरूप असल्यामुळें ईश्वरप्रतीकाच्या ठिकाणीं समष्टिदेवतेची प्रतिष्ठापना करतांना यांचा विनियोग स्तुतिपूर्वक करणें यांत कांहीं विशेष रहस्य दिसतें. सृष्टींतील विविध भावरसांत मधुरसात्मक समता पाहणें हेंच लाक्षणिक मधुपर्कस्नान होय. स्वस्वरूपाच्या ध्यानधारणेंत जीवभावाचा ग्रास करणें हेंच आचमन होय. अशा ज्या भावना कोठें कोठें केलेल्या आढळतात, त्यांसच अनुसरून श्रुत्यनुकूल भावना आपणहि पंचामृतस्नानाच्या वेळीं कराव्या. तात्पर्य, शास्त्रविधीवर अविश्वास करून त्यांचा त्याग न करितां विचारपूर्वक त्यांचा योग्य विनियोग करणें हें सुज्ञांचें कर्तव्य होय.

---

१ शतपथब्राह्मण हिंदी विज्ञानभाष्य, खं. ३, पृ. २६० पहा.

२ दधि हैवास्य लोकस्य रूपम् , घृतमन्तरिक्षस्य, मध्वमुष्य । श. प. ७. कूर्मचिति ब्राह्मण.

३ शीतोष्णं कटुतिक्तमम्लमधुरं क्षारं विचित्रैं रसैर्यत्तस्यास्य समत्वभाव मधुना पर्कः कृतश्रेयादि । मुख्योयं मधुपर्क उत्तमरसस्तेनामुना सादरं पूज्यानामपि पूज्य एप परमो देवः सदा पूज्यताम् ॥ ३ ॥ सर्वांगीण सुखावहं मुहुरहो यमन्मनो मज्जनं । शुद्धेपमुखाम्बुधौ शुचितरे स्नानं विशुद्धिप्रदम् । आमानं स्फुरति द्वितीयमिव यत्तत्सर्वमाचम्यता–। मित्युक्तो गुरुभिस्तदेप विधृतश्चित्ते स एवाचमः ॥ ४ ॥ —हिंदी सार्थ योगसार, २१०-२११.

आतां या पंचामृतस्नानाच्या वेळीं जे ऋग्वेदांतील मंत्र म्हटले जातात, ते ते त्या पदार्थांचे स्तावक अगर स्मारक मंत्र आहेत. "दधिक्राव्ण" याचा अर्थ काहीएक सतत असतील, त्याप्रमाणें स्वर्गीय घोडा नव्हे. सायणांनी त्याचा अर्थ धावणारा, सामर्थ्यवान्, ध्वनिक, आवेगयुक्त असा केला आहे. ही या दधि अथवा दधिक्रानामक धन तत्त्वाची स्तुति आहे. अर्थात् अस्थि व त्यांच्या अंतर्गत असलेला बलवान् दधिक प्राण याची ती स्तुति आहे. आतां वेदांतील मंत्रभाग प्रायः देवतांच्या स्तुतिपरच असतो. त्यांत विधि नसतो. ब्राह्मण भागांत विधि असतो. पूजाविधानांत त्या विधीची व मंत्राची अशी जोड करण्यांत आलेली असते कीं, त्यांत मंत्रदेवतेची अथवा तत्त्वाची स्तुति व प्रार्थना असावी, व तो मंत्र म्हणतांना कोणता विधि करावा त्या अर्थाचा स्मारक शब्द पाहिजेच असावा, म्हणून त्यांस लैंगिक मंत्र म्हणतात. (पूर्वमीमांसा २।३।१४) याप्रमाणें पंचामृतस्नानविधीला सामर्थ्य-संपन्न करणारे असे हे मंत्र मानले पाहिजेत व त्या सामर्थ्यसंपन्न अशा विधीनें पाषाणलिंगाच्या ठिकाणीं शिवसायुज्य अथवा सशक्तिक शिवसामर्थ्य आयत्त करावें, हा त्यांतील हेतु दिसत आहे.

आजकालच्या रूढ पूजापद्धतींत, पंचामृतस्नानाचे वेळीं वैदिक व पुराणोक्त असे दोन्ही प्रकारचे मंत्र म्हणण्याची वहिवाट आहे. ते दोन्ही प्रकारचे मंत्र अर्थासह पुढीलप्रमाणें आहेत.

वैदिक (१) ॐ आ प्यायस्व समेतु ते विश्वतः सोम वृष्ण्यम् । भवा वाजस्य संगथे ॥ ऋ. ९।३१।४.

अर्थ :—हे सोमासारख्या दुधा, तुझी विपुलता असावी. तुझें सामर्थ्य तुला सर्व बाजूंनीं प्राप्त होवो, आणि सर्व सामर्थ्यानें युक्त असा तूं आम्हांला समर्थ करणारें अन्न देणारा हो.

---

१ म्हणजे असा सोम या ईश्वरदृष्ट तत्त्वाचा शोध लावणारे ऋषि (प्राण) ते दधीचि ऋषि होत. दधिसोममञ्च ते अपेक्षते । ते दधयः.

२ उदाहरणार्थ—आप्यायस्व०, दधिक्राव्णो, घृतं मिमिक्षे०, मधुवाता०, स्वादुः पवस्व०.

३ विद्यानिधि सिद्धेश्वरशास्त्री चित्राव यांच्या पूजानामक पुस्तकावरून

पुराणोक्त :— कामधेनोः समुद्भूतं देवर्षिपितृतृप्तिदम्, पयो ददामि देवेश स्नानार्थं प्रतिगृह्यताम्॥ ( सुबोध आहे म्हणून अर्थ द्यावयास नको. )

वैदिक ( २ ) ॐ दधिक्राव्णो अकारिषं जिष्णोरश्वस्य वाजिनः। सुरभि नो मुखा करत् प्रण आयूंषि तारिषत् ॥ ऋ. ४।३९।६.

अर्थ :— जयशील, व्यापक आणि आवेशयुक्त अशा दधिप्रिय देवाची मी स्तुति करतों. तो देव आमचें मुख, नेत्र वगैरे इंद्रियें तेजस्वी करो आणि आम्हांला दीर्घायुष्य देवो.

पुराणोक्त :— चंद्रमंडलसंकाशं सर्वदेवप्रियंदधि। स्नानार्थं ते मयादत्तं प्रीत्यर्थं प्रतिगृह्यताम् ॥

वैदिकः— ( ३ ) घृतं मिमिक्षे घृतमस्य योनिर्घृते श्रितो घृतम्वस्य धाम। अनुष्वधमा वह मादयस्व स्वाहाकृतं वृषभ वक्षि हव्यम् ॥ ऋग्वेद २।३।११

अर्थः— मी अग्नीमध्यें तुपाच्या आहुति देतों. कारण तो अग्नि तुपातच उत्पन्न होतो; तुपांतच राहातो आणि तुपानेंच तेजस्वी होतो. म्हणून हे फल देणाऱ्या अग्ने, तुला स्वाहा म्हणून दिलेलें हविर्द्रव्य देवाकडे नेऊन त्याला प्रसन्न कर. मीं दिलेलें तूप तूं देवाकडे पोंचीव.

पुराणोक्तः— आज्यं सुराणामाहारं आज्यं यज्ञे प्रतिष्ठितम्। आज्यं पवित्रं परमं स्नानार्थं प्रतिगृह्यताम् ॥

वैदिकमंत्र ( ४ ) :— मधु वाता ऋतायते मधु क्षरन्ति सिन्धवः। माध्वीर्नः सन्त्वोषधीः, ॥ ६ ॥ मधु नक्तमुतोषसो मधुमत् पार्थिवं रजः। मधु द्यौरस्तु नः पिता ॥ ७ ॥ मधुमान्नो वनस्पतिर्मधुमाँ अस्तु सूर्यः। माध्वीर्गावो भवन्तु नः ॥ ८ ॥ ऋ १।९०।६,७,८.

अर्थ :— नैसर्गिक माणसाला वायु चांगलीं फळें देतात. नद्या त्यांना चांगलें आरोग्यकारक जल देतात; त्याप्रमाणें औषधी आम्हांला माधुर्ययुक्त रस देवोत. रात्र, सकाळ, पृथ्वीवरचे लोक, पाऊस पाडून आम्हांस रक्षणारें आकाश, वनस्पति, सूर्य आणि गाई आम्हांला त्यांच्याजवळ असणारे आरोग्यकारक आणि मधुर असे रस देवोत.

पुराणोक्तः— सर्वौषधि समुत्पन्नं पीयूषसदृशं मधु। स्नानार्थं ते प्रयच्छामि गृहाण परमेश्वर ॥

वैदिक (५) ॐ स्वादुः पवस्व दिव्याय जन्मने स्वादुरिन्द्राय सुहवीतु नाम्ने। स्वादुर्मित्राय वरुणाय वायवे बृहस्पतये मधुमाँ अदाभ्यः ॥ ऋ.९।८५।६.

अर्थः—हे सोमासारखे शर्करे, गोड असणारी तूं, देवांना खुष कर. थोर इंद्र, मित्र, वरुण, वायु, बृहस्पति यांना खुश कर आणि तुझी गोडी कधींहि नष्ट न होवो.

पुराणोक्तः—इक्षुरससमद्भूत दिव्य शर्करया हरिम्, स्नापयामि सदा भक्त्या प्रीतो भव सुरेश्वर॥

याप्रमाणें वैदिक मंत्रात स्तुति व पुराणोक्त मंत्रांत विधि सांगितला आहे. ऋग्वेदांतील सुप्रसिद्ध पुरुषसूक्तांत सोळा मंत्र आहेत. त्यांतील प्रत्येक मंत्रानें एकेक पूजोपचार समर्पण करण्याची पद्धत सर्वत्र आहे. ईश्वराचें नाम व वैदिक मंत्र याचा उच्चार पुण्यकारक व चित्तशुद्धिकारक असतो. म्हणून कर्मातील निरनिराळ्या तंत्रांत शास्त्रकारांनीं ते मंत्र गुंफले आहेत. आपल्या साऱ्या नित्यनैमित्तिक कर्मांत आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक दृष्टि, अथवा भक्ति व ज्ञान यांची जोड साधली आहे. अध्यात्म रामायण व भावार्थ रामायण यांत ज्याप्रमाणें देवतांच्या स्तुतीचे भाग म्हणजे तत्त्वज्ञान सांगण्याच्या राखीव जागा मानल्या आहेत, त्याप्रमाणेंच हें समजावें. मानव स्त्री-पुरुष ज्याप्रमाणें आपले देह-गेह भूषणांनीं सुशोभित करतात, त्याप्रमाणें वैदिक कर्म पुण्यप्रद मंत्रांनीं शृंगारलेलें आहे. हे पूजाविधिरूप साखर-भातांतील बेदाणा, बदाम समजावे.

याप्रमाणें पंचामृतस्नानाचा विधि अत्यंत रहस्यपूर्ण असून त्यांत म्हटले जाणारे मंत्र त्या विधींचे सामर्थ्यप्रेरक असे प्रभावी प्राणच मानावेत. पंच अमृत हे शब्दहि इष्टार्थसूचकच आहेत. हे अलौकिक उपचार सर्वशक्तिमान शिवाच्या पूजेंतच योग्य ठरतात. मानवाच्या आदरातिथ्यांत हे कसे योग्य ठरतील? अशा रीतीनें योग्य भावना व धारणापूर्वक तसेंच निष्ठा-निर्धार-पूर्वक परंपरानुसार यथासांग पूजा झाल्यावर अखेर शिवाची स्तुति व प्रार्थना करण्यापूर्वी शिवलिंग म्हणजे केवळ पाषाण न राहतां त्यांत शिवाचें तेज प्रादुर्भूत होत असलें पाहिजे. असा या विधींत सद्हेतु पाहिला पाहिजे. "स्तुति करावी परमेश्वराची। करूं नये व्यर्थ कधीं नराची। स्तुतीस जो ईश्वर पात्र होतो। तसा तिला मानव काय हो तो॥ १॥" हें पूर्वीच्या चालमोघ क्रमिक

पुस्तकांतील सुभाषित सर्वांना सुपरिचित असेलच. जड यंत्रांतील शक्तीची प्राणप्रतिष्ठा करीत नाहींत. म्हणून यंत्रांचीहि प्रार्थना कोणी करीत नाहींत. भौतिकवाद्यांची यंत्रशक्ति जड असते. आपल्या उपासनेंतील उपास्य शक्ति सचेतन म्हणजे शक्तिमानासह पूजली जाते. हा मूलग्राही भेद आहे.

**स्तुतिस्तोत्रें-प्रार्थना**—ही कांहीं ईश्वराला लांच नव्हे. ईश्वराचें शुद्धांतःकरणानें स्तवन करतांना आपण सहजच ईश्वराशीं सन्निध व सन्मुख होतों. अशा वेळीं आपलें अंतःकरण ज्या मानानें निर्मळ असेल, त्या मानानें भगवंताचें प्रतिबिम्ब किंवा ठसा प्रसन्न झालेल्या मृदु अंतःकरणांत पडतो. म्हणजे भगवत्कृपेचा अनुभव आपल्या अंतरांतच मिळतो व त्या योगानें मनाचा उल्हास वाढून मनाला धीर येतो, आणि ईश्वरावरील आपली निष्ठा बळावते. याप्रमाणें ईशस्तुतीच्या निमित्तानें ईश्वराशीं सन्मुख होऊन आत्मप्रसन्नता वाढवावी व तेणेंकरून आपणच आपलें हित करून घ्यावें असा त्यांत हेतु दिसतो. या ईशस्तवनानें व प्रार्थनेनें उपासक निरहंकार बनण्याचा फार महत्त्वाचा अभ्यास सहज घडतो. ईश्वर व आपण याच्या दरम्यान आपला जीवअहंकार एवढाच काय तो प्रत्यवाय आहे. तो या वेळीं अंशतः तरी दूर होतो. याशिवाय स्तुतिस्तोत्रपाठानें व प्रार्थनांनीं आपल्या-सभोंवारच्या आधिदैवत-अदृश्य-नियामक शक्तिकेंद्रांवर अनेक अपूर्व आकर्षक परिणाम घडत असतील व ते नकळत आपणांस उपकारक होत असतील ते वेगळेच. कर्तुमकर्तुम् अन्यथा कर्तुम्, अशा व्यापक ईश्वराची स्तुति व प्रार्थना सुपरिणामकारक होते. जड यंत्राचे किंवा अर्धजड मानवाचे दृष्टांत यासंबंधीं काय कामाचे ?

स्तुतिस्तोत्रें-प्रार्थना म्हणत बसण्यापेक्षां सत्कर्म करावें असें आक्षेपक म्हणतो, पण ईशस्तुति व प्रार्थना हेंहि श्रेष्ठ प्रकारचें सत्कर्मच असल्याचें शास्त्र सांगतें. "तस्मात् शास्त्रं प्रमाणं ते कार्याकार्य व्यवस्थितौ।" असें भगवानच सांगतात. ज्या पुरुषार्थाची कित्येक स्तुति करतात, तोच हा धर्म-पुरुषार्थ आहे. ज्या यत्नदेवाचा श्रीसमर्थ रामदास गौरव करतात, तोच हा ईशकृपेसाठीं सत्प्रयत्न होय. ज्याला कर्मविपाक म्हणतात त्यांतीलच कर्म-विपाकाचा जो नियंता त्या महादेवाचा स्तुति-स्तोत्रपाठ हें एक आवश्यक कर्म आहे. प्राक्कर्मविपाकाप्रमाणें जें घडायचें असेल तें घडेल, तें टळणार

नाहीं, असें म्हणून कोणीच स्वस्थ बसत नाहीं. अपायावर उपाय किंवा अपाय होऊं नये म्हणून प्रतिबंधक पूर्वोपाय आपण करीतच असतों. त्यांतीलच हा एक अचूक परिणामकारक उपाय आहे. आपल्या साऱ्या ज्ञान–इच्छा–क्रियांचा जो एक शिवशक्तिरूप समष्टि भगवान् प्रेरक आहे, त्याच्या इच्छेशीं समरस होण्यांत आपली कृतार्थता आहे. भगवान् भगवत्गीतेंत पुनः पुन्हां सांगतात :— " मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु। मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥ ३४ ॥ दैवी ह्येषा गुणमयी मम माया दुरत्यया। मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ॥ ७।१४ ॥ सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज। अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ भगवद्गीता ९।३४, ७।१४, १८।६६. शिवगीता १४।३७, ३८, ४३, ४४.

जर नामस्मरणांत नामनामीअभेदप्रत्यय येतो, तर अनन्यगतिकत्वानें केलेल्या प्रार्थनेंत तशा प्रकारचा अनुभव कां येणार नाहीं? प्रार्थनेच्या उपयुक्ततेबद्दल पुष्कळच लिहितां येण्यासारखें आहे. पण हा मुद्दा फारसा गूढ नसल्यामुळें लेखनविस्तार करीत नाहीं. सरकारनें स्थापन केलेल्या न्यायदानाच्या कोर्टांत जे आपले वाजवी हक्क असतील तेच सिद्ध होतील, असें असतां त्यासाठीं न्यायकचेरीकडे फिर्यादअर्ज दाखल करावा लागतो, तीच गोष्ट प्रार्थनेची आहे. द्रौपदीची भर दरबारांत विटंबना होत असतां तिचे इंद्रवायुयमदेवतुल्य पति व भीष्मद्रोणांसारखे आचार्य जें लज्जारक्षण देऊं शकले नाहींत तें एका भगवंताच्या धाव्यानें तात्काल घडून आलें.

आपल्या प्रार्थनेचे पडसाद नियामक आधिदैवत जगांतून कसे मिळतात, तें आपणांस जरी न कळलें, तरी ज्या अर्थी कोणतेंहि कर्म निष्फल होत नाहीं त्या अर्थी शुद्ध व उत्कट भावनेनें केलेली प्रार्थना व्यर्थ कशी ठरेल? पूजादि शास्त्रोक्त विधींच्या आरंभीं केलेला सत्संकल्प व अखेर सद्गदित अंतःकरणानें व अनन्यभावानें केलेली आरती म्हणजे संसाराच्या दुर्गम संकटगिरीवरून आपली योगक्षेमाची गाडी सुरक्षित पैलपार नेणारीं घाटएंजिनेंच आहेत, अशी आपली दृढतर निष्ठा असावी, हेंच इष्ट आहे. ती व्यर्थ ठरणारच नाहीं, असा साऱ्या दिव्य अनुभवसंपन्न आप्तसज्जनांचा निर्वाळा आहे.

निसर्गनियम, कर्मविपाकशास्त्र, लौकिक व्यवहार, यांतील कार्यकारणभाव

असी अटळ वाटले, तरी त्या कार्यकारणभावाच्या मार्गे जाऊन त्याच्या शिवशक्तिरूप प्रेरकास गाठणें व आपण निश्चित होणें हें सामर्थ्य प्रार्थनेंत आहे प्रार्थनेंत जी नम्रता, जी निरहंकारता, जें अनन्यगतिकत्व आहे, तेंच प्रार्थनेंतील खरें पुण्य आहे तेंच पर्यायानें सामर्थ्य होय. निदान ईश्वरप्रार्थना हें सर्वोन्नति करून घेण्याचें आपल्या स्वाधीनचें सुलभ साधन आहे असो आता संतांच्या प्रार्थनेचे तीन नमुने पुढें देत आहे

(१) नरनारी बाळें अवघा नारायण। ऐसें माझें मन करीं देवा ॥ १ ॥ नयो कामक्रोध द्वेष निंदा द्वंद्व। अवघा गोविंद निःसंदेह ॥ २ ॥ असावें म्यां सदा विषयीं विरक्त। काया वाचा चित्त तुझे पायीं ॥ ३ ॥ करोनियां साह्य पुरवीं मनोरथ। व्हावें कृपावंत तुका म्हणे ॥ ४ ॥

(२) आकल्प आयुष्य व्हावें तया कुळा। माझिया सकळा हरिच्या दासां ॥ १ ॥ कल्पनेची बाधा न हो कोणे काळीं। ही संत मंडळी सुखी असो ॥ २ ॥ अहंकाराचा वारा न लागो राजसा। माझ्या विष्णुदासां भाविकांसी ॥ ३ ॥ नामा म्हणे तयां असावें कल्याण। ज्या मुखीं निधान पांडुरंग ॥ ४ ॥

(३) आतां विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें। तोषोनि मज द्यावें। पसायदान हें ॥ १ ॥ जे खळांची व्यंकटी सांडो। तया सत्कर्मीं रति वाढो। भूतां परस्परें पडो। मैत्र जीवाचें ॥ २ ॥ दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात ॥ ३ ॥ वर्षत सकळ मंगळीं। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी। अनवरत भूतळीं। भेटो तयां भूतां ॥ ४ ॥ चलां कल्पतरूंचे आरव। चेतना चिंतामणींचें गांव। बोलते जे अर्णव। पीयूषाचे ॥ ५ ॥ चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन। ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु। किंबहुना सर्व सुखी। पूर्ण होऊनि तिहीं लोकीं। भजिजो आदिपुरुषीं। अखंडित ॥ ७ ॥ येथ म्हणे विश्वेशरावो। हें होईल दान पसावो॥ येणें वरें ज्ञानदेवो। सुखिया झाला ॥ ८ ॥ —ज्ञानेश्वरी १८।१७९३ ते १८०१

प्रकरण ८ वें

# लिंगपूजामाहात्म्य



जन्मज दुःखविनाशन लिङ्गम् ।
तत्प्रणमामि सदाशिव लिङ्गम् ॥

— लिंगाष्टक

ब्रह्मा कृतयुगे देवस्त्रेतायां भगवान् रविः ।
द्वापरे दैवतं विष्णुः कलौ देवो महेश्वरः ॥

— कूर्मपुराण, अ. १८

शिव एव स्वयं लिङ्गं लिङ्गं गमकमेव च ।
शिवेन गम्यते सर्वं शिवो नान्येन गम्यते ॥
शिवशक्त्याश्च चिह्नस्य मेलनं लिङ्गमुच्यते ।

— शि. पु., वि. स., अ. १०७

लिङ्गसंपूजनम् मुख्यमलाभे प्रतिमादिषु ।

— पद्मपु., १०११११४.

पूजयेद्विग्रहं यस्तु लिङ्गं चापि महात्मनः ।
लिङ्गं पूजयिता नित्यं महतीं श्रियमश्नुते ॥ १३६ ॥

— म. भा., द्रोणपर्व.

मूर्ति म्हणजे प्रतिमा आणि प्रतीक यांच्या पूजेसंबंधीं कांहीं सामान्य विचार मागील चिकित्सा खंडाचें प्रकरण १३ यांत सांगितले. आतां शिवलिंगोपासनेचें कर्मदृष्टीनें महत्त्व पाहूं. आणि तेंहि अगोदर शैवपुराणें किंवा आगमग्रंथ न पाहातां महाभारत व रामायण हे स्वतंत्र जगमान्य इतिहास-ग्रंथ यासंबंधीं काय सांगतात तें प्रथम पाहूं.

महाभारतांत सभापर्व, उद्योगपर्व, वनपर्व, द्रोणपर्व, अनुशासनपर्व, सौप्तिकपर्व अशा अनेक पर्वांत केवळ शिवमहिमाच वर्णिला नसून शिवक्षेत्रें

अर्थात् शिवलिंगें यांचाहि अनन्यसाधारण महिमा वर्णिला आहे. पांडवांच्या दिग्विजयवर्णनांत व तीर्थयात्रावर्णनांत अनेक शिवलिंगक्षेत्रांचा उल्लेख आला आहे. पुढें द्रोणपर्वांत (अ. २०१–२०२) व्यासांनीं शिवमहिमा वर्णन केल्यावर अश्वत्थाम्याला त्यानें पूर्वजन्मीं केलेल्या शिवप्रतिमापूजेपेक्षां नारायणानें केलेल्या शिवलिंगोपासनेचें अनन्यसाधारण महत्त्व कसें जास्त आहे तें सांगितलें आहे.

अनुशासनपर्वांत (अ. १४) उपमन्यु म्हणतो कीं, "मी शंकरास विश्वाचें आदिकारण मानतों. ++ हें शंकराचें भगलिंग म्हणजे पुरुषप्रकृतीचें संयुक्त लिंग आहे. ह्यावरून निर्गुणचैतन्य व माया ह्यांच्या संयोगानें सृष्टिरचना होते ह्याचें अनुमान करतां येईल. ब्रह्मा, विष्णु, इंद्रादि देव ज्या शिवलिंगाची पूजा करतात, त्याहून श्रेष्ठ इष्ट दैवत तें कोणतें?"

वाल्मीकि रामायणाच्या उत्तरकांडांत (अ. ३१।४२,४३.) म्हटलें आहे कीं, "शिवभक्त रावण जेथें जेथें जाई तेथें तेथें त्याच्याबरोबर शिवाचें स्वर्णलिंगहि असे. वाळूच्या वेदीवर तें ठेवून रावण त्या शिवलिंगाची विधिवत् पूजा करून त्यापुढें भक्तीच्या प्रेमानें नृत्य करीत असे." रावण राक्षस असला, तरी त्याची शिवभक्ति कांहीं राक्षस नव्हे. शिवभक्ति कोणीहि केली तरी ती श्रेष्ठच होय.

याप्रमाणें रामायण आणि महाभारत या प्राचीन व सर्वमान्य असलेल्या इतिहासांतील हे पुरावे नमुन्यापुरतेच सांगितले.

"*शिव सर्व ठिकाणीं, सर्व आधाराच्या ठिकाणीं नेहमीं आहे. तथापि शिवलिंगाच्या ठिकाणीं पूजा केली असतां ती शिव ग्रहण करतो. मंत्र, द्रव्य व क्रिया यांनीं युक्त इतर पूजेपेक्षां शिवलिंगाची पूजा हीच संपूर्ण पूजा होते.*"

(शिवरहस्य)

स्कंदपुराणांत म्हटलें आहे कीं, "शिवमूर्तीच्या शंभर वर्षें भक्तिपूर्ण केलेल्या पूजेंत जें फळ मिळेल, तें एक दिवस शिवलिंगपूजा केली असतां निःसंशय प्राप्त होतें."

लिंगपुराणांत म्हटलें आहे कीं, "विद्वान् पुरुषांनीं नेहमीं शिवलिंगपूजा करावी. लिंगांत व्यंगपूजाहि सांग होते. म्हणून द्विजांनीं ती करावी. शंकर लिंगरूपांत रमतात. मूर्तीपेक्षां लिंग हें त्यांना जास्त प्रिय आहे."

वायुपुराणांत म्हटलें आहे कीं, "शंभूच्या लिंगपूजेनें चारी पुरुषार्थ तत्काल प्राप्त होतात, याबद्दल शंकाच नको. शंभूच्या लिंगाची पूजा केली तर शंभर जन्मांतील पाप एका क्षणांत निश्चयानें नाहींसें होतें. शिवलिंग-पूजनानें मिळणार नाहीं असें काय असणार ? त्रैलोक्याचें ऐश्वर्य व संपत्ति हजारों मार्गांनीं प्राप्त होते."

वायुपुराणांत आणखी सांगितलें आहे की, "शिवलिंगपूजा हाच परम-धर्म. हेंच परमतप आणि हेंच परमज्ञान आहे. शंकराच्या लिंगाची एकदां पूजा केली तरी या दुःखसागरसंसारांत जन्माचें भय रहात नाहीं. सर्वांचा त्याग करून जो शिवलिंगाला शरण गेला, त्याला मोठीं पातकें सुद्धां बाधा करूं शकत नाहींत. या त्रैलोक्यांत लिंगाराधनाइतकें सुखकारक आणि पवित्र दुसरें कांहीं नाहीं."

कालिकापुराणांत सांगतात कीं, "शिवलिंगाची पूजा केली कीं अखिल स्थावरजंगमाची पूजा केल्याप्रमाणें होतें. संसारसागरांत मग्न असणारांना दुसरें तारक साधन नाहीं. अज्ञानी आणि विषयासक्त यांना तरण्याला लिंगा-राधनेवांचून दुसरी नौका नाहीं."

सौरसंहिता सांगते कीं, "वेदमार्गानें रुद्रलिंगाची भक्तिपूर्वक पूजा केली असतां सर्वपातकयुक्त असलेला पूजकहि थोडक्याच काळांत पवित्र होतो."

पद्मपुराणांत म्हटलें आहे कीं, "महेश्वरानें हें चराचर त्रैलोक्य उत्पन्न केलें आहे. तेव्हां जे महेश्वराची (लिंग) पूजा करीत नाहींत ते कृतघ्न जाणावे." स्कंदपुराणांत असें सांगतात कीं, "शिवलिंगांत जठरांत ब्रह्मा लीन असतो. डावे बाजूस जनार्दन लीन असतो. हृदयाच्या ठिकाणीं गायत्रि लीन असते, सर्व देव अंगाच्या ठिकाणीं लीन असतात. मस्तकाच्या ठिकाणीं षडंगपदक्रमासह वेद असतात. यास्तव प्रतिमेचा त्याग करून शिवलिंगाची पूजा करावी." "जगद्गुरु शंकराची जो लिंगामध्यें पूजा करतो, त्याला अति उत्तम असें शुभलोक ईश्वर संतोषानें देतो." (भविष्य पु.) शिवराघव संवादांत असें आढळतें कीं, "शिवलिंगाच्या ठिकाणीं साक्षात् महादेव लोकां-वर अनुग्रह करण्याकरतां राहिला आहे. म्हणून लिंगाची पूजा करावी. +++ लिंगार्चनासारखें भुवनत्रयांत दुसरें पुण्य नाहीं. लिंगाची पूजा केली असतां सर्व जगाची पूजा केल्यासारखें होतें यांत संशय नाहीं. पृथ्वीमधील जितकीं

तीर्थे आणि पुण्यक्षेत्रें आहेत तीं सर्व शिवलिंगाच्या ठिकाणीं राहातात, म्हणून लिंगाच्या ठिकाणीं भक्तिभावानें पूजा करावी. जो शिवलिंगाची भक्तिभावानें पूजा करतो, त्यानें सर्व तीर्थांत स्नान केल्याप्रमाणें होतें व सर्व यज्ञांत दीक्षा घेतल्याप्रमाणें होतें. जो शिवलिंगपूजेंत रत असतो त्याला महापातकापासून उत्पन्न होणारे दोष पाण्यांतील कमलपत्राप्रमाणें बाधूं शकत नाहींत. ज्याच्या पुनर्जन्माचा छेद करण्याची शंकर इच्छा करतात, त्यांना लिंगार्चन करण्याची बुद्धि उत्पन्न होते. त्रैलोक्यांत लिंगाराधनेसारखें दुसरें पुण्य नाहीं. शिवलिंगावर अभिषेक केल्यानें सर्व तीर्थांत अभिषेक केल्याप्रमाणें होईल. म्हणून जे कोणी महातेजाला वाढविणारी परमलक्ष्मी प्राप्त करून घेण्याची इच्छा करीत असतील त्यांनीं महेशाच्या लिंगाची पूजा करावी."

सौरपुराणांत विष्णूला शिवानें असें म्हटलें आहे कीं, "शिवलिंगाच्या ठिकाणीं माझी पूजा कर. लिंगमूर्ति धारण करणारा मी आहें. सर्व देव लिंगाच्या पूजेनें अज्ञाननिवृत्त होतात आणि त्यांचें संसारभय राहात नाहीं." त्याच पुराणांत नारदाला ब्रह्मदेव सांगतात कीं, "या भुवनत्रयांत लिंगार्चनापेक्षां श्रेष्ठ कांहीं नाहीं. हे देवर्षे! तूं हें जाणून लिंगार्चनरत हो."

भगवान शिव महादेव म्हणतात:—"हजारों जन्मांमध्यें यज्ञदानादि क्रिया करून ज्या मनुष्यांचीं पातकें क्षीण झालीं आहेत, त्यांनाच लिंगार्चनाविषयीं श्रद्धा उत्पन्न होते. यज्ञ, तप, दान, तीर्थसेवा, जप, उत्सव हीं सर्व लिंगार्चनावांचून निष्फल आहेत. वर सांगितलेल्या धर्मापेक्षां माझ्या लिंगाची आराधना करणें श्रेष्ठ आहे. मुलें ज्या ठिकाणीं वाळूचें किंवा मातीचें लिंग करून खेळांत त्याची पूजा करतात ते राजे होतात."

कूर्मपुराणांत मुनींना सांगतात कीं, "लिंगार्चनासारखें भीतिनाशक दुसरें पुण्य नाहीं. म्हणून पूजकांच्या हिताकरतां लिंगाच्या ठिकाणीं शंकराची पूजा करावी. जो शंकराची लिंगामध्यें नेहमीं पूजा करतो, त्याला घोर नरक प्राप्त न होतां साक्षात् शिवाची प्राप्ति होते. ज्ञानयज्ञ, महातप, संन्यासवृत्ति, जितेंद्रियत्व हीं सर्व शंकराच्या लिंगाची नित्यपूजा केली असतां त्याबरोबर तुल्य होत नाहींत."

शिवरहस्य सांगतें कीं, "लिंगार्चनावांचून ज्याचा नित्य काल जातो, तो दुष्ट, वाईट आचरणाचा समजावा; त्याची महा हानि होते. सर्व दानें, नाना

प्रकारचीं व्रतें, तीर्थनियम, यज्ञ हीं सर्व एका बाजूला आणि लिंगार्चन एका बाजूला केल्यास कलियुगांत लिंगार्चन श्रेष्ठ ठरतें. यासारखें दुसरें श्रेष्ठ नाहीं असा शास्त्राचा निश्चय आहे. चारहि वेदांमध्यें लिंगाराधनेसारखें दुसरें पुण्य सांगितलें नाहीं असा सर्व शास्त्रांचा निश्चय आहे. म्हणून सर्व कर्मजालाचा त्याग करून विद्वानांनें मोठ्या भक्तीनें एक लिंगाचाच आश्रय करावा."

काशीखंडांत वचन आहे कीं, "एक शंकराचें लिंग विधिपूर्वक उत्तम पूजलें असतां शंकर शेंकडों अपराधांची क्षमा करतो व मोक्ष देतो. जसें सात लिंगें उत्तम पूजलीं असता शंकर संतुष्ट होतात, तसे यज्ञ, दान, तप व व्रत यांनीं संतुष्ट होत नाहींत. जो लिंगार्चनविधि जाणतो व नेहमीं लिंगार्चनरत असतो तो मनुष्य दोन नेत्रांचा असतांहि त्याला त्र्यक्ष म्हणजे तीन नेत्रांचा शंकर समजावा. शेंकडों गाई दान दिल्यानें अथवा शेंकडों सुवर्णदानें केल्यानें जें फल प्राप्त होतें तें एकदां लिंगपूजा केली असतां प्राप्त होतें."

सौरपुराण सांगतें कीं, "धर्म, अर्थ, काम व मोक्ष या पुरुषार्थसिद्धीला लिंगार्चन हें साधन होतें. त्यानें उपसर्ग शांत होतात. विघ्नांचा नाश होतो. मन प्रसन्न होतें. सर्व देवांचा ईश, सर्व देव ज्यास नमस्कार करतात, अशा शंकराची पूजा केली असतां हे लाभ होतात; व सर्व देवता पूजित होतात. कारण तो व्यापक आहे. जो नेहमीं लिंगार्चनरत असतो, त्याला उदकांतील कमलपत्राप्रमाणें महापातकांचा दोष लागत नाहीं. जास्त शास्त्रें सांगून काय करायचीं आहेत ? थोडक्यांत सांगतों. सर्व व्यापार टाकून महेश्वराची पूजा करावी. वेदशास्त्र किंवा तीर्थ यांच्या सेवेनें काय होणार आहे ? नेहमीं शंकराचें पूजन करावें, हा उत्तम उपदेश होय. सत्यहितसार पुनः पुन्हां सांगतों—असार आणि दग्ध असा हा संसार आहे. यांत शिव ( लिंग ) पूजन हें सार आहे, म्हणून दग्धसंसारग्रंथी जो अत्यंत दुर्भेद्य आहे त्याला शंकरार्चन हें परनिर्मल असें छेदणारें आहे. जे कामदेवाची ( लिंगमूर्ति ) नित्य पूजा करतात, ज्यांचें वर्तन व शील चांगलें असतें, ते दोषरहित होऊन संसाररूपी समुद्राला तरतात. त्यांनीं नाना प्रकारच्या यज्ञांनीं देव-ऋषिपितर यांना तृप्त केलें असें समजावें. ज्यानीं भगवान शंकराचें पूजन केलें, त्यांनीं सर्व यज्ञ केल्याप्रमाणें होतें. या कर्मभूमीमध्यें लाखों जन्मांमध्यें स्वर्ग-मोक्ष देणारा असा हा मनुष्यजन्म प्राप्त होतो. अशा तऱ्हेचा मनुष्यजन्म प्राप्त झाला असतांना

जे शंकराचें पूजन करीत नाहींत, ते अगदीं मूर्खांतले मूर्ख असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं विवेक राहात नाहीं. शंकराचें पूजन हाच उत्तम धर्म आहे. हेंच उत्तम तत्त्वज्ञान आहे, म्हणून सर्व त्याग करून कलीयुगांत सदाशिवाची पूजा करावी."

पद्मपुराण म्हणतें कीं, " मुमुक्षूंनीं रात्रंदिवस लिंगपूजाच करावी. लिंगाच्या पूजेनें पुष्कळ मोक्ष पावले. म्हणून देव, मनुष्य, गंधर्व आणि मुक्त होण्याची इच्छा करणारे मुनि सर्वांनीं सावध रीतीनें लिंगपूजा करावी. शिवाचें लिंगाच्या ठिकाणीं सर्वकाळ सान्निध्य आहे. एवढ्याकरतां विद्वानांनीं सतत लिंगपूजा करावी. वेदोक्तलिंगपूजाच वेदमार्गरत, शुद्ध आणि मोक्षरूप फलाची इच्छा करणारे, अशा द्विजांनीं सतत करावी. सर्व इच्छा पूर्ण करणारें नित्यलिंगपूजन सुलभ आहे. पण याचा त्याग करून लोक नरकांत पडतात हें आश्चर्य आहे. केवळ लिंगपूजेनेंच पुष्कळ ऋषि कैलासाला गेले. निर्मल लोकांना तो दुर्लभ नाहीं. लिंगपूजा करणाऱ्या शिवभक्ताला पाहून यमकिंकर दूर पळतात. त्याना यमाच्या आज्ञेचें स्मरण होतें. लिंगपूजनावांचून दुसरा श्रेयस्कर मार्ग नाहीं ही गोष्ट सत्य आहे यांत शंका नाहीं. लिंगार्चनाचें माहात्म्य वेदांनासुद्धां समजणें कठीण आहे. ब्रह्मदेव, विष्णु व इतर देव यांना देखील तें समजत नाहीं."

कूर्मपुराणांत म्हटलें आहे कीं, " लिंगापेक्षां दुसरें श्रेष्ठ नाहीं. लिंग हें मोक्ष देणारें आहे, म्हणून सर्व कामप्रद व विभु अशा ईश्वराची लिंगांत पूजा करावी. अति उत्तम स्थानांत असणारें शिवस्वरूप जें शिवलिंग याची ( इतर आराधना न करतां ) प्रयत्नानें पूजा करावी. सर्व लोक या शिवपूजेनें प्रयत्नानें शिवाप्रत जातात; म्हणून नाना प्रकारच्या उपायांनीं लिंगपूजन करावें. सर्वज्ञ श्रीमहादेव सर्वव्यापक असून आपल्या भक्तांवर अनुग्रह करण्याकरतां लिंगाकारानें राहातो. संसाररूपी वृक्षाचीं प्रबळ मुळेंहि लिंगार्चनरूपी वणव्यानें नष्ट होतात. प्ररूढमूल असलेला हा संसारवृक्ष लिंगार्चनरूपी कुऱ्हाडीनें तोडून उपासक शंकराकडे जातात. पूर्वी संसाराच्या शांतीकरितां मोठमोठे ऋषि लिंगाची आराधना करून संसारबंधनांतून मुक्त झाले. हे कण्वा ! लिंगार्चनावांचून संसाराचा नाश होत नाहीं; म्हणून संसारशांतीकरितां शिव ( लिंग ) पूजन कर."

शिवरहस्य सांगतें कीं, "मातेच्या गर्भापासून निघालेला पुत्र लिंगार्चनांत रत झाला असतां त्याच्या मातेचा गर्भधारणेपासून प्राप्त झालेला क्लेश सफल झाला असें समजावें. ज्या कुलामध्यें लिंगपूजा करणारा उत्पन्न होतो, तेंच कुल उत्कृष्ट व धन्य असें आम्ही समजतों. कलीयुगामध्यें लिंगार्चनपूजा हें एकच सार आहे. तेंच घोरसंसाररूपी महासागरापासून तारणारें आहे. संसाररूपी अग्नीनें तप्त झालेल्या लोकांना शिवलिंगार्चन हें अमृत होय. हें संसारताप व पाप तत्काल दूर करतें. शिवलिंगाचें पूजन करून जो आनंदानें शिवाला पाहातो. तोच सर्व भाग्याचा निश्चित आलय समजावा. जास्त काय सांगावें, जो नेहमीं लिंगपूजा करतो, तो मला अति प्रिय होतो यांत संशय नाहीं. कलीयुगांत मनुष्यजन्म अत्यंत दुर्लभ आहे. तो प्राप्त झाला असतां लिंगपूजा करावी. मनुष्यामध्यें सुद्धां ब्राह्मणापासून ब्राह्मण स्त्रीच्या ठिकाणीं जन्म झाला असेल तर अवश्य शिवलिंगपूजन करावें."

"वर्णांना उत्तम धर्म शिवलिंगार्चन करणें हाच श्रेष्ठ आहे, म्हणून वर्णांचे इतर धर्म गौण मानले पाहिजेत. ब्राह्मणांना, विशेषेंकरून शिव-लिंगार्चन श्रेष्ठ आहे. शिवलिंगाच्या पूजेनें जें फल प्राप्त होतें, तें कोट्यवधि अश्वमेधांनीं प्राप्त होत नाहीं. लिंगार्चनानें प्राप्त होतें तें अन्य धर्मानें प्राप्त होत नाहीं. ही गोष्ट जाबाल्यायनानीं सांगितली आहे." (सनत्कुमार संहिता)

"ज्यांत भूतें लीन होतात व ज्यापासून तीं उत्पन्न होतात, असें जें परमव्योम तें लिंग होय. तो निष्कल परमशिव समजावा. ज्या भावानें शंकराचें योग्याकडून चिंतन केलें जातें तें लिंग तीन प्रकारचें आहे. व्यक्त, अव्यक्त, उभयात्मक. व्यक्त म्हणजे सकल, अव्यक्त म्हणजे निष्कल व ज्ञानज्योतिरूप हें व्यक्ताव्यक्त समजावें." (महाकालोत्तर)

"हे ब्राह्मण हो, लिंगाचा यथावत् क्रम मी तुम्हांला सांगतों. शंकराचें पहिलें लिंग ओंकार होय. तें सर्व कामना पूर्ण करणारें आहे. शिवाचें सूक्ष्म लिंग प्रणवरूप आहे. तेंच निष्कल होय. शंकराचें स्थूल लिंग म्हणजे हें ब्रह्मांड होय. त्याचें नांव पंचाक्षर होय. या दोन्ही प्रकारच्या लिंगपूजेला तप म्हणतात. तें मोक्षप्रद आहे. पुरुषप्रकृति तसेंच आकाशादि पंचमहाभूतें इत्यादि शंकराचीं अनेक लिंगें आहेत. त्यांचें विस्तारानें वर्णन करण्याची शक्ति शिवाहून अन्य कोणाचीच नाहीं." (शिवपुराण)

" लिंगपदाचा अर्थ रूप आहे, अर्थात् ज्या ज्या रूपांत शिवाची भावना शास्त्रांत सांगितली आहे, तीं सारीं शिवाचीं कल्पित लिंगेंच आहेत. ज्याप्रमाणें कल्पित अनित्य वर्णांच्या द्वारां मनुष्य विद्वान् व कृतार्थ होतो, त्याप्रमाणें या कल्पित शिवरूपांच्या उपासनाद्वारां मानवाचें कल्याण होतें असें सांगून सूतानें शिवरूपाचा क्रम सांगितला तो असा :— पहिल्या प्रथम प्रणव हें शिवरूप आहे. त्याची उपासना केली असतां सर्व कामना पुऱ्या होतात. या प्रणवप्रतीकांतहि एक सूक्ष्म ओम् हें रूप व दुसरें पंचाक्षर नाम व सर्व वर्णमाला हें स्थूलरूप आहे. या पंचवर्णात्मक स्थूलरूपाची प्रतिमा पंचमुखी महादेव ही आहे. या स्थूलसूक्ष्मरूपाची पूजा करणें यास तप म्हणतात. त्यानें मोक्ष प्राप्त होतो. ॐ च्या आकृतींत लौकिक, वैदिक व उपास्य शिवलिंग कसें तें दाखवितात. तसेंच ॐ या आकृतीच्या अनेक तुकड्यांत तेहतीस देवता दाखवितात. तसेंच ब्रह्म, माया, जीव, मन, बुद्धि, चित्त, अहंकार, आकाश, वायु, अग्नि, जल, पृथ्वी हीं तत्त्वें निरनिराळ्या विभागांत दाखवितात. अ = शुद्ध ब्रह्म, उ = विशुद्ध प्रकृति, म = दोहोंच्या संमेलनाचें परिचायक. अशा निरनिराळ्या प्रक्रियेनें ॐ हें अखिल ब्रह्मांडव्यापी शिवलिंग आहे असें निदर्शित करतात. सर्ववर्णमय शिवलिंग आहे असें म्हणण्यांत हाच सर्वव्यापकत्वाचा भाव असतो. "

हें जें लिंगपूजामाहात्म्य येथवर सांगितलें त्याचें आस्थापूर्वक चिंतन करावें. यांत ग्राम्य आणि अश्लील भावाचा यत्किंचितहि गंध तरी आहे काय? हा वाचकांनीं विचार करावा.

प्रतिमा आणि प्रतीक यांत महत्त्वाचा भेद हाच आहे कीं, प्रतिमा स्वरूपतः जशी परिच्छिन्न, रूपविशिष्ट, सावयव व व्यावर्तक असते तसें प्रतीक नसतें. प्रतीक हें स्वरूपतः अरूप व निरवयव असतें. अर्थात् त्या ठिकाणीं जघन्य इंद्रियांची कल्पना करणें हें अगदींच अयोग्य ठरतें. प्रतीक हें अत्यंत सार्थ असून तें एकच एका अद्वय परमात्म्याचें असतें. कोणत्याहि देवतेची कारणब्रह्मरूपांतच उपासना करावी हें आचार्यांच्या पंचप्रतीकोपासनेचें रहस्य दिसतें. शिवपंचायतनांत शिव हें कारणब्रह्म असून बाकीचीं चार कार्यब्रह्में मानावीं असें त्यांतील रहस्य आहे.

प्रतिमोपासना ही वस्तुतंत्र म्हणजे प्रतिमातंत्र असते. प्रतीकोपासना

कर्तृतनच असते. प्रतिमोपासनेंत प्रतिमेच्या अवयवांच्या सौंदर्यादि गुणांवर मन लुब्ध होणें किंवा प्रतिमेचा कुरूपतेबद्दल मनानें तिरस्कार करणें संभवतें. प्रतीकोपासनेंत हे कोणतेच विकल्प संभवत नाहींत. याप्रमाणें भागवतांच्या प्रतिमोपासना, याज्ञिकांच्या अग्न्युपासना, तसेंच सूर्यादि एकदेशी प्रतीकोपासना सोडून जगत्कारणाचें एकमेव प्रतीक या दृष्टीनेंच शिवलिंगाचा महिमा वर्णिला आहे हें लक्षांत घ्यावें.

त्याप्रमाणें एखाद्या शिलेची मूर्ति घडण्यापूर्वी त्या अनघड शिलेंत असंख्य आणि विविध मूर्ति अव्यक्त दशेंत असूं शकतात, त्याप्रमाणें प्रतीकोपासना ही सकल–निष्कलाची अव्यक्तोपासना असते.

निर्गुण अधिष्ठानभूत ब्रह्म आणि अनिर्वचनीय माया या दोघांचें शिवलिंग हें प्रतीक आहे असें उपमन्यु सांगतो. अर्थात् या ब्रह्ममाया युग्मांत ग्राम्य आणि अश्लील भाव कसा संभवेल? कारण वस्तुतः तेथें द्वैतच नाहीं. एक शिवलिंग पूजल्यानें सर्व कांहीं पूजल्याप्रमाणें होतें. याचाच अर्थ तें अभिन्न-निमित्तोपादानरूप असें व्यापक ईश्वराचेंच प्रतीक आहे असा होतो. एरव्हीं सयोनिशिश्न प्रतीकोपासनेनें सर्व देवपूजा किंवा चारी पुरुषार्थ कसे सिद्ध होतील? शिवलिंग हें जर अनार्यांचें प्रतीक असून तें आर्यांनीं विरोध टाळण्याकरतां स्वीकारलें असतें, तर तें आर्यांच्या देवात फार तर उपांगभूत होऊन राहिलें असतें. आद्यवनमानवांच्या अत्यंत ग्राम्य आणि अश्लील अशा सयोनिशिश्न प्रतीकाला आर्यांनीं अनन्यसाधारण असें महत्त्व देणें अगदींच अशक्य दिसतें. शिवाय शिवलिंग या प्रतीकाचे ठिकाणीं ब्रह्माविष्णु इत्यादि सर्व देव लीन असतात व षडंगपदक्रमासह वेदहि त्याच ठिकाणीं अव्यक्त असतात असें स्कंदपुराणांत सांगितलेंच आहे. शिवलिंग हें कांहीं शिवाचें स्मारक असें जड चिन्ह नव्हे. शिवलिंगाच्या ठिकाणीं शिव आहे अशी भावना असते. विदेशांतील प्रतीकें व आपल्याकडील ईश्वराचीं प्रतीकें यांत फार मोठा भेद आहे. ज्याला इंग्रजींत सिम्बॉल म्हणतात तसें शिवलिंग नाहीं. तेथें शिवप्राण असतात.

वर सांगितलेल्या लिंगमाहात्म्यांत दुसरा एक असा फार महत्त्वाचा मुद्दा आहे कीं त्यांत शिवलिंगाचें अर्चन ब्राह्मणांनीं वेदोक्तपद्धतीनें करावें असें

सांगितलें आहे. अर्थात् तें अवैदिक अनार्यांचें किंवा शूद्रांचें दैवत आहे असें म्हणतांच येत नाहीं.

शिवलिंग हें जगत्कारणाचें प्रतीक आहे असें अनेक अनुभवसंपन्न ऋषिवर्यांनीं स्पष्टच सांगितलें आहे. तें एकदेशी सृजन कर्मांचेंच प्रतीक नाहीं. कारण तें जन्मापासून उलट निवृत्त करणारें आहे. ब्रह्मचर्य (ब्रह्मानुसंधान) हा त्याचा विशेष आहे. तसेंच तें एकदेशी संहारकारी देवतेचें प्रतीक नाहीं. कारण तें मृत्यूचें निवारण करून अमृतत्त्व देणारें आहे. तें प्रतीक कोणत्याहि एकदेशी परिच्छिन्न भावनेचें नाहींच. कारण त्याहून अन्य आणि श्रेष्ठ असें परमात्म्याचें दुसरें प्रतीकच नाहीं, असेंच सर्व पुराणें व श्रुतिहि एकमतानें सांगत आहेत.

शिवलिंगोपासनेच्या सांगितलेल्या फलश्रुतींत-कोणाला अतिशयोक्ति वाटत असेल, तर तें त्याचें शिवलिंगनिष्ठेसंबंधीं दारिद्र्य किंवा अज्ञान समजावें. शिव-शक्तीला अशक्य असें कांहींच नाहीं. शिवाय मोक्ष पुरुषार्थाचें महत्त्व सामान्य अनधिकारी जीवांस जाणवत नाहीं. यामुळें रोचक अशी ही फलश्रुति न सांगितली तर लिंगार्चनाकडे प्रवृत्तीच होणार नाहीं असाहि यांतील एक परोक्ष गूढभाव असतो.

> हा गुह्यार्थ करितां प्रकट । सांडोनि कर्ममार्गाची वाट ।
> कर्मब्रह्म उभय भ्रष्ट । होतील नष्ट अनधिकारी ॥ ३६२ ॥
> हें जाणोनि ज्ञाते ऋषीश्वरीं । वेदार्थ निरूपण कुसरीं ।
> हा मुख्यार्थ झांकोनि निर्धारीं । परोक्षावरी व्याख्यान केलें ॥ ३६३ ॥
>
> (एकनाथी भागवत, ११।२१.)

कांहीं असो. सांप्रदायिक शैवपुराणें जरी आपण सोडून दिलीं तरी महाभारतांत अनुशासनपर्व व द्रोणपर्व यांत साक्षात् श्रीकृष्णानें व श्रीव्यासानें तसेंच उपमन्यु, तंडी, विश्वामित्र इत्यादि महान् ऋषिवर्यांनीं जो शिवमहिमा व शिवलिंगमहिमा विशेष विस्तारानें व अगत्यानें वर्णिला आहे, तो लक्षांत घेतां शैववाङ्मयांतील कांहीं विवक्षित भागांवरून आधुनिकांच्या ज्या विपरीत कल्पना झाल्या आहेत, याचें कारण त्या सांप्रदायिक वाङ्मयाचा गूढ रहस्यार्थ संप्रदाय शुद्ध परंपरेनेंच समजून घेतला पाहिजे तो त्यांना समजलाच नाहीं, हेंच मानणें भाग पडतें. बृहदारण्यकांत लिंगात्म्याचा विचार सुरू असतांनाच

परोक्षप्रिया इव हि देवाः प्रत्यक्षद्विषः । हें गूढवादाच्या गुरुकिल्लीचें सुप्रसिद्ध श्रुतिवचन आलें आहे. असो. महाभारतांतील ज्या अनुशासनपर्वात भग-लिंगाची कल्पना स्पष्ट सांगितली आहे. त्याच पर्वांत अ. ६१ यांत महेश्वराचें माहात्म्य सांगतांना " त्याचें लिंग नित्य स्थिर म्हणून त्यास स्थाणु म्हणतात. त्याचें लिंग नित्य ब्रह्मचर्य पाळतें. लोक त्या लिंगाची नेहमीं पूजा करतात. ही पूजा त्या माहात्म्याला प्रिय आहे. लिंगपूजकांना महान् ऐश्वर्य मिळतें " इत्यादि वर्णन आहे. त्यांत भगलिंगाचा ग्राम्य मैथुनभाव दिसत नाहीं. द्रोणपर्व, अ. २०२ यांत प्रत्येक परमगुह्य हें महेशाचें रूप असल्याचें सांगितलें आहे.

तदाप्रभृति लोकेषु लिंगार्चासुप्रतिष्ठिता । लिंगवेदी महादेवी लिङ्गं साक्षान्महेश्वरः ॥ —लिंगपुराण १।१७

---

## प्रकरण ९ वें

## सगुण-निर्गुण शिव

निर्गुणः सगुणश्चेति शिवो ज्ञेयः सनातनः ।
निर्गुणः प्रकृतेरन्यः सगुणः सकलः स्मृतः ॥

—शारदातिलक.

एवं ईक्षण आरंभीं शेवटीं प्रवेश । इतुकें निर्माण करीं मी ईश ॥
परी हें मायिक रूप सविशेष । बोलिजे माझें ॥ ४५० ॥

एवं सृष्टि स्थिति संहार तिन्ही । याचा कर्ता मी एकला ॥ ४५९ ॥

तरी अवधारा सविशेषाविण । बोलतां नये निर्विशेष निर्गुण ॥
तस्मात् सविशेषामाजीं ओळखून । निर्विशेष अंगें व्हावें ॥ ४६३ ॥

—वेदेश्वरी, ६.

**निर्द्वंद्व स्वरूप :—** शैववाङ्मय अद्भुतरम्य व गूढ आहे, त्याचा किंचित् नमुना या प्रकरणांत निदर्शित करीत आहें. शैवतत्त्वज्ञानांत शुद्ध

परब्रह्म व शबलब्रह्म या दोहोंसहि शिवच म्हणतात. शिवाचीं सगुण-निर्गुण, अथवा सक्रिय-निष्क्रिय अशीं उभयविध रूपें मानतात. शबलब्रह्मरूपांत प्रकाशतत्त्वाचें प्राधान्य असतें, तेव्हां त्यास शिव व विमर्शतत्त्वाचें प्राधान्य असतें, तेव्हां त्यास शक्ति असा भेद मानला आहे. तरी केवळ प्रकाशस्वरूप अथवा शिवस्वरूप किंवा एकमेवविमर्शरूप अथवा शक्तिस्वरूप कधींच नसतें. सगुण-निर्गुण शिव हीं अविनाभूत तत्त्वें आहेत.

**उपास्य अथवा ध्येय**—शिवलिंगार्चन किंवा शिवलिंगपूजा अशा साधनमार्गानें शिवाशीं जीवानें समरस होणें हा शिवलिंगोपासनेचा वस्तुतः अर्थ आहे. पण शिवलिंगद्वारां ज्या शिवाची उपासना करावयाची तो शिव अज्ञेय नसला तरी दुर्विज्ञेय आहे खास. शिवमहिम्न पाठांत कोठें कोठें "तव तत्त्वं न जानामि कीदृशोऽसी महेश्वर। यादृशोऽसि महादेव तादृशाय नमो नमः ॥ ४१ ॥" असा श्लोक आढळतो. शिवलिंगोपासनेचें स्वरूप व्यवहारतः असेंच आहे. निर्गुण शिव निर्गुण म्हणून त्याला उपमा नाहीं व त्याची प्रतिमा नाहीं. सगुण शिवरूप अनंत असल्यामुळें त्यालाहि दुसरी उपमा नाहीं व त्याचीहि प्रतिमा संभवत नाहीं. म्हणून शिवाची लिंगपूजा सांगितली आहे. कारण प्रतिमा करतांच येणार नाहीं. पण शिवलिंगाची पूजा करतांना अज्ञात व अकल्पनीय अशा शिवाचें ध्यान कसें करावें हा प्रश्न उद्भवतोच. म्हणून शाखाचंद्रन्यायानें शिवाचें सगुण-निर्गुण रूप कळण्यासाठीं शास्त्रकारांनीं जो यत्न केला आहे त्याचाच थोडा अंश या प्रकरणात सांगावयाचा आहे. शिवाचे सगुणसाक्षात्कार योगीरूपांत, किरातरूपांत, सौदागररूपांत, अतिथिरूपांत असे व्यक्तिपरत्वें भिन्न रूपांत होत आलेले आहेत. तसेंच उलट शिवाचीं कांहीं निश्चित ध्यानेंहि शास्त्रकारांनीं ठरविलीं आहेत. हीं दोन्ही प्रकारचीं रूपें वस्तुतंत्र म्हणजे शिवाचीं वास्तविक रूपें आहेत किंवा तीं कर्तृतंत्र म्हणजे तीं भक्तभावनांस अनुसरून तात्पुरतीं मानावयाचीं आहेत? या क्लिष्ट विषयांत न शिरतां आध्यात्मिक व आधिदैविक जगांतील शिवाचीं वास्तविक नित्यरूपें कोणतीं त्याचेंच थोडें दिग्दर्शन या प्रकरणांत करावयाचें आहे. ध्यानाकरतां रचलेलीं किंवा यदृच्छेनें किंचित् काल साक्षात्कृत झालेलीं रूपें यांस किंवा शिवकथांत प्रसंगानुसार वर्णिलेल्या अशा शिवरूपांस अनुभवसिद्धवत् मानलें, तरी त्यांचा विचार

या प्रकरणांत केला नाहीं. कारण शिवाची अनेक मुखें, अनेक हात इत्यादि लक्षणांची रचलेली ध्यानस्वरूपें जरी ध्येयरूप असलीं, तसेंच शिवाची आख्यानकरूपें किंवा साक्षात्कृतरूपें जरी भूतार्थवादानें सत्य मानलीं तरी सृष्टीच्या सूक्ष्मस्वरूपांतील किंवा देवताविज्ञानातील तीं पारमार्थिक किंवा व्यावहारिक रूपें असें म्हणतां येणार नाहीं. तसेंच, एकास साक्षात्कृत झालेलें शिवरूप तसेंच दुसऱ्याला साक्षात्कृत होतें असें नाहीं; म्हणून हा एकांतिक विचार सोडून देवताविज्ञानाच्या सामान्य दृष्टीनें या प्रकरणांत विचार केला आहे.

**पुरुषविध अपुरुषविध:**—आकाशांत विद्युत् चमकली की तिचें व्यापक प्रकाशरूपांत किंवा प्रकाशरेखारूपांत प्रत्यक्ष दर्शन होतें असें वाटतें. पण तें विद्युच्छक्तीचें वास्तविक स्वरूप नव्हे. तें सूक्ष्म व अव्यक्तच असतें. प्रकाश एवढेंच विद्युत्चें कार्य नाहीं. गति, आकर्षण, विकर्षण, ध्वनिलहरींचें वाहन, रोगनिवारण, दाहकता इत्यादि अनेक ज्ञाताज्ञात कार्यें तिचीं असतात. त्या त्या कार्यानुमेय विद्युच्छक्तीचे प्रकार आणि विकार भिन्न असतील. शिवशक्तीचें अथवा सशक्तिक शिवतत्त्वाचें असेंच म्हणतां येईल. हे सारे प्रकार पुरुषविध असतील असें वाटत नाहीं आणि जें पुरुषविध शिवतत्त्व असेल तेंहि आपल्याप्रमाणें देहाकार असलें पाहिजे असेंहि म्हणवत नाहीं.

**सोपाधिक द्वैत निरुपाधिक अद्वैत:**—ज्याप्रमाणें एकच व्यक्ति घरीं पुत्र, पिता, पति, बंधु, काका, इत्यादि भिन्न नात्यांनीं, बाहेर शिवशेजारी, नागरिक, स्वयंसेवक, पंच इत्यादि प्रकारें, कचेरींत निरनिराळ्या अधिकारपरत्वें, याप्रमाणें विविध अभिनिवेशांनीं वावरत असते, एकच अमूर्त राजसत्ता महामंत्र्यापासून गांवमहारापर्यंत विविधरूपें धारण करते, त्याप्रमाणें या त्रैलोक्यांत शिव विश्वात्मक, विश्वचर, विश्वातीत अथवा मायोपहित, मायाविशिष्ट, मायातीत अशा विविध सूक्ष्मसूक्ष्मतरतमरूपांत विद्यमान असतो. एका रुद्राध्यायांत कितीतरी प्रकारच्या रुद्रांना नमस्कार केला आहे व रुद्र असंख्यात असल्याचें म्हटलें आहे. पण अनेक सोंगें घेणारा नट जसा त्या सर्व सोंगांहून वेगळाच असतो, असंख्य लाटालहरी, बुदबुद यांना धारण करणारा सागर वेगळाच असतो, किंवा सर्प, माला, काठी, पाण्याची रेषा, भूमींत पडलेली भेग असे अनेक भास उत्पन्न करणारी अधिष्ठानरूप दोरी त्या सर्वांहून वेगळीच न बदलणारी नित्य एकचस्वरूप असते,

त्याप्रमाणें एकेश्वर जो शिव त्याचें स्वरूप अविकारी असलें पाहिजे व तेंच वस्तुतः शिवलिंगोपासनेंत शोधावयाचें आहे. पण महदाश्चर्य असें आहे कीं, तें जाणण्यापूर्वी खरी शिवपूजा संभवत नाहीं. (" देवे परिचयो नास्ति वद पूजा कथं भवेत ।"—बोधसार) आणि पुढें तें जाणल्यावर पूज्य-पूजक हा द्वैतभावच उरत नाहीं. "जाते परिचये देवः पूजामपि न कांक्षति"—बोधसार म्हणजे " शिवोभूत्वा शिवं यजेत् ।" असें झाल्यावरहि शिवपूजा संभवत नाहीं. पण श्रीनरहरस्वामी म्हणतात कीं, शिवासंबंधीं अज्ञानरूपी सुतक आहे, तोंवर पूजेचा अधिकारहि वास्तविक नसतो. (पूज्यपूजकता न ते मूर्खस्त्वज्ञान सूतकी, बो. सा.) त्या अज्ञाननिरसनासाठीं हें वाङ्मयप्रायश्चित्त आहे असें जाणावें.

**निर्गुण परमशिवः**— या जगांत असंख्य रूपांत नानात्व दिसत असूनहि " सर्वं खल्विदं ब्रह्म ।", " ब्रह्मै वेदं सर्वं ।", " एकमेवाद्वितीयम् ब्रह्म " असा वैदिकांचा अटळ अद्वैत सिद्धान्त आहे. असें हें जें निर्विशेष, निरपेक्ष, निरंजन, निर्गुण, निष्क्रिय, निर्विकार, या प्रकारचें केवळ निषेध मुखानें निर्दिष्ट केलें जाणारें एकमेवाद्वितीय तत्त्व तेंच परम शिव-तत्त्व होय. (श्वे. उप. ६।११. १९; १।१०; ४।१८ अथर्वशिरस. उप. ५.)

सांख्यादर्शनकारांनीं या अखिल विश्वांतील पदार्थांचें वर्गीकरण करून चोवीस तत्त्वें ठरविलीं आहेत. (कपिलगीता, २।११.) त्या चोवीस तत्त्वाचा मूलाधार प्रकृति आणि पुरुष हें द्वंद्व होय. (क. गी. २।९) अद्वैत वेदांतानें या द्वैतापैकीं प्रकृति ही मिथ्या मानून पुरुष हें एकच तत्त्व मानलें आहे. (ब्र. सू. २।१–९, २४, २५. श्वे. ६।८ छा. ६।२. बृ. उप. ४।४।१९) तो एकच एक पुरुष म्हणजे परमशिव होय. (तै. उप. श्वे. उप. महानारायण उप. १३।५) या पुरुषाचेहि गीतेंत क्षरपुरुष, अक्षरपुरुष व अव्ययपुरुष अथवा पुरुषोत्तम असे तीन पुरुष मानले आहेत. (गीता १५।१८) त्यांतील पुरुषोत्तम तोच शिव होय. (श्वे. उप. ४।१४ पारमेश्वरागम)

**परात्परः**— यापुढें जाऊन विज्ञानवाद्यांनीं क्षरपुरुष म्हणजे अपरा प्रकृति, जगाचें उपादानकारण, अक्षरपुरुष म्हणजे पराप्रकृति जगाचें निमित्तकारण, व त्यांस आलंबनरूप मायावच्छिन्न चेतन म्हणजे अव्यय-पुरुष, आणि त्याच्याहि पलीकडे मायानवच्छिन्न सर्वपदविशिष्ट रसरूपव्यापक

तो परात्पर असें मानलें आहे हें जें विज्ञानवाद्याचें सर्वश्रेष्ठ स्वरूप तो परमशिव होय[१] ( यात बलविशिष्ट ही जी नित्योपाधि मानली आहे ती केवलाद्वैत्यास मान्य नाहीं )

**छत्तीस तत्त्वें** —शैवशाक्तांच्या तत्त्वज्ञानात सांख्याहून एका अर्थी जास्त सूक्ष्म विचार करून सांख्यांच्या, पंचमहाभूतें, पंचतन्मात्रा, दशेंद्रियें, मन, बुद्धि अहंकार[२] आणि प्रकृति या चोवीस तत्त्वांच्या पलीकडे जाऊन (१) माया[३], (२) कला[४], (३) काल, (४) नियति, (५) विद्या[५], (६) राग (७) पुरुष[६] हीं सात शुद्धाशुद्ध तत्त्वें व त्यांच्याहिपेक्षा सूक्ष्म म्हणजे (१) शुद्धविद्या[७], (२) ईश्वर[८], (३) सदाशिव[९], (४) शक्ति[१०], (५) शिव[११], अशीं पाच सूक्ष्मतरतम तत्त्वें मानलीं आहेत त्याच्या छत्तीस तत्त्वातील जें शबल शिवतत्त्व त्यासहि आधार असें जें परसंविद्रूप परमशुद्ध व एकमेव तत्त्व तेंच परमशिवतत्त्व होय[१२]

१. ईशविज्ञानभाष्य, हिंदी ख १, पृ. २१ परात्पर म्हणजे वैदिक ब्रह्मवन व अव्यय म्हणजे त्यातील ब्रह्मवृक्ष [ ब्रह्म वन ब्रह्म स वृक्ष आस यतो द्यावापृथिवी निष्टतक्षु । तै० ब्राह्मण ] २ सर्वसंचयवत्त्वेन संपूर्ण. शिवसहित. । शिवपुराण. अचिन्त्यमव्यक्तमनन्तरूप शिव प्रशान्तममृत ब्रह्मयोनिम् ॥ कै उ ११६ अव्यक्तोऽह गुणान् वक्तु महादेवस्य धीमत । यो हि सर्वगतो देवो न च सर्वत्र दृश्यते ॥ म भा. अनु १४।३ ३ चिज्जडादि भेद करणारी शिवशक्ति ४ सर्व कर्तृतेचा उपाधि सापेक्ष संकोच करणारी ती कला ५ वस्तूच्या नित्यतेचा परिच्छेद करणारा तो काल कंचुक होय ६ पूर्ण स्वातंत्र्याचें जें नियमन ती नियति ७ आत्म्याच्या सर्वज्ञतेचा संकोच करणारी ती विद्या ८ भोगविषयक इच्छेचा प्रेरक तो राग. ९ भोक्ता आणि कर्ता तो पुरुष १० यात अह आणि इद हे दोन्ही भाव तुल्य असतात. ११. यात अहपेक्षा इदतेस प्राधान्य असतें. यासच बिंदु म्हणतात. १२ यात इदतेपेक्षा अहमावाला ( शिवतत्त्वाला ) प्राधान्य असतें यास नाद म्हणतात १३. समन शिवतत्त्वास शक्ति म्हणतात १४ उन्मन शिवतत्त्वास शिव म्हणतात यात अहइद हा भेद नसतो १५. कल्याण शक्तिअंक, पृ ५८३ ते ५८७ Garland of letters by sir J. Woodroffe.

भुवनें—याप्रमाणें शबल शिवतत्त्वापासून पृथ्वीतत्त्वापर्यंत जी ३६ तत्त्वांची उतरती श्रेणी शाक्तांनीं मानली आहे, तींत त्यातून पृथ्वीतत्त्वापासून वर प्रकृतितत्त्वापर्यंत जीं सांख्यांचीं चोवीस तत्त्वें आहेत, त्यांत सूक्ष्म भेद करून शैवशाक्तांनीं एकशेंचौसष्ट भुवनें अथवा जगतें मानलीं आहेत. त्या सर्वांचा स्वामी ब्रह्मा होय. त्यावरील पुरुषापुढील व कलेपर्यंत माया कञ्चुकांच्या बारा भुवनांचा स्वामी विष्णु आहे. काल आणि मायेच्या दहा भुवनांचा स्वामी रुद्र महेश्वर आहे. यापुढें सदाशिवतत्त्वापर्यंतच्या १८ भुवनांचा स्वामी ईश्वर आहे. त्यापुढील समनी शक्ति तत्त्व व उन्मनी शिवतत्त्व यांच्या पधरा भुवनांचा स्वामी शबल शिव होय. त्याहूनहि श्रेष्ठ म्हणजे दोनशें-चौवीस भुवनांच्या अतीत तो शुद्ध परम शिव होय. [ कल्याण शाक्त अङ्क, पृ. ५८३ पहा. ]

**शाम्भवदर्शन**—शाम्भवदर्शनांत याहून वेगळें वर्गीकरण आहे. त्यांत त्रिंद्विशेषाच्या आठ अवस्था मानल्या आहेत. (१) बिंदु अवस्था चित् (२) व्यापक अवस्था चिति (३) आन्तरिक व बाह्य क्रियाशीलता-चित्त (४) अंतर्मुख बोध-चैतन्य (५) या बोधाची धारणा-चेतना (६) इंद्रिय व्यापार-अनुभव (७) देह (८) चंद्र, सूर्य आणि अग्नि यांच्या शरिरांतर्गत सूक्ष्म शक्तिकला याप्रमाणें सूक्ष्मापासून स्थूलापर्यंत परासवित अथवा परमशिवाच्या या अवस्था मानल्या आहेत.

**केवलाद्वैत**—या शैवशाक्तांच्या परमशिवतत्त्वांत शक्ति भेदाभेदरूपानें व समरसत्वानें मानलेली असते. असा हा स्वगत भेदाभासहि ज्यास खपत नाहीं असे जे केवलाद्वैती त्यांचें जें केवल तत्त्व त्यासच परमशिव म्हणावें.

जेथें सृष्टि नाहीं व सृष्टीची कल्पनाहि शिवली नाहीं, असें जें विश्वातीत स्वरूप तो ब्रह्मभाव होय. हा भाव शून्यरूप नाहीं; म्हणून त्यास सद्रूप म्हणतात. तो जडरूप नाहीं म्हणून त्यास चिद्रूप म्हणतात. त्यांत अपूर्णतेचा लेशहि नाहीं म्हणून त्यास आनंदरूप किंवा अनंतरूप म्हणतात. असें हें जें निःसंग, अद्वय रूप तेंच निर्गुण परमशिव होय. तेंच शुद्ध ब्रह्मात्मरूप होय.

**ईश्वररूप**—या ब्रह्मभावात ब्रह्मप्रकृति जगत्कल्पनारूपानें उदित होऊन ती कल्पनारूप प्रकृति जगाची उत्पत्ति, स्थिति व लय करीत आहे, असें जें ब्रह्मभावाचें साक्षीत्वानें ईक्षण त्या सगुणभावास ईश्वरभाव असें म्हणतात.

गीतेंतील क्षेत्रक्षेत्रज्ञविचारांतील जो क्षेत्रज्ञ अक्षरपुरुष तें शिवाचेंच सगुण-रूप होय.

**व्यापकरूप**—या ब्रह्मप्रकृतीच्या विलासांत म्हणजे सृष्टिरूपांत अनुस्यूत अथवा संबंधित असा जो ब्रह्मभाव तोच विराटभाव होय. या आपल्या विराट भावांचेंहि किंचित् दर्शन शिवानें श्रीरामाला दिल्याचें वर्णन पुराणांतरीं आहे. रुद्राध्यायांत व शिवगीतेंतील विभूतिवर्णनांत हाच व्यापक भाव आहे. सारांश, हें सारें ज्ञाताज्ञात ब्रह्मांड अथवा अशीं असंख्य ब्रह्माण्डें हें सगुण शिवाचें विराट स्वरूप होय.

**महेश्वर**—याप्रमाणें या विश्वात्मक सगुण शिवाचें मन, वाणी, बुद्धीस अगोचर असें जें उत्पत्ति, स्थिति, लयकारी ( आणि याशिवाय तिरोभाव आणि अनुग्रहकारी ) आधिदैवतरूप तेच ब्रह्मा–विष्णु–महेश होत. ही त्रिमूर्ति शिवाचेंच रूप होय त्यातहि परमशिवतत्त्व हें निषेधावधि, सवलयसाक्षी असें ज्याप्रमाणें आहे, त्याचप्रमाणें संहारकारी महेशहि लयसाक्षी असल्यामुळें, महेशाच्या ठिकाणीं शिवतत्त्वाचें जणु प्राधान्य मानतात

असा जो अमूर्त महेश्वर शिव त्याचें जें भक्तास गोचर होणारें सगुण साकार रूप तोहि सगुण शिवच होय आणि त्याहिपुढें त्या अमूर्त सगुणेश्वराचें जें प्रतीक तेंहि सगुणशिवरूप शिवलिंग होयें

*ब्रह्मलिंग*—सूतानें *लिंगपुराण सांगताना आरंभीं जें मंगल केलें* आहे त्यात तो शिवाचें वर्णन करताना म्हणतो कीं, " शब्दब्रह्म हेंच ज्याचें शरीर, शब्दब्रह्म हेंच ज्याचें प्रकाशक, केवल वर्ण हेंच ज्याचे अवयव, अव्यक्त, अनेक स्वरूपात असलेलें अकार, उकार, मकार, यांनीं युक्त, स्थूल, सूक्ष्म, ॐकाररूप, ऋग्वेद हेंच ज्याचें मुख, सामवेद हीच ज्याची जिह्वा, यजुर्वेद ही ज्याची मान, अथर्ववेद ज्याचें हृदय, विभु, प्रधान व पुरुष याहून पलीकडे असणारें, ज्याला उत्पत्ति व लय हीं दोन्ही नाहींत, तमो

---

[ पान न ५४७ वरून ]

प्रदेशात्तु शूद्रा पादात् पिनाकिन ॥ लिंगपुराण ईश्वरश्चेतन कर्ता पुरुष कारण शिव । विष्णुर्ब्रह्मा शशी सूर्य शक्रो देवाश्च सान्वया ॥ सृज्यते ग्रस्यते चैव तमो भूतमिद जगत्। अप्रज्ञात जगतात्सर्व तदा ह्येको महेश्वर ॥ म भा शातिपर्व त्व वै ब्रह्मा च रुद्रश्च वरुणोऽग्निर्मनुर्भव । धाता त्वष्टा विधाता च त्व प्रभु सर्वतोमुख ॥ त्वत्तो जातानि भूतानि स्थावराणि चराणि च, सर्वत पाणिपादस्त्व सर्वतोऽक्षिशिरोमुख । सर्वत श्रुतिमॉल्लोके सर्वमावृत्य तिष्ठसि ॥ म भा अनु. प ४५।३९७–४०७.

१ यस्य ब्रह्मा च विष्णुश्च त्व चापि सह दैवते । अर्चयेथा सदा लिङ्ग तस्माच्छ्रेष्ठतमो हि स ॥ म भा अनु प अ १४।२३२, लिंगे सपूजन मुख्यमलाभे प्रतिमादिषु ॥ (पद्म पु १०१।११४) पूजयेदिह यस्तु लिंग चापि महात्मन । लिंग पूजयिता नित्य महतीं श्रियमश्नुते ॥ म भा द्रो प १३६

गुणामुळें ज्याला कालरुद्र म्हणतात, रजोगुणामुळें ज्यास ब्रह्मा हें नांव आहे, सत्त्वगुणास्तव जें विष्णु आहे, निर्गुण असल्यामुळें ज्यास महेश्वर म्हणतात, प्रधान व जीव यांस ज्यानें व्यापलें आहे, सव्वीस रूपें किंवा अवस्था यांमध्यें स्थित असणारें, ब्रह्मापासून उत्पन्न झालेलें आणि उत्पत्ति, स्थिति व संहार हे व्यापार लीलेनें चालवीत म्हणून लिंगरूप धारण करणारें जें ब्रह्म ( शिव ) त्यास प्रणाम करून मी लिंगपुराण सांगतों."

**अर्धनारीश्वर**— कारणाधीश्वराच्या ठिकाणीं अर्धनारीश्वर ही भावना आहे. ती कचित् शिवाशिवाय इतरांलाही लावलेली आढळली, तरी प्राधान्यानें तें हरांचेंच रूप मानलें आहे. हराच्या त्र्यंबक या नांवाची व्याख्या सायणाचार्यांनीं "स्त्री अंबा स्वसा यस्य," अशी करून स्त्री शब्दांतील सकाराचा लोप मानला आहे. अर्थात् बहीण-भावंडांप्रमाणें पुरुष-प्रकृति हीं ( आद्य स्फूर्तीचीं ) सहोदर अपत्यें ज्याच्या ठिकाणीं आहेत, तो वैदिक त्र्यंबक शिव होय. यांत अर्धनारीश्वराची कल्पना परशिव अधिष्ठानावर केली आहे. हें शिवशक्तिद्वंद्व अविनाभूत असतां भृंगी ऋषीची केवळ शिवाचीच उपासना करण्याची प्रतिज्ञा अव्यवहार्य ठरविण्याकरितां सशक्तिक शिवानें अर्धनारीश्वर हें रूप धारण केलें. मागें पृ. २६८।२६९ वर हा विषय संक्षेपतः आलाच आहे.

शिवगीतेवरील टीकेंत म्हटलें आहे कीं :—

एक मी निर्विशेष असतां। मायिक स्फुरण झालें न होतां। तेचि माया चंचलरूपें जाणता। मीं असें सर्वज्ञ ॥ ४३८ ॥ चचळ तेचि जडत्वें प्रकृति। जाणता पुरुष मी स्वयंज्योति। परी उभयांसी स्त्रीपुरुष आकृति। किमपि नसे ॥ ३९ ॥ तोचि अर्धनारी नटेश्वर। तोचि षड्गुणात्मक ईश्वर। शिवशक्ति आदिनाम प्रकार। तया विकारासी ॥ ४४० ॥ वेदेश्वरी ६.

सृष्ट्युत्पत्तिपूर्वीची ब्रह्मावस्था वर्णन करतांना श्रुति म्हणते :— "एकाकी न रमते तद्द्वितीयमैच्छत् पतिश्च पत्नी च।" याज्ञिकांच्या पात्रासादनप्रक्रियेंत पांच पात्रांचें युग्म ठेवण्यास सांगितलें आहे. कारण एकाच्या अपेक्षेनें द्वंद्वाच्या ठिकाणीं वीर्य जास्त असतें. द्यौ पति व पृथ्वी जाया यांच्या मिथुनभावावून

---

१ अथ यद्द्वंद्वंद्वं वै वीर्यम्। यदा वै द्वौ संरभेतेऽथ तद्वीर्यं भवति। द्वन्द्वं वै मिथुनम्प्रजननम्। मिथुनमेवैतत् प्रजनने क्रियते। श. प. ब्रा. १।१।२।१

प्राणिमात्र उत्पन्न होतात. द्यौपिता व अदिति माता असेंहि वर्णन आहे. परमेष्ठि वायुतत्त्वाला वैज्ञानिक साम्ब सदाशिव म्हणतात. वस्तुतः प्रत्येक पदार्थ शिवशक्तिरूप आहे. उपनिषदांत या रुद्रशक्तीचें अनेक प्रकारचें वर्णन आढळतें. जगाच्या बुडाशीं असलेलें पुरुषप्रकृति हें द्वंद्व किंवा मैथुनी सृष्टीच्या बुडाशीं असलेलें लिंगयोनि हें द्वंद्व किंवा स्त्रीपुरुष हें द्वंद्व प्रथम अविनाभूतच मानावें लागतें.

अर्धनारीश्वर हें रुद्राचें किंवा शिवाचेंच रूप मानण्यांत येतें; पण जगत्कारणवादांत जो तो आपापल्या उपास्याला जगत्कारण मानतो. याप्रमाणें " नरनारीमयो हरिः" असेंहि म्हणतात. वस्तुतः शक्ति हेंच शिवाचें व्यक्त रूप आहे. असें असतां शक्तिविरहित शिवाची उपासना करण्याची भृंगी ऋषींची प्रतिज्ञा व्यर्थ ठरविण्याकरितां पार्वतीनें तप करून ती शिवाशीं एकरूप झाली, अशीहि अर्धनारीश्वराची एक लाक्षणिक स्वरूपाची पौराणिक आख्यायिका आहे.

चैतन्य आणि अहंकार यांचें युगल म्हणजेच अर्धनारीश्वर होय. चैतन्ययुक्त अहंकार शिव व अहंकारयुक्त चैतन्य म्हणजे गौरी होय.

आत्मा त्वं गिरिजा मतिः। असें यांचें ध्यान आहे. प्रणवांतील अकार म्हणजे उमा व उकार म्हणजे शंकर होयँ. प्रजापतीच्या अग्निषोमात्मक यज्ञांतून सारें

---

१ तैत्तिरीय- ऐ- आ. ३।१।६

२ यस्य यस्य पदार्थस्य या या शक्तिरुदीरिता ॥ सा सा सर्वेश्वरी देवी स स सर्वो महेश्वरः ॥

३ रुद्रो नर उमा नारी तस्मै तस्यै नमो नमः ॥ रुद्रो ब्रह्मा उमा वाणी तस्मै तस्यै नमो नमः ॥ रुद्रो विष्णुरुमा लक्ष्मीस्तस्मै० ॥ रुद्रः सूर्य उमा छाया तस्मै० ॥ रुद्रः सोम उमा तारा तस्मै० ॥ रुद्रो दिवा उमा रात्रीस्तस्मै० ॥ रुद्रो यज्ञ उमा वेदीस्तस्मै० ॥ रुद्रो वह्निरुमा स्वाहा तस्मै० ॥ रुद्रो वेद उमा शास्त्र तस्मै० ॥ रुद्रो वृक्ष उमा वल्ली तस्मै० ॥ रुद्रोगन्धउमापुष्पस्तस्मै० ॥ रुद्रोऽर्थ अक्षरः सोमा तस्मै०॥ रुद्रो लिङ्गमुमापीठं तस्मै तस्यै नमो नमः॥ रुद्रहृदयोपनिषत्.

४ Rudra's marriage with Uma even after his destroying cupid is his spiritual marriage with Brahma Vidya [Indo Aryan mythology II, 227]

५ कल्याणशिवांक.

विश्व उत्पन्न झालें आहे. विज्ञानवादी असें सांगतात कीं, अग्नि हें पुरुषतत्त्व असून तें स्त्रीच्या रजांत आहे. सोम स्त्रीस्वरूप असून तें तत्त्व पुरुषाच्या शुक्रांत आहे. प्रत्यक्ष पाहातां पुरुष स्त्रीचा संभोग घेतो. परंतु वस्तुतः प्राणदृष्ट्या अग्नि-प्राणमय पुरुषाच्या ठिकाणीं सौम्य-प्राणमय स्त्रीच संयुक्त होत असते. म्हणजे एका अर्थी पुरुष स्त्री आहे व स्त्री पुरुष आहे. स्त्रीचे स्तनादि कांहीं अवयव पुरुषाचे ठिकाणीं, तशींच कांहीं पुरुषचिन्हें स्त्रीचे ठिकाणीं, अस्पष्ट आढळतात. स्त्रीचें वैशिष्ट्य सोम रेत हें पुरुषाचे ठिकाणीं आहे आणि पुरुषाचें वैशिष्ट्य अग्नि ( रज ) हें स्त्रीचे ठिकाणीं आहे व त्या अग्नींत रेताची आहुति असें हें यज्ञकर्म आहे. वेदीला दक्षकन्या म्हटलें आहे. उलट निष्क्रिय शवरूप शिवावर शक्तीचें तांडव असें विपरीत मिथुनहि वर्णिलेलें आढळतें. हीं सारीं वर्णनें अर्थात् लाक्षणिक आहेत.

शिवपुराणाच्या वायवीय संहितेंत एक कथा आहे कीं, ब्रह्मदेवाच्या मानसिक सृष्टीकडून प्रजावृद्धि होईना ; म्हणून ब्रह्मदेवानें तपश्चर्या केली. तेव्हां आद्य शक्ति त्याच्या मनांत उदित झाली. तिच्या आश्रयानें ब्रह्मदेवानें त्र्यंबकेश्वराचें ध्यान केलें. तेव्हां शिव प्रसन्न होऊन ते अर्धनारीश्वररूपांत प्रगट झाले. या अर्धनारीश्वरानें एक परमाशक्ति नामक देवी प्रगट केली. त्या देवीची ब्रह्मदेवानें प्रार्थना केली कीं, प्रजा-वृद्धि होण्यासाठीं नारीकुलाच्या उत्पत्तीची गरज आहे; यासाठीं माझा पुत्र दक्ष याच्या येथें कन्यारूपानें जन्म घे. तें तिनें मान्य केलें. पुढें नारीकुल उत्पन्न झाल्यावर मैथुनी सृष्टि निर्माण झाली. तिला ह्या अर्धनारीश्वर महेश्वरामुळें माहेश्वरी प्रजा असें म्हणतात.

---

१ शतपथब्राह्मण विज्ञानभाष्य, (हिंदी) भाग १, पृ. ८६।२०४

२ धिया चक्रे वरेण्यो भूतानां गर्भमादधे। दक्षस्य पितरं तना॥ ऋ. ३-२७।९ सायणभाष्य-दक्षस्य प्रजापतेः तना तनया वेदिरूपा भूमिः॥ अदितिर्ह्यजनिष्ट दक्ष या दुहिता तव। ऋ. १०।७२।५. अग्ने...सां योनिमिह्वासदः।तै. सं. ४।१।१० पहा.

३ पूर्वभाग, अ-१३।१४

४ शंकरः पुरुषाः सर्वे स्त्रियः सर्वा महेश्वरी॥ वा. सं. पू.४।५५ लिंगांका च भगांका च तस्मान्माहेश्वरी प्रजा। म. भा. अनु., प. १४।२३३

**शिवशक्ति** — देवी भागवतांत असा कथाभाग आहे कीं, एकदां शिवपार्वतीचें भांडण झालें. त्या भांडणाच्या भरांत शिव पार्वतीला अपशब्द बोलले. त्याचा त्यास पश्चात्ताप होऊन पुन्हां असें भांडण होऊ नये म्हणून ते अर्धनारीश्वर बनले. शिव विश्वकुटुंबी बनण्यासाठीं आपणच शिवशक्तिरूप झाले. आचार्य म्हणतात —" शिवःशक्त्या युक्तो यदि भवति शक्तः प्रभवितुम् । " शाक्तवेदांतांतील,अद्वैत द्वैताहून भिन्न आहे, पण शिवागमांतील अद्वैत म्हणजे द्वैताचें नित्य सामरस्य होय. शैवमतांतील अद्वैतांत मायेचा त्याग नाहीं, उलट ब्रह्मशक्ति म्हणून सग्रह आहे.

**द्वैताभास**—शांकरमतांतहि हा द्वैताभास सूक्ष्मरूपांत दिसतोच. श्वेताश्वतरांतील मायां तु प्रकृतिं विद्यान्मायिनं तु महेश्वरम् तस्यावयवभूतैस्तु व्याप्तं सर्वमिदं जगत् ॥४।१०॥ तसेंच गीतेंतील मम योनिर्महद्‌ब्रह्म तस्मिन् गर्भं दधाम्यहम्। सम्भवः सर्वभूतानां ततो भवति भारत"॥ १४।३ हें वचन व मनूचें " द्विधा कृतात्मनो देहमर्धेन पुरुषोऽभवत् । अर्धेन नारी तस्यां स विराजमसृजत्प्रभुः॥" हीं सारीं वचनें अर्धनारीश्वराचेंच तात्त्विक विवेचन करितात. देवीला शिवाचें वामाग असें वर्णिलेलें आढळतें. ( त्वया हृतं वामवपुः शरीरं त्वं शम्भो । ) व अर्धनारीश्वराच्या मूर्तींत बहुधा असेंच असतें.

**निर्गुण-सगुण शिव**—शिव निर्गुण असतां सगुण कसा ? असा प्रश्न ऋषींनीं केल्यावरून सूत सांगतात, " परमार्थज्ञानी लोक शिवास प्रणवरूप मानतात. कोणी त्यास विज्ञान, अज असें मानतात. कोणी तो प्रत्यक्ष ज्ञानच आहे, कोणी तो प्रमात्मक भ्रान्तिरहित ज्ञान आहे असें म्हणतात. कांहीं मुनींचें असें म्हणणें आहे कीं, शिव हा निर्मल, निर्विकल्प, निराश्रय, शुद्ध, गुरुप्रकाशित असें ज्ञान आहे. ज्ञानानें मुक्ति मिळते आणि ईशप्रसादानें

---

१ मनु आणि शतरूपा ही कथाहि अशीच लाक्षणिक आहे.

२ सत्यपि भेदागमे नाथ तवाहं न मामकी नरस्त्वम्॥
सामुद्रो हि तरङ्गः क्वचन समुद्रो न तारङ्गः॥
द्वैतं मोहाय बोधात्प्राक् प्राप्ते बोधे मनीषया ॥
भक्त्यर्थं कल्पितं द्वैतमद्वैतादपि सुन्दरम्॥
जाते समरसानन्दे द्वैतमप्य मृतोपमम्॥
मित्रयोरिव दम्पत्योर्जीवात्मपरमात्मनोः॥ बोधसार

ज्ञान प्राप्त होतें. निर्गुण, निष्कल शिव सगुण सकल होतो तो त्याचे स्वतःचे इच्छेनेंच होतो, त्याला वाटलें म्हणजे तो सगुण होतो[1]. शिवाच्या या सगुण विश्वरूपाचें आकाश हें शिर, अंतरिक्ष ही नाभी, सोम, सूर्य व अग्नि हे नेत्र, सर्व दिशा हे कान, पाताळ हे चरण, समुद्र हें पांघरावयाचें वस्त्र, देव हात, नक्षत्र हे अलंकार, याप्रमाणें त्याचें स्वरूप आहे. ब्रह्मा व ब्राह्मण त्याच्या मुखापासून झाले, विष्णु, इंद्र आणि क्षत्रिय त्याच्या हातांतून निघाले. मांड्यापासून वैश्य झाले व पायांपासून शूद्र झाले. अशा प्रकारें हा कर्मात्मा प्रकृतींत काम करावयास लावतो. ++ वस्तुतः सकल किंवा निष्कल असा भेद नाहींच. हें सर्व शिवमय आहे. ( लिं. पु., पू. अ. ७५ )

**शिवमहेश्वर**—अव्यय ( आलंबन ), अक्षर ( निमित्तकारण ) आणि क्षर ( उपादानकारण ) या तीन पुरुषांपैकीं अक्षरपुरुष हा सृष्टिकर्ता ईश्वर होय. हा अक्षरपुरुष बलप्रधान आहे. हें बल सुप्तावस्थेंत असतें तेव्हां त्यास शक्ति म्हणतात. कार्याभिमुख बलाला प्राण म्हणतात व कार्यरूप बलाला क्रिया म्हणतात. प्रत्येक पदार्थात शक्तीचें बल, गति म्हणजे उत्क्रांति, आगति व प्रतिष्ठा किंवा स्थिति या तीन लक्षणेनें लक्षित होतें. पदार्थाची सतत गति अगर उत्क्रांति ही परिणामीं नाशकारकच होते. यासाठीं व्ययाबरोबर आय असावा, याप्रमाणें आगति अथवा आदान हें शक्तिस्वरूप लक्षित होतें. याप्रमाणें प्रत्येक पदार्थाची स्थिति अथवा प्रतिष्ठा गति—आगति अथवा आदान-विसर्गरूप असते. गति, आगति आणि प्रतिष्ठा किंवा स्थिति या तीन बलांचा संबंध आला असतां तेथें संकोच ( सोम ) आणि विकास ( अग्नि ) हे दोन कलात्मक प्रकार उद्भूत होतात.

हे जे क्रियात्मक प्राणशक्तिविशेष यांतील उत्क्रांतितत्त्वाला इंद्र, आगति अथवा यज्ञतत्त्वाला विष्णु, प्रतिष्ठा तत्त्वाला ब्रह्मा, बाह्यगतिशील प्राणाला

---

१ आसं प्रथममेवाहं वर्तामि च सुरेश्वराः।
भविष्यामि च लोकेऽस्मिन्मत्तो नान्योऽस्ति कश्चन ॥११॥
व्यतिरिक्तं च मत्तोऽस्ति नान्यत्किंचित्सुरेश्वराः।
नित्योऽनित्योऽहमनघो ब्रह्मणां ब्रह्मणस्पतिः ॥१२॥
मय्येव सकलं जातं मयि सर्वं प्रतिष्ठितम्।
मयि सर्वं लयं याति तद्ब्रह्माद्वयमस्म्यहम् ॥१४॥ शिवगीता, अ. ६.

आग्नि व अंतर्गतिशील प्राणशक्तीला सोम अशा संज्ञा आहेत. यांतील पहिले तीन पदार्थमात्राचे हृद्य किंवा अतर्यामी असून शेवटचे दोन बहिश्चर पिंडास व्यापून राहाणारे सूत्रात्मारूप मानतात. वस्तुतः अग्नि आणि सोम, विकास आणि संकोच, केन्द्रत्यागी व केन्द्रगामी हे शक्तिविशेष उत्क्रांति-तत्त्वाचेच अंगभूत आहेत. या तिहींमिळून महेश्वरशिवाचें किंवा त्र्यंबकाचें रूप सिद्ध होतें. हे प्राणशक्तिविशेष सापेक्ष आहेत. एकाचा विसर्ग तो दुसऱ्याचा आदान असतो. आपण अन्न खातों, यांत अन्नाची गति व आपल्या ठिकाणीं त्याची आगति होते. व त्यामुळेच संकोच-विकासात्मक प्राणस्पंदरूप आपली स्थिति असते. वरील विवेचनातील प्राण, अग्नि, सोम हे शक्तिवाचक शब्द आहेत. द्रव्यवाचक नाहींत. या सर्व शक्तींनीं युक्त शक्तिमान् तोच शिव होय.

**सशक्तिक शिवाचें यथार्थ स्वरूप :—** वर केलेल्या एकंदर विवेचनावरून वाचकांच्या लक्षांत येईल कीं, शिव शब्दानें शास्त्रानें वस्तुतः परब्रह्माचाच निर्देश केला आहे. शिव हीच जिवाची परमगति होय. सदानंद हें शिवाचेंच स्वरूप होय. मायोपहित *शिवस्वरूपाला सगुण* व *मायोपाधिशून्य रूपाला* निर्गुण म्हणतात. शिवप्रकृतीचा स्वीकार करतो, तेव्हां त्याच्यापासून एक अनिर्वचनीय महाशक्ति निर्माण होते, तीच सृष्टीचें उपादानकारण होय. *या शक्तियुक्त शिवापासूनच नाद अथवा महत्तत्त्व व त्यापासून अहंकार* किंवा बिंदूची उत्पत्ति होते. या अविनाभूत युगलापासूनच जगाची उत्पत्ति होते. वर जो बिंदु सांगितला त्याच्या गुणभेदानें तीन अवस्था होतात. त्या तीन अवस्था पुन्हां एकत्र होतात. तेव्हा त्यास परमबिंदु म्हणतात. हाच परमशिव सत्त्वगुणाचे उपाधीनें चिन्मय पुरुष, तमोगुणामुळें प्रकृति, व रजोगुणामुळें शिवशक्तियुक्त प्रतीत होतो. या तीन भावांसच ज्ञान, इच्छा क्रिया, या संज्ञा आहेत. यांस गौरी, ब्राह्मी व वैष्णवी शक्ति म्हणतात.

**शिवयोग**—या तीन शक्तींच्या अधीश्वराचे अभेदरूपास महेश्वर ही संज्ञा आहे. याचाच प्रणव हा दुसरा संकेत आहे. प्रणवाची अकार, उकार, मकार,

---

१ मूलतो ब्रह्मरूपाय मध्यतो विष्णुरूपिणे । अग्रतः शिवरूपाय अश्वत्थाय नमो नमः ॥

२ कल्याण शिवांक पृ. २८५

नाद, बिंदु, कला व कलातीत अशीं सात अंगें आहेत. हींच शिवाचीं अनुक्रमें तत्पुरुष, अघोर, सद्योजात, वामदेव, ईश्वर, नीलकंठ, कलातीत चैतन्य याप्रमाणें सात मुखें होत. या सात मुखांस ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर, महेश्वर, परशिव व महामहेश्वर अशीं नांवें आहेत. शिवाचें प्राणस्वरूप सूर्य, मनःस्वरूप चंद्र व बुद्धिस्वरूप अग्नि आहे. हा सप्तमुखी शिवच जगद्गुरुरूप धारण करून मुक्तिप्रद योगमार्गांचा व सप्ताम्नायांचा प्रकाश करतो. या सात आम्नायाचें ज्ञेय = ( १ ) प्रकृति = ( कुंडलिनी योग्य मंत्रयोग व हठयोग ) ( २ ) परमात्मा = ( भक्तियोग किंवा लय योग ) ( ३ ) काल = ( क्रियायोग किंवा लक्ष्य योग ) ( ४ ) विज्ञान = ( ज्ञानयोग ) ( ५ ) शून्य = ( परायोग किंवा संन्यास ) ( ६ ) ब्रह्म = ( शांभवी विद्या किंवा अमनस्कयोग, ) ( ७ ) परमब्रह्म = ( सहज, किंवा मोक्षयोग ) याप्रमाणें आहे.

**अष्टमूर्ति**—हाच शिव पृथ्वी, आप, तेज, वायु, आकाश, मन, बुद्धि, अहंकार या अष्टमूर्तींना धारण करून जीवाचें प्रतिपालन करतो. पिंडांतर्गत अस्थि याच त्याच्या माला होत. ब्रह्माग्नीनें जळून गेलेल्या वासनांचें भस्म हेंच त्याचें भूषण होय. तीन शरीरांची अभिमानशून्यता हेंच स्वरूप त्रिपुरारीचें होय. ज्या महाशून्यांत आत्मा प्रतिष्ठित आहे, तेंच त्याचें महास्मशान होय. पृथ्वीतत्त्वापासून आकाशतत्त्वापर्यंत जीवभाव आणि देवभाव आहे. पुढें अलिंगरूप महास्मशान आहे.

**जगत् जगदीशसंबंध** :—वैज्ञानिक दृष्टीनें ईश्वराचा म्हणजे सगुण किंवा सशक्तिक शिवाचा जगताशीं सहा प्रकारचा संबंध आहे : ( १ ) जगतांत ईश्वर आहे. ( २ ) ईश्वराच्या ठिकाणीं जगत आहे. ( ३ ) जगत् ईश्वरच आहे. ( ४ ) जगत् आणि ईश्वर भिन्न भिन्न आहेत. ईश्वर जगताहून वेगळा आहे. ( ५ ) ईश्वर जगतातीत असला तरी जगत् ईश्वरातीत नाहीं. ( ६ ) जगत् अनिर्वचनीय म्हणजे ईश्वराशीं भिन्नतेहून व अभिन्नतेहून अथवा सताहून, आणि असताहून वेगळें आहे. ( भ. गीता. ६।३०, ७।७, २५, ८।२०, ९।४, ५. )

**पाश, पशु आणि पशुपति** :—या वैज्ञानिक शिवरूपाचे आत्मा, प्राण आणि पशु, किंवा अव्यय, अक्षर आणि क्षर, किंवा पशुपति, पाश व

म्हणून रुद्राध्यायांत प्रार्थना करतात व शिवरुद्राची पूजा–उपासना करतात. तारामंडळाशीं संबंध असणाऱ्या रुद्राच्या कथा आधिदैविक समजाव्या. दक्षयज्ञाची कथा, नक्षत्रांची गणना कृत्तिकेपासून होती तीं अश्विनी (मेष) पासून करूं लागले यावर आधारलेली मानतात. आश्लेषा नक्षत्रावर सूर्य असतां रोगोत्पत्ति होते. मघा नक्षत्रावर सूर्य असतां रोगनाश होतो. सूर्य हें रुद्राचेंच स्वरूप आहे. सविताहरः। ऋ. १०।१५८।२. रुद्रप्राण असंख्य मानले आहेत. त्यांचेंच वर्णन रुद्राध्यायांत आलें आहे. ज्याला पाश्चात्य वैद्यक रोगजंतु म्हणतात, ते विकृत वायुप्रविष्ट रुद्रप्राण होत.

पृथ्वीपासून सूर्यापर्यंत पार्थिवाग्निरूप रुद्रसत्ता आहे. त्यापुढें परमेष्ठि मंडळांत सोमसत्ता आहे. सोम (स+उमा) तीच शक्ति. दोहोंमिळून अग्नीषोमात्मक जगत् निर्माण होतें. (कालाग्निरूप रुद्र खालीं व सोमशक्ति त्याच्यावर विराजमान आहे. (कालीदेवीची मूर्ति अशीच असते.) ज्ञानरूप शिव निष्क्रिय आहे. क्रियात्मक शक्ति त्याच्या वक्षस्थळावर तांडवनृत्य (सृष्ट्युत्पादकरूप) करीत आहे. ईश्वराचें म्हणजे शिवरुद्राचें जें विश्वात्मकरूप त्यास विश्वेश्वर म्हणतात. ("एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्व व्यापी सर्वभूतांतरात्मा. श्वे० ६।११") तृतीय नेत्ररूप अग्नि ज्याचें मस्तक, चंद्रसूर्य नेत्र, दिशा श्रोत्र, वेद वाणी, विश्वव्यापी वायु, हृदयांतील प्राण, पृथिवी पादरूप असा हा भूतांतरात्मा शिव आहे. (मुं. २।१।४.) परमेष्ठि मंडळाच्या वरचें व खालचें दोन्ही मंडळें श्वेत आहेत. श्वेत हा वर्ण स्वाभाविक आहे. यात सर्व वर्ण अंतर्निहित असतात. तो प्रकाशरूप–ज्ञानरूप आहे. यास्तव शिवाचा श्वेतवर्ण किंवा गौरवर्ण मानला आहे. विभूतिवर्ण श्वेत आहे.

**दुर्विज्ञेय सगुणता**—सशक्तिक शिवतत्त्व म्हणजे चंचल अथवा सक्रिय ब्रह्म होय. या सक्रिय ब्रह्माचे निर्गुण निराकार, सगुण निराकार, सगुण साकार सगुण मानवदेहसदृशस्वरूप, पुरुषविध, अपुरुषविध, मन्त्रमहेश्वर, मन्त्रेश्वर, विद्येश्वर, रुद्रस्वरूप असे किती तरी दुर्विज्ञेय प्रकार आहेत. सरूप देहाकार शिवपार्वतीच्या लीला पुराणांत पुष्कळच वर्णन केल्या आहेत. श्री. भट्ट भास्कर यांनी आपल्या रुद्र भाष्यांत शिवाच्या विचित्र चरित्रांतील कांहीं विचित्र नमुने दिले आहेत. ते मीं मागील खंडाच्या १४ व्या प्रकरणांत सांगितलेच आहेत. तसेंच भट्ट भास्करांनीं त्याच भाष्यात जीं अनेक कामनिक अनुष्ठानें

पशु हे अश आहेत. सर्व चराचर संसारवश असल्यामुळें त्यास पशु म्हणतात. भगवान् रुद्र हा त्याचा पशुपति होय. पति याचा अर्थ स्वामी, नियामक किंवा पतितपावन असा होतो. रुद्राध्यायांतील स्तेनांचा पति अशा शब्दप्रयोगांत पतितपावन हा अर्थ अभिप्रेत दिसतो. तसेंच क्षर = (जीव जगत्); अक्षर = (ईश्वर किंवा प्रकृति) अव्यय = (जन्यजनकभावात्मक परमेश्वर) या तिन्ही पुरुषांच्या जो अतीत त्यास परमशिव म्हणतात. अव्ययाच्या पाच कलांनुरूप आनंदमय शिवाला मृत्युंजय, विज्ञानमयाला दक्षिणामूर्ति, मनोमयाला कामेश्वर, प्राणमयाला नीललोहित पशुपति, आणि वाङ्मय-शिवाला भूतेश अष्टमूर्ति म्हणतात. पशुपति, पाश आणि पशु ही शैवतत्त्व-ज्ञानांतील ज्ञानाची एक प्रक्रिया किंवा श्रेणी आहे. याप्रमाणें सूर्याच्या ठिकाणींच पशुपतीची धारणा केल्यास सूर्यरश्मि हे पाश आणि पृथ्वी, चंद्रमादि पशु समजावे. तात्पर्य, नियामक म्हणजे पशुपति, नियम्य ते विकार किंवा पशु व नियमनाचें साधन तो पाश समजावा. ही त्रिविधता समजुतीकरतां आहे. मुळांत एकच तत्त्व आहे. त्यासच परमशिव म्हणावें.

मूर्तिमय शिवाला अक्षर अथवा ईश्वर मानलें कीं, त्याच्या ठिकाणीं गति, (इंद्र म्हणजेच महेश) आगति, (विष्णु), प्रतिष्ठा (ब्रह्मा) या तीन सशक्तिक देवता अंतर्निहित मानाव्या लागतात. अथवा अग्निरूप शिव यांतील अग्नि आणि सोम हीं बहिःक्षर तत्त्वें ; बाकीचीं तीन अंतःक्षर होत.

वैदिक इंद्रालाच पुराणोक्त शिव हें नांव वैज्ञानिक देतात. महेश्वर या तत्त्वात गति (इंद्र), संकोच (सोम) आणि विकास (अग्नि) हीं तीन तत्त्वें येतात. कोणी यांसच त्र्यंबक म्हणतात. हे तत्त्वभेद किंवा शक्तिभेद समजुतीकरतां केले जातात. अग्नितत्त्व व प्राणतत्त्व हे रुद्रतत्त्वाचेच पर्याय आहेत. तसेंच "एका मूर्तिस्त्रयो देवा ब्रह्माविष्णुमहेश्वराः।" हेंहि सत्यच आहे. शिवतत्त्व सर्वसमावेशक आहे.

शिव घोररूपें—पृथ्वी व सूर्य यांच्यामधील अंतरिक्षात आग्नेय वायु असतो. तो बहुधा उपद्रावक असतो. त्याला रुद्र म्हणतात. तोच भौतिक वायु म्हणजे मरुत् व भौतिक अग्नि यांचा उत्पादक आहे. सूर्याच्यावर परमेष्ठि मंडलापर्यंत सौम्य वायु असतो. त्याला सांबसदाशिव म्हणतात. "अग्निर्वा रुद्रः तस्यैते द्वेतन्वौ घोरान्या च शिवान्या च।" घोररुद्रापासून बचाव व्हावा

म्हणून रुद्राध्यायात प्रार्थना करतात व शिवरुद्राची पूजा-उपासना करतात. तारामंडळाशीं संबंध असणाऱ्या रुद्राच्या कथा आधिदैविक समजाव्या. दक्षयज्ञाची कथा, नक्षत्रांची गणना कृत्तिकेपासून होती ती अश्विनी (मेष) पासून करूं लागले यावर आधारलेली मानतात. आश्लेषा नक्षत्रावर सूर्य असतां रोगोत्पत्ति होते. मघा नक्षत्रावर सूर्य असता रोगनाश होतो. सूर्य हें रुद्राचेंच स्वरूप आहे. सविताहरः। ऋ. १०।१५८।२. रुद्रप्राण असंख्य मानले आहेत. त्याचेंच वर्णन रुद्राध्यायांत आलें आहे. ज्याला पाश्चात्य वैद्यक रोगजंतु म्हणतात, ते विकृत वायुप्रविष्ट रुद्रप्राण होत.

पृथ्वीपासून सूर्यापर्यंत पार्थिवाग्निरूप रुद्रसत्ता आहे. त्यापुढें परमेष्ठि मंडळांत सोमसत्ता आहे. सोम (स+उमा) तीच शक्ति. दोहोंमिळून अग्निषोमात्मक जगत् निर्माण होतें. (कालाग्निरूप रुद्र खालीं व सोमशक्ति त्याच्यावर विराजमान आहे. (कालीदेवीची मूर्ति अशीच असते.) ज्ञानरूप शिव निष्क्रिय आहे. क्रियात्मक शक्ति त्याच्या वक्षस्थळावर तांडवनृत्य (सृष्ट्युत्पादकरूप) करीत आहे. ईश्वराचें म्हणजे शिवरुद्राचें जें विश्वात्मकरूप त्यास विश्वेश्वर म्हणतात. ("एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वं व्यापी सर्वभूतांतरात्मा. श्वे० ६।११") तृतीय नेत्ररूप अग्नि ज्याचें मस्तक, चंद्रसूर्य नेत्र, दिशा श्रोत्र, वेद वाणी, विश्वव्यापी वायु, हृदयांतील प्राण, पृथिवी पादरूप असा हा भूतांतरात्मा शिव आहे. (मुं. २।१।४.) परमेष्ठि मंडळाच्या वरचें व खालचें दोन्ही मंडळें श्वेत आहेत. श्वेत हा वर्ण स्वाभाविक आहे. यात सर्व वर्ण अंतर्निहित असतात. तो प्रकाशरूप-ज्ञानरूप आहे. यास्तव शिवाचा श्वेतवर्ण किंवा गौरवर्ण मानला आहे. विभूतिवर्ण श्वेत आहे.

**दुर्विज्ञेय सगुणता**—सशक्तिक शिवतत्त्व म्हणजे शबल अथवा सक्रिय ब्रह्म होय. या सक्रिय ब्रह्माचे निर्गुण निराकार, सगुण निराकार, सगुण साकार सगुण मानवदेहसदृशस्वरूप, पुरुषविध, अपुरुषविध, मन्त्रमहेश्वर, मनेश्वर, विद्येश्वर, रुद्रस्वरूप असे किती तरी दुर्विज्ञेय प्रकार आहेत. सरूप देहाकार शिवपार्वतीच्या लीला पुराणांत पुष्कळच वर्णन केल्या आहेत. श्री. भट्ट भास्कर यानीं आपल्या रुद्र भाष्यात शिवाच्या विचित्र चरित्रातील कांहीं विचित्र नमुने दिले आहेत. ते मीं मागील खंडाच्या १४ व्या प्रकरणांत सांगितलेच आहेत. तसेंच भट्ट भास्करानीं त्याच भाष्यात जीं अनेक कामनिक अनुष्ठानें

सांगितलीं आहेत, त्यांत शिवाचीं निरानिराळीं ध्यानें सांगितलीं आहेत. बर्फ आणि *वाफ हे जसे जलतत्त्वाचेच दोन पर्याय अत्यंत भिन्न वाटतात, त्याप्रमाणेंच* शिवाचीं अत्यत भिन्न तात्त्विक व व्यावहारिक स्वरूपें असावींत असें दिसतें. शिवाच्या सगुणलीलाच्या वर्णनांत भूतार्थवाद कोणता व लाक्षणिक वर्णन कोणतें, *हें निश्चयानें ठरविण्यास खास पुराणांत किंवा त्यावरील टीकांत* जरूर ते निर्देश आढळत नाहींत. यामुळें सान्याच शिवलीला लाक्षणिक मानणें हें कोणास जास्त सुसंगत व सयुक्तिक वाटेल. कोणी असें *मानतात कीं, श्रीमद्भागवतांत पुरंजन कथा हें रूपक असल्याचें सांगितलें* आहे. त्याप्रमाणें रासक्रीडा हें आध्यात्मिक रूपक असल्याचें सांगितलें नाहीं. त्या अर्थीं तो भूतार्थवादच मानावा लागतो. त्याप्रमाणें शिवलीलांना भूतार्थवाद मानणेंच भाग आहे. पण शिवाच्या *दिव्य लीलांचें आपण आजच्या लौकिक* दृष्टीनें निरीक्षण व परीक्षण करूं पाहणें योग्य नाहीं. या शिवलिंगोपासना ग्रंथांत ज्या शिवकथाप्रसंगांचें जास्त महत्त्व आहे, त्या शिवलिंगपूजारंभकथा भूतार्थवाद मानणें म्हणजे त्यांतील उत्तानार्थाप्रमाणेंच सत्य घटना झाल्या असें मानणें हें मला तरी फार अयुक्तिक वाटतें. याचीं कांहीं उदाहरणें मागील चिकित्साखंडांत ७-८ प्रकरणांत दिलींच आहेत. त्याच संबंधीं आणखी एक संदर्भग्रंथ सांगावयाचा तर तो त्रिपुरारहस्य माहात्म्य खंड, अ० ४४-४५ हा सांगतां येईल. यांत महादेवाला व पार्वतीला संतान होणें शक्य नाहीं. कारण त्या उभयतांस तसे शाप आहेत, असें पार्वती इंद्राला लौकिक अथवा स्थूल व्यावहारिक मापँत सांगत आहे व त्यांतच दारुक वनातील महान् तापसी ऋषींनीं, त्यांच्या स्त्रियांना शिवानें भ्रष्ट केलें म्हणून, शिवास, "तुझें लिंग गळून पडो!" असा शाप दिल्याचें आख्यान इतर पुराणांहून बरेंच वेगळ्या प्रकारचें सांगितलें आहे. *ती सारी हकीकत अक्षरशः तशीच घडलेली* साचंत सत्यकथा मानणें मला तरी कठिणच वाटतें. पण आश्चर्य हें कीं, ती कथा लाक्षणिक समजावी, असें त्या ग्रंथाची भूमिका लिहिणारे विद्वान् पंडित आपल्या भूमिकेंत म्हणत नाहींत. तसेंच महाभारताच्या सौप्तिक *पर्वांतील पूर्वी ( खंड २, प्रकरण ८ यांत ) दिलेल्या आख्यानांतहि टीकाकार* नीळकंठ ती कथा लाक्षणिक आहे, असें सांगत नाहींत.

**परोक्ष वर्णन**—"परोक्षप्रिय हि देवाः प्रत्यक्षद्विषः।" हें वचन बृहदारण्यकांत प्र. ४।२।२ व ऐतरेय उपनिषदात ३।१४ यात इद्रासंबधीं प्रासंगिक आलें आहे पण तें वचन आपल्या वैदिक व पौराणिक सर्व वाङ्मयास लावावें असें तेथें कोठें सांगितलें नाहीं. पण इंडो-आर्यन मॉयथॉलजीचे विद्वान्, मार्मिक लेखक त्या वचनाचा आधार घेऊन बहुतेक सारें वैदिक व पौराणिक वाङ्मय अध्यात्मपर लाक्षणिक आहे असें सिद्ध करूं पाहतात. त्याचप्रमाणें प्रिन्सिपॉल थडाणी यांचें मिस्टरीज ऑफ महाभारत या बृहद् ग्रंथांत, तसेंच दी परमनंट हिस्टरी ऑफ भारतवर्ष या तिसऱ्या ग्रंथात हीं वैदिक व पौराणिक वर्णनें भूतार्थवाद मानणें असंबद्ध आहे, तीं तशीं नसून तत्त्वज्ञानाचे पंथभेद, मतभेद व यौगिक विविध अनुभव यांचीं लाक्षणिक वर्णनें आहेत, असें सिद्ध केलें आहे. माझा स्वतःचा कल विशेषेंकरून शिवलिंगपूजात्मक कथा भूतार्थवाद मानण्याकडे नसल्यामुळें व हा ग्रंथ शिवलिंगोपासनेचा असल्यामुळें सरूप शिवाच्या इतर विलक्षण सगुण कथांचा विचार मीं या ग्रंथांत फारसा केला नाहीं व त्याच कारणास्तव या अगोदरच अति क्लिष्ट झालेल्या प्रकरणाचा अधिक विस्तार करणें मला अप्रस्तुत वाटतें.

**स्वरूप व तटस्थ लक्षण**—परासंवित् हें परमशिव तत्त्व आहे. या संविदेचे ठिकाणीं एकोऽहम् बहुस्याम् ही जी आद्य स्फूर्ति झाल्याचें सृष्टिचिंतकानीं मानलें आहे, त्या आद्य स्फूर्तीतून नामरूपकर्मात्मक उत्पत्तीची, क्षणिक टिकणारी व दीर्घ काळ टिकणारी अशीं अनेक स्थूल सूक्ष्मरूपें उद्भूत झाल्याचें शास्त्रकारानीं मानलें आहे. हीं सारीं सशक्तिक म्हणजे आद्य स्फूर्तियुक्त शिवाचींच अनेक रूपें आहेत. याप्रमाणें शिवाचें सगुणरूप ब्रह्माण्डव्यापी आहे. त्याचें यथार्थ व समग्र वर्णन अगर आकलन कोणी करूं शकणार नाहीं. भक्ताला आपलें उपास्य आपणाप्रमाणें सावयव देहाकार असावें असें वाटतें व त्याप्रमाणें ईश्वर आपण देहाकार असल्याचें भक्तास दाखवितो हें खरेंच आहे. यासच सगुण साक्षात्कार म्हणतात. पण यावर निर्गुणोपासकाचें असें म्हणणें दिसतें कीं, भाविक भक्तांच्या भावराज्यांतील हा शिवभक्तविलास दिव्य असला तरी त्यास सत्य व शाश्वतरूप नसतें. नटानें अंगीकारलेली भूमिका हें कांहीं त्याचें नित्याचें स्वाभाविक स्वरूप नसतें. हात होरपळून काढणारी अत्युष्ण वाफ व हात बधिर करणारे बर्फाचे कठिण तुकडे हीं कांहीं जलाचीं

नित्याचीं स्वरूपलक्षणें नव्हत. तीं आगंतुक लक्षणें आहेत. ईश्वराच्या अवतार मूर्ति, विभूति व अन्य सावयव देहाकार आविर्भाव यांची भक्ति अथवा उपासना आणि शिवलिंगोपासना यांत जर भेद मानावयाचा असेल तर तो असा मानता येईल कीं, शिवलिंगोपासकानें ब्रह्माच्या तटस्थ अथवा आगंतुक लक्षणाची धारणा शिवलिंगाच्या ठिकाणीं न करता शक्यतों ब्रह्माच्या स्वरूप लक्षणाची किंवा तत्सदृश तात्त्विक धारणा करावी. शिवाची प्रतिमापूजा करूं नये, लिंगप्रतीकांतच पूजा करावी, असा निर्बंध घालणाऱ्या शास्त्रकारांचा असाच हेतु दिसतो. परंतु केवळ सच्चिदानंद या स्वरूप-लक्षणांची भावना शिवलिंगाच्या ठिकाणीं करणें ज्यास अवघड वाटेल त्यांनीं "सगुणाचेनि आधारें निर्गुण पाविजे निर्धारें।" या धोरणानें शास्त्रकारांनीं जीं अनेक शिवध्यानें सांगितलीं आहेत, त्याप्रमाणें भावना करावी. शिवलिंगोपासना कर्तव्य आहे. शास्त्रकारांच्या या अनेक सगुणध्यानांत काय रहस्य असेल तें निश्चित सांगतां येणार नाहीं ; पण पुढील सद्भावशतक या प्रकरणांत वाचकांस शिवलिंगासंबंधीं ज्या भावना आढळतील त्याप्रमाणें कांहीं युक्तिवाद त्या सगुणध्यानांत पण असेल.

मागें या ग्रंथाच्या पृ. ५६ ते ५९ यांवर शिवाच्या सगुण देहाकारमूर्तीचा सविस्तर विचार केलाच आहे. "सगुणाचे नि आधारें। निर्गुण पाविजे निर्धारें ॥" हेंच उपासनेचें रहस्य दिसतें. सगुणाचें स्वतंत्र अगत्य मानावयास नको. शुद्ध काय व शबल काय तें जाणलें पाहिजे. तुकोबारायांसारख्या सगुण-साकार विठलाच्या भक्तांस "विठोबा भेटला निराकार।" असा साक्षात्कार झाला.

मूल जन्माला येतें तें शुद्ध नागवें, उघडें व निरावरणच असतें. त्याला मग सावकाश अनेक वस्त्राभरणें घालून नटवण्याची आपली हौस आई पुरविते.. याप्रमाणें महामायेच्या पोटीं ब्रह्मप्रतिबिंबरूप ईश्वरस्वरूप प्रगट झालें तें असेंच निर्गुण, निराकार व निरावरण असेल. पण पुढें गुणमायेनें त्याला असंख्य गुणोपाधींत घालून विविधतेनें जीवांच्या प्रत्ययाला आणलें. समुद्रावरील लाटांना जशी मोजदाद नाहीं, त्याप्रमाणें मायेनें शिवावर याप्रमाणें आवरण घातलेल्या नामरूपकर्मांची गणतिच नाहीं. हें पाहून प्राचीन वाङ्मय आधिभौतिक, आधिदैविक, आधियाज्ञिक व आध्यात्मिक दृष्टींनीं लिहिलें गेलें.

पण प्राचीन ग्रंथांतील प्रत्येक वर्णन या चारी दृष्टींनीं लिहिलें असेल असें वाटत नाहीं. टीकाकारांनीं तसा खुलासा कोठेंच केला नाहीं. तरीपण प्राचीन शिवलीलांचा आध्यात्मिक अर्थ लावण्याच्या प्रयत्नांत, त्या लीलांची आधिदैविक व आधिभौतिक सत्यता नाकारलीच पाहिजे असें वाटत नाहीं. उदाहरणार्थ, महाकारणशरीराची आध्यात्मिक सत्यता स्थूल शरीराच्या व्यावहारिक सत्यतेला बाध आणीत नाहीं. द्रष्टा आणि दृश्य यांच्यासंबंधीं जाणिवेच्या निरनिराळ्या पातळ्या मानल्या, म्हणजे शिवलीलांच्या आधिभौतिक व आधिदैविक वास्तविकतेला त्यांचें आध्यात्मिक रहस्य काढल्यानें बाध येणार नाहीं. पण जेथें बुद्धिपुरस्सरच लाक्षणिक भाषा वापरलेली दिसते तेथें त्या लीलांचा उत्तानार्थ खरा मानावा असा ग्रंथकर्त्यांचा हेतु दिसत नाहीं. इतकेंच नव्हे तर शिवलीलांच्या उत्तानार्थ अत्यंत अयुक्तिक व असंबद्ध असा असतो, तेव्हांच जहद्‌जहल्लक्षणेप्रमाणें तो वाच्यार्थ टाकावा अशीच ग्रंथकर्त्यांची गर्भित सूचना मानणें रास्त होईल. शिवाय वरील दृष्टांतांतील बालकाचें निरावरणरूप हेंच खरें स्वरूप असतें. त्याचप्रमाणें अध्यात्म हेंच खरें स्वरूप मानावें लागतें.

**अध्यात्मदृष्टि**—सारांश, सारीं पुराणें अध्यात्माचेंच उपबृंहण करण्याकरितांच ज्या अर्थी लिहिलीं आहेत त्या अर्थी पुराणोक्त शिवलिंगातहि अध्यात्मिक रहस्यच शोधलें पाहिजे. अध्यात्मिक रहस्य शोधण्याचें आरंभस्थान पिण्डान्तर्गत आत्मलिंग हें आहे. त्याचप्रमाणें बाह्य ब्रह्मांडांतील शिवलिंगें मानलीं पाहिजेत. मग त्यांच्या माहात्म्यकथा आधिदैविक, आधियाज्ञिक किंवा आधिभौतिक जगाशीं कशाहि निगडित असोत. त्या जीव-शिवैक्याच्या अथवा ब्रह्मात्मैक्याच्याच सेतुरूप मानणें योग्य वाटतें. बहिरंगसाधनांत त्याचें महत्त्व असो, अंतरंगसाधनात त्यांचें तितकेंसें महत्त्व उरत नाहीं. याहि कारणास्तव मी या प्रकरणात शिवाच्या निर्गुणरूपापेक्षाहि अधिक दुर्विज्ञेय अशा सगुणरूपाचा व लीलांचा विचार अधिक करीत नाहीं.

चरितानि विचित्राणि गुह्यानि गहनानि च ।
ब्रह्मादीनां च सर्वेषां दुर्विज्ञेयोऽसि शंकर ॥[1]

---

१ श्रीनरहरिस्वामीकृत बोधसार पद्य.

# प्रकरण १०

## —योग—



" योगश्चित्तवृत्तिनिरोधः ॥ १।२
तदा द्रष्टुः स्वरूपेऽवस्थानम्। १।३

योगसूत्रें

परजीवात्मनोरेव मेलनं योग उच्यते ॥
मानवः शिवयोगेन शिवो भवति केवलम् ॥

शैवधर्माचें योग हें वैशिष्ट्य आहे. " तूं सांख्य व योगीहि आहेस " असें उपमन्यु शिवस्तुतींत म्हणतो. ( म. भा. अनु. १४ ) उपासनेचा प्राण भक्ति व शरीर योग असें म्हणतात. भगवद्गीतेंत प्रत्येक अध्यायाला योग म्हटलें आहे. सर्व साधनांचें सार मनोनिग्रह हें आहे. म्हणजे वृत्तिनिरोधात्मक आहे. आचाररूप कर्मयोग मनोनिग्रहाकरतांच सांगितला आहे. सूक्ष्म विषयांच्या निग्रहाकरितां भक्तियोग सांगितला आहे व अतिसूक्ष्म अशा वासनात्मक विषयांच्या निरोधाकरतां ज्ञानयोग सांगितला आहे. व्यतिरेक पद्धतीनें व अंतर्मुखवृत्तीनें आत्मतत्त्व जाणावें हा राजयोगाचा विषय दिसतो. जीव-शिवैक्य म्हणजे ब्रह्मात्मैक्य सिद्धान्त सांगणाऱ्या तत्त्वमसि या महावाक्यांतील तत्पदवाच्य ईश्वराचा अनुभव भक्तियोगांत आहे. त्वम्पदवाच्य जीवा-त्म्याचा अनुभव राजयोगांत आहे व असि पदाचा अनुभव ज्ञानयोगात आहे. तो अन्य वृत्तिनिरोधानेंच आहे.

सुख हें जीवाचें परम ध्येय आहे. ज्याच्याकरितां सर्व कांहीं, पण जें कोणा-करितां नाहीं, त्याला सुख म्हणावें. आत्मा हा सुखरूप आहे. कायमचें सुखी व्हावयाचें असेल तर प्रथम मनाचाच विचार करावा लागेल. " मन करारे प्रसन्न। सर्व सिद्धींचें कारण। मोक्ष अथवा बंधन। सुख समाधान इच्छा तें ॥ १ ॥ + + + साधक वाचक पंडित। श्रोते वक्ते ऐका मात ॥ नाहीं नाहीं आन दैवत। तुका म्हणे दुसरें " ॥ ४ ॥ मनाचें मूळस्वरूप चित्त आहे. तें मूळचें स्वभावतः स्वच्छ आहे. पण जन्मांतरीय कर्मवासनांनीं व रजस्त-माच्या मिश्रणानें तें मलिन होतें; तेव्हां बाह्य पदार्थांचेंहि स्वरूप आपल्या-

सारखेंच अयथार्य पाहतें व त्यातच तें गुंततें. अन्तर्यामी प्रत्यगात्म्याच्या सुखरूपतेच्या प्रत्ययाला तें अशा रीतीनें प्रत्यवायभूत होत असतें. म्हणून सात्त्विक वृत्तींनीं रजस्तमात्मक वृत्तींचा निरोध करणें ह्या चित्ताला मूळचें शुद्ध स्वरूप प्राप्त करून देण्याचा योगमार्ग भगवान् पतंजलींनीं सांगितला आहे. सांख्य आणि योग हीं जीवाच्या मनोमय व विज्ञानमय कोपाची शुद्धि करतात. अथवा त्या कोपाच्या बंधनांतून जीवाला मुक्त करितात व ज्ञानयोग आनंदमय कोपरूपकारणदेहांतूनहि जीवाला मोकळें करून त्याला त्याची परमशिवरूपता म्हणजे ब्रह्मरूपता प्रत्ययास आणून देतो.

मंत्रयोग, हठयोग, लययोग, राजयोग व शिवयोग असे योगाचे अनेक प्रकार आहेत. त्यांत "राजत्वात्सर्वयोगानां राजयोग इति स्मृतः ॥" म्हणजे राजयोग सर्वांत श्रेष्ठ आहे. मंत्रयोग, हठयोग व लययोग हे त्यास साधनरूप होतात. शिवयोग आणि राजयोग यांत म्हणण्यासारखें अंतर नाहीं. "न भेदः शिवयोगस्य राजयोगस्य तत्त्वतः ॥" या शिवयोगाचे विशेष प्रकार शिवज्ञान, शिवभक्ति, शिवध्यान, शिवव्रत व शिवपूजा असे आहेत. यांतील शिवपूजेंत बाकीच्या प्रकारांचा अंतर्भाव होतो, म्हणून शिवपूजेलाच शिवयोग म्हणतात. अशा राजयोगात्मक शिवपूजेचा उत्कृष्ट नमुना म्हणजे श्रीनरहरीस्वामींचा बोधसार हा ग्रंथ होय. शिवगीतेंत अ. १३ हा कळसाध्याय मानतात. ह्यांत सांगितलेला मोक्षयोग तसाच आहे. म्हणून राजयोग, शिवयोग व मोक्षयोग यांची त्रोटक माहिती पुढें देत आहें.

योगाचीं सामान्यतः आठ अंगें मानतात. (१) **यम**—बहिरिंद्रियांचा संयम. (२) **नियम**—अंतरिंद्रियांचा संयम. (३) **आसन**—शरिराला धैर्ययुक्त करणें. (४) **प्राणायाम**—प्राणांचा संयम. हीं बहिरंग साधनें होत. (५) **प्रत्याहार** म्हणजे बहिर्जगांतून वृत्तीला अंतर्जगताकडे खेचणें. (६) अंतर्जगताच्या एखाद्या अंशावर वृत्ति स्थिरावणें ती **धारणा.** (७) **ध्यान** म्हणजे परमात्म्याच्या सगुणनिर्गुणरूपाची ध्याता-ध्यान-ध्येय ही त्रिपुटी (८) **समाधि** म्हणजे ध्याताध्यानात समरस होऊन दोहोंचा लय ध्येयांत होणें. ह्या द्वैतभावरहित वृत्तिनिरोधाच्या अंतिम अवस्थेला **समाधि** म्हणतात.

जाबाल दर्शनाप्रमाणें (१) **यम** = अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य,

दया, आर्जव, क्षमा, धृति, मिताहार आणि शौच हे दहा यम (२) **नियम** = तप, संतोष, आस्तिक्य, दान, ईश्वरपूजन, सिद्धान्तश्रवण, लज्जा, मति, जप, व्रत हे नियम (३) **आसन** (४) **प्राणायाम** (५) **प्रत्याहार** (६) **धारणा** (७) **ध्यान** (८) **समाधि** या अष्टांगाच्या व्याख्यासंबंधीं अनेक सूक्ष्म मतभेद आहेत त्यांतील कांहीं माझें श्रीदत्तभक्तरहस्य, उत्तरार्ध, पृष्ठ ३७३–७६ यांत दिले आहेत ते पहावे. विस्तारभयास्तव ते येथें देता येत नाहींत.

हठयोगांत प्राणनिरोध मुख्य आहे. राजयोगांत चित्तवृत्तिनिरोध मुख्य आहे. इतर योगांपेक्षा राजयोग सूक्ष्म आहे. राजयोगापेक्षा वेदान्तदर्शन अधिक सूक्ष्म आहे शांकर वेदान्तदर्शन हाच या ग्रंथाचा मुख्य आधार आहे तथापि योगदर्शन हें परमार्थसाधक पुरुषार्थाचें एक महत्त्वाचें साधन आहे म्हणून त्या साधनाचें सार या खंडांतून अगदींच वगळता येत नाहीं. सामान्यतः विचार करता अहं स्वरूपांत अंतर्मुख वृत्तीनें शुद्ध आत्मप्रत्यय घेणें हें योगमार्गाचें स्वरूप असतें. याउलट द्वैतेच्या प्रत्ययांत शिवप्रत्यय घेणें हें भक्तियोगाचें रहस्य आहे.

सृष्टि, स्थिति, लयाचें कारण अंतःकरणच आहे अंतःकरण दृश्य व आत्मा द्रष्टा आहे अंतःकरणरूपी कारणदृश्याशीं जगत्‌रूपी कार्यदृश्याचा कार्यकारण-संबंध आहे दृश्याशीं द्रष्ट्याचा संबंध घडल्यामुळें सृष्टि प्रकाशित होते पण अंतःकरणाच्या वृत्तींचा जयपूर्वक केवळ द्रष्ट्याचाच प्रत्यय घेणें याला राज-योग म्हणतात. इतर योगांपेक्षा राजयोगांत विचाराला प्राधान्य आहे.

या राजयोगाचीं पंधरा अंगें थोडक्यांत पुढीलप्रमाणें आहेत :—

(१) यम–सर्व जगत् ब्रह्म आहे हें जाणून इंद्रियांचा संयम करणें.

(२) नियम – चेतनरूपी सद्भावाचें ग्रहण व जडरूपी असद्भावाचा त्याग करणें हा विचार.

(३) त्याग – चिदात्मभावाच्या अवलोकनानें प्रपंचस्वरूपाचा तिरस्कार.

(४) मौन – परब्रह्मपदाला मौन म्हणतात.

(५) देश – परमात्मभावानें व्याप्त व संसारसंबंधशून्य विजन देश.

(६) काल – अखंडानंदरूप अद्वितीय भाव.

(७) आसन – ज्या अवस्थेंत सुखानें ब्रह्मचिंतन होतें ती अवस्था.

(८) देहसाम्य – समभावापन्न ब्रह्मांत लीन होणें.

(९) दृक्स्थिति – दृष्टीला ज्ञानमयी करून समस्त प्रपंच ब्रह्ममय पाहणें.

(१०) मूलबन्ध – सर्व भूतांचें मूल व चित्तवृत्तिनिरोधास कारण याचें चिंतन.

(११) प्राणसंयमन – सर्व प्रपंचाचा बाध करणारी वृत्ति हा रेचक प्राणायाम, मी ब्रह्मरूप आहे हा भाव पूरक प्राणायाम, व निश्चल ब्रह्मभाव हा कुंभक प्राणायाम जाणावा.

(१२) प्रत्याहार – अनेक विषयांच्या ज्ञानांच्या संधींत आत्मतत्त्व पाहणें.

(१३) धारणा – जेथें जेथें मन जाईल तेथें तेथें ब्रह्मस्वरूप पाहणें.

(१४) आत्मध्यान – मी ब्रह्म आहे या सद्वृत्तीची निरालंब स्थिति.

(१५) समाधि – आपण ब्रह्मरूप आहों हें जाणून संपूर्ण वृत्तिसहित सुप्तिभावाचा त्याग. (तेजोबिंदूपनिषत्)

**तत्त्वलय**—पृथ्वी जलांत, जल अग्नींत, अग्नि वायूंत, वायु आकाशांत, अशा स्थूलभूत लयानंतर मन बुद्धींत, बुद्धि अहंकारांत, अहंकार चित्तांत, चित्त क्षेत्रज्ञांत व क्षेत्रज्ञाचा परमात्म्यांत लय करणें.

**सप्तज्ञानभूमिका**—(१) षोडश पदार्थांच्या ज्ञानद्वारां परमतत्त्वाची प्राप्ति व मला जें जाणावयाचें आहे तें मीं जाणलें हा अनुभव.

(२) धर्माधर्मनिर्णय आणि षट्पदार्थज्ञानद्वारां परमतत्त्वाचा ज्ञानलाभ. व मला ज्याचा त्याग करणें होतें त्याचा मीं त्याग केला हा अनुभव.

(३) चित्तवृत्तिनिरोधद्वारां परमतत्त्वाचा लाभ. व जी शक्ति प्राप्त करावयाची ती केली हा अनुभव.

(४) प्रकृतीच्या सम्यक् ज्ञानानें परमतत्त्वाचा साक्षात्कार व मायामोह मला नाहीं हा अनुभव.

(५) कर्माच्या प्राधान्यानें जगत् ब्रह्म आहे हें दर्शन. व जगत् ब्रह्म हा अनुभव.

(६) भक्तीच्या प्राधान्यानें ब्रह्म जगत् आहे. हें जगत् दर्शन व अनुभव.

(७) ज्ञानाच्या प्राधान्यानें मी ब्रह्मरूप आहें हें दर्शन व अनुभव.

**राजयोगांतील ध्यानें**—( १ ) मी सच्चिदानंद ब्रह्म आहें. (२) मीच दृश्याचा द्रष्टा आहें. ( ३ ) मीच संपूर्ण ब्रह्मांड आहें. या साधनाचा आरंभ धारणा-ध्यान या भूमिकेंत होऊन अखेर पर्यवसान निर्विचारसमाधींत होतें. पुढें मी ब्रह्म आहें हाहि भाव निर्विकल्प समाधींत राहात नाहीं. वितर्कानुगत, विचारानुगत हे सविचार समाधीचे व आनंदानुगत आणि अस्मितानुगत हे दोन निर्विचारसमाधीचे असे आत्मज्ञानयुक्त समाधिप्रकार आहेत. सर्वांचें पर्यवसान जीवन्मुक्तींत आहे.

मंत्रयोग, हठयोग, लययोग या इतर योगांत चित्तवृत्तींचा निरोध होऊन महाभाव, महाबोध व महालय अशा समाधि प्राप्त होतात. पण त्या ज्ञानरहित असल्यामुळें चित्तवृत्तींचा मूलोच्छेद करूं शकत नाहींत. यामुळें या तिन्हीं समाधिभावांत चित्तवृत्तींचें पुनरुत्थान होण्याचा संभव असतो. पण त्या वेळीं राजयोगाचा अभ्यास करण्याचा अधिकार प्राप्त होतो. वर राजयोगाच्या सप्तांगांचें स्वरूप सांगितलें. पुढें पुढें राजयोगी सत् आणि चित् या भावपूर्ण प्रकृतिपुरुषात्मक दोन राज्यांचा अनुभव घेऊन अनंतरूपमय प्रपंचाच्या विस्मृतीला संपादन करतात. नंतर प्रकृतीचें स्वरूप परिपूर्ण जाणल्यावर ब्रह्म, ईश आणि विराट या रूपांत अद्वितीय ब्रह्मसत्तादर्शनानें ध्यानभूमिच्या पराकाष्ठेला जाऊन पोहोंचतात. हाच उपासनेचा व वेदान्तदर्शनाचा परमसिद्धान्त होय. हे राजयोगी प्रारब्धक्षयापर्यंत जीवन्मुक्त स्थितींत राहून नंतर विदेहमुक्तीला प्राप्त होतात.

आजकाल छापखान्याच्या सोयीमुळें वेदान्त ग्रंथांचा सुकाळ झाला आहे. कांहीं वेदान्तग्रंथ कॉलेजांत शिकवलेहि जातात. पण नुसत्या वेदान्तग्रंथांच्या वाचनानें शिवबोध होणें सामान्यतः शक्य वाटत नाहीं. त्याला तीव्र प्रज्ञा किंवा श्रीसद्गुरुकृपा पाहिजे. सामान्यतः शिवबोधास योगाभ्यासाची अगदीं जरूरीच न वाटली तरी उपयुक्तता वाटतेच. योग हा शैवधर्मांतील विशेष आहे. कायाशुद्धीकरतां चरक, भाषाशुद्धीकरतां व्याकरण, व चित्तशुद्धीकरतां योग, अशीं तीन शास्त्रें भगवान् पतंजलींनीं सांगितलीं आहेत. व तीं सर्वमान्य झालीं आहेत. तथापि योगाचें तत्त्वज्ञान व शांकर वेदान्त यांत अनेक मतभेद आहेत. हा ग्रंथ ज्या नवयुगधर्ममालेंतील आहे त्या मालेंत शांकर वेदान्त प्रमाणभूत मानलेला आहे. म्हणून योग आणि शांकर वेदान्तांत यांतील कांहीं

मतभेद येथें दिग्दर्शित करतों. (१) वेदान्तांत उपमान, अर्थापत्ति व अनुपलब्धि हीं प्रमाणें मानलीं आहेत. तीं योगास मान्य नाहींत. वे० = वेद अपौरुषेय. यो० = ईश्वरकृत. यो० = ईश्वर, जीव, प्रकृतिभेद. वे० = एक ब्रह्म सत्य बाकी सर्व मिथ्या. यो० = सत्कार्यवादी. वे० = विवर्तवादी. योगी = प्रकृति उपादानकारण, ईश्वर निमित्तकारण. वे० = शबल ब्रह्म निमित्तोपादान. यो० = लयवादी. वे० = अजातिवादी. योग = दुःखनिवृत्ति. वे० = दुःखनिवृत्ति व परमानंदप्राप्ति. योग = क्रियायोग, ईश्वरप्रणिधान, प्रसंख्यान वे० = कर्मयोग, भक्तियोग, ज्ञानयोग. योग = त्रिगुणात्मक प्रकृतीपलीकडे कांहीं नाहीं. वे० = त्यापलीकडे निर्गुण माया असद्रूप मानतात. यो० = महत्तत्त्वांत रजतमप्राधान्य = चित्त. वे० = चित्त = अविद्या = एकोऽहं अहंकार. योगी = शुद्ध सत्त्वाचा स्वीकार करून जगाचा चालक ईश्वर. वे० = शुद्धसत्त्वप्रधान मायेंत प्रतिबिंबित ब्रह्म तो ईश्वर. यो० = चित्त प्रतिबिंबित चेतन = जीव. वे० = अविद्या प्रतिबिंबित ब्रह्म जीव. यो० = जाग्रत्स्वप्नसुषुप्ति चित्ताच्या अवस्था. वे० = अविद्येच्या अवस्था. योग० = संप्रज्ञात समाधि व असंप्रज्ञात समाधि. वे० = तुर्या व उन्मनी. सारांश–योगानें तत्पद व त्वंपद शुद्धि होऊन जीव, शिव हीं तत्त्वें वेदान्ताच्या स्वाधीन होतात, असें श्री. भाऊशास्त्री वझे म्हणतात. परंतु योगाच्या समाधींत आत्मप्रत्यय येईल. त्यांत भक्तियोगातील शिवसाक्षात्कार, जीवशिवैक्य, किंवा ब्रह्मात्मैक्यज्ञान साधणार नाहीं. वेदान्तातील चित्ताचें एकाग्र्य वेगळें व योगाचा चित्तवृत्तिनिरोध वेगळा असें वाटतें. भक्ताचा ईश्वरासंबधीं निदिध्यास वेगळा व योगाचा समाधि वेगळा. पहिला दुसऱ्यापेक्षां जास्त श्रेष्ठ वाटतो. योगी समाधि उतरून देहभानावर आल्यावर पुन्हा नामरूपात्मक मायेच्या मोहांत पडणें शक्य आहे.

शिवगीतेंत मोक्षयोगनामक अध्यायांत—

प्रभु रामचंद्रानें श्रीशिवगुरूना ईश्वराच्या ब्रह्मरूपाच्या शुद्ध ज्ञानाचा उपाय विचारला असतां श्रीशंकर म्हणाले, "सर्व भूताचे ठायीं विरक्ति पावून ब्रह्मलोकापर्यंत सर्व दिव्य लोक हे नश्वर आहेत, म्हणून त्यांच्या सर्वांविषयीं निरिच्छ व्हावें; पुत्र, मित्र इत्यादिकांविषयीं अनासक्ति धरावी. सर्व वेदान्तवाक्यार्थे तात्पर्य मत्परच आहे, असा (सद्गुरुबोधानें) निश्चय करावा. त्याचेंच मनन करावें. अखेर सर्वसंगपरित्याग करून अहंता व

ममता सोडून, सर्वत्र समान बुद्धि करून, शांत्यादि साधनसंपन्न होऊन निरंतर ध्यानयोगानें आत्मस्वरूपाचें ध्यान करावें. या निदिध्यासानें आत्मसाक्षात्कार होतो. "

वेदेश्वरींतील साक्षात्काराचें वर्णन— " दृढ साक्षात्काराचीं लक्षणें ऐशीं। कदापि उत्थान न व्हावें वृत्तीशीं। निदिध्यासयोगें दृढता ये तयासी। अन्यत्रीं व्यापारता ॥ ५१५ ॥ कधींच मी माझें नुपजे। कोणेही रीतीं देह असतां सहजें। तैशीच सर्व क्रिया होतां नुठिजे। अहंकर्तृत्व कीं भोक्तृत्व ॥१६॥ ध्यान करतांहि ध्यातेपणें। वेगळा न पडेचि अभिमानें। एवं त्रिविध भीषण गळतां तेणें। पुढें असंगत्व मात्र उरे ॥ १७ ॥ संशयरहित समाधान। याचि नांवें साक्षात्कार पूर्ण ॥ कोणतेही अवस्थेंन आपण। आपुलेपणें असे ॥ ५१८ ॥ " इ. वेदेश्वरी, अ. १३.

लिंगपुराणाच्या उत्तरार्धांत शेवटच्या पंचावन्नाव्या अध्यायांत योगमार्गानें महादेव त्र्यंबकाचें उपासन कसें करावें तें संक्षेपानें सांगितलें आहे. (१) मंत्रयोग, (२) स्पर्शयोग, (३) भावयोग, (४) अभावयोग आणि सर्वांत उत्तम असा (५) वा महायोग होय. (१) ध्यानस्थ होऊन मंत्रजप करणें याला मंत्रयोग म्हणतात. (२) प्राणायामाच्या योगानें शरीरांतील वायु जिंकून सुषुम्नादि नाड्यांची विशुद्धि होऊन रेत स्थिर झालें म्हणजे चित्ताची एकाग्रता करणाऱ्यास धारणात्रयाचा प्रकाश अंतःकरणांत होतो. पुढें भेदत्रयाचा विशोधक असा कुंभकद्वारां जो अभ्यास त्याला स्पर्शयोग म्हणतात. (३) मंत्रयोग व स्पर्शयोग यांच्या अतीत, बाह्य व आंतर वस्तूंवर असणारें जें स्फुरत् मन त्याचा संकोच करून केवळ महादेवाचा आश्रय करून राहणारा जो योग त्यास भावयोग म्हणतात. (४) सर्व स्थावरजंगम जगत् निरवयव झालेंसें वाटतें, सर्व निराभास व शून्य असून स्वरूपाचें चिंतन मात्र चाललेलें असतें, अशा स्थितीस अभावयोग म्हणतात. यानें चित्ताचा लय होतो. (५) निरूप, केवळ, शुद्ध, अनिर्देश्य, स्वप्रकाशक, स्वयंवेद्य, सर्वव्यापी असा स्वतःचा (आत्म्याचा) भाव ज्या स्थितींत भासमान होतो, तीच स्थिति महायोग आहे, असें समजावें. नित्योदित, स्वयंज्योति, शुद्ध, निर्मल, केवळ, असा जो शिवात्मा तोच महायोग होय. अहंबुद्धीपासून मुक्त, आकाशसदृश, आवरणरहित, अचिंत्य, प्रविलीन, स्वयंवेद्य, स्वसाक्षिक, आनंदमय असें

जें कांहीं आहे, तेंच ज्ञेय किंवा ध्येय आहे असें समजावें. धार्मिकपणा, कृतज्ञता, गुरुभक्ति, योगाची प्रीति इत्यादि गुण साधकाचे ठिकाणीं अवश्य असले पाहिजेत."

श्री नरहरिस्वामींचा राजयोगात्मक शिवपूजेचा किंचित् नमुना असा आहे'— "शिवपूजात्मकं कर्म कर्मनिर्मूलनक्षमम्। संकल्पःशिवपूजायाः सर्वसंकल्पदुःखहृत्" ॥१॥ सर्ववृत्तिरूप पुष्पांनीं सदाशिवरूप आत्मदेवाची पूजा म्हणजे ब्रह्माकारवृत्ति होय. उदाहरणार्थ, यांत अवेर जीं अक्रा बिल्वपत्रें वाहिलीं आहेत तीं अशीं आहेत : "द्रष्टा च दर्शनं दृश्यमिति पत्रत्रयान्विता। शिवे समर्प्या चिद्रूपे प्रथमा बिल्वपत्रिका ॥ १ ॥ म्हणजे या तिहींत अनुगत असणाऱ्या साक्षीचैतन्याला अर्पण असो. कर्ता कार्यं च करणमिति पत्रत्रयात्मिका। शिवे०॥२॥ भोक्ता च भोजनं भोज्यमिति पत्रत्रयात्मिका। शिवे० ॥३॥ याप्रमाणें भूर्भुवस्वः ॥४॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्ति (५) स्थूलसूक्ष्मकारण (६) अविद्या, संसार व जीव (७) *उत्पत्तिस्थितिनाश (८) ब्रह्माविष्णुरुद्र (९) तमरजसत्त्व* (१०) त्वन्ता, अहंता, इदंता (११) हीं सारीं निकें त्यांतील अनुगत शिवात्म्याला समर्पण करणें. म्हणजे शिवात्म्याहून त्या निराळ्या सत्ताच नाहींत, अशी दृढ बुद्धि धारण करणें, हीच राजयोगात्मक शिवपूजा होय.

वीरशैवाचा शिवपूजारूप योग याचा अंशतः नमुना असा—

शांति हेंच अभिषेकजल, विश्वव्यापकताभाव हें वस्त्र, इच्छा, ज्ञान, क्रियात्मक शक्तित्रय हें यज्ञोपवीत, स्वस्वरूपज्ञान हें गंधानुलेपन, अत्यधिक दया ही अक्षता, परिशुद्धभक्ति हें पुष्प, मनोबुद्धिअहंकारपरमान्तःकरणचतुष्टय हा धूप, इंद्रियगुणोत्कर्ष हा दीप, सुखदुःखरहित आत्मस्वरूप हा नैवेद्य, सत्त्वरजस्तमोगुणत्रय हा तांबूल, व प्राण हा नमस्कार, "इत्येवमाभ्यन्तर मुख्यपूजाद्रव्याणि सम्पादय शंकराय ॥" (कल्याण शिवांक).

न भेदः शिवयोग यस्य राजयोगस्य तत्त्वतः।
शिवार्थिनां तयाप्येव मुक्तो बुद्धेः प्रवृद्धये ॥

---

ममता सोडून, सर्वत्र समान बुद्धि करून, शांत्यादि साधनसंपन्न होऊन निरंतर ध्यानयोगानें आत्मस्वरूपाचें ध्यान करावें. या निदिध्यासानें आत्मसाक्षात्कार होतो."

वेदेश्वरींतील साक्षात्काराचें वर्णन— " दृढ साक्षात्काराचीं लक्षणें ऐशीं। कदापि उत्थान न व्हावें वृत्तीशीं। निदिध्यासयोगें दृढता ये तयासी। अन्यत्रीं व्यापारता ॥ ५१५ ॥ कधींच मी माझें नुपजे। कोणेही रीतीं देह असतां सहजें। तैशीच सर्व क्रिया होतां नुठिजे। अहंकर्तृत्व कीं भोक्तृत्व ॥१६॥ ध्यान करतांहि ध्यातेपणें। वेगळा न पडेचि अभिमानें। एवं त्रिविध मीपण गळतां तेणें। पुढें असंगत्व मात्र उरे ॥ १७ ॥ संशयरहित समाधान। याचि नांवें साक्षात्कार पूर्ण॥ कोणतेही अवस्थेंत आपण। आपुलेपणें असे ॥ ५१८ ॥" इ. वेदेश्वरी, अ. १३.

लिंगपुराणाच्या उत्तरार्धांत शेवटच्या पंचावन्नाव्या अध्यायांत योगमार्गानें महादेव त्र्यंबकाचें उपासन कसें करावें तें संक्षेपानें सांगितलें आहे. (१) मंत्रयोग, (२) स्पर्शयोग, (३) भावयोग, (४) अभावयोग आणि सर्वांत उत्तम असा (५) वा महायोग होय. (१) ध्यानस्थ होऊन मंत्रजप करणें याला मंत्रयोग म्हणतात. (२) प्राणायामाच्या योगानें शरीरांतील वायु जिंकून सुषुम्नादि नाड्यांची विशुद्धि होऊन रेत स्थिर झालें म्हणजे चित्ताची एकाग्रता करणाऱ्यास धारणात्रयाचा प्रकाश अंतःकरणांत होतो. पुढें भेदत्रयाचा विशोधक असा कुंभकद्वारां जो अभ्यास त्याला स्पर्शयोग म्हणतात. (३) मंत्रयोग व स्पर्शयोग यांच्या अतीत, बाह्य व आंतर वस्तूंवर असणारें जें स्फुरत् मन त्याचा संकोच करून केवळ महादेवाचा आश्रय करून राहणारा जो योग त्यास भावयोग म्हणतात. (४) सर्व स्थावरजंगम जगत् निरवयव झालेंसें वाटतें, सर्व निराभास व शून्य असून स्वरूपाचें चिंतन मात्र चाललेलें असतें, अशा स्थितीस अभावयोग म्हणतात. यानें चित्ताचा लय होतो. (५) निरूप, केवळ, शुद्ध, अनिर्देश्य, स्वप्रकाशक, स्वयंवेद्य, सर्वव्यापी असा स्वतःचा (आत्म्याचा) भाव ज्या स्थितींत भासमान होतो, तीच स्थिति महायोग आहे, असें समजावें. नित्योदित, स्वयंज्योति, शुद्ध, निर्मल, केवल, असा जो शिवात्मा तोच महायोग होय. अहंबुद्धीपासून मुक्त, आकाशसदृश, आवरणरहित, अचिंत्य, प्रविलीन, स्वयंवेद्य, स्वसाक्षिक, आनंदमय असें

जें कांहीं आहे, तेंच ज्ञेय किंवा ध्येय आहे असें समजावें. धार्मिकपणा, कृतज्ञता, गुरुभक्ति, योगाची प्रीति इत्यादि गुण साधकाचे ठिकाणीं अवश्य असले पाहिजेत."

श्री नरहरिस्वामींचा राजयोगात्मक शिवपूजेचा किंचित् नमुना असा आहे – "शिवपूजात्मकं कर्म कर्मनिर्मूलनक्षमम्। संकल्पःशिवपूजायाः सर्वसंकल्पदुःख-हृत्" ॥१॥ सर्ववृत्तिरूप पुष्पानीं सदाशिवरूप आत्मदेवाची पूजा म्हणजे ब्रह्माकारवृत्ति होय. उदाहरणार्थ, यांत अलेर जीं अकरा बिल्वपत्रें वाहिलीं आहेत तीं अशीं आहेत : "द्रष्टा च दर्शनं दृश्यमिति पत्रत्रयान्विता। शिवे समर्प्या चिद्रूपे प्रथमा बिल्वपत्रिका ॥ १ ॥ म्हणजे या तिहींत अनुगत असणाऱ्या साक्षीचैतन्याला अर्पण असो. कर्ता कार्यं च करणमिति पत्रत्रयात्मिका। शिवे०॥२॥ भोक्ता च भोजनं भोज्यमिति पत्रत्रयात्मिका। शिवे० ॥३॥ याप्रमाणें भूर्भुवस्वः ॥४॥ जाग्रत्स्वप्नसुषुप्ति (५) स्थूलसूक्ष्मकारण (६) अविद्या, संसार व जीव (७) *उत्पत्तिस्थितिनाश* (८) *ब्रह्मविष्णुरुद्र* (९) *तमरजसत्त्व* (१०) त्वन्ता, अहंता, इदंता (११) हीं सारीं त्रिकें त्यांतील अनुगत शिवात्म्याला समर्पण करणें. म्हणजे शिवात्म्याहून त्या त्रिकास सत्ताच नाहीं, अशी दृढ बुद्धि धारण करणें, हीच राजयोगात्मक शिवपूजा होय.

वीरशैवांचा शिवपूजारूप योग याचा अंशतः नमुना असा—

शांति हेंच अभिषेकजल, विश्वव्यापकतामात्र हें वस्त्र, इच्छा, ज्ञान, क्रियात्मक शक्तित्रय हें यज्ञोपवीत, स्वस्वरूपज्ञान हें गंधानुलेपन, अत्यधिक दया ही अक्षता, परिशुद्धभक्ति हें पुष्प, मनोबुद्धिअहंकारपरमान्तःकरण-चतुष्टय हा धूप, इंद्रियगुणोत्कर्ष हा दीप, सुखदुःखरहित आत्मस्वरूप हा नैवेद्य, सत्त्वरजस्तमोगुणत्रय हा तांबूल, व प्राण हा नमस्कार, "इत्येव-माभ्यन्तर मुख्यपूजाद्रव्याणि सम्पादय शंकराय ॥" (कल्याण शिवांक).

न भेदः शिवयोग यस्य राजयोगस्य तत्त्वतः।
शिवार्थिनां तयाप्येव मुक्तो बुद्धेः प्रवृद्धये ॥

———

## प्रकरण ११ वें

# पापयोनींतील भक्त[1]

मां हि पार्थ व्यपाश्रित्य येऽपि स्युः पापयोनयः ।
स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥

—गीता, ९।३२.

मन-वाचातीत तुझें हें स्वरूप ।
म्हणोनियां माप भक्ति केलें ॥ १ ॥
भक्तीचिया मापें मोजितों अनंता ।
इतरानें तत्वतां न मोजवे ॥ २ ॥
योग याग तपें देहाचिया योगें ।
ज्ञानाचिया लागें न सांपडसी ॥ ३ ॥
तुका म्हणे आम्ही भोळ्या भावें सेवा ।
घ्यावी जी केशवा करितों ऐशी ॥ ४ ॥

वरीलसारख्या भक्तिपोषक वचनांवरून भक्ति आणि तीहि आशुतोष शिवाची भक्ति, ही अगदींच अल्प व सोपी आहे असें वाटतें. पण वस्तुतः तशी ती असणें शक्यच नाहीं. स्वार्थ आणि परमार्थ यांचें गणित अत्यंत प्रमाणबद्ध आहे. फलश्रुतीच्या गुणाकारांत अथवा बेरजेंत एक रकम कमी दिसली तर दुसरी त्या मानानें मोठी असावीच लागते.

स्वानुभवी संत भक्त एकनाथ म्हणतात— तें हें राया भागवत जाण । मुख्यत्वें भक्तिप्रमाण । भावें करितां भगवद्भजन । अज्ञान जन उद्धरती ॥ १॥ स्त्रीशूद्रादि अवघे । घालूनियां ये नावें । एकेच खेपे स्वयें न्यावे । भजन भावें परतीरा ॥ २ ॥ येथें पोहणें याविण उतरणें । प्रयासें विण प्राप्ति घेणें । सुखोपायें ब्रह्म पावणें । या लागीं नारायणें प्रकाशिली भक्ति ॥ ३ ॥ अशी

---

[1] या प्रकरणाच्या मूळ हस्तलिखितांत कण्णप, शबर, शबरी, महानंदा अशा अनेक शिवभक्तांचीं चरित्रें आहेत. तीं विस्तारभयास्तव गाळावीं लागलीं.

वचनें केवळ भक्तिरोचक मानून चालणार नाहीं. तसेंच उलट यांचा वर वर दिसणारा अर्थ अक्षरशः खरा मानल्यानेंहि भलताच गैरसमज होईल. वरील सतवचनांत कर्म, ज्ञान आणि भक्ति अशा तीन रकमाचा उल्लेख आहे. अर्थात् भक्ति या परमार्थसाधनांतील कर्मज्ञानाची उणीव भरून निघेल इतका भक्तीचा भाव असलाच पाहिजे, तरच फलश्रुतीचें गणित जमेल. शिवभक्ताच्या कथा सूक्ष्म दृष्टीनें पाहिल्या म्हणजे असें दिसून येतें कीं, संपूर्ण जीवभाव हें शिवभक्तीचें माप आहे. हें माप अल्प नाहीं, सूक्ष्म आहे, खोल आहे तत्त्वतः *त्याला आकारमान नाहीं खंडोगणती कर्मरूप धान्याची बरोबरी एक तन्मय* भक्तीची हिरकणी करील. डोंगराएवढा अज्ञानाचा कापूस एक आत्यंतिक भक्तीचा स्फुल्लिंग केव्हाच जाळून टाकील. पापयोनींना मार्गदर्शन करण्याकरिता, तसेंच कर्मठ, योगी व पंडित यांचा गर्व हरण करण्याकरिता, ईश्वर पापयोनींतहि भगवद्भक्तरत्नांना कधीं कधीं जन्मास घालतो. दक्षिणेंतील नयनार हे शिवभक्त याच कोटींतील होत. त्यांच्या विक्षिप्त चरित्राकडे वर वर पाहणारास त्यांच्या शिवभक्तीची खोली व प्राणार्पणापर्यंतची निस्सीम त्यागाची तयारी यांचें यथार्थ मूल्यमापन करता येत नाहीं. वर वर पाहणारास नयनारांच्या चरित्रात अडाणीपणा, आचरटपणा किंवा आततायीपणा दिसतो पण त्यात एक निकालाबाधित तत्त्वज्ञानाचा सिद्धांत लपलेला आहे तो असा कीं, माणसाच्या ठिकाणचा स्थूलसूक्ष्म संपूर्ण देहभाव सुटला कीं त्याचें शिवसायुज्य अथवा ब्रह्मात्मैक्य स्वयंसिद्धच आहे. या महान् सत्याच्या दिग्दर्शनार्थ नमुन्याकरता एकाच शिवभक्ताचें त्रोटक चरित्र पुढें देत आहें.

**महाशिवभक्त नंद :—** प्राचीन काळ असा होता कीं, ज्या वेळीं धर्म हेंच राज्यकर्त्यांना आपलें सर्वस्व वाटे दक्षिणेंतील अत्यंत प्रेक्षणीय देवळें हें त्यांचेंच द्योतक आहे. प्राचीन देवळें हीं रावरंकांचीं, आबालवृद्धांचीं, स्त्रीपुरुषांचीं भव्य धर्मपीठें होत. या देवालयांच्या गगनचुंबित शिखरांनीं जनतेंत *पापभीरुता राखली. लोकांत धर्मप्रवणतेस उत्तेजन दिलें. स्वर्गीय शिवलोक,* गोलोक, ब्रह्मलोक या दिव्य लोकांचीं तीं ऐहिक स्मारकें बनलीं निर्गुणसगुण जगदीश्वराला त्याचे अजाण भक्त प्रथम तेथें पाहत असत व भक्तिप्रेमानें नाचत असत. शिवालयांतील सर्वत्र गाजणारा तो घंटानाद आणि शंखनाद ऐहिक अज्ञानात घोरत पडलेल्या लोकांत धर्मजागृति करीत असे. शील-

संवर्धन करणारें या जगांत धर्मावांचून दुसरें काय आहे ? पण आज तो काळ पालटला आहे आज समाजधारक अशा देवाच्या देवळाच्या ऐवजीं जनतेचा व्यर्थ जाच करणाऱ्या व त्यास परिणामीं अनीतिमान करणाऱ्या मानवी कायद्यांचीं कायदेमंडळें चोहोंकडे उभारलेलीं दिसतात सात्त्विक धर्मनीति आणि तामसी दंडनीति हीं ईशनियतीच्या आंदोलनाचीं दोन टोकें आहेत. दक्षिणेंत देवभक्तानीं आपलीं मंदिरें निर्माण केलीं, हें जसें खरें आहे, तसेंच देवळानीं अनेक देवभक्त निर्माण केले, हेंहि त्रिवार सत्य आहे महाभक्त नंद याची कथा अशाच प्रकारची आहे. हें थोड्या विचाराअंतीं कळून येईल

नंद हा तंजावर प्रांतात अधनूर नामक एका खेड्यांत जन्मला तो जन्मजात अतिशूद्र होता. मेलेलीं ढोरें ओढून न्यावीं व जळणाऱ्या माणसाच्या शवाची राखण करावी, हीं त्याचीं जन्मजात कामें होतीं तसेंच जमीनदाराची गुलामगिरी पत्करून त्याची शेती करावी, हाहि त्याच्या जातीचा व्यवसाय होता. खेड्यापासून दूर घाणेरड्या, दलदलीच्या जागेंत गवतानें शाकारलेल्या व कुडामेडीच्या अशा चंद्रमौळी झोपड्यात तो परमशिवभक्त राहात होता. सभोंवार ओढून आणलेल्या ढोराचीं कातडीं व हाडें पडलेलीं असत व तेथें येणारीं गिधाडें व कोंबडीं-कुत्रीं हीं त्याची सोबत करीत असत. बाहेर जिकडे तिकडे पाणथळ जमीन व त्यांतील नासकीं डबकीं व घरात नागवीं उघडीं, शेंबडीं-लेंबडीं पोरें व जखिणीसारख्या कच्चा कच्चा भांडणाऱ्या अर्धनग्न बाया व अठरा विश्वें दारिद्य, अशी त्याची परिस्थिति होती पुनर्जन्म न मानणारे आधुनिक, प्रत्येक मनुष्य मनाची कोरी पाटी घेऊन जन्मास येतो व जन्मानंतरच्या परिस्थितीनें त्यावर बरेवाईट संस्कार होतात, असें म्हणतात त्यातील साधकबाधक अंशाचें परीक्षण करण्यास कणप व नंद यांचीं चरित्रें फार उपयोगी पडतील. असो. अशा खतावलेल्या परिसरात नंदाच्या अंत करणात शिवभक्तीचा जोरदार अंकुर उद्भवला, हें ईश्वरी मायेचें आश्चर्य होय. पंत म्हणतात, "जरि उकिरड्यात पडला, मळला, न हिरा तथापि सामान्य ॥" सोनखतानें उत्तम अन्न पिकावें ही निसर्गाची क्रिया-प्रतिक्रिया पण चिंतनीय आहे.

नंदाचा ल्हानपणचा खेळ, म्हणजे मातीचा मला मोठा दाढीमिशाचा सदाशिव करावा. त्याच्या हातात परशु किंवा विळा द्यावा. त्याच्या मस्तकावर

मर्ले मोठें मुडासें घालावें, आपण व आपले सवंगडी यांनी अंगाला राख लावून त्याच्या समोंवर भजन करीत नाचावें, त्याची मिरवणूक काढावी, असा असे त्याचे अकरा-बारा बालमित्र होते त्यास घेऊन अनेक शिवालयाचें दर्शन घेण्यास नाचत व भजन करीत जावें व दुरूनच देवाला नमस्कार करून मोठ्या उत्साहभरानें "हर हर महादेव!" असा शिवनामाचा जयजयकार करावा, हा त्याचा आवडीचा छंद होता

एक दिवस शेतांत कांहीं काम नाहीं असें पाहून तो आपल्या बालमित्रांसह कांहीं मैलावर असलेल्या वैद्यीश्वर नामक प्रसिद्ध शिवालयाच्या दर्शनाला गेला. ते सारे अतिशूद्र व पूर्वास्पृश्य असल्यामुळें त्यांना देवळाजवळ जाण्याला बंदीच होती तरी त्या सर्वांनीं अंगाला राख लावून मोठमोठ्यानें शिवनामाचा जयजयकार करीत तीन वेळा मोठ्या आनंदभरानें गावप्रदक्षिणा करण्यांतच कृतार्थता मानली सायंकाळीं देवळाचे दरवाजे उघडले, तेव्हां त्यांनीं बरोबर आणलेले नारळ, केळीं, व देवाच्या नगाऱ्यासाठीं उत्तम कमावलेल्या कातड्याचा गठ्ठा असें सारें भावभक्तीनें पुजाऱ्याच्या स्वाधीन केलें व आपण देवाच्या निशाणकाठीपासून दूर अंतरावरून आंतलें जें कांहीं अल्प स्वल्प दिसेल तें पाहून धन्यता मानली नंदाच्या आनंदाला पारावार राहिला नाहीं. आंत घंटानाद, स्तोत्रपाठ व कर्पुरारती सुरू झाली तीं दुरूनच पाहून व ऐकून नंद आनंदानें नाचूं लागला! त्याच्या नेत्रांवाटे प्रेमाश्रु वाहूं लागले! त्याचें मन तर शिवाशीं संलग्नच होतें पण आपल्या चर्मचक्षूंना शिवलिंग दिसेल तर केवढा आनंद होईल असें त्यास वाटे. त्यासाठीं त्यानें आंतील शिवाला रस्त्यावरून अनेक साष्टांग दंडवत घातले तो जमिनीवर गडबडा लोळूं लागला व रडूं लागला! शिवालयापुढील भला मोठा नंदी आड आल्यामुळें त्याला दुरून शिवलिंग दिसेना तो म्हणाला, "हे भोला नाथ! तुझ्या दर्शनासाठीं मोठ्या उत्कंठेनें मैलचे मैल चालत आलों आणि आतां तुझें दर्शन न होतांच परत जाऊं काय? हायरे दैवा! माझें अनेक जन्मींचें पापच या नंदीच्या रूपानें आड आलें! याला काय करावें!" असें म्हणून तो स्फुदस्फुदून रडूं लागला देव हा भक्ताचा अभिमानी आहे तो भक्तीसाठींच भुकेला आहे नामदेवाच्या भक्तीसाठीं ओंढ्या नागनाथाचें सारें देऊळ फिरलें मग नंदाची दर्शनाची आतुरता कशी फुकट जाईल!

असें सांगतात कीं, श्रीशिवाच्या प्रेरणेनें क्षणार्धांत तो पाषाणमय नंदी बाजूला सरला आणि नदाला शिवलिंग दुरून स्पष्ट दिसूं लागलें. आंत आरतीचा झगझगीत प्रकाश पडलाच होता. त्या प्रकाशांत तळपणारें तें शिवलिंग पाहून नंद नाचूं लागला! त्याचें देहमान हारपलें! डोळ्यांतून प्रेमाश्रूंचा अभिषेक पृथ्वीलिंगाला होत राहिला! तो देहमानावर आल्यावर त्यानें आपल्या सवंगड्यांसह पुन्हा गांवप्रदक्षिणा घातली. ती प्रदक्षिणा घालीत असतां त्यानें पाहिलें कीं, एका घरीं पुराण सुरू होतें. तें दुरूनच तो ऐकत उभा राहिला. पुराणिकबोवा चिदंबर पुराण वाचीत होते. तें वाचतांना पुराणिकबोवा म्हणाले कीं, "चिदंबरासारखें पवित्र स्थान त्रिभुवनांत कोठेंहि नाहीं. ज्यानें एकदां चिदंबराचें दर्शन घेतलें, तो चांडाळ का असेना, तो जन्ममरणाच्या फेऱ्यांतून कायमचा सुटतो." नंतर पुराणिकबोवा चिदंबर देवस्थानाचा व तेथील चित्सभेंतील नटराजाच्या दिव्यमूर्तीचा अधिकाधिक महिमा सांगू लागले. तें ऐकून नंदाच्या मनाला चटका लागला! तो आपल्या सवंगड्यांना म्हणाला, "गडे हो, चिदंबरमूचें व नटराजाचें असें माहात्म्य आहे, तर चला आपण आतांच तिकडे जाऊं या." असें म्हणून तो नटराजाच्या दर्शनाला जाण्यासाठीं नाचूं लागला! पण त्याचे बाळगडी त्यास म्हणाले, "अरे, तूं आपल्या जमीनदाराचा ताबेदार नोकर आहेस. तुला तुझ्या मालकाच्या परवानगीवांचून दूर कसें जातां येईल?" तें म्हणणें त्यास पटलें व आपण मालकास विचारून चिदंबरास जाऊं असा त्यानें विचार केला. यानंतर ते सारे परत येण्यास निघाले असतां त्यांस देवळाजवळ एक डबकें दिसलें. तेव्हां नंदाच्या मनांत आलें कीं, हें खणून याचें आपण चांगलें तळें करूं या. म्हणजे देवळांत येणाऱ्यांना स्नानाची व पशुपक्ष्यांना चांगलें पाणी पिण्याची सोय होईल. टिटवीनें समुद्र आटवण्याचा बेत केला तसाच कांहींसा हा विचार होता. कारण ते दहाबारा जण अल्पवयी मुलगे. तावडतोब तळें तें काय खणणार! शिवाय त्यांना परत वेळेवर जाण्याची उतावळी होती. पण 'देहबुद्धया तु दासोऽहम्।' अथवा 'स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः॥ १८।४६ गीता. हें सद्भक्तांचें शील त्यांस स्वस्थ बसूं देत नाहीं. शुभस्य शीघ्रम् या न्यायानें त्यांनीं मनांत आणलेल्या कार्यास, तें आपल्या हातून तडीस कसें जाईल याचा विचार न करतां, लगेच आरंभ

केला. तो त्या शिवभक्तांचा निर्धार पाहून श्रीगणपतीनें अनेक शिवगणांस मजूरकरांच्या रूपांत त्यांच्या मदतीला पाठविलें व आश्चर्य असें कीं, कांहीं तासांत तें तळें खणून तयार झालें! तें पाहून नंदाला फार आनंद झाला. त्यानें आपल्याबरोबर आणलेलें सारें धान्य आयत्या वेळीं मदतीस धावून आलेल्या त्या अनोळखी गड्यांस दिलें व देवालयाच्या महाद्वाराचें पुन्हां एकदां प्रार्थनापूर्वक दर्शन करून तो आपल्या मित्रांसह परतला.

नंद घरीं परत आला. पण त्याला एकसारखा चिदंबरच्या नटराजाचा ध्यास लागला होता. त्याच्या अंतर्मनाला वाटे कीं, हा सारा विश्वपसारा एक नटराजाच्याच चरणाचा प्रताप आहे. तो देवाला मनोमय म्हणे, "हे शंकरा, तूं दिसतोस तसा नव्हे, तर खरोखर आहेस तसा मला पाहूं दे." त्या शिवध्यासामुळें मी एकदां चिदंबरला केव्हां जाईन असें त्याला झालें होतें! तेंच त्याला वेड लागलें! त्याला चिंचेच्या झाडावरील पेंदारि, विर, इकला इत्यादि भूतांनीं पछाडलें आहे असें गांवकऱ्यांना वाटलें. मग त्यांनीं त्यांस कोंबडीं, बकरीं बळी देण्याचें ठरविलें. पण नंद एका महादेवाशिवाय कोणालाच जाणत नव्हता. त्यानें "माझ्यासाठीं गरीब प्राण्यांना बळी देऊं नका हो!" अशी गांवकऱ्यांना पुष्कळ विनवणी केली. पण ते ऐकतना. तो त्यांस म्हणे, "अरे, हें आयुष्य भरामर चाललें. तें कोणाकरतां थांबत नाहीं. तर आतां त्वरा करून आपण चिदंबर देवाकडे जाऊं या!" त्याचें नांगरकीकडे लक्ष लागेना. तो शिवाच्या नामघोषांत नाचत राही! अखेर त्यानें विचार केला कीं, आपण धन्याची परवानगी घेऊन लवकर गेलेंच पाहिजे. असें मनांत आणून तो त्याच्या कसणुकींतील जमिनींच्या धन्याकडे गेला व त्याच्यापुढें त्यानें दंडवत घालून हात जोडून चिदंबरला जाण्यासाठीं रजा मागितली. पण त्याचा धनी त्याच्यावर चवताळला व रागानें अधिकच्उणें बोलून त्यानें त्यास जाण्यास साफ मनाई केली. नंदानें पुष्कळ आर्जवें केलीं. पण धन्याला स्वार्थापलीकडे त्याचें काय महत्त्व! नंदाला मरणप्राय दुःख झालें. पण त्यानें आपल्या मालकाला दोष दिला नाहीं. तो देवाला म्हणे, "मी माझ्या धन्याला दोष देत नाहीं. कारण त्याला प्रेरणा देणारा तूंच आहेस. तुझ्या आज्ञेवांचून झाडाचें पानहि हालत नाहीं. मी तुझ्या इच्छेला शरण असलें पाहिजे. धन्याची प्रसन्नता मला जोडतां आली

नाहीं, तर माझीच घंडखोरी तुझ्या व माझ्या आड येईल. मी आशाधारक व शरणागत झालों कीं माझ्या धन्याला द्रव येईल व तूंहि प्रसन्न होशील." असा तो पुष्कळ विचार करी व मनाचा संयम करी. पण त्याची देवाकडील ओढ थांबेना. "बरवी निरयगति परी परवशता शतगुणें करी जाच।" याचा अनुभव त्याला आला. तो एकांतीं ओक्साबोक्शीं रडत रडत देवाला म्हणे, "हे नटराज शंकरा! तुझें दुरून तरी दर्शन घ्यावें व जन्ममरणांतून सुटावें यासाठीं अंतःकरण व्याकुळ झालें आहे। पण तें भाग्य या वेमुदतबंदी *गुलामगिरीच्या दीन महारड्याला कोठचें? हे दयाळा! आम्हां दीनांना* तुझ्या दर्शनाची बंदी आणि पुनः पुन्हा शूद्रातिशूद्र जातींत जन्मास यावें ही सक्ती! हे देवा, तुला हें कसें आवडतें? तो आणखी म्हणाला कीं, "हे माझ्या मायबापा दयाळा! तूं जाणतोसच कीं माझा जीवींचा जिवलग तूं आहेस. तर तुझें मला एकदां दर्शन होऊं दे. अरे, तूं दीनाचा दयाळू ना! मग या दीन, परतंत्र दासाच्या बाबतींत तुझें हृदय असें पाषाणासारखें कठोर करूं नकोस." नंदाला नटराजाचा विरह असह्य झाला. त्यानें अन्नपाणी सोडलें व तो शिवाच्या *भेटीसाठीं धाय मोकलून एकसारखा रडूं लागला! त्याचें धन्याच्या शेतीकडे* मुळींच लक्ष लागेना.

नंदाच्या अंतःकरणाची चाललेली ही कालवाकालव त्याच्या धन्याच्या लक्षात आली व त्याच्या मनाला एकाएकीं ईश्वरी इच्छेनें पालट पडला. तो नंदावर नेहमींप्रमाणें न रागावतां त्याला समजुतीनें म्हणाला, "नंदा, तूं शहाणा असून असें वेड्यासारखें काय करतोस? अरे, तूं जायचें म्हणतोस, मग या पिकाची वाट काय? तिकडे कोण पाहील?"

इकडे नंदाला शिवाचा दृष्टांत झाला कीं, तूं धन्याला सांग कीं, "पीक तयार आहे. पाहावयाला चला. म्हणजे तें पाहून तो तुला मजकडे येण्यास परवानगी देईल." नंद आनंदाश्चर्यानें नाचूं लागला! तो तडक धन्याकडे गेला व त्याला देवानें सांगितल्याप्रमाणें सांगितलें. इतक्या लवकर पीक हातीं येईल हें त्याच्या धन्याला खरें वाटणें शक्यच नव्हतें. पण नंदाचा त्या वेळचा उत्साह व रागरंग कांहीं अपूर्वच दिसला. म्हणून तो नंदा-बरोबर शेतावर गेला व तेथें पाहतो तों पीक काढून, झोडून, मळणी होऊन पिकाची सोन्यासारखी रास त्याला खळ्यावर दिसली. हें मानवी कर्तृत्व

नव्हे, हें त्याच्या तेव्हांच लक्षात आलें. तो आश्चर्यानें थक्क होऊन म्हणाला, "नदा! हें आज मी काय पहात आहें? अनेक माणसें लावून जें काम दोन आठवड्यात पुरें झालें नसतें, तें अवघ्या दोन प्रहरात पुरें झालें कसें? नदा! हा सारा तुझा पुण्यप्रताप आहे खास! अरेरे! तुला निष्ठुरपणें गुलाम म्हणून वागविण्यात माझ्या हातून केवढें घोर पाप घडलें! या क्षणापासून हे साधो! नदा, तू माझा धनी व मी तुझा नोकर असें समज. माझी सारी संपत्ति व जमीनजुमला इत:पर तुझी आहे. हे भक्तश्रेष्ठा, तुझ्या प्रिय शंकरानवळ माझ्याबद्दल विनवणी कर व मला माझ्या पापक्षालनाचा व उद्धाराचा मार्ग दाखव." असें सद्गदित अंत:करणानें म्हणून त्या धन्यानें नदापुढें साष्टांग दंडवत घातलें. "अहो मालक, हें भलतेंच काय करता? मी अतिशूद्र आहें," असें म्हणत नदानें चटकन् त्याला उठवलें. त्यापूर्वीच्या त्या निष्ठुर धन्यानें नदाच्या गळ्याला मिठी मारली व स्फुंदत स्फुंदत तो म्हणाला, "नव्हे, नव्हे, तसें नव्हे, उलट तू माझा गुरु आणि देव आहेस. या पातक्याला क्षमा कर! हे साधो! तुला चिदंबरम्‌ला जाण्याला अडथळा करणारा मी कोण? तो माझा अहंकार ठार झाला! तू तुझ्या इच्छेप्रमाणें चिदंबरम्‌ला खुशाल जा. पण माझें स्मरण ठेव व नटराजाच्या पायीं या पाप्याची दाद लाव, आणि हे साधो! मला जाताना दोन उपदेशाच्या गोष्टी सांग. कारण तू आता माझा गुरु आहेस" तेव्हा गांभीर्यानें पण विनयपूर्वक नंद त्यास एवढेंच म्हणाला, "हें पहा मालक, आपण बायकापोरांवर घरदारावर व संपत्तीवर जेवढें प्रेम करता तेवढेंच देवावर करा. यापेक्षा मी आपला दास आपल्याला अधिक तें काय सांगणार!" असें सांगून नंद आनंदभरानें चार पावलें गेला नसेल, तोंच त्या धन्यानें कळवळून पुन्हा त्यास हाक मारली व त्याच्या होणाऱ्या वियोगाच्या दु:खानें विव्हळ होऊन रडत रडतच तो म्हणाला, "अहो दयाळा, माझ्या सद्गुरो! आपण परत केव्हा याल? आपलें पुन्हा दर्शन केव्हा होईल ही माझ्या मनाला चिंता लागली आहे" त्यावर निश्चयाच्या स्वरानें नंद म्हणाला, "अहो मालक, चिदंबरम्‌ला पोंचल्यावर परत यायचें नसतें! हा आता माझा शेवटचा रामराम घ्या!" "यद्गत्वा न निवर्तन्ते तद्धाम परमं मम।" हाच त्याच्या म्हणण्यातील महाभाव होता

नंद याप्रमाणें तन्मय होऊन आपल्या निधानरूप चिदंबरम् क्षेत्राकडे अत्यानंदानें नाचत बागडत चालला असतां स्वर्गींच्या देवांनीं आपल्या सदिच्छेची त्याच्यावर पुष्पवृष्टि केली! पृथ्वीवर हर्षभरानें रोमांच उभे राहिले. तेच नंदाच्या पायास गालीच्याच्या पायघड्यांप्रमाणें झाले. आजूबाजूचीं अद्याप न कापलेलीं शेतें या नंद शेतकऱ्याचें भक्तिप्रेम पाहून आनंदानें डोलूं लागलीं!

त्या वेळीं कोलॉडम् नदी या शिवभक्ताला आडवी सामोरी आली. तिला आनंदाचा पूर लोटला होता. नंद व त्याच्याबरोबरचे अनेक लोक त्या नदींतील नावेंत चढले. मी ही संसरणा नदीच ओलांडून जात आहे, असें नंदास वाटलें. त्यानें शिवनामाचा जयघोष चालविला व तो आनंदानें बेमान होऊन नाचूं लागला! तसे सारेच उतारू नाचूं लागले! नावाडीहि वल्हीं टाकून नाचूं लागले! नाव मौजा करीत परतीराला लागली. नटराजाच्या पवित्र क्षेत्रांत पाऊल पडतांच नंदाचा भजनाचा उत्साह अति वाढला. सारे लोक त्याच्याबरोबर शिवनामाचा जयघोष करीत नाचत व भजन करीत नटराजाकडे चालले! बाजारपेठेंतील व्यापारी, व दुकानदार आपआपल्या पेढ्या व दुकानें तशींच टाकून या अभूतपूर्व मिरवणुकींत सामील झाले! "बोला हरहर महादेव! बोला नटराजकी जय!" अशा जयघोषांनीं आकाश दुमदुमून गेलें! नंदाला दुरून देवळाच्या आवाराचें महाद्वार दिसलें. तो म्हणाला, "अहो हें पहा, हेंच कैलासाचें द्वार होय. यांतून पलीकडे गेलेले कोणी परत येत नाहींत. यांतूनच संबंदर, माणिक्य, अप्पर आणि सुंदर मूर्ति हे देवाकडे गेले व शिवसायुज्य पावले. जातां जातां ह्या सर्व भिंतींना व वृद्ध पाषाणांना त्यांनीं देवरूप केलें. मित्रांनो, देव सर्वरूपांत आहे व तो अरूपहि आहे. तो आंत आहे आणि बाहेर आहे. येथें अज्ञानी ज्ञानस्वरूप होतात व ज्ञानी इंद्रियें विसरतात. येथें देव उघडा प्रकाशमय आहे. माझा नटराज सर्व कांहीं आहे. हे देवा! मी कोणत्या शब्दांनीं तुला आळवूं? तुझें स्तवन कसें करूं? देवा, आपल्या पायापासून मला क्षणभरहि दूर करूं नकोस. देवा, मी निष्पाप व शुद्ध आहे ना? तर मग आतां मला अगदीं आपल्याजवळ घे."

देहमान-विवर्जित होऊन नंद व त्याचे संवगडी तीन अहोरात्र गांवाभोंवतीं प्रदक्षिणा करीत व एकीकडे भजन करीत फिरत होते. त्या आवाराच्या आंत १ प्याला त्यांना मनाई होती. नंद देवाजवळ जाण्यास अति उत्कंठित झाल

होता. त्यानें आवाराच्या कुसावरून पाहिलें. तों थोडे थोडके नाहीत—नटराजाचें वैभव फार मोठें—त्याचे दोन हजार नऊशें नव्याण्णव दीक्षित पुजारी शुचिर्भूत होत्साते शुभ्र वस्त्रें परिधान करून नटराजाकडे चालले होते. तो त्यास साक्षात् भूकैलासच वाटला! उडून नटराजाच्या पायाशीं जावें असें त्यास वाटूं लागलें! त्याचें चित्त अत्यंत अधिर झालें! पण काय करावें? मी अतिशूद्र. मला आंत कसें जातां येईल? मीं तेवढी पुण्याई कोठें केली आहे? या न्यूनगंडानें त्याचें अंतःकरण पोळून निघालें. तो अति कळवळून म्हणाला, "देवा! तूंच माझ्या धन्यास प्रेरणा देऊन मला येथपर्यंत आणलेंस. आतां मला तुला कडकडून भेटूं दे! मला अंतर देऊं नकोस. मी सर्वस्वाचा त्याग करून तुझ्या महाद्वारीं, तुझ्या भेटीच्या उत्कंठेनें उभा आहें, हे नटराज! तूं मला आपल्या चरणाचा आश्रय देच." याप्रमाणें नंदाची निस्सीम उत्कटतेनें प्रार्थना सुरू असतां शिवानें तेथील सर्व दीक्षित पुजाऱ्यांना दृष्टांत दिला कीं, "त्या माझ्या प्रिय भक्ताला अग्निदिव्य करून आंत घ्या." असा सर्वांना एकच दृष्टांत झाला. तेव्हां ते सारे भूदेव नंदाकडे आले. ते जवळ येत आहेत असें पाहून नंद त्यांस हात जोडून म्हणाला, "महाराज! आपण मजजवळ येऊं नका. मी अतिशूद्र आहें. मी महार आहें, डोंब आहें." त्याच्या या म्हणण्याकडे दुर्लक्ष करून ते सच्छील ब्राह्मण पुढें आले व म्हणाले, "अरे, तुझी जन्मजात निकृष्ट का असेना, तूं शिवकृपेनें फार उंचावला आहेस. यासाठीं तूं अग्निदिव्य कर व मग आमच्याबरोबर मंदिरांत चल."

नटराजाच्या भेटीसाठीं कोणतेंहि दिव्य करण्यास नंद तयारच होता. देवळाच्या आवाराबाहेर त्या ब्राह्मणांनीं अग्नि पेटविला होता. त्यांत निःशंक मनानें नंदानें उडी घेऊन शिवस्मरणपूर्वक दिव्य केलें!! असें सांगतात कीं, यज्ञोपवीतधारी पवित्र ब्राह्मणाच्या रूपांत तो अग्नींतून बाहेर आला. मग त्याला हजारों ब्राह्मणांनीं वाजत-गाजत मंदिरांत नेलें. फार वेळ चुकलेलें तान्हें मूल आपल्या आईपुढें जातें त्याप्रमाणें तो भक्तश्रेष्ठ नंद आपल्या ध्येयसर्वस्वरूप चिदंबरम् देवळांतील नटराजापुढें हात जोडून उभा राहिला! त्याच्या चरणांवर त्यानें मस्तक ठेवलें व सद्गदित अंतःकरणानें तो म्हणाला,
"नटराज! माझ्या जीवाच्या जिवलगा। तुझ्या अंगसंगा लाभलों जी॥ १॥
आम्हां तुम्हां आतां भेद नाहीं देवा। अभिन्नत्वें सेवा घ्यावी माझी॥ २॥"

इतकी शेवटची अत्युत्कट विनवणी करून नंद नटराजांत समरस झाला! नंद देहासक्ट गुप्त झाला! परम शिवभक्तीचा हा लोकोत्तर चमत्कार पाहून सारें देऊळ थरारलें! सारा पुजारीवर्ग थक्क झाला! घंटा व नौबती झडूं लागल्या! तामीळ देशांत अद्यापि त्या मार्गशीर्ष महिन्यांत हजारों तरुणी अंगावर नूतन वस्त्रालंकार घालून नंदाची गाणीं गात नाचत असतात. त्या गाण्यांचे थोडे नमुने अन्यत्र दिले आहेत.

कै. पांगारकर यांच्या अनुवादावरून नंदाच्या विचारांचा थोडा मासला पुढें देत आहें. निरक्षर संतांची शिवासंबंधीं सहजस्फूर्ति कशी काव्यमय व दिव्य असते तें यावरून दिसून येईल. नंद म्हणतो, नटराजाचें नृत्य किती गोड! आपण सर्व जण त्याच्याचसारखें नृत्य करूं. म्हणजे तो आपणांस नृत्यांतच सांपडेल. गावें आणि नाचावें, पुन्हा गावें आणि नाचावें हेंच काम! वर्तुळ किंवा फेर धरून त्या राजराजाचें नाम गावें. तो निर्विकल्प व निर्मळ आहे.

नृत्य आणि प्रेम यांचा स्वामी, महासमर्थ, प्रेमळांची कामधेनु, प्रेमसागर, दीनांचा कल्पवृक्ष, शुद्ध प्रकाश – अशा नटराजाला आपल्या चित्तांत शोधा.

हे सौम्य, आल्हादकारक, शुभ्र चंद्रा! शिवाला प्रिय होण्याला मला मार्ग दाखव. माझा प्राणविसावा जो नटराज त्याच्या मस्तकावर तू विराजत आहेस! तूं कोणतें पुण्य केलें आहेस? रात्र नाहीं, दिवस नाहीं असा तूं " अहोरात्रीच्या पैलीकडे " आहेस. मला असें होतां येईल काय?

शुभ्र चंद्रा! त्याच्याशीं मला एकांत कसा करतां येईल? गड्या सांग ना! हें किती कठिण आहे! तो महामानी आहे! तो आणि मी, मी आणि तो, अगदीं एक – अहाहा! या भावनेनें मी किती सुखी आहें. पण काय करूं रे. हा पांचतोंड्या (पंचज्ञानेंद्रियें) सर्प (अहंकार) आड येतो रे. तूं त्याला अमृत पाजून निर्विष कर, म्हणजे तो मला छळणार नाहीं!

महाराष्ट्रांतील चोखामेळा, रोहिदास हीं अशींच उदाहरणें आहेत.

चोख्या महाराची बायको संतीण सोयराबाई म्हणते —

**नाहीं उरली वासना। तुम्हां नारायणा पाहातां॥ १॥**
**उरला नाहीं भेदाभेद। झालें शुद्ध अंतर॥ २॥**

विटाळाचे होतें जाळें । तुटलें वळें नामाच्या ॥ ३ ॥
चौदेहाची तुटली दोरी । म्हणे चोख्याची महारी ॥ ४ ॥

ती आणखी पुढें म्हणते —

अवघा रंग एक झाला । रंगीं रंगला श्रीरंग ॥ १ ॥
मी तूं पण गेलें वायां । पाहतां पंढरीच्या राया ॥ २ ॥
नाहीं भेदाचें तें काम । पळोनि गेले क्रोध काम ॥ ३ ॥
देही असूनि विदेही । सदा समाधिस्थ पाहीं ॥ ४ ॥
पाहतें पाहणें गलें दुरी । म्हणे चोख्याची महारी ॥ ५ ॥

---

## प्रकरण १२ वें

## भवतारिणी कालीचा साक्षात्कार

शवारूढां महाभीमां घोरदंष्ट्रां वरप्रदाम् ।
हास्ययुक्तां त्रिनेत्रां च कपाल कर्त्रिकाकराम् ।
मुक्तकेशीं ललज्जिह्वां पिबन्तीं रुधिरं मुहुः ।
चतुर्बाहुयुतः देवीं वराभयकरां स्मरेत् ॥ १ ॥

श्रीराम आणि श्रीकृष्ण यांच्याप्रमाणें श्रीरामकृष्ण परमहंस यांचें नांव आज बहुतांच्या मुखीं आहे. श्रीराम आणि श्रीकृष्ण यांच्याहूनहि श्रीसद्गुरु रामकृष्ण परमहंस यांची थोरवी अधिक होती, असें त्यांचे जगविख्यात शिष्यश्रेष्ठ स्वामी विवेकानंद म्हणत. मी त्यांना उपासनेची सर्वोत्कृष्ट आदर्श-मूर्तिच मानतों. श्रीरामकृष्ण परमहंस यांच्या सर्वांगीण उपासनेंतील दिव्य आणि विविध अनुभव आणि आधुनिक परलोकविद्येंतील *कित्येक आश्चर्य*-कारक प्रयोग हा बुद्धिवादी नवयुगाच्या जडवादावर बिनतोड उतारा आहे.

श्रीरामकृष्ण परमहंस हे अवतारी पुरुष तर खरेच; पण त्यांनीं आपल्या चरित्रांत मानवोपासकाचा आदर्श जगापुढें जितका उघड करून ठेविला, तसा इतर थोर पुरुषांच्या चरित्रांत क्वचितच आढळेल. ते मूळचे कर्मठ ब्राह्मणधर्मी होते. नंतर त्यांनीं तंत्रादि सर्व साधनांचा स्वतः अभ्यास केला व अनेक अलौकिक अनुभव घेतले. हिंदुधर्मांतील निरनिराळ्या पंथांतील साधुसंतांच्या भेटी घेतल्या. ईश्वरचंद्र विद्यासागर आणि देवेन्द्रनाथ ठाकूर, केशवचंद्र सेन आणि विजयकृष्ण गोस्वामी अशी आधुनिक थोर थोर मंडळी त्यांनीं फार जवळून न्याहाळली. समग्र तंत्रशास्त्र आणि देवताविज्ञान त्यांनीं पूर्णपणें आत्मसात् केलें. हिंदूंच्या सर्व देवतांचीं त्यांनीं साक्षात् दर्शनें घेतलीं. इतकेंच नव्हे तर आपण स्वतः श्रीगोपाळकृष्ण, श्रीराधा, भगवान् शंकर इत्यादि रूपें धारण करून इतरांस दर्शन दिलें. निर्विकल्प समाधींत ते कित्येक महिने राहिले आणि इतकें सर्व अनुभविल्यानंतरहि केवळ लोकसंग्रहबुद्धीनें त्यांनीं ख्रिस्ती व इस्लामी धर्मांची दीक्षापूर्वक उपासना पूर्ण केली व सर्व धर्मांचें उपास्य एक दक्षिणेश्वर हेंच आहे, नामरूपें वेगळीं इतकेंच; हें सप्रयोग सिद्ध केलें. असा हा जो दिव्य नवयुगधारी अवतारी महाउपासक पुरुषाचा प्रत्यक्ष प्रयोगसिद्ध अनुभव, यांत या नवयुगाचा ईश्वरी संकेत सांठविला आहे; असेंच मानावें लागतें. पर्यायानें त्याच विश्वधर्मात्मक संकेताचा विचार आपणांस या ग्रंथांतहि करावयाचा आहे. असो. या प्रकरणांत या अवतारी उपासकाच्या चरित्रातील एका महात्त्वाच्या अंशाचें थोडक्यांत वर्णन करीत आहें. हा शिवशक्तिस्वरूप शिवलिंगोपासना ग्रंथाचा हा कळसाध्याय समजावा.

बंगालयांत हुगळी प्रांतांत शहरी वस्तीपासून दूर अगदीं एकीकडे कमरपुरकर नामक खेड्यांत एका कुडाच्या झोंपडींत ता. १८ फेब्रुवारी सन १८३६ रोजीं सुप्रभातीं एका गरीब ब्राह्मण पुरोहिताच्या घरीं श्रीरामकृष्णांचा जन्म झाला. त्यांच्या जन्मापूर्वी असा दिव्य पुत्र जन्मास येणार असा त्यांच्या सच्छील आईबापांस ईश्वरी साक्षात्कार झाला होता. म्हणून गयेच्या गदाधराचें नांव त्याला ठेवलें होतें. अगदींच निरक्षर म्हणतां येणार नाहीं इतकाच शालेय शिक्षणाचा संस्कार गदाधराला मिळाला. श्रीरामकृष्णांना अखेरपर्यंत जे निमित्तमात्र विद्यागुरु लाभले, त्यांनाच या असामान्य शिष्यापुढें

अखेर हात जोडण्याची वेळ आली. मनाची धार्मिक प्रवृत्ति, उत्कट भाव व चित्ताची एकतानता हे या गदाधराचे उपजत गुण होते. त्याच्या ठिकाणीं स्त्रीसुलभ अशी नाजूक मार्दवता दिसे. पुढेंहि मी स्त्री आहें व विवेकानद पुरुष आहे असें कांहीं गूढार्थानें श्रीरामकृष्ण म्हणत. हा गदाधर लहानपणीं सहा-सात वर्षांचा असतांना एक दिवस सहज शेताच्या बांधावरून एकीकडे तोंडांत पोहे चघळीत एकटाच भटकत होता. इतक्यांत आकाशांत एकाएकीं काळे ढग येऊन त्यांनीं सारें आकाश व्यापत केलें तिकडे त्याचें लक्ष वेधलें. एवढ्यात त्या काळ्या ढगांच्या पृष्ठभागावरून स्वच्छ पांढऱ्या बगळ्यांची एक रागच्या रांग उडत गेलेली त्यानें पाहिली. त्या निसर्गाच्या विलक्षण विरोधाभासाच्या आनदात त्याचा उत्कट बालभाव तन्मय झाला व देहभान सुटून गदाधर खालीं बेशुद्ध होऊन पडला! तेव्हां तेथून त्यास उचलून न्यावें लागलें. गदाधर नऊ वर्षांचा असताना त्याच्या खेड्यांतील ग्रामस्थांच्या एका पौराणिक नाटकांत त्या गौरवर्ण गदाधराकडे शिवाची भूमिका दिली होती. त्यासाठीं त्याच्या अंगाला भस्म लावलें. मस्तकावर जटा बांधल्या. कमरेस व्याघ्रांबर नेसविलें. गळ्यांत रुद्राक्षमाळा घातल्या व अशा थाटांत हातांत एक लहानसा त्रिशूळ घेऊन तो मोठ्या गंभीरपणें पावलें टाकीत रंगभूमीवर आला. पण हें होत असतांच तो शिवभूमिकेशीं पूर्ण तन्मय झाला. त्याच्या नेत्रातून शिवानंदलहरी वाहू लागल्या, चेहऱ्यावर दैवी तेज चमकूं लागलें, व या अवस्थेंत त्याच्या ठिकाणीं एकाएकीं भावसमाधीचें ताटस्थ्य आलें! त्या निश्चेष्ट स्थितींतच त्यास रंगभूमीवरून उचलून न्यावें लागलें. पुढें त्याच्या ठिकाणचा हा शिवभाव मावळण्यास तीन दिवस लागले! त्यानंतर एकदां बालपणींच विशालाक्षी देवीच्या दर्शनास बायकांबरोबर जात असता वाटेंत तो असाच एकाएकीं भावमग्न होऊन त्यास ताटस्थ्य आलें. तें कशानेंहि जाईना. शेवटीं त्याच्या कानाशीं देवीच्या नांवाचा घोष केला. तेव्हां तो देहभानावर आला. पुढें नवव्या वर्षीं त्याची मुंज झाल्यावर त्याला घरच्या रघुवीर देवाची पूजा करण्याची संधि वरचेवर मिळूं लागली. त्या पूजेंत तो रंगलेला असे. त्याला सगुण साक्षात्कार होत. कोठेंहि शेजारींपाजारीं देवाची अर्चा व धार्मिक उत्सव असला कीं गदाधर तिकडे असायचाच. असें होतां होतां तो सतरा वर्षांचा झाला. तेव्हां

कलकत्त्यास त्याच्या वडील भावाची वेदशास्त्रशाळा होती, तिकडे त्यास विद्यार्जनासाठीं नेलें. पण पोटभरू विद्या मला नको, असें तो म्हणे. शाळेंत जाऊन शिकण्याकडे त्याचें कधींच लक्ष नसे. साधु-वैराग्यांच्या मेळ्यांत जावें व त्यांच्या गोष्टी मन लावून ऐकाव्या हा त्याला विशेष छंद होता. इ. स. १८५५ सालीं, कलकत्त्याजवळ राणीरासमणी नामक एका श्रीमान कोळीण बाईचें श्रीदक्षिणेश्वर कालीचें एक फार मोठें देवस्थान आहे, तेथें गदाधराच्या वडील भावास पुजारीपण मिळालें; म्हणून तो तेथें गेला. त्यानें बरोबर गदाधराला पण नेलें. पण एका शूद्र जातीच्या बाईच्या देवळांत राहणें व जेवणें गदाधराच्या कट्टया धर्मनिष्ठेस पत्करलें नाहीं. तो आपलें जेवण हातानेंच करी. तेथील देवीचा प्रसादहि तो ग्रहण करीत नसे. ही पावित्र्याची भावना श्रीरामकृष्णांच्या रक्तांतच पुरी भिनलेली होती. पण *श्रीदक्षिणेश्वर कालीमंदिर जणु श्रीरामकृष्णाकरतांच निर्माण झालें होतें.* त्यामुळें तेथील श्रीभवतारिणी काली देवीनें गदाधरास लवकरच आपले पुजारी केलें. गदाधर वीस वर्षांचा झाला असतां त्याचा वडील भाऊ मरण पावला. तेव्हा साहजिकच देवीची पूजाअर्चा करण्याचें सारें काम गदाधराकडे आलें. ज्या काली देवीची पूजा करण्याचें काम गदाधराकडे आलें, तिचें ध्यान या प्रकरणाच्या आरंभींच्या श्रीकालीदेवीच्या ध्यानाच्या श्लोकांत दिलें आहे, तसेंच नाहीं. त्यांत थोडा फरक आहे. तिच्या हातांत कपाल व कातरी नाहीं. उजव्या हातापैकीं एक वरदकर व दुसरा अभयकर आहे. अर्थात् सौम्य आणि उग्र असे दोन्ही भाव तिच्या ठायीं आहेत.

**भाविक गदाधराची एकनिष्ठ शिवशक्तिपूजा :—** *अगदीं* पहाटेपासून तों रात्रीं नऊ वाजेपर्यंत गदाधर देवीच्या सेवेंतच गुंतलेला असे. पहाटेच्या प्रभातीं काकड आरती, देवीचें स्नान, तिच्या अंगावर सारीं बहुमोल रत्नजडित वस्त्राभरणें घालणें, तिची सर्वोपचारपूजा, महानैवेद्य, स्तोत्रपाठ, रात्रीची शेज-आरती व नंतर चांदीच्या पलंगावर तिला निजविणें, असें हे सारे पूजाअर्चेचे शास्त्रोक्त व लौकिक विधि गदाधर रोज नेमानें, अत्यंत मनोभावानें व कसोशीनें करीत असे. हातानें कर्म व तोंडानें अत्यंत मधुर आवाजांत मंत्रपाठ व स्तुति-स्तोत्रें व गीतें अशा रीतीनें कायावाचामनानें *देवीच्या उपासनेंत अगदीं पहाटेपासून निजेपर्यंत तो सतत गढलेला असे.* रोज

सकाळ-संध्याकाळ परोपरीच्या उत्कृष्ट सुवासिक फुलांच्या देवीला घातलेल्या हारांच्या सुगंधानें व मधूनमधून प्रसगानुसार होणाऱ्या घंटानाद व शखनाद यांनीं देवळाचें सारें आवार दरवळलेलें व दुमदुमलेलें असे. गदाधराच्या स्वाभाविक कोमल सौंदर्याला त्याच्या अंतरींच्या पावित्र्यानें ओज चढे, त्याच्या गोड आवाजाला त्याच्या उत्कृष्ट भक्तिभावनेनें दिव्य माधुरी येई, त्याच्या कलावंत हातांना त्याच्या प्राणप्रिय मातेची पूजा रचतांना धन्यता वाटे. या त्याच्या नित्याच्या मंगलकार्यास देवीच्या नौबतखान्यावरील कलावंत वाजंत्री उत्तम साथ देत. या सर्व मांगल्याला स्वर्गीय शोभा आणणारी अधिष्ठात्री चिच्छक्ति भवतारिणी कालीदेवी गदाधरास सदा प्रसन्न व हास्यवदन दिसे. त्या विश्वमोहिनीच्या आकर्षक स्मित हास्याच्या आड्त गदाधराचें अति भाविक मन आपला जीवभाव विसरून जाई. त्याच्या साऱ्या श्रमांचा शीण त्यानें हरपून जाई. तहानभूकहि हारपे. याचें नांव वैधी भक्ति व याचेंच नांव एकनिष्ठ शिवशक्त्युपासना.

**अज्ञानाच्या अथांग सागरावरून चिद्रूपिणीच्या शोधाचा अट्टाहास**:— याप्रमाणें गदाधराचें सारें विचारसूत्र जगन्मातेच्या सेवेंत सर्वस्वीं गुंतलें. गदाधराचें भाविक मन कालीमातेच्या चटका लावणाऱ्या मातृहास्यांत दंग होऊन जाई! तो रात्रीं त्या प्राणप्रिय जगन्मातेपुढें तासन्‌तास उभा राही. रात्र किती झाली याचेंहि त्यास भान नसे. पुढें पुढें त्या विश्व-मोहिनीच्या दिव्य स्वरूपाचा साक्षात्कार आपणांस केव्हां होईल, या तीव्र उत्कंठेनें त्याचें मस्तक भणाणून जाई. त्याच्या जीवाला लागलेली ही तळमळ दुसऱ्या कशानेंहि शांत होईना. सामान्य पुजाऱ्याप्रमाणें नित्याचें पूजाकर्म यथासाग उरकून मोकळें व्हावें, एवढ्यांतच त्याला संतोष वाटेना. तसेंच द्रव्येषणा, लोकेषणा, इत्यादि लौकिक एषणापूर्तीसाठीं सामान्य पूजक नेहटून प्रार्थना करतो, तसेंहि कांहीं त्याच्या मनात कधींच येईना. असल्या ऐहिक क्षुद्र कामनांच्या मोहांत कधींच न गुंतण्याइतकें त्याचें मन उंचावलें होतें. उपास्य देवतेला समक्ष पाहावें, हीच एक काय ती त्याची उत्कंठा होती. ज्या अंतरायभूत होणाऱ्या मायेच्या पडद्यामुळें या चिद्रूपिणी जगन्मातेच्या हृदयाचे पडसाद कळत नाहींत, तो पडदा मी केव्हां दूर करीन अशा प्रज्वलित आकांक्षेनें त्याच्या अंतरांत पेट घेतला होता! या पाषाणमय मूर्तींत

मला चैतन्याचें ज्योतिर्लिंग कसें दिसेल, यासाठीं तो अति अधिर झाला होता. "धर्म हा एक केवळ अभ्यास तर नाहींना? जगन्माता ही केवळ माझी एक भोळी भावना तर नसेल ना? अथवा मानवाच्या कल्पनेनें रचलेलें तें एक खूळ तर नाहीं ना?" असे विकल्प त्याच्या अत्यंत श्रद्धामय भाविक मनात येणें कधींच शक्य नव्हतें. उलट रामप्रसाद व अन्य देवीचे भक्त यांना देवीच्या दिव्य सगुणसाक्षात्काराचें भाग्य खरोखरीच लाभलेलें आहे, असा त्याचा निःशंक बालभाव होता. अर्थात् तसें दिव्यदर्शन आपणांसहि कां होऊं नये, यास त्याला कांहीं सयुक्तिक कारण दिसेना. त्यामुळें हें वैषम्य त्याच्या मनाला दुःसह होई. त्याला असें भासे कीं, ती अनंत चिदानंदमयी माता आपल्या अगदीं सन्निकट आहे. असें असून ती आपणांस दिसत कशी नाहीं, याचा त्याला अत्यंत विषाद वाटे. तिनें आपला व्यर्थ छळ चालविला आहे, हें पाहून नैराश्यानें त्याला अति दुःख होई.

त्या वेळीं ऐहिक विषयाची गदाधराला मुळींच अभिरुचि राहिली नव्हती. अमृतत्व व निरतिशयानद यांचें नित्य उगमस्थान कोणतें त्याचा शोध लावल्यावांचून चालणारें दैन्यवाणें जीवन हा एक उपहासाचाच विषय त्यास वाटे. जगन्मातेच्या कृपेवर त्याची नितांत श्रद्धा असे. तिनें आपल्या सगुण ऐश्वर्यांत आपल्याला दर्शन द्यावें, म्हणून तो अनन्यगतिक होऊन कालीमातेपुढें एखाद्या अनाथ मुलाप्रमाणें आक्रोश करी व तिच्या खणपटीस बसे. तो देवीपुढें तासन् तास ध्यानस्थ बसे. आणि मधेंच हृदयस्पर्शी करुणाष्टकें व प्रार्थनागीतें म्हणून तिला आपला कनवाळा यावा यासाठीं आपलें हृदय उकलून आर्जवें करी. अखेर प्रत्येक दिवस मावळला, म्हणजे हायरे देवा! हा एक दिवस आई भेटल्यावांचून तसाच फुकट गेला! म्हणून आंसवें ढाळीत व आक्रोश करीत तो जमिनीवर अंग टाकून देई व दुःखानें गडबडां लोळे!! या वरचेवर उसळणाऱ्या दुःसह दुःखाच्या आवेगानें तो जणुं भूमीवरून शोकसागरांत फेंकला जाई. अंतःकरण पिळून काढणारें तें विरहदुःख असह्य झालें कीं त्या वैतागानें तो अंतरायभूत झालेला अज्ञानाचा पडदा जणुं फाडण्यास धांवे! त्या वेळीं त्याला आजूबाजूच्या जगाचें भान राहात नसे. मग त्या दुःखोन्मादांत तो आपलीं वस्त्रें फेंकून देई. जानवेंहि काढून टाकी व एका जुन्या स्मशानभूमींतील मयाण, दुर्गम कांटेरी

जाळींत असलेल्या एका आंवळीच्या झाडाखालीं रात्रीच्या रात्रीं ध्यानस्थ बसे. याप्रमाणें ध्यानमग्न होण्यास जात असतां भय, जात्यभिमान, लज्जा इत्यादि दुर्बल विचारांना तो पायांखालीं निष्ठुरपणें तुडवून जाई. देवळांतील इतर लोक मला काय म्हणतील, याची तो काडीमात्र पर्वा करीत नसे.

मन एकाग्र करावयाच्या योगशास्त्राची गदाधराला मुळींच माहिती नव्हती. अशा स्थितींत त्याचें निर्मळ अंतःकरण मातृदर्शनासंबंधीं भावनेच्या तीव्र आवेगांत त्यास उपासनेचा जो मार्ग दाखवील, त्या मार्गानें तो निर्भयतेनें जात होता. पण अशा रीतीनें दिवसांमागून दिवस चालले तसतसें त्याच्या तीव्र सर्वंकषप्रभावानें शारीरयातनांची सीमा गांठली! चेहरा व ऊर भावनावेशानें लाल झालेलें, गालांवरून अश्रुधारांचे सदा पाट चाललेले, सारें शरीर झटक्यांनीं थरारलेलें, चेहरा अति केविलवाणा झालेला, व अंतःकरण कळवळून होणारा हृदयद्रावक आक्रोश चाललेला, अशी ही गदाधराची विरहव्याकुळ असह्य अवस्था पाहून पाहणाराची छाती फाटून जाई! अखेर एक दिवस हे विरहाचे क्लेश असह्य झाले, तेव्हां एका भयंकर विचारानें त्याला घेरलें, व तो वेडापिसा होऊन देहाचा अंत करण्याकरतां पुढें सरसावला.

साऱ्याच उपासकांना या दिव्यांतून जावें लागतें असें दिसतें. नामदेव म्हणतात — "काय माझा आतां पाहतोसि अंत। येईं बा धांवत देवराया॥ तुजवीण होईल जीवासी आकांत। येईं बा धावत देवराया॥ २॥" तुकाराम यापुढें जाऊन म्हणतात— "काय देह घालूं करवतीं कर्मरीं। टाकूं भीतरीं अग्निमाजीं। तुका म्हणे काय करावा उपाय। ऐसा देईं भाव पांडुरंगा॥" पुढें ते म्हणतात— "कळलें माझा तुज नव्हे रे आठव। काय काज जीव ठेवूं आतां॥ तूं काय करिसी माझिया संचिता। धिक् हे अनंता झालें जिणें। तुका म्हणे माझी मांडिली निरास। करितों जीवा नाश तुजसाठीं॥"

श्रीरामकृष्णांनींच पुढें या साधकावस्थेंतील दारुण अनुभवांबद्दल अंतरंगांतील शिष्यांजवळ अत्यंत हृदयस्पर्शी वर्णन केलें तें असें — "एक दिवस या विरहाच्या असह्य वेदनांनीं माझ्या हृदयाच्या जणुं चिंधड्या झाल्या! एखादा भिजलेला रुमाल पिळावा तसें माझें अंतःकरण पिळून निघालें. तो दुःखावेगाचा ताण असह्य झाला. सगुण साक्षात्काराचें भाग्य मला कधींच लाभणार नाहीं, अशा नैराश्यानें माझ्या अंगीं भयंकर उन्माद चढला!

असेंच जर असेल तर पुरें झालें हें जीवन, असें माझ्या मनानें घेतलें. देवीच्या देवळाच्या गाभाऱ्यांत एक तलवार टांगलेली होती. माझी दृष्टि तिकडे गेली. माझ्या डोक्यांत एक कल्पना चमकली. ही तलवार माझ्या जीवनाचा अंत करण्यास उपयोगी ठरेल. मी झट्दिशीं पुढें झेप घालून एखाद्या उन्मत्ताप्रमाणें माझा दुःखान्त करण्यासाठीं ती तलवार हातीं पकडली. पण इतक्यांत ओहो हो ! ! माझा अंत न होतां माझ्या पुढील जगाचाच अंत झाला ! दारें, खिडक्या, देऊळ, सारें दृश्य माझ्या पुढून साफ मावळलें ! क्षणार्धांत सारें नामरूपशून्य झालें ! पण, त्या ठिकाणीं मीं दिव्य, अथांग चित्सागर पसरलेला पाहिला. मीं इकडे तिकडे वळून पाहिलें, तों चोहोंकडे प्रचंड तेजोराशी उसळत होत्या. त्या तेजोमय लाटा जणुं माझा ग्रास करण्याकरतां मोठमोठ्या गर्जना करीत माझ्याकडे धांवून येत होत्या. क्षणार्धांत त्यांनीं मला गांठलेंच. त्या मजवर येऊन आदळल्या, त्यांनीं मला आपल्या पोटांत गडप केलें. माझा जीव कासावीस झाला. माझें भान सुटलें आणि मी खालीं पडलों. तो व त्यानंतरचा दिवस कसा गेला तें मला कळलेंच नाहीं. माझ्या सभोंवार अवर्णनीय असा आनंदसागर उसळला होता. आणि अति खोल अशा माझ्या आत्मसत्तेंत प्रियतम दिव्य जगन्मातेचा गोड साक्षात्कार मला होत होता."

यानंतर दोन दिवसांनीं भावनोत्कट कापऱ्या कापऱ्या आवाजांत "आई ! आई ! !" असें गोड नामोच्चारण करीत श्रीरामकृष्ण आपल्या दिव्य आनंद-समाधींतून पुन्हां देहभानावर आले. याप्रमाणें दिव्यदर्शनोत्सुकतेच्या जणुं झंझावातानें त्या तरुण पुजाऱ्याचे मनाला धक्के देत अज्ञानाच्या मार्ग-शून्य समुद्रावरून वेगुमानपणें लोटीत ढकलीत सगुण साक्षात्काराच्या सुरक्षित त्रिपुटी बंदरावर आणून सोडलें, आणि त्या अपूर्व विश्रांतिस्थानीं दोन दिवस त्यांस राहूं दिलें. पण तो अल्पकाळ संपतांच तो दिव्यानुभव मावळला व त्याच प्रारब्धगतीच्या जणुं संवर्तवायूनें त्यांस पुन्हां यातनांच्या खवळलेल्या घोर समुद्रावर ओढून आणलें.

जगन्मातेच्या पुनर्दर्शनासाठीं टाहो फोडण्यांत गदाधराचे पुन्हां दिवसा-मागून दिवस जाऊं लागले ! एकदां झालेल्या दिव्य दर्शनानें गदाधराच्या मनाला चटका लागून राहिला व वेड्यापिशासारखी त्याची अवस्था झाली !

त्या दिव्य साक्षात्काराच्या आनंदसरोवरांत पुन्हा बुडी मारावी म्हणून त्याचें चित्त पाण्याबाहेरील माशाप्रमाणें तडफडूं लागलें! कधीं कधीं विरहव्यथा दुःसह झाली कीं वैतागानें तो आपलें तोंड रक्तबंबाळ होईपर्यंत जमिनीवर घाशी! त्याच्या हृदयद्रावक आक्रोशानें त्याच्याभोंवतीं आजूबाजूंची मंडळी जमा होई. पण गदाधराच्या मनांत आता जगाची आस्था राहिली नव्हती. सभोंवारचे लोक त्याला छायांप्रमाणें वाटत आणि म्हणून तो आईसाठीं कंठ शोष करीत असतां त्याच्या सभोंवार इतरांच्या अस्तित्वाचें मानहि त्यास राहात नसे.

गदाधराला झालेल्या पहिल्या दिव्य दर्शनाचा तात्कालिक परिणाम पुनर्दर्शनाची उत्कंठा तीव्रतर होणें व म्हणून विरहाग्नीचा दाह दुःसह होत जाणें असाच जरी झाला, तरी तो हळूहळू नकळत आध्यात्मिक अनुभवाच्या अगदीं नवीनच पातळीवर आरूढ झाला होता. जेव्हां जेव्हां त्याच्या विरहाकुलतेचा झटका त्याला दुःसह होई, तेव्हां त्याचें बाह्यभान सुटून जाई. आणि त्या भावावस्थेंत त्याची उपास्य जगन्माता आपल्या निरुपम ऐश्वर्यांत असून ती आपल्या त्या एकनिष्ठ भक्तास वरदान देत आहे व त्यास "धीर धर!" असें सांगत आहे असें दिसे. याप्रमाणें वरचेवर भावनावेगानें येणाऱ्या झटक्यांत आपली प्रियतम माता कधीं स्मितहास्य करीत आहे, कधीं चार गोड शब्द बोलून आपलें समाधान करीत आहे, तर कधीं परोपरीचा उपदेश करीत आहे, असा त्याला अनुभव येई. कधीं कधीं त्याच्या नजरेसमोर काजव्यांच्या थव्यांप्रमाणें तेजाच्या स्फुलिंगाचे पुंज दिसत. तर कधीं कधीं धुकट प्रकाशाच्या पडद्यांतच तो लपेटला जाई. आणखी कधीं कधीं डोळे मिटलेले अगर उघडेहि असतां चांदीच्या चकचकीत रसाप्रमाणें प्रकाशाच्या लाटा त्याच्या सभोंवार पसरल्या आहेत असें त्यास भासे!

यापुढें मनाच्या सामान्य मर्यादा ओलांडून जाण्यांत त्याची फार जलद प्रगति झाली आणि त्याच्या प्रज्ज्वलित उत्कंठेचा दिव्य विषय त्याच्या खास आटोक्यांत आल्यासारखा वाटूं लागला. त्याची दिव्य माता त्याच्या ध्यानावस्थेंत येऊन त्याला त्याच्या दिनक्रमाबद्दल मार्गदर्शन करूं लागली. या कालखंडांत तो ध्यानावस्थेंत जात असतां त्यास एक विलक्षण अनुभव येऊं लागला. त्याचें शरीर अत्यंत स्थिर व निश्चल राहण्यासाठीं त्याच्या

शरीराच्या साध्यासाध्याला कोणी अनुक्रमानें खडाखडा कुलपें लावीत आहे असें त्यास स्पष्ट ऐकू येई, मग तासन् तास त्याचें शरीर एखाद्या पाषाणाप्रमाणें भूमीला जखडून गेलेलें असे पुन्हा तीं साध्यासाध्याचीं कुलपें उघडलीं जाइपर्यंत त्याला एक तसूभरहि हालचाल करणें अशक्य होत असे।

पुढें लवकरच सामान्य उपासकाचा कर्तृतंत्र उपासनेचा चष्मा त्याच्या डोळयावरून गळून पडला आणि त्याला त्याच्या कालीमातेच्या दर्शनासाठीं समाधि अवस्थेची अगर ध्यानधारणेची गरज उरली नाहीं कालीमातेची पाषाणमूर्ति त्याच्या दृष्टीसमोरून कायमची विरून गेली ती पूर्णपणें मूळच्या चैतन्यरूपात रूपांतर पावली त्या जडमूर्तीच्या ठिकाणीं त्याला नेहमींच साफ उघड्या डोळयानीं कालीमातेची सचेतन व्यक्ति दिसे. इतकेंच नव्हे तर तिच्या स्मित हास्याच्या दिव्य लहरी आपणाकडे येत आहेत व तिच्या वरदानाचा वर्षाव आपणावर होत आहे, असा दिव्य आनंदाचा अनुभव तो घेई तिच्या साक्षात् श्वासोच्छ्वासाचा स्पर्श त्याच्या हाताला जाणवे पण रात्री दिव्याच्या प्रकाशात तिच्या दिव्य शरीराची सावली निरखून पाहिलें असताहि कोठें दिसत नसे साऱ्या दिवसाचा दिनक्रम आटोपून गदाधर जेव्हा आपल्या खोलींत निजण्यास जाई, तेव्हा त्यास पायातील तोरड्याचा मंजुळ ध्वनि ऐकू येई तेव्हा त्याला वाटे कीं, माझी प्रिय कालीमाता एखाद्या लहान मुली- सारखी जिना चढून देवळाच्या माडीवर गेली असावी मग तिला त्या थाटात पाहण्याच्या उत्कंठेनें छाती धडधडत असता तो बाहेर चौकात जाऊन वर पाही, तेव्हा खरोखरीच माडीवरच्या सज्जावर आपली प्रियतम कालीमाता उभी आहे, तिचा कृष्ण केशकलाप मोकळा सुटलेला आहे, आणि ती गंगेकडे निरखून टक लावून पाहत आहे असें त्याला दिसे

या अशा नित्य दर्शनानें गदाधरानें कालीमातेशीं नित्य सामीप्य जोडलें आणि तो एखाद्या तान्हुल्याप्रमाणें बालभावानें तिला चिकटला त्याच्या या अलौकिक घनिष्ठ संबंधात पुजाऱ्याची शिस्त व विधिनिषेध राहिले नाहींत पूजेच्या तंत्राची बंधनें मुळींच उरलीं नाहींत त्याचें अंतःकरण दिव्य प्रेमानें भरून गेलें व त्यात औपचारिक रीतिरिवाज व शिष्टाचार यास अवकाश राहिला नाहीं दुसऱ्या कोणत्याहि पार्थिव पदार्थापेक्षा त्याची प्रियतम सचेतन काली माता तो जास्त स्पष्टपणें व एकतानतेनें साक्षात् पाहत असे, म्हणून तो

स्वाभाविक रीत्या एखाद्या लाडक्या बालकाच्या बालभावानें व लडिवाळपणें तिला बिलगण्यास व गोंजारण्यास तिच्याजवळ जाई.

कालीमातेला नैवेद्य यथाविधि दाखविण्याचादि धीर नसे असें त्याला आढळे. तो अगोदरच नैवेद्याच्या पात्रातील काहीं खाऊं लागे उलट एखाद वेळीं गदाधर नैवेद्यातील घास आपल्या हातात घेऊन तिच्याजवळ जाई व तिच्या ओठाजवळ तो धरून "ह, हा घे बर" अशी तिची विनवणी करी. कधीं कधीं तो स्वता अगोदर खाई व मग दुसरा घास देवीच्या मुखाशीं नेऊन "ह, आता तुझी पाळी आली आता तू खा गडे," असें अगदी खेळीमेळींत म्हणे पुष्कळ वेळां भावनोद्रेकानें त्याचे डोळे व छाती फुलून गेली असता तो तिच्याजवळ लटपटणाऱ्या पायांनीं जाई, लाडिकपणें तिच्या हनुवटीस हात लावी, आणि मग तिच्यापुढें काहीं गाणें म्हणावें, बोलावें, थट्टा करावी, हसावें, किंवा नाचावें अशा बालचेष्टा तो करी कधीं कधीं शेजारती झाली कीं देवीला अथरुणावर निजविण्यास घेऊन गेल्यावर तो म्हणे, "काय म्हणतेस? मी तुझ्या बिछान्यावर निजू? बर तर मी निजतों." असें म्हणून गधादर तिच्या पलगावर थोडा वेळ निजत असे. रोज सकाळीं देवळाच्या फुलबागेंतील फुलें देवीच्या हाराकरता काढताना गदाधर कोणाशीं तरी बोलत आहे, कोणास लडिवाळपणें गोंजारीत आहे, हसत आहे, किंवा थट्टा विनोद करीत आहे असें आढळे. त्या वेळीं कालीमातेची सगुण मूर्ति इतरास दिसत नसे. साऱ्या रात्रींत त्याचे डोळे कधींच मिटत नसत. तो सारी रात्र दिव्य भावात घालवी किंवा तो कोणाशीं बोलत आहे, किंवा गात आहे, किंवा दूरच्या आवळीच्या खालच्या तपोभूमींत ध्यानमग्न आहे, असें आढळे. कधीं कधीं त्याचें त्याच्या उपास्य देवतेशीं इतकें प्रेमाद्वैत होई कीं, त्या वेळीं देवी व आपण यात यत्किंचितहि भेद किंवा अतर हा भाव सर्वस्वीं लोपून जाई. अशा वेळीं त्याचें वर्तन जास्त गभीर व देवस्वापहाराचें दिसे. अशा प्रसगीं तो आपल्या हातातील फुलें व बिल्वपत्रें आपल्या पायापासून सर्व अवयवाना लावी आणि मग तीं कालीमातेच्या पायावर वाही

श्रीरामकृष्ण परमहसाचा हा भक्तिविलास आणखीहि पुष्कळ वर्णन

१ हें प्रकरण मुख्यत. कल्चरल हेरिटेज ऑफ इडिया या श्रीरामकृष्ण सघाच्या ग्रथाधारेंच लिहिलें आहे

करण्यासारखा आहे. तो जसा अति दिव्य व अलौकिक आहे, तसाच तो अक्षरशः खरा आहे. त्यांत कल्पनेचा किंवा दंतकथेचा लवलेश नाहीं. ह्या भक्तीचा लोकविलक्षण प्रकार सामान्य दृष्टीस भ्रमासारखा वाटणें स्वाभाविक आहे. पण श्रीरामकृष्णांचें समग्र चरित्र तत्कालीन अत्यंत चिकित्सक लेखकांनीं लिहिलेलें वाचलें म्हणजे श्रीरामकृष्णांच्या दिव्य अनुभवांत भ्रमाचा संपर्कच नाहीं अशी खात्री होते. फार मोठमोठ्या तज्ज्ञांनीं श्रीरामकृष्णांना अवतारी पुरुष असेंच ठरविलें व त्यांच्या अवस्थेला महाभाव हें नांव दिलें. श्रीरामकृष्णांनीं कालीमातेचेच काय, तर राम, सीता, मारुति, कृष्ण, राधा, शिव अशा सर्व देवतांचे साक्षात्कार अनुभविले, इतकेंच नव्हे तर मुसलमानांचा पैगंबर व खिस्ती लोकांचा खाइस्ट यांचाहि साक्षात्कार त्यांनीं घडवून आणला व अखेर निर्विकल्प समाधीचीहि त्यांनीं अपरोक्षानुभूति घेतली हें आरंभीं सांगितलेंच आहे. त्यांच्या साधकावस्थेतील प्राणांतिक भयंकर क्लेश पाहिले कीं अंगावर कांटा उभा रहतो! कित्येक दिवस त्यांच्या पापण्याच मिटत नसत. डोळ्यांत बोट घातलें तरी पापण्या हालत नसत. झोंप नाहीं, खाणें-पिणें नाहीं, अशा घोर साधनानुष्ठानानें त्यांची अनेक वेळां प्राणांतिक अवस्था झाली होती. त्यांनीं सर्व साधनांचे अभ्यास केले व अनेक सिद्धि प्राप्त करून घेतल्या. श्रीरामकृष्ण म्हणजे मूर्तिमान् वैराग्यपूर्ण पावित्र्यच. त्यांच्या अंथरुणाखालीं कोणीं पैसा ठेवला तर त्यांच्या शरीराला असह्य आंचके येत! अमंगल आचारविचारच्या मनुष्याचा स्पर्शहि त्यांना सहन होत नसे. अशानें दिलेला कोणताहि पदार्थ ते घेत नसत. त्यांनीं विवेकानंदांसारख्या उच्च कोटीच्या पुरुषापासून गिरीशबाबूसारख्या पाप्यापर्यंत सर्वांचा उद्धार केला. हें त्यांच्या उपासनेचें सामर्थ्य होय. त्यांनीं स्वतःच्या विविध साधनानुष्ठानानें उपासकांस आदर्श दाखविला. उपासकाच्या शेवटच्या सर्वश्रेष्ठ महाभावापर्यंत ते स्वावलंबनानेंच गेले. सारीं उपास्यें एकच. तरी पण ईशसत्तेची मातृभावनेनें उपासना हें त्यांच्या संप्रदायाचें रहस्य दिसतें. तें इतकें कीं, जवळजवळ त्यांचीच योग्यता पावलेली त्यांची महासाध्वी पत्नी श्रीरामकृष्णांना माउली मानूनच त्यांच्यावर एकनिष्ठेनें प्रेम करी. श्रीरामकृष्णांच्या निर्याणानंतर शुद्ध मातृभावानेंच त्यांच्या महापतिव्रता पत्नीनें त्यांच्यासंबंधीं शोक केला! या भक्ताच्या मातृभावाबद्दल स्वतंत्र प्रकरण लिहावें असें योजलें होतें; पण

विस्तारभयास्तव शक्ति हा विषय गाळल्यामुळे तें येथें देत नाहीं. अनेक संतभक्तांनीं देवगुरूंच्या ठिकाणीं माउलीचीच भावना केलेली आढळते. शिवलिंगोपासना ही शिवशक्त्युपासनाच आहे. काली म्हणजे शिवाई. म्हणजेच शिवाची आनंदप्रकृति. म्हणजेच शिवलिंग. हीच भक्तांची निरतिशयानंद लिंगोपासना होय. अखंडानंद हा भक्तिमाउलीचा विषय आहे. म्हणूनच शिवलिंगोपासनेचा हा कळसाध्याय म्हटला.

कां वो रामराये दुरी मोकलिलें। कठिण कैसें जालें चित्त तुझें ॥ १ ॥
देउनि आलिंगन प्रीतिपडिभरें। कैं मुखें पीतांबरें पुसशील ॥ २ ॥
घेउनि कडिये धरुनी हनुवटी। कै गुजगोष्टी सांगसील ॥ ३ ॥
रामदास म्हणे केव्हां संबोखिसी। प्रेमपान्हा देशी जननीये ॥ ४ ॥

* * *

अवघाचि संसार सुखाचा करीन। आनंदें भरीन तिन्ही लोक ॥ १ ॥
जाईन गे माये तया पंढरपुरा। भेटेन माहेरा आपुलिया ॥ २ ॥
सर्व सुकृताचें फळ मी लाहीन। क्षेम मी देईन पांडुरंगीं ॥ ३ ॥
बापरखुमादेवीवरु विठ्ठलेंसी भेटी।
आपुलें संवसाटी करूनि ठेला ॥ ४ ॥

---

## प्रकरण १३ वें

## सद्भावदर्शन

यस्य ब्रह्मा च विष्णुश्च त्वं चापि सह दैवतैः।
अर्चयेथाः सदा लिंगं तस्माच्छ्रेष्ठतमो हि सः॥
—म. भा. अनु. अ. १४

लिंगार्चनंविना निष्ठा नास्ति तस्माज्जनार्दनः।
आत्मनो यजते नित्यं श्रद्धया भगवान्प्रभुः॥ १४८ ॥
—लिं. पु. पू. अ. २४

भावे हि विद्यते देवस्तस्माद्भावो हि कारणम्।

* * *

भाव तोचि देव भाव तोचि देव।
ये अर्थी संदेह धरूं नका ॥ १ ॥
भावें भक्ति फळे भावें देव मिळे।
निजभावें सोहळे स्वानंदाचे ॥ २ ॥
भावचि कारण भावचि कारण।
यापरतें साधन नाहीं नाहीं ॥ ३ ॥
एका जनार्दनीं भावाच्या आवडी।
मनोरथ कोडी पुरती तेणें ॥ ४ ॥

श्रीतुकारामबुवा म्हणतात, 'भाव देवाचें उचित। भाव तोचि भगवंत॥' शिवलिंगाच्या ठिकाणीं शिवभावाचीच प्राणप्रतिष्ठा करावयाची असते. अशिवभाव तेथें मनांतहि आणूं नयेत. आधुनिकांना शिवलिंगाच्या ठिकाणीं अश्लील *लैंगिक* हा एकच भाव दिसतो. त्याची सविस्तर चिकित्सा *मागील* खंडांत केली. आतां या साधनसार खंडांत भाविक उपासकास शिवलिंगाचे ठिकाणीं अनेक सद्भाव कसे भावित करतां येतील, त्याचें यथामति दिग्दर्शन या प्रकरणांत करावयाचें आहे. तें लेखनविस्तारभयास्तव अति त्रोटक रूपांतच करावें लागेल. त्यांत कांहीं भावना पूर्वीच केलेल्या दिल्या आहेत, व दुसऱ्या अनेक नवीन सुचविल्या आहेत. सुज्ञ वाचकांनीं त्यांची पूर्तता करून घ्यावी अशी विनंती आहे. पूर्तता शंभर भागर अधिक भावांची नव्हे, तर आपल्या सदभिरुचीप्रमाणें व प्रज्ञासामर्थ्याप्रमाणें सच्चिदानंदलक्षण भगवंतासंबंधीं आपल्या मनाचें उन्मन करतील अशा भावना कराव्या.

*येथें एक महत्त्वाची गोष्ट सांगणें भाग आहे. सर्व पुराणांतून विविध शिवलीला वर्णिल्या आहेत, त्यांत अर्थात् शिव देहाकारच वर्णिला आहे. त्याप्रमाणें शिवाच्या सर्व आख्यायिकांत शिव देहाकार मानला आहे, त्याच-प्रमाणें आगम - निगम, तंत्रशास्त्रें, पुराविनोद व नाथसंप्रदायाचें गूढज्ञ तत्त्व-ज्ञान इत्यादींतील, शिवपार्वतींचे संवाद, तसेंच शिवगीतेंतील शिव आणि*

राम, योगवासिष्ठ (६।१।३०-५१ शिवपूजोपाख्यान) यांतील शिव आणि वसिष्ठ, शंभुगीतेंतील शिव आणि पितर यांचे जे विस्तृत संवाद आहेत, त्या सर्व ठिकाणीं शिव देहाकारच मानावे लागतात हें उघड आहे. मग ते सगुण शिवाचे देह दिव्य असोत. पण त्या सर्व संवादांत शिव जें आपलें वास्तविक स्वरूप सांगतात, तें देहाकार नसून ब्रह्मात्मरूप, तात्त्विक, एकमेवाद्वितीय असेंच आहे यांतहि शंका नाहीं.

शास्त्रांत शिवाचीं ध्यानें पण अनेक सांगितलीं आहेत. शाळिग्रामावर चतुर्भुज विष्णूची भावना करावी, त्याप्रमाणें शिवलिंगावर निरनिराळे देहाकार धारण केलेले, अनेक मुखें, अनेक हस्त व आयुधें आहेत, असे शिवाचे देहभाव किंवा महायोगी, जोगी, तापसी, भैरवमूर्ति, भिक्षाटणमूर्ति, कंकाळमूर्ति, नटराज किंवा अर्धनारीश्वरमूर्ति अशा ध्यानधारणा करतां येतील. त्यांचा विचार या प्रकरणांत न करतां केवळ तात्त्विक भावविचार मात्र केला आहे. कारण शिवलिंगासारख्या प्रतीकाच्या उपासनेंत प्रतिमापूजेंतील देहदृष्टि किंवा देहावयवदृष्टि इष्ट नाहीं असें मी समजतों. उपासना कर्तृतंत्र असते. यामुळें उपासकास उपास्यासबंधीं श्रुतिशास्त्राला अविरोधी अशा सद्भावना करण्यास स्वातंत्र्य असतें. ज्या सगुण भावनेंत आपली वृत्ति सूक्ष्म, स्थिर, अपरिच्छिन्न, व्यापक व निर्गुण भावाकडे वळेल अशा भावना मला इष्ट वाटतात.

लिंगपुराण, शिवमहापुराण, स्कंदपुराण, लिंगार्चनचंद्रिका, रुद्रभाष्य इत्यादि ग्रंथांत शिवलिंगाच्या उपासनेसंबंधीं त्याची प्रतिष्ठा, आराधना, अर्चना, पूजा, उपासना, प्रार्थना, योग, याग अथवा होमहवन यांसंबंधीं पद्धति अंतर्बाह्य दृष्टींनीं विस्तारपूर्वक सांगितली आहे. लिंगार्चनचंद्रिकेंत प्रथम सारे वेद, उपनिषदें, पुराणें, इत्यादि प्राचीन ग्रंथ शिवाचा असाधारण महिमा कसा सांगतात तें साधार सांगितलें आहे. शिवाची प्रतिमा ही लोकसंमत असली तरी लिंगपूजा देवांना संमत आहे, असें विश्वेश्वरसंहितेंत म्हटलें आहे. इतर देव शुद्ध ब्रह्मरूप नाहींत, म्हणून त्यांच्या प्रतिमा करतात. शिव हा शुद्ध ब्रह्मरूप असल्यामुळें त्याची लिंगपूजाच म्हणजे प्रतीकपूजाच शास्त्रानें सांगितली आहे. ती मुक्तिप्रद व प्रतिमापूजा भुक्तिप्रद मानली आहे. 'यथासांग प्रतिमापूजेंत जें फळ मिळतें, तें लिंगाच्या व्यंगपूजेनेंहि मिळतें. तसेंच

करून गंध, पुष्प, धूप यांनी पूजा करावी. प्रणवादि सर्व मंत्रांचा जप करावा, प्रणव मंत्र म्हणून शंकराकरितां अष्टदल कमलाचें आसन कल्पावें. अणिमा, लघिमा, महिमा व प्राप्ति हीं त्या कमलाचीं पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर या चार दिशांकडील पानें आहेत असें मानावें. याप्रमाणें उपदिशांकडे प्राकाम्यादि बाकीच्या चार सिद्धि कल्पाव्या. मध्यमार्गी सोम कल्पावा. त्याच्याखालीं सूर्य व त्याच्याखालीं अग्नि. चार उपदिशांस धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य आहेत असें योजावें. मुख्य दिशांकडे अव्यक्त, महत्तत्त्व, अहंकार व चित्त आहेत अशी कल्पना करावी. सत्त्व, रज, तम हे गुण सोमाच्या जवळ ठेवावेत व त्यांच्यावर विश्वात्मा, तैजसात्मा आणि प्राणात्मा या आत्मत्रयाची स्थापना करावी आणि त्यावर शिवाचें पीठ ठेवावें. 'सद्यो जातं' या मंत्रानें शिवाचें आवाहन करावें. "नामदेवाय नमो०" या मंत्रानें स्थापना करावी. रुद्र व गायित्री यांस "अघोरेभ्यो०" या मंत्रानें शंकराचे सन्निध आणून ठेवावें. "ईशानः सर्व विद्यानां०" हा मंत्र म्हणून सर्व पूजा करावी. पाद्यअर्घ्यादि देऊन रुद्र, श्री-सूक्त, रजनीसूक्त, चमक, होतार, अथर्शिरः, शांतिद्वय इत्यादि मंत्रांनीं अभिषेक करावा. पुढें धूप, दीप, नैवेद्य दाखवून सर्वलोककारण अक्षर, पर, अगोचर, असें जें शिवतत्व त्याचें प्रणवमंत्रानें लिंगाचे ठायीं पूजन करावें, स्तोत्रांचा जप करावा, आणि प्रदक्षिणा करून नमस्कार करावा. अर्घ्य देऊन पूजा संपवावी आणि स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणीं या शिवास स्थान द्यावें. आत्म्यावरच त्याचें आरोपण करावें.

प्रतिमापूजा एक वर्ष करून जें फळ मिळतें, तें एक दिवसाच्या लिंगपूजेंत मिळतें. (स्कंद, वायु, लिंग पु.) आणखी लिंगपूजेचें महत्त्व असें आहे कीं, त्यांत इतर देवता व वेद-श्रुति लीन झालेल्या आहेत अशी भावना आहे (स्कंद). लिंगपूजेपेक्षां अधिक पुण्यप्रद दुसरें कर्म नाहीं. शिवाय "कलौ लिंगार्चनं श्रेष्ठम्।" असें शिवरहस्य वैष्णवांच्याहि पद्मपुराणांत सांगितलें आहे. विशेषेंकरून द्विजांनीं वेदोक्त शिवलिंगपूजा करावी असें म्हटलें आहे. देवाधिदेव शिव यास लाक्षणिक दृष्ट्या ब्राह्मण म्हणतात. (सामश्रुति, पाराशरपुराण) रसलिंगाचें आवाहन – विसर्जन करावें लागत नाहीं. याप्रमाणें पुष्कळ माहिती लिंगार्चनचंद्रिकेंत आहे.

शिवतत्त्वासंबंधीं आणि शिवलिंगासंबंधीं पुढें जरी अनेक भावना सांगितल्या असल्या, तरी तत्संबंधी मुख्य भावना ब्रह्मात्मज्ञान, प्रकाश, अग्नि, ज्योति याच आहेत. सति दाक्षायणीला ब्रह्मविद्या, (केन, उप.) चिच्छक्ति, माया, अग्नीची योनि, वेदि असें मानलेलें आढळतें. (ऋ. ३।२७।९; १०।७२।५; १।१४३।२; २।३।७; ३।५।९, सूत संहिता १०।२८; ईशान संहिता, तै. संहिता, ब्रह्मपुराण, अ. १३५; वायुपुराण, अ. ५५; लिंग पु. पू. १७-१९, उ. अ. २५; रामायण उ. कां. अ. ३१) ऋग्वेदांतील महादेव अग्नि (४।५८।३) तोच महादेव होय. अग्नि अष्टमूर्ति व वृषभवाहन वर्णिला आहे. भट्टभास्करांच्या रुद्रभाष्यांत रुद्राची सकाम उपासना होमहवनानें अग्निद्वारांच सांगितली आहे. इंद्र, वायु, ब्रह्मा, विष्णु या देवप्रमुखांस प्रथम शिवसाक्षात्कार झाला तो दिव्य प्रकाशज्योतिस्वरूपांतच झाला. (केन उपनिषद्, लिंगपुराण, शिवपुराण स्कंद. मा. खं. अ. ८ पहा.) मागील २ प्रकरणांत जें साक्षात्काराचें वर्णन आहे तें दिव्य तेजाचेंच आहे. छांदोग्याप्रमाणें तेज हेंच जगत्कारणाचें पहिलें दृश्य स्वरूप होय. (६।२।३). तेजस्वरूप जगत्कारणाचेंच शिवलिंग प्रतीक आहे. वसु, रुद्र, आदित्य हीं सारीं तेजाचींच रूपें होत.

(१) लिंगपुराण, पूर्वार्ध, अध्याय २७ यांत लिंगार्चनपद्धति सांगितली आहे, ती थोडक्यांत सांगतों. प्रथम देहशुद्धि आणि चित्तशुद्धि यासाठीं जलस्नान, भस्मस्नान व मंत्रस्नान केल्यावर पूजास्थानीं बसून प्राणायाम करून, शिवाचें ध्यान करावें आणि "ॐ नमः शिवाय।" ह्या मूल मंत्राचा न्यास करावा. पूजाद्रव्याचें समंत्रक शोधन करावें. मग महादेवाची सपरिवार स्थापना

करून गंध, पुष्प, धूप यांनीं पूजा करावी. प्रणवादि सर्व मंत्रांचा जप करावा, प्रणव मंत्र म्हणून शंकराकरितां अष्टदल कमलाचें आसन कल्पावें. अणिमा, लघिमा, महिमा व प्राप्ति ह्या त्या कमलाचीं पूर्व, दक्षिण, पश्चिम व उत्तर या चार दिशांकडील पानें आहेत असें मानावें. याप्रमाणें उपदिशांकडे प्राकाम्यादि बाकीच्या चार सिद्धि कल्पाव्या. मध्यभागीं सोम कल्पावा. त्याच्याखालीं सूर्य व त्याच्याखालीं अग्नि. चार उपदिशास धर्म, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य आहेत असें योजावें. मुख्य दिशांकडे अव्यक्त, महत्तत्त्व, अहंकार व चित्त आहेत अशी कल्पना करावी. सत्त्व, रज, तम हे गुण सोमाच्या जवळ ठेवावेत व त्यांच्यावर विश्वात्मा, तैजसात्मा आणि प्राणात्मा या आत्मत्रयाची स्थापना करावी आणि त्यावर शिवाचें पीठ ठेवावें. 'सद्यो जातं' या मंत्रानें शिवाचें आवाहन करावें. "वामदेवाय नमो०' या मंत्रानें स्थापना करावी. रुद्र व गायत्री यांस "अघोरेभ्यो०' या मंत्रानें शंकराचे सन्निध आणून ठेवावें. "ईशानः सर्व विद्यानां०" हा मंत्र म्हणून सर्व पूजा करावी. पाद्यअर्घ्यादि देऊन रुद्र, श्रीसूक्त, रजनीसूक्त, चमक, होतार, अथर्वशिरः, शांतिद्वय इत्यादि मंत्रांनीं अभिषेक करावा. पुढें धूप, दीप, नैवेद्य दाखवून सर्वलोककारण अक्षर, पर, अगोचर, असें जें शिवतत्त्व त्याचें प्रणवमंत्रानें लिंगाचे ठायीं पूजन करावें, स्तोत्रांचा जप करावा, आणि प्रदक्षिणा करून नमस्कार करावा. अर्घ्य देऊन पूजा संपवावी आणि स्वतःच्या आत्म्याच्या ठिकाणीं या शिवास स्थान द्यावें. आपल्या आत्म्यावरच त्याचें आरोपण करावें.

(२) पुढें लिंगपुराणाच्या पूर्वार्धांतील अठ्ठाविसाव्या अध्यायांत शिवाची मानसपूजा सांगितली आहे ती थोडक्यात अशी:— आपल्या हृत्कमलांत अग्नि, सूर्य व सोम यांच्या मंडलांची स्थापना करावी. त्यांवर गुणत्रय व आत्मत्रय यांस बसवावें, मग निष्कल व सकलाकृति व कांतासहित अशा महेश्वराचें ध्यानविधीनें पूजन करावें. हेंच ध्येय होय. 'सर्वं तु खल्विदं ब्रह्म' इत्यादि मंत्रांनीं शिवाचा गौरव करावा व त्यास नमस्कार करून ध्यान करीत बसावें. चतुर्व्यूहमार्गानें ईश्वराचें ध्यान करावें. अन्नमय, प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय असे चार कोश हेच मार्ग असावेत. संसारहेतु, संसार, मोक्षहेतु व निवृत्ति असे चार व्यूह आहेत. श्रद्धा, भक्ति आणि ध्यान यांच्या योगानें मोक्ष मिळतो. भक्त शिवाहून भिन्न नाहीं अशी भावना करावी.

(३) लिंगपुराण पूर्वार्धाच्या पंचाहत्तराव्या अध्यायांत असें सांगितलें आहे कीं, हजारों कर्मयज्ञांपेक्षां तपोयज्ञ चांगला. तपोयज्ञसहस्रांहून जपयज्ञ चांगला. जपयज्ञसहस्रांहून ध्यानयज्ञ विशेष आहे. ध्यानानेंच ज्ञान होतें. मनाची समता करून ध्यान लावून जो योगी पहातो, त्याचेजवळच शिव असतो. परानंदात्मक शुद्ध, निष्कल, अक्षर, सर्वग, असें शिवलिंग योग्याच्या हृदयांत असतें.

(४) शिवलिंग दोन प्रकारचें असतें—(१) बाह्य व (२) आभ्यंतर. बाह्य लिंग हें स्थूल आहे. कर्ममार्गी व अज्ञानी, ज्यास आभ्यन्तरींचें सूक्ष्म लिंग उपजत नाहीं, अशा लोकांचे मनांत भावना उत्पन्न करण्यास स्थूल लिंगाची आवश्यकता असते. ज्ञानी जनांस आभ्यन्तरींचें आध्यात्मिक सूक्ष्म लिंग नेहमीं प्रत्यक्ष दिसत असतें. वस्तुतः सकल-निष्कल असा भेद नाहींच. हें सर्व शिवमय आहे.

(५) लिंगपुराणाच्या पूर्वार्धातील ब्याहत्तराव्या अध्यायांत पाशुपतव्रत सांगितलें आहे. त्यांतहि हें सर्व जगत् शिवलिंगमय आहे. वास्तव पिंडांतर्गत तत्त्वांचें शोधन करून हें सर्व शरीर चिदात्म्यानें म्हणजे शिवभावानें भरून काढावें, असेंच सांगितलें आहे.

(६) शैवपंथांत पशु, पाश आणि पशुपति अशीं तीन तत्त्वें मानतात. त्यांत संसारवश जीव हे पशु, माया किंवा अविद्या हे पाश, आणि भगवान् रुद्र हे पशुपति असें सांगितलें आहे व अखेर (उत्तरार्ध, अ. ९) मुमुक्षूला असा उपदेश केला आहे कीं, 'वाग्जालांनीं उगाच बडबड कां करतोस? शास्त्ररूपी अन्धकारांत भ्रमण करूं नकोस. भय कोठेंहि दिसत नाहीं. वायूहूनहि चपळ असा जो दारांत बसणारा इंद्रियांचा नायक (म्हणजे मन) त्याचें संयमन कर आणि ॐ काररूपी दिवा पाजळून त्या घराच्या म्हणजे शरीराच्या मालकास शोधून काढ. सूक्ष्म, अन्तस्थ, शिव हा आपल्या अंतर्यामीं आहे. तोच या घराचा मालक आहे. त्याची ओळख करून घेतली पाहिजे. याप्रमाणें ज्ञान्यांनीं आनंदमय कोशांत राहून आपणां स्वतःमध्येंच मोक्ष (अभयपद) प्राप्त करून घ्यावा.

(७) पुढें शिवलिंगपुराण, उत्तरार्ध, अध्याय अकरा यांत नंदिकेश्वर सनत्कुमारांस सांगतात कीं, शिव हा एकच परंतु तो जीवरूपानें प्रत्येक शरीरांत

असतो. उमा देहक्षेत्र आहे तेंच पीठ होय आणि शिव हा क्षेत्रज्ञ समजावा. तोच लिंग समजावा. श्रेयार्थी लोकांनी अशा या शिवलिंगाचें मानसपूजन व मनन करावें.

(८) नाथसंप्रदाय हा शिवलिंगोपासकच आहे. या संप्रदायांत श्रीगोरक्षनाथ हे सर्वांत जास्त प्रसिद्ध आहेत. त्यांच्या कविताच्या बाडांत पुढील पद्य आहे. "पाषाणाचीं देऊळें। पाषाणाचा देवो। पाषाणाची पाउली। तेथ न फिटे संदेहो। कसें बोलों पडितो। देवो कळणें ठाईं। निजलिंग न्याहाळिता। आम्ही तुम्ही नाहीं॥" (महाराष्ट्र सारस्वत, पा. ३७) अशी आत्मपरच शिवलिंगोपासना सांगितली आहे.

(९) शिवगीतेंत (अ० १६) भगवान् श्रीरामाला सांगतात कीं, "संसारान्मुच्यतेजन्तुः शिवतादात्म्यभावनात्। तथा दान तपो वेदाध्ययन चान्यकर्म वा। सहस्रांश तु नार्हन्ति सर्वदा ध्यानकर्मणः॥ १३॥ याप्रमाणें आत्मलिंगाचे ठिकाणींच शिवलिंगाची धारणा सर्वांत श्रेयस्कर सांगितली आहे.

(१०) शिवानें वसिष्ठाला हेंच पुनः पुन्हा सांगितलें आहे. शिवलिंग हें आत्मलिंगाचेंच प्रतीक मानावें. (यो. वा ६।१।२९ पहा.)

(११) काश्मिरीय शैवदर्शनात ईश्वराद्वयवादच सांगितला आहे आणि श्रीकंठ, श्रीअप्पय दीक्षित इत्यादींच्या इतर शैवपंथांचें अंतिम पर्यवसान जीवशिवैक्य हेंच आहे.

(१२) शिवपुराणाच्या सनत्कुमारसंहितेच्या अ. ३८ मध्यें लिहिलें आहे कीं, "पुरुष शाश्वत सूक्ष्म द्रष्टव्य ध्यानचक्षुषा। यतते ध्यान योगेन यदि पश्येत पश्यति॥ + + + परमात्मा हृदिस्थो हि स च सर्वं प्रकाशते। म्हणजे शाश्वत आणि दिव्य असा पुरुष कोण तें ध्यानरूपी नेत्रानें पाहावें. जो हें पाहील तोच डोळस समजावा. परमात्मा हृदयांत असून सर्व प्रकाशित करतो.

(१३) शिव हें योगतत्त्व आहे कालिदास कुमारसंभवात (३-५०) म्हणतात —

"मनो नवद्वार निषिद्धवृत्ति। हृदि व्यवस्थाप्य समाधिवश्यम्। यमक्षर क्षेत्रविदो विदुस्तमात्मानमात्मन्यवलोकयन्तम्॥ म्हणजे नव इंद्रियद्वारातून संचार करणारी मनोवृत्ति समाधिद्वारा वशीभूत करून ती कूटस्थ आत्म्याच्या ठिकाणीं लावणें हेंच शिवरहस्य आहे.

(१४) शिवलिंगासंबंधीं आधियाज्ञिक दृष्टीनें विचार करतां दाक्षायणी, योनि, शालुंका हीं सर्व नांवें वेदीलाच लावलीं आहेत. (ऋग्वेद ३।२७।९; १०।७२।५; १।१४३।२; २।३।७, ३।५।९; निरुक्त ११।२३; तै. सं. ४।१।१०) लिंग ठेवण्याच्या जागेस रामायणांत वेदीच म्हटलें आहे (उत्तरकांड ३१।४२). महाभारत, सौप्तिक पर्व, अ० ७ यांत अश्वत्थाम्यानें वेदीवरून अग्नींत उडी टाकली, त्यातून शंकर प्रगट झाले असें म्हटलें आहे. उत्तरायणीला पुरूरवा हें शंकराचें नांव आहे व त्यास गुंडाळण्याच्या दोरीला सर्प म्हणतात. यज्ञांतील यूपाच्या स्तुतींशीं विराट ज्योतिर्लिंगाचें कांहीं साम्य दिसतें. (श. ब्रा. बृहत्संहिता, अ. ५८,५३, ५४; अथर्ववेद १०।७)

(१५) पद्मपुराणांत पाताळ खंड (अ० १०५) यांत श्रीराम शिवाला विचारतात कीं, 'ज्या शिवपूजेनें पापाचा नाश होऊन मोक्ष प्राप्त होतो, ती शिवपूजा कशी करावी?' त्यावर शंभु म्हणाले कीं, 'लिंगपूजेचा विधि गहन आहे. तो मोठमोठ्या ऋषींसहि माहीत नाहीं. कोणी त्याची हृदयांत स्थापना करून पूजा करतात; तर कोणी अग्नि हेंच त्याचें स्वरूप मानून त्याची पूजा करतात. सगळ्यांत पारदाचें लिंग श्रेष्ठ. पूजेनंतर आपल्या शरीरावर लिंगाचें धारण करावें. ब्रह्मदेवानें मस्तकावर लिंग धारण केलें. (पंढरीच्या विठोबानेंहि मस्तकीं लिंग धारण केलें आहे) लक्ष्मीनें ललाटावर, बाणानें मूर्धास्थानीं, हरकर्णानें कानांत व इतर पुष्कळ माणसांनीं व राक्षसांनीं तें शरीराच्या निरनिराळ्या भागांचे ठिकाणीं धारण केलें. कमरेच्या खालीं लिंग धारण करणें हा अगदीं गौण पक्ष आहे यापमाणें पद्मपुराणांतहि शिवलिंगमहिमा सांगितलाच आहे [ लिंगसंपूजनं मुख्यमलाभे प्रतिमादिषु। पद्म. पु. १०१।११४ ]

(१६) शिवलिंगार्चनाची ही आणखी भावना पहा.

" चित्सागरीं मिळे जाऊनी। न्यायाचे युक्तीनें वृत्ति उद्धरुनी। एवं वृत्ति जळें लिंगरूप निर्गुणीं। अभिन्नत्वें शिंचिलें ॥ ४६ ॥ दृश्य पुष्पें स्वता निर्माण। येणें शिवलिंगाचें केलें पूजन। इकडे चचल तत्त्वें तीं दिव्य सुमनें। निश्चळीं समर्पिलीं ॥ ४७ ॥ वनामाजीं फळें जीं निर्मित। हें प्रवृत्तिरूप पूजन होत। निवृत्तिरूपें सहज कर्मफळें समस्त। निष्कर्मत्वें वाहिलीं ॥ ४८ ॥ एव प्रवृत्ति समसमानें। शिवलिंग पूजिलें रामानें। याच रीतीं जीवानें करणें। जया चाड मोक्षाची ॥ ४९ ॥" (रेणुकेश्वरी अ० ४)

(१७) शिवाद्वैतदर्पणांत शिवलिंग ही योगाकृति असल्याचें दर्शविलें आहे. म्हणजे आसनावर मांडी घालून बसलेल्या योग्यानें दोन्ही हात पुढें करून त्यावर धरलेल्या इष्ट लिंगाचें ध्यान करीत असावें, अशी शिवलिंगाकृति आहे. योग्याचें मुंडण केलेलें मस्तक हाच शिवलिंगाचा माथा, त्यानें दोन्ही हात पुढें करणें हीच जलहारीची लांबट पन्हळी किंवा साळुंका (अर्थात् एक हात उंच अशा बैठकीच्या स्थावरलिंगाची) समजावी. साळुंकेचा खालचा भाग हेंच शिवयोग्याचें खालचें अंग व मांडी समजावें. अशी एका मंत्रपिण्डाची शिवयोगाकृति होय. तो मंत्र असा :—

ॐकारो वदनं देवि नमःकारो भुजद्वयं। शिकारो देहमध्यस्तु वाकारो पदद्वयं। पीठं पादादि जान्वन्तमानाभे मध्यमीरितिम्। हृदयन्तं वर्तुलं स्यात् कंठात् गोमुखं स्मृतम् भ्रूमध्यान्तं लिंगकंठो मस्तको लिंगमस्तकः॥ शिवाद्वैत-दर्पण, पृ. ४९.

(१८) मूळ पीठ, ऊर्ध्व पीठ व पिंडी मिळून महालिंग होतें. असें शिव-संप्रदायांत मानतात. मूळपीठ ब्रह्मा किंवा रजोगुणाचें चिन्ह, ऊर्ध्व पीठ विष्णु किंवा सत्त्वगुणाचें चिन्ह व पिंडी हें शिव किंवा तमोगुणाचें चिन्ह व एकंदर महालिंग म्हणजे ब्रह्मा-विष्णु महेशात्मक त्रिमूर्तिरूप परब्रह्म प्रतीक होय. असें तीन मुखांचें लिंग घारापुरीच्या कोरीव लेण्यांत आहे.

(१९) कै. लक्ष्मणराव पांगारकर मराठी वाङ्मयाच्या इतिहासांत (खं. १, पृ. १७७) लिहितात कीं, समाधिस्थितींत योग्याचें शरीर महालिंगाच्या आकाराचें होतें व स्वयंभू शिवलिंगें हीं महायोग्यांची समाधिस्थ मृत शरीरें होत.

(२०) पंचमुखी शिवलिंग म्हणजे पंचज्ञानेंद्रियें व पार्वती म्हणजे अंगभूत प्रकृति जाणावी.

(२१) मोहन जो दारो येथील उत्खननांत एक शिवलिंगाचें चिन्ह सांपडलें तें एका समभुजऊर्ध्वशिर त्रिकोणाच्या ऊर्ध्व कोनावर दुसऱ्या समभुज त्रिकोणाचा अधःकोन (त्रिकोण उलट करून) ठेवलेला असून यावरच्या त्रिकोणाच्या ऊर्ध्व पायावर एक सरळ रेषा काढून त्यावर एक अण्डाकार काढ-लेला आहे. म्हणजे इंग्रजी एक्स, रोमन दहा, किंवा गुणिलें चिन्ह, त्यावर रेघ आणि त्या रेघेवर लंबवर्तुळ ⨯ असा त्याचा आकार शिवलिंगासारखा होतो. ही

आकृति कर्नाटकांतील लिंगायतांच्या घरांच्या भिंतीवर आढळते. ह्याला कुड म्हणतात. या आकृतींत जो तात्त्विक पुरुषप्रकृतिसंयोग दाखविला आहे, त्याचा खुलासा असा करतात कीं, प्राचीन द्रविडांची, "आन" = शिव, "आनील" = "शरण" = "अग" = साक्षी, किंवा अक्षर पुरुष, "अम्मा" = चिच्छक्ति = पराप्रकृति, "अलम्" = अपराप्रकृति = सृष्टि, अशी परिभाषा आहे. त्याप्रमाणें वरील शिवलिंगाच्या आकृतीचा खालचा सत्त्व–रज–तमाचा त्रिकोण म्हणजे अपराप्रकृति किंवा सृष्टि तीवरील उलटा त्रिकोण म्हणजे "अम्मा" अथवा सच्चिदानंदमयी चिच्छक्ति, व तीवरील सरळ आडवी रेषा म्हणजे अक्षरपुरुष किंवा साक्षी म्हणजे "आनील" आणि त्यावरील शून्य म्हणजे "आन" अथवा केवळ शिवतत्त्व होय.[1]

(२२) स्वामी विवेकानंद यांचें म्हणणें असें दिसतें कीं, यज्ञांतील यूपस्तंभाची अथर्ववेदांत (१०।७) जी स्तुति आहे, त्यांतूनच शिवलिंगपूजा उगम पावली आहे. यज्ञांतील ह्या स्तंभ किंवा स्कंभाला अनंतब्रह्माचें अनाद्यनंत प्रतीक असें मानलें जात असे. पुढें यज्ञाचा अग्नि, धूर, भस्म, ज्वाला, सोम, सोमवाहक वृषभ, आणि वैदिक यज्ञसंज्ञा यांच्या ठिकाणीं, भस्माच्छादित शिवाचें शरीर, त्याच्या पिवळट जटा, नीळकंठ, वृषभवाहन, असें मूर्तिकरण होऊन यूपस्तंभाचे ठिकाणीं (वेदीसह) शिवलिंग आलें व तेंच शिवरुद्ररूप मानूं लागले. अथर्ववेदांतील (१०।७) स्कंभाच्या स्तुतीचा विस्तार लिंगपुराणात आख्यानकस्वरूपांत होऊन ह्याच स्तंभाचें व महादेवाचें (याज्ञिकांचा अग्नि–महा देव) माहात्म्य वाढलें. तात्पर्य, अल्पसंख्य वैदिकांच्या कर्मकांडांतील अग्निपूजेच्या ठिकाणीं बहुसंख्य शिवभक्तांची सुलभ साधी अशी लिंगपूजा सार्वत्रिक सुरू झाली.[2]

---

१ साखरेकृत लिंगायतांचा इतिहास व तत्त्वज्ञान, पृ. ८४ व प्रबुद्धभारत, एप्रिल १९४२, पृ. १८१ पहा.

२ बृहत्संहिता, अ. ५३, ५४, ५८, अथर्ववेद, १०।७; श. ब्रा. ३।७।१।१४; स्वामी विवेकानंद यांचे संपूर्ण ग्रंथ, मायावती प्रत, खंड ४ पृ. ९४२.

अथर्ववेदांतील स्कंभवर्णनांतील कांहीं मंत्र पुढें दिले आहेत.

## (७) सर्वाधारवर्णनम्

कस्मिन्नङ्गे तपो अस्याधितिष्ठति कस्मिन्नङ्ग ऋतमस्याध्याहितम् ।
क्व व्रतं क्व श्रद्धास्य तिष्ठति कस्मिन्नङ्गे सत्यमस्य प्रतिष्ठितम् ॥ १ ॥
कस्मादङ्गाद्दीप्यते अग्निरस्य कस्मादङ्गात्पवते मातरिश्वा ।
कस्मादङ्गाद्वि मिमितेऽधि चन्द्रमा मह स्कम्भस्य मिमानो अङ्गम् ॥ २ ॥

\+ + +

यस्मिन्स्तब्ध्वा प्रजापतिर्लोकान्सर्वाँ अधारयत् ।
स्कम्भं तं ब्रूहि कतमः स्विदेव सः ॥ ७ ॥

\+ + +

यत्र तपः पराक्रम्य व्रतं धारयत्युत्तरम् ।
ऋतं च यत्र श्रद्धा चापो ब्रह्मसमाहिताः स्कम्भं तं ब्रूहि कतमः
स्विदेव सः ॥ ११ ॥

यस्मिन्भूमिरन्तरिक्षं द्यौर्यस्मिन्नध्याहिता ।
यत्राग्निश्चन्द्रमाः सूर्यो वातस्तिष्ठन्त्यार्पिताः स्कम्भ तं ब्रूहि कतमः
स्विदेव सः ॥ १२ ॥

यस्य त्रयस्त्रिंशद्देवा अङ्गे सर्वे समाहिताः ।
स्कम्भं त ब्रूहि कतमः स्विदेव सः ॥ १३ ॥

\+ + +

यत्रादित्याश्च रुद्राश्च वसवश्च समाहिताः
भूतं च यत्र भव्यं च सर्वे लोकाः प्रतिष्ठिताः स्कम्भं तं ब्रूहि कतमः
स्विदेव सः ॥ २२ ॥

\+ + +

स्कम्भो दाधार द्यावापृथिवी उभे इमे स्कम्भो दाधारोर्वन्तरिक्षम् ।
स्कम्भोदाधार प्रदिशः षडुर्वीः स्कम्भ इदं विश्वं भुवनमाविवेश ॥ ३५ ॥

[अपूर्ण]

(२३) थिऑसोफिस्ट यांची कल्पना अशी आहे कीं, कुलकुंडलिनीयोगांत जे घनपडण प्राणसंचार पृष्ठरज्जूंत होतात, त्या वेळीं प्राण खालीं येतो व अपान

वरती येतो या अपानाला पट्चक्रनिरूपणात आरक्त वर्णाचा कदर्प नावाचा जीवेश असें म्हटलें आहे या प्राणद्वयाच्या तीव्र संघर्षास दिव्यलग्न म्हणतात. यावरून खालीं आणि खालून वर येणाऱ्या उभ्या लयरूप प्राणगतीच्या संघर्षणामुळें प्राणापानाच्या संघर्षाच्या जागीं वर्तुळाकार काटकोनांत आडवें चक्र बनतें. या चक्रातील मध्य गिरणीतील घोट्याप्रमाणें जोरानें वरखालीं येत राहिल्यामुळें एक बरेंच लंब असें तोंडल्यासारखें, किंवा सरळ काकडीसारखें उभें लंबवर्तुळ बनतें. या उभ्या वर्तुळाचा निम्मा भाग काटकोनातील आडव्या वाटोळ्या चक्राच्या खालीं व निम्मा भाग वर ( कांहींसा शनिग्रहाप्रमाणें ) थिऑसोफिस्टांच्या उपपत्तीप्रमाणें येतो. आडवी विस्तार पावणारी गति ही विष्णूची, अर्थात् ती विश्वयोनि आहे व उभी वरखालीं अधोर्ध्व होणारी लयरूप गति ही शिवाची म्हणजे निमित्तरूप जगत्कारणाची आहे. या प्राणापानाच्या गतीच्या आकृतींत आडव्या-वाटोळ्या शाळुंकेंत उभें अर्धें लिंग खालीं बुडालेलें व अर्धें वर असलेलें अशीच शिवलिंगाची आकृति तयार होते. या पिण्डब्रह्माण्डातील नैसर्गिक धनऋणात्मक प्राणसंचाराच्या आकृतीवरून शिवलिंगप्रतीक हिंदूंच्या पूर्वजांनीं बनविलें असावें, असा बिशप लेडबिटर याचा तर्क आहे.[1]

( २४ ) ज्याप्रमाणें वटबीजात वटवृक्ष अव्यक्त असतो, त्याप्रमाणें आकाशासारख्या दिसणाऱ्या घुमटाखालीं असणाऱ्या बीजरूप शिवलिंगात पुढीलप्रमाणें अव्यक्त रुद्र पाहतात. रुद्र या शब्दाच्या धात्वर्थावरून व इतर वर्णनावरून विद्युत्शाली मेघ हेंच कोणी रुद्राचें प्रतीक मानतात. या रुद्राचा वर्षा करणारा वृषभ वाहन आहे. चोहों बाजूंनीं चमकणाऱ्या विजाच या धूर्जटीच्या जटा होत. इंद्रधनुष्य हेंच या पिनाकपाणीचें धनुष्य असून विद्युत्पातरूप त्याचे बाण आहेत. मेघधारामुळेंच त्यास गंगाधर म्हणतात. मेघाच्या कृष्णवर्णामुळें त्यास कृत्तिवास हें नाव शुळतें. जवळच चंद्र असल्यामुळें त्याचें चंद्रशेखर हें नाव शोभतें. अहि हा जलाचा पर्याय असल्यामुळें तो अहिभूषण आहे. तो सर्वव्यापक असल्यामुळें महादेव आहे औषधिद्वारा सर्व पशूना पुष्ट करीत असल्या-

१ *बिशप लेडबिटर यांचें* 'चक्र' *या पुस्तकाचें प्रकरण २ व प्रो अरुंडेल* यांच्या 'लोटस फायर' या पुस्तकाचें पृ. २२२ पहा.

मुळें त्यास त्रिपुरारि म्हणतात. पृथ्वी, अंतरिक्ष आणि द्यौ येथील तीन धर्मांच्या-मुळें तो त्रिनेत्र आहे. अशी ही शिवलिंगाच्या ठिकाणीं करावयाची व्यापक भावना आहे.

( २५ ) कोणी पिण्डांतर्गत ( आत्म ) लिंगावर मस्तिष्करूप घटांतून षड्-जीमेच्या द्वारां स्रवणाऱ्या अमृताचा होणारा अभिषेक हेंच एक प्रकारचें लिंगार्चन अशी भावना करतात.

( २६ ) क्षितीतत्त्वशास्त्राप्रमाणें पूर्व-पश्चिम आडवी पसरणारी रेषा ( साळुंकी ) ती मातृशक्ति व उभी वरपर्यंत उत्तर-दक्षिण अधोर्ध्व जाणारी रेषा ( पिंडी ) ती कारणरूप × पुरुषशक्ति होय. याप्रमाणें दोन रेषांच्या छेदनांत त्यांचें † क्रॉस हें चिन्ह बनतें. Phallus ही याचीच विकृत कल्पना होय.

( २७ ) तैत्तिरीय उपनिषदाप्रमाणें आकाश आणि वायु हीं मूळ अदृश्य तत्त्वें होत. आकाश हीच महद्योनि साळुंका व पिंडी हाच त्यांतील वात-स्तंभ होय.

( २८ ) छांदोग्याप्रमाणें सृष्टीचें पहिलें दृश्यकारण तेज होय. ( तत्तेजोऽसृजत। ६।२।३ ) त्यांतून पुढें जलादि भूतसृष्टीचें अवतरण होतें. याचेंच ज्योतिर्लिंग आणि जलहारी हीं प्रतीकें आहेत.

( २९ ) तेज हें ऊर्ध्वगामी आहे व जल अधोगामी आहे. याचप्रमाणें गति-अगति, संकोच-विकास या विरोधी धर्मांचा आश्रय ईश्वर होय. त्याचें हें प्रतीक आहे.

( ३० ) सृष्टीचें आद्यंत स्वरूप शास्त्राप्रमाणें अण्डाकारच मानावें लागतें. त्याचें पिंडी हें प्रतीक होय. मयूरांडांतून जसा मोराचा चित्र-विचित्र पिसारा व्यक्त होतो, त्याप्रमाणें या आपातरमणीय विश्वाचें हें अव्यक्त अंड आहे.

( ३१ ) ब्रह्म हें अरूप आहे. त्याची प्रतिमा संभवत नाहीं. म्हणून अरूप शिवलिंग हें त्याचें प्रतीक आहे.

( ३२ ) शिवशक्ति अविनाभूत कशी तें बाणलिंगांत दिसतें.

( ३३ ) "आत्मासाक्षी शिवमूर्ति। आणि बुद्धि होचे पार्वती। सेवाधारक प्राण असती। शरीर हें देऊळ॥" याप्रमाणें शिवलिंग व शिवालय यांसंबंधी भावना करावी.

( ३४ ) सच्चिदानंदलक्षणपरमात्म्याचा आनंद हा भाव शिवभक्तांचें उपास्य असतें. त्या निरतिशयानंदाचें जें ताटस्थ्य तेंच या लिंगांत दाखविलें आहे.

( ३५ ) ईशान म्हणजे आकाश, तत्पुरुष म्हणजे वायु, अघोर म्हणजे अग्नि, वामदेव म्हणजे जल आणि सद्योजात म्हणजे पृथ्वी हीं शिवाचीं पांची तात्त्विक रूपें या पाषाणलिंगांत अनुप्रविष्ट व अव्यक्त आहेत.

( ३६ ) सृष्टयुपासक व आधुनिक सृष्टिविज्ञानवादी असें सांगतात कीं, सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वीचा अतराळांतील तेजोमेघ प्रथमतः सृष्टिक्रमांत थंड होत चापट झाला व त्याची एक प्रचंड दीर्घ वर्तुळ तबकडी बनली. त्या तबकडीच्या मध्यमार्गी शनीच्या गोलाप्रमाणें पिंडी उत्पन्न झाली तोच सूर्यमालेंतील सूर्य व त्यासभोंवतालच्या कडेपासून पुढें ग्रहगोल व लोक बनले. त्याच जगत्कारणरूपाची शिवलिंग ही प्रतिमा मानावी. मधली पिंडी हें ज्योतिस्वरूप सूर्याचें लिंग व समोंवतालची शाळुंका हीच प्रकृतिपीठाचीं वलयें होत.

( ३७ ) अथवा ज्याप्रमाणें बीजांतूनच वृक्ष उत्पन्न होतो व त्या रूपांतच पुन्हां परिणाम पावतो, त्याप्रमाणें हें ब्रह्मवन ज्यांतून व्यक्त झालें व ज्यात लय पावेल, तें आद्यन्त अधिष्ठान शिवरूप होय. यास्तव शिवतत्त्वाला नाशक न मानता पुनरुत्पादक असें मानतात. सृष्टयुन्मुख चिज्ज्योतीचें भौतिकदृष्ट्या पाषाणलिंग हें सृष्टिक्रमातलें अखेरचें खनिज पर्यवसान तसेंच प्रथमचें पुनरुत्थान होय.

( ३८ ) जी शिवरात्र मूर्तिपूजाविरोधाची स्मारक रात्र असें आर्यसमाजी मानतात, त्याच शिवरात्रीं प्रथम अतिप्राचीन श्रद्धावान् अशा भाग्यवानांना शिवलिंग ज्योतिस्वरूप दिव्य दिसलें.

> माघ कृष्ण चतुर्दश्यामादिदेवो महानिशि ।
> शिवलिङ्गतयोद्भूतः कोटि सूर्य समप्रभः ॥

दृढश्रद्धेचे डोळे किंवा डोळस श्रद्धा पाहिजे म्हणतात ती याचसाठीं. जीवाच्या मनश्चंद्रम्याची-निस्सीम त्यागाची पूर्वतयारी ती शिवरात्र होय. जीवभावाचा अस्त तोच शिवाचा महोदय होय.

( ३९ ) यज्ञीय पशुबळी ज्याला बांधतात त्याला यूप किंवा स्कंभ म्हणतात. त्याप्रमाणें साधकाचा परिच्छिन्न जीवभाव ज्ञानाग्नींत बलि द्यावयाचा असता

आत्मनिवेदनरूप भक्तिरज्जूनें उपासक जेथें विलीन होतो असा हा शिवलिंग-रूप स्थाणु जाणावा

(४०) अतिदीप्तिमान वस्तु कृष्णवर्ण भासते, अतिदूरची वस्तु तद्रीच दिसते, अतिगतिमान वस्तु स्थिरशी भासते, ज्ञात्याचें मौन ताटस्थ्यरूप असतें, तसं हें दिव्यानुभूतीचें जड भासणारें प्रतीक शिवलिंग होय.

(४१) व्यवहारात रात्रीं काळोखातील स्थाणूवर चोराचा भ्रम होतो, तसा उलट चोराच्या ठिकाणीं झाडाचे खुंठ असाहि भ्रम संभवतो त्याप्रमाणें वस्तुत. भावनाप्रधान उपासकाचें मन हरण करणाऱ्या व्यापक हराच्या ठिकाणीं शिवा-लयातील गर्भागारात कोणास पाषाणरूप शिवलिंगाचा जणू भास होतो तो पाषाण नव्हे भक्तमनोहर शिवच तो, असें जाणावें

(४२) शिवाची पिंडी म्हणजे जणू आकाशाचा घुमट अथवा अंतराळातील वातस्तंभ किंवा स्थंडिलातील भस्माच्छादित अग्नि, नाहीं तर समष्टि कर्म-सलिलावरील एक दिव्य लाट, अथवा भूपृष्ठावरील क्षुद्र जीवाचें निर्भय आश्रय-स्थानरूप वारूळ मानावें

(४३) आदि-अंतीं असणारें जें शून्य त्या पूज्याची अथवा शून्याची आकृति आपण अंडाकृति काढतों विश्व हें अंडाकृति आहे असेंच भौतिक शास्त्रज्ञ म्हणतात. आकाश आणि सारे खगोल अंडाकृति अथवा गोलाकृतीच दिसतात. 'अणोरणियान् महतो महीयान्' असें जें तें अंडाकृतीच असलें पाहिजे. असें सद्रूप, अव्यक्त, शून्य, चिद्रूप, प्रकाशरूप किंवा स्थूल व्यक्त ब्रह्मांड या सर्वांची गोलाकृति दाखविणारी जी पिंडी तेंच शिवलिंग होय

(४४) प्रत्यक्ष —शिवलिंग हें शिवाचें लक्षणेनें ज्ञानगत व निर्विकल्प असें प्रत्यक्षच आहे "अवघें ब्रह्मरूप। रिता नाहीं ठाव। प्रतिमा तो देव। कैसा नव्हे॥" असें संत तुकाराम म्हणतात संत श्रीविठ्ठल या आपल्या उपास्य मूर्तीकडे पाहून म्हणतात कीं, "आजि म्यां ब्रह्म पाहिलें, समचरण विटेवरी उभें राहिलें," कमलमुख म्हणजे मुखच अलंकार तें सुवर्णच आता श्रीसमर्थ म्हणतात कीं, " उपासना हाहि भ्रम निश्चयेसीं," पण हा संवादि भ्रम आहे शिवाय भ्रमहि निरधिष्ठान नसतो रज्जुसर्पभ्रमात जाणते डोळस रज्जूच पाहतात उपासना म्हणजे जवळ जाणें तेथें भ्रम उरत नाहीं रज्जुसर्पाचें

छायाचित्र ( यथार्थ दर्शन ) घेतलें तर तें रज्जूचेंच येतें. वीरशैव व लिंगायत शिवलिंगाला शिवच मानतात. शिवलिंग या नामरूपाला परमशिव या अधिष्ठानोपादानाहून पृथक् सत्ताच नाहीं. याप्रमाणें शिवलिंगोपासना ही लक्षणेनें प्रत्यक्ष शिवाचीच उपासना आहे सराफाची नजर अलंकाराच्या सुवर्णावर खिळते. त्याप्रमाणें श्रेष्ठ शिवलिंगोपासक शिवलिंगाचे ठिकाणीं परमशिवाची धारणा करतात. हेंच रहस्य विसोबा खेचर यानीं नामदेवास पटविलें. " वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं, मृत्तिकेत्येव सत्यम् " छां ६।१।४

( ४५ ) **अनुमान** :—कार्यावरून कारणाचें अस्तित्व अनुमानित होतें. संपूर्ण कारण आणि संपूर्ण कार्य हीं एकरूपच असतात. त्यांच्यांत अभेद असतो. प्रत्येक पदार्थ नामरूपकर्मात्मक असतो. एका शिवसंकल्पांत नामरूपकर्म या तिघांचा अंतर्भाव होतो. अर्थात् प्रत्येक पदार्थ शिवसंकल्परूपच आहे. गाण्यावरून गायकाचें, चित्रावरून चित्रकाराचें अस्तित्व सिद्ध होतें. कल्पक आणि कल्पना यांचा अभेदसंबंध आहे. सोंगामागें नट असतो. शिवसृष्टीच्या उपलक्षणात्मक शिवलिंग या नामरूपकर्मात्मक चिन्हाच्या मागें अभिन्नोनिमित्तोपादानकारणरूप चेतन शिव हा अनुमानप्रमाणानें सिद्ध होतो. अखिल नामरूपकर्मात्मक विश्वरूप कार्याची कारणता अनुमानानें सिद्ध आहे. त्या कारणतेचें शिवलिंग प्रतीक आहे. अथवा जगत्कार्याच्या कारणाचें जें सूचक प्रश्नचिन्ह तेंच शिवलिंग होय.

( ४६ ) ज्या ठिकाणीं सर्व लय पावतें, तें एक अज्ञात, तमप्रधान कारणब्रह्मच असल्यामुळें शिवालयाच्या गर्भागाराच्या अंधारांत गडदलेलें अरूप किंवा तमोरूप शिवलिंग हें कारणब्रह्म किंवा सबीजसब्रह्म यांचें बोधक प्रतीक जाणावें.

( ४७ ) या ब्रह्माण्डाचें कारण कसें असेल या उपमेचें उपमान अंडज प्राण्याच्या अंड्याप्रमाणें अंडाकार, तसें शिवलिंग आहे असें दृष्टांतानें मानतां येईल.

( ४८ ) शिवलिंगाचें लिंगपुराणाप्रमाणें शब्दप्रमाणरूपांत वर्णन मागें दिलेंच आहे.

( ४९ ) पाषाणाचें शिवलिंग जगत्कारण कसें असूं शकेल ! अर्थात् त्यांत अंतर्निहित असलेलें शक्तिविशिष्ट शिवचैतन्य तेंच तत्त्वतः शिवलिंग होय. तेंच जगत्कारण समजावें. अनेक मूर्ति अनघड पाषाणांत अव्यक्त असतात.

त्याप्रमाण अखिल नामरूपात्मक विश्वकार्य त्या जगत्कारणात अव्यक्त आहे त्याचें हें प्रतीक आहे

(५०) ज्याच्या ध्यानप्रकर्षांत उपास्य प्रतीक, उपासक जीव व उपासना या त्रिपुटींसह अखिल जगाची अनुपलब्धि होते तेंच शून्याचें निष्कर्षरूप वस्तु माहात्म्यपूर्ण शिवलिंग होय.

(५१) अनेक शिवकथावरून असेंहि म्हणता येईल की, शिवसत्ता व शिवकृपा याच्या साक्षात्काररूप जागृत प्रत्ययाचें शिवलिंग हें कित्येक स्थळीं ऐतिह्य प्रमाण आहे

याप्रमाणें शिवलिंगाची प्रमाणभूत भावना करावी

(५२) जड घटाहून कल्पक कुंभार वेगळा असतो, तसा सर्वज्ञ शिव जर जड शिवलिंगाहून वेगळा असता तर शिवलिंगाची पूजा अडाणीपणाची ठरली असती पण अभिन्ननिमित्तोपादानरूप शिवच शिवलिंगात आहे अन्य काहीं नाहीं अलकारात सुवर्णाशिवाय काहींच नसतें अलकाराच्या केवळ नामरूपाला मूल्य नाहीं वजन नाहीं शाश्वती नाहीं, इतकेंच काय त्याच्या सुवर्णोपादानाहून त्यास पृथक् सत्ताहि नाहीं पाषाणाहून जर शिव वेगळा असेल तर तो परिच्छिन्न होईल त्याला व्यापक व अनत कोण म्हणेल? ज्या शिवभक्ताना शिवलिंगात शिवानद प्रतीत झाला, त्याच्या आनदाला जगात कोठेंच वाण नाहीं व कोठेंच प्रत्यवाय नाहीं तेच खरे जीवन्मुक्त होत

(५३) स्वप्नातील जड सृष्टि म्हणजे निद्रित मन मनाहून अन्य काहींच नाहीं हें जसें सुज्ञ जाणतो, त्याचप्रमाणें जड पाषाणरूप शिवलिंग म्हणजे ईश्वराचें मन दुसरें काहींच नाहीं, हें ज्ञानी शिवभक्त जाणतो

(५४) हें ईश्वराचें गूढ रहस्य जें शिकवतें, तेंच जगद्गुरु जे आदिनाथ शिव त्या अनतरूपाचें शिवलिंगनामक प्रतीक होय.

(५५) योग्याच्या निर्विकल्प समाधींत योगी जोंवर देहमान व जगमान विसरतो, तोंवर सुखी असतो तसें सुषुप्तावस्थेंतील पुरुष जोंवर बाह्यजगासबधीं पूर्ण विस्मृतिरूप अज्ञानात असतो तोंवरच विश्रांतिसुख भोगतो दोघेहि या अनात्मसृष्टींत जागे होताच पुन्हा क्लेशात पडतात यास्तव शिव-

लिंगोपासना हेंच शिकवितें कीं, पाषाणाप्रमाणें या देहाच्या जडोपाधींत असतांनाहि शिवोऽहम् ही अखंड आतरविश्रांतिस्वरूप अनुभूति असावी. ह्यालाच उत्तमा सहजावस्था म्हणतात.

( ५६ ) "*यद्यद्विभूतिमत्सत्त्वं श्रीमदूर्जितमेव वा । तत्तदेवावगच्छ त्वं मम तेजोंऽशसंभवम् ॥ गी० १० । ४१.*" अर्थात् जगात जें जें तेजस्वी दिसेल, तेथें ईश्वराचा अंश पाहणें, हा विभूतिपूजेचा एक मार्ग झाला. पण जगाच्या आदिकाली जिकडे तिकडे पाषाण आणि खडकच दिसत होते. तेव्हा या आदिनाथानें जगाला सांगितलें कीं, हें जें तुम्हांला जड आणि अनात्म दिसत आहे, तेंहि माझेंच लिंग आहे. माझ्यावांचून त्या नामरूपांत अन्य कांहीं नाहीं अशी उपासना करा.

( ५७ ) या पाषाणलिंगरूप उपास्यानें शिवलिंगोपासनेचें प्राचीनत्व सहज सिद्ध होतें.

( ५८ ) पृथ्वीचें भूषण जसा मेरू त्याप्रमाणें प्रकृतिरूप साळुंकेचें भूषण स्थाणु ( अगर पुरुषरूप ) पिंडी होय. पृथ्वी ही साळुंका व मेरू हें लिंग. मेरू पर्वताजवळील शारदीय दीर्घरात्र ही साळुंका हैमवती पार्वती व दिवस हें शिवलिंग अशा कल्पना प्राचीन वैदिक वाङ्मयांत आढळतात.

( ५९ ) ज्याप्रमाणें बुध-शुक्रादि ग्रह सूर्यगोलाभोंवतीं सतत परिभ्रमण करीत *असतात, त्याप्रमाणें माझ्या मनोवृत्ति या शिवलिंगासभोंवार सदा परिभ्रमण करोत!*

( ६० ) रात्रीच्या समयीं पक्षी ज्याप्रमाणें घरट्यात जाऊन विश्राम पावतात त्याप्रमाणें माझ्या इसात्म्याचें एकमेव विश्रामस्थान असें हें शिवलिंग होवो!

( ६१ ) मधाचें पोवळें ज्याप्रमाणें मधानें भरलेलें असतें, त्याप्रमाणें असंख्य शिवभक्तांच्या प्रेममधूनें भरलेलें भक्तिमधुमक्षिकांचें शिवलिंग हें एक पोवळेंच आहे.

( ६२ ) त्या महान् जगत्कारणाधीश्वरानेंही असंख्य भुवनाचें भुवनरूप, गगनाचा भेद करून वर जाणारी विश्वाची इमारत रचण्यास मूळारंभ करताना जी प्रथम मंगलकारण पायाची शिला बसविली तेंच हें शिवलिंग होय. "ओंकारो लिंगमाख्यातम्" ( आगम )

( ६३ ) सृष्टीपूर्वी एकट्या एकच असलेल्या परमात्म्यानें "एकोऽहम्" या आरंभक स्फूर्तीबरोबर अहं-इदं हें शिवशक्तीचें द्वैत निर्माण केलें व त्या

द्वैतानें आपला तिसरा साक्षी गृहीत केला. अशा या सर्वाधार त्रिकूचें शिवलिंग हें प्रतीक आहे.

(६४) या भेदात्मक मायेचे तीन हें लघुतम रूप आहे. सत्-चित्-आनंद; सत्त्व-रज-तम; आदि-अंत-मध्य; उत्पत्ति-स्थिति-लय; भूत-भविष्य-वर्तमान इत्यादि. अशा त्रिविध मायेला धारण करणाऱ्या शिवाचें हें प्रतीक आहे. "तत्र देवास्त्रयः प्रोक्ताः लोकावेदास्त्रयोऽग्नयः। तिस्रोमात्रार्धं मात्रा च प्रत्यक्षस्य शिवस्य तत्।" (– प्रणवोपनिषत्).

(ज्येष्ठा-वामा-गौरी इत्यादि) तीन रेषांचा त्रिकोण ही लघुतम रेषाकृति. हीच प्राकृतिक साळुंका, मध्यव्यासपरिघ हें त्रिकू अव्यक्त असलेला बिंदु तीच पिंडी. असें हें सूक्ष्म शिवप्रतीक आहे.

(६५) खनिज, उद्भिज, स्वेदज, अंडज, जरायुज यांचें हें आरंभक खनिज कोटिलिंग आहे.

(६६) पाषाणालाहि दयेचा पाझर फोडणाऱ्या निस्सीम त्यागस्वरूप शिव-भक्ताच्या प्रपन्नावस्थेचें कसोटीरूप हें लिंग आहे.

(६७) गुणसाम्यावस्थेच्या साळुंकेंतून उद्भूत होणारें हें सबीज सद्ब्रह्माचें प्रतीक आहे.

(६८) निष्कल परमशिवाच्या भावनेला आलंबनरूप शून्याचें निष्कर्ष-रूप हें प्रतीक आहे.

(६९) सकल सगुण ज्यांत घनीभूत झालें आहे असें वाटतें, अशा महान् चित्‌शिलेचें हें लिंग आहे. एकरसत्व, घनत्व, एकात्मत्व, अभेद्यत्व, कूटस्थत्व इत्यादि गुणांमुळें जिच्यामध्यें हें जगज्जाल आहे अशी ही चित्‌शिलाच आहे. (यो. वा. ६।१।४६)

(७०) संतत जलधारेच्या वर्षावांतहि कोरडें राहणारें हें परम अलिप्ततेचें वैराग्यसूचक लिंग आहे.

(७१) असंख्य मोहक विषयांच्या मानास्पर्शांनीं अविचल राहण्यासाठीं उपासकानें आपलें हृदय किती कठिण केलें पाहिजे त्याचें आदर्शरूप हें लिंग आहे.

(७२) अग्निषोमात्मक विश्वयज्ञांतील विक्षेपरूप वेदींतील आवरणरूप विभू-तींनें आच्छादित ज्ञानाग्नीचें हें स्फुल्लिंग आहे.

( ७३ ) आपातरमणीय जगाला नाहींसें करणाऱ्या कालाग्नीच्या स्मशान-भूमीवरील कालाच्याहि कालरूप मृत्युंजयाचें हें स्थिर अनग्निदग्ध लिंग आहे.

( ७४ ) असंख्य शिवभक्तांना विश्रांतिरूप छाया देणाऱ्या गगनभेदी ज्ञान-वृक्षाचें वटबीजाप्रमाणें हें बीजलिंग आहे.

( ७५ ) स्वस्वरूप विस्मृतिरूप मृत्यूपासून मार्कंडेयरूप उपासकाला संजीवित करणारे निजबोधरूप महादेव ज्यांतून प्रगट झाले त्याचें स्मारक हें शिवलिंग होय.

( ७६ ) बालभक्ताचें आपल्या प्रेमामृतरसानें सदैव पोषण करणारें असें जगज्जननीरूप भूमातेचें जें हें जणु स्तनाग्र तेंच मायामहेश्वराचें लिंग होय.

( ७७ ) या शिवलिंगावरील अक्षता खाण्यासाठीं उदीर वर चढो किंवा त्यांच्यापुढें शिवामूठ वाहण्यासाठीं तरुण सौभाग्यवती स्त्रियांचे कोमल कर पुढें होवोत; तें अविचल व केवळ साक्षीभूत असतें; तसेंच आपलें ब्रह्मात्मलिंग असल्याचें जाणावें.

( ७८ ) साधकाच्या " मी " नामक देहधारक देहावच्छिन्न चैतन्याप्रमाणेंच हें शिवलिंग नामक पाषाणरूपधारक विषयावच्छिन्न चैतन्य आहे ज्याप्रमाणें ' मी ' ही धारणा करणारें उपासकाचें मन त्याच्या देहाच्या ठिकाणीं असतें, त्याचप्रमाणें शिवसंकल्परूप समष्टि मनाची शिवलिंग या प्रतीकाच्या ठिकाणीं भावना करावी.

व्यष्टि–समष्टि हीं दोन्ही मनें उपास्य–उपासकभावानें जवळ आणणें व पुढ त्यांचें तादात्म्य होणें हें या शिवलिंगोपासनेचें रहस्य आहे.

( ७९ ) ज्या अर्थी उपासकाच्या ठिकाणीं असणारें चैतन्य शिवलिंगरूप जड पाषाणाच्या ठिकाणींहि आहे, त्या अर्थी तें सर्वांभूतीं तसेंच आहे; या विश्वासानें उपासकानें वागलें पाहिजे.

तुका म्हणे जें जें भेटे, तें तें वाटे मी ऐसें ॥

( ८० ) ज्या अर्थी शिवलिंग हें समष्टि मनाचें मनोमयरूप आहे, त्या अर्थी शिवलिंगदर्शन म्हणजे शिवनामक समष्टि मनाचें अथवा ईश्वराचेंच दर्शन होय.

( ८१ ) ज्याप्रमाणें चाणाक्ष दृष्टीस चित्रांत चित्रकार व कादंबरींत कादंबरीकार लपलेला दिसतो, त्याचप्रमाणें शिवसंकल्परूप पाषाणलिंगांत सद्ब्रह्मरूप शिव ज्ञानी भक्तानें पहावा.

( ८२ ) टेलिफोनच्या जड यंत्राशीं बोलणारा वस्तुतः त्या तारेच्या लांबच्या टोंकाला असणाऱ्या आपल्या अदृश्य मित्राशीं बोलत असतो, त्याप्रमाणें शिवलिंगापुढें रुद्रपाठ व प्रार्थना अज्ञात शिवास उद्देशूनच असते, असें ध्यानीं घ्यावें.

( ८३ ) शिवाय ज्यास सर्वत्र कान आहेत, असें सामान्य शिवचैतन्य शिवलिंगांतहि असल्यामुळें ( सर्वतः श्रुतिमल्लोके, ) उपासकाचा सखा शिव त्याची प्रार्थना ऐकण्यास सन्निकटच असतो, असा सहृदय भक्तांचा अनुभव आहे.

( ८४ ) ज्या अर्थी तुच्छ व तिरस्करणीय अशा जडपाषाणांतहि ओतप्रोत शिवनामक समष्टि मन असतेंच, अथवा मायामहेश्वरनामक निमित्तोपादानकारण असतेंच, त्या अर्थी हेयोपादेय सर्व सुखदुःखात्मक विषयांत तें शिवमन असलेंच पाहिजे, मग तेथें विषमभाव तो कसा मानावा ?

( ८५ ) आपल्याला कारणपरत्वें मारणारे हात हे आपणांस गोंजारून आपल्यावर ममता करणाऱ्या आईचे आहेत, हा लहान बालकासहि धीर वाटतो, टणक बर्फ व मृदु पाणी काय वेगळीं आहेत ? ज्या बर्फाच्या खडकानें मागें टिटानिक बोट फोडून बुडविली, त्याच बर्फाच्या रूपांतरित वाफेनें ती पूर्वी जलावरूनच वेगानें वाहत नेली होती. यावरून भक्तास प्रारब्धवशात् सहन कराव्या लागणाऱ्या आघातांत शिवलिंगांतील निमित्तकारणरूपव्यापक शिवाच्या कृपाळू वरदहस्ताची जाणीव कां राहणार नाहीं ? वज्राहूनहि कठिण अशा शिवलिंगाचा अंतर्यामी लोण्याहूनहि मृदु आहे हा शिवभक्तांचा अनुभव आहे. त्यास मूर्तिपूजक म्हणून अधमाधम कां मानावें ?

( ८६ ) शिवलिंगास जडपाषाण म्हणणें म्हणजे तत्त्वतः ज्योतिर्लिंगाचा दिव्य दिपविणारा प्रकाश आपले दुष्ट अविद्येचे हात डोळ्यावर ठेवून टाळण्याप्रमाणें आहे. अनंतकोटि सूर्यप्रकाश हेंच शिवसाक्षात्काराचें स्वरूप नव्हे काय ?

( ८७ ) एखाद्या पांथस्थाला ठेंच लागली म्हणून चिंतामणी कांहीं दगड ठरत नाहीं. तसें हें पाषाणलिंग चिंतामणीरूप आहे.

( ८८ ) परिस दगडाप्रमाणें दिसतो. सोनें उज्ज्वल भासतें. पण सोन्याचा जनक परिस आहे हें विसरतां येत नाहीं. "अमङ्गल्यं शीलं तव भवतु नामैव-मखिलं। तथापि स्मर्तॄणां वरद परमं मङ्गलमसि" ॥ २४॥ ( महिम्न ) हा शिव-लिंगाचा महिमा आहे.

( ८९ ) निकृष्टावर सर्वोत्कृष्ट भावना करणें हें श्रेष्ठ उपासनेचें मर्म आहे. निकृष्ट आणि उत्कृष्ट, पशु आणि पति या दोन टोंकांचें सामंजस्य शिव-लिंगांत आहे.

( ९० ) जो अंर्तयामी अर्धजागृत ( स्वप्न ) आणि जागृत अवस्थेंत असतो तोच सुपुप्तीय अवस्थेंतहि असतोच ही व्यापक दृष्टि जड शिवलिंगोपासनेंत आहे.

( ९१ ) घटाखालीं दीप असावा, त्याप्रमाणें या पाषाणलिंगांत चिद्रूप स्फुलिंग तिरोहित आहे.

( ९२ ) आपल्या पिण्डातील आत्मज्योतीच्या भेदक किरणांनीं या शिव-लिंगाच्या तमावरणाचा भेद करून आंतील प्रकाशज्योति पाहिली पाहिजे.

नारळाच्या गुरडीच्या पोटांत जसें खोबरें असतें, तसें या शिवलिंगाचे पोटांत प्रेमरहस्य आहे. हत्ती ज्याप्रमाणें कवठ न फोडतां कवठांतील रस चाखतो, तशी प्रज्ञावंत भक्तांची भेदक दृष्टि 'रसो वै सः' हें शिवलिंगांतील रहस्य जाणते.

( ९३ ) ज्याप्रमाणें प्रेमळ आईचें व्यंग असलेल्या मुलावरचें अधिक प्रेम असतें, त्याप्रमाणें भक्ति माउलीचें वात्सल्य प्रेम या जड गणलेल्या शिवलिंगा-वर सर्वांत अधिक आहे. " जो या लिंगास म्हणे धोंडा। आग लागो त्याच्या तोंडा ॥" असें तुकोबारायाप्रमाणें कट्टी शिवभक्ति म्हणते.

( ९४ ) ज्याप्रमाणें प्रज्ञावंत आणि अनन्य शिष्याला त्याच्या सद्गुरूंचें मौन हेंच संशयोच्छेद करणारें व्याख्यान होतें, त्याप्रमाणें सहृदय व ज्ञानी भक्तांचें शिवलिंगदर्शन हें त्यांच्या उद्धाराला पुरेसें होतें. परावाणीचा जप मौनरूपच असणार.

( ९५ ) जड पाषाणापासून दिव्य ज्योतिःस्वरूपापर्यंत सार्‍या मूर्तामूर्त उत्क्रांतीचा इतिहास शिवलिंगांत अव्यक्त आहे.

(९६) साखरेचें रमकडें (चित्र) काल्याचें असलें तरी तें गोडच असतें. त्याप्रमाणें समष्टि मनांतील हा लिंगरूप पाषाणहि दिव्य समष्टिमनरूपच आहे. अन्य कांहीं नाहीं.

अशी श्रद्धा जो धर्म शिकवितो त्यानेंच हें शिवलिंग उपासनीय म्हणून रूढ केलें आहे.

(९७) पृथ्वी ही साळुंका व आकाशाचा घुमट हीच पिंडी अशा व्यापक ब्रह्मांडलिंगाचें शिवलिंग हें प्रतीक आहे.

(९८) द्यावा-पृथ्वी या जगाच्या आईबापांचें द्योतक असें हें प्रतीक आहे. भूकैलास या इहपर लोकांचें हें लिंग आहे.

(९९) जलहारी हें प्रतीक प्रवृत्तीचा प्रवाह दर्शवितें. पिंडी हें नैष्कर्म्य अथवा निवृत्तिसूचक स्थिर चिन्ह आहे. उभयतांचें सामंजस्य ज्यांत आहे, अशा अभ्युदयनिःश्रेयसकारी धर्माचें शिवलिंग हें प्रतीक जाणावें.

(१००) जगाची उभारणी व संहारणी करणाऱ्या कुलकुंडलिनीरूप साळुंकेच्या वेढ्यांत हा उत्पत्ति, स्थिति, लय, निग्रह, अनुग्रह या पंचप्रेरणामुख बाण पिंडीरूपांत स्थित आहे.

मायेनें अनावृत अशा दशांगुळें उरलेल्या परब्रह्माचें हें लिंग आहे.

(१०१) उपादानकारणांत निमित्तकारण अनुप्रविष्ट झाल्याचें हें द्योतक-लिंग आहे.

(१०२) प्राण्यांच्या प्राक्कर्मसलिलांत तप करण्यास शिरलेले शिव आपली शिवसृष्टि निर्माण करण्यास बाहेर आलेले पिंडीच्या रूपांत दिसत आहेत.

(१०३) पुरुषप्रकृति, प्रकाशविमर्श, शिवशक्ति, अथवा पार्वतीपरमेश्वर हीं जगाचीं आईबापें खरीं. विस्मृतिरूप मृत्यूनें दुरावल्यासारख्या झालेल्या त्या आईबापांचें हें समाधि लिंग आहे. आपल्या जनक-जननींबद्दल कोणाहि सुपुत्रास व सुकन्येस उत्कट प्रेमादर वाटणें योग्यच आहे; पण त्यांच्या निदिध्यासांत, त्या जनक-जननीच्या जननेंद्रियांचें चिंतन करण्याचा वात्कळपणा त्यांच्या प्रिय मुलामुलींच्या ठिकाणीं आढळणें अशक्यप्राय आहे. आईबापांच्या छाया चित्रांत त्यांचीं उपस्थेंद्रियें शोधणें याहून आचरट कल्पना दुसरी कोणती असणार?

(१०४) जगाच्या अजातिरूप पसरलेल्या घुमटांत नित्य असणारें असें हें स्वयंभू ब्रह्मात्मलिंग आहे.

(१०५) भूमींत पुरून ठेवलेल्या गुप्त धनाची स्थलनिदर्शक कांहीं दृश्य पण गूढ अशी खूण ठेवतात. त्याप्रमाणें भौतिक सृष्टींत गडदलेलें ब्रह्मात्मधन शोधण्याचें साधनक्षेत्रदर्शक हें लिंग आहे.

(१०६) लोखंडाला सुवर्णाच्या योग्यतेस चढविणारा परिस हा सामान्य दगडासारखाच दिसतो. बद्धाचा मुक्त, नराचा नारायण करणारा शिवलिंग हा एक दिव्य परिस आहे. याला साक्ष नरहरी सोनारासारखे तज्ज्ञ भक्त आहेत. चिंतामणींत ज्याप्रमाणें चिंतकाच्या सर्व मनोरथांचीं फळें अव्यक्त असतात, त्याप्रमाणें या शिवलिंगांत भक्तांना अपेक्षित पांची मुक्तींचीं फळें अव्यक्त आहेत.

(१०७) साऱ्या जड भौतिकांत अज्ञात अशा अभौतिक दिव्याची स्मृति जाग्रत ठेवणारें हें चिन्ह आहे.

(१०८) हें ज्ञानप्रकाशाचें ऊर्ध्वशिख ज्योतिर्लिंग आहे.

(१०९) हें लयसाक्षीरूप अथवा शून्याचा निष्कर्परूप महाशून्याचें लिंग आहे.

(११०) वर्षाकाळांत श्रावणांतल्या अमावास्येच्या मध्यरात्रीं अरण्यांत स्वतांच काळोखांत दिसेनासा झालेल्या पुरुषाच्या अंतरांत आत्मभान स्पष्ट भासतें ; तसें हें शिवरात्रीं ब्रह्मवनांत अंतर्मुख वृत्तीला प्रकाशरूप भासणारें लिंग आहे.

(१११) या चिद्रूपलतेचें मायाकाशरूप आळ्यांत कलिंगडाप्रमाणें धरलेलें जें ब्रह्माण्ड फळ त्याचें शिवलिंग हें प्रतीक आहे.

(११२) शशीशेखराच्या चिच्चंद्रम्यांतील सशांकाप्रमाणें हें एक चित्‌-चंद्रिकेंतील आभासमात्र लिंग आहे.

(११३) लौकिक राजसत्ता लोकांचे संदेश घेण्याकरतां ठिकठिकाणीं टपालाच्या पेट्या ठेवण्याची व्यवस्था करते, त्याप्रमाणें हिंदुधर्मसंस्कृतीनें भक्तांचे संदेश घेण्याकरतां ठिकठिकाणीं शिवलिंगें स्थापन केलेलीं असतात. येथें दिलेला संदेश ईश्वरास पोंचतो, अशी खात्री असावी.

(११४) हें जड पाषाणलिंग निःसंकल्प शुद्धब्रह्मास्म्याचेंच बोधकचिन्ह

आहे. न झालेल्या जगाचें भवितव्य जाणणारें हें अष्टमूर्ति भगवंताचें पुर्यष्टक लिंग आहे.

(११५) सच्छास्त्रादि सात्त्विक अविद्यांशानें यदृच्छेनें अविद्येचा क्षय झाला असतां या विश्वरूप महान् शिवालयांत स्वतः शिवात्मा आपल्यालाच जगुं पाहतो हाच त्याचा साक्षात्कार होय. बुद्धिवृत्तींत अभिव्यक्त झालेल्या चिदाभासानें शिवात्म्याला व्यापणें हा साक्षात्कार नव्हे. कारण तो चिदाभास जड पदार्थांनाच व्यापूं शकतो. चेतन शिवात्म्याला तो व्यापूं शकत नाहीं.

(११६) हें जें कैलासगिरीचें सत्घन प्रतीकरूप पाषाणलिंग आपल्यापुढें दिसत आहे, त्याच्या मस्तकीं आपला मनश्चंद्रमा संलग्न करा आणि मग त्या शशिशेखराची उपासना करा!

(११७) हें जें उपासनेकरितां शिवलिंग आपल्यापुढें आहे तें केवळ चिन्मय आहे. कारण युक्ति दृष्टया दृश्य विषयाचा अत्यंत असंभव आहे. जडाला स्वतां सत्ता व स्फूर्ति आहे असें म्हटलें तर हेंच अजड ठरणार नाहीं तर मिथ्या ठरणार. वास्तव अज्ञानावृत चित्स्वभावामुळें अन्यथा प्रतीत होणारें हें शिवलिंग स्वाप्निक पदार्थांप्रमाणें केवळ चिदाकाशच आहे.

(११८) हें सत् व असत् याचा मध्यरूप जें ब्रह्म त्याचेंच प्रतीक आहे.

(११९) हें तुमचें चित्तत्व, हें माझें चित्तत्व, हें अन्य असंख्य लोकांचें चंचल चित्तत्व असें हें चंचल चित्तत्व चंचल वाफेच्या घनीभूत बर्फाप्रमाणें गर्भिणी गर्भाला धारण करते तसें या शिवलिंगानें धारण केलें आहे, तेंच वस्तुतः उपास्य आहे. त्याचें चिंतन करावें.

(१२०) वस्तुतः या शिवात्मलिंगाचें स्वरूप शास्त्रार्थांनीं जाणलें जात नाहीं व गुरूच्या वचनानेंहि जाणलें जात नाहीं. तर तें स्वतांच आपल्या बोधाच्या बळानें जाणलें जातें. पण गुरूपदेश व शास्त्रार्थ यांच्यावांचून शिवात्म्याचा परोक्ष बोध होत नाहीं. कारण त्यांचा संयोगच शिवात्मबोधाला नंदादीपाप्रमाणें प्रकाशित करणारा आहे.

(१२१) सर्व पदार्थांनीं संपन्न व निराकार देशसत्ता, कालसत्ता इत्यादि सर्व पदार्थसत्ता प्रथम चित्तात उदय पावून मागाहून बाहेर असत्यासारख्या भासतात, मग हें शिवलिंग आत्मलिंगाहून भिन्न कोठून असणार!

(१२२) शिवलिंग आणि आत्मलिंग ही दोन्ही ब्रह्मलिंगाचींच नांवें आहेत तेंच ब्रह्मलिंग माझ्या दहराकाशात आहे आणि तेंच माझ्यापुढाल साळुंकेत आहे असें उपासकानें जाणावें

(१२३) नाना प्रकारच्या वैभवानें शोभणाऱ्या यथाप्राप्त शयन, आसन, यान, इत्यादिकांच्या योगानें शिवाचें पूजन करावें कान्ता, अन्नपान, इतर संभोगाचा संभार इत्यादिकांपासून होणाऱ्या सर्वरूप सुखानें आत्म्याला तत्त्वत जाणून पुजावें आधि व व्याधि यानीं व्याप्त, मोह व क्षोभ यानीं शोभणाऱ्या अशा प्राप्त झालेल्या सर्व उपद्रव दु खानें या शिवात्म्याला पूजावें निषिद्ध व अनिषिद्ध अशा दोन्ही प्रकारच्या विषयाच्या त्यागानें पूजन करावें

(१२४) नुकत्याच प्रसूत झालेल्या बालकाच्या विज्ञानाप्रमाणें विकल्प विस्तारशून्य होऊन, चिदाभास व चित्त याच्या मूलभूत स्वात्मशिवाला अत्यत शात मनानें पहात जीवन्मुक्त पदातच स्थित होणें हीच शिवात्म लिंगाची महापूजा होय.

(१२५) सपत्ति, दारिद्य, सुख, दु ख, भूक, तहान इत्यादिकाचा आपल्या ठिकाणीं किंवा दुसऱ्याच्या ठिकाणीं आरोप करणें हें शिवात्मलिंगाचें पूजन आहे स्वात्माच आतल्या आत विस्मृतिमानसत्ता होऊन जीवादिस्वरूप व घरादि इतर जगद्रूप होऊन राहिला आहे त्यातलेंच हें एक प्रतीकरूप आहे

(१२६) ज्यात असख्य कल्पाचा त्रैकालिक इतिहास लिहिला आहे व ज्यात अगणित ब्रह्माडाचीं चित्रें कोरलेलीं अव्यक्त आहेत असा मिटलेला हा विश्वकोश आह

(१२७) असख्य ब्रह्माडें पाचोऱ्याप्रमाणें दूर फेंकून देणारा सवर्त वायु व अगणित लोक क्षणार्धात जाळून टाकणारी विद्युत् अशा अनेक प्रचड शक्ति ज्यात अव्यक्त आहेत अशा या दिव्य शक्तिपिंडास शिवलिंग म्हणतात

(१२८) ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर, सदाशिव, अशा कोट्यवधि देवाच्या मूर्ति ज्यात अप्रकट आहेत असें हें महालिंग आहे

(१२९) एक अखड साक्षात्कारवृत्तीवर आरूढ झालेल्या अमृत आत्मरूप बोधानेंच हा महादेव पुजला जातो ज्याच्या योगानें या परमात्म्याच्या उपा धींचा बाध होतो व निरतिशय आनदाची अभिव्यक्ति होते, अशा अखड

एकरस आत्मानुभवानें प्रत्यगात्म्याला आनंदसागरांत बुडवून सोडणें हें त्याचें अत्यंत श्रेष्ठ पूजन मानलें आहे. स्वदेह याच लिंगामध्यें निर्विशेष स्वभाव आत्म्यांत स्थित असलेल्या बोधलिंगाची यथाप्राप्त अर्थसंवेदनानें चांगली पूजा करावी. (यो. वा. ६।१।३८-३९)

(१३०) प्रतीकांत प्रत्यायित होणारी दैवी व आध्यात्मिक कला कमजास्त मानानें अनुभवास येण्याचीं कारणें—(१) दैवी जगतावर दृढ विश्वास, (२) प्रतीकाचे ठिकाणीं पूर्ण श्रद्धा, (३) उपासनेंतील मन्त्रशुद्धि, (४) पूजाद्रव्यशुद्धि, (५) स्थलकालमाहात्म्य, (६) प्रतीकाचें मृत्तिकापारदादि उपादानवैशिष्ट्य, (७) पुजाऱ्याची योग्यता, (८) उपासकांचा अधिकार, (९) आचारशुद्धि, (१०) विचारशुद्धि आणि (११) उपासकाची अंतर्मुख वृत्ति अशीं अनेक संभवतात.

(१३१) शिवलिंगाचे ठिकाणीं अविनाभूत शिवशक्तीची भावना करावयाची असते. आधिदैवत जगाशीं उपासकाचा संबंध जोडणारा पहिलाच कोश म्हणजे प्राणमयकोश होय. शिवलिंगाच्या पार्थिव कोशाची कोणीं मूर्तिभंजकानें विटंबना केली तरी आंतील प्राणमयकोश व त्याच्याहि आंतील सूक्ष्म कोश निरुपाधिकच राहतात असा विश्वास ठेवावा. आपल्या आंतरकोशांचा देवतेच्या आंतरकोशांशीं सूक्ष्मसूक्ष्मतर पातळीवर संवाद जोडण्याचा प्रयत्न करावा.

शिवलिंगावर नुसत्या श्रद्धेनें अमंत्रक पाणी घालण्यापासून निर्गुण शिवतत्त्वाच्या परापूजेपर्यंत अथवा मानसपूजेपर्यंत उपासनेच्या अनेक श्रेष्ठश्रेष्ठतर पायऱ्या आहेत. त्यांचें ज्ञान शास्त्रग्रंथावरून व सद्गुरूंपासून करून घ्यावें. शिव या सगुण-निर्गुण उपास्याचें उपासनाशास्त्र समग्र समजावून देण्याचा माझा अधिकार व यत्न नसून त्या विषयाकडे प्रवृत्ति व्हावी, एवढेंच माझें या ग्रंथाचें आजचें उद्दिष्ट आहे.

शिव आणि सेवा :—(Last but not the least) शेवटला पण सर्वांत महत्त्वाचा असा भाव स्वामी विवेकानंदांच्या "शिव आणि सेवा" या प्रसिद्ध दंडकांत आहे. "विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म", त्याचप्रमाणें "शिवमय जग हाच शैवधर्म", "अवघीं रूपें तुझीं देवा । वंदूं भावें करूं सेवा।", "नारायण असे विश्वीं। त्याची पूजा करीत जावी। याकारणें

तोंडवावो। कोणी तरी काया ॥ २५।९।२५ ॥" "ज्यास आपंगिता नाहीं। त्यास धरी जो हृदयीं ॥" ही सर्वांत श्रेष्ठ शिवलिंगोपासना आहे. "विरळा परकार्यरता। परदुःखेनापि दुःखिता विरळा ॥" गरीब याचकांचा तिरस्कार करणेंच अधिक. लज्जास्पद गोष्ट आहे कीं, सुशिक्षितांत व सधनांतच हें प्रमाण अधिक असावें. "कांहीं नाहीं पुढें जा।" असें म्हणण्याचें जणुं बाळकडूच कित्येक घराण्यांतून अगदीं बाळपणापासून दिलें जातें. मोठमोठे ग्रंथ लिहून वाङ्मयसेवेचें ढोंग माजवणारे व जनताजनार्दन सेवेवर मोठमोठीं व्याख्यानें देऊन आपलें स्तोम वाढवणारे, "उदार कर कधीं नाहीं केला पैसा एक धाया॥" या वर्गांतले असूं शकतात! "परोपकारः पुण्याय।" अशी जी पुण्याची व्याख्या केली आहे त्यांत अहंकाराचें विष आहे. परोपकार नव्हे परसेवा हेंच पुण्य खरें. "तुका म्हणे रूपें। अवघीं देवाचीं स्वरूपें॥" म्हणून मी स्वपरबोधार्थ म्हणतों कीं, परसेवा ही श्रेष्ठ शिवलिंगोपासना होय. (ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहितेरताः॥ गीता १२।४)

**शिवलिंगमाहात्म्य कथा** :—प्रत्येक भूतमात्र व वस्तुमात्र हें शिवलिंगच आहे, म्हणजे शिवाचेंच चिन्ह आहे. कारण हें अखिल ब्रह्मांड शिवमय व शिवरूप आहे अशा शिवानुभवाचा अभ्यास वेगळा अथवा सारें स्थितिगतिरूप हा सशक्तिक शिवासंबंधीं शुद्ध अनुभव वेगळा, आणि असाधारण व अद्भुतरम्य अशा शिवलीलामृताचें सेवन वेगळें, शुद्ध अनुभव हा ज्ञानाचा व तत्त्वचिकित्सेचा विषय आहे आणि शिवाचीं विविध सगुण चरित्रें हा विशेषेंकरून भक्तिप्रेमाचा व श्रद्धेचा विषय आहे. मीं हा ग्रंथ फारकरून विश्वधर्माच्या पहिल्या व्यापक दृष्टीनें लिहिला आहे. देवताविज्ञानांतील सगुणलीला या प्रांतांत मी शिरलों नाहीं. याचें कारण शिवलीला या विश्वास ठसण्यास कठिण व चिकित्सेस अयोग्य अशा कथा असतात म्हणून नव्हे. "विशेषतः प्राचीन पुराणांतील आख्यायिका स्वयंदृष्ट व सत्यार्थ असतात. उपाख्यानें अन्यश्रुत कल्पितार्थ पण उपोद्‌बलक असतात. गाथा प्राचीन परंपरेनें चालत आलेल्या वहिवाटींच्या निदर्शक अशा प्रमाणभूत असतात. कल्पांत एका संपूर्ण विषयाचें निरूपण असतें" इत्यादि जें प्राचीन मत आहे, तें मला अमान्य नाहीं. कोणत्याहि श्रुत आख्यायिकेला मूळांत थोडा तरी सत्यांश असल्यावांचून प्रसिद्धि मिळत नाहीं. असा जरी प्रामाण्यविचार असला, तरी धर्म आणि

तत्त्वज्ञान, पुराणें आणि उपनिषदें, यांपैकीं दुसरें तत्त्वज्ञान हें बुद्धिगम्य असल्यामुळें सर्वांस मान्य करावें लागतें. यास्तव मीं शक्य तों सौरासिक लिंगिष्याची दृष्टि ठेवली आहे, म्हणून निरनिराळ्या शिवलिंगांसंबंधीं ज्या माहात्म्यकथा आहेत, त्यांतील शिवाची सगुणरूपें शिवलिंगाच्या ठिकाणीं धारण करण्यासाठीं या प्रकरणांत उपयोगांत आणलीं नाहींत.

सारांश, शिवार्चन हा विषय फार मोठा गहन आहे. मीं या ग्रंथांत हिंदुधर्मोतील आख्यानविशिष्ट देवताविज्ञानाची पुरुषविध देहाकार दृष्टि न ठेवतां शक्य तों विश्वधर्मरचनेंत साजेल अशी तात्त्विक दृष्टिच ठेवली आहे व त्याचेच कांहीं नमुने वर दिले आहेत. हें सुज्ञ वाचकांच्या लक्षांत येईल. यापुढील दोन प्रकरणांत अशा आध्यात्मिक दृष्टीनें उपासनेच्या अंतिम फलश्रुतीचा विचार सांगण्याचो माझा यत्न आहे. या उपासनायोग्य श्रेष्ठ भावनांची मनाला गोडी लागल्यावर ग्राम्य व अश्लील कुकल्पना मनास शिवणारहि नाहींत.

> ॐ पीठं स्याद्धरित्री जलधरकलशो लिङ्गमाकाश मूर्तिः।
> नक्षत्रं पुष्पमाल्यं ग्रहगणकुसुमं नेत्रचंद्रार्कवह्निम्।
> कुक्षिः सप्तसमुद्रं भुजगिरिशिखरं सप्तपाताल पादं।
> वक्त्रं वेदं षडङ्गं दशदिशवसनं दिव्यलिंगं नमामि ॥ १ ॥
>
> (क. शि.)

> आकाराः कल्पिता यस्यां ब्रह्माद्याः स्थिरजङ्गमाः।
> तन्मृत्तिकामयं शैवैः शिवलिंगं प्रपूज्यते ॥ ५ ॥
>
> — शिवपूजाशतकम्.

---

प्रकरण १४ वें

# पूर्णानुभव

यो वै भूमा तत्सुखम्। — छां. ७।२३।१

यत्रनान्यत्पश्यति नान्यच्छृणोति नान्यद्विजानाति स भूमा।
— छां. ७।२४।१

मागील प्रकरणांत कर्तृतंत्र शिवलिंगोपासनेंत शिवलिंग या प्रतीकाच्या ठिकाणीं अनेकांनीं पूर्वींच केलेल्या व पुढें करतां येण्यासारख्या पुष्कळ इष्ट भावना सांगितल्या आहेत. पण केवळ सद्भावनांतच कृतार्थता नसते. पूर्णतेंत कृतार्थता असते. पूर्णता तें सुख व अपूर्णता तेंच दुःख असें म्हणतां येईल. भूमा हा पूर्णतावाचक शब्द आहे. म्हणून छांदोग्यांत " यो वै भूमा तत्सुखम्। " असें सनत्कुमारांनीं नारदांना सांगितलें आहे. नित्य निरतिशय आनंदानुभव, शिवानुभव, पूर्णानुभव, दृढापरोक्षानुभूति व कैवल्यमुक्ति हे परमार्थसाधनांतील कृतार्थतावाचक पारिभाषिक शब्द आहेत. नद्या अनेक असल्या तरी त्या सर्व एका सागरलाच मिळतात, सर्व देवतांस केलेले नमस्कार एकाच ईश्वराला होतात, त्याप्रमाणें परमार्थसाधनें अनेक असलीं तरी सर्वांचें साध्य एक मोक्ष पुरुषार्थ हेंच मानलें जातें. पण हें फार ढोबळ म्हणणें आहे. निरनिराळ्या अधिकाराच्या व पंथांच्या साधकांचा मोक्ष पुरुषार्थ सारखाच नसतो. मुक्तींत सालोक्य म्हणजे उपास्य देवतेच्या लोकाची अर्थात् शिवलोक प्राप्ति, सामिप्य म्हणजे शिवाच्या अगर अन्य उपास्य देवाच्या आधिदैवत जगांत सहवास, सारुप्य म्हणजे रूप हीं शिवाचें अगर अन्य उपास्याचे प्राप्त होणें, सार्ष्टी म्हणजे शिवाचे अगर अन्य इष्ट देवतेचे भोग भोगणें, सायुज्य म्हणजे हिरण्यगर्भात मिळून जाणें आणि कैवल्यमुक्ति म्हणजे केवळ अद्वैतास्थिति, असे मुक्तीचे एकापेक्षां एक श्रेष्ठ असे अनुभवांचे प्रकार आहेत.

द्वैती, विशिष्टाद्वैती, द्वैताद्वैती, शुद्धाद्वैती व केवलाद्वैती अशा निरनिराळ्या पंथभेदांनुसार अंतिम अपरोक्षानुभूतींत थोडाफार भेद असतो. शिवलिंगोपासना करणारे शैव, शाक्त व लिंगायतादि पंथ आपणांस अद्वैतीच म्हणवितात.

या उलट केवलाद्वैतवादी श्रीमच्छंकराचार्यांसच अनुसरणारे महाराष्ट्रीय संत अद्वैती असूनहि, " अद्वैती तों नाहीं । मातें समाधान । गोड हे चरणसेवा तुझी ॥ ", " नको ब्रह्मज्ञान । आत्मस्थिति भाव । मी भक्त तूं देव ऐसें करीं ॥ ", " मोक्ष तुमचा देवा । तुम्ही दुर्लभ तो ठेवा ॥ १ ॥ मज भक्तीची आवडी । नाही अंतरीं ते गोडी ॥ २ ॥ " असा ज्ञानोत्तर साध्य भक्तीचा महिमा अनेक संत गातात. शैवसिद्धांताप्रमाणें निर्गुण विद्या ही सगुण विद्येची पूर्व तयारी मानली आहे. दुसरें असें कीं, जीव, जगत् व ईश्वर हे भेद कोणी अपरिहार्य मानतात. सगुण-निर्गुण आणि उभयातीत असे जरी अनुभवांचे तीन पर्याय मानले, तरी उभयातीत याहि सापेक्ष अवस्थेत अनुभव आणि अनुभविता हें द्वैत न मानावें तर त्या अवस्थेचा पुरावा काय हा प्रश्न राहातोच. तसेंच, मूळ अभावांतून हें जग भावरूपतेस कसें प्राप्त होईल ? त्या अर्थी तें ब्रह्माचे ठिकाणीं शक्तिरूपांत अव्यक्त असल्याचें मानणें भाग पडतें. तात्पर्य, सूक्ष्म स्वगतभेद मानावा लागतो. ही व्यावहारिक अडचण आहे.

शिवाद्वैतनिर्णयांत अप्पय्या दीक्षित यांनीं श्रीकंठ शिवाचार्य यांचें शिवाद्वैत तत्त्वज्ञान प्रस्थापित करण्याचा यत्न केला आहे. पण आगमांत तत्त्वज्ञानात वेदान्त तत्त्वज्ञानातील अद्वैत नाहीं असेंच त्या ग्रंथाचे संपादक श्रीसूर्यनारायणशास्त्री स्पष्टच म्हणतात[१]. या शैवशाक्तांचा शिवानुभव, ज्ञानानुभव अथवा पूर्णानुभव याची थोडी कल्पना या प्रकरणांत करून देत आहे. मग या पुढील प्रकरणात श्रीमच्छंकराचार्यांच्या मतानुसार शिवलिंगोपासनेचें अंतिम पर्यवसानरूप शिवात्मानुभव म्हणजे काय तें विशद करून हा आरंभिलेला ग्रंथ समाप्त करूं.

शुद्ध अनुभव—शाक्ताद्वैताप्रमाणें शिवानुभव अथवा चिदानुभव हा सक्रिय, निष्क्रिय, स्थिर व चल उभयविध संभवतो. स्थिर राहाणें यांतसुद्धां प्रतिकारशक्ति असतेच. स्थितीवांचून गति नाहीं व गतिविरहित स्थिति

१ Agamanta, thus presented, would seem to fall short of the Advaita Vedanta, which appears to have legitimate claim to be the fulfilment of the former. ( Sivadvaita Nirnaya by Appayya Dikshit edited by Pro. S. S. Suryanarayan Sastri, p. 44. )

नाहीं असें हें शिवरूप चिदाकाश सक्रिय-निष्क्रिय उभयविध आहे. असें हें स्थिति-गतिरूप शक्तिशान हाहि शक्तिवाद्याचे दृष्टीनें शुद्ध अनुभव आहे. शक्तिवादाप्रमाणें चिदाकाशांत गति-स्थिति दोन्ही असतात. त्यांत विरोध नाहीं. त्या दोन अवस्था आहेत. स्थिर चित् व अस्थिर चिच्छक्ति यांत द्वैत नाहीं. दोन्ही मिळून पूर्ण ब्रह्म असतें. सांख्याचें पुरुषप्रकृति हें द्वंद्व स्वतंत्र असतें. शाक्त त्यांस अविनाभूत अशा शिवशक्ति तत्त्वाचीं विकसित रूपें मानतात.

**पूर्णानुभव**— चिदाकाशाचा ( चित् = केवळ, निरूपाधिक व भेदरहित ज्ञान अथवा प्रकाश ) आवरणरहित जो अनुभव तो पूर्णानुभव. पूर्णानुभवांत निरनिराळे परिच्छिन्न जीवभाव व त्या भावांचीं निरनिराळीं जगें नसतात. त्यात निरनिराळ्या सक्रियनिष्क्रिय व्यक्ताव्यक्त सूक्ष्मस्थूल अवस्था, भूमिका, अथवा पातळी, निरनिराळे परिच्छेद, अश व गुणधर्म किंवा आकृति, निरनिराळ्या दिक्काल कार्यकारणभावना, ज्ञाताज्ञात, उद्धत अनुद्धत इ० असे कोणतेच भेद व विशेष नसतात. परासविद्रूप पूर्णानुभव हा अनेक विशेषांचा समुच्चय नव्हे. तो तत्त्वातीत असतो. तो अनिर्वचनीय व तर्कातीत असतो. पण याप्रमाणें पूर्ण चित् हें विश्वातीत असलें तरी विश्वांतील सारे आकार आणि प्रकार, गुण, धर्म आणि संबंध हे चिच्छक्तींतूनच उद्भूत होत असल्यामुळें ते चिताचे ठिकाणीं किंवा चिताचे अंतर्गत अंतर्निहित असतातच, असें शक्तिवादांतील चिंत्य रहस्य आहे. चिद्रूप हें स्वरूपतः तर्कातीत असलें तरी शाखाचंद्रन्यायानें, तटस्थ लक्षणानें, निषेधमुखानें ( नेति नेति असें ), विरोधी गुणधर्मानें किंवा सत्-चित्-आनंद अशा अबाधित लक्षणानें, त्याचे निर्देश केले जातात. चलाचल अशा विरोधी धर्मानें जेव्हां शास्त्र ब्रह्मवर्णन करतें, तेव्हां तो विरोध मायेमुळें अथवा बुद्धीच्या परिच्छिन्नतेमुळें भासतो. तो भ्रम आहे असें मायावादी म्हणतात व तो चिच्छक्तीमुळें भासतो व तो खरा आहे, असें शक्तिवादी सांगतात. मायावादी नामरूप कर्मात्मक जगदानुभवांतील भेद आणि विसंगति मायाभ्रम म्हणून तुच्छ लेखतात. पण यावर शक्तिवाद्यांचें म्हणणें असें आहे कीं, तो टाळल्यावरहि जगदानुभवाला सताहून विलक्षण व असताहून विलक्षण असे विरोधाभास असलेलें लक्षण त्यास सांगावेंच लागतें. शिवाय मायावी

जगताचा केवलाद्वैतांत समावेश न केल्यानें केवलाद्वैत द्वैतच उत्पन्न करतें. उलटपक्षीं गत्यात्मक जगताला त्रैकालाबाधितत्व नसलें तरी तें विद्यमान असताना ते चिच्छक्तिरूपच असतें, असें अद्वैत जरी शक्तिवादी सांगत असले तरी एकाच मूळ अविकारी तत्त्वाचें पूर्ण स्वरूप सगुण-निर्गुण, सक्रिय-निष्क्रिय असें उभयविध कसें असतें हें कोडें शक्तिवादालाहि सोडविता येत नाहीं. कारण, क्षयात बदल संभवतो तें पूर्ण म्हणतां येत नाहीं एकदरींत चिदानुभवाची (ज्ञानानुभवाची) जाग्रत-स्वप्न-सुषुप्ति या अवस्थेंतील सोपाधिक अनुस्यूतया तुरीय (समाधि) अवस्थेंतील निरुपाधिक अतीतता या दोन अनुभवाचे प्रकारातून आगासवर्धी वध्यासुतप्रमाणें अत्यंताभाव, "जें झालेंच नाहीं" तो अजातिभाव, मृगजळाप्रमाणें दृक्प्रतीतिमात्र भाव, रज्जुसर्पभ्रमाप्रमाणें विवर्तभाव, अलंकाराप्रमाणें अविकृत परिणामभाव, केवळ व्यावहारिक सत्ताभाव आणि त्रिकालाबाधित नित्य अविकारी असा पारमार्थिक अपरिच्छिन्न केवलपूर्ण, भेदशून्य सद्भाव असे विकल्प संभवतांत

---

१ The Crux of the whole problem is this Though of course the changing world is not real in the sense of being persistent in the three tenses of time, yet it is there in a way, and it can never be said that it does not exist. And this changing existence (call it unreal if to change is to be unreal) of the world experience side by side with unchanging existence of Pure Experience is a Gordian knot which (some may say) we do not either untie by any theory of cosmic hypnosis, or cut by any logical or dialectic weapon. It is best to frankly recognise that Reality (though consciousness itself) in its wholeness is alogical, and that, therefore, any attempt, direct or indirect, to clothe it in logical concepts must involve us in contradiction

[Mahamaya, p. 55].



[२ पुढील पान पहा

आतां हे निरनिराळे दृष्टिभेद चिद्वस्तूच्या ज्या अनुस्यूत व अतीत या दोन अवस्थाभेदांमुळें संभवतात, ते अवस्थाभेद जगद्दृष्टीनेंच मानावे लागतात. त्रिकालाबाधित, शुद्ध अविकारी, एकमेवाद्वितीय अशा पारमार्थिक दृष्टीनें ते संभवत नाहींत. पारमार्थिकसत्ता सगुण-निर्गुणातीत, सक्रिय-निष्क्रियातीत, अनुस्यूत-अतीतातीत इत्यादि सर्व सापेक्षभावातीत आहे, हें

---

२ मागील पानावरून चालू.

--जगाच्या सत्यमिथ्यत्वासंबंधीं विचार करतां—

१. ज्या पदार्थाची कल्पना संभवली तरी जगांत त्रैकालिक अत्यंताभाव असतो, त्यास वंध्यासुत किंवा शशशृंग हे दृष्टांत देतात.

२. जो पदार्थ वस्तुतः नसून व तें माहीत असून तसाच भासत राहातो, त्या दृग्भासास मृगजळाचा दृष्टांत देतात. हें उन्हाच्या कडक किरणात उखार भूमीवर नसून प्रत्यक्ष भासतें.

३. पदार्थाचें यथार्थ ज्ञान न होतां त्या ठिकाणीं अन्यथा भास होतो त्यास रज्जुसर्प किंवा शुक्तिरजत हे दृष्टांत देतात. मंदप्रकाशांत पडलेल्या दोरखंडावर सर्पाचा भास होतो किंवा उन्हांत पडलेल्या शिंपल्याच्या ठिकाणीं चांदीचा भ्रम होतो यास विवर्त म्हणतात.

४. पंचवीस तोळ्यांच्या सोन्याच्या सरींतून फक्त पंचवीस तोळे सोनेंच काढून घेतलें तर सरी हें नामरूप उरत नाहीं; अर्थात् सरी या नामरूपाला सुवर्णाहून पृथक् सत्ता मुळींच नसते. याला अविकृत परिणाम म्हणतात.

५. जें एकमेवाद्वितीय तत्त्व तिन्ही काळीं नित्य शुद्ध एकच रूपात अविकारी असतें तें पारमार्थिक सत्य होय. या ब्रह्मास अन्य दृष्टांत नाहीं. हा एकच सत्यानुभव, पूर्णानुभव, शिवानुभव, अथवा ब्रह्मात्मानुभव होय. बाकीचे सारे अनुभव मिथ्यानुभव होत. या परब्रह्मासारखें दुसरें सजातीय कांहीं नाहीं, त्याहून वेगळें विजातीय कांहीं नाहीं, व त्याच्या पोटांतहि स्वगतभेद नाहीं, असें वेदान्ती मानतात. उलट, ज्यांत सर्व जगत् व्यक्ता-व्यक्त असतें अशी चिच्छक्ति शिवब्रह्मांत शैवशाक्त अविनाभूत नित्य सत्य मानतात, हाच मतभेदाचा मुद्दा आहे. शैवशाक्त मायेला सत्य मानतात, वेदान्ती तिला सताहून विलक्षण, असताहून विलक्षण, सता-सताहून विलक्षण म्हणून अनिर्वचनीय म्हणतात.

म्हणणहि पुन्हां सापेक्षच आहे. पण त्यास निरुपाय आहे. केवलावस्था म्हणजे विरोधी धर्मांची बेरीज नव्हे ती निर्विशेषावस्था होय. त्यांत सजातीय, विजातीय व स्वगत कोणतेच भेद संभवत नाहींत. पण शक्तिवादाप्रमाणें पराहंतारूप समष्टि ईश्वर आणि अपराहंतारूप व्यष्टिजीव हे चिच्छक्तीचेच सविशेपभाव आहेत. सकल-निष्कलादि द्वैतभावना किंवा अनुभव द्विदलात्मक आज्ञाचक्राच्या वर नाहींत. सहस्रारांत (मस्तकांतील चक्र) ज्या पराकोटीचा (परशिव, पराशक्ति, परव्योम, परावाक् इत्यादि) अनुभव आहे, त्यांत शक्तिवादाप्रमाणें सकल भेदांचा अभेदात म्हणजे अविनाभूत अशा अद्वैत स्थितींत अव्यक्तरूपांत अतर्भाव होतो. पण केवलाद्वैती ब्रह्मवादी यास स्वगतभेद म्हणतात व तो त्यांस मान्य नाहीं. पण त्यावर शक्तिवाद्यांचें असें म्हणणें आहे कीं, सत्-चित्-आनंद इत्यादि स्वगतभेद जर ब्रह्माचे ठिकाणीं प्रत्यक्ष आहेत, तर त्यास पूर्णानुभवांतून वगळतां कसें येईल ? सारांश, पूर्ण हें तर्कातीत असल्यामुळें त्यासंबंधीं कांहींच म्हणतां येत नाहीं. तार्किक चिकित्सा करूं जावें तर सक्रिय-निष्क्रिय याचा एकत्र मेळ, तसेंच सशक्तिक ब्रह्माच्या क्रियेंतील हेतु व अपूर्णता याचा पूर्णाशीं मेळ बसत नाहीं. म्हणजे एकाच शुद्ध तत्त्वास सक्रिय आणि त्यासच उलट निष्क्रिय असें म्हणता येत नाहीं. तसेंच क्रियेंत हेतु लागतो तो पूर्णतत्त्वासंबंधीं संभवत नाहीं. त्यानें तें मूळ तत्त्व अपूर्ण ठरूं जातें, जेथें बदल आहे तेथें पूर्णता नाहीं. पूर्णातून पूर्ण काढलें तरी पूर्णच उरतें असें हें विलक्षण पूर्ण आहे.

१ The dilemma is this : to say that Perfect Experience changes and evolves is to deny that it is Perfect; and to say that Experience is unchanging and statical is to deny that it is the whole Experience as it actually is. But as a whole it must be either moving or unmoving. There is no logical escape from the dilemma. In spiritual intuition the whole is alogical, and to the analytic understanding, it presents the two aspects of statical and dynamical. [ Mahamaya, p. 60 ]. ब्र. सू २।१।११.

२ बृ. उप ईश. पद्य.

चिदाकाश हे अहंनिष्ठ, कर्तृवाच्य किंवा विषयीगत आहे की नाहीं, हाहि एक कूट प्रश्न आहे. तें विषयीगत मानावयाचें म्हणजे त्याच्याच ठिकाणीं विषयी आणि विषय, प्रकाश आणि विमर्श असे दोन भेद कल्पावे लागतात. असें झालें असता विषयरूप होणारें चिदाकाश विषयविषयी या भावातीत चिदाकाशाहून भिन्नच ठरेल. अर्थात् तेथें द्वैत उत्पन्न होतें व द्वैत म्हणजे अपूर्णता होय.

अपराहंतारूप जीवाला पराहंतारूप ईश्वर मानणें ओघासच येतें. म्हणजे ईशशक्तीनें निर्माण केलेलें मन त्या ईश्वरासहि विषय करूं शकतें. श्रेष्ठता, कारणता, व्यापकता, सर्वज्ञता, नित्यता इत्यादि मूळ बौद्धिक भावनांची परमावधि म्हणजे ईश्वर होय. पण अपराहंताचा विषय जसा बुद्धिगम्य आणि बुद्धयातीत किंवा विश्वात्मक आणि भेदाभेदातीत असा असतो, त्याप्रमाणें पराहंतेचा विषय पराहंतेच्या स्वरूपाच्याहि अतीत, पण तिला आपल्या पोटांत घेणारा असा असला पाहिजे. 'स्थिरचरव्यापुनी अवघा तो जगदात्मा दशांगुळें उरला', हें पताचें वचन हेंच दर्शवितें.

शक्तिवादाचे पूर्णानुभवात निष्कलाबरोबर सकलहि येतें. त्याप्रमाणें सुख-सौंदर्याबरोबर दुःख-विरूपताहि त्यातच येते. सकल-निष्कल दोन्ही चिद्रूपे असलीं तरी निष्कल हें शुद्ध व सकल हें शबल मानतात. त्याचप्रमाणें धर्मातीत अशा पूर्णाचे ठिकाणीं धर्म आणि अधर्म दोन्ही असले तरी धर्म हा त्याला मिळण्याचा शुद्धमार्ग मानतात. ईश्वर हा द्वंद्वातीत असला तरी सत्त्व-प्रधान दया त्याच्या ठिकाणीं आहेच. शेवटीं त्यास असेंहि म्हणावें लागतें कीं, द्वंद्वातीत असें हें पूर्ण ब्रह्म सर्व द्वंद्वाचा आश्रय आहे.'

---

१ *Summing up we find that Perfect Experience is not in time and in space and yet it manifests itself as a beginningless and endless cosmic flux and cosmic con-*

तात्पर्य, शैवशाक्ताचा सक्रिय निष्क्रिय असा सशक्तिक शिवाचा पूर्णानुभव अयुक्तिक किंवा तर्कातीत ठरतो. वेदान्तातील भूमा हें ब्रह्मात्मतत्त्व निर्गुण, निष्क्रिय व त्रिविध भेदरहित आहे ज्याच्याहून मोठें सामान्य संभवतच नाहीं असें तें एकमेव एकरस महासामान्य आहे त्याहून अन्य कांहीं नाहीं तें नित्य अविकारी आहे त्यास पाहाणारें, जाणणारें दुसरें कोणी नाहीं त्या ठिकाणीं विषयविषयी भावच नाहीं तें एकच एक, अद्वितीय असें नित्य, निरातिशय सुखरूप भूमातत्त्व म्हणजे आपला शिवात्माच अथवा ब्रह्मात्माच होय असें छांदोग्यात ( छा ७।२५।२ ) अखेर सांगितलें आहे. " तरी सुख तें गा किरीटी । दाविजेल तुज दिठीं । जें आत्मयाचिये भेटी । जीवासी होय ॥ " ज्ञानेश्वरी, १८।७७३.

याचाच स्पष्ट खुलासा पुढील प्रकरणात करून त्यातच शिवलिंगोपासनची अंतिम परिणति कशी होते तें पाहू.

प्राप्यं कृत्वैव तस्य प्रपदनममृतस्याद्यमानन्दमूर्तिस्थानं भर्गस्य जुष्टं तदमृततनवैर्देवदेवैः पुराणैः ॥ —रत्नत्रयपरीक्षा

---

## प्रकरण १५ वें

# शिवात्मलिङ्गोपासना

एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ एषोऽन्तर्याम्येष योनिः सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ॥ ६ ॥ नान्तः प्रज्ञं न बहिष्प्रज्ञं नोभयतः प्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम् । अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिन्त्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपञ्चोपशमं शान्तं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥ ७ ॥ सोऽयमात्माऽध्यक्षरमोंकारोऽधिमात्रं पादा मात्रा मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति ॥ ८ ॥ अमात्रश्चतुर्थोऽव्यवहार्यः प्रपञ्चोपशमः शिवोऽद्वैत एवमोंकार आत्मैव संविशत्यात्मनाऽऽत्मानं य एवं वेद ॥ १२ ॥

—माण्डूक्य उपनिषद्

एको देवः सर्वभूतेषु गूढः सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा।
कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥
—श्वे० ६।११.

ओं मनोबुद्ध्यहङ्कारचित्तानिनाहं। न च श्रोत्र जिह्वे न च घ्राणनेत्रे।
न च व्योम भूमिर्न तेजो न वायुश्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥
॥ १ ॥ —निर्वाणषट्कम्.

अखण्डाकारवृत्तिस्तु वेदान्ते या निरूपिता।
नमो महेश्वरायेति लिंगसंघट्टनं हि तत् ॥ ७ ॥
—नरहरिस्वामीकृत शिवपूजाशतक.

माण्डूक्य उपनिषद् हें साऱ्या वेदांताचें सार आहे. त्याच्याशीं श्रीशिवलिंगोपासनेचा समन्वय करण्याचा यत्न या प्रकरणांत करण्यांत येत आहे. "केतकीवर पत्रेषु लघुपत्रस्य गौरवम्।" या सुभाषिताप्रमाणें मांडूक्य हें जसें अत्यंत लहान (अवघे १२ मंत्र) तसेंच तत्त्वज्ञानाचें अत्यंत सारभूत असें उपनिषद् आहे. ज्यांना अधिक वाचण्याला सवड नाहीं, त्यांनीं हें एकच आत्मसात् केलें म्हणजे पुरे, असें मुक्तिकोपनिषदांत म्हटलें आहे व त्याचा अनुवाद श्रीमच्छंकराचार्यांनीं व आधुनिक वैदिक विज्ञानवाद्यांनीं केला आहे. या उपनिषदाला वैदिक विज्ञानवादी "सर्वोपनिषत्" म्हणतात. कारण भोक्तात्म्या जीवापासून तों अमृतात्म्यापर्यंत विचार यांत साररूपानें आहे. यांत ज्ञान आणि विज्ञान दोन्ही आहेत. "हे जीवा! तूं आत्मयाजी बन. विश्वयाजी होऊं नकोस." हा या उपनिषदाचा लक्ष्यार्थ आहे. ओंकारद्वारां प्रज्ञान ब्रह्माचें निरूपण यात आहे. तसेंच अथर्वणवेदाचें 'अयं आत्मा ब्रह्म।' हें महावाक्य याच उपनिषदांतील आहे. जीव हें कार्यब्रह्म, ईश्वर हें कारणब्रह्म व उभयातीत परब्रह्म, या तिघांचा विचार यांत केला आहे.

आत्मयाजी आणि ज्ञानयोगी एकच. याग आणि योग हे साधनमार्ग जरी दिसण्यांत वेगळे दिसले, तरी त्यांच्या अंतिम पर्यवसानांत भेद नाहीं. योग हें शिवधर्माचें मर्म आहे. तसेंच "शिव हा वस्तुतः यज्ञसाधक आहे," हें यागांतील मर्म आहे. विष्णु हाच यज्ञनारायण होय. पण भागवतांतील गोवर्धनमाहात्म्य व ऋषिपत्न्यामाहात्म्य या कथानकांत श्रीकृष्ण यज्ञ-



A tribal marriage

noney matters and clas cal music recitals with ut any takers cause a rain in the national exche uer Commercialisation of e small screen is prob ly the greatest calamity nce Indepedence

*Vineeta Bharati*
Nashik

***andhi***

Sir – The Down memory ne column entitled Typi lly Gandhian (EW Au ist 20) was thought ovoking Anand Hing ani s memories about the ther of the nation were ghtening The nor al rational and patriotic estyle of the Mahatma deserves to be earnestly emulated by every conscientious person young or old!

*Devendra Bharati*
Nashik

**Readers who wish to send their views/ opinions on the topics covered by Express Weekend may address their letter to**
**The Editor,**
**Express Weekend**
**Indian Express**
**Nariman Point**
**Bombay-400 021**

विरोधी भासतो. त्याचप्रमाणें दक्षाख्यानांत शिव यज्ञबाधक भासतो. पण शिवलिंगोपासनेवरील अयथार्थ विपरीत भावनांप्रमाणें हे आभासमात्र आहेत. अग्निषोमात्मक यज्ञ हें विश्वाचें स्वरूप आहे. अग्नि हें स्त्रीचें योनिस्वरूप आहे व सोम हें पुरुषाचें वीर्य आहे. प्राकृत विश्वयोनींत अनुप्रविष्ट होणारें ब्रह्म दोन प्रकारचें असतें. एकाचें नांव विश्वशरीरावच्छिन्न ईश्वर व दुसऱ्याचें नाव शरीरविश्वावच्छिन्न जीव म्हणजे भूतात्मा होय. या "द्वासुपर्णा सयुजा सखाया।" अशा जीवशिवात्म्याचें निरूपण या उपनिषदांत आहे.

उपासना हा एक यज्ञ आहे अथवा योगहि आहे. या उभयतांतील भाव संगतिकरण, हा एकच आहे. आत्मा आणि परमात्मा, जीव आणि ईश्वर या दोन अज्ञात वस्तूंचें संगतिकरण करण्याकरतां मध्यस्थ प्रतीक लागतें. जीवाची जिज्ञासा व ब्रह्मविद्या यांचें संगतिकरण करण्याकरितां शब्द किंवा पुस्तक या मध्यस्थाची गरज असते. वस्तुतः "यदेवेह तदमुत्र यदमुत्र तदन्विह।" क. ४।१०. 'जें पिंडीं तें ब्रह्मांडीं' असा सिद्धान्त खरा. पण तो पटवण्याकरितां "नामरूपकर्मात्मक" एक छंदस्वरूप प्रतीक लागतें.

आधिभौतिक, आधिदैविक आणि आध्यात्मिक हे जे तीन विषय अथवा दृष्टि यांपैकीं कोणतीहि एक दुसऱ्या दोहींचा योग म्हणजे संबंध जोडते. याप्रमाणें कर्मठांच्या यज्ञासंबंधीं भौतिक, वेदि, अग्नि, हवनद्रव्य, यज्ञपात्रें इत्यादिविषयक प्रक्रिया ह्या आधिदैविक अग्नि व आध्यात्मिक प्राण अथवा ज्ञान यांचा संबंध जोडण्यासाठींच असतात. तसेंच उपासकांची भौतिक उपास्यमूर्ति अथवा भौतिक शिवलिंगाचें प्रतीक हें आधिदैविक शिव व आध्यात्मिक जीव यांचें सामंजस्य साधण्याचें साधन असतें. उपासकाच्या पुढें असलेलें शिवलिंगाचें पाषाणमय भौतिक प्रतीक हें कांहीं जड उपास्य नव्हे, तर त्यांतील जें ईशतत्त्व अथवा देवतातत्त्व तें उपास्य मानावयाचें असतें. त्याचप्रमाणें पूजा-जप ध्यान इत्यादि करणारें उपासकाचें जड शरीर हें खरें उपासक नव्हे, तर त्या शरीरांतील "मी" नामक गूढ जीवतत्त्व हेंच उपासक होय. या उपास्य-उपासकांच्या नामरूपादि भिन्न उपाधींना बाध करून आत्मलिंगाच्या ठिकाणीं ऐक्य जोडणें हें उपासनेचें रहस्य असतें. आधिभौतिक, आधियाज्ञिक, आधिदैविक व आध्यात्मिक या भिन्न विषयांचें अधिष्ठान एकच चेतन असतें. विषयावच्छिन्न, शब्दावच्छिन्न, संस्कारावच्छिन्न या भिन्न चेतनप्रकारांतील

चेतन स्वरूपतः एकच असतें व तें आपल्या ठिकाणींहि असतेंच. बेरजेचें गणित शिक्षकानें शिशूला शिकविण्यासाठीं अंक किंवा खडे अशा मध्यस्थाची गरज असते, त्याप्रमाणें आत्मचैतन्य व ब्रह्मचैतन्य यांचें ऐक्य जोडण्याचें शिवलिंग हे एक सुलभ आलंबन आहे.

श्वेताश्वतरोपनिषदांत ( १।१४ ) सांगितलें आहे कीं, "स्वदेहमरणिं कृत्वा प्रणवं चोत्तरारणिम् । ध्याननिर्मथनाभ्यासाद्देवं पश्येन्निगूढवत् ।" म्हणजे स्वतःचा देह ही खालची अरणि व ॐ ही वरची अरणि करून ध्यानरूपी सतत मंथनानें, गूढरूपानें असलेला देव प्रत्यक्ष पहावा. ॐ हें शिवात्म्याचें लिंग व अहम् हें जीवात्म्याचें लिंग यांतील वैषम्याचा बाध करून शिवसायुज्य जोडावें. ह्याच विचार सुसाध्य करण्याकरितां शिवलिंग हें प्रणवलिंग आहे, अशीहि कल्पना करतात. ( लिं. पु. पू. अ. १७-१९ ) हें जें सारें त्रैकालिक जग आहे, तसेंच जें त्याहून निराळें कालातीत ब्रह्मात्मतत्त्व आहे, तें ओंकारच होय, अशी ही उपासनेसाठीं स्वीकारलेली भावना आहे. 'ओमित्येतदक्षरमिदँ सर्वं तस्योपाख्यानं भूतं भवद्भविष्यदिति सर्वमोंकार एव । यच्चान्यात्त्रिकालातीतं तदप्योंकार एव'॥' मांडुक्य १. त्याचप्रमाणें ह्या जो सशक्तिक स्रष्टा ईश्वर ह्याचें प्रतीक शिवलिंग आहे. उपासना ही कर्तृतंत्र म्हणजे आपणच करावयाची ध्यानधारणा-प्रक्रिया आहे हें पुनः पुन्हा सांगावयास नकोच. आतां हें प्रणवोपासनेंतील साम्य सयुक्तिक रीतीनें पटवून घेण्यासाठीं प्रणव, जीवात्मा आणि देवात्मा यांच्या ठिकाणीं अवयवांची कल्पना करून तिन्ही चतुष्पाद अशी धारणा सांगितली आहे. म्हणजे व्यष्टि-समष्टि विश्व-जागिरताचा अभिमानी विश्व आणि वैश्वानर, ( व्यष्टि-समष्टि ) स्वप्न अवस्थेचा अभिमानी तैजस आणि हिरण्यगर्भ, ( व्यष्टिसमष्टि ) सुषुप्तीचा अभिमानी प्राज्ञ ईश्वर, आणि या तिन्ही अवस्थांपलीकडील जें साध्यपद तें तुरीय ब्रह्म, असे चार पाद मानले आहेत. तसेंच प्रणव ह्या प्रतीकाचे ठिकाणीं अ+उ+म या ओम्‌च्या तीन मात्रा व चवथें अमात्र तत्त्व असे चार पाद सांगितले आहेत. ' सर्वँ ह्येतद्ब्रह्मायमात्मा ब्रह्म सोऽयमात्मा चतुष्पात् ॥२॥ सोऽयमात्मा ऽध्यक्षरमोंकारोऽधिमात्रं पादा मात्रा मात्राश्च पादा अकार उकारो मकार इति ॥ ८ ॥ ( मांडूक्य )' आतां याचप्रमाणें आपण जगाचा क्षणभर लैंगिक दृष्टीनें विचार करूं. या सृजन क्रियात्मक साक्षात् स्थूल इंद्रियांचा जाग्रतावस्थेतील

अभिमानी तो विश्व व त्याचीं इंद्रियें हें स्थूल शरीर, त्या सृजनक्रियेची इंद्रियातीत जी मोक्त्याची किंवा शिल्पकाराची स्वप्नाप्रमाणें केवळ मनाची प्रेरणा किंवा कल्पना याचा अभिमानी तो तैजस व त्याचें शरीर तें लिंग शरीर आता हें स्थूल म्हणजे प्रत्यक्ष साक्षात् व सूक्ष्म म्हणजे मानसिक हे दोन्ही भाव ज्यात लीन होतात, म्हणजे तिरोधान पावतात, अर्थात् प्रतीत होत नाहींत, अशी जी सुषुप्त म्हणजे गाढनिद्रेची निश्चल निर्विकार अवस्था त्या अवस्थेच्या अभिमान्याला प्राज्ञ म्हणतात. त्याचें शरीर तें कारणशरीर असें म्हणतात. या व्यष्टि अभिमान्याप्रमाणें जाग्रत अखिल सृष्टीचा अभिमानी वैश्वानर, सूक्ष्म संकल्पात्मक सृष्टीचा अभिमानी सूत्रात्मा हिरण्यगर्भ व दोहोंचा ज्यात लय होतो त्या प्रलयावस्थेचा अभिमानी ईश्वर असें मानतात

हा व्यष्टि अभिमानी प्राज्ञ किंवा समष्टि अभिमानी ईश्वर व त्याचें कारण-शरीर याच्याशींच आपल्याला मुख्य कर्तव्य आहे कारण त्याचेंच शिवलिंग हें प्रतीक आहे हे जे तीन अभिमानी पुरुष, त्यापैकीं विश्वाभिमानी याचें स्थूल शरीर, तैजसाभिमान्याचें लिंगशरीर आणि प्राज्ञ अभिमानी याचें कारण-शरीर मानलें आहे शिवलिंग हें कारणशरीराचें प्रतीक आहे आता प्रणव-लिंगाचा विचार करता प्रणवाच्या अ–उ–म् या तीन मात्रा मिळून ओम् असा शब्द होतो यापैकीं आद्य 'अ' ही मात्रा जाग्रत स्थूलाची मानतात, 'उ' ही मात्रा स्वप्नस्थानीय सूक्ष्म तैजसाची मानतात व 'म्' ही सुषुप्तस्थानीय प्राज्ञ याची मात्रा मानतात 'अ' हा उच्चार व स्वर आदि आहे 'उ' हा पुढील उत्कर्ष पावलेला स्वर आणि उच्चार आहे तो 'अ' आणि 'म्' याच्या मधील उभयविध स्वर आहे व 'म्' या अन्त्य व्यंजनानें अ आणि उ याचा उच्चार मापला जातो म्हणजे पुरा होतो म्-च्या उच्चारात ओठ मिटतात व उच्चार पुरा होतो याप्रमाणें एक ओम् या ध्वनीचा कंठ, तालु व ओंठ असा रेषात्मक त्रिकोण होतो अर्थात् क्रमींत क्रमी तीन रेषांची एक आकृति सिद्ध होते हा जो ओम्‌चा त्रिकोण अथवा चिन्ह ही अखिल नामरूपात्मक ब्रह्मांडाची मूळ प्रकृति (योनि) होय आदि-मध्य अंत, जाग्रत स्वप्न सुषुप्ति, स्थूल-सूक्ष्म-कारण, सत्त्व रज तम, ब्रह्मा विष्णु महेश, सूर्य-चंद्र अग्नि, गति-आगति-स्थिति अशीं या त्रिकोणाचीं असंख्य त्रिकें सांगण्यात येतात त्याच्याशीं आपल्याला फारसें कर्तव्य नाहीं पण अ+उ+म् यापैकीं तिसऱ्या 'म्' नें

ओठ मिटतात व अ-स्थान आणि उ-स्थान हीं तिरोधान पावतात, अदृश्य होतात. अ+उ म्हणजे अ हा उंत मिळतो व पुढें अ+उ=ओ हें म् मधें अवसान पावतें म्हणजे लय पावतें. आणि त्या ओम्ची पुन्हां द्विरुक्ति करतांना त्या अंत्य 'म्' मधूनच पुन्हां अ आणि उ हे उदय पावतात. म्हणजे 'म्' मधें 'अ' आणि 'उ' लय पावतात व तेथूनच ते पुन्हां उद्भवतात. जसें ओमोंमोंम उत्पत्ति, स्थिति आणि लय यांपैकीं त्याची मात्रा म ही आहे. अ ही मात्रा जाग्रताची. तो जाग्रत 'अ' कार स्वप्नस्थानीय उकारांत लय पावतो व अखेर जाग्रत आणि स्वप्न या दोन्ही अवस्था व त्यांच्या मात्रा सुषुप्तस्थानीय 'म्' कारांत लय पावतात. अर्थात् जाग्रत अवस्था स्वप्नांत लय पावते व दोन्ही अवस्था सुषुप्तींत म्हणजे गाढ झोंपेंत लय पावतात. त्यांतच उत्पत्ति स्थिति-लय-तिरोधान-अनुग्रह या शैवांच्या पंचकृत्यांतील तिरोधान व अनुग्रह या अवस्था अव्यक्त असतात.

याप्रमाणें जाग्रत आणि स्वप्न या दोन अवस्था व त्यांच्या मात्रा तिसऱ्या लयस्थानीं जरी लय पावल्या, तरी त्या नाश पावत नाहींत. सुषुप्तांतूनच पुन्हा स्वप्न आणि जाग्रत या अवस्था उद्भूत होतात. अर्थात् उत्पत्ति, स्थिति आणि लय यांपैकीं तिसऱ्या लयस्थानांत उत्पत्ति आणि स्थिति नाश न पावतां बीजरूपांत अव्यक्त राहतात. सुषुप्तीनंतरचा जाग्रत व्यवहार किंवा प्रलयानतरचा पुनर्सृष्ट्युद्भव, हे त्यांचें सुषुप्ति किंवा प्रलय या अवस्थेंत सूक्ष्म अव्यक्त बीजरूपानें अवस्थान असल्याचेंच सिद्ध करतात. कारण, जें असतें तेंच व्यक्त होतें. अभावांतून भावरूपता कशी संभवेल? (नासतो विद्यते भावो नाभावो विद्यते सतः। २।१६ गीता) म्हणून प्रलयावस्थेंत अनुग्रहरूप पुढील सृष्टीचीं कर्मबीजें अव्यक्त असतात, असेंच मानावें लागतें. तात्पर्य, अ+उ+म्, जाग्रत्-स्वप्न-सुषुप्ति, उत्पत्ति-स्थिति-लय, ब्रह्मा-विष्णु-महेश, यांचा जो त्रिकोण तो (अव्याकृत व) सबीज (अव्यक्त सानुग्रह) मानावा लागतो.

हा जो मूळप्रकृतीचा त्रिकोण तीच शिवलिंगाची स्थूलमानानें शाळुंका होय. त्या त्रिकोणांतील अव्यक्त कर्मबीज-अनुग्रह (थिऑसोफिस्ट यांचा शाश्वत अणु) तीच पिंडी होय. सर्व मिळून जीवेश्वरांचें कारणशरीर होय. *या कारणशरीरांत स्थूलसूक्ष्म शरीरें तिरोधान पावलेलीं असतात, लय पावलेलीं* असतात. नाश पावत नाहींत. सुषुप्त अवस्थेंत म्हणजे गाढ झोंपेंत स्थूल शरीर

व सूक्ष्म शरीर अथवा मन याचा नाश होत नाहीं, त्याचें अमान होतें त्या कारणशरीरातूनच पुन्हा जाग्रत् व स्वप्न या अवस्था उदित होतात, म्हणून त्यास सबीजकारणशरीर म्हणतात आता पदार्थाचें कारणशरीर कितीहि सूक्ष्म मानलें, तरी त्यात उत्पत्ति-स्थिति-लय हें निक मानावेंच लागतें तसेंच कोणत्याहि सृष्ट पदार्थास व्यक्त होताना किमानपक्ष तीन रेषा लागतातच तीन रेषाहून कमी रेषानीं आकृति व्यक्त होऊच शकत नाहीं. अशी ही मूळ प्रकृतीची त्रिकोणात्मक योनि अनिर्वाह पक्ष म्हणून स्वीकारावी लागते स्त्रीच्या जननेंद्रियाची एक मानलेली आकृति म्हणून त्रिकोणाची कल्पना केलेली नसते.

आता असें पहा कीं, 'अ' स्थानीय ब्रह्मा व 'उ' स्थानीय विष्णु या दोघानीं 'म्' स्थानीय महेश्वराच रूप मापलें जात नाहीं उलट 'म्' स्थानीय महेश्वराच्या पोटात दोघे सामावतात हें मार्गे सांगितलेल्या (पृ १२) ब्रह्मा-विष्णूस आदिअंत न लागलेल्या अरुणाचल ज्योतिर्लिंगाच्या कथेचें एक रहस्य दिसतें या भावना-या तत्त्वास थिऑसॉफीनें रौंड म्हटलें आहे तात्पर्य, सुषुप्तीचा अभिमानी जो प्राज्ञ अथवा ईश्वर त्याचें त्रिकोणात्मक जें प्रकृति-चिन्ह तें केवळ उत्पत्तिवाचक नसून उत्पत्ति स्थिति-लयवाचक आहे अर्थात् ज्यातून जग उत्पन्न होतें, ज्यात तें स्थित असतें व अखेर ज्यात तें लय पावतें, तें प्राज्ञाचें कारणशरीर आहे, तीच ईश्वराची योनि होय अर्थात् ही योनि म्हणजे, केवळ उत्पादन करणारें जननेंद्रिय नाहीं तर जगाचें स्थिति-स्थान व लयस्थानहि आहे म्हणून शिवलिंगाची जी योनि अथवा शाळुंका तें जननेंद्रियाचें प्रतीक नसून व्यापक अशा अव्यक्त मायेचें अथवा मूळ प्रकृतीचें प्रतीक आहे हें निर्विवाद सिद्ध होतें 'पृथ्वी अवघी लिंगाकार। अवघा लिंगाचा विस्तार॥' वेदेश्वरी १।५४. येथें लिंग म्हणजे प्रकृति असेंच समजावें (लिंग पु पू अ ३)

याप्रमाणें शिवलिंगापैकीं योनिभागाचा विचार झाल्यावर आता पिंडीचा विचार करू सुषुप्तिस्थानीय मकारमात्रावाच्य जें महेश्वरनामक लयतत्त्व तें नुसतें अभावरूप नसून भावरूप सबीज आहे हा जो विशेष तो या मूळ प्रकृतीच्या योनि त्रिकोणात बिंदुरूपात अर्थात् वाटोळ्या पिंडीनें दर्शविला जातो तें बीज अव्याकृत आहे अर्थात् शुक्रबीजाप्रमाणें व्यक्त नाहीं आणि शिवाय

मानवाच्या सृजनशक्तीचें शुक्र हें बीज काहीं शिश्नात नसत तात्पर्य, त बीज म्हणजे शुक्र नव्हे किंवा शिश्नहि नव्हे म्हणून योनि त्रिकोणातील बीजबिंदु अथवा शाळुंकेवरील पिंडी हें शिश्नप्रतीक मानणें अत्यत असबद्ध आह सुपुप्तावस्थेंत अथवा प्रलयावस्थेंत जें अव्यक्त, अविद्याकामकर्मबीज असतें त्याचें शिश्न या अवयवाशीं काहींच सादृश्य नसतें त्याप्रमाणे लिंग-शरीर या शब्दातील लिंग (म्हणजे मन) या सशेचा स्थूलशरीराच्या शिश्नाशीं काहींच सबध नसतो, त्याचप्रमाणें कारणशरीर यातील कारण शब्दाचा स्थूल जननेंद्रियाशीं काहींच सबध नसतो

साराश, सृजनक्रियेचे साधन म्हणून स्थूल जननेंद्रियाना कारणत्व देऊन कोणी आपल्याकडील तात्रिक वामाचारी अथवा पाश्चात्य शिश्नयोन्योपासक त्या जघन्य इद्रियाचे आणि त्याच्या अभिमानी विश्वाचे देव्हारे माजवोत, ते केवळ मैथुनादिकामास प्राप्त होतील ( माडुक्य ९ ), किंवा स्वप्नावस्थेंतील सृजनात्मक मैथुनक्रियेच्या कल्पनेंत भगलिंगसयोगाची नुसती कल्पनाच असते. वस्तुत स्थूल शरीराचें भगलिंगमैथुन तेथें नसतेंच त्याप्रमाणें भग-लिंगाच्या अथवा त्याच्या मैथुनाच्या शिल्पकारानें केलेल्या लिंगाकृतींचो व त्याच्या अभिमानी कल्पक तैजसाची कोणी धारणा करोत, ते फार तर विज्ञानाच्या सततीचा उत्कर्ष करतील पण त्यापुढील सुपुप्तावस्थेंत स्थूल जननेंद्रियें किंवा तत्सबधीं कल्पना याचें पूर्ण अमान असतें. त्या अवस्थेंतील व्यष्टि अभिमान्यास प्राज्ञ म्हणतात व समष्टि अभिमान्यास ईश्वर म्हणतात, आणि त्या ईश्वरनामक शिवाचीच उपासना करण्याकरता शिवलिंग हें प्रतीक असल्यामुळें तेथें जघन्य इद्रियाचे अथवा त्याच्या कल्पनेचेंहि अमानच अभिप्रेत आहे याहून अधिक स्पष्ट म्हणावयाचें तर स्थूल जननेंद्रियें हीं व्यष्टि समष्टि जाग्रतावस्थेचे अभिमानी विश्व किंवा वैश्वानर याचीं चिन्हें म्हणता येतील जननेंद्रियाचे शिल्पातील आमास हीं व्यष्टि समष्टि तैजस हिरण्यगर्माचीं चिन्हें म्हटल्यास कदाचित् चालेल, परतु व्यष्टि-समष्टि सुपुप्त अथवा प्रलय या अवस्थेचें अभिमानी जें प्राज्ञ किंवा ईश्वर याचें प्रतीक हें अव्याकृताचें प्रतीक होय तें निरवयव व अरूपच असावयास पाहिजे तें केवळ ( सबीज ) सद्ब्रह्म होय, अथवा शबलब्रह्म होय तेथें अव्यक्त अविद्या काम कर्म बीजाची म्हणजे केवळ " अनुग्रहाची " सत्तामात्र दिग्दर्शित करावयाची असते तींच पिंडीनें दिग्दर्शित होते

आता जाग्रत् स्वप्नसुषुप्ति याचे अनुक्रमें विश्व, तैजस व प्राज्ञ (अथवा समष्टीच्या म्हणजे अखिल विश्वाच्या दृष्टीनें वैश्वानर, हिरण्यगर्भ व ईश्वर) हे जे अभिमानी ते निरनिराळे तीन पुरुष नसून एकाच पुरुषाच्या त्या व्यावर्तक अशा तीन अवस्था मात्र असतात त्याचप्रमाणें उत्पत्ति, स्थिति आणि लय या तीन अवस्था एकाच वस्तूच्या ठिकाणीं समवतात याप्रमाणें तीन अवस्थाचा अथवा तीन गुणाचा जो हा पुरुष त्यालाच माडूक्यात प्राज्ञ, सर्वेश्वर, सर्वज्ञ, अतर्यामी सर्वोची योनि, व भूताचा प्रभव व प्रलय असें म्हटलें आहे [ *एष सर्वेश्वर एष सर्वज्ञ एषोन्तर्याम्येष योनि सर्वस्य प्रभवाप्ययौ हि भूतानाम् ॥ माडुक्य ६* ] हाच उत्पत्ति स्थिति लय तिरोधान अनुग्रह असा पचमुखी परमेश्वर होय

या अखिल ब्रह्माडातील असंख्य अशा नामरूपात्मक पदार्थांचा जो समुदाय त्यापैकींच प्राण्याचें शरीर व त्याचीं जननेंद्रियें हा अल्पाश आहे. त्याचप्रमाणें या जगन्नाटकाच्या जगत्सूत्रधाराचे जे असख्य सकल्प किंवा कामना-कल्पना त्यापैकींच व्यष्टिजीवरूप नटानें काहीं ग्रहण केलेल्या असतात याप्रमाणें प्रत्येक व्यक्तीचे स्थूल-सूक्ष्म भाव हे समष्टीहून पृथक् नसतात, त्याचेच अश असतात त्याचप्रमाणें प्राण्याच्या गाढ निद्रेचा अभिमानी जो प्राज्ञ त्याच्या ठिकाणीं *जाग्रताची, स्थूल विषयाची ( साक्षात् मैथुनाची ) वृत्ति* नसते तसेंच स्वप्नावस्थेतील किंवा मनोराज्यातील मैथुनविषयक केवळ मानसिक अशी सूक्ष्म वासनावृत्तिपण नसते स्वस्वरूपाची (आत्मस्वरूपाची) विस्मृति अथवा अमान हें तिन्ही अवस्थेत सारखेंच असतें. कारणशरीर हें मगलमय, तमप्रधान शिवच असतें तात्पर्य, स्वतत्त्वाचा अप्रबोध, कामसस्पर्शरहितत्व व अन्यथाग्रहणशून्यत्व या प्राज्ञेश्वराच्या विशेषणाचें जड शिवलिंग हें प्रतीक आहे, हें सुज्ञास सहज पटेल त्याचप्रमाणें प्राज्ञाची म्हणजे गाढ झोंपेतील जीवभावाचीं जीं दुसरीं लक्षणें तींहि या प्रतीकाचे ठिकाणीं कशीं आहेत तीं पहा "यत्र सुप्तो न कचन काम कामयते न कचन स्वप्न पश्यति तत्सुषुप्तम् । सुषुप्तस्थान एकीभूत प्रज्ञानघन एवाऽऽनन्दमयो ह्यानन्द-भुक्चेतोमुख प्राज्ञस्तृतीय पाद ॥५॥"

रात्रीच्या अधारात ज्याप्रमाणें खोलींतील सर्व वस्तु अदृश्य होऊन सारें अधारमय एकीभूत झाल्याप्रमाणें दिसतें, त्याप्रमाणें अरूप अशा शिव-

लिंगाच्या ठिकाणीं ब्रह्मा, विष्णु, महेश, (ईश्वर, सदाशिव) सूर्य, सद्योजातादि असख्य मूर्ति अव्यक्तावस्थेंत जणू एकीभूत झालेल्या असतात. त्वष्ट्या मूर्तिकारानें अथवा कुंभारानें मूर्ति किंवा घट घडण्याच्या पूर्वी, सान्या मूर्ति किंवा घट यांची संभाव्यता ओल्या मातीच्या गोळ्यांत किंवा ऐवट पाषाणांत अव्यक्त रूपांत असते, त्याचप्रमाणें गाढ निजलेल्या पुरुषाच्या प्राज्ञभावांत सारा स्वप्नजाग्रत् व्यवहार मिटलेल्या ग्रंथाप्रमाणें एकीभूत झालेला असतो. असें जें अव्याकृत संज्ञक कारण त्याचें हें अरूप (अथवा अव्यक्त नानारूप) शिवलिंग प्रतीक आहे गाढ निजलेला जीव मृतवत् जड अजाणसा भासतो, त्याप्रमाणें प्रज्ञानघनाचें शिवलिंग हें जड भासणारें प्रतीक आहे व शिवालयाच्या गर्भागारांत बहुधा असणारा अंधार हें सुषुप्तीचें अथवा अमानाचें व तमाचें प्रतीक जाणावें. त्याचप्रमाणें गाढ निजलेल्या प्राज्ञाचे ठिकाणीं विषयीकारानें किंवा विषयाकारानें स्वप्नजाग्रतावस्थेंत होणारें स्पंदन नसल्यामुळें तो निरायास व अनुपम असें परमावधीचें विश्रांति सुख भोगतो, असें जें त्याचें शववत् भासणारें पण आनंदमय व आनंदभुक् असें अवस्थान तेंच या शिवलिंगाच्या ठिकाणच्या विश्रांतिरूप शिवभावात मानतां येतें. तसेंच गाढ झोंपीं गेलेला प्राणी चेतो मुख असतो, म्हणूनच तो जागा होऊं शकतो. गाढ झोंपीं गेलेला प्राणी मृतवत् निश्चेष्ट भासला, तरी त्याला प्राणरूप सबीज सद्ब्रह्माचें अधिष्ठान असतें. म्हणून प्राक्कर्मबीजाच्या भूतपूर्वगतीनें तो जागा होऊन पुढें व्यवहारक्षम होतो. त्याचप्रमाणें या शिवलिंगाचे *ठिकाणीं प्राक्कर्मबीजाचें प्रतीक अशी त्या मूळ प्रकृतिरूप योनि-त्रिकोणांत* अधिष्ठित अशी बिंदुरूप पिंडी आहे. तेंच अनुग्रहरूप तेजोमुखत्व असल्यामुळें त्याला ज्योतिर्लिंग, स्वयंभूलिंग, किंवा मनुष्याच्या कर्मकृतीचें संसारात्मक अथवा बीजात्मक कृत्रिम पण दिव्य लिंग असें मानतात.

याप्रमाणें मांडूक्याच्या पांचव्या श्रुतींत सुषुप्तावस्थेचा व कारणशरीराचा अभिमानी जो प्राज्ञ त्याचें जें लक्षण सांगितलें, त्याचें शिवलिंग हें प्रतीक कसें तें सांगितलें. याप्रमाणें जीवभावाचें जें प्रतीक तेंच शिवभावाचें होय. कारण जें पिंडीं तेंच ब्रह्मांडीं. जीवात्मा हा शिवात्म्याहून पृथक् नाहीं. त्याचाच तो जणुं अंश असल्यामुळें जीवप्रतीक व शिवप्रतीक एकच संभवतें.

जीवाचें पर्यवसान शिवाला सोडून नाहीं. अलंकाराचें नामरूप सुवर्णाहून

पृथक् नसतें. सुवर्णाचा अलंकार तो सुवर्णच म्हणून जीवाचें जें प्रतीक तेंच सर्वेश्वराचें प्रतीक होय. उलटपक्षीं आधिदैविकासह सर्व भेदजाताची ईशिता जीवात्माच आहे म्हणूनच संत आध्यात्मिक दृष्टीनें म्हणतात कीं, ईश्वर आमच्याहून वेगळा नव्हे. आमचा ईश्वरभाव तोच देव. आम्हींच देवाचे द्रष्टे आणि निर्माते आहोंत. याप्रमाणें ब्रह्मात्मरूप जीवलिंगाचे ठिकाणीं ईशस्वरूप शिवलिंगहि सामावतें. श्वेताश्वतर म्हणतें, ' वालाग्रशतभागस्य शतधा कल्पितस्य च, भागो जीव· स विज्ञेय· सचाऽऽनन्त्याय कल्पते ॥ श्वे० ५।९ ' केसाग्राच्या दशसहस्त्रांश्या अग्रापेक्षाहि सूक्ष्म असा जीव असता तो अनंतालाहि आपल्या हृदयांत धारण करतो. संत म्हणतात, " नम्र जाला भूता। तेणें कोंडिलें अनंता ॥ " शरणागतीचा असा अद्भुत महिमा आहे. वस्तुतः विश्व, तैजस आणि प्राज्ञ हे एकाच जीवात्म्याचे विशेषणभेद अथवा अवस्थाभेद असतात, त्याचप्रमाणें किंचिज्ञ व सर्वज्ञ हे जीवशिवाच्या बुद्धि या उपाधीचे भेद आहेत. मूळ आत्मरूप एकच आहे. ज्याप्रमाणें एक जाग्रत जीव मनोराज्यांत स्वप्नदशा व शांत व शून्य दृष्टींत सुषुप्तदशा याचा अनुभव घेऊ शकतो, अथवा व्यष्टीजीवाच्या गाढ झोंपेंत प्राणाच्या ठिकाणीं ज्याप्रमाणें त्याचें स्थूल सूक्ष्म अनुभव लय पावतात, त्याचप्रमाणें या जीवाच्या गाढनिद्रारूप दैनंदिन प्रलयाप्रमाणें जगाच्या प्रलयरूप ईश्वराच्या गाढ निद्रेच्या वेळीं संवर्तनामक महाप्राणाच्या ( वायूच्या ) ठिकाणीं सारें जग उपसहृत होतें याप्रमाणें अध्यात्म व अधिदेव यांचें प्राणाख्य बीज एकच आहे त्याचप्रमाणें उभय पक्षीं ( व्यष्टि-समष्टि ) कार्याचा अधिष्ठाता चिद्धातु एकच आहे. तेंच शिवलिंग या उपाधीचे ठिकाणीं उपहित चेतन आहे याप्रमाणें या आधिभौतिक प्रतीकाच्या उपासनेंत अध्यात्म जीव व आधिदैविक ईश्वर यांचें ऐक्य साधावें तेंच सबीज सद्ब्रह्म अथवा शबल ब्रह्म होय. जाग्रतावस्थेंतील स्थूल विषयानंद, स्वप्नांतील किंवा मनोराज्यातील सूक्ष्म वासनानंद, सुषुप्तींतील निर्विषयानंद हें सारें भोग्य व त्याचा भोक्ता हे दोन्ही या एकाच मायाशबलब्रह्माचे ठिकाणीं आहेत. सत्त्व, रज, तम आणि सत्–चित्–आनंद असा षड्गुणैश्वर्यसंपन्न भगवान् अथवा शक्तिमान् यांचें हें प्रतीक आहे या प्राज्ञापासून उद्भूत होतेशी वाटणारी भोज्य-भोक्त्याची जाग्रतस्वप्नसृष्टि स्वस्वरूपविस्मरण व अन्यथा दर्शन अशी मायामयी आहे. शिवलिंगाच्यासंबंधीं अविद्याकल्पित भाव हें शिवलिंगाचें यथार्थ दर्शन नव्हे

व्यष्टिजीवाच्या स्थूल जननेंद्रियाच्या भोग्यभोक्तृभावाची समष्टीच्या ठिकाणीं धारणा केल्यास फार तर मैथुनादिकामाची व वैश्वानराची प्राप्ति समवेल शिवलिंग हें शिश्नयोनि मैथुनप्रतीक आहे असें मानून तदनुरूप समष्टिभावना करण्याचा प्रयत्न सफल झाल्यास त्या कल्पनारूप सूक्ष्म लिंगशरीराभिमानी तैजसास हिरण्यगर्भाची व विज्ञानसततीच्या उत्कर्षाची प्राप्ति होईल पण या लिंगशरीराचाहि जो अधिष्ठाता ज्यानें हिरण्यगर्भास जन्म दिला, जो हिरण्यगर्भाचाहि साक्षी 'यो देवाना प्रभवश्चोद्भवश्च विश्वाधिपो रुद्रो महर्षि । हिरण्यगर्भं जनयामास पूर्वं स नो बुद्धया शुभया सयनक्तु ॥ श्वे ३।४,४।१२ ' तो सर्वाधिष्ठाता अतर्यामी शिवच शिवलिंगोपासनेच्या द्वारा खरा उपास्य आहे श्वेताश्वतर सागतें कीं, 'भावग्राह्यमनीडाख्य भावाभावकर शिवम् । कलासर्गकर देव ये विदुस्ते जहुस्तनुम् ॥ ५।१४ ॥ ' जे त्या परमशिवाला जाणतात, ते देहापासून मुक्त होतात. साराश, भौतिक पिंडीची प्रत्यक्ष भौतिक पूजाअर्चा करावी त्यातील आधिदैविक ईश्वराची प्रार्थना करून त्याची कृपा सपादावी व त्यातीलच आध्यात्मिक शिवात्मा अपरोक्ष करून घ्यावा, हें शिवलिंगोपासनेचें रहस्य आहे.

शिश्नयोनि किंवा भोक्ताभोग्य याच्या प्रतीकाच्या ध्यानानें कामशक्ति व जन्ममरणपरपराच वाढेल. भोग्यभोक्त्याचें मैथुन हें जन्मदातें आहे पण शिवलिंगरहस्य त्याहून गूढ आहे वरील द्वद्वाचें जें केवलाधिष्ठान त्या अतर्यामीचें ध्यान हें योनिमुक्त करणारें आहे "अत्रातर ब्रह्मविदो विदित्वा लीना ब्रह्मणि तत्परा योनिमुक्ता ॥" श्वे १।७ भोग्यभोक्ता हे भाव ज्याच्या सत्तेवर नादतात त्याला प्रेरिता असें जरी म्हटलें असलें, (श्वे १।१२) तरी वस्तुत. तो प्रेरिता नव्हेच. "न तस्य कार्यं करण च विद्यते ॥" श्वे. ६।८. तो आप्तकामनिर्गुणनिष्क्रिय आहे

शिवलिंगाच्या ठिकाणचे सयोनिलिंगादि भोग्यभोक्तेभाव हा निव्वळ भ्रम आहे पण कोणताहि भ्रम निरधिष्ठान सभवत नाहीं. सर्पभ्रमाला रज्जू, मृगजळाचे भ्रमाला उखार भूमि असें काहीं तरी अधिष्ठान लागतेंच. निरनिराळ्या अलकाराच्या नामरूपाना सुवर्ण हें अधिष्ठान लागतेंच इतकेंच नव्हे तर तें अधिष्ठानमात्र सत्य असतें. नामरूपात्मक भ्रम मिथ्याच असतो त्याला वस्तुत अस्तित्वच नसतें. त्याप्रमाणें प्राप्तस्वरूप म्हणजे अरूप शिव-

*लिंगाच्या ठिकाणीं अविद्याकल्पित भगलिंगाला किंवा भोज्यभोक्तेपणाला* वस्तुतः अस्तित्वच नसतें. प्राज्ञप्रतीक शिवलिंगाचे ठिकाणीं जें असतें, तें उपाधिरहित जातिमत्त्वरहित व क्रियारहित अशा केवळ शिवात्म्याचें प्रतीक होय. गाढ झोंपेंत असणारा जो प्राज्ञ त्याच्या जडतेचें अधिष्ठान जसा जीवात्मा तसेंच या पाषाणाच्या जड प्रतीकाचें अधिष्ठान शिवात्मा होय. या जीवात्म्याच्या जशा स्थूलसूक्ष्मकारण या तिन्ही जड देहोपाधि तशाच या शिवात्म्याच्या विराट, हिरण्यगर्भ व ईश्वर या स्थूलसूक्ष्मकारणोपाधि यांचा बाध करणाऱ्या उपासनेची जी जड प्रतीकोपाधि तिचा बाध करून ' शिवोऽहम्, *शिवोऽहम्, शिवः केवलोऽहम्' असें शिवलिंग व आत्मलिंग याचें ऐक्यज्ञान* अनुभविणें हीच शिवलिंगोपासनेची दिव्य फलश्रुति आहे.

सारांश, सर्व अंतर्बाह्य गुणोपाधींची अथवा नामरूपांची अत्यंत निवृत्ति, हेंच चवथें *शुद्ध तुरीय पद अथवा परमशिवपद याच्या दिव्य उपलब्धीचें तें साधन* असतें. सुषुप्तींत सर्व निरास होतो, पण निद्रा दोषरूप स्वस्वरूपाचें अज्ञान हा दोष राहतोच. म्हणून निद्रेचें अवलंबन न करतां जागेपणीं अंतर्मुखवृत्तीनें अविद्याकल्पित सर्व विषयजाताचा निरास हेंच शिवलिंगोपासनेचें अंतिम रहस्य आहे. हेंच मांडूक्योपनिषदाचा पुढील सातवा मंत्र सांगत आहे. तें असें " नान्तःप्रज्ञं न बहिःप्रज्ञं नोभयतःप्रज्ञं न प्रज्ञानघनं न प्रज्ञं नाप्रज्ञम्। अदृष्टमव्यवहार्यमग्राह्यमलक्षणमचिन्त्यमव्यपदेश्यमेकात्मप्रत्ययसारं प्रपञ्चोपशमं शान्तं शिवमद्वैतं चतुर्थं मन्यन्ते स आत्मा स विज्ञेयः ॥ ७ ॥ " म्हणजे हें *तुरीय शिवात्म तत्त्व अन्तःप्रज्ञ नाहीं. अर्थात् त्याचे ठिकाणीं भगलिंगात्मक* मैथुनकाम नाहीं. ( काम त्यानें जाळला आहे ) त्या आप्तकामाचे ठिकाणीं वासनात्मक तैजस अवस्था नाहीं. तें बहिःप्रज्ञ नाहीं. म्हणजे त्या निरवयवाच्या ठिकाणीं बहिर्भोग घेणारी भगलिंग हीं इंद्रियेंच नाहींत. तें उभयतः प्रज्ञ नाहीं. अर्थात् जाग्रत् व स्वप्न यांच्यामधील अन्तरालावस्थेचा निषेधच आहे. ' न प्रज्ञानघनं ' तिसऱ्या सुषुप्त अवस्थेंत निद्रादोषामुळें स्वस्वरूपाचें *अज्ञान असतें. तुरीयांत त्या अज्ञानाचेंहि* निराकरण केल्यामुळें म्हणजे सुषुप्तींतील अज्ञानाचा अनुभव सांगणारा जीवात्मा ज्ञानीच ठरतो. अशा त्या स्वयंप्रकाश शिवात्मतत्त्वाचे ठिकाणीं अज्ञान नाहीं, म्हणून ज्ञाननाशीलहि

नाहीं. त्याच्या ठिकाणीं विषयच नाहीं. अर्थात् विषयीहि भावपण नाहीं. तसेंच त्या ज्ञप्ति मात्राच्या ठिकाणीं जडताहि नाहीं. कारण जाग्रत्, स्वप्न, सुषुप्ति, हे अनुभव व्यभिचरित आहेत. एक अनुभव दुसऱ्या अनुभवाचा निषेध करतो. पण त्यांची ज्ञप्ति अव्यभिचरित आहे. सातत्यानें आहे. असें तें शिवात्मतत्त्व अदृष्ट म्हणजे ज्ञानेंद्रियांचा विषय नाहीं ( तें ज्ञानेंद्रियांचें प्रेरक आहे ) म्हणून तें व्यवहारोपयोगी नाहीं. तें घेतां-देतां येण्यासारखें नाहीं. अर्थात् तें अग्राह्य आहे. तें अलक्षण म्हणजे अलिंग आहे. तें प्रत्यक्ष किंवा अनुमानाचा विषय नाहीं, म्हणून अचिंत्य आहे. तें अनिर्देश्य असलें तरी ( जाग्रत्-स्वप्न-सुषुप्ति ) सर्व अवस्थांतील एकात्मप्रत्ययसार आहे. म्हणजे सर्व अवस्थांचा साक्षी तो एकच असा प्रत्यय आहे. असा प्रत्यगात्मरूप तो परमात्मा, तोच परमशिव होय. याप्रमाणें अगोदर भौतिक शिवलिंगप्रतीकाच्या ठिकाणीं अविद्याकल्पित जीव व मायाशबल ईश्वर यांचें सबीज कारणाचें ऐक्य साधून पुढें त्या बीजाचा ज्ञानाग्नींत प्रविलाप करून शिवात्मतेच्या अद्वयानंदास प्राप्त होणें हें शिवलिंगोपासनेचें अखेरचें सार आहे. ( 'एतज्ज्ञेयं नित्यमेवात्मसंस्थं नातः परं वेदितव्यं हि किंचित् । श्वे. १।१२ ) याहून श्रेष्ठ दुसरें कांहींच जाणण्यासारखें नाहीं. पिंडी उपस्थ भोगी रति । उत्पत्ति कर्ता प्रजापति । उभयां उभवी जयाची शक्ति । शिवोहं शिवोहं ॥ वेदेश्वरी १।६६

*शिवलिंग हें प्रणवलिंग आहे अशी धारणा करणारे असा विचार करितात* कीं, स्थूल प्रपंच, जागरित व विश्व हें त्रितय अकारमात्र आहे. सूक्ष्म प्रपंच, स्वप्न व तैजस हें त्रितय उकारमात्र आहे. स्थूलसूक्ष्म प्रपंचाचें कारण सुषुप्त व प्राज्ञ हें त्रितय मकारमात्र आहे. त्यांतील पूर्व पूर्व उत्तरोत्तर भावास प्राप्त होतें. यांप्रमाणें हें सर्व स्थूलसूक्ष्मकारणात्मक जगत् ओंकार-मात्र आहे असें ध्यान करीत राहिलेल्या पुरुषाला, "एखादा वेळ तूं ज्याला ओंकार मात्र समजत होतास तें अत्यंत शुद्ध ब्रह्मात्मरूपच आहे'," ( अलंकार

---

१ अकार तोचि सर्व दृश्य । उकार चंचलत्वें सर्वावभास । मकार अज्ञान कारण दोहींस । ही प्रकृतीचीं अंगें तीन ॥ ३८७ ॥ ध्वनिमात्र ते मूळ प्रकृति । जाणता पुरुष स्वयंज्योति । एवं प्रकृतिपुरुषात्मक निश्चितीं । सविशेष ओंकार मी ॥ ३८८ ॥ वेदेश्वरी, अ. ६.

देहरूपी वृक्षावर जीव आणि शिव असे दोन पक्षी आहेत. पैकीं एक विषय-भोक्ता आहे, दुसरा केवलसाक्षी आहे. एक मोहयुक्त होऊन शोक करतो, दुसरा आत्मसंतुष्ट असतो. एक प्रकृतीचा भोग घेतो, दुसरा त्या भुक्तभोगा प्रकृतीला तिरस्कृत करतो. (श्वे. ४।५ ते ७). एक अविद्याकल्पित आहे, दुसरा अविद्याउपहित आहे. भौतिक क्षर पाषाणलिंग हें अक्षराच्या (ईश्वराच्या) अथवा प्राज्ञाच्या कारणशरीराचें प्रतीक आहे. त्यांतील उपास्य आधिदैविक ईश्वर आहे आणि साध्य लक्ष्यार्थ अव्यय शिवात्मा आहे. उपासना हें साधन आहे, म्हणून श्वेताश्वेतर सांगतें कीं, (६।५-७) तो विश्वाचा अनादि आरंभ, संयोगाचें निमित्तकारण, आपल्या हृदयांत असलेला ईश्वरांचा सर्वश्रेष्ठ महेश्वर विश्वातीत विश्वात्मा त्या शिवात्म्याला आम्हीं प्राप्त करून घ्यावें. याप्रमाणें शिवलिंगांतला जो अलिंग कारणाचें कारणरूप परमशिव त्याला आपल्या आत्मलिंगाचे ठिकाणीं पहावा. शिवोपासना अनादि मानण्यांत शिवच शिवाचा उपासक असा भाव सहजच प्राप्त होतो. शिवोऽहं, शिवोऽहं, शिवः केवलोऽहम्! अशी जी आद्यकारणाची आत्मप्रतीति तीच अनादि व अनंत अशी शिवात्मलिंगोपासना होय! निदान असें तरी म्हणावेंच लागतें कीं, (न चेशिता नैव च तस्य लिंगम् स कारणं करणाधिपाधिपो ॥ श्वे. ६।९). "निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरंजनम्।" श्वे. ६।१९. अशा त्या शुद्ध शिवात्म्याच्या ठिकाणीं शिवलिंगोपासना हा विषय समाप्त होतो. याशिवाय प्रत्यक्ष उपासना तंत्र हा अभ्यासाचा व अनुभवाचा विषय आहे. तो गुरू-पासून समजावून घ्यावा.

या अद्वय शिवात्मलिंगभावाला अथवा लिङ्गांगसामरस्याला उपासना अगर भक्ति कसें म्हणतां येईल? असेंहि मानण्याचें कारण नाहीं. शैवांच्या प्रत्यभिज्ञादर्शनांत अद्वैताच्या चरमावस्थेंतहि भक्तीला स्थान आहे. शिवशक्तीच्या अविनाभूतमेलनांतहि चिदंश शिवभाव व आनंदांश शक्तिभाव असें नित्य द्वैत ते मानतात. कट्टे अद्वैतवादी शंकराचार्यहि

**सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्।**
**सामुद्रो हि तरङ्ग क्वचन समुद्रो न तारङ्गः॥**

*आपल्यामध्यें समुद्राचे जसे तरंग तसा हे नाथ! मी आपला दास अथवा* अंश आहें, असें म्हणतात. तसेंच भक्तिरसायनांत श्रीनरहरि म्हणतात :

संगति नीट जमेले. नंदी हा जसा परात्पर चतुष्पाद ब्रह्मरूप आहे तसाच तो चतुष्पाद पशु म्हणजे जीवनिदर्शकहि आहे. पशु-पाश-पशुपति हें शिवोपासनेंतील त्रिक् आहे. ज्याप्रमाणें सूक्ष्मदर्शक साधनानें अव्यक्त व्यक्त होतें, त्याप्रमाणें पशुसाधकानें उपासनापाशरूप सूक्ष्मदर्शक साधनानें पशुपतीचें यथार्थ दर्शन घेऊन कृतार्थ व्हावें. स्वतः पशुपति असल्याचें अनुभवावें हा शिवलिंगोपासकांचा शुद्ध वैदिक असा शैवधर्म आहे.

ओंकाराच्या ज्याप्रमाणें चार मात्रा आहेत त्याप्रमाणें शिवाच्या चार मात्रा कोणी मानतात. त्या अशा :—

शकार = विराटरूप, विश्व, उत्पत्तिरूप, जाग्रत, सत्त्व, ज्ञाता, आधिभौतिक.

इकार = हिरण्यगर्भ, तैजस, स्थिति, स्वप्न, रज, ज्ञान, अध्यात्म.

वकार = ईश्वर, प्राज्ञ, प्रलय, सुषुप्ति, तम, ज्ञेय, अधिदैव.

अकार = परब्रह्म, आत्मा, मायातीत, तुर्य, गुणातीत, शुद्धसंवित् , निरुपाधिकत्व. याप्रमाणें शिव सर्वत्र, सर्वातीत, सर्वाधार, सर्वाधिष्ठान सर्वांना पूजनीय आत्मा आहे.

प्रणव हें शिवाचें चिन्ह अथवा नाम आहे असें शिवमहापुराण, लिंगपुराण, महाविष्णुपुराण कै. सं. अ. ३।१६ वगैरे अनेक ग्रंथांत सांगितलें आहे. तसेंच शिवलिंग हें उद्बोधक प्रतीक आहे.

सारांश, आत्मलिंग तेंच शिवलिंग, जीवात्मा तोच वस्तुतः शिवात्मा (एवमात्मात्मनि गृह्यतेऽसौ सत्येनैनं तपसा योऽनुपश्यति ॥ श्वे. १।१५) अरणीमध्यें जसा अव्यक्त अग्नि असतोच, त्याप्रमाणें अहम्वाच्य जीवांत ॐ वाच्य शिव आहे हें तपानें व ज्ञानानें जाणतां येतें. कारण तो माणसाच्या हृदयांत प्रतिष्ठित आहे. (सदा जनानां हृदये संनिविष्टः । श्वे ३।१३.) या

---

१ प्रमोघरूप नंदी प्रकटे। सामान्य ज्ञान शति उमटे॥ वेदेश्वरी, ४।२४६.

२ इजिप्शिअन्स, खाल्डियन्स, झोरॅस्ट्रियन्स इत्यादि प्राचीन संस्कृतींत नंदी पूजला जात असे तो कांहीं ग्राम्य भावनेनें खास नसावा, (सीक्रेट डॉक्ट्रिन्स ५।२०६; २।३८३ पहा.)

देहरूपी वृक्षावर जीव आणि शिव असे दोन पक्षी आहेत. पैकीं एक विषय-मोक्ता आहे, दुसरा केवळसाक्षी आहे. एक मोहयुक्त होऊन शोक करतो, दुसरा आत्मसंतुष्ट असतो. एक प्रकृतीचा भोग घेतो, दुसरा त्या भुक्तभोगा प्रकृतीला तिरस्कृत करतो. (श्वे. ४।५ ते ७). एक अविद्याकल्पित आहे, दुसरा अविद्याउपहित आहे. भौतिक क्षर पाषाणलिंग हें अक्षराच्या (ईश्वराच्या) अथवा प्राज्ञाच्या कारणशरीराचें प्रतीक आहे. त्यांतील उपास्य आधिदैविक ईश्वर आहे आणि साध्य लक्ष्यार्थ अव्यय शिवात्मा आहे. उपासना हें साधन आहे, म्हणून श्वेताश्वेतर सांगतें कीं, (६।५–७) तो विश्वाचा अनादि आरम, संयोगाचें निमित्तकारण, आपल्या हृदयांत असलेला ईश्वरांचा सर्वश्रेष्ठ महेश्वर विश्वातीत विश्वात्मा त्या शिवात्म्याला आम्हीं प्राप्त करून घ्यावें. या-प्रमाणें शिवलिंगांतला जो अलिंग कारणाचें कारणरूप परमशिव त्याला आपल्या आत्मलिंगाचे ठिकाणीं पहावा. शिवोपासना अनादि मानण्यांत शिवच शिवाचा उपासक असा भाव सहजच प्राप्त होतो. शिवोऽहं, शिवोऽहं, शिवः केवलोऽहम्। अशी जी आद्यकारणाची आत्मप्रतीति तीच अनादि व अनत अशी शिवात्मलिंगोपासना होय! निदान असें तरी म्हणावेंच लागतें कीं, (न चेशिता नैव च तस्य लिंगम् स कारणं करणाधिपाधिपो ॥ श्वे. ६।९). "निष्कलं निष्क्रियं शांतं निरवद्यं निरंजनम्।" श्वे. ६।१९. अशा त्या शुद्ध शिवात्म्याच्या ठिकाणीं शिवलिंगोपासना हा विषय समाप्त होतो. याशिवाय प्रत्यक्ष उपासना तंत्र हा अभ्यासाचा व अनुभवाचा विषय आहे. तो गुरू-पासून समजावून घ्यावा.

या अद्वय शिवात्मलिंगभावाला अथवा लिङ्गांगसामरस्याला उपासना अगर भक्ति कसें म्हणतां येईल? असेंहि मानण्याचें कारण नाहीं. शैवांच्या प्रत्य-भिज्ञादर्शनांत अद्वैताच्या चरमावस्थेतहि भक्तीला स्थान आहे. शिवशक्तीच्या अविनाभूतमेलनांतहि चिदंश शिवभाव व आनंदांश शक्तिभाव असें नित्य द्वैत ते मानतात. कट्टे अद्वैतवादी शंकराचार्यहि

> सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम्।
> सामुद्रो हि तरङ्गः क्वचन समुद्रो न तारङ्गः ॥

*याप्रमाणें समुद्राचे असे तरंग तसा हे नाथ! मी आपला दास अथवा* अंश आहे, असें म्हणतात. तसेंच भक्तिरसायनांत श्रीनरहरि म्हणतात :

द्वैतं मोहाय बोधात्प्राक् प्राप्ते बोधे मनीषया ।
भक्त्यर्थं कल्पितं द्वैतमद्वैतादपि सुन्दरम् ॥ ४२ ॥

जाते समरसानन्दे द्वैतमप्यमृतोपमम् ।
मित्रयोरिव दम्पत्योर्जीवात्मपरमात्मनोः[1] ॥ ४४ ॥

अखेर, आजच्या नवयुगाला हेंच सांगावयाचें कीं, शिवात्मलिंगोपासनेनें ब्रह्मात्मैक्याचें ज्ञान झाल्यानंतरच साम्यवाद, मानवतावाद, लोकसंग्रह, जनताजनार्दनसेवा व विश्वधर्म या महान् कल्पनांतील खरें व पुरें रहस्य तत्त्वतः कळेल.

विवेक पाहाणें बरा । बरा विचार तो करा ।
उपासकांसि सूचना । उपासना उपासना ॥ १ ॥
उपासनेला दृढ चालवावें । भूदेवसंतांसि सदां नमावें ।
सत्कर्मयोगें वय घालवावें । सर्वांमुखीं मंगल बोलवावें ॥ २ ॥

---

१ भावार्थ :— अद्वैत ज्ञानाच्या पूर्वींचें द्वैत मोहांत घालतें. परंतु अद्वैत-बोधानतर भक्तिप्रेमाकरितां कल्पिलेलें द्वैत अत्यंत प्रेमळ दम्पतीच्या सुखा-प्रमाणें अद्वैतानंद द्विगुणित करतें. अविद्या हें मायाकार्य मानावें. माया ही भेदजनक सृष्टिकर्ती आहे. महामाया भेद निरास करणारी आहे. महामायेच्याहि अतीत परमशिवपद आहे. इतकाच केवलाद्वैत व शैवाद्वैत यांत परमार्थतः भेद आहे. केवलाद्वैती महामाया शक्तीला नित्य अविनाभूत मानीत नाहींत. शैव मानतात.

" वस्तुतः पूर्ण सत्यकी दृष्टिसे तो सभी मिथ्या है और सभी सत्य है। और जिस स्थिति में पहुंचकर ऐसा अनुभव होता है, वही सच्चा परमपद है। यही अद्वैतवादियोंका ब्रह्म, वैष्णवों के विष्णु, शैवोंके सदाशिव, शाक्तोंकी पराशक्ति, गाणपत्योंके गणेश और बौद्धोंके बुद्ध है। इन सबमें केवल नामका ही भेद है। वस्तुतः तो सारे सिद्धान्तोंका समन्वय इस एक ही तत्त्वमें होता है। " ( कल्याण साधनांक, पृ. ७ ).

# परिशिष्ट

## श्वेताश्वतर उपनिषद् अध्याय सहावा.

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
|---|---|
| स्वभावमेके कवयो वदन्ति। | कसें कुठुनि जन्मलें जगतचक्र हें केधवां। |
| कालं तथाऽन्ये परिमुह्यमानाः। | निसर्ग म्हणती कुणी फिरवितो तया काल वा। |
| देवस्यैष महिमा तु लोके। | विमूढमति ते परि खचित, सत्य त्यां नाकळे। |
| येनेदं भ्राम्यते ब्रह्मचक्रम्॥ १॥ | महेश महिमाच हा भ्रमत विश्व ज्याच्यामुळें॥ १॥ |
| येनाऽऽवृतं नित्यमिदं हि सर्वम्। | असे भरुनि राहिला नित चराचरीं जो विभू। |
| ज्ञः कालकारो गुणी सर्वविद् यः। | गुणाधिपति, जाणता, सकल, कालकर्ता प्रभू। |
| तेनेशितं कर्म विवर्तते ह। | नियंत्रित प्रभूवरें विविध भासते प्रकृती। |
| पृथ्व्याप्य तेजो निलखानि चिन्त्यम्॥ २॥ | नभानिल जलानल पृथिवि यापरी आकृति॥ २॥ |
| तत्कर्मकृत्वा विनिवर्त्य भूयः। | स्वयें निघतसे दुरी सृजनकर्म आरंभुनी। |
| तत्त्वस्य तत्त्वेन समेत्य योगम्। | अचेतन जडासवें सजिव चेतना जोडुनी। |
| एकेन द्वाभ्यां त्रिभिरष्टभिर्वा। | स्वभाव अथ काल वा असति साधनें मात्र तीं। |
| कालेन चैवाऽऽत्मगुणैश्च सूक्ष्मैः॥ ३॥ | प्रभु लपुन राहिला म्हणुन मूळ जीं भासतीं॥ ३॥ |
| आरभ्य कर्माणि गुणान्वितानि। | घडे जनन सृष्टिचें त्रिगुणसाम्य जेव्हां ढळे। |
| भावांश्च सर्वान् विनियोजयेत् यः। | चराचर जगामधें विविधता तदां आढळे। |
| तेषामभावे कृतकर्मनाशः। | करील जगदीश तें त्रिगुण येति साम्यस्थिति। |
| कर्मक्षये याति सतत्त्वतोऽन्यः॥ ४॥ | तदा प्रलय होतसे परि अभंग ईशस्थिती॥ ४॥ |
| आदिः स संयोगनिमित्तहेतुः। | सनातन अखंड जो जडवितो जडां चित्कला। |
| परस्त्रिकालादकलोऽपि दृष्टः। | त्रिकाल कवळूनियां पलिकडे असे राहिला। |
| तं विश्वरूपं भवभूतमीड्यम्। | सुभव्य जरि सृष्टिचा जनक विश्वरूप स्वयें। |
| देवं स्वचित्तस्थमुपास्य पूर्वम्॥ ५॥ | महेश हृदयस्थ तो स्वमनकां प्रचीतीस ये॥ ५॥ |

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
|---|---|
| स वृक्षकालाकृतिभिः परोऽन्यो ।<br>यस्मात् प्रपंचः परिवर्ततेऽयम् ।<br>धर्मावहं पापनुदं भगेशम् ।<br>ज्ञात्वाऽऽत्मस्थममृतं विश्वधाम ॥ ६ ॥ | प्रपंचमय चक्र हें फिरतसे जयापासुन ।<br>हरी दुरित, धर्महीं उगम पावतो जेथुन ।<br>न काल, नच संसृति तरु, दिशा न त्या व्यापिती।<br>तयांहुनिहि थोर जो हृदयिं तोच सूक्ष्माकृति ॥ ६ ॥ |
| तमीश्वराणां परमं महेश्वरम् ।<br>तं देवतानां परमं च दैवतम् ।<br>पतिं पतीनां परमं परस्तात् ।<br>विदाम देवं भुवनेशमीड्यम् ॥ ७ ॥ | यमादि जरि ईश्वरासम, सुरेंद्रही देव तो।<br>महेश्वर तयांमधें परि असे महादेव तो ।<br>प्रजापति जरी दुजे पति परी तयांच्यामधें ।<br>सुपूज्य जगदीश तो प्रगट आमुतें होउं दे ॥ ७ ॥ |
| न तस्य कार्यं करणं च विद्यते ।<br>न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते ।<br>पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते ।<br>स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥ ८ ॥ | न कार्यकरणीयसें, मग कशास कर्मेंद्रिय ।<br>तयासम तसा न थोर कुणिही असा अद्वय ।<br>सशक्तिकहि जाणता प्रभु स्वयेंच कर्ता असे ।<br>अगाध महिमा असा श्रुति तदीय वर्णीतसे ॥ ८ ॥ |
| न तस्य कश्चित् पतिरस्ति लोके ।<br>न चेशिता नैव च तस्य लिंगम् ।<br>स कारणं कारणाधिपाधिपो ।<br>न चास्य कश्चिज्जनिता न चाधिपः ॥ ९ ॥ | स्वयेंच जगदीश जो कुठुनि ईश त्याचा दुजा ।<br>पिता सकल सृष्टिचा, जनक कोठुनी त्या अजा ।<br>न भूतपतिला तया पति कुणीही जीवाधिपा ।<br>कळे अनुभवेंच तो जरि घडे तयाची कृपा ॥ ९ ॥ |
| यस्तंतुनाभ इव तंतुभिः ।<br>प्रधानजैः स्वभावतः ।<br>देव एकः स्वमावृणोति ।<br>स नो दधातु ब्रह्माप्ययम् ॥ १० ॥ | अहो स्वशरिरांतुनी प्रसवि तंतु कोळी कसा ।<br>बसे गुरफटूनियां मग विणून जाळें जसा ।<br>तसा स्वरचितांमधें दडुनि जो स्वभावें असे ।<br>अम्हांवरि कृपा करो प्रभु, जडो तयाचें पिसें ॥ १० ॥ |

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
|---|---|
| एको देवः सर्वभूतेषु गूढः ।<br>सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा ।<br>कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः ।<br>साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥११ | असे प्रभुच एकला सकल व्यापुनी राहिला ।<br>नसे प्रगट तो दिसेल जरि अंतरीं शोधिला ।<br>तटस्थ अवलोकितो अखिल कर्म तो चिन्मय ।<br>तया त्रिगुण नेणती, स्थिरचरांस तो आश्रय ॥ ११ ॥ |
| एको वशी निष्क्रियाणां बहूनाम्<br>एकं बीजं बहुधा यः करोति ।<br>तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीराः ।<br>तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ॥१२ | नटे यदिय आश्रयें प्रकृतिबीज नानापरी ।<br>जडासहित जीवहि सहज सावरी, आवरी ।<br>तया हृदयवासिया सतत ध्यातिजे सन्मती ।<br>निरंतर सुखांत ते, इतर यातना भोगिती ॥ १२ ॥ |
| नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानाम् ।<br>एको बहूनां यो विदधाति कामान् ।<br>तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यम् ।<br>ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ॥१३ | अनित्य जगिं नित्यसे गमत जें तया पूर्विचा ।<br>अजाण जडजीव जे वदति ज्ञान, त्यापूर्विचा ।<br>सहेतुक अहेतु वा जगति कर्म जें जें घडे ।<br>करी सफल वा न वा तदधिकार देवाकडे ॥ १३ ॥ |
| | असे तदिय कार्य हें सकल विश्व, तो कारण ।<br>तया प्रभुवरा कुणी करुनि योग घे जाणुन ।<br>कुणी पथिक भक्तिचे, बघति ज्ञानमार्गें कुणी ।<br>शिवस्वरुप जाणतां सुटति सर्व पाशांतुनी ॥ १३ ॥ |
| न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकम् ।<br>नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः ।<br>तमेव भांतमनुभाति सर्वम् ।<br>तस्य भासा सर्वमिदं विभाति ॥१४ | न चंद्र, नच तारका, नच तिथें प्रकाशे रवी ।<br>न वीज तळपूं शके, कुठुन अग्निची थोरवी ।<br>प्रकाशमय तो स्वयें, इतर सर्व त्याच्यामुळें ।<br>प्रभा तदिय फांकली म्हणुन विश्व हें भासलें ॥१४॥ |

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
| --- | --- |
| स वृक्षकालाकृतिभिः परोऽन्यो। | प्रपचमय चक्र हें फिरतसे जयापासुन। |
| यस्मात् प्रपंचः परिवर्ततेऽयम्। | हरी दुरित, धर्मही उगम पावतो जेथुन। |
| धर्मावहं पापनुदं भगेशम्। | न काल, नच संस्थिति तरु, दिशा न त्या व्यापिती। |
| ज्ञात्वाऽऽत्मस्थममृतं विश्वधाम ॥ ६ ॥ | तयांहुनिहि थोर जो हृदयिं तोच सूक्ष्माकृति ॥ ६ ॥ |
| तमीश्वराणां परमं महेश्वरम्। | यमादि जरि ईश्वरासम, सुरेंद्रही देव तो। |
| तं देवतानां परमं च दैवतम्। | महेश्वर तयांमधें परि असे महादेव तो। |
| पतिं पतीनां परमं परस्ताद्। | प्रजापति जरी दुजे पति परी तयांच्यामधें। |
| विदाम देवं भुवनेशमीड्यम्॥ ७॥ | सुपूज्य जगदीश तो प्रगट आमुतें होउं दे ॥ ७ ॥ |
| न तस्य कार्यं करणं च विद्यते। | न कार्यकरणीयसें, मग क्यास कर्मेंद्रिय। |
| न तत्समश्चाभ्यधिकश्च दृश्यते। | तयासम तसा न थोर कुणिही असा अद्वय। |
| पराऽस्य शक्तिर्विविधैव श्रूयते। | सशक्तिकहि जाणता प्रभु स्वयेंच कर्ता असे। |
| स्वाभाविकी ज्ञानबलक्रिया च ॥ ८ ॥ | अगाध महिमा असा श्रुति तदीय वर्णीतसे ॥ ८ ॥ |
| न तस्य कश्चित् पतिरस्ति लोके। | स्वयेंच जगदीश जो कुठुनि ईश त्याचा दुजा। |
| न चेशिता नैव च तस्य लिंगम्। | पिता सकल सृष्टिचा, जनक कोठुनी त्या अजा। |
| स कारणं कारणाधिपाधिपो। | न भूतपतिला तया पति कुणीही जीवाधिपा। |
| न चास्य कश्चिज्जनिता न चाधिपः ॥ ९ ॥ | कळे अनुभवेंच तो जरि घडे तयाची कृपा ॥ ९ ॥ |
| यस्तंतुनाभ इव तंतुभिः। | अहो स्वशरिरांतुनी प्रसवि तंतु कोळी कसा। |
| प्रधानजैः स्वभावतः। | बसे गुरफटूनियां मग विणून जाळें जसा। |
| देव एकः स्वमावृणोति। | तसा स्वरचितांमधें दडुनि जो स्वभावें असे। |
| स नो दधातु ब्रह्माप्ययम ॥ १० ॥ | अम्हांवरि कृपा करो प्रभु, जडो तयाचें पिसें ॥ १० ॥ |

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
|---|---|
| एको देवः सर्वभूतेषु गूढः । | असे प्रभुच एकला सकल व्यापुनी राहिला । |
| सर्वव्यापी सर्वभूतांतरात्मा । | नसे प्रगट तो दिसेल जरि अंतरीं शोधिला । |
| कर्माध्यक्षः सर्वभूताधिवासः । | तटस्थ अवलोकितो अखिल कर्म तो चिन्मय । |
| साक्षी चेता केवलो निर्गुणश्च ॥११ | तया त्रिगुण नेणती, स्थिरचरांस तो आश्रय ॥११॥ |
| एको वशी निष्क्रियाणां बहूनाम् | नटे यदिय आश्रयें प्रकृतिबीज नानापरी । |
| एकं बीजं बहुधा यः करोति । | जडासहित जीवहि सहज सावरी, आवरी । |
| तमात्मस्थं येऽनुपश्यंति धीराः । | तया हृदयवासिया सतत ध्यातिजे सन्मती । |
| तेषां सुखं शाश्वतं नेतरेषाम् ।१२ | निरंतर सुखांत ते, इतर यातना भोगिती ॥ १२ ॥ |
| नित्यो नित्यानां चेतनश्चेतनानाम् । | अनित्य जगिं नित्यसे गमत जें तया पूर्विचा । |
| एको बहूनां यो विदधाति कामान् । | अजाण जडजीव जे वदति ज्ञान, त्यापूर्विचा । |
| तत्कारणं सांख्ययोगाधिगम्यम् । | सहेतुक अहेतु वा जगतिं कर्म जें जें घडे । |
| ज्ञात्वा देवं मुच्यते सर्वपाशैः ।१३ | करी सफल वा न वा तदधिकार देवाकडे ॥ १३ ॥ |
| | असे तदिय कार्य हें सकल विश्व, तो कारण । |
| | तया प्रभुवरा कुणी करुनि योग घे जाणुन । |
| | कुणी पथिक भक्तिचे, मथति ज्ञानमार्गे कुणी । |
| | शिवस्वरुप जाणतां सुटति सर्व पाशांतुनी ॥ १३ ॥ |
| न तत्र सूर्यो भाति न चंद्रतारकम् । | न चंद्र, नच तारका, नच तिथें प्रकाशे रवी । |
| नेमा विद्युतो भान्ति कुतोऽयमग्निः । | न वीज तळपूं शके, कुठुन अग्निची थोरवी । |
| तमेव भांतमनुभाति सर्वम् । | प्रकाशमय तो स्वयें, इतर सर्व त्याच्यामुळें । |
| तस्य भासा सर्वमिदं विभाति ।१४ | प्रभा तदिय फांकली म्हणुन विश्व हें भासलें ॥१४॥ |

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
| --- | --- |
| एको हसः भुवनस्यास्य मध्ये । | असे त्रिभुवनामधें प्रभुच मोह जो नाशितो । |
| स एवाग्निः सलिले संनिविष्टः । | प्रपंच सलिलीं वसे अनल नित्य जो तोच तो । |
| तमेव विदित्वा अतिमृत्युमेति । | तयास जरि जाणिलें तरिच मृत्यु ये जिंकितां । |
| नान्यः पन्था विद्यतेऽयनाय ।१५ | न अन्य पथ ज्यामुळें सपदि मोक्ष लाभे जितां ॥ १५ ॥ |
| स विश्वकृद् विश्वविदात्मयोनि- | असे सकलजाणता सकल विश्वकर्ताहि तो । |
| र्ज्ञः कालकालोगुणी सर्वविद्यः । | स्वतांस प्रसवी स्वयें, प्रलयिं कालही नाशितो । |
| प्रधान क्षेत्रज्ञ पतिर्गुणेशः । | जड प्रकृति, जीव ही, गुण तसे जया अंकित । |
| संसारमोक्षस्थितिबंधहेतुः ॥१६॥ | कृपें तदिय चक्र हें जननमृत्युचें लोपत ॥ १६ ॥ |
| स तन्मयो ह्यमृत ईशसंस्थो । | महेश अविनाशि तो स्थिरचरांत आत्माच तो । |
| ज्ञः सर्वगो भुवनस्यास्य गोप्ता । | अकुंठित गती तसा त्रिभुवनांस संरक्षितो । |
| य ईशेऽस्य जगतो नित्यमेव । | प्रशासक सनातन प्रभु जगीं असे एकला । |
| नान्यो हेतुर्विद्यत ईशनाय ।१७ | समर्थ न कुणी दुजा जगतिं शासनीं देखिला ॥ १७ ॥ |
| यो ब्रह्माणं विदधाति पूर्वम् । | पुरा स्वशरिरांतुनी प्रगटवूनि ब्रह्मा जयें । |
| यो वै वेदांश्च प्रहिणोति तस्मै । | दिले सकल वेदही मग तया विधात्या स्वयें । |
| तं ह देवं आत्मबुद्धिप्रकाशम् । | अखंडित तरीहि तो प्रभु तसा अकर्ता असे । |
| मुमुक्षुर्वै शरणमहं प्रपद्ये ॥ १८ ॥ | निरंजनहि शांतसा, लवहि दोष त्यातें नसे ॥१८॥ |
| निष्कलं निष्क्रियं शान्तम् । | जणों परम सेतु हा सरळ अमृतत्वाप्रती । |
| निरवद्यं निरंजनम् । | हुताशनचि या कृती सकल भक्षुनी आहुती । |
| अमृतस्य परं सेतुम् । | तया प्रभुवरा प्रकाशितनिजात्मरूपेश्वरा । |
| दग्धेन्धनमिवानलम् ॥ १९ ॥ | मुमुक्षुजन हा असे शरण आश्रयार्थी खरा ॥ १९ ॥ |
| यदा चर्मवदाकाशम् । | पटासम जरी हटें गगन येइ गुंडाळितां । |
| वेष्टयिष्यन्ति मानवाः । | समर्थ जरी जाहले मनुज एवढें तत्त्वतां । |
| तदा देवमविज्ञाय । | तरी प्रभुकृपेविणें, तरिच आत्मबोधाविणें । |
| दुःखस्यान्तो भविष्यति ॥ २० ॥ | सरूनि भवदुःखही सुखद मानवाचें जिणें ॥२०॥ |

| मूळ श्लोक | मराठी भावदर्शिका |
|---|---|
| तपःप्रभावाद् देवप्रसादाच्च ।<br>ब्रह्म ह श्वेताश्वतरोऽथ विद्वान् ।<br>अत्याश्रमिभ्यः परमं पवित्रम् ।<br>प्रोवाच सम्यगृषिसंघजुष्टम् ॥ २१ | फळलें तप उग्र दिव्यसें ।<br>वरि झाला प्रभुचा प्रसादही ।<br>मग श्वेताश्वतरां मुनीवरां ।<br>कळलें अंतिम सत्यब्रह्महि ॥<br>ऋषिवर्यें बहु मानिलें जया ।<br>शुभ तें ज्ञान पवित्र मंगळ ।<br>कथिलें मुनिनें यथामती ।<br>मग संन्यासपरां यतीवरां ॥ २१ ॥ |
| वेदांते परमं गुह्यम् ।<br>पुराकल्पे प्रचोदितम् ।<br>नाप्रशांताय दातव्यम् ।<br>नापुत्रायाशिष्याय वा पुनः ॥२२ | वेदांताचें सार थोर हें जाण ।<br>कल्पारंभीं स्थापिलें हेंच ज्ञान ।<br>दुर्वृत्तातें हीन शिष्यासुता वा ।<br>द्यायाचा ना हा कधींहि न ठेवा ॥ २२ ॥ |
| यस्य देवे परा भक्तिः ।<br>यथा देवे तथा गुरौ ।<br>तस्यैते कथिता ह्यर्थाः ।<br>प्रकाशन्ते महात्मनः ॥ २३ ॥ | देवापायीं शुद्ध भक्ती जयाची ।<br>ज्यानें सेवा साधिली सद्गुरूची ।<br>ऐशा सत्पात्रास हें ज्ञान द्यावें ।<br>तें तच्चित्तीं तेज त्याचें खुलेल* ॥ |

प्रकाशन्ते महात्मन इति ।

---

*ही समश्लोकी चि. गोविंद सदाशिव फडके, बी. ए., एल्एल्. बी. यांनीं रचली आहे.

# प्रार्थना

आतां विश्वात्मकें देवें। येणें वाग्यज्ञें तोषावें। तोषोनि मज द्यावें। पसायदान हें ॥ १७९३ ॥ जे खळांची व्यंकटी सांडो। तयां सत्कर्मी रति वाढो। भूतां परस्परें पडो। मैत्र जीवाचें ॥ ९४ ॥ दुरिताचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो। जो जें वांछील तो तें लाहो। प्राणिजात ॥ १७९५ ॥ वर्षत सकळ मंगळीं। ईश्वरनिष्ठांची मांदियाळी। अनवरत भूतळीं। भेटो तयां भूतां ॥ ९६ ॥ चलां कल्पतरूंचे अरव। चेतनाचिंतामणीचे गांव। बोलते जे अर्णव। पीयूषाचे ॥ ९७ ॥ चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन। ते सर्वांही सदा सज्जन। सोयरे होतु ॥ ९८ ॥ किंबहुना सर्व सुखीं। पूर्ण होऊनि तिहीं लोकीं। भजिजो आदि पुरुषीं। अखंडित ॥ ९९ ॥ आणि ग्रंथोपजीविये। विशेषीं लोकीं इये। दृष्टादृष्ट विजयें। होआवें जी ॥ १८०० ॥ तेथ म्हणे श्रीविश्वेशरावो। हा होईल दान पसावो। येणें वरें ज्ञानदेवो। सुखिया जाला ॥ १८०१ ॥

॥ ॐ तत्सत् ब्रह्मार्पणमस्तु ॥